

तुकाराम तुकाराम । नाम घेता कांपे यम ॥ धन्य तुकोबा समर्थ । जेणें केला पुरुषार्थ ॥
जळीं दगडासहित वह्या । तारियल्या जैशा लाह्या ॥ म्हणे रामेश्वरभट्ट द्विजा । तुका विष्णु नाहीं दुजा ॥



माझी विठ्ठल माउली । प्रेमपान्हा पान्हायेली ॥ कुर्वाळूनि लावी स्तनीं । न वजे दुरी जवळूनि ॥
केली पुरवी आळी । नव्हे निष्ठुर कोंवळी ॥ तुका म्हणे घांस । मुखीं घाली ब्रह्मरस ॥

## भक्तिभावाने समर्पण



-: मातृकृपांकित :-

. तीर्थरूप कै. नरहरशास्त्री जोशी, खरशीकर.

तुमच्या मुखातून लहानपणापासून कीर्तन प्रवचनातून ज्ञानेश्वरतुकारामांच्या अमृतमधुर वाणीचा संस्कार प्रथम झाला. जेवढे देण्याजोगे होते तेवढे तुम्ही संतोषाने व मुक्त हस्तानी दिले त्यातील माझ्या चिमटीत किती आले कुणास माहीत? परंतु तुमच्याच स्मरणातून साकार झालेली ही प्रकृती तुमच्याच चरणांवर भक्तिभावाने समर्पित करीत आहे

— प्रल्हाद

# श्रीतुकाराम महाराजांच्या चरणी स्तुतिसुमनांजली

दळणी कांडणीं गाइन मनाळीं । कान्हो वनमाळी प्राणसखा ॥ १ ॥
हरीचिया नामें हरती महादोष । तुटती कर्मपाश निमिषमात्रें ॥ २ ॥
सद्गुरुरायाची पाउले गोमटीं । वंदिताचि भेटे हृदयस्थ ॥ ३ ॥
माझ्या सद्गुरुचे अवलोकिता मुख । समाधीचे सुख तुच्छ वाटे ॥ ४ ॥
सद्गुरुरायाचे स्वरूप पहाता । विश्वीं एकात्मता भासो लागे ॥ ५ ॥
नित्य सद्गुरुची आळविता नामें । येती निजधामें भेटों सर्वे ॥ ६ ॥
सद्गुरु स्वामीचा महिमा अगाध । वचनेचि बोध करी शिष्या ॥ ७ ॥
सद्गुरु सद्गुरु करिता उच्चार । येती हरीहर भेटो सवे ॥ ८ ॥
सद्गुरुच्या नामें पोट माझे धाय । आनंदाचा होय पान्हुणेरु ॥ ९ ॥
निळा म्हणे माझ्या सद्गुरुची मूर्ती । सकळांही विश्रांति विश्रांतीसी ॥ १० ॥

—निळोबा

ऐशा रीतीं प्रेमळ तुका । चित्तीं आठवी वैकुंठनायका ।
तो गगनीं झळके गरुडटका । निजभक्त सखा येतसे ॥ १ ॥
खग वहनीं वैकुंठपती । अकस्मात उतरले क्षितीं ।
पीतांबराची झळके दीप्ती । तेणें गभस्ती लोपला ॥ २ ॥
ठाण साजिरें सुकुमार । जघनीं शोभती दोन्ही कर ।
दिव्य कुंडले मकराकार । श्रीमुख मनोहर हरीचें ॥ ३ ॥
दिव्य कौस्तुभ वैजयंती । मयूर पिच्छें शिरीं असती ।
तुळसी हार गळा मिरविती । देखिता विश्रांती होय जीवा ॥ ४ ॥
रुक्मिणिसहित सारंगधर । उभा तुकयाचे समोर ।
चहू भुजीं धरणाधर । आलिंगन सत्वर दे तया ॥ ५ ॥
मग सावध होऊनि उठाउठी । उघडोनि पाहे दृष्टी ।
सगुणस्वरूप पाहता दृष्टी । चरणीं मिठी घातली ॥ ६ ॥
जैसी माता तान्ह्याकारणें । हृदयीं धरीत निजप्रीतीनें ।
तैशाच रीतीं जगज्जीवन । तुकयाकारणे सबोखी ॥ ७ ॥

—महीपती

दूत यमासि कथिति कीं निर्मुनि हरिभजनसेतु कागाळी ।
एकेना बळ इतरा धर्मचि तिळ नसे तुका गाळी ॥ १ ॥
मेघें न तर्पिला तो सुतृषित चातक करील शा जितुका ।
जो जो मुमुक्षु त्यातें त्याते करितो सुतृप्त आजि तुका ॥ २ ॥
शरणागतें वहाता वेचिल देऊनि ओ तुका मास ।
येइल पर साधु तसा व्याघ्रापरि काय ओतु कामास ॥ ३ ॥
घृता पळात पुण्यें जरि म्हणता काय शक्र तुकया धू ।
वाटे याची माता जेंवो करि तेवि न कधु कयाधू ॥ ४ ॥
भक्तिरसचि मूर्त असा करिति बृहस्पति शतक्रतु कयास ।
कीं वाटे भगवद्यश सुरभोग्य अमृत तन तुकयास ॥ ५ ॥
विमद विराग विमत्सर तृप्ति सदा सुगुण हे तुकारामीं ।
ते कंचे स्वर्गीच्या विविधविषयलाभहेतुकारामीं ॥ ६ ॥
वाटे बहु मानी तो भागवतशिरोवतंस शुक याते ।
कीं जें अनुदिन दचले त्या सद्रसिका तसेचि तुकयातें ॥ ७ ॥
आश्रय विभीषणातें श्रीराम कुसंगहातुकामातें ।
साधु म्हणे व्हावा या मोहत्यागींही हा तुका मातें ॥ ८ ॥

—मोरोपंत

## प्रकाशकाचे निवेदन :

सुमारे पाचसहा वर्षांपूर्वी ज्या सार्थ व सविवरण तुकारामगाथेचा संकल्प आम्ही सोडला होता, त्याची सांगता व पूर्णता या तिसऱ्या खंडाने होत असल्याचे पाहून आमच्या मनास अतिशय आनंद होत आहे संतशिरोमणी श्रीतुकाराम महाराजांच्या अभंगाची सार्थ आवृत्ती चांगल्या स्वरूपात मराठी वाचकांना व विठ्ठलभक्त वारकऱ्यांना उपलब्ध नव्हती कित्येक महत्त्वाच्या अभंगावर रहस्य-बोधक व मर्मग्राही असे विवरण तर यापूर्वी कोणीच केलेले नव्हते म्हणून सार्थ आणि सविवरण गाथेचा संकल्प त्या दयाघन प्रभूच्या कृपेने आणि श्रीतुकाराम महाराजांच्या आशीर्वादाने आम्ही मनात धरिला, तो आज त्यांच्याच कृपाप्रसादाने पूर्ण होत असल्याचे पाहून आम्हास जसा संतोष वाटत आहे, तसाच तो आमच्या असंख्य वाचकांनाही वाटेल यात शंका नाही

श्रीतुकाराम महाराज यांच्या सुमारे सेहेचाळीसशे अभंगांचा हा सार्थ व सविवरण गाथा वाचकांच्या हाती देत असताना या प्रतिकूल काळात अडचणी किती व कशा आल्या याचा पाढा येथे वाचण्याची गरज नाही सन १९६४ सालीच एका पंडित गृहस्थाकडे आम्ही हे काम प्रथम सोपविले परंतु त्यांच्या अनेक अडचणीमुळे त्यांच्या हातून हे काम पूर्ण होत नाहीसे दिसल्यावरून आम्ही एका समर्थ व अधिकारी व्यक्तीच्या शोधात असतानाच म म दत्तो वामन पोतदार यांनी आमच्यावरील लोभामुळे आम्हास पुणे येथील संतवाङ्मयप्रेमी डॉ प्र न जोशी यांचे नाव सुचविले पाश्चात्य विद्येने विभूषित असलेले डॉ जोशी यांच्या घराण्यातच श्रीज्ञानेश्वर–तुकारामादी परंपरेच्या अभ्यासाचा वारसा असल्याने आम्हास ही योजना पसंत पडली व आम्ही त्यांना गाथासंपादनाबद्दल विनंती केली त्यांच्या पाठीमागे विविध व्याप असतानाही त्यांनी हे काम पत्करून आज पूर्ण करीत आणले, याबद्दल समाधान होत आहे

श्रीतुकारामबोवांच्या प्रत्येक अभंगाचा शब्दार्थ, सरळ गद्यार्थ, पाठभेद, विवरण इत्यादी-सहित आमची ही अद्वितीय गाथा लोकादरास प्राप्त होईल अशी खात्री वाटते आमच्या या खटा-टोपाचे चीज होईल असा विश्वास आहे डबल क्राऊन आकाराची दोन हजार पृष्ठे या प्रतिकूल काळात आम्ही प्रसिद्ध केली व तीन खंडात सार्थ तुकारामगाथा पूर्ण केली, ही त्या परमकरुण व भक्तवत्सल पांडुरंगाची व संतश्रेष्ठ तुकोबाचीच कृपा होय आमचे वार्धक्य, महागाई, सप–हरताळ, बँकांची पुनर्-रचना, प्रेसची अडचण, कागदाची टंचाई, ग्रंथकारांची सोयगैरसोय इत्यादी अनेक अडचणीतून आम्ही ही सार्थ गाथा थोडच्या उशीराने का होईना पण प्रसिद्ध करू शकलो याची धन्यता वाटते आमच्या आयुष्यातील हा मोठ्या आनंदाचा व भाग्याचा क्षण आम्ही मानतो आमचे आर्थिक बळ अगदी बेताचे, इतर साहाय्यकारीही कोणी नाही पण श्रीपांडुरंग आमच्या पाठीशी असल्याने त्यानेच हा दिवस दाखविला

'ज्ञानविलास' प्रेसचे श्री मधुकरराव जोशी यांनी या तीनही खंडाचे मुद्रण सुबकतेने व तत्परतेने केल्यामुळे या आमच्या संतवाङ्मयीन कार्याची शोभा वाढली आहे या संकल्पपूर्तीमुळे 'धन्य दिवस आजि डोळियां लाधला । आनंद देखला धणीवरी' या श्रीतुकाराम महाराजांच्या उक्ती-प्रमाणेच आम्हास अनुभव येत आहे तसाच मन तृप्त करणारा आनंद आमच्या वाचकांनाही व्हावा अशी त्या श्रीपांडुरंगचरणी आमची प्रार्थना आहे

आपला नम्र,

**शिवराम वामन आवटी**

## ग्रंथकाराचे मनोगत :

सार्थ व सविवरण अशा तुकारामगाथेचा हा तिसरा व शेवटचा खंड मी संतवाङमयप्रेमी व तुकारामभक्त वाचकाच्या हाती आज देत आहे श्रीपांडुरंगाच्या कृपेने आणि श्रीतुकाराम महाराजांच्या आशीर्वादाने हे एक मोठे संतवाङमयीन कार्य माझ्या हातून पूर्ण झाले याचे मनाला अतिशय समाधान असले तरी अभिमान मात्र थोडासुद्धा नाही इंद्रायणीच्या तीरावरील देहूच्या मातीमधील चैतन्याचा गुणच असा आहे की, माझ्यासारख्या जड व स्थूल बुद्धीच्या माणसासही त्याचा थोडाफार गुण लागावा सुमारे तीन वर्षांपूर्वी म्हणजे सन १९६६ मध्ये मी सार्थ व सविवरण तुकारामगाथेचा पहिला खंड वाचकाच्या हाती दिला त्या खंडात १२५१ पर्यंत अभंगाचा अर्थ व कित्येकाचे विवरण, सूची, तुकोबाचरित्र, तुकाराम महाराजांची अभंगवाणी हा निबंध, इत्यादी मजकूर आलेला आहे गेल्या वर्षी मी या गाथेचा दुसरा खंड वाचकांना सादर केला यात १२५२ पासून २८८० पर्यंतचे अर्थासहित अभंग, विवरण, सूची, धर्माचे पाळण । करणें पाषाड खंडण हा निबंध, इत्यादी मजकूर आलेला आहे. आता या तिसऱ्या खंडात उरलेले २८८१ ते ४६०७ पर्यंतचे अभंग, त्याचे अर्थ, महत्त्वाची विवरणे, सूची आणि तुकोबाचे कवित्व व तत्त्वचिंतन हा निबंध, एवढा मजकूर आलेला आहे

संपूर्ण तुकारामगाथेचे हे काहीसे स्थूल स्वरूप असले तरी एकंदर कार्याचे स्वरूप पहिल्या दोन खंडातील माझ्या निवेदनावरून आणि दुसऱ्या व या तिसऱ्या खंडास जोडलेल्या अधिकारी व्यक्तीच्या अभिप्रायावरून वाचकाच्या ध्यानी नीटपणे येणारे आहे अर्थासाठी व विवरणासाठी मी शंकर पांडुरंग पंडिताची गाथाच का स्वीकारली यासंबंधीही वारंवार स्पष्टीकरण केले आहे. शंकर पांडुरंगी गाथा अगदी निर्दोष व अस्सल आहे असे नाही पण तुकाराम महाराजांच्या अभंगाचा जुन्यातला जुना क्रम याच गाथेत असल्याचे माझे मत झाल्यामुळे मी माझ्या कार्यापुरती हीच गाथा प्रमाण मानली वाङमय, भाषा, शब्दसिद्धी, व्याकरणविशेष, पाठचिकित्सा, तत्त्वज्ञानाचा बारकावा इत्यादी प्रमाणावरून तुकोबाच्या गाथेचे परिशीलन होणे अत्यंत अगत्याचे आहे परंतु माझ्या कामाच्या मर्यादेत ते कार्य महत्त्वाचे असले तरी मी ध्यानात घेतलेले नाही. काही अभंग उघड उघड दुसऱ्याचे वाटतात, काही तर स्पष्टपणे तुकयाबंधूची मुद्रा धारण करतात, काहीच्या ओळी कमीजास्त आहेत, काही दुबार आलेले आहेत, काही महत्त्वाचे अभंग या गाथेत नसतीलही परंतु शंकर पांडुरंगी गाथा एकदा प्रमाण मानून मी अर्थविवरणाच्या उद्योगात रमल्यामुळे वरील उणीवा दिसत असूनही मला त्याकडे दुर्लक्ष करावे लागले आहे फक्त एकच बदल मी संपादनकार्यात केला तो असा की, १०७९, १०८०, १०८१, १०८२ हे दुबार क्रमांकाचे अभंग रामेश्वरभट्टाचे असलेले गाथेतच म्हटले असल्याने मी ते घेतलेले नाहीत आरंभीच्या चारपाच पानात 'स्तुतिसुमनांजली' मध्ये यातील काही आले आहेत त्याचप्रमाणे 'इति बालक्रीडा संपूर्णमस्तु 'च्या नंतर शंकर पांडुरंग प्रतीत 'देहू व तळेगाव या प्रतीत खाली लिहिल्याप्रमाणे ज्याचा आरंभ झालेला नाही असे पंढरपूरच्या प्रतीतले अभंग' या शीर्षकाखालील ३७ अभंगही मी वगळले आहेत

सार्थ व सविवरण गाथेमधील ४६०७ अभंगापैकी काही अभंग दुबार आहेत त्याचा क्रम मी मूळ गाथेशी अनुसंधान राखण्यासाठी आहे तसाच ठेविला आहे पंडिती किंवा सरकारी गाथेप्रमाणे मूळ अभंग, अर्थभेद स्पष्ट करणारे महत्त्वाचे पाठभेद प्रत्येक अभंगातील कठीण शब्दाचे अर्थ, महत्त्वाच्या संदर्भाचा खुलासा, अभंगाच्या ओळीचा सरळ गद्यात अर्थ आणि महत्त्वाच्या अभंगावर उद्बोधक, मर्मग्राही व संतपरंपरेस अनुसरून केलेले विवरण, असे या गाथासंपादनाचे स्वरूप आहे शेवटी त्या त्या खंडातील अभंगाची व विवरणविषयाची सूचीही देण्यात आली आहे

श्रीतुकाराम महाराजाच्या अभंगगाथेची निकड फार दिवसापासून भासत होती पूर्वी १९०९ मध्ये तुकाराम महाराजाच्या अभंगाचा अर्थ विशद करण्याचा फार मोठा प्रयत्न प्रसिद्ध भगवद्भक्त वैकुंठवासी विष्णुबोवा जोग यानी केलेला होता तो एकच प्रयत्न असल्याने व बोवाच्या सप्रदायातील स्थानामुळे त्याला लोकाश्रयही मिळाला परतु पुढे ही गाथा दुर्मिळ होत गेली तिची अर्थबोधाची भाषाही जुनी व काहीशी कठीण वाटू लागली शिक्षणाच्या प्रसारामुळे फार मोठा समाज आज लिहायला, वाचायला लागलेला असल्यामुळे त्याला समजेल अशा सुबोध, सरळ व बोधास धरून नव्याने अर्थ सागणे अगत्याचे होते मध्यतरी चार वर्षापूर्वी ह भ प शकरराव खदारकर यानी तुकोबाच्या अभगावरील आपले गाथाभाष्य प्रसिद्ध केले परतु थोडी आधुनिक चिकित्सा व सुबोध गद्यशैलीची निकड याची जरुरी उरल्यामुळेच मी हे काम तीनचार वर्षापूर्वी हाती घेतले. अनेक महत्त्वाच्या अभगावर विवरणे तर कोणत्याच सार्थ गाथेत नाहीत तुकोबाचे चरित्रप्रसग, त्याची भक्तिसाधना, त्याची गुरुपरपरा, त्याची प्रवृत्तिनिवृत्ती, त्याचा उपदेश, त्याचा सामाजिक दृष्टिकोण, त्याचे अनुभवसपन्न व्यक्तित्व इत्यादी विषयावरील सखोल पण सक्षेपाने विवरण याच गाथेत वाचकाना मिळणार आहे या विवरणामुळे वाचकाना तुकोबाचे हृद्गत अधिक जवळून समजण्यास मदत होईल, असा विश्वास वाटतो तीनही खडात मिळून सुमारे ५०० अभगावर विवरणे आलेली अशी ही एकमेव सार्थ गाथा आहे द्विरुक्ती टाळण्याच्या उद्देशाने पुढे दुसऱ्या व तिसऱ्या खडातून विवरणसख्या कमी झाली असली तरी अगदी नवा वा अपरिचित विषय सोडलेला नाही तुकोबाच्या वाणीचे रहस्य ध्यानी घेण्यास या विवरणाचा उपयोग वाचकाना होईल अशी खात्री आहे

श्रीज्ञानेश्वरतुकारामादी सताच्या वाङ्मयाचा नाद मला लहानपणीच्या सस्कारातूनच लागलेला आहे जावळी तालुक्यातील पाचगणीशेजारचे खरशी हे माझे गाव तीर्थरूप कै नरहरशास्त्री जोशी, खरशीकर याचा लौकिक थोर कीर्तनकार व प्रवचनकार म्हणून मोठाच होता ते अतरगाचे भगवद्भक्तही होत श्रीक्षेत्र माहूर येथील रेणुकादेवीचे गेल्या शतकातील थोर उपासक व भक्तकवी श्रीविष्णुदास हे तीर्थरूपाचे गुरु व सख्खे मामा विष्णुदासाच्या, श्रीरेणुकेच्या, ज्ञानेश्वर-तुकारामाच्या सगतीतच तीर्थरूपाचे बहुतेक सर्व आयुष्य गेले पहाटे अभूला जागे करणाऱ्या भूपाळीपासून ते रात्री एखादी देवादिकाची अथवा देवभक्ताची गोष्ट ऐकून झोपण्यापर्यंत मनावरील सर्व सस्कार या वातावरणाचे झाले. रामकृष्ण, विवेकानद, रामतीर्थ याचे वाङ्मय तर नवव्यादहाव्या वर्षापासूनच माझ्या वाचनात आले शेतीचे कामधाम आटोपून निवातपणे रात्री अमृतानुभव अथवा ज्ञानेश्वरी ऐकण्यासाठी घरी अनेक शेतकरी जमा व्हायचे त्याना लिहिता वाचता येत नव्हते, पण त्याची समजशक्ती ऐकून ऐकून चागलीच वाढली होती त्यावेळच्या निरूपणातील सुबोधता आणि सतबोधाचे मर्म कळत का हाईना पण मनावर ठसत होते पुढे बी ए एम ए ला मराठी साहित्याचे अध्ययन केले हिंदी सतकवी समजावून घेण्याच्या निमित्ताने बनारसची एम् ए ची परीक्षा दिली पीएच डी साठीही भक्तिशास्त्रातीलच विषय निवडला पण इतके सर्व पुस्तकी अध्ययन करूनही सतबोधाचे मर्म समजते असे नव्हे त्यासाठी तीर्थरूपाची पुण्याई व सतश्रेष्ठांचा आशीर्वाद हेच माझे खरे पाठबळ होते त्याच्याच साह्याने मी हे मोठे वाङ्मयीन कार्य पार पाडू शकलो यातील सर्व उणीवा मात्र माझ्या आहेत चागुलपणाचा सर्व वाटा मात्र श्रीतुकाराम महाराजाचा आहे

डबल क्राऊन आकाराचे सुमारे दोन हजार पृष्ठाचे तीन खड या दिवसात छापून प्रसिद्ध करण्याचे धाडस मुंबईच्या श्रीभारतबुक डेपोचे श्री शिवराम वामन आवटी यानी केले, हीही त्या दयाघन पाडुरगाचीच कृपा म्हणावयास हवी श्री आवटी याचे वय झाले असतानासुद्धा काम लौकर उरकण्याबद्दल मला त्याची सतत प्रेरणा असे. काम चागले पण जलद व्हावे म्हणून ते तगादा लावीत हाती घेतलेले एक थोर व शाश्वत टिकणार कार्य शक्य तितक्या लौकर पूर्ण व्हावे अशी त्याची इच्छा

श्री आवटी हे काही तसे सधन प्रकाशक नाहीत, पण तुकोबाच्या वाङ्मयावरील मनापासूनच्या प्रेमामुळे त्यानी हिंमत धरली व प्रसगी मलासुद्धा प्रोत्साहन दिले पैशाची जमवाजमव, छापखान्याचा शोध, चागल्या कागदाची प्राप्ती, रोजच्या धद्याची सोयगैरसोय, गाथेच्या ग्राहकाचा उशीर होत असल्याबद्दलचा तगादा, इत्यादी अडचणीनी ग्रासून न जाता शातपणाने हे मोठे कार्य छापून वाचकाच्या स्वाधीन केले ही गोष्ट त्याना मोठीच भूषणावह आहे जोडलेले थोडेफार धन उत्तम व्यवहारात खर्च करण्याची प्रेरणा त्याना श्रीपाडुरगकृपेने झाली तिचे सार्थक वाचकानी उदार मनाने करावे

या तिसऱ्या खडासाठी मराठीतील एक ज्येष्ठ सतवाङ्मयसेवक प्रा श्री ना. बनहट्टी यानी पुरस्कारादाखल चार शब्द लिहिले आहेत श्री दादासाहेब बनहट्टी याचा लोभ तीर्थरूपाच्या वेळेपासूनचा आहे त्यानी तो जुना धागा परिपुष्ट करण्याचा प्रयत्न केल्यामुळे सार्थ तुकारामगाथेस प्रतिष्ठा लाभलेली आहे ज्ञानविलास प्रेसचे चालक श्री मधुकरराव जोशी व त्याचे सुपुत्र रा प्रकाश जोशी यानी गाथा-मुद्रणाच्या प्रसगी ग्रथकाराला व प्रकाशकाला वारवार साभाळून घेतले आहे प्राचीन सतवाङ्मयाची छपाई तशी जिकिरीची, पण जोशी पितापुत्रानी मला विशेष प्रकारे साभाळून घेतले हे त्याच्याही सतप्रेमी घराण्यास शोभून दिसणारे आहे गेल्या पिढीतील एक परमार्थसाधक व सतप्रेमी कै बाळकृष्ण भाऊराव जोशी याचे चिरजीव श्री मधुकरराव जोशी; तेव्हा सौजन्याचा व उदारतेचा वारसा त्यानी साभाळला हे परपरेस शोभणारेच झाले अशाच महत्त्वाच्या पुढील कार्यात त्याचे सहकार्य लाभेल अशी खात्री मला आहे सार्थ तुकारामगाथेच्या या सगुण दर्शनात 'ज्ञानविलास'मधील कामगाराचाही वाटा फार मोठा आहे त्यानीही ममत्वाने व आपुलकीने या कार्याकडे पाहिले

शेवटी आणखी एका बाबीचा उल्लेख करून हे मनोगत आटोपते घेतो एक योगायोगाची गोष्ट अशी की, बरोबर शभर वर्षांपूर्वी म्हणजे सन १८६९ साली मी जिचा आधार घेतला ती तुकाराम-गाथा विष्णु परशुरामशास्त्री पडित व शकर पांडुरग पडित, एम् ए यानी नामदार मुबई सरकारच्या आश्रयाने छापून प्रसिद्ध केली खरे म्हणजे फुटकळ स्वरूपात तुकोबाचे अभग मुद्रित व्हावयास सन १८४४ पासूनच प्रारभ झाला होता पुढे त्यावेळच्या ब्रिटिश राज्यकर्त्यांचे लक्ष तुकारामबुवाच्या अभगसपदेकडे जाऊन त्यानी या कामी पुढाकार घेतला. मरे मिचेल या महाराष्ट्रीय मिशनऱ्याने तुकारामाच्या अभगाचा चागलाच अभ्यास केला. त्यानतर सन १८६७ मध्ये त्या वेळचे डायरेक्टर ऑफ् पब्लिक इन्स्ट्रक्शन सर अलेक्झाडर ग्रट यानी 'फॉर्टनाइटलि रिव्ह्यू' मध्ये तुकारामावर एक निबध लिहून प्रसिद्ध केला त्यात त्यानी म्हटले, 'हे अभग म्हणजे देवाच्या सतत सान्निध्यात असलेल्या हृदयाचे निरनिराळ्या प्रसगी आणि वेगवेगळ्या भावनाच्या आवेशात, पक्ष्याच्या कूजिताप्रमाणे सहज गाइलेले उद्गार होत ज्याच्या मुखी तुकारामाची वाणी वसत आहे त्याना नैतिक दृष्ट्या ख्रिस्ती धर्म श्रेष्ठ आहे हे पटवून देणे दुरापास्त आहे'

एका शिक्षणाधिकाऱ्याने सुमारे शभर वर्षांपूर्वी काढलेले हे उद्गार अतिशय सार्थ आहेत ग्रँट साहेबाने नुसता निबधच लिहिला असे नाही, तर तुकारामबुवाची गाथा नीटनेटक्या स्वरूपात प्रसिद्ध करण्याचे काम वरील पडितद्वयावर सोपविले. त्यावेळी या कामासाठी मुबई सरकारने चोवीस हजार रुपये खर्च केले तुकोबाच्या या लौकिक गौरवावर लिहिताना विष्णुशास्त्री चिपळूणकरानी आपल्या नेहमीच्या मिष्कील शैलीत लिहिले, "जो बिचारा शूद्रकवी आपल्या लगोटेबहाद्दर व धोगडीवाल्या भक्तमडळीतच काय तो रमायचा, फार झाले तर हरदासाच्या कथाप्रसगी सत्कार पावायचा, त्यास एकाएकी अरबी गोष्टीतील अबू हसनाप्रमाणे मोठे ऐश्वर्य प्राप्त झाले! इदुप्रकाश मुद्रणयत्रालयातील मुक्ताफळे अगभर उधळलेली, महावस्त्रात शरीर लपटलेले व युनिव्हर्सिटीचे शानदार शगे घातलेले तरुण विद्वान डोक्यावर मोर्चेल उडवताहेत व चवऱ्या ढाळताहेत अशा थाटाने तुकाराम महाराज फार दिवसानी आपल्या अभिधानाची सार्थकता पावून विराजमान झाले महाराष्ट्र देशाच्या पहिल्या अधिपतीने

पाठवलेले ऐश्वर्य परत लावून वरील कवीने जी आपली हानी करून घेतली होती तिची भरपाई दोन शतकानंतर त्याच देशातल्या परद्वीपस्थ प्रभूने करण्याचे मनात आणिले की काय कोण जाणे ! असो. झाली ही गोष्ट वरीच झाली. " याच गाथेचे देखणे पुनर्मुद्रण सन १९५० साली त्या वेळच्या मुंबई सरकारने केले आणि आज तीवरच प्रथम प्रकाशनाच्या बरोबर शंभर वर्षांनी अर्थ-विवरणाचे हे लेणे लोकाश्रयाच्या साहाय्याने चढविले आहे.

गेल्या तीनचार वर्षांत मी सार्थ तुकारामगाथेच्या कामात रमून गेलो होतो. तुकोबाच्या दिव्य अनुभूतीत व त्याच्या जागृक समाजचिंतनात मी तल्लीन झालो होतो नवीन विज्ञानाच्या चिकित्सेत माझे मन रमते हे मराठी वाचकाना माहीत आहे. परंतु नवविज्ञानाच्या साहाय्याने प्राप्त झालेल्या साधनसामग्रीचा वापर करण्याची योग्य बुद्धी आज माणसास संतबोधामुळेच प्राप्त होईल हे मी अनेकदा बोललो आहे, लिहिले आहे. भौतिकाच्या नादाने बेताल होणाऱ्या माणसास माणुसकीची आठवण या सार्थ तुकारामगाथेने करून दिली तरीसुद्धा मला समाधान वाटेल. एऱ्हवी तुकोबासारखा अज्ञाताचा शोध घेताना 'नित्य नवा दीस जागृतीचा' अनुभव घेणारा एखादाच. असो.

श्रीतुकाराममहाराजांच्या सार्थ गाथेचा हा उपक्रम अनेकाना सत्प्रेरणा देणारा ठरावा आणि असत्य प्रापंचिकांच्याही चित्तास गारवा देणारा वाटावा यात मला मोठे समाधान आहे. महाराष्ट्राचे हे अलौकिक असे सांस्कृतिक धन मी थोडा उजळा देऊन मराठी वाचकापुढे ठेवीत आहे इतकेच. मूळचे नाणेच शंभरनवरी व खणखणीत आहे. मी फार तर भारवाही हमालाची भूमिका घेऊन तुकोबाचे रहस्य सर्वसामान्य माणसाच्या आटोक्यात आणून उभे करण्याचा प्रयत्न केला आहे. माझ्या मर्यादा मला पूर्ण माहीत आहेत. माझ्या उणीवाही मला ठाऊक आहेत. अपेक्षेपेक्षा थोडा उशीरच हे काम पूर्ण करण्यास झालेला आहे ही जाणीवही मनास टोचत आहे. पण उदार व सहृदय वाचकाना विनंती की, त्यानी मला विसरावे आणि श्रीविठ्ठलाच्या व श्रीतुकोबाच्या भक्तिप्रेमात तल्लीन व्हावे. या श्रीतुकाराम महाराजानी ज्या श्रीज्ञानदेवाची परंपरा चालविली, ज्याच्या भागवत धर्माच्या इमारतीवर कळस चढविला, त्या श्रीज्ञानदेवाची 'सार्थ व सविवरण अभंगगाथा' मी लौकरच याच पद्धतीने हाती घेत आहे. हेही कार्य पूर्ण करण्यासाठी त्या दयाघन विठ्ठलाने आणि श्रीज्ञानदेवतुकारामानी मला सर्व प्रकारचे बळ द्यावे एवढीच त्यांच्या पायाशी विनवणी आहे. माझा अधिकार मी ओळखून आहे. पण या देवतांचा अधिकार मला चांगलाच परिचयाचा असल्याने शेवटी तुकोबाच्याच शब्दांतून प्रार्थना करीत आहे–

'मागणें तें एक तुजप्रती आहे । देशी तरी पाहें पांडुरंगा ॥ १ ॥
या संतांसी निरवी हेंचि मज देई । आणिक दुजें कांहीं न मागें तुज ॥ २ ॥
तुका म्हणे आतां उदार तूं होई । मज ठेवीं पायीं संतांचिया ॥ ३ ॥'

—प्र. न. जोशी

'रेणुका,' लक्ष्मीपार्क
नवी पेठ पुणे, ३०

दुसरी आषाढी एकादशी १८९१
आठ ऑगस्ट १९६९

## पुरस्कार :

लेखक **प्रा श्रीनिवास नारायण बनहट्टी**

तुकाराम महाराजाची वाणी हा आपला अभग ठेवा आहे जीवनाचा दीपस्तभ आहे. मनन-चिंतामणि आहे सामान्य माणसाला मननाचे इतके सामर्थ्य नसते. अभगवाणीची ओढ तर त्याला असते, पण तिच्या अतरगात शिरून बोधाची रत्ने हस्तगत करण्याचे काम त्याला कित्येक वेळा बिकट वाटते साध्या भाषेत सरळ गद्यात अर्थ सागितला तर अतरगात प्रवेश करण्याचा मार्ग थोडा सुलभ होईल अशा धारणेने सरळ अर्थासह अभगाची गाथा प्रसिद्ध करण्याचा उपक्रम सुरू झाला वारकरी सप्रदायाचे प्रमुख वैकुठवासी विष्णुबोवा जोग यानी शके १८३१ साली महाराजाच्या अभगाची सार्थ गाथा प्रसिद्ध केली तिची दुसरी आवृत्ति सुमारे वीसबावीस वर्षांनी प्रसिद्ध झाली''पण तीही पुढे दुर्मिळ झाली

मध्यतरी अर्थासह तुकारामबोवाचे अभग प्रसिद्ध करण्याचे आणखी कित्येक प्रयत्न झाले पटवर्धन आणि वेळकर या प्राध्यापकद्वयाने काही महत्त्वाच्या अभगाचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करून 'तुकारामाच्या अभगाची चर्चा' या नावाने एक ग्रथ प्रसिद्ध केला श्री बाबाजी गणेश पराजपे यानी भिजलेल्या वहीचे अभग ७५१ अर्थासह प्रसिद्ध केले (इ स १९५०) अलीकडे खदारकरबुवा यानी तुकारामाची सपूर्ण गाथा अर्थासह प्रसिद्ध केली आहे डॉ प्रल्हाद नरहर जोशी याचा हा प्रयत्न सर्वांत अलीकडचा आणि प्रशस्त होय

आकाराचा आणि माडणीचा प्रशस्तपणा हे तीन खड पाहताच लक्षात येण्याजोगा आहे प्रत्येक चरणाला स्वतत्र ओळ, याप्रमाणे ठळक ठशात छापलेले अभग, दुर्बोध शब्दाचा अर्थ आणि *त्यानतर चरणवार सरळ गद्यामध्ये अर्थ, ही माडणी सामान्य वाचकाला तेव्हाच पटणारी आहे आणखी* विशेष असा की, अभगातील विषयाची खुलावट करण्याकरिता प्रल्हादपतानी काही ठिकाणी 'विवरण' जोडले आहे विवरणामध्य अभगातला विषय अधिक स्पष्ट तर केला आहेच, शिवाय त्याला पोषक *असे दाखले इतर ग्रथातून किंवा सतवचनातून देऊन त्याचा फैलावा केला आहे यासबधात उदाहरणा-*दाखल क्र ३०६९, ३५७१, ३५७२ या अभगाचा उल्लेख करता येईल अभग ३०६९ मध्ये

तरुवर बीजापोटी । बीज तरुवरा शेवटी ॥

अशा रीतीने २-३ दृष्टान्त देऊन सृष्टि आणि परमेश्वर याच्यामधील सबध स्पष्ट करण्याचा तुकोबानी यत्न केला आहे, सृष्टि परब्रह्माचे कार्य आहे, की परिणाम आहे, की विकार आहे, की नुसता विस्तार आहे ? प्रल्हादपतानी या अभगावरील विवरणात आपल्या वेदान्तातील भिन्न मताचा थोडक्यात उल्लेख करून ज्ञानदेवीच्या नवव्या अध्यायातील सुदर उताऱ्याचे अवतरण केले आहे (ज्ञानदेवी ९ ६४-६७) आणि या ज्ञानदेववचनाचे जे मार्मिक विशदीकरण पागारकराच्या लेखात आले आहे त्याचाही उतारा घेतला आहे या सगळ्यामुळे हे विवरण फार खुलले आहे अभगक्र ३५७१ मध्ये बुवा म्हणतात,

होते तेचि असो द्यावे । रूप सौम्यचि बरवे ॥ २ ॥
भया भेणें तुमचा ठाव । तुमच्या कोपें कोठें जावे ॥ ३ ॥

'तुमचे सौम्य रूप आहे तेच चागले, तुमच्या उग्र रूपाच्या भीतीने आम्ही कोणत्या स्थानाचा उपयोग करावा ? तुमचा राग झाला तर आम्ही जावे कुठे ?' असा याचा अर्थ प्रल्हादपतानी केला आहे परमेश्वराचे सौम्य रूप आणि भयानक रूप याना त्यानी गीतेच्या अकराव्या अध्यायाचा आधार घेतला आहे, आणि आपल्या 'विवरणा'मध्ये विराट विश्वरूपाच्या दर्शनाने अर्जुनाची भीतीने कातर अवस्था

झाली तिचे आणि सौम्यरूप दर्शनाने झालेल्या शांत स्थितीचे ज्ञानदेवीतील वचनाच्या साह्याने वर्णन केले आहे अभंग क्र ३५७२ मधील

प्रेम नये सांगता बोलता दाविता । अनुभव चित्ता चित्त जाणे ॥

या चरणावरून प्रेमाचे अनिर्वचनीय स्वरूप वर्णन करण्यात प्रल्हादपंतांची वाणी रमली आहे जाता जाता नारदभक्तिसूत्राचा आधार त्यांना घ्यावासा वाटला आहे

अशा रीतीने विवरणामधून अध्यात्म, भक्ति या विषयाचे बरेचसे व्यापक ज्ञान आणि बहुश्रुतता वाचकाच्या अंगी बाणेल अशा तऱ्हेची योजना प्रल्हादपंतांनी करून ठेवली आहे

अभंगाचा अर्थ प्रल्हादपंतांनी अगदी साध्या रीतीने सांगितला आहे पद्याचे गद्य आणि जुन्या शब्दांच्या जागी सध्या प्रचलित असलेले शब्द ठेवणे, एवढेच त्यांनी सामान्यत केले आहे ते खोलात शिरलेले दिसत नाहीत तुकोबांच्या कित्येक अभंगांचा अर्थ गहन असतो, आदाय आसमंतात विखुरलेल्या चंद्रकिरणात न्हालेल्या वस्तुप्रमाणे अर्धस्फुट असतो, अनेक ध्वनितांच्या सूक्ष्म छटांनी विकीर्ण असतो या सर्वांना हात घालायचा म्हणजे एकेका अभंगावर एकेक प्रवचन हवे प्रल्हादपंतांनी सरळ गद्यार्थ सांगून वाचकाला मति गुंगविणाऱ्या दालनाच्या उंबरठ्यापर्यंत आणले आहे हे त्यांनी अगदी योग्य असे केले आहे अंतरंगअनुभव आणि आस्वाद ज्याचा त्याचा स्वतंत्र असणार आणि असावा, तो सगळ्यांचा एका छापाचा असेल असे नाही त्यांनी दिलेल्या सरळ गद्यार्थात देखील मतभेदाची स्थळे आढळतील अन्वय, रोख आणि अन्त सदर्भ लक्षात घेता, त्यांनी दिलेल्या अर्थाहून निराळा अर्थ निष्पन्न होतो असे वाटेल पण एवढ्या मोठ्या प्रयत्नात असे काही प्रकार चालायचेच मतभेदावर किंवा अपार्थतेवर भर देण्याचे कारण नाही साडेचारहजारावर अभंगांचा अर्थ लिहून काढणे, त्यापैकी कित्येकांवर विवरणे लिहिणे, हे काम केवढे प्रचंड ! ते पार पाडण्यास आवश्यक असलेल्या चिकाटीचे आणि उद्यमशीलतेचे भरलेल्या मनाने कौतुक करणे हेच आम्हाला आवडते, योग्य वाटते

प्रल्हादपंतांना फार मोठा वारसा लाभला आहे त्यांचे पितृदेव नरहरशास्त्री खरशीकर उच्चकोटीचे साधुपुरुष होते तुकारामादि संत कसे असतील याची यथार्थ कल्पना ज्यांच्यावरून व्हावी असे ते सत्पुरुष होते अंत करणाचा प्रेमळपणा आणि संतवाणीची आवड शास्त्रीबुवांच्यापासून प्रल्हादपंतांना लाभली प्रेमळपणा स्वभावातच आहे, आणि संतवाणीची आवड त्यांनी आस्थापूर्वक जोपासली आहे. प्रस्तुतचा भव्य प्रयत्न हे तिचेच फळ आहे त्या पूज्य गुरुरूप जनकाच्या आशीर्वादाने या तिसऱ्या खंडाच्या रूपाने हे धर्मकार्य आज शेवटास जात आहे, याबद्दल वाटणारा आनंद व्यक्त करून थांबतो

पुणे, ज्येष्ठ शु १२
गुरुवार, शके १८९१

—श्री ना बनहट्टी

# सार्थ तुकारामगाथा-गौरव

गेल्या वर्षी प्रसिद्ध झालेल्या सार्थ तुकारामगाथेच्या दुसऱ्या खंडावर विद्वान व अधिकारी व्यक्तींनी जे अभिप्राय वृत्तपत्रातून प्रकट केले त्यातील निवडक येथे दिले आहेत सार्थ तुकारामगाथेचे अनेक विशेष व एकदरीत स्वरूप याचे नेटके व सगुण दर्शन यामुळे वाचकाना होण्यासारखे आहे

१ : मराठा, दि ३ नोव्हेंबर १९६८

## आनंद मिळवून देणारा साहित्यसागर

श्रीतुकाराम महाराज वैकुंठवासी झाल्याला आता तीनशे एकोणीस वर्षे झाली, पण या तीन शतकामध्ये महाराष्ट्रात असा एकहि हतभागी इसम जन्माला आला नसेल की, ज्याने तुकोबाची अभगवाणी स्वत कधी ऐकली–उच्चारली नसेल ! **'ओवी ज्ञानेशाची अभगवाणी प्रसिद्ध तुकयाची'** या आर्यार्धात म्हटल्याप्रमाणे महाराष्ट्रात ज्ञानेश्वरी आणि गाथा सर्वप्रसिद्ध आहेत ज्ञानेश्वरी हा विद्वानाचा *विषय मानला जातो तर तुकोबाची गाथा हा सामान्याचा जिवलग मानला जातो बहिणाबाईनी म्हटले* आहे की, **' महाराष्ट्र शब्दात वेदातीचे अर्थ ! बोलिला लोकात सर्वद्रष्टा '** ज्ञानेश्वरानीही सस्कृतातील तत्त्वज्ञान मराठी भाषेत आणिले तुकोबारायानी ते वेदातीचे विवरण आपल्या प्रासादिक अमृततुल्य अभगाच्या रूपाने महाराष्ट्रात सर्वतोमुखी नेहमी वावरत राहील अशी चोख व्यवस्था करून टाकली. या दृष्टीने मोरोपत जे म्हणतात की, **' नारदमुनिसा सुयशें बहुमत सज्जनमना तुकोबा हो '** हें अगदी खरे आहे नारदाप्रमाणेच तुकोबाची *अभगवाणी सर्वगामी आहे, एवढेच नव्हे तर नारदाप्रमाणेच ती सर्वत्र* सदैव लोकप्रियहि होत आलेली आहे तुकोबारायानी आपल्या अमर अभगवाणीने **'अवघा जिकला ससार'** याबद्दल दुमत होणार नाही अगदी साध्या सोप्या शब्दात अत्यत अवघड अशी जीवनानुभूति किंवा अतिशय गुतागुतीचा असा तत्त्वविचार तुकाराम महाराज सहजगत्या माडून जातात ! हा चमत्कार पाहिला की, **' अपार कवित्वशक्ती मिरवुनि इहलोकीं '** अशी जी त्याची प्रशसा निळोबारायानी *केलेली आहे तिची सत्यता पटते तुकारामानी अतिसुदर, तत्त्वमधुर, चिंतनप्रचुर काव्य रचलें आहे,* तसेच विपुल प्रमाणातहि त्यानी अभगरचना केलेली आहे जीवनाचे विविधढगी स्वरूप जनगगेच्या स्वरूपात त्याच्या समोर नेहमी दिसत होते, आणि **' विठ्ठल माझा जीव विठ्ठल माझा भाव । '** अशी तदाकार वृत्ति झालेल्या तुकोबारायाना **' उखळ, मुसळ, जातें । माझें मन गुतलें तेथें । '** असल्या प्रापचिकाच्या लोमट वृत्तीची साहजिकच कीव येई **' नाम घेता न लागे मोल । नाममत्र नाहीं खोल । दोंचि अक्षराचे काम । उच्चारावे राम राम । '** *हा महामत्र तुकोबानी अशा प्रापचिकाच्या उद्धारासाठी आमजनतेला* दिला आहे **' नाम घेता उठाउठीं । होय ससाराची तुटी । ऐसा लाभ बाधा गाठीं । विठ्ठल पायीं पडे मिठी । '** हे तुकारामाच्या सर्व शिकवणुकीचे सार म्हणता येईल जग आणि जीवन याचे सगळे रग पाहून त्याचे तुकोबारायानी आपल्या अनेक अभगातून सुदर आणि सुबोध वर्णन केलेले आहे **' बाइलेच्या गोता आवडीनें पोसी । मातापितयासी दवडीतो ', ' जोडोच्या हव्यासे । लागे घनाचेचि पिसें । ',** ***' अवगुणाचा त्याग नाही ' ' खवळे पाहीं उपदेशें । '***, *अशा मानवी स्वभावाच्या अनत छटा आणि* अगणित वृत्ति तुकाराम महाराजानी नीट निरखल्या होत्या, आणि त्या सर्वांचे अत्यत समर्पक शब्दचित्र त्यानी आपल्या अनेक अभगातून अतिशय प्रभावी स्वरूपात उभे केलेले आहे तुकोबाच्या अभगवाणीचा सपूर्ण रसास्वाद चाखण्यासाठी त्याच्या गाथेचा मुळातून अभ्यास केला पाहिजे. तसा तो करू इच्छिणाऱ्या

अभगभक्ताच्या सोयीसाठी मुबईच्या श्रीभारत बुक डेपोनें 'सार्थ तुकारामगाथा' तीन खडात प्रकाशित करण्याचे कार्य हाती घेतले आहे दोन वर्षापूर्वी महाराजाच्या १२५० अभगाचा पहिला खड प्रकाशित झालाच आहे आता २८८० अभगापर्यंतच्या आणखी १६३० अभगाचा हा प्रस्तुत दुसरा खड प्रकाशकानी वाचकाच्या हाती दिलेला आहे सार्थ तुकारामगाथा या ग्रथाच्या सपादनाचे कार्य डॉ प्रल्हाद नरहर जोशी एम् ए पीएच डी. याच्यावर सोपविण्यात आलेले आहे डॉ जोशी याचे वडील घरशीकर जोशी हे चागले कीर्तनकार आणि संतवाङ्मयाचे अभ्यासक होते वडिलाकडूनच डॉ जोशी याना सतवाङ्मयाच्या व्यासगाचा वारसा मिळाला आहे या सार्थ तुकारामगाथेचे स्वरूप डॉ जोशी यानी असे ठरवले आहे की, प्रथम मूळ अभग सपूर्ण देऊन, नतर शब्दार्थ व टीपा, सरळ गद्यार्थ, महत्त्वाचे पाठभेद व विशेष अभगावर उद्बोधक व मर्मग्राही असे सुबोध, साधे, आणि सतपरंपरेस धरून विवरण करायचे या सपादनव्यवस्थेचा सवसामान्य वाचकाला अतिशय फायदा होण्यासारखा आहे वस्तुत तुकाराम महाराजाचे अभग शब्ददृष्ट्या सोपे असतात, पण तीनशे वर्षापूर्वीचे अनेक शब्द आज व्यवहारातून मागे पडलेले आहत तर अनेक शब्दाच्या तेव्हाच्या स्वरूपात आणि आजच्या प्रचलित स्वरूपात फरक पडलेला आहे त्यामुळें सवसामान्य माणसाला अनेकदा या अभगवाणीतील अर्थसौन्दर्याचे रसग्रहण करणे कठीण जाते ही अडचण डॉ जोशी यानी आपल्या सपादनपद्धतीनें सटकयालाच दूर केलेली आहे मूळ अभगावर त्यांनी विस्तृत विवरणहि दिलेले असल्यामुळें तुकोबाच्या तत्त्वज्ञानाचा सुगम रीतीन बोध होण्याला चागली मदत झालेली आहे तुकाराराम हे भगवद्भक्त होते, तसच ते समाजाचे उत्कृष्ट टीकाकारहि होते समाजातील सगळ्या प्रकारच्या गुणदोषाचे त्याचे अतिस्पष्ट असे दर्शन त्याच्या नाना अभगातून पडलेले आहे दभ आणि ढोग याचा तर त्याना इतका तिटकारा होता की, प्रसग येईल तेव्हा या दोन सामाजिक दुर्गुणावर त्यानी निकरानें प्रहार केलेले आहेत असा हल्ला करतांना त्यानी जरी जातपात पाहिली नाही तद्वत दाभिक व्यक्तीचा लौकिक वा प्रतिष्ठा याचाहि मुलाहिजा ठेवलेला नाही 'अहकार खोटे। वाटे श्वापदाचे थाटे', 'अभिमानाचे तोंड काळें। दावी बळें अधार।', 'टिळा टोपी उच दावी। जगीं मी एक गोसावी। अवघा परपच सारा। पोटीं विषयाचा थारा।', 'दुर्जनाची जाती। त्याचे तोंडीं पडे माती', 'जातीची शिंदळी। तिला कोण वशावळी' 'अभक्त ब्राह्मण जळो त्याचें तोंड। काय त्यासी राड प्रसवली', असे तुकारामाचे अनेक अभग वाचले की, तीनशे वर्षापूर्वी आबालविठ्ठलभक्त म्हणून गाजलेले तुकाराम महाराज प्रथम श्रेणीचे समाज-टीकाकारहि होते ह कळून चुकत केवळ टाळकुटेपणाचे काम सतानी आयुष्यभर स्वत केले व जनतेला तोच छद लावला अशी महामूर्खपणाची टीका काही पोरबुद्ध प्राध्यापक अजूनहि करताना केव्हा केव्हां दिसतात या बालिश टीकेचे कारण अशा द्विपादानी तुकोबाची गाथा सपूर्ण अशी स्वत कधी वाचलेलीच नसते! तुकारामाची सार्थ गाथा काळजीपूर्वक वाचल्यावर हें ध्यानात येऊन चुकते तुकोबानी केवळ विठ्ठलनामाच्या गजराचाच पुरस्कार केलेला नसून मानवी जीवनाचा आणि एकदर मानवी व्यवहाराचाहि अति सूक्ष्म विचार केलेला असून त्याच्या अभगातून जें तत्त्वज्ञान प्रगट होतें तेंहि जीवनानुभूतीचेच फळ आहे तुकारामाच्या अभगवाणीत कोणालाहि पटकन वश करून घेण्याची जी अजब जादू आहे ती यामुळेंच आलेली आहे 'काय करू मज देवे बोलाविलें। माझें खोळविलें काय होते।' असे जे तुकोबा एके ठिकाणी म्हणतात त या दृष्टीनें रास्त वाटते त्याना स्वत नामसकीर्तनात रमून स्वत चें जीवन सहन वचता आले असते 'म्हणा विठ्ठल विठ्ठल। गोड आणि स्वल्प बोल। कळिकाळाची बाधा। नव्हे उच्चारिता सदा' याची कल्पना असूनहि तुकाराम महाराज दभ, मोह, लोभ, मत्सर याच्यावर जे असूडाचे फटकारे ओढीत राहिले हाते त्याचे कारण त्याना समाजाची चाललेली अवनती पाहवत नव्हती 'डोळ्यामध्यें जैसे कुण। अणु तेंहि न समाये।' असे याच झाले होते म्हणून त्यानी जनतेला आपल्या अभगवाणीनें सन्मार्ग दाखवण्याचे प्रयास केले भवसागरात गटगळ्या खाणाऱ्या पामराना तुकारामाची

गाथा ही तेजस्वी दीपस्तंभासारखीच मार्गदर्शन झालेली आहे. मात्र स्वतः तुकोबा म्हणतात की, 'करविली तैसी केली कटकट । वांकडें नीट देव जाणे ।' तुकारामाची गाथा ही जीवनदर्शन घडवून जीवन सार्थकी लावण्याचे सोपें साधन सर्वांना मुक्तहस्ताने मोकळें करून देणारी असल्यामुळें गेल्या तीनशें वर्षांत महाराष्ट्रात ती सर्वांना शिरोधार्य होऊन बसलेली आहे. केव्हाहि कोठेहि अभंग वाचले तरी मनाला मोठा आनंद आणि विलक्षण शांति, समाधान लाभते. या दृष्टीनें हा गाथा म्हणजे हमखास मनाला समाधान आणि आनंद मिळवून देणारा साहित्यसागरच आहे! सागराची सखोलता, विशालता, प्रचंडपणा आणि रौद्रतादेखील या गाथेमध्यें वैपुल्याने भेटते. समुद्रस्नानाने पुण्य लाभते अशी जी धार्मिक समजूत आहे तिचाहि प्रत्यय तुकारामाच्या गाथेंत अवगाहन करून घेता येण्यासारखा आहे. अशा विविध गुणसंपदेनें आकंठ भरलेला असा 'सार्थ तुकारामगाथा' सर्वसामान्य जनतेच्या नित्य उपयोगासाठी विवरणासह उपलब्ध करून देण्याचें जें महत्कार्य डॉ. जोशींनी हाती घेतलेले आहे त्याबद्दल त्याचें अभिनंदन केले पाहिजे. आजच्या समाजाची एक फार मोठी साहित्यिक गरज या 'सार्थ तुकारामगाथे'नें भरून निघाली आहे याबद्दल दुमत होण्यासारखें नाही.

२ : केसरी दि. २३ मार्च १९६९

## तुकोबांच्या विचारांचे साक्षेपी समालोचन

'वारकरी संप्रदायाचे जे अप्रतिम धर्ममंदिर महाराष्ट्रात उभारण्यात आले, त्याचा कळस संत तुकाराम हेच झाले असे संत बहिणाबाईंनी आपल्या एका सर्वश्रुत अभंगात म्हटले आहे ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ आणि तुकाराम या संतचतुष्काने महाराष्ट्रात वारकरी संप्रदायाचे जें प्रवर्तन केले, त्याचाच आलेख बहिणाबाईंच्या अभंगात पाहायला मिळतो. ज्ञानेश्वरांच्या चिद्विलासवादाचा पाठ नामदेवानी आपल्या अभंगातून गिरविला ज्ञानेश्वरानी लावलेली ही प्रेरणाज्योत नामदेवामार्फत तुकारामापर्यंत जाऊन पोहोचली. 'नामदेवें केले स्वप्नामाजीं जागे।' अशी तुकारामाचीच साक्ष आहे. नामदेवत्व तुकारामाच्या ठिकाणी कळसास गेले. 'आत्मा अवतरविते मंत्र । अक्षरें इयें ॥' गीतेची अक्षरे आत्म्याला प्रकट करणारे मंत्रच आहेत असे ज्ञानेश्वर सांगतात तुकाराम आणि तुकारामाचे कवित्व यातील अभिन्नत्व लक्षात घेता त्याचे अभंग म्हणजे त्याच्या आत्म्याचा आविष्कार घडविणारी मन्त्राक्षरेच आहेत असें सार्थपणे म्हणता येईल.

## आंतरजीवनांतून स्फुरलेली कविता

कवि आणि त्याची कविता किती एकरूप असू शकतात, याचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे तुकारामाचा एकेक अभंग होय. हा अभंग म्हणजे आत्मानंदाने हरखून गेलेल्या एका परमार्थप्रवण व्यक्तित्वाचा प्रत्ययकारी उद्‌गार आहे. शब्दकला, विचारवैभव आणि भावसौंदर्य या वैशिष्टयात न्हाऊन निघालेली अभंगरचना तुकारामानी केली आहे.

'तुकारामाच्या या प्रसिद्ध अभंगवाणी'चे मर्म उकलून दाखविण्यासाठी डॉ. प्रल्हाद नरहर जोशी यांच्यासारखे अधिकारी अभ्यासक सिद्ध झाले, ही अतिशय आनंददायी गोष्ट आहे मातृकृपांकित कै. नरहरशास्त्री खरशीकराच्या या सुपुत्रास परमार्थप्राप्तीचा वारसा मूलत च लाभलेला असून प्रदीर्घ व्यासंगाने त्याने तो सतत चढता वाढता ठेवला आहे. 'मराठी साहित्यातील मधुरा भक्ती'च्या अभ्यासाने हा 'संत-प्रसाद' त्यानी संपादन केला आहे. 'सार्थ तुकारामगाथे'ची प्रस्तुतची त्याची संपादणी म्हणजे त्याच्या संतभक्तीची सहज परिणतीच आहे महाराष्ट्रात शब्दात वेदांतीचे अर्थ जे तुकोबानी सांगितले, त्याचा रसोद्‌ग्राही परिचय त्यानी येथे करून दिला आहे.

## संपादनाचें स्वरूप

डॉ जोशी यानी संपादिलेल्या सार्थ व सविवरण तुकारामगाथेच्या प्रथम खंडाचे प्रकाशन बरोबर तीन वर्षांपूर्वी करण्यात आले. त्यानंतर क्र. १२५२ ते २८८० अशा एकूण १६२९ अभंगाचे

सटीप सपादन या दुसऱ्या खडात करण्यात आले असून अशाच स्वरूपाचा तिसरा खड प्रकाशनाच्या वाटेवर आहे "मूळ अभग, शब्दार्थ व टीपा, सरळ गद्यार्थ, महत्त्वाचे पाठभेद व विश्येक अभगावर उद्बोधक व मर्मग्राही असे सुबोध, साधार व संतपरपरेस धरून केलेले विवरण" असे या द्वितीय खडाचे अतरग आहे "डॉ. जोशी यानी साप्रदायिक अर्थास न डावलता, आपल्या स्वतत्र बुद्धीचा व ऐतिहासिक पद्धतीचा अवलब केला असून या सार्य गाथेच्या साहाय्याने तुकाराम महाराजाच्या अमृत-वाणीच्या गगेस एक उत्तम घाट बाधला आहे" ही डॉ. के ना वाटवे यानी केलेली ग्रथाची भलावण बरोबरच आहे

## भाष्यकाराची योग्य भूमिका

तुकारामाच्या अभगाचा अर्थ सागताना डॉ. जोशी यानी केवळ शब्दास प्रतिशब्द व पद्य-चरणास गद्यवाक्य अशी पढिकाची भूमिका न घेता अभगगत विचारविकाराची योग्य उकल करून दाखविली आहे. भावार्थाच्या गाभ्यालाच त्यानी हात घातला असल्यामुळे त्याचे हे अभग-भाष्य अतिशय बोलके झाले आहे उदाहरणार्थ,

"उष्टघा पत्रावळी करूनिया गोळा ।
दाखविली कळा कवित्वाची ॥" (अ. १२८४)

या प्रसिद्ध अभगाचा अर्थ देण्यापूर्वी, "कितीतरी सामान्य कवि आधी होऊन गेलेल्या थोर कविश्रेष्ठाच्या कवितेमधील शब्द उसने घेऊन आपल्या कवितेचे कौशल्य दाखवितात" असे या अभगाची भूमिका सुचविणारे छोटेसे प्रास्ताविक डॉ जोशी यानी दिले आहे त्यानतर अर्थ देऊन झाल्यावर त्यानी केलेले विवरण त्याच्या व्युत्पन्नतेचे द्योतक आहे "तुकाराम महाराजाच्या वेळी अध्यात्माची व धर्म-विचाराची भ्रष्ट नक्कल होऊन सर्वसामान्य जनाची फसवणूक भोदू लोकाकडून होत असे त्याचप्रमाणे या भोदू साधुसताचे कवित्वहि तसेच भ्रष्ट व अनुकरणात्मक असे त्याला 'प्रासादाची चवी' कधीच नसे." (पृ १६) याच सदर्भात त्यानी तुकारामांच्या या काव्यदृष्टीचे ज्ञानेश्वर–रामदासाशी जे तुलनात्मक विवेचन केले आहे, त्यामुळे त्याच्या अभग–भाष्यास वजन प्राप्त झाले आहे 'बाचें बरवें कवित्व । कवित्वीं बरवें रसिकत्व ' हा ज्ञानेश्वराचा उद्गार व 'नव्हे कवित्व हे टाकसाळी नाणे ।' ही समर्थोक्ती देऊन त्यानी प्रासादिक काव्याविषयीचे आपले हे विवेचन अधिकच प्रासादिक केले आहे

## तुकारामाचे तत्त्वचिंतन

जीव, जग व परमात्मा याचे स्वरूप आणि त्याचे परस्पर सबध याविषयीचे उल्लेख तुकारामानी अनेक ठिकाणी केले आहेत त्याचे हे तत्त्वनिरूपण डॉ जोशी यानी सुलभ सोपारे करून सागितले आहे उदाहरणार्थ,

"नव्हो आम्ही आजिकालींची ।
काचीं कुचीं चाळवणी ॥" (अ १३६४)

या सपूर्ण अभगाचा त्यानी दिलेला अर्थ व त्यावरील विवरण भारतीय तत्त्वदर्शनाच्या परपरेस धरूनच आहे "आम्ही काही आजकालचे जन्मास आलेलो नाही आम्ही अनादी असून कुठल्याहि कच्चे-पणाने किंवा काचकूच करून जाणार नाही" हा यथायोग्य अर्थ सागून डॉ जोशी पुढे म्हणतात, "तुकाराम ही व्यक्ति सतराव्या शतकातील असली, तरी आत्मस्वरूपाच्या जाणिवेमुळे, चैतन्यस्वरू-पाच्या सामरस्यामुळे आपणास अनादी काळापासूनच ज्ञान आहे, असा विलक्षण आत्मविश्वास बुवाच्या वचनातून प्रकट झाला आहे परमेश्वर व आपण याचे 'मूळ डाळ' म्हणजे मूळचे आश्रयस्थान एकच असल्याचे तुकाराम येथे सागतात" (पृ. ६४) अशा रीतीने, तुकोबाच्या आत्मानुभूतीचे हे बोल अद्वैत तत्त्वज्ञानास कसे धरूनच आहेत हे त्यानी परोपरीने विशद केले आहे

सोळाशे अभंगसंख्येच्या या खंडात तुकारामाच्या तत्त्वविचाराचे जे दर्शन घडते त्याचे साक्षेपी समालोचन डॉ जोशी यांनी ग्रंथारंभीच्या प्रास्ताविक निवेदनात केले आहे. संताची समाजाभिमुखता तुकारामाच्या ठिकाणी प्रकर्षाने प्रत्ययास येते हे त्यांनी येथे साधार व सप्रमाण सिद्ध केले आहे तुकोबाची कविता ही खरी संस्कृतिटीका आहे, असेच त्यांना म्हणावयाचे आहे, समकालीन समाज आचारभ्रष्ट झाला होता, कौटुंबिक नाती विपरीत बनली होती, कथाकार पोटभरू होत होते, गुरु अनाचारी होते, व ब्राह्मण चळले होते लोकजीवन असे गढूळले होते, ह जसे तुकारामाच्या कवितेतून स्पष्ट होते, तसेच या दुर्दशेतून पार होण्याचा उपायहि तुकोबा स्पष्टपणे सांगतात परमेश्वराचे पावन नाम स्मरावे व कीर्तनातून ब्रह्मरस सेवून ब्रह्मानंद अनुभवावा, ह तुकाराम सांगतात तुकोबांनी लोकधर्माची नव्याने मांडणी केली व त्या द्वारे प्रापंचिकाप्रमाणे साधकानाहि मार्गदर्शन केले, असे डॉ जोशी यांनी समारोपात साररूपाने सांगितले आहे

प्रस्तुत ग्रंथसंपादनात डॉ जोशी यांची दृष्टि केवळ विवरणकाराची की संशोधकाची ? त्यांची स्वत:ची याविषयीची प्रास्ताविकातील साक्ष दोन स्थळी परस्परविरोधी आहे. " अभंगाचे शास्त्रशुद्ध संस्करण, पाठशुद्धीची चिकित्सा हे संशोधन प्रस्तुतच्या कार्याच्या मर्यादेच्या बाहेरचे आहे " असे ते ' मनोगता 'त सांगतात (पृ १०) तर पुढच्याच पानावर "मला यासंबंधी संशोधनपर लेखन करण्यात एक प्रकारचा विशेष आनंद वाटतो " हे आपले उद्गारहि ते उद्धृत करतात खरे म्हणजे, त्यांनीच म्हटल्याप्रमाणे शंकर पांडुरंग पंडिताची गाथा विशेष प्रमाणभूत व अधिकृत मानून त्यांनी हा गाथाप्रपंच उभारला आहे पाठचिकित्सा व संशोधनपरता यापेक्षाहि सुबोध असे अर्थनिरूपण व टीकात्मक विवरण हेच त्यांचे खरे उद्दिष्ट आहे तसेच, काही आशयघन व गहन अभंगाचे विवरण न करता केवळ सरलार्थ देऊन त्यांची बोळवण करण्यात आली आहे उदाहरणार्थ, अभंगक्रमांक २४९१ ते २५७२ हे सर्वच अभंग विवरणदृष्ट्या दुर्लक्षित राहिले आहेत **' गोदेकांठी होता आड । '** (क्र. २५४३) **' तेव्हां होतों भोगाधीन । तुम्हां भिन्न पासूनि । '** (क्र २५६९) असे त्यांपैकी कित्येक अभंग, त्यातील गहन विचारामुळे, दुर्बोध असून त्यावर सविस्तर विवरण अपेक्षित होत.

सोळाशेहून अधिक अभंग असलेल्या या खंडात विषयदृष्ट्या अनेकविध प्रकरणे आली आहेत पण अभंगाचे प्रकरणश व विषयवारीने वर्गीकरण करून तयार केलेली अनुक्रमणिका एवढ्या मोठ्या ग्रंथास असू नये, याचे नवल वाटते ग्रंथाच्या अखेरीस अभंगाची अकारविल्हेवाने केलेली सूचि दिली आहे; पण त्याबरोबरच विषयसूचीहि असती तर ग्रंथाची उपयुक्तता वाढली असती संत सोनोपंत दांडेकरांनी संपादिलेल्या ज्ञानेश्वरीच्या शेवटी, ज्ञानेश्वरीतील ओव्यांतून आलेले विविध कथासंदर्भ स्पष्ट करणाऱ्या पुराणकथा दिल्या आहेत, तशा स्वरूपाचे स्वतंत्र परिशिष्ट येथेहि असणे आवश्यक होते तसेच अभंगनिरूपणात शब्दार्थ दिलेले असले, तरी ग्रंथान्ती साथ शब्दसूचि दिल्याने ग्रंथमूल्य खचितच वाढले असते या लहानमोठ्या सूचनांचा विचार तिसऱ्या खंडाच्या संपादनात व्हावा अशी अपेक्षा आहे

तुकाराम-गाथेची सार्थ व सटीप संहिता देऊन डॉ जोशी यांनी संतसाहित्याचे एक महत्त्वाचे दालन पुन्हा एकदा प्रकाशात आणले आहे त्यासाठी त्यांनी उपसलेले अपार कष्ट व व्यक्त केलेली विदग्ध रसवृत्ती असाधारण आहे त्यांचा हा उद्योग समाधान देईल असाच साधला आहे.

**' बरवा झाला वेवसाव ।**
**पावलों चिंतिलाचि ठाव ।। "**

*या तुकोबांच्या उक्तीचा डॉ जोशी यांना येथे आत्मप्रत्यय येईल !*

**— डॉ. हेमंत वि. इनामदार**

३ : पुणे आकाशवाणी दि. २४-१-६९

## गूढ सौंदर्याचे सर्वांगीण दर्शन

प्रथमच हे स्पष्ट केले पाहिजे की, ' सार्थ तुकारामगाथा ' या ग्रंथामुळे मराठीतील सांस्कृतिक ग्रंथसामग्रीत मोलाची भर पडली आहे. हा ग्रंथ एका लोकप्रिय उपासकाच्या वाणीविषयीचा आहे हा लोकप्रिय उपासक म्हणजे महाराष्ट्राचा महामानव तुकाराम तुकाराम हा महाराष्ट्राच्या आत्मशक्तीचा परम विकास आहे इथल्या कृष्णशिलाची भव्यता व अभेद्यता आणि इथल्या सरिताची गतिमान् करुणा त्याच्या वाणीतून ओसडत आहे 'सकोचोनि काय झालासी लहान, घेईं आपोशण ब्रह्मांडाचे ' असे मानवाला आवाहन करणारा हा देहूचा तुका दिसायला अणूहून " थोकडा " असला, तरी त्यात आपल्या अनुभवाच्या विशालतेने आकाशाएवढे महिमान प्राप्त केले आहे तुकोबाची अनुभवसमृद्ध अभगवाणी हे महाराष्ट्रशारदेचे अभगलेणे आहे त्याच्या चार साडेचार हजार अभगात त्याच्या आतरजीवनाचे समग्र चित्र रसरशीतपणे उमटले आहे त्याचमुळे आपण असे म्हणू शकतो की, तुकोबाची अभगवाणी ही त्याची "वाङ्मय श्रीमूर्ति" आहे 'घोटवीन लाळ ब्रह्मज्ञान्याहातीं । मुक्ता आत्मस्थिती साडवीन ' ही आत्मविश्वासाने उच्चारलेली त्याची वाणी म्हणजे परमानुभूतीची दिव्य खाणी आहे 'अतरीचे धावे स्वभावे बाहेरी ' अशा सहजतेने प्रकटलेल्या या वाणीचे स्वरूप दिसायला सरळ साधे आहे परंतु तिचे चितन करू लागल्यावर असे अनुभवाला येते की, चितनाच्या नव्या नव्या वलयात त्या वाणीतला आशय अधिकाधिक उमलून येतो आपल्या आतरिक समृद्धीचे भाडार खुले करतो

अर्थात अभगचितनाची ही प्रक्रिया प्रत्येक वाचकाला स्वावलबनाने सुरू करणे तितके शक्य नाही त्यासाठी कुणीतरी हाती धरून चितनगुफेत नेले पाहिजे तिथल्या गूढ सौंदर्याचे सर्वांगीण दर्शन घेण्यासाठी कुणी तरी "दिव्य चक्षु" दिला पाहिजे डॉ प्रल्हाद नरहर जोशी याचा प्रयत्न हा अशा मार्गदर्शनाचा आहे तुकोबाच्या अभगवाणीनें त्याच्या हयातीतच लोकप्रियतेचे शिखर गाठले होते. त्याच्या वाणीला मुद्रणाचे लेणे लाभले त्या घटनेलाही आता शतकभराचा काळ लोटला आहे तेव्हा-पासून त्या वाणीचा अभ्यास अखडपणे चालू आहे असा अभ्यास करणाऱ्यात सप्रदायातील मातबर व्यक्तींबरोबरच नव्या दृष्टीचे अनेक देशीविदेशी विद्वानही आहेत वारकरी सप्रदायाचे एक अध्वर्यू आणि आधुनिक काळातील सत्पुरुष श्रीविष्णुबुवा जोग यानी तुकोबाच्या गाथेचा अर्थ विशद केला त्यालाही आता अनेक दशके लोटली आहेत त्यानतरच्या काळात सतसाहित्याची विपुल चिकित्सा झालेली आणि प्राचीन मराठीच्या अभ्यासाची अनेक साधने उजेडात आली आहेत या अनुकूलतेच्या पार्श्वभूमीवर तुकोबाच्या वाणीचे विशदीकरण करणाऱ्या ग्रथाची नितात गरज होती डॉ जोशी यांनी हा सारा आटोप साभाळण्याचा मोठाच प्रयत्न केला आहे

सतसाहित्याच्या सप्रदायनिष्ठ व्यासगाचा वारसा डॉ जोशीना त्याच्या घरीच लाभलेला आहे, आणि तो वारसा आधुनिक दृष्टीच्या अध्ययनाने समृद्धही झालेला आहे त्यामुळे त्यानी तुकाराम गाथेच्या विशदीकरणाचे कार्य अगावर घेणे उचितच होते

डॉ जोशीचा 'सार्थ तुकारामगाथा' तीन खडात पूर्ण होणार असून, त्यातला दुसरा खड आज आपल्यापुढे आहे पहिल्या खडात साडेबाराशे अभगाचा समावेश झालेला आहे तर प्रस्तुत दुसऱ्या खडात जवळ जवळ साडेसोळाशे अभगाचे अर्थविवरण आलेले आहे

अर्थविवरणासाठी त्यानी पडिताच्या गाथेचा पाठ स्वीकारला आहे हे योग्यच झाले प्रथम मूळ अभग, त्याखाली शब्दार्थ व टीपा, पुढे अभगाचा अर्थ आणि शेवटी रहस्योद्घाटी विवरण अशा पद्धतीने डॉ जोशीनी हे अर्थविवरणाचे कार्य केले आहे हे कार्य तत्पूर्वीच्या या स्वरूपाच्या कामाहून निःसशय सरस आहे परतु या कार्याचे स्वरूप मूळातच अनेकागानी कठिण असल्यामुळे त्या बाबतीत अनेकाचे अशत असमाधान राहणारच या असमाधानानेच ज्ञानसाधनेचे प्रगतिशील सातत्य राखू शकत, आणि प्रयत्नशीलतेतून उद्भवणारे असमाधान सर्वांनाच पुढे नेत राहते असे माझे प्राजळ मत आहे

या खंडाचे समग्र अवलोकन केल्यानंतर मला असे एकसारखे जाणवत राहिले की, डॉ जोशी यांच्या भावविश्वावर आणि वैचारिक पिंडावर संतसाहित्याचा अमीट प्रभाव उमटलेला आहे पण हा प्रभाव एका भावबंधाच्या स्वरूपातच व्यक्त होतो वेगळ्या शब्दात सांगायचे तर असे म्हणता येईल की, डॉ जोशी अर्थविवरणात चिकित्सक म्हणून वावरत नाहीत, तर आस्वादक म्हणूनच प्राधान्याने वावरतात; त्यामुळे मला त्यांनी केलेल्या अर्थापेक्षा त्यांची विवरणे अधिक हृद्य वाटली. उदाहरणार्थ या खंडातील पहिल्याच भूपाळी विभागातील १२५२ व्या अभंगावरील विवरण त्यांच्या आस्वादक वृत्तीचे रम्य दर्शन घडविणारे आहे त्यात त्यांनी संक्षेपाने भूपाळी गीतप्रकाराचे वैशिष्ट्य, त्या गीतप्रकाराची मराठीतली समृद्धि, त्यातून प्रकट होणारे सत्त्वपोषक प्रसन्न वातावरण आणि तुकोबांच्या भूपाळ्यांचे पृथगात्मस्वरूप, इत्यादि बाबी सुंदरपणे मांडल्या आहेत. त्यापुढच्याच **"ऐसी वाट पाहे काहीं निरोप का मूळीं"** या भूपाळीवरील विवरणात त्यांनी **'मूळ'** या शब्दाच्या निमित्ताने माहेराच्या ओढीचे रहस्योद्घाटन हळुवारपणाने केले आहे

परंतु या दोन्ही हृद्य विवरणांना ज्या अर्थाची पार्श्वभूमि आहे, तो अर्थ मात्र काहीशा शिथिलतेने दिलेला आहे या दोन्ही भूपाळ्यांत तुकोबांनी आपल्या उपास्याला माउली मानून, त्या भावनेशी सुसंवादी अशा विठ्ठले, पांडुरंगे या संबोधनांनी वाहिले आहे परंतु अर्थ देताना मात्र या संबोधनाच्या औचित्याकडे दुर्लक्ष झाले आहे **'आवो पांडुरंगे पंढरीचे निवासे लावूनिया आस चालवूनी ठेविले'** या पंक्तीचा अर्थ डॉ जोशी असा देतात की, "अहो पांडुरंगा, या पंढरपूर क्षेत्रात निवास करायला लावून तुम्ही नुसतीच आशा लावलीत मला" या अर्थात थोडी गडबड झाली आहे. पंढरीचे निवासे, हे 'पांडुरंगे' या संबोधनाचे विशेषण आहे, ही गोष्ट डॉ. जोशींच्या नजरेतून अनवधानाने निसटली आहे त्यामुळे पंढरपूरचा निवास हा पांडुरंगाऐवजी त्यांनी तुकोबांकडे लावला आहे तुकोबांना इथे असे म्हणायचं आहे की, "हे पंढरपूरनिवासिनी पांडुरंगमाउली, तू मला आशेला लावून चालवीत ठेवले आहेस"

क्वचित अर्थाच्या मर्यादा पाठाच्या अशुद्धीमुळे निर्माण झालेल्या दिसतात. उदाहरणार्थ, **'दिन दिन शंका वाटे आयुष्य नेणवतां गाढे।'** हा १७६८ व्या अभंगाचा प्रारंभ पहा। इथे **"गाढे"** हा शब्द चुकीचा दिसतो डॉ. जोशींनी त्याचा अर्थ मोलाचे आयुष्य संपून वाया जाते, अशी अजाणताच *मला दिवसेंदिवस शंका येत आहे असा या चरणाचा अर्थ दिला आहे.* ***'आयुष्य नेणवतां गाढे' या*** चरणात 'संपून वाया जाते' अशा अर्थाला जागा रहात नाही म्हणून मला असे वाटते की, हा *चरण* ***'आयुष्य नेणवतां घटे'*** *असा असावा* ***'घटे'*** *हा शब्द जसा अर्थाच्या दृष्टीने समर्थनीय* ठरतो, तसाच तो मागील पंक्तीतील 'वाटे' या शब्दाशी यमकदृष्ट्याही जुळतो.

अर्थात् या अशा किरकोळ दोषस्थलांनी डॉ जोशी यांच्या या विराट प्रयत्नाचे मोल कमी होत नाही संतसाहित्याच्या सुसंस्कारांनी रंगलेली आणि तसे संस्कार वाचकाच्या चित्तावर करण्यासाठी समुत्सुक बनलेली त्यांची शैली त्यांनी केलेल्या अर्थविवरणात जागोजाग आपल्याला खिळवून ठेवते. त्यांच्या या संकल्पाची पूर्ति सत्वर व्हावी

**–रा. चिं. ढेरे**

# तुकोबांचे कवित्व व तत्त्वचिंतन :

नव्हती हीं माझीं जायाचीं भूषणें । असे नारायणें उचित केलें ॥ १ ॥
शब्दाच्या वोवोनी रत्नांचिया माळा । मुळींच जिव्हाळा झरवणी ॥ २ ॥
अर्थांतरीं असे अनुभवसेवन । परिपाकीं मन साक्ष येथें ॥ ३ ॥
तुका म्हणे मज सरतें परते । हें नाहीं अनंतें उरों दिलें ॥ ४ ॥

## प्रतिभेचे लक्षण

अपूर्व वस्तूची निर्माणक्षमता अथवा तिचे दर्शन हे जर प्रतिभेचे एक महत्त्वाचे लक्षण मानले तर प्राचीन मराठी काव्यास ते यथार्थतेने लागू पडते अव्वल दर्जाची प्रतिभा ही स्वभावत च नव-निर्मितीच्या शोधात असते नित्य नव्याच्या दर्शनाचा छद तिला असतो अज्ञाताचा अथवा अदृष्टाचा हा शोध कधी तत्त्वज्ञानी लोकानी घेण्याचा प्रयत्न केला, कधी शास्त्रज्ञानी केला, कधी कवीनी केला याची शोधपद्धती वरवर पाहाता जरी वेगळी वाटली तरी त्याच्या सशोधनाचे लक्ष्य एकच होते ज्या अज्ञात आदिकारणाची ओढ माणमास प्राचीन काळापासून लागलेली दिसते तिचा शोध प्रतिभावतानी घेतला मानवी बुद्धीच्या, प्रज्ञेच्या प्राहारी जाणाऱ्या प्रतिभावताना शास्त्रीय सशोधनाचे क्षेत्र उपलब्ध झाले भावनेच्या, श्रद्धेच्या अत करणप्रवृत्तीच्या मार्गाने जे गेले त्याना नवीन सौदर्याच्या अनुभूतीचे भावविश्व गवसून ते काव्यवृत्तीत रगून गेले या दोहोंच्या सीमारेषेवर तत्त्वज्ञ उभे राहिलेले दिसतात.

## ' परतत्त्वाचा स्पर्शु '

कोणताही थोर तत्त्वज्ञ हा बहुधा कविवृत्तीचा असतो, आणि कोणताही मोठा कवी हा थोर तत्त्वज्ञानी असतो ईश्वरदत्त वाणीने कवित्व स्फुरते या कवित्वास शोभा रसिकत्वाने येते आणि रसिकत्वास ' परतत्त्वाचा स्पर्शु ' झाला की त्या काव्याचे दर्शन चिरतन स्वरूपाचे होते. श्रीज्ञानदेव, श्रीनामदेव, श्रीचोखोबा, श्रीजनाबाई, श्रीएकनाथ, श्रीतुकाराम, श्रीरामदास इत्यादी प्राचीन मराठी सतकवीच्या काव्याची ही अशी दोन लक्षणे आहेत एक तर त्यानी आपल्या दिव्य प्रतिभेच्या साहृयाने अपूर्व वस्तूची निर्मिती केली. अगोचराला गोचर केले ' बोलीं अरूपाचें रूप दावीन । अतीद्रिय परी भोगवीन । इद्रियांकरवीं ' अशी ज्ञानदेवाची प्रतिज्ञाच होती आणि या अतींद्रियाच्या ध्यासामुळेच सतकवींच्या काव्याला परतत्त्वाचा स्पर्श झालेला आहे सतकवी हे प्रथम सत होते, आत्मसाक्षात्कारी होते, आत्मानुभूती घेणारे श्रेष्ठ शोधक होते, आणि हा आत्मानुभव सागण्यासाठी त्यानी काव्याचा आश्रय केला म्हणूनच त्याची वाणी प्रासादिक बनली जे जे विठ्ठलाच्या कृपेने अनुभवास आले ते व्यक्त झाले काव्याचे रूप धारण करून ' तुका म्हणे घवी आले । जें का मिश्रित विठ्ठले ' आणि ही अलौकिक चव तुकोबाच्या अभगातून पदोपदी साध्या वाचकासही अनुभवास येते

## ' मज विश्वंभर बोलवितो '

प्रारभी दिलेल्या अभगावरून तुकोबाच्या कवित्वाच्या जिवतपणाची, दिव्य स्पर्शाची, नारायणाच्या कर्तृत्वाची साक्ष पटण्यासारखी आहे नारायणानेच प्रत्यक्ष दिलेली ही काव्याची भूषणे वाया कशी जाणार ? मूळचा झराच जिव्हाळ्याचा असून या कवित्वशक्तीच्या साहृयाने आपण शब्द-रत्नाची माळ ओवून ती श्रीहरीच्या गळ्यात घालीत आहोत ही तुकोबाची भावना आहे. अनताने दिलेली कवित्वाची ही देणगी कधी सपणारी वा कोमेजणारी नाही, असाही आत्मविश्वास तुकोबाना

आहे. कारण ही काही लौकिक विषयाच्या नादाने फुलणारी आणि क्षणात कोमेजणारी वृत्ती नव्हती. हे बोल काही देहूच्या अथवा महाराष्ट्रातील कुणाही माणसास स्फुरणारे नव्हते. सतत अगसगात व्यापून राहिलेल्या पाडुरंगाचे हे बोल असून त्यानेच त्याचे माप धरलेले आहे. '**करितों कवित्व म्हणाल हें कोणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ माझिये युक्तीचा नव्हे हा प्रकार । मज विश्वंभर बोलवितो**' अशी साक्ष वारवार तुकोबानी दिलेली आहे. '**अनुभवें आलें अंगा । ते या जागा देतसें**' असे तुकोबानी म्हटले आहे. '**मूळ ओल अंतरींची**' फार तीव्र असल्यामुळे तुकोबाच्या कवित्वाची शोभा काही वेगळीच वाटते.

## 'कृपा भीक स्वामीची'

तुकारामबुवाच्या मुखातून जी वाणी प्रगटली ती काय साधी होती ? देहूच्या एका अव्यवहारी वाण्याची ती वाणी होती ? लौकिकाच्या दुराव्यामुळे झालेली व्यथा त्यात होती ? लौकिकाच्या क्षणिक आनदाचे तरग त्यात होते ? तुकोबाच्या वाणीत यांतले काहीच दिसणार नाही. अनंत सात व्हावा, अरूप सरूप व्हावा, निर्गुण सगुणसुदर व्हावा, अनिर्वचनीय वाणीत यावा, म्हणून त्याचा अट्टाहास होता. वरवरच्या मानवी बुद्धीचे हे कर्तृत्व नव्हते. '**जोडिलीं अक्षरे । नव्हतीं बुद्धीचीं उत्तरे**' म्हणून त्यानीच सागितले आहे. '**नव्हे हे कवित्व टांकसाळी नाणें**' असा त्याच्या अलौकिकाचा दावा आहे. तुकोबाच्या कवित्वातील शब्द हे काही टाकसाळीतून पडणारे शब्द नव्हते. खरे म्हणजे या ठिकाणी '**तुका म्हणे झरा । आहे मुळींचाचि खरा**' हा मूळचा झरा तरी एवढा खरा का निघाला ? तर '**माझी वदवितो वाणी । त्याणें धरिलो धरणी**' प्रत्यक्ष धरणीधरच तुकोबाना बोलते करणारा आहे. वचनातून जे निघते त्याचा अनुभव आधीच हातात आलेला असतो. '**वचनाचा अनुभव हातीं । बोलविती देव मज**' अशी तुकाराम महाराजाची साक्ष आहे. एवढे प्रासादिक देणे पूर्वी कधी कुणाला लाभलेले नव्हते. ही सारी त्या स्वामीची कृपा आहे. '**अनुभूत हे प्रासादिक । कृपा भीक स्वामीची**' अशी त्याची नम्र वृत्ती आहे. जो सखा कृपावत झाला त्याची वाणी फारच सरस असणार. साळुकीच्या मजुळ बोलाचा दृष्टात देऊन बुवानी म्हटले आहे, '**काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें**' ज्याला प्रत्यक्ष विश्वंभराने, धरणीधराने बोलते केले त्याच्याच वाणीवरून कवितेने आपले स्वरूपलक्षण ठरवावे हे बरे,

## नामदेवांची प्रेरणा

तुकोबासारख्या सताच्या कवित्वाचे मुख्य लक्षण म्हणजे ते प्रासादिक आहे. परतत्त्वाचा स्पर्श त्याला झालेला असल्यामुळे त्यास आपोआपच सहजसुदरता प्राप्त झाली आहे. '**अक्षरांची जोडाजोडी**' करून '**कवित्वाची रूढी**' घालणे त्याना पसत नव्हते बुद्धिचातुर्याने कवित्वाचा दिमाख वरवर आणता आला तरी त्यात प्रासादिक ओलावा कसा व कोठून येणार ? '**चातुर्याच्या योगें कवित्व करितो । प्रासादिक रंग आणितां नये**' असे त्यानीच म्हटले आहे. तेव्हा बुवाची कविता ही श्रीहरीच्या गुणात रमणारी आहे, त्याच्या विरहाने व्याकूळ होणारी आहे, सतदर्शनाने नाचणारी आहे, आणि मुख्य म्हणजे तिला एक फार मोठा असा वारसा आहे. ज्ञानदेवाच्या समकालीन नामदेवानी तुकोबाना कवित्वाची प्रेरणा दिल्याचा उल्लेख तुकोबांनीच एका ठिकाणी केला आहे. पाडुरंगास बरोबर घेऊन नामदेवानी शतकोटी अभगाची आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी '**थापटोनि केलें सावधान**' असे तुकोबानीच म्हटले आहे. '**नामदेवें केले स्वप्नामाजीं जागें । सवें पांडुरंगें येऊनियां॥ सांगितलें काम करावें कवित्व । वाउगें निमित्य बोलों नको ॥ माप टाकी सळ धरिली विठ्ठलें । थापटोनि केलें सावधान ।**' या तुकोबाच्या अभगावरून नामदेवाची प्रेरणा स्पष्ट होण्यासारखी आहे. '**नामदेवापायीं तुक्या स्वप्नभेटी । प्रसाद हा पोटीं राहिलासे**' असेही त्यानी आपल्या एका अभगात म्हटले आहे. आपणांस गुरूचा उपदेश झाल्यानतर आपणांस कवित्वाची स्फूर्ती झाली असे सांगताना तुकोबाराय म्हणतात, '**सत्यअसत्यासी मन केलें**

त्याही । मानियेलें नाहीं बहुमता ॥ मानियेला स्वप्नीं गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामीं ॥ यावरिया जाली कवित्वाची स्फूर्ती । पाय धरिले चित्तीं विठोबाचे ॥'

## कवित्वास प्रारभ

तुकाराम महाराजाना कवित्वाची स्फूर्ती नेमकी केव्हा व कशी झाली ? हा थोडा वादाचा विषय होऊ पाहात आहे श्रीगुरूचा उपदेश व नामदेवाची प्रेरणा होण्यापूर्वी तुकोबानी कवित्वाची थोडीफार रचना केली असावी असे जाणकाराना वाटते सन १६४० च्या प्रारभी तुकोबाना गुरुपदेश झाला याच सुमारास त्याची पदे व अभगसपदा सर्वत्र प्रसिद्ध होती, अशी बहिणाबाईची साक्ष आहे या साक्षीवरून असे मानणे प्राप्त आहे की, तुकोबाच्या कवित्वास प्रारभ गुरुपदेशाच्याही आधी झालेला असावा 'तुकोबाचीं पदें अद्वैत प्रसिद्ध । याचा अनुवाद चित्त सुखी ॥ तुकोबाचा छद लागला मनासीं । ऐकता पदासीं कयेमाजीं ' अशी आर्तता ज्या तुकोबाची व तुकोबाच्या अभगाची बहिणाबाईस सन १६३९–४० सालाच्या सुमारास लागते, ते अभग महाराष्ट्रात कथा-कीर्तनातून याआधीच प्रसृत झालेले दिसतात तुकाराम महाराजाच्या कवित्वाच्या प्रारभासबधी महीपतीने भक्तलीलामृतात म्हटले आहे त्यावरूनही या मतास दुजोरा मिळतो महीपती म्हणतात, 'ऐसे जाणूनि पाडुरगमूर्ती । विचार करीत आपुले चित्तीं । म्हणे तुका वदेल माझी कीर्ती । ते कवित्व स्फूर्ती त्यासी द्यावी ॥ मग नामदेवाचा धरोनि हात । देहूसि आले पढरिनाथ । तुका रात्रीं असता निद्रित । दृष्टांत दाखवित जगदात्मा ॥ तुकयाचें अल्पसतोषी मन । पाठातर इच्छित सतवचन । मग आज्ञा केली जगज्जीवनें । प्रासादिक वचनें बोलावीं ' आणि यानतर 'कवित्वासी प्रारभ केला प्रीतीं । सप्रेम मतीं आपुल्या ' गुरुपदेशाच्या आरभीच तुकोबाचे कवित्व त्याच्या नम्रत्वाचे, शालीनतेचे द्योतक आहे. 'गाईन ओविया शिष्याच्या आधारे', 'सताचीं उछिष्टें बोलतो उत्तरें', 'करितों कवित्व बोबड्या उत्तरीं । झणि मज-वरि कोप धरा ' या शालीन व विनयशील भाववृत्तीस प्रखर तेज व सामर्थ्य गुरुपदेशानतर येत राहिले.

## काही काव्यकथा

तुकोबाचे प्रारभीचे कवित्व हे बहुधा 'पाडुरगा करू प्रथम नमना' या पद्धतीचे असावे बाल-क्रीडेचे अभगही तुकोबानी प्रारभीच्या काळात भागवतातील श्रीकृष्णचरित्रातील कथाप्रसगाच्या अनुरोधाने गाइले असावेत हरिदासानाही तुकोबाचे हे कवित्व श्रोत्याचे चित्त कृष्णप्रेमात रगवून सोडण्यास उपयुक्त झाले असावे 'कीर्तनामाजीं साचार । चरित्र नसले पाठांतर । त्याचा अभग वरच्या-वर । वैष्णववीर करीतसे ॥ प्रासादिक कविता ऐकूनि कानीं । श्रोते आश्चर्य करिती मनीं । कीर्तनीं रग येतसे चौगुणीं । वरदवाणी म्हणोनिया ' अशा भाषेत महीपतिबोवानी तुकोबाच्या कवित्वाचा परिणाम वर्णन केलेला आहे दामाजी, भानुदास, सुदाम इत्यादीची चरित्रे याच काळातील असावीत काही कथा निर्माण करून ईश्वरी कृपेचा प्रभाव दाखविण्याचा प्रकारही याच प्रारभीच्या काळातील असावा वृक्षावरच्या पक्ष्यावर बाण धरून बसलेला पारधी व या संकटातून श्रीहरीनें पक्ष्याची केलेली सुटका (अभगक्रमाक ६०७), पाडसासहित चरणाऱ्या मृगाभोवती पारध्याने निर्माण केलेले सकट व त्यातून श्रीहरीने चमत्कृतीने केलेली त्याची सुटका (अभगक्रमाक ६७८), कुरुक्षेत्रावरील रणसग्रामात हत्तीच्या गळ्यातील घंटेखाली राखली गेलेली पक्ष्याची पिले (अभगक्रमाक २५५०), दावाग्निभक्षणाची कथा (अभगक्रमाक ४२३१-८२), उपमन्यूस मिळालेला क्षीरसागर (अभंगक्रमाक ४४९३) इत्यादी कथा कीर्तनप्रसगी उपयोगी याव्यात म्हणून तुकोबानी निर्माण केल्या असाव्यात याच हेतूने त्यानी काही विनोदी व उपहासपर अभग रचले असावेत

## हा असा विनोद

हरिप्रेमच कीर्तनात गावे, इतर गोष्टी कधी करू नयेत असा तुकोबाचा दडक असला तरी सर्वसामान्य लोकाचा भोळसर परमार्थ व स्वार्थी प्रपच याची शब्दचित्रे अशा प्रकाराचा निषेध

करण्यासाठी त्यांनी रंगवलेली दिसतात 'सुखें वोळव दावी गोहा' या अभंगात बायकोचे फाजील लाड करणाऱ्या 'गोहा'चे, नवऱ्याचे मोठे विनोदी चित्र तुकोबांनी रंगविले आहे (अभंगक्रमांक ३६) वाराणशीस निघालेल्या प्रपंचग्रस्त माणसाची 'राडांपोरांनी' कशी भागवण केलेली असते याचे मोठे खुमासदार शब्दचित्र बुवांनी काढलेले आहे (अभंगक्रमांक ५१८) वाघ आणि कोल्हा या दोन ठकांच्या सभापणातून तुकोबांनी काढलेला निष्कर्ष चिंतनीय आहे (अभंगक्रमांक ३०५२) म्हातारपणी पंढरपुरास निघालेली व वेशीपासून परत वारंवार येणारी व शवटी 'आता कासया याने जाऊं। काय जाऊनि तेथें पाहूं ॥ मुलें लेकरें घर दार। माझें येथेंचि पंढरपूर' म्हणून निर्णय घेणारी आवा सर्वांच्याच परिचयाची आहे (अभंगक्रमांक ४२१९) आणि कामाचा अंकित झालेला भ्रतार व त्याच्याशी गुजगोष्ट करणारी भार्या यांचा विनोदी संवाद संसारग्रस्त माणसाच्या स्वभावाचे मार्मिकपणे दिग्दर्शन करणारा आहे लहान वयाच्या नवऱ्याची बायको व म्हाताऱ्या नवऱ्याची बायको यांच्यातील संवाद कीर्तनप्रसंगी हास्यरस निर्माण करणारा असला तरी 'पूर्व सुकृताचा ठेवा' कसा असतो हेही स्पष्ट करणारा आहे (अभंगक्रमांक ४४९५)

## आणि हा असा कळवळा

तुकोबांच्या या प्राथमिक कवितेची ओळख सर्वांना पटण्यासारखी आहे पुढे गुरुकृपेचा स्पर्श होताच, आत्मानुभवाने बैठक पक्की होताच, 'नित्य नवा दीस जागृतीचा होऊन पांडुरंगाचा संग वारंवार होऊ लागताच त्यांच्या कवित्वास आगळेच तेज चढले पांडुरंगाच्या विरहामुळे होणाऱ्या आर्त वाणीने सर्व जीवांचे चित्त विरघळून जाईल तुकाराम महाराजांच्या या भावकाव्यास स्फुटतेचे रूप असले, तरी प्रत्येक अभंग म्हणजे पांडुरंगाच्या गळ्यातील एक एक भावमौक्तिकच होय एवढी चित्ताची आर्तता, मनाचा एवढा हळुवारपणा, वृत्तीची एवढी लीनता इतरत्र सापडणे कठीण आहे विठ्ठलाच्या नावाने तुकोबांनी केलेला पुकार आजही साध्या साध्या माणसाचे चित्त गहिवरून सोडणारा आहे 'तुका म्हणे माझ्या आसावल्या बाहचा। तुज क्षेम द्यायां पांडुरंगा' यातील तीव्रता कविमनेचे अंतरंग स्पष्ट करणारी आहे 'माझी विठ्ठल माउली। प्रेमपान्हा पान्हायेली ॥ कुर्वाळूनि लावी स्तनीं। न वजे दुरी जवळूनि ॥ केली पुरवी आळी। नव्हे निष्ठुर कोंवळी ॥ तुका म्हणे घास। मुखीं घाली ब्रह्मरस ॥' या अभंगातील वात्सल्य नामदेवाच्या खेरीज इतरत्र कुठे पाहायला सापडणार? 'येईं गा विठ्ठला। येईं गा विठ्ठला। प्राण हा फुटला आळविता' असा पुकार साध्या कवीच्या मुखातून कसा येणार? 'क्षेम देयाला हो। स्फुरताती दंड बाहो ॥ आता धडधडा चालें। देईं उचलूं पाउलें ॥ साडीं हसगती। बहु उत्कंठा हे चित्तीं ॥ तुका म्हणे आई। भेटि रंगें विठाबाई ॥' असा कळवळा पाहून वाचकाचे चित्त आजही गलबलून जाते 'कोठें गुंतलासी योगियाचे ध्यानीं', 'कोठें गुंतलासी कोणाच्या धवया', 'बाळ मातेपाशी सांगे सानभूक', 'तू माउलीहून मायाळ। चंद्राहूनी शीतळ', 'नलगे मायेसी बाळ निरवावें' इत्यादी अभंगातील करुणा व वात्सल्य वारंवार अनुभवावे एवढे श्रेष्ठ आहे तुकोबांच्या अंतरंगाचे दर्शन या करुण व वत्सलरसपर अभंगातून कसे घडले याचा आढावा आम्ही पहिल्या खंडात घेतलेला आहे त्याचप्रमाणे तुकोबांच्या कवित्वाच्या प्रभावाने समाजाची जागृती कशी होत राहिली व ती आजही कशी होण्यासारखी आहे, यासंबंधीचीही विस्तृत चर्चा आम्ही दुसऱ्या खंडातील निबंधात घेतलेली आहे. येथे तुकाराम महाराजांच्या कवित्वाच्या आणखी काही खुणा निरखून पाहू

## उपमा व दृष्टान्त

आपले प्रतिपादन चटकदार व्हावे, श्रोत्यांच्या-वाचकांच्या मनास ते एकदम पटावे, त्यांच्या चित्तास संतोष होऊन बोधाचा उमग सहजसुलभ व्हावा म्हणून तुकाराम महाराजांनी अतिशय समर्पक असे उपमा व दृष्टान्त अलंकार सहजगत्या वापरलेले आहेत या उपमांनी व दृष्टांतांनी अर्थबोध तर

सुलभ झालाच, पण अर्थबोधामुळे व उपमाचातुर्यामुळे श्रोत्याच्या व वाचकाच्या चित्तास परम हर्षही होतो ' निर्नासिकासी जैसा नावडे आरसा। मूर्खालागीं तैसा शास्त्रबोध ', ' वाळवंटीं साकर पडे। तेथें गज येउनी काय रडे? ', ' परिमळ म्हणुनी चोळूं नये फूल। खाऊं नये मूल आवडतें ', ' चंद्रामृतें तृप्ति पारणे चकोरा। भ्रमरासी चारा सुगंधाचा ', ' सोनियाचा कळस। माजी भरिला सुरारस॥ मृत्तिकेचा घट। माजी अमृताचा साट ', ' धेनु चरे वनांतरीं। चित्त बाळकाचे घरीं ', ' फळे देठींहून झडे। मग मागुते न जोडे ' इत्यादी ओळीतील उपमादृष्टान्तानी तुकोबाची कविता बहरून गेली आहे. कधी कधी तुकोबा एका सिद्धान्तासाठी तीनतीन चारचार दृष्टान्त एकापेक्षा एक सरस असे देतात, तेव्हाची बहार काय वर्णन करावी? अधमाच्या चित्तास कोणताही उपाय कसा नाही ? तर तुकोबा म्हणतात, कडू लिंबाच्या झाडास साखरेचे आळे करून काय फायदा ? खापराला परीस लावून उपयोग काय ? चंदनाच्या संगतीत कळकाचा काय उपयोग? ढोंगी मनुष्य कसा असतो ? तर तुकोबा म्हणतात, ' काय सर्प खातो अन्न। काय ध्यान बगाचें...काय उंदीर नाहीं धावीं। राख लावी गाढव ' आणि एखाद्या वेळी संपूर्ण रूपकाचाच आश्रय घेऊन तुकाराम महाराज मोठी मौज साधतात. ' हरिनामवेली पावली विस्तार। फळीं पुष्पीं भार वोल्हावली॥ तेथें माझ्या मना होईं पक्षिराज। साधावया काज तृप्तीचें या ' यासारख्या अभंगामधून तुकोबाची श्रेष्ठ भक्तिसाधना काव्यात्मकतेबरोबरच वावरताना दिसते.

## ' सुंदर तें ध्यान '

पांडुरंगाची सगुण, साकार व कोटिसूर्याहून तेजाळ अशी गोचर वर्णने तुकोबांनीच रंगवावीत. जें जें त्याच्या ध्यानी सतत वसे ते ते त्याच्या पुढे सगुणसुंदर रुपात उभे ठाके. ' आळी करी भृंगध्यान। होई भृंगचि आपण ' अशी त्याच्या मनाची अवस्था होई विठ्ठलाचे रूप अतिशय मनोहर आहे, तो सालंकृत आहे, तो मदनाचा पुतळा आहे, हा साक्षात्कार तुकोबाच्या अभंगावरूनच यावा. ' सुंदर तें ध्यान उभें विटेवरी ' या तुकोबाच्या अभंगावाचून एकही कीर्तन कधी सुरू होत नाही. या सुंदर ध्यानाच्या गळ्यात तुळशीचा हार आहे. कासेस पीतांबर शोभतो आहे कानात मकराच्या आकाराची कुंडले तळपत आहेत. कंठात कौस्तुभमणी शोभतो आहे. याच रूपाची आवड प्रत्येक मराठी माणसास आजही आहे. तुकोबांनी जे पाहिले, भोगिले, अनुभविले ते रूप त्यांनी शब्दाच्या अलंकारानी चिरस्थायी करून मराठी लोकमानसात रुजविले. केवळ परम सुखच ओतून श्रीहरीचे रूप समोर उभे राहिले असे त्यांना वाटते. हा विठ्ठल मोठा राजस आहे, सुकुमार आहे. याच्या तेजापुढे चंद्रसूर्यांचे तेज लोपून जाते, याच्या कपाळावर कस्तुरीचा मळवट आहे, अंगास चंदनाची उटी आहे, गळ्यात वैजयंती माळ रुळत आहे. असा हा घननीळ सावळा पाहून सर्वांचेच भान हारपून जाते. ' रुपीं गुंतले लोचन। पायीं स्थिरावले मन ' अथवा ' तुज पाहतां सामोरी। दृष्टि न फिरे माघारी ' अशी अवस्था तुकोबाचीच या रूपसंपन्न देवामुळे होते असे नाही, तर आजही अनेकांना याच रूपकांतीने वेड लावलेले दिसून येईल. आजही या रूपाने सर्वांचे भान हरपून जाते.

ज्याचा ध्यास, त्याचा भास या न्यायाने तुकोबा नित्य पांडुरंगाच्या संगतीत वावरले त्याच्या कृपेच्या, वात्सल्याच्या नाना छटा त्यांनी आपल्या शेकडो अभंगातून व्यक्त केल्या आणि समाजातील सर्व थरावरील साधकांना व प्रापंचिकांना या शब्दरत्नांची लूट करणे सुलभ झाले. तुकोबाचा एखादा अभंग माहीत नाही, एखादा चरण पाठ नाही, असा एकही मराठी मनुष्य मिळणार नाही. समस्त जनतेच्या प्रीतीस तुकोबा परिपूर्णपणे उतरलेले होते. ज्याच्यात्याच्या मुखात त्यांचेच चरण घोळत असतात कुणास त्यांचा आंतरिक ओलावा आवडतो, कुणास त्याच्या आर्त पुकाराची ओढ असते, कुणास त्याच्या प्रीतिकलहात गोडी वाटते, कुणास त्यांचा सामाजिक उपरोध आवडतो, कुणास त्यांचे

व्यवहारचातुर्य भुरळ पाडून जाते. कुणास त्यांची श्रेष्ठ अनुभूती चकित करून सोडते. तर कुणी त्याच्या सुभाषितवजा चटकदार वचनानी मोहित होऊन गेलेला असतो.

## सुभाषितांची मौक्तिके

त्याच्या सार्वकालिक सिद्धान्तानी व सुभाषितवजा वचनानी मराठी भाषा मोठीच सुललेली आहे. रोजच्या व्यवहारात हे चातुर्य अनेकाना उपयुक्त होत आहे. आज मराठी भाषेत रूढ झालेल्या अनेक म्हणी तुकोबाच्या अभंगातील असल्याने त्याचा समाजमनावरील गाढा प्रभाव स्पष्ट होण्यासारखा आहे. नित्याच्या व्यवहारात पदोपदी उपयोगी पडणाऱ्या, सावध करणाऱ्या या सुभाषितानी व मार्मिक वचनानी तुकोबाना दिगंत कीर्ती मिळवून दिलेली आहे. 'चणे खावे लोखंडाचे। तेव्हां ब्रह्मपदीं नाचे', 'महापुरीं झाडें जातीं। तेथें लव्हाळे वाचतीं', 'आलें देवाजीच्या मना। तेथें कोणाचें चालेना', 'सत्य संकल्पाचा दाता भगवान', 'असाध्य तें साध्य करितां सायास, कारण अभ्यास तुका म्हणे', 'शुद्ध बीजापोटीं। फळें रसाळ गोमटीं', 'चित्त समाधानें। तरी विष वाटे सोनें', 'महारासि सिवे। कोपे तो ब्राह्मण नव्हे', 'सुख पाहतां जवापाडें। दु:ख पर्वताएवढें', 'गेली वीरसरी। मग त्यासि रांड मारी', 'दया तिचें नांव भूतांचें पाळण। आणिक निर्दळण कटकांचें', 'कन्या सासुऱ्यासि जाये। मागे परतोनी पाहे', 'अंतरींचें घावे स्वभावें बाहेरी। धरितां परी आवरे ना', 'मन करा रे प्रसन्न। सर्व सिद्धीचें कारण', 'देव सखा जरी। जग अवघें कृपा करी', 'शांतीपरतें नाहीं सुख। येर अवघेंचि दु:ख', 'लहानपण देगा देवा। मुंगी साखरेचा रवा', 'ज्याचे अंगीं मोठेपण। तया यातना कठीण', 'नीचपण बरवें देवा। न चले कोणाचाही हेवा', 'भिक्षापात्र अवलंबणे। जळो जिणें लाजिरवाणें', 'नम्र झाला भूतां। तेणें कोंडिलें अनंता', 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति। देह कष्टविती उपकारें', 'भूतांची दया हे भांडवल संता। आपुली ममता नाहीं देहीं', 'आलिया भोगासी असावें सादर। देवावरी भार घालूनिया' इत्यादी सुभाषितानी व म्हणीवजा चटकदार वचनानी तुकोबाची कविता अतिशय समृद्ध बनलेली आहे. या अमृतबिंदूच्या तुषारानी मराठी मनोभूमी सतत ओलसर बनलेली आहे.

असे हे तुकोबाच्या कवित्वाचे स्वरूप आहे. सुबोध, सरळ व हृदयाचा ठाव घेणारे हे कवित्व पांडुरंगाच्या कृपेने आर्द्र बनलेले आहे. मराठी संस्कृतीची जडणघडण होत असताना या वरवर प्राकृत व क्वचित प्रसंगी ओबडधोबडही वाटणाऱ्या तुकोबाच्या वाणीने फार मोठे कार्य साधले आहे. तुकारामबुवानी हा प्रेमामृताचा वर्षाव सतत मराठी जनमानसावर केला; त्यामुळेच येथे मानवी मनातील सद्भावना अजूनही तग धरून आहे. 'अमृताची वाणी वरुषला शुद्ध' असे ज्याचे वर्णन केले जाते तो तुकाराम मराठी जनतेचा एक मोठा महाकवीच म्हणावा लागेल. मराठी जनतेने त्याच्यावर अलोट प्रेम केले आहे. 'ज्ञानदेव-तुकाराम' या सामासिक शब्दात मराठी संस्कृती सामावलेली आहे.

## भागवतधर्माचे तत्त्वचिंतन

तुकाराममहाराजाच्या कवित्वाच्या रूपाने जे तत्त्वचिंतन आकारास आले, त्याला एखादी स्वतंत्र बैठक पूर्वपरंपरेहून वेगळी अशी देता येण्यासारखी नाही. वेद, उपनिषदे, गीता, भागवत, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत इत्यादी ग्रंथानी व श्रीकृष्ण, श्रीराम इत्यादी अवतारी पुरुषानी सांगितलेल्या मार्गाने जो भागवत धर्म परिपुष्ट झाला त्याचाच विकास तुकोबाच्या अभंगवाणीत दिसून येतो. समस्त मानवजातीच्या संसाराची नीट मांडणी करून तिला अत्युच्च सुखाची प्राप्ती करून देण्यासाठी हा भागवत-धर्म वैदिक काळापासून हळुहळू विकसित होत आला आहे. वेदातील दैवतज्ञान, उपनिषदातील ब्रह्मविद्या, गीतेमधील ज्ञानोत्तर भक्ती, भागवतामधील सगुणभक्ती इत्यादीचा परिपाक ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ यांच्या प्रयत्नाने मराठीत होऊन जे भागवतधर्माचे मंदिर उभे राहिले, त्यावर 'तुका झालासे

कळस' अशी साक्ष बहिणाबाईने दिलेली आहे उपनिषदरूपी गाईचे दुग्धामृत म्हणजेच भगवद्गीता आहे आणि याच भगवद्गीतेवर श्रीज्ञानेश्वराची भावार्थदीपिका अथवा ज्ञानेश्वरी ही प्रसिद्ध टीका आहे. ज्ञान, योग, कर्म, भक्ती इत्यादी विविध अगाचे माहात्म्य गीताटीकाकारानी वारवार वर्णन केले असले तरी ज्ञानोत्तर भक्ती हेच गीतेचे सार भागवतधर्मीय सतानी मानलेले आहे

## गीता व भागवत

गीतेमधील तत्त्वज्ञान ज्या श्रीकृष्णाच्या चरित्रात साकार झालेले दिसते त्या श्रीकृष्णाचे चरित्र रसाळ पद्धतीने नाना कथाच्या आधारे भागवतात आले आहे. भगवताच्या कथेबरोबरच ध्रुव, प्रल्हाद, अजामेळ, गजेन्द्र, सुदामा, ऋषभदेव, कपिलदेवहूती इत्यादीच्याही उपकथा भागवतात भक्तीचे वेगवेगळे आविष्कार प्रकट होताना साकार झाल्या आहेत नारद-ब्रह्मदेव, विदुर-उद्धव, विदुर मैत्रेय, कृष्ण-उद्धव याचे सवाद तात्त्विक असले तरी त्याचे लक्ष्य भक्तियोगाची परिपुष्टी हेच आहे कृष्णाच्या बाललीला अथवा गोकुळातील क्रीडा हा तर प्रत्येक प्राकृत भाषेतील कवीचाही एक महत्त्वाचा विषय आहे भागवतामध्येच नवविधा भक्तीचे स्वरूप स्पष्ट झाले भगवताचे गुणानुवाद व नामसकीर्तन या दोन साधनाची लोकप्रियता याच ग्रथामुळे वाढली सत व त्याची सगत याचे माहात्म्य, श्रवणाचे माहात्म्य, भक्तिप्रेमाचे माहात्म्य याच ग्रथामुळे वाढीस लागले सर्वसामान्य माणसास कष्टदायक योग, विविध प्रकारचे कर्मकाड, शुष्क ज्ञानचर्चा इत्यादी फदात न पडता नामसकीर्तनाच्या सुलभ व सोप्या मार्गाकडे भागवत पुराणाने वळविले भागवताच्या एकादश स्कधावर विस्तृत टीका लिहून एकनाथानी याच जनसामान्याच्या मार्गाची वाढ केली

काया, वाचा, मन, चित्त, बुद्धी, इद्रियाकडून होणारी सारी कर्मे हे सर्व त्या नारायणाला समर्पण करून राहावे, हा एक विचार गीताभागवताच्या मननाने मराठी सतपरपरेत दृढ झाला ईश्वराच्या मगलदायक व भक्तसरक्षक अवताराच्या लीला वर्णन करण्यात धन्यता मानली गेली निर्मल भक्तीने, प्रेममय भक्तीनेच परमेश्वर वश होतो असा अनुभव येत राहिला. शुचिता, तप, तितिक्षा, मौन, स्वाध्याय, आर्जव म्हणजे मनाची सरलता, ब्रह्मचर्य, अहिंसा, मनाची द्वद्वातीत अवस्था म्हणजे समता इत्यादी गुणाची जोपासना या धर्मपथाने केली हा भागवतधर्म अहिसामूलक असल्याने परपीडा, पशुहत्या व मासभक्षण याना आपोआपच बदी आली भगवताचे नित्य स्मरण, त्याच्या पुण्यक्षेत्राची यात्रा, त्याच्या चरित्राचे श्रवणमनन, सतसग इत्यादी विशेषानी भागवतधर्मच पुढील मराठी सतानी परिपुष्ट केला. या भागवतधर्माचे मुख्य दैवत श्रीकृष्ण म्हणजे श्रीविष्णू असले तरी ते शिवापासून वेगळे नाही असाच तत्त्वबोध सर्वत्र आढळतो, म्हणूनच शिवोपासक नाथपथातील ज्ञानदेवादी भावडे विठ्ठलाच्या उपासनेत रमणाऱ्या भागवतसप्रदायात आली दत्तोपासनेत रमणारे एकनाथ दत्त तोच भगवान विष्णू व कृष्ण समजून भागवतधर्माची ध्वजा उच्च खावरून धरण्यास प्रवृत्त झाले

## भक्तीचा डांगोरा

गीताभागवतावर उभारलेल्या या भागवतधर्माच्या पार्श्वभूमीवर तुकोबाचे तत्त्वचिंतन पाहाणे अगत्याचे आहे ससारत्रासामुळे व व्यवहार फसल्यामुळे तुकोबाची मूळची वैराग्यवृत्ती वर उफाळून आली पूर्वसुकृताचा व परपरेचा धागा बळकट झाला आणि भडाऱ्याच्या, भामनाथाच्या डोगरावर वृक्षवल्ली व वनचरे याच्या सहवासात त्याची साधना सुरू झाली गीता, भागवत, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवतटीका याच्या वाचनाने, मननाने तुकारामबुवाना 'नित्य नवा दीस जागृतीचा' वाटू लागला प्रभुचिंतन, सतसगत, हरिकीर्तन, नामस्मरण, सत्कथाश्रवण याची महती त्याना जाणवू लागली आपल्याच मनाशी आपणच सवाद करून तुकोबा हरिकथा भोजनाचे निरनिराळे प्रकार करून सतुष्ट झाले आणि स्वत ला मिळालेले आत्मिक समाधान सर्व जिज्ञासू लोकाना वाटण्यासाठी ते उत्सुक

झाले. यासाठी भागवतधर्माच्या आधारेच तत्त्वचिंतन करून त्यानी एक सहजसुलभ असा साधनमार्ग प्रवर्तित केला. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ यानी जो मार्ग चोखाळला होता तोच तुकोबानी झाडून पुसून स्वच्छ केला. 'झाडूं संताचे मारग । आडरानें भरलें जग' हे त्यानी आपले जीवितकार्य स्पष्ट केले. 'अर्थे लोपलीं पुराणें । नाश केला शब्दज्ञानें ' म्हणून एका साध्या व सुलभ अशा नामसंकीर्तनावर आधारलेल्या भक्तिमार्गास, वारकरी पंथास त्यानी उजळा दिला. असा भक्तीचा डांगोरा पिटल्यावर *कळिकाळासही भीती वाटेल अशी त्याना खात्री होती.*

## एक विठ्ठल हेच दैवत

भक्तिप्रेमावर आधारलेल्या या वारकरी पंथाचे दैवत म्हणजे पंढरपूरचा पांडुरंग अथवा विठ्ठल होय. या विठ्ठलावर सर्व संतांचे मनापासून प्रेम आहे याच्या गुणवर्णनात सर्वजण तल्लीन होतात, देहभान विसरतात, सारी दु खे त्याच्यासमोर सांगतात. त्याच्या सगुण रूपाचा वेध सर्वांना आहे. हा विठ्ठल म्हणजे कैवल्याचा पुतळा, याचे तेज कोटिसूर्यांहून आगळे. हा भक्तवत्सल, हा चैतन्याचा गाभा, सर्व रत्नाची शोभा याच्या ठिकाणी, अशी साधुसंताची व सर्व वारकऱ्याची श्रद्धा आहे विशेष बाब म्हणजे शिवविष्णू भागवतधर्मात एकच कल्पिले आहेत याच्याखेरीज अडाणी माणसानी जी विविध देवदैवते पुष्कळ *निर्माण केली होती, ज्याना मासाचा, रक्ताचा नैवेद्य लागत होता, त्याना तुकोबासारख्या सत्पुरुषाने* हद्दपार करण्याचे ब्रीद घेतले होते. या एका विठ्ठलावाचून अन्य दैवत त्याच्या मनास रुचत नव्हते. दगडधोंड्याला शेंदूर फासून नाना वेडेचार व अनाचार करणाऱ्या भक्ताचे व त्याच्या गुरूचे धिंडवडे तुकारामबुवानी कसे काढले हे आपण द्वितीय खंडातील प्रास्ताविक निबंधात पाहिले आहे. 'कुणवट बुळवाडी । तैसा आन आन देव मांडी' पाहून ज्ञानदेवानाही सात्त्विक संताप आलेला आहे. नाना देवदैवताना भजणारा भक्त अज्ञानी असून त्याची स्थिती गावभर भटकणाऱ्या 'अहेव ' स्त्रीसारखी *असल्याचे ज्ञानेश्वरानी म्हटले आहे* मेसाबाईसारख्या क्षुद्र दैवतासमोर नारळ, बोकड, मेंढरू देणाऱ्या लोकाची एकनाथानी कीवच केली आहे 'सांडोनिया विठाबाई । का रे पूजिता मेसाई ?' असाच सवाल त्यानी केलेला आहे आणि याच तत्त्वविचारास अनुसरून तुकोबानीही गर्जना केली आहे, 'नव्हे जोखाई जोताई । मायराणी मेसाबाई । बळिया माझा पंढरिराय । जो या देवाचाही देव ' अशा या क्षुद्र व हीन दैवताना सोडून लोकानी देवाचाही देव जो विठ्ठल त्याचे भजन करावे हा त्याचा उपदेश आहे.

## ' नामसंकीर्तन साधन पैं सोपें '

या प्रेममय विठ्ठलास नामस्मरणाने व हरिकीर्तनाने आळवण्यावर तुकोबाचा कटाक्ष आहे. *'राम कृष्ण हरी' हाच एक सोपा मंत्र त्यानी सर्वसामान्याना दिलेला आहे* 'विठ्ठल मंत्र सोपा । करी पाप निर्मूळ ' अशी त्याची गर्जना आहे ' राम कृष्ण गोविंद नारायण हरी । केशवा मुरारी पांडुरंगा ' हा ध्यास त्याच्या मनाला सततचा आहे 'जयजय राम कृष्ण हरी ' या मंत्रासारखा सोपा व निर्धास्त असा दुसरा मंत्र त्याना माहीत नाही. इतर मंत्रतंत्र ते मानीत नाहीत. इतर मंत्रतंत्रात थोडी जरी चूक झाली तरी पिसे लागते, घात होतो पण 'नाम सर्व काळ शुभदायक' असल्याचे तुकोबा सांगतात. नामघोषात विधिनिषेध फारसे नाहीत प्रेमाने तल्लीन होऊन प्रभूच्या नाममंत्राचा घोष करायचा व *भजनप्रेमात लीन व्हायचे, हाच मोक्ष तुकोबानी मानला आहे.* या नाममंत्राने व हरिकीर्तनाने जन्म-जन्मांतरीची पापे जळून जातील अशी त्याची खात्री आहे समुद्रवलयांकित पृथ्वीचे दान जरी कुणी दिले तरी त्याची तुलना नामाबरोबर होणार नाही. सर्व शास्त्रे पाठ केली तरी हरिनामाची सर त्याला नाही. नामाशी तुलना सर्व तीर्थांबरोबरही होणार नाही. हरिनामाखेरीज दुसरे काहीच पवित्र नाही, असे त्याना वाटते. नामस्मरणातच सारी स्नानसंध्या आली असेही त्यानी म्हटले आहे.

हे नामसंकीर्तनाचे साधन फारच सोपे आहे यासाठी वनान्तरास जाणे नको, की यज्ञयागादी सायास करायला नकोत आपल्याच ठिकाणी बसून त्याच्या रूपगुणाची आळवणी करावी 'रामकृष्ण हरि विठ्ठला केशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ।। याविण आणिक नाहीं पैं साधन । वाहतसे आण विठोबाची' असे प्रतिज्ञेने तुकोबा सांगतात म्हणूनच त्याचा आग्रह आहे की, 'प्राणिया एक बीज मंत्र उच्चारीं । प्रतिदिनीं रामकृष्ण म्हण का मुरारी ।। . उपास पारणें नलगे वनसेवन । न लगे धूम्रपान पञ्चाग्नितापणें ' म्हणून त्यानी नामाचे माहात्म्य वर्णन केले आहे. ' संध्याकर्म ध्यान जपतप अनुष्ठान । अवघे घडे नाम उच्चारितां' अशी त्यानी खात्री दिलेली आहे ' अनुहतध्वनि वाहे सकळा पिंडीं । राम नाहीं तोंडीं कैसा तरे ? ' असा प्रश्न तुकोबानी एका अभगात केलेला आहे. या नामाखेरीज इतर कुठलीही साधने नकोत लौकिक व्यवहारही सोडायला नको; वनात जाऊन भस्म-दंड धारण करण्याची जरूरी नाही फक्त या 'कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणे नारायण येईल भेटी' अशी त्यांची शिकवण आहे

## सर्व तीर्थांचे माहेर

ज्या श्रीहरीचे नाम एकचित्ताने गायचे त्याच्या पंढरीक्षेत्राचा महिमा वारकरी संत फार मोठा मानतात पुंडलीक महामुनीने सर्वांसाठी श्रीकृष्णाला बालरूपात भिवरेच्या तीरावर विटेवर उभे केल्यापासून या क्षेत्राचे महत्त्व अनेक पटीनी वाढत गेले. आषाढी व कार्तिकी एकादशीना येथे आजही लक्षावधी विठ्ठलभक्त वारकरी जमून प्रभुदर्शनाचा, प्रेमाचा, संतसंगतीचा आनंद लुटतात प्रत्येक वारकऱ्याने पंढरीची वारी नियमितपणे करावी असा त्यानी दंडक घालून दिलेला आहे 'होय होय वारकरी । पाहे पाहें रे पंढरी । ' असा त्याचा उपदेश आहे. पंढरपुरास गेल्यावर रखुमादेवीवरास पाहाता येईल, त्याच्या दर्शनाने डोळे व कान तृप्त होतील संतमहंताची भेट होईल वाळवंटात आनंदाने नाचायला मिळेल. 'तें तीर्थांचे माहेर । सर्व सुखाचे भांडार' असल्यामुळे याच जन्मात त्या क्षेत्राची वारी जन्मास येणाऱ्या प्रत्येक माणसाने करावी अशी त्याची अपेक्षा आहे उगाच नाना तपाचे डोंगर करून काय फायदा ? उगाच नाना देश पिसाटाप्रमाणे कशासाठी हिंडावेत ? इतर अनेक दैवताचे पूजन तरी कशासाठी करावे ? मुक्ती मिळविण्यासाठी उगीच कष्ट करण्यात काय फायदा ? कारण ती तर 'मिळे पंढरीस फुकासाठीं' या पंढरपुरचे सुख काय वर्णन करावे ? या भरलेल्या बाजारपेठेत पुंडलीकाने 'अवघें वैकुंठ आणियेलें' आषाढीकार्तिकीस तर येथे फार मोठे बाजार भरतात या पंढरीचा महिमा आणखी तरी काय सांगावा ? ' ऐसा ठाव नाहीं कोठें । देव उभाउभी भेटे ' म्हणूनच येथील अवघे चराचर पावन होऊन गेले आहे 'धन्य तेहि भूमी धन्य तरुवर । धन्य तें सरोवर तीर्थरूप ।। धन्य पशुपक्षी कीटक पाषाण । अवघा नारायण अवतरलासे' असे तुकोबानी केलेले या पंढरीच वर्णन आहे

## असा हा संतसहवास

या पंढरपुरास आल्यावर पांडुरंगाच्या दर्शनाबरोबरच आणखी एक फायदा होतो तो असा की, येथे साधुसंताची संगत होते साधुसंताचा समागम हा एक वारकरी पंथातील तात्त्विक चर्चेचाच भाग झाला आहे. देवाच्या बरोबरीने त्याच्या भक्ताचे अथवा संताचे माहात्म्य तुकोबासारखे संत मानतात कधीकधी तर देवापेक्षाही भक्तास महत्त्व येते देव मोक्ष देईल, तर संत प्रभुप्रेम मिळवून देतील अशी श्रद्धा वारकऱ्याची आहे 'आलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे' हे तर आहेच, पण मोक्षापक्षाही वरचढ असणारे निरंतरचे प्रभुप्रेम संतसहवासातच मिळते असे तुकोबाना वाटते हे संत आपणास निरंतर जागृती आणतात म्हणून त्यानी त्याचे उपकार मानले आहेत याच्या पायी जीव ठेवला तरी तो थोडा होईल असे त्याना वाटते साधुसंताच्या भेटीने दसरादिवाळीचा आनंद घरी

अवतरतो. '**संत पाउलें साजिरीं**' घराकडे वळताना दिसली की '**गंगा आली आम्हांवरी**' असे तुकोबाना वाटते. हे संत वा हरिजनच त्यांना सगेसोयरे वाटतात. सतसंगतीतच काळ मोठ्या सुखात जातो. '**डौरलो भक्तिसुखें । सेवूं अमृत हें मुखें**' अशा अनुभूतीत '**प्रेमसुखाचा कल्लोळ**' निर्माण झाल्यास नवल काय? लेकराचे हित ज्या कळवळ्याने माऊली जाणते त्याच जातीचे संत प्रेम करतात. '**करी लाभाविण प्रीती**' अशी तुकारामाची अनुभूती आहे. अशा या संताचे गुणदोषही आपण कधी पाहू नयेत. पुष्पाचा सुवास कधी त्याला पिळून मिळतो काय? या साधुसंताच्या चरणावर तुकाराम बुवा अतिशय लीन झालेले दिसतात. '**तुमचिये दासीचा दास करूनी ठेवा**' असा आशीर्वाद ते संताना मागतात. '**गोमटें तें करा माझें । भार ओझें तुम्हांसी**' अशी त्याची संताना विनवणी आहे आणि हे गोमटे कोणते? तर विठोबाची खूण फक्त संतानाच माहीत असते. तुकारामबुवानी एका अभंगात म्हटले आहे, '**गुरुचिया मुखें होईल ब्रह्मज्ञान । न कळे खूण विठोबाची ॥ वेदांतें विचारा पुराणाते पुसा । विठोबाचा कैसा प्रेमभाव ॥ तुका म्हणे सांडा जाणिवेचा शीण । विठोबाची खूण जाणती संत**' उन्हात हिंडताना उदकाची भेट व्हावी त्याप्रमाणे या जिवलग संताचा समागम त्याना वाटतो. भुकेलेल्या माणसास मिष्टान्नाचा योग जितका प्रिय तितकाच संतयोग तुकोबाना प्रिय

## चित्तशुद्धीचा मार्ग

विठ्ठलदर्शन, नामस्मरण, पंढरीची वारी, संतसमागम इत्यादी साधनमार्गाने वारकरी पंथ साऱ्या लहानथोराना जवळ करीत आहे तुकोबानी परिपुष्ट केलेल्या या भक्तिपंथाचा आणखी एक विशेष असा की, येथे चित्तशुद्धीच्या मार्गाने श्रीहरीचे प्रेम संपादन करायचे असते नाना प्रकारची कर्मकांडे आणि यज्ञयागादी यातायात न करता चित्तशुद्धीवर भर देऊन वरील सोपा मार्ग सर्व लहान-थोरानी चालवायचा आहे. यासाठी काही नियम दैनंदिन व्यवहारासाठी तुकोबानी सांगितले आहेत. स्त्रीसंगाचा अतिरिक्त हव्यास वारकरी पंथाला मान्य नाही '**तुका म्हणे तैशा दिसतील नारी । रिसाचिया परी आम्हां पुढे**' स्त्रिया आम्हापुढे अस्वलीप्रमाणे आहेत असे तुकोबा म्हणतात '**स्त्रियाचा तो संग नको नारायणा**' म्हणून त्यानी एके ठिकाणी म्हटले आहे. यासारख्या वचनाचा संदर्भ पाहून सावधपणे तुकोबानी वर्णन केलेल्या '**रांडापोराच्या द्वेषा**'चा अर्थ समजावून घ्यावयास हवा. स्वस्त्रीशीही संयमाने वागणारे तुकोबा परस्त्रीविषयी काय बोलतात हे सर्वप्रसिद्ध आहे. '**पराविया नारी रखुमाई-समान**' हा त्याचा बाणा आहे हीच गत धनसंपत्तीविषयी त्याची आहे. परद्रव्य, परदारा यासबधी त्याचा कटाक्ष विशेष आहे. आम्हाला धन हे गोमासासमान आहे असे बुवा म्हणतात. धन मिळवावे पण ते उत्तम व्यवहार करून, असा त्याचा उपदेश आहे. त्याना जनसंगाचा कटाळा वाटत असला तरी भलभलत्या मार्गांनी लोक संसारात रमतील तर ते कटू शब्दात त्याना सावध करण्यास मागेपुढे पाहात नाहीत. एऱ्हवी चित्तशुद्धीसाठी एकान्तासारखे दुसरे साधन नाही. '**एकांताचे सुख जडलें जिव्हारीं। वीट परिचारीं बरा आला**' असे त्यांचे उद्गार आहेत. '**खेळों मनासवें जीव तया संवादें । कौतुकें विनोदें निरंजनीं**' यात त्याना सुख आहे. अहंकार जावा, स्वतःच्या दोषाचे मूळ नष्ट व्हावे, वृत्ती पांडुरंगचरणी दृढ व्हावी, सत्संग घडावा, नामस्मरणाची गोडी लागावी, म्हणजे चित्तशुद्धी आपोआप होऊन प्रभूचे प्रेम अखंड लागेल अशी त्याची स्वानुभूती आहे.

## आणि हा आचारधर्म

तुकाराम महाराजाच्या तत्त्वचिंतनात या आचरणात्मक भागाला फार महत्त्व आहे. नुसते कोरडे तत्त्वज्ञान, शुष्क शब्दचर्चा त्याना मान्य नाही. या आचारधर्माचा आणखीही विस्तार त्यानी केलेला आहे. गीता, भागवत, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत इत्यादी ग्रंथाचे पठण, पारायण, गरुड, हनुमंत, पुंडलिक याचे पूजन, हरिहरात अभेदत्व, संतस्मरण, एकादशी व सोमवार या दिवशी उपवास,

महाशिवरात्रीस उपवास, चंद्रभागेत स्नान, पंढरीची वारी, परस्त्री, परधन, परनिंदा, मद्यमांस यांचा त्याग, चित्ताचे समत्व, परोपकाराचे व्रत इत्यादी साधना वारकरी पंथात महत्त्वाची मानली गेली असली तरी तिच्यात जटिलता व कठोरता नाही 'एक धरिला चित्तीं । आम्ही रखुमाईचा पती, ' ' परद्रव्य परनारी झाली विषाचिये परी, ' ' संतसंगें कथा करावें कीर्तन । सुखाचें समाधान रामनाम, ' ' साधकाची दशा उदास असावी ', 'कलियुगामाजी करावें कीर्तन । तेणें नारायण देईल भेटी ', ' आणिकांचे कानीं । गुण-दोष मना नाणी ', ' परद्रव्य परनारी । यांचा धरी विटाळ ', ' हित व्हावे तरी दंभ दूरी ठेवा ', ' निर्वैर व्हावे सर्व भूतांसवें, ' भूतांचा मत्सर आणि संतनिंदा । हें नको गोविंदा घडों देऊं ', ' अवघ्या दशा येणें साधती । मुख्य उपासना सगुणभक्ती ' इत्यादी वचनातून तुकोबाच्या साधनमार्गाचा, आचारधर्माचा व लोकशिक्षणाचा बोध होण्यासारखा आहे नित्य नामस्मरण करावे, संताची संगत धरावी, सद्ग्रंथाचे वाचनश्रवण करावे, कीर्तनात व भजनात प्रभुप्रेम लुटावे, परनिंदा ऐकू नये, नित्य प्रभुचरणाशी अनुसंधान असावे, सकाळी स्नान झाले की तुळशीस पाणी घालावे, गोपचंदनाचे टिळे लावावेत, ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथाचे पूजनवाचन करावे, नित्य व्यवहाराची कामे पांडुरंगास स्मरून करावीत, रात्री भगवंताचे भजन करून त्या नादात झोपी जावे, असा हा साधा साधनमार्ग व आचारधर्म वारकरी पंथात महत्त्वाचा मानला जातो

## अद्वैतावरील द्वैत

तात्त्विक बोधाच्या दृष्टीनेही वारकरी पंथ काहीसा वेगळा वाटतो अद्वैताची प्राप्ती हेच केवळ या पंथाचे ध्येय नाही द्वैतावर आधारलेली सगुण उपासनाही येथे मान्य नाही या पंथातील साधुसंतांना अद्वैताचीच अनुभूती भोगण्यासाठी द्वैत हवे सगुणनिर्गुण, द्वैतअद्वैत यांच्या पलीकडे असणाऱ्या श्रीहरीचा ज्ञानोत्तर भोग त्यांना प्रेमातून हवा असतो 'तू माझा आकार । मी तों तुझा निर्धार ।। मी तुजमाजी देवा । घेसी माझ्या अंगीं सेवा ।। मी तुजमाजी अचळ । मजमाजीं तू सबळ ।। तू बोलसी माझ्या मुखें । मी तों तुजमाजी सुखें ' म्हणून तुकोबांनी देवभक्त यांचे नाते व्यक्त केले आहे. ईश्वराला ईश्वरपणाचा साक्षात्कार झाला तो भक्तामुळे भक्ताच्या या उपकाराचे स्मरण तुकोबांनी ईश्वरास अनेक वेळा करून दिले आहे देव-भक्त यांचे अत्यंत गोड नाते फक्त वारकरी पंथातच व्यक्त झालेले आढळते 'अद्वैतीं तों माझें नाहीं समाधान । गोड हे चरण सेवा तुझी ' अशी तुकोबांची मागणी देवापाशी आहे देवभक्त हे अद्वैतातच मुरलेले, एक झालेले, परंतु भक्तिसुखासाठी ते निराकार ब्रह्मच द्वैतदशेस आले, अनेक रूपांत नटले म्हणून काही ते अलग नाही 'अद्वयाचें द्वय झालेंचि कारण । धरिलें नारायणें प्रेमसुख ।' असे त्यांना वाटते म्हणूनच त्यांचा हट्ट ' मी भक्त तू देव ' अशा द्वैताचा असतो अद्वैतावरील या द्वैती भक्तीत श्रीहरी म्हणजे प्रेमाचा पुतळा असतो 'विठ्ठल जीवाचा जिव्हाळा । विठ्ठल प्रेमाचा पुतळा ' असे तुकोबांनी म्हटले आहे

अद्वैतावरील द्वैती भक्तीमुळे अथवा ज्ञानोत्तर प्रेमभक्तीमुळे आलेली एक महत्त्वाची विशेष तुकोबांसारख्या संतांनी मानला आहे तो म्हणजे त्यांना मोक्षसुखाची अथवा मुक्तीची पर्वा नाही मुक्तीपेक्षा, ब्रह्मपदापेक्षा, कैवल्यापेक्षा, वैकुंठपदाच्या प्राप्तीपेक्षा तुकोबांना श्रीहरीचे सगुण प्रेम महत्त्वाचे वाटले संतसंगत मोठी वाटते भगवंताच्या विरहात असावे, त्याला आर्त वाणीने पुकारावे, त्याच्यावर रुसावे, त्याच्याशी हट्ट करावा, त्याची प्रसंगी वर्मेही काढावीत या प्रेमकलहातील आनंद मुक्तीमध्ये कुठून असणार ? या प्रेमसुखाचा वाटा सोडून जे मुक्ती मागतात ते करंटे होत असे त्यांनी म्हटले आहे 'देवा ऐकें हे विनंती । मज नको रे हे मुक्ती',' मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ।। मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ते गोडी ', 'आत्मस्थिती मज नको हा विचार । देई निरंतर चरणसेवा ' अशा शेकडो वचनातून तुकोबांनी भक्तीचा आदर केलेला आहे. याच मताचा दुसरा भाग म्हणजे साधुसंत

गर्भवासास कधी भीत नाहीत. कारण त्यांना जन्म घेऊन प्रभूचे प्रेम लुटायचे असते. इतर पंथीय लोकाना हा मानवी जन्म नको असतो. पण तुकोबा म्हणतात **'आम्हां जन्म घेणें युगायुगीं', 'मुनी मुक्त झाले भेणें गर्भवासा। आम्हां विष्णुदासा सुलभ तो', 'तरीच जन्मा यावें। दास विठ्ठलाचे व्हावें'** मनुष्य-जन्मास आल्याचा साधुसंताना कोण आनंद व स्वाभिमान! कारण या देहाने सगुण परमेश्वराची जवळीक साधायची. त्याच्या नामसंकीर्तनातच सर्व काया ब्रह्मीभूत करून सोडायची. **'याचि देहीं याचि डोळा'** मुक्तीचा सोहळा भोगायचा. म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात, **'तुका म्हणे नाहीं मुक्तीसवें चाड। हेचि आम्हां गोड जन्म घेता'**

यापमाणे तुकोबाच्या तत्त्वचिंतनात मोक्ष अथवा वैकुंठपद हे अंतिम साध्य नाही. जेथे अणुरेणूएवढा तुकाच आकाशाएवढा झाला तेथे कोण कुणाला मुक्त करणार? आणि गमत अशी की, *आकाशाएवढा हा तुकाच सानुला व नम्र होऊन श्रीहरीशी यातचीत करून स्वसुख भोगतो.* भक्तिप्रेमातील अवीट सुख हे मुख्य ध्येय संतानी मानले आहे. मोक्षासाठी ज्ञान, ज्ञानासाठी विरक्ती, विरक्तीसाठी नाना खडतर साधने यापेक्षा हरिभजनात व प्रभुचिंतनात सर्वच हरिरूप झाल्याची अनुभूती कितीतरी पटीनी श्रेष्ठ मानावी लागेल. भोग वा त्याचा त्याग याचे चिंतन करण्यापेक्षा हरिप्रेमात मन जडले की ज्या भोगाचा त्याग करायचा त्याचे चिंतनही सपते. **'त्यागें भोग माझ्या येतील अंतरा। मग मी दातारा काय करूं?'** *देवा, ज्या भोगाचा त्याग करणार तेच माझ्या मनात दृढ झाले तर मी काय करू? असा* मोठा मार्मिक प्रश्न तुकोबानी विचारलेला आहे. म्हणूनच तुकोबा स्पष्टपणे सागतात की, **'नको गुंफूं भोगीं नको पडूं त्यागीं। लाऊनि सरे अंगीं देवाचिये'** किंवा भोगाचेच नीट नियमानी सेवन केल्यास ते **'विषयत्यागाऐं समान'** असतात, हा बुवाचा निर्णयही महत्त्वाचा आहे. तुकोबाच्या तत्त्वचिंतनाकडे या सूक्ष्मतेने पाहावयास हवे तरच त्याचे वास्तविक वैभव ध्यानात येईल.

---



॥ श्रीविठ्ठलाय नमः ॥

॥ श्रीनिवृत्तिनाथाय नम ॥ श्रीज्ञानेश्वराय नमः ॥

॥ श्रीराघवचैतन्य श्रीकेशवचैतन्य ॥

॥ श्रीबाबाचैतन्य सद्‌गुरुभ्यो नम ॥

# देवांनीं स्वामींस चिंचवडास नेलें होतें ते अभंग

८८१ वांजा गाई दुभती । देवा ऐसी तुझी ख्याति ॥ १ ॥
ऐसे मागत नाहीं तुज । चरण दाखवावे मज ॥ २ ॥
चातक पाखरूं । त्यासी वर्षे मेघधारु ॥ ३ ॥
पक्षी राजहंस । अमोलिक मोतीं त्यास ॥ ४ ॥
तुका म्हणे देवा । कां गा खोचलासी जीवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाजा–वाझ, दुभती–दूध देतील, खोचलासि–सकट वाटले.

अर्थ – चिंतामणी देवा. तुमच्या कृपाप्रसादाने वाझ गाईदेखील दूध देतील अशी तुमची प्रसिद्धी आहे १
ला तुमच्या गणपतीचे प्रत्यक्ष चरण दाखवा, असे मी काही तुझ्याजवळ अशा प्रकारचे चमत्कारिक दान मागत नाही २
तक पक्ष्यासाठी मेघराज वर्षाव करीत असतो. ३ आणि राजहंसाच्या सेवनासाठी अमूल्य अशा मोत्यांचा चारा
र्माण झालेला आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझ्या अशा शब्दांनी तुमच्या जीवास सकट वाटले
? ५

८८२ परतें मी आहे सहजचि दुरी । वेगळें भिकारी नामरूपा ॥ १ ॥
न लगे रुसावें धरावा संकोच । सहज तें नीच आले भागा ॥ २ ॥
पडिलिये ठायीं उच्छिष्ट सेवावे । आर्त[1] तेंचि देवे केले ऐसें ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही आम्हां जी वेगळे । केलेती[2] निराळे द्विज देवें[3] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आर्त–तीव्र इच्छा, द्विज–ब्राह्मण.

---

१ आर्त, २ केले ते, ३ देवा.

अर्थ :– या नामरूपादी उपाधींपासून मी सहजच परतून वेगळा भिकाऱ्याप्रमाणे होऊन राहिलेलो आहे. १ सहजासहजी या देहाच्या वाट्यास आलेले नीचपण, हीनत्व पत्करावे. त्यासाठी रुसण्याची जरूरी नाही किंवा संकोच वाटण्याचे कारण नाही. २ पडिल्या जागीच राहून जे उच्छिष्ट मिळेल त्याचे सेवन करावे हीच तीव्र इच्छा देवाने पूर्ण करण्याची व्यवस्था केली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो ब्राह्मण देवा, तुम्ही स्वत:पासून आम्हांस वेगळे केलेले आहे किंवा देवानेच आम्हांस ब्राह्मणांपासून वेगळे केले आहे. ४

२८८३ चिंतामणीदेवा गणपतीसी आणा । करयावें भोजना दुजे पात्रीं ॥ १ ॥
देव म्हणती तुक्या एवढी कैंची थोरी । अभिमानाभीतरी नागवलों ॥ २ ॥
वाडवेळ जाला सिळें जालें अन्न । तटस्थ ब्राह्मण बैसलेती ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा तुमच्या सुकृतें । आणीन त्वरित मोरयासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दुजे-दुसऱ्या, पात्रीं–पानावर, थोरी–मोठेपण, सामर्थ्य, सुकृतें–पुण्याईने.

अर्थ :– चिंतामणी देवा, तुमचे दैवत गणपती आहे; त्याला तुम्ही भोजनासाठी आणावे व तुम्ही स्वत: दुसऱ्या पानावर बसून भोजन करावे. १ यावर चिंतामणी देव म्हणाले, 'तुक्या, आमच्याजवळ एवढे सामर्थ्य कुठून असणार ? आम्ही अभिमानामुळे नागवलेलो आहोत. २ आता पुष्कळ वेळ होऊन गेला आहे. अन्न शिळे होऊन चालले असून सर्व ब्राह्मणही तटस्थपणे बसले आहेत.' ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, चिंतामणी, तुमच्या पुण्याईने मी त्या गणपतीस त्वरित भोजनासाठी आणीन ४

२८८४ भोक्ता नारायण लक्ष्मीचा पति । म्हणोनि प्राणाहुती घेतलिया ॥ १ ॥
भर्ता आणि भोक्ता कर्त्ता आणि करविता । आपण सहजता पूर्णकाम ॥ २ ॥
विश्वंभर[1] कृपादृष्टी सांभाळीत । प्रार्थना करीत ब्राह्मणांची ॥ ३ ॥
कवळोकवळीं नाम घ्यावें गोविंदाचें । भोजन भक्तांचें तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– भोक्ता–भोग घेणारा, प्राणाहुति–भोजन करण्यापूर्वी पंचप्राणांस द्यावयाच्या आहुती, भर्ता–पालन करणारा, कवळोकवळीं–प्रत्येक घासाला.

अर्थ :– लक्ष्मीचा पती नारायण हाच भोक्ता आहे असे म्हणून ब्राह्मणांनी पंचप्राणांना आहुत्या दिल्या. १ पालन करणारा, भोगणारा आणि कर्ताकरविता असा तोच सहजपणे परिपूर्ण आहे. २ अशा प्रकारे सर्व विश्वाचा सांभाळ करणारा हा देव सर्व ब्राह्मणांकडे कृपादृष्टीने पाहून त्यांची प्रार्थना करीत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने भक्तांचे भोजन देवाबरोबर होत असल्यामुळे सर्वांनी प्रत्येक घासाबरोबर या गोविंदाचे स्मरण करावे. ४

२८८५ माझा स्वामी तुझी वागवितो लात । तेथें मी पतित काय आलों ॥ १ ॥
तीर्थें तुमच्या चरणीं जाहालीं निर्मळ । तेथें मी दुर्बळ काय वाणूं ॥ २ ॥
तुका म्हणे तुम्ही देवा द्विजवंद्य । मी तों काय निंद्य हीन याति ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– लात–लाथ, वाणूं–वर्णन करू ? द्विजवंद्य–वंदनीय असे ब्राह्मण.

अर्थ :– चिंतामणी देवा, तुमच्यासारख्या ब्राह्मणांची लाथ हा माझा स्वामी वागवीत आहे इतके तुम्ही श्रेष्ठ असल्याने अशा ठिकाणी माझ्यासारख्या पापी माणसाचे काय चालणार ? १ तुमच्या चरणस्पर्शाने तीर्थसुद्धा पवित्र व निर्मळ झाली. अशा ठिकाणचे मी दुर्बळ आपली काय वर्णन करू ? २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे तुम्ही सर्व ब्राह्मण देवांनाही वंदनीय असे आहात आणि मी तर अतिशय निंद्य व हीन जातीचा असल्याने माझ्यासारख्याचे तुमच्यापुढे काय चालणार ? ३

१ विश्वी विश्वंभर.

विवरण :– वरील पाच अभंगात तुकोबाच्या आयुष्यातील एका महत्त्वाच्या व वादग्रस्त प्रसंगाचा उल्लेख आहे. चिंचवड येथील मोरया गोसावी यांच्या परंपरेतील चिंतामणी देव यांच्या व तुकोबाच्या भेटीमधील हा प्रसंग आहे. या प्रसंगाचे वर्णन महीपतीबुवानी दिले आहे ते संक्षेपाने असे. देहूपासून जवळच चिंचवड येथे चिंतामणी देव या नावाचे एक थोर गणपतिभक्त त्या काळी होते. त्यानी तुकारामबुवाची कीर्ती ऐकून त्याच्या सामर्थ्याची प्रचीती पाहावी म्हणून त्याना देहूस निरोप पाठविला. चिंतामणी देव आपल्या भेटीची इच्छा करतात हे तुकाराममहाराजानी ओळखून आधीच चिंचवडला येण्याचे ठरविले होते चिंचवड येथे तुकोबा गेले. त्यांनी देवाना साष्टांग नमस्कार केला. तुकोबांची परीक्षा घेण्याचेच चिंतामणी देवाच्या मनात होते तुकोबाच्याबरोबर पांडुरंग जेवण करतो असे देवानी ऐकिले होते. त्याची प्रचीती पाहण्याचे त्यानी ठरविले. अशी प्रचीती आली तरच तुकोबाना नमस्कार करायचा अशी देवांच्या मनाची धारणा होती भोजनाची तयारी झाली तुकोबाचे पान थोडे दूर बाजूला वाढलेले होते. तुकोबानी आणखी दोन पाने मांडायला सांगितली एक देवाचे उपास्य दैवत गणपतीसाठी व दुसरे स्वतःचे दैवत पांडुरंगासाठी. तुकोबानी गणपतीला बोलावण्यासाठी देवाना विनंती केली देवानी त्यांना सांगितले, 'आमचे कुठे आहे एवढे सामर्थ्य ? आम्ही ज्ञानाच्या अभिमानाने नागवलो गेलो आहोत. तुम्हीच गणपतीस व तुमच्या पांडुरंगास बोलवा ना' यावर तुकोबानी 'तुमच्या पुण्याईच्या प्रभावाने मी गणपतीस त्वरित बोलावितो' असे म्हटले तुकोबानी मनोमन प्रार्थना करून गणपतीस व पांडुरंगास भोजनासाठी बोलाविले व हे दोन देव प्रत्यक्षच अवतरले ! सर्वांनी मिळून भोजन केले तुकोबाचा महिमा देवाना पटला.

अशी ही महीपतीबुवानी सांगितलेली कथा. तिच्यातही पुढे अनेक प्रकारची भर पडून ती अधिक चर्विष्ट झाली भक्ताबरोबर भोजन करण्याची आवड सगुण देवास मोठीच असली तरी या प्रसंगाकडे थोड्या सावधगिरीने पाहावयास हवे. तुमच्या पुण्याईने मी मोरयास येथे त्वरित आणीन व पानावर बसवून भोजन करवीन असे तुकोबानी म्हटले. पण खरेच प्रत्यक्ष असा चमत्कार घडला असा आधार वरील अभंगात नाही. तुमचा पांडुरंग प्रत्यक्ष येऊन जेवला तरच तुम्हांस आम्ही श्रेष्ठ मानू हा चिंतामणी देवाचा भावही तुकोबाना दुरुस्त करावयाचा होता. खरे म्हणजे या प्रसंगी गणपती व पांडुरंग यानी भोजन केले. पण ते अगदी निराळ्या अर्थाने. परमेश्वर आपल्या भक्ताबरोबर भोजन करतो म्हणजे काय करतो ? या प्रश्नाचा उलगडा तुकोबांनी वरीलपैकी एका अभंगात अत्यंत समर्पक रीतीने केलेला आहे रिद्धीसिद्धीचे सामर्थ्य, चमत्कारांनी पटलेली महत्ता, जादूटोणा इत्यादी गोष्टींचा तुकोबाना वीट होता प्रभुप्रेमाच्या तल्लीनतेत या सर्व बाबींना अत्यंत गौण स्थान त्यानी दिलेले होते. तुकारामबुवाच्या बरोबर पांडुरंगाने जेवावे अथवा गणपतीने भोजन करावे हा देवाचा आग्रह तुकोबाना दुरुस्त करायचा असावा. गणपतीला व पांडुरंगास बोलवा अशी सूचना देवानी करताच तुकोबा म्हणाले, 'तुम्हीच तुमच्या गणपतीस बोलवा ना वांझ गाईला दुभती करण्याचे सामर्थ्य तुमचे आहे मला असले काही येत नाही राजहंस पक्षी मोत्यांचा चारा खातो, मी मात्र चातक पक्ष्याप्रमाणे केवळ जलबिंदूवर तहान भागवितो. देवा, या माझ्या बोलण्याने तुमच्या अंतःकरणास कष्ट होऊ देऊ नका. मी खरोखरच हीन यातीचा असून त्यासाठी रुसावे, संकोचावे असेही मला वाटत नाही. उच्छिष्टाचे सेवन हीच माझी इच्छा प्रत्यक्ष देवानेच ब्राह्मणांना वेगळे व वरिष्ठ केले आहे. तेथे तक्रार कशी करावी ? तेव्हा तुमचाच अधिकार मोठा. तुम्हीच आणा ना गणपतीस !' त्यावर आपण अभिमानामुळे बुडालो, आपली कुठे आहे एवढी योग्यता ? असे म्हणून देवानी तुकोबाना पुन्हा विनंती केली. यानंतर देवांच्या पुण्याईमुळे समजेल अशा रीतीने तुकोबानी पांडुरंग व गणपती यांच्या 'भोजना'चा अर्थ सांगितला. देव-भक्ताच्या पंगतीच्या भोजनाचे रहस्य प्रकट केले

पंगतीस प्रत्यक्ष गणपती व पांडुरंग येण्याने काय साधणार आहे ? प्रत्येक भोजनाच्या वेळी भोक्ता कोण असतो ? तो लक्ष्मीचा पतीच ना आपल्या मुखाने भोजन करीत असतो ? आपण भोजन करताना पाच प्राणाहुती देतो त्या कुणास पोचतात ? भोक्ता, भर्ता व कर्विता तो नारायण असल्याने तोच भोजन घेत नसतो का ? विश्वामध्ये भरून राहिलेला विश्वंभरच अशा रीतीने आपल्या भक्ताना कृपाळूपणाने सांभाळीत असतो ना ? तेव्हा प्रत्येक घास घेताना गोविंदाचे, त्या भोक्त्या नारायणाचे नाव घ्यावे हेच खरे देवभक्तांचे भोजन होय. हा एक

अतिशय मार्मिक व तत्त्वस्पर्शी बोध तुकोबांच्या वाणीतून प्रकट झाला आहे, यास आपल्या पूर्वपरंपरेत फार मोठा आधारही आहे. गीतेत म्हटले आहे 'अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः । प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥' मीच वैश्वानराचे, अग्नीचे रूप घेऊन प्राण्यांच्या देहात राहिलो असून प्राण व अपान यांनी युक्त होऊन चार प्रकारचे अन्न पचवीत असतो. अशा प्रकारे नारायणच भोक्ता असल्याची निष्ठा आजही भोजनप्रसंगी आपली असावी. 'हरिर्दाता हरिर्भोक्ता हरिरन्नं प्रजापतिः । हरिर्विप्रशरीरस्तु भुंक्ते भोजयते हरिः' याच ओळीचा भावार्थ 'भोक्ता नारायण'लक्ष्मीचा पती' या एका चरणात बुवांनी येथे सांगितला आहे. 'जनीं भोजनीं नाम वाचें वदावें । अती आदरें गद्यघोषें म्हणावें ॥ हरी चिंतनें अन्न सेवीत जावें' या समर्थ रामदासांच्या उक्तीचेही मर्म हेच आहे. भोजन हे केवळ उदरभरण नसून एक प्रकारचे यज्ञकर्म आहे, ही जाणीव दृढ झाली की मग तुकोबांना अपेक्षित असे देवभक्तांचे भोजन सिद्ध होते. यासाठी आपल्या परंपरेनुसार 'ॐ प्राणाय स्वाहा । ॐ अपानाय स्वाहा ।' अशा प्रकारे पाच आहुती पाच प्राणांना दिल्या की 'म्हणोनि प्राणाहुती घेतलीया' या तुकाराम महाराजांच्या उक्तीचा अर्थ स्पष्ट झाल्यासारखा होतो.

२८८६ वंदिलें वंदावें जीवाचिये साटीं । किंवा बरी तुटी आरंभींच ॥ १ ॥
स्वहिताची चाड ते ऐका हे बोल । अवघेंचि मोल धीरा अंगीं ॥ २ ॥
सिंपिलें तें रोंप वरीवरी बरें । वाळलिया वरी कोंभ नये ॥ ३ ॥
तुका म्हणे टाकीघायें देवपण । फुटलिया जन कुला पुसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाड–इच्छा, कुला–ढुंगण.

अर्थ :– जे आपण प्रथम वंदनीय ठरविले त्याला शेवटपर्यंत जीव ओवाळून वंदन करावे. नाहीपेक्षा आरंभीच त्याचा संबंध तोडलेला बरा. १ ज्याला कुणाला स्वहिताची इच्छा असेल त्याने माझे हे बोलणे ऐकावे. धीर धरल्यास सर्व प्रकारचे मोल प्राप्त होते. २ रोपास वारंवार जलसिंचन केले तर त्याची वाढ चांगली होते. कारण ते एकदा वाळून गेले की मग त्याला पुनः कोंभ येणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, टाकीचे घाय सहन करूनच देवपणा येतो. पण तोच दगड जर फुटला तर लोक त्याचा उपयोग ढुंगण पुसण्यासाठी करतात. ४

२८८७ आम्हां विष्णुदासां हेंचि मांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ १ ॥
वाणी नाहीं घ्यावें आपुलिया हातें । करोनियां चित्तें[1] समाधान ॥ २ ॥
तुका म्हणे द्रव्य मेळविलें मागें । हें तों कोणासंगें आलें नाहीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाणी–कमतरता.

अर्थ :– विठ्ठलाचे सदासर्वकाळ चिंतन करणे हेच एक आम्हा विष्णुदासांचे मांडवल आहे. तोच आमची धनसंपत्ती होय. १ चित्ताचे समाधान होईपर्यंत हे आपल्या हातांनी वाटेल तितके घ्यावे, त्याची कमतरता पडणार नाही. २ तुकाराम महाराज म्हणतात, मागच्या काळी पुष्कळांनी खूप मिळविले, पण ते काही कुणाच्याही बरोबर आले नाही. ३

२८८८ सुखाचे व्यवहारीं सुखलाभ जाला । आनंदें कोंदला मागें पुढें ॥ १ ॥
संगतीं पंगतीं देवासवें घडे । नित्यानित्य पडे तेंचि सांवा ॥ २ ॥
समर्थाचे घरीं सकळ संपदा । नाहीं तुटी कदा कासयाची ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें लाभाचिया कोटी । बहु वाव पोटीं समर्थाचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोंदला–भरून राहिला, संपदा–संपत्ती, कोटी–अतिशय.

१ चित्त.

अर्थ :– प्रेमसुखाचा व्यवहार करताना तो इतका लाभदायक झाला की मागेपुढे सर्वत्र आनंदी आनंदच भरून गला आहे. १ त्यामुळे आता आम्हांस देवांचीच संगत व पंगत लाभली असून सर्व नित्य व अनित्य वस्तू त्या देवाच्या एकाच साच्यात ओतल्या आहेत असे अनुभवास येते २ या समर्थाच्या घरी सर्व प्रकारची संपत्ती आहे. कोणत्याही वस्तूची कमतरता म्हणून कधी नसते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे या देवाच्या घरी अतिशय लाभ होणारा असून या समर्थांच्या पोटामध्ये पुष्कळच जागा आहे. ४

२८८९ काय देवें खातां घेतलें हातींचें । आलें हें तयाचें थोर भय ॥ १ ॥
म्हणतां गजरें राम एकसरें । जळती पापें थोरें भयधाकें ॥ २ ॥
काय खोळंबले हात पाय अंग । नाशिलें हें सांग रूप काय ॥ ३ ॥
कोण लोकीं सांगा घातला बाहेरी । म्हणतां हरि हरि तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– एकसरें–एकसारखे.

अर्थ :– प्रेमभावाचे आपण सेवन करीत असताना देवाने काय आपल्या हातून ओढून नेले काय ? मग त्याचे हे मोठे भय कशासाठी मानता ? १ मोठ्याने गजर करून एकसारखे रामनाम घ्या. म्हणजे त्याच्या भयाने व धाकाने फार मोठी पातके जळून जातील. २ श्रीहरीचे नाम घेत असता काय हातपाय बंद पडतात ? अंगात विक्षेप येतो की काय ? किंवा यामुळे तुझ्या रूपसौंदर्यात काही बिघाड होतो की काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मुखाने हरी हरी म्हटल्याने कधी कुणास लोकांनी बहिष्कार घालून समाजाच्या बाहेर घातले आहे का ? ४

२८९० उत्तम त्या याति । देवा शरण अनन्यगति ॥ १ ॥
नाहीं दुजा ठाव । कांहीं उत्तम मध्यम भाव ॥ २ ॥
उमटती ठसे । ब्रह्मप्राप्ति अंगीं दिसे ॥ ३ ॥
भाविक विश्वासी । तुका म्हणे नमन त्यांसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव–स्थान, विश्वासी–विश्वासू.

अर्थ :– जे कुणी ईश्वराला अनन्यभावाने शरण गेले आहेत त्यांची जात उत्तमच आहे. १ एकदा श्रीहरीला मिळाल्यावर उत्तम, मध्यम असे भेदभावाचे स्थान उरत नाही. २ श्रीहरीस शरण गेल्यावर त्याच्या अंतःकरणावर श्रीहरीचे ठसे उमटतात व त्याच्या अंगी ब्रह्मानुभवाने तेज दिसते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे जे कुणी श्रीहरीला शरण गेलेले आहेत, त्या भाविक व विश्वासू भक्तांना माझा नमस्कार असो. ४

२८९१ ज्यासी नावडे एकादशी । तो जिताचि नरकवासी ॥ १ ॥
ज्यासी नावडे हें व्रत । त्यासी नरक तो ही भीत ॥ २ ॥
ज्यासी मान्य एकादशी । तो जिताचि मुक्तवासी ॥ ३ ॥
ज्यासी घडे एकादशी । जाणें लागे विष्णूपाशीं ॥ ४ ॥
तुका म्हणे पुण्यराशी । तोचि करी एकादशी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– जिताचि–जिवंत असूनही.

अर्थ :– ज्याला एकादशीच्या उपवासाचे व्रत आवडत नाही तो जिवंत असून नरकात गेल्यासारखा असतो. १ ज्याला हे व्रत आवडत नाही त्याला प्रत्यक्ष नरकही भीत असतो. २ आणि ज्याला एकादशीचे व्रत मान्य झाले तो जिवंत असूनही मुक्त झाल्यासारखा आहे. ३ ज्याला एकादशी घडते तो विष्णुपाशी जाऊन पोचतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, जो पुण्याची राशी आहे तोच एकादशीचे व्रत करीत असतो. ५

२८९२ मुंगी होउनि साकर खावी । निजवस्तूची भेटी घ्यावी ॥ १ ॥
वाळवंटी साकर पडे । गज येउनि काय रडे ॥ २ ॥
जाला हरिदास गोसांवी । अवघी मायिक क्रिया दावी ॥ ३ ॥
पाठ पाठांतरिक विद्या । जनरंजवणी संध्या ॥ ४ ॥
प्रेम नसतां अंगा आणी । दृढ भाव नाहीं मनीं ॥ ५ ॥
ब्रह्मज्ञान वाचें बोले । करणी पाहातां निवती डोळे ॥ ६ ॥
मिथ्या मगल वाढविती । आपुली आपण पूजा घेती ॥ ७ ॥
तुका म्हणे धाकुटें व्हावें । निजवस्तूसी[1] मागुनि घ्यावें ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :– गज–हत्ती, मगल–ढोंग.

अर्थ :– मुंगीसारखे लीनत्व व लहानपण पत्करून साखर खावी. याच वृत्तीमुळे निजस्वरूपाची भेट घ्यावी. १ वाळवंटात साखर पडलेली असताना तेथे हत्ती येऊन काय रडणार ? तेथे मुंगीच हवी. २ उगाच हरिदास या गोसावी याचे सोंग दाखवून काय उपयोग ? उगाच मायिक क्रिया कशासाठी दाखवाव्यात ? ३ नुसते कोरडे, पाठांतर करून मिळविलेली विद्या काय कामाची ? केवळ जनरंजनासाठी स्नानसंध्येचे अवडंबर काय उपयोगाचे ? ४ मनामध्ये दृढ भाव नसताना उगाचच नसत्या कला अंगात आणून, उगाच प्रेम नसताना अंगी आविर्भाव आणून काय उपयोग ? ५ वाणीने मात्र ब्रह्मज्ञान बोलायचे आणि प्रत्यक्ष करणी पाहाताच डोळे निवून जातील अशी असते. ६ उगाच खोटे ढोंग वाढवून असे लोक आपली आपणच पूजा करवून घेतात. ७ तुकाराम महाराज म्हणतात, यापेक्षा धाकटेपणा पत्करावा, लीन व नम्र व्हावे, आणि स्वस्वरूपाच्या अनुभवास मागून घ्यावे. ८

२८९३ भय हरिजनीं । कांहीं न धरावें मनीं ॥ १ ॥
नारायण ऐसा सखा । काय जगाचा हा लेखा ॥ २ ॥
चित्त वित्त हेवा । समर्पून राहा देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे मन । असों द्यावें समाधान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लेखा–गणना, हिशेब, मर्यादा, हेवा–हाव.

अर्थ :– हरिदासांनी आपल्या मनात कसलेही भय बाळगू नये. १ नारायणासारखा पाठीराखा सखा असल्यावर मग इतर जगाची गणना कशासाठी करावी ? २ आपले चित्त व आपली धनाविषयी हाव यांना देवाला समर्पण करून स्वस्थ राहावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी आपले मन समाधानाच्या अवस्थेत ठेवावे. ४

२८९४ आयुष्य मोजावया बैसला मापारी । तूं कां रे वेव्हारी संसाराचा ॥ १ ॥
नेईल ओढोनि ठाउकें नसतां । न राहे दुश्चिता हरिविण ॥ २ ॥
कठीण हें दुःख यम जाचतील । कोण सोडवील तया ठायीं ॥ ३ ॥
राहतील दुरी सज्जन सोयरीं । आठवीं श्रीहरी लवलाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे किती करिसी लंडायी । होईल भंडाई पुढें थोर ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मापारी–मापाड्या, माप करणारा, लंडाई–दाडगाई, भंडाई–अपकीर्ती, फजिती.

अर्थ :– अरे, तुझे आयुष्य मोजण्यासाठी हा काळ मापाड्या होऊन बसला आहे. उगीच का तू संसाराच्या व्यवहारात गुरफटून राहिला आहेस ? १ तुला न समजताच तो तुला या जगातून घेऊन जाईल. म्हणून तू हरिभजनाशिवाय दुश्चित होऊन राहू नकोस. २ तुझ्या अपराधाबद्दल यमाचा जाच सुरू झाला म्हणजे मग फार

[1] निजवस्तु.

कठीण होईल; त्या वेळी मग तेथून तुला सोडविणारे कोण आहेत ? ३ अशा वेळी सज्जन, सोयरेधायरे व आप्तजन वगैरे दूर राहातील. म्हणून तू त्वरित त्या श्रीहरीची आठवण कर. ४ तुकाराम महाराज म्हणतात, तू किती दांडगाई करशील रे ? पण पुढे फार मोठी फजिती तुझी होणार असल्याचे तू नीट ध्यानात ठेव. ५

२८९५ होऊं नको कांहीं या मना आधीन । नाइकें वचन याचें कांहीं ॥ १ ॥
हटियाची गोष्टी मोडून टाकावी । सोई हो धरावी विठोबाची ॥ २ ॥
आपुले आधीन करूनियां ठेवा । नाहीं तरि जीवा घातक हें ॥ ३ ॥
तुका म्हणे जाले जे मना आधीन । तयांसी बंधन यम करी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आधीन–स्वाधीन.

अर्थ :– अरे, तू या मनाच्या स्वाधीन कधीच होऊ नकोस; याने काहीही सांगितले तरी तू याचे बोलणे ऐकू नकोस. १ हे मन मोठे हट्टी आहे. याच्या सर्व गोष्टी तू मोडून काढ; आणि सरळ श्रीविठ्ठलाच्या भजनाचा मार्ग धर. २ या अवखळ मनास आपल्या स्वाधीन करून ठेवा. नाहीतर हे जीवाचा मोठाच घात करील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, उलट जे लोक या मनाच्याच स्वाधीन झाले त्याना यमाचे फार मोठे बंधन सहन करावे लागते. ४

२८९६ नामाविण काय वाउगी चावट । वांयां वटवट हरीविण ॥ १ ॥
फुकटचि सांगे लोकांचिया गोष्टी । राम जगजेठी वाचे नये ॥ २ ॥
मेळवूनि चाट करी सुरापान[1] । विषयांच्या गुणें मातलसे[2] ॥ ३ ॥
बैसोनि टवाळी[3] करी दुजयाची । नाहीं गोविंदाची आठवण ॥ ४ ॥
बळें यम दांत खाय तयावरी । जंव भरे दोरी आयुष्याची ॥ ५ ॥
तुका म्हणे तुला सोडवील कोण । नाहीं नारायण आठविला ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाउगी–व्यर्थ, चाट–चावट लोक.

अर्थ :– अरे, या एका हरिनामाशिवाय उगाच इतर चावट गोष्टींची व्यर्थ वडवड का करीत आहेस ? १ या जगजेठी रामाचे नाम मात्र तुझ्या मुखात कधीही येत नाही आणि गावातील लोकाविषयी मात्र फुकटच्या गोष्टी व्यर्थ सांगतोस. २ चावट लोक जमवून दारू पितोस आणि नाना विषयांच्या गुणांनी माजतोस मात्र. ३ एका ठिकाणी बसून जाणाऱ्येणाराची तू टवाळी करतोस; पण तुला कधी गोविंदाची आठवण होत नाही. ४ अशा या माणसाच्या आयुष्याची दोरी संपत आली की यम बळाने याच्यावर दात खात असतो. ५ तुकाराम महाराज म्हणतात, तू जर वेळीच नारायणाचे स्मरण केले नाहीस तर मग तुझी यमापासून सुटका कोण करणार आहे रे ? ६

२८९७ संत गाती हरिकीर्तनीं । त्यांचें घेइन पायवणी ॥ १ ॥
हेंचि तप तीर्थ माझें । आणीक मी नेणे दुजें ॥ २ ॥
काया कुरवंडी करीन । संत महंत ओंवाळीन ॥ ३ ॥
संत महंत माझी पूजा । अनुभाव नाहीं दुजा ॥ ४ ॥
तुका म्हणे नेणें कांहीं । अवघें आहे संतांपायीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पायवणी–पायाचे तीर्थ, अनुभाव–दुसरा भाव.

अर्थ :– जे साधुसंत हरिकीर्तनात प्रेमाने गातात त्याच्या पायांचे तीर्थ मी घेईन. १ हेच माझे तप व हेच माझी तीर्थयात्रा होय. याशिवाय मी दुसरे काहीही जाणीत नाही. २ या संतमहंतांवरून मी माझे शरीर ओवाळून

१ मद्यपान, २ मातला, ३ थवाळी, ४ तिदोरी.

टाकीन. ३ याच संतमहंतांची मी पूजा करीत असतो. याच्यावाचून दुसरा भाव माझ्याजवळ नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझे सर्व काही या संतांपाशी आहे. मी याच्याशिवाय दुसरे काहीच जाणीत नाही. ५

२८९८ जालें मांडवल । अवघा पिकला विठ्ठल ॥ १ ॥
आतां वाणी कशासाटीं । धीर धरावाच पोटीं ॥ २ ॥
आपुल्या संकोचें । म्हणऊनि तेथें टांचे ॥ ३ ॥
घेतों खऱ्या मापें । तुका देखोनियां सोपें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वाणी-कमतरता, उणीव, टांचे-तोटा.

अर्थ :- यंदा सर्वत्र या विठ्ठलाचे पीक भरपूर पिकले आहे. हेच मुख्य भांडवल आता माझ्या व्यापारासाठी झाले आहे. १ आता उणीव कशासाठी आहे ? आपल्याच ठिकाणी फक्त थोडा धीर पाहिजे. २ आपली वृत्ती थोडीफार संकोचित असल्यामुळे येथे तोटा आहेसे दिसते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे मांडवल फार सोपे असल्यामुळे मी माझ्या जिव्हेच्या खऱ्या मापाने साठवून घेतो. ४

२८९९ शुद्ध ऐसें ब्रह्मज्ञान । करा मन सादर ॥ १ ॥
रवि रसां सकळां शोषी । गुणदोषीं न लिंपे ॥ २ ॥
कोणासवें नाहीं चोरी । सकळांवरी समत्व ॥ ३ ॥
सत्य तरी ऐसें आहे । तुका पाहे उपदेशीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.- सादर-आदराने, शुद्ध भावाने युक्त

अर्थ – लोकहो, तुम्ही आपले मन शुद्ध व आदरभावाने युक्त करा, म्हणजे तुम्हांस खऱ्या ब्रह्मज्ञानाची प्राप्ती होईल. १ सूर्य हा चांगला व वाईट अशा सर्व रसांचे शोषण करतो; पण कधी त्यांच्या गुणदोषांनी लिप्त होत नाही. २ तो कुणापासूनही काही चोरून ठेवीत नाही. सर्वांना समत्वाने सारखाच प्रकाश देत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, खरे ब्रह्मज्ञान अशा प्रकारचे असून त्याचा उपदेश मी तुम्हांस करीत आहे, त्याचा नीट अनुभव घ्या. ४

२९०० अग्नि हा पाचारी कोणासी साक्षेपें । हिंवें तोचि तापे जाऊनियां[1] ॥ १ ॥
उदक म्हणे काय या हो मज प्यावें । तृषित तो धांवे सेवावया ॥ २ ॥
काय वस्त्र म्हणे यावो मज नेसा । आपुले स्वइच्छा जग वोढी[2] ॥ ३ ॥
तुकयास्वामी म्हणे काय मज स्मरा । आपुल्या उद्धारा लागूनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पाचारी-बोलावतो, साक्षेपें-अगत्याने.

अर्थ – अग्नी हा काही स्वत होऊन कुणाला अगत्याने हाका मारीत नाही, बोलावीत नाही. पण ज्याला थंडी वाजते तोच त्याच्याकडे जाऊन त्याची उष्णता घेतो. १ पाणी कधी 'मला प्या हो' असे म्हणते का ? जो तान्हेलेला आहे तो आपण होऊन त्याच्याकडे धावत जाऊन त्याचे सेवन करतो २ वस्त्र कधी 'या हो मला नेसा' असे म्हणते का ? आपल्या स्वतःच्या इच्छेनेच जग त्याला जवळ करीत असते. ते नेसत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे या जगाचा स्वामी 'मला स्मरा, मला स्मरा' असे कधी म्हणत नाही. उलट जगच स्वतःच्या उद्धारासाठी त्याचे स्मरण सतत करीत असते. ४

२९०१ भक्त देवाघरचा सुना । देव भक्ताचा पोसणा ॥ १ ॥
येर येरां जडलें कैसें । जीवा अंग जैसें तैसें ॥ २ ॥

१ जाणोनिया, २ वेढी.

देव भक्ताची कृपाळु माता । भक्त देवाचा जनिता ॥ ३ ॥
तुका म्हणे अंगें । एक एकाचिया संगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सुना–कुत्रा, पोसणा–पोषण करणारा, येरयेरा–एकमेकांना, जनिता–जन्म देणारा, पिता.

अर्थः – भक्त हा देवाघरचा कुत्रा होऊन राहातो, आणि देव हा आपल्या भक्ताचे पालनपोषण करीत असतो. १ जीव व शरीर जसे एकत्वाने असतात, तसेच देव व भक्त एकमेकांना जडून असतात. २ देव हा भक्ताची कृपाळू आई असतो आणि भक्तानेच देवाला आकारास आणलेले असल्यामुळे तोच त्याचा पिता असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे देव व भक्त हे एकमेकांच्या संगतीत अंगानेही एकच असतात. ४

२९०२ बरवयांबरवंट । विटे चरण सम नीट ॥ १ ॥
ते म्यां हृदयीं धरिले । तापशमन पाउलें ॥ २ ॥
सकळां तीर्थां अधिष्ठान । करी लक्ष्मी[1] संवाहन ॥ ३ ॥
तुका म्हणे अंतीं । ठाव मागितला संतीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– बरवया–सौंदर्याला, बरवंट–चांगला, सुंदर, तापशमन–ताप दूर करणारी, संवाहन–सेवा, ठाव–आश्रय.

अर्थः– सान्या सौंदर्याला शोभा आणणारे या विठोबाचे सुंदर चरण एकसारखे विटेवर उभे आहेत. १ त्रिविध ताप दूर करणारे हे चरण मी माझ्या हृदयात धारण केले आहेत. २ याच पायांपासून सर्व तीर्थांचे उगमस्थान असून याचीच सेवा लक्ष्मी करीत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व साधुसंतांनी शेवटी याच पायांचा आश्रय मागितला आहे. ४

२९०३ मांस चर्म हाडें । देवा अवघींच गोडें ॥ १ ॥
जे जे हरिरंगीं रंगले । कांहीं न वचे वांयां गेले ॥ २ ॥
वेद खाय शंखासुर । त्याचे वागवी कलिवर ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसा । बराडी हा[2] भक्तिरसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– न वचे–गेले नाही, शंखासुर–शंखासुर नावाचा एक दैत्य, कलिवर–देह, शरीर, बराडी–भिकारी, हपापलेला.

अर्थः– पुढे सांगितल्याप्रमाणे जे कुणी आहेत त्याचे मांस, चर्म व त्यांची हाडे सर्वच काही गोड असते, देवास सर्व गोडच वाटते. १ जे श्रीहरीच्या प्रेमरसात रंगून गेले त्याचे शरीर काहीच वाया गेलेले नाही २ शंखासुर नावाच्या एका दैत्याने वेद गिळून टाकले होते, पण देवाने त्याचा वध करून वेदांचे रक्षण केले व त्याचे शरीर शंखाच्या रूपाने आपल्या हातात धारण केले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तिरसाविषयी असा हा देव नेहमीच हपापलेला असतो. ४

२९०४ कोणा चिंता आड । कोणा लोकलाज नाड ॥ १ ॥
केंचा राम अभागिया । करी फटकट[3] वांयां ॥ २ ॥
स्मरणाचा राग । क्रोधें विटाळलें अंग ॥ ३ ॥
तुका म्हणे जडा । काय चाले या दगडा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– जडा–निर्जीव.

१ लक्ष्मी, २ या, ३ बडबड.

अर्थः– या श्रीहरीविषयी लोक कसे फसतात पाहा. कुणाला कसली तरी चिंता आड येते, कुणी लोकलज्जेसाठी भितात. १ अशा अभागी लोकांना रामनाम कसले आले आहे ? उगाच व्यर्थ बडबड मात्र ते करीत असतात. २ कुणी त्यांना श्रीहरीचे स्मरण करा असे सांगितले तरी त्याचा त्यांना राग येतो; कारण यांचे शरीर रागाने सतत विटाळलेले असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असल्या या निर्जीव दगडांपुढे कुणाचे काय चालणार आहे ? ४

२९०५ आपुलिया काजा । आम्हीं सांडियेली लाजा ॥ १ ॥
तुम्हां असों जागवीत । आपुलिया हातीं हित ॥ २ ॥
तुम्ही देहशून्य । आम्हां कळे पाप पुण्य ॥ ३ ॥
सांगायासी लोकां । उरउरीत उरला तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– काजा–कामासाठी, उरउरीत–वेगळेपणाने

अर्थः– देवा, आमचेच काम असल्यामुळे आम्ही सर्व लाज टाकून तुमच्या नादी लागलेले आहोत. १ आम्ही यासाठी तुम्हांस सतत जागवीत आहोत; कारण आमचे सर्व हित तुमच्याच हातात आहे. २ देवा, तुम्ही देहविरहित आहात; आणि आम्ही देहधारी असल्यामुळे आमच्या मागे पापपुण्य लागले आहे, हे आम्हांस नीटपणे समजते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तरी तुम्हीआम्ही एकच आहोत; पण लोकांना तुमचे रहस्य सांगण्यासाठी मी वेगळेपणाने उरलेलो आहे. ४

२९०६ मायबापें केवळ काशी । तेणें न वजावें तीर्थासी ॥ १ ॥
पुंडलीकें काय केलें । परब्रह्म उभें ठेलें ॥ २ ॥
तैसा होईं सावधान । हृदयीं धरीं नारायण ॥ ३ ॥
तुका म्हणे मायबापें । अवघीं देवाचीं स्वरूपें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– न वजावें–न जावे, जाऊ नये.

अर्थः– आपले आईबाप हे केवळ काशी क्षेत्राइतके पवित्र असल्याने त्यांना टाकून तीर्थयात्रेस जाण्याची जरूरी नाही. १ पुंडलीक महामुनीने काय केले ? आपल्या आईबापांच्या सेवेत असताना त्याने विठ्ठलाला विटेवर उभे केलेच ना ? २ त्याप्रमाणे तुम्ही सावध व्हावे व आपल्या हृदयात नारायणाचे रूप साठवावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कारण आपली मायबापे म्हणजे सर्व देवाचीच स्वरूपे आहेत ४

विवरण :––आपणास जन्म देणाऱ्या मातेचे महिमान तुकोबानी या अभंगात अगदी मोजक्या शब्दात मोठ्या समर्पक रीतीने वर्णन केले आहे. ' न मातुः परदैवतम्, ' ' मातृदेवो भव ' अशी आपल्या परंपरेची शिकवण आहे. तुकाराम महाराजानी प्रत्यक्ष ईश्वरासच आपली माता समजून आळविले असल्याने मातृप्रेमाचे अनेक नमुने त्याच्या वाणीतून प्रकट झाले ' मायाबापापुढें लाडिकें लेंकरूं ', ' मायबापापुढें लेकराची थोरी ', ' माये मोकलेलें कोठें जावें बाळें ? ' ' माउलीची चाली लेंकराचे ओढी, ' ' मातेचिया चित्तीं अवघा बाळकाची व्याप्ती ' इत्यादी ओळीतून तुकोबाच्या चित्तातील मातृवात्सल्य समजून येण्यासारखे आहे ईश्वर जशी ' आपली आई, आपला पिता, तशी जन्मदात्री आई हीसुद्धा देवाप्रमाणेच, तीर्थाप्रमाणेच मानावयास आपली संस्कृती सांगत आहे. आजही आपण पत्र लिहिताना ' तीर्थरूप ' असा शब्द कायम केलेला आहे. समर्थ रामदासानी तर मातेच्या महिम्यासाठी दशक तिसऱ्या मधील समास चौथा खर्च केला आहे कारण या मातेला आपला पुत्र कसाही असला तरी तो आवडतो. ' पुत्र वैभवहीन भिकारी । माता तैसाचि अंगिकारी । दगदगला देखोनि अंतरीं । ' ' त्याचेया दुःखें दुखवें ' अशी या मातेची मनस्थिती असल्याने तिला तीर्थस्थानाचे माहात्म्य देणे उचितच आहे.

१ जागवीत.

' तूं सर्व सुखाची मस । तूं आनंदरत्नांची मांदुस '(पेटी ) असे समर्थांनी मातेस पत्र लिहिताना म्हटले आहे. 'विवेकनिधी केवळ । अंतर शुद्ध निर्मळ । ज्ञानदीप प्रबळ । तुमचे ठायीं ' अशा योग्यतेची माता समर्थांना प्राप्त झालेली होती. आपल्या नित्याच्या प्रातःस्मरणातही मातेच्या व पित्याच्या वंदनास महत्त्व आहे.'श्रीमातापितृभ्यां नमः' असे वचन आहे. मातृप्रेमाचे वैभव गाताना ज्याने विठ्ठलास विटेवर उभे केले त्या थोर मातृभक्त पुंडलीकाची आठवण तुकोबांना व्हावी हे स्वाभाविकच आहे. महान मातृभक्त पुंडलीक आपल्या आईबापांना घेऊन काशीयात्रा झाल्यावर दिंडीरवनामध्ये लोहदंड नावाच्या तीर्थाजवळ आला व तेथेच त्याने आपल्या मातापित्यांची सेवा आरंभिली. पूर्वीच्या वचनास अनुसरून श्रीकृष्ण या मातृप्रेमी भक्ताकडे येण्यास निघाले ' करूनी रुक्मिणीचें समाधान । तेथून मुरडला भगवान । तों पुंडलिकभक्त पूर्ण । जगन्निवासें देखिला ॥ आश्रमापुढें ते वेळां । उभा राहिला घनसांवळा । पुंडलिक पाठमोरा बैसला । चरण धूत मातेचे ॥ कोटी सूर्यांची प्रभा । तैसा लक्ष्मीनायक उभा । ती वर्णितां शोभा । वेदशास्त्रा अतर्क्य ॥. तो पुंडलीक घाबरला । म्हणे एवढा प्रकाश कैसा पडला । म्हणोनी अवलोकूं लागला । तों देखिला मग भगवंत । त्याच्या हातीं पित्याचे चरण । तेथूनि केलें हरिसी नमन । मग वामहस्तें करून । वत्री वीट टाकली बसावया ' अशा या भगवद्भक्त पुंडलीकासही देवापेक्षा आपल्या आईबापांची महती अधिक वाटली.

२९०७ सत्य आम्हां मनीं । नव्हों गाबाळाचे धनी ॥ १ ॥
ऐसें जाणा रे सकळ । भरा शुद्ध टांका मळ ॥ २ ॥
देतों तीक्ष्ण उत्तरें । पुढें व्हावयासी बरें ॥ ३ ॥
तुका म्हणे बरें घडे । देशोदेशीं चाले कोडे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- गाबाळचे-वरवरच, केरकचरा, कोडें-कोडकौतुक

अर्थः- सत्यस्वरूपाचा परमेश्वरच आमच्या मनात आहे. आम्ही वरवरच्या केरकचऱ्याचे धनी कधीच होणार नाही. १ सर्व लोकहो, तुम्ही हे सर्व जाणून असा शुद्ध स्वरूपाचा माल भरा व मनातील कुविचाराचा मळ काढून टाका. २ पुढे तुमचे नीट बरे व्हावे म्हणून मी कठोण शब्दांनी आज तुम्हांस बोलत आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, चांगले घडल्यानंतर देशामध्ये सर्वत्र तुमचेच कोडकौतुक होईल. ४

२९०८ शिकवूनि हित । सोयी लावावे हे नीत ॥ १ ॥
त्याग करूं नये खरें । ऐसें विचारावें बरें ॥ २ ॥
तुमचिया तोंडें । धर्माधर्मचि खंडे ॥ ३ ॥
मजसाटीं देवा । कां हो लपविला हेवा ॥ ४ ॥
जाला सावधान । त्यासी घालावें भोजन ॥ ५ ॥
तुका म्हणे पिता । वरी बाळाच्या तो हिता ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपाः- सोयी-मार्गास, नीत-नीती, विचारावें-विचार करावा, हेवा-हाव.

अर्थ.- देवा, जे काही हिताचे आहे ते नीट शिकवून आम्हांस मार्गास लावावे हीच खरी नीती आहे. १ तुम्ही आमचा त्याग करू नये. यासंबंधी तुम्ही विचार करावा हे बरे. २ देवा, तुमच्याच तोंडाने धर्माधर्माचा विचार खंडित होतो; निवाडा होतो ३ असे असूनही देवा, माझ्याविषयीची तुमची हाव का लपवून ठेविली हो ? ४ जो झोपेतून सावध झाला आहे त्यास आईने जेवायला घालावे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, बाप हा आपल्या मुलाचे सर्व प्रकारचे हित करतो हे स्पष्टच आहे. ६

२९०९ सुख[1] सुखा भेटे । मग तोडिल्या न तुटे ॥ १ ॥
रविरश्मिकळा । नये घालितां पै डोळा ॥ २ ॥
दुरि तें जवळी । स्नेहें आकाशा कवळी ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त । माझें पायीं अखंडित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– रविरश्मिकळा–सूर्य व सूर्याच्या किरणाची प्रभा

अर्थ– सुखस्वरूपाचा जीव सुखस्वरूपाच्या ईश्वरास भेटल्यानंतर त्याचा संबंध कधी तोडू म्हणता तुटणार नाही १ सूर्य व त्याच्या किरणाची प्रभा वेगळ्या स्वरूपात आपल्या डोळ्यात कधी साठविता येणार नाही २ एकदा स्नेह निर्माण झाला म्हणजे जे दूर आहे तेही अगदी जवळचे वाटू लागते स्नेहामुळे आकाशालाही कवळण्याचे सामर्थ्य येते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझे चित्त तुमच्या पायावर अखंडितपणाने आहे ४

२९१० तुम्हां न पडे वेच । माझा सरेल संकोच ॥ १ ॥
फुकासाठीं जोडे यश । येथें कां करा आळस ॥ २ ॥
कृपेचें भुकेलें । होय जीवदान केलें ॥ ३ ॥
तुका म्हणे शिकविलें । माझें ऐकावें विठ्ठलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेच–खर्च

अर्थ – देवा, माझ्यावर कृपा करण्यात तुमचे काही खर्च होत नाही आणि माझा पण संकोच दूर होईल १ असे फुकटचे जर यश तुम्हास मिळते तर ते तुम्ही घ्यावे याविषयी आळस करू नये २ मी तुमच्या कृपेचा भुकेलेला आहे ती देऊन मला जीवदान दिल्याचे तुम्ही करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठले, आई, मी मागमाणे तुला सांगितले आहे, त्याप्रमाणे तू ऐकावेस ४

२९११ लोक म्हणती मज देव । हा तो अधर्म उपाव ॥ १ ॥
आतां कळेल तें करीं । सीस तुझे हातीं सुरी ॥ २ ॥
अधिकार नाहीं । पूजा करिती तैसा कांहीं ॥ ३ ॥
मन जाणे पापा । तुका म्हणे मायबापा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उपाव–उपाय, सीस–डोके

अर्थ – सर्व लोक मला देव म्हणू लागले हा तर एक अधर्माचाच उपाय झाला १ देवा मी आता माझे मस्तक तुझ्या हाती दिले आहे शस्त्रही तुझ्या हातात आहे जे जसे कळेल तसे तू मला कर २ सर्व लोकांनी माझी पूजा करावी असा काही माझा अधिकार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात मायबापा, माझ्या मनातून होणारे पाप मी जाणून आहे ४

२९१२ एका म्हणे भलें । आणिका सहजचि निंदिलें ॥ १ ॥
कांहीं न करितां आयासें[2] । सहज घडलें ते दोष ॥ २ ॥
घरें वाइटाचें । नाहीं मज कांहीं साचें ॥ ३ ॥
तुका म्हणे वाणी । खडोनि राहावें चिंतनीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– आयास–प्रयत्न, साचे–खरोखर

१ सुखा सुख, २ सायास

२९१६ साकरेच्या योगें[1] वर्ख । राजा कागदातें देखे ॥ १ ॥
तैसें आम्हां मनुष्यपण[2] । रामनाम केण्यागुणें ॥ २ ॥
फिरंगीच्या योगें करी । राजा काष्ठ हातीं धरी ॥ ३ ॥
रत्नकनका योगें लाख । कंठीं धरिती श्रीमंत लोक ॥ ४ ॥
देवा देवपाट । देव्हाऱ्यावरी बैसे स्पष्ट ॥ ५ ॥
ब्रह्मानंदयोगें तुका । पढीयंता सज्जनलोकां[3] ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपाः– वर्ख–मुलामा, केण्यागुणें–मालाच्या गुणामुळे, फिरंगी–पोलादी तरवार, काष्ठ–मुठीचे लाकूड, रत्नकनका–रत्नामुळे व सोन्यामुळे, पढीयंता–आवडता, प्रिय

अर्थः– राजाला मुलाम्याचे कागद पाहाण्याचे काहीच कारण नाही; पण ते साखरेच्या पदार्थांना लावलेले असल्याने त्याला पाहावे लागतात १ त्याचप्रमाणे रामनामाच्या मालामुळेंच आमचे मनुष्यपण सार्थकी लागले आहे. २ पोलादाच्या तरवारीस बसविल्यामुळे मुठीचे लाकूड राजास हातात धरावे लागते ३ रत्न अथवा सोनें यांच्या दागिन्यांच्या निमित्ताने श्रीमान माणसे लाखेसारख्या पदार्थास गळयात धारण करतात. ४ देवाच्या पूजेमधील लाकडाचा पाट देवाचा म्हणूनच देव्हाऱ्यात बसू शकतो हे स्पष्टच आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, त्याचप्रमाणे माझ्या ठिकाणी ब्रह्मानंदाची वस्ती झालेली असते यामुळे मी सज्जन लोकांना प्रिय झालेलो आहे. ६

२९१७ धनवंतालागीं । सर्वमान्यता आहे जगीं ॥ १ ॥
माता पिता बंधु जन । सर्व मानिती वचन ॥ २ ॥
जव मोठा चाले धंदा । तंव बहिण म्हणे दादा ॥ ३ ॥
सदा शृंगारभूषणें । कांता लवे बहुमानें ॥ ४ ॥
तुका म्हणे धन । भाग्य अशाश्वत जाण ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः– जव–जोपर्यंत, तंव–तोपर्यंत, कांता–पत्नी.

अर्थः– जे कुणी धनवंत आहेत त्यानाच या जगात मानमान्यता मिळत असते १ जोवर जवळ धनसंपत्ती आहे, तोवरच आई, वडील, भाऊ व इतर सर्व लोक आपले वचन मानीत असतात २ जोपर्यंत मोठा उद्योगधंदा चालू आहे तोपर्यंतच भावास बहीण 'दादा दादा' म्हणून कौतुकाने हाक मारीत असते ३ सदासर्वदा जोपर्यंत नवरा शृंगारासाठी दागदागिने आणून देत असतो तोपर्यंतच बायको बहुमान देत त्याच्यापुढे नम्र होत राहाते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे धनामुळे मिळालेले भाग्य हे नाशवंत आहे असे तुम्ही समजावे. ५

२९१८ न विचारितां ठायाठाव । काय भुंके तो[4] गाढव ॥ १ ॥
केला तैसा लाहे दंड । खळ अविचारी लंड ॥ २ ॥
करावें लाताळें । ऐसें नेणे कोण्या काळें ॥ ३ ॥
न कळे उचित । तुका म्हणे नीत हित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– न विचारितां–विचार न करता, ठायाठाव–योग्य अथवा अयोग्य, लाहे–प्राप्त होतो, खळ–दुष्ट, लंड–दांडगा, ठग, लाताळें–लाथा झाडणे, नीत–नीतीचा विचार.

अर्थः– योग्य अथवा अयोग्य किंवा चांगल्यावाईटाचा विचार न करताच जो कुणी बोलत असतो तो गाढवा-प्रमाणेच असतो. १ तो जसे करेल तशा प्रकारची शिक्षा त्याला प्राप्त होईल. असा हा मनुष्य दांडगा आहे २

१ नावें, २ मानुसपण, ३ जनलोका ४ तें.

गाडवाला कोणत्या वेळेस लाथ झाडावी हे कधीच समजत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याचप्रमाणे अशा या माणसास योग्य काय, अयोग्य काय हे समजत नाही त्याला नीतीचा विचारही कधी नीटपणे ध्यानात येत नाही. ४

२९१९ कंठीं नामसिका । आतां कळिकाळासी धका ॥ १ ॥
रोखा माना[1] कीं सिका माना । रोखा सिका तत्समाना ॥ २ ॥
रोखा न मना सिका न मना । जतन करा नाककाना ॥ ३ ॥
सिका न मनी[2] रावण । त्याचें केलें निसंतान ॥ ४ ॥
सिका मानी हळाहळ । जालें[3] सर्वांगीं शीतळ ॥ ५ ॥
तुका म्हणे नाम सिका । पटीं बैसलों निजसुखा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– नामसिका– हरिनामाचा शिक्का, रोखा–प्रत्यक्ष कागद, हलाहल–हालाहल नावाचे विष, पटीं–पट्टावर, राज्याच्या सिंहासनावर.

अर्थ:– मी आता माझ्या कंठामध्ये श्रीहरीच्या नामाचा शिक्का धारण केला आहे. त्यामुळे आता प्रत्यक्ष कळिकाळासही धक्का देण्यास मी समर्थ झालो आहे. १ लोकहो, आता तुम्ही प्रत्यक्ष कागद माना किंवा त्याच्या नामाचा शिक्का माना, कारण हा रोख्याचा कागद व त्यावरील शिक्का याची बरोबरी आता श्रीहरीच्या समान आहे. २ तुम्ही हा रोखाही मानला नाही व शिक्काही मानला नाही तर मात्र तुम्ही आपल्या नाकाचा व कानाचा नीट संभाळ करावा. ३ रावणानें श्रीहरीच्या नामाचा हा शिक्का मानला नाही; त्यामुळे श्रीहरीने त्याचे निसंतान केले. ४ आणि हालाहल नावाच्या विषाने अंगाचा दाह होत असताना शंकराने या नामशिक्क्याचा आधार घेतल्यामुळे त्याचे सर्वांग शीतल होऊन गेले. ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी या नामशिक्क्याच्या आधारावरच निजसुखाच्या सिंहासनावर बसलो आहे. ६

२९२० भूतीं देव म्हणोनि भेटतों[4] या जना । नाहीं हे भावना नरनारी ॥ १ ॥
जाणे भाव पांडुरंग अंतरींचा । न लगे द्यावा साचा परिहार ॥ २ ॥
दयेसाटीं केला उपाधिपसारा । जड जीवा[5] तारा नाव कथा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं पडत उपवास । फिरतसे आस धरोनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– भूतीं–सर्व भूतमात्रात, साचा–खरोखर, परिहार–समर्थन

अर्थ:– सर्व भूतमात्रांच्या ठिकाणी देवाचा निवास आहे असे समजून मी सर्व लोकांना आलिंगन देतो, भेटतो. माझ्या ठिकाणी स्त्री-पुरुष असा भेदभाव मुळीच नसतो. १ माझ्या मनातील हा भाव पांडुरंग जाणून असल्याने त्याचे खरोखर काही समर्थन करावे असे नाही. २ या भवसागरातून तरून जाण्यासाठी मी ही हरिकथेची नाव तयार केली आहे या उपाधीचा पसारा मी दयेच्या पोटीच केलेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला काही उपास पडत नव्हते, परंतु लोकांचे कार्य नीट व्हावे म्हणूनच मी आशा धरून फिरत आहे. ४

२९२१ हारपल्याचो नका चिंता । धरूं खंतीं यांयांच ॥ १ ॥
पावलें तें म्हणा देवा । सहज सेवा या नांवें ॥ २ ॥
होणार तें तें भोगें घडे । लाभ जोडे संकल्पें ॥ ३ ॥
तुका म्हणे मोकळें मन । अवघें पुण्य या नांवें ॥ ४ ॥

१ माना, २ मानी, ३ जाला, ४ भेटता, ५ जीव.

शब्दार्थ व टीपा – खंती-चिंता

अर्थ – आपले जे काही हरवून गेले आहे त्याची वृथा चिंता मनात कधी धरू नका १ ते आता देवालाच पावले असे म्हणा ना यामुळे देवाची सहज सेवा तरी तुमच्या हातून घडेल २ जे जे काही होणार असते ते ते आपल्या प्रारब्धकर्माच्या भोगामुळे घडते; पण आपण त्याचा संकल्प देवाच्या नावाने केल्यास सहज मोठा लाभ तरी होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपले मन पापविचारापासून मोकळे केले तर त्यालाच पुण्याची पदवी प्राप्त होईल ४

२९२२ नेसणे आलें होतें गळचा । लोक रळचा करिती ॥ १ ॥
आपणिया सावरिले । जग भले आपण ॥ २ ॥
संबंध तो तुटला येणे । जागेपणें चेष्टाचा ॥ ३ ॥
भलती सेवा होती अगे । वारस वेगें पडिले ॥ ४ ॥
सावरिले नीट वोजा । दृष्टिलाजा पुढिलाच्या ॥ ५ ॥
बरे उघडिले डोळे । हळहळेपासूनि ॥ ६ ॥
तुका म्हणे विटंबना । नारायणा चुकली ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – रळचा-थट्टा, कुचेष्टा, वारस-वासर (?) सैरावरा, स्वच्छंदी, अस्ताव्यस्त, वोजा-काळजीने, लक्ष देऊन

अर्थ – आपले नेसणे जर गळाशी आले तर त्यामुळे सर्व लोक हासून आपली कुचेष्टा करतील १ म्हणून आपले वस्त्र आपणच सावरून नीट धरले तर आपण भले ठरू व जगही भले ठरेल २ अशा रीतीने नीट सावधपणा ठेवला तर लोकांच्या चेष्टेचा संबंधच उरणार नाही ३ अज्ञानाच्या झोपेत असताना इंद्रियाकडून अस्ताव्यस्त स्वरूपात भलतीच सेवा होत होती, ४ पण सावध होऊन नीटपणे, काळजीने भोवतीच्या लोकांच्या दृष्टीची लाज वाटून मी माझे अवयव सावरून धरले ५ आणि अशा रीतीने लोकांकडून फजिती होण्यापूर्वीच माझे डोळे उघडले हे फार बरे झाले ६ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, या प्रकारात होणारी माझी विटंबना तुम्ही दूर केली ७

२९२३ जिव्हा जाणे फिके मधुर कीं क्षार । येर मास पर हाता न कळे ॥ १ ॥
देखावे नेत्रीं बोलावे मुखें । चित्ता सुखदुःखें कळों येती ॥ २ ॥
परिमळासी घ्राण ऐकती श्रवण । एकाचे कारण एका नव्हे[1] ॥ ३ ॥
एकदेहीं भिन्न ठेवियेल्या[2] कळा । नाचवी पुतळा सूत्रधारी ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐशी जयाची सत्ता । का तया अनंता विसरलेती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – क्षार-खारट, येर- इतर, मास-मांस, पर-परंतु, परिमळासी-वास घेण्यासाठी, घ्राण-नाक

अर्थ – एखादा पदार्थ आळणी आहे की खारट आहे हे आपली जीभच जाणू शकते एऱ्हवी हातावर मांस असूनही त्याची चव काही समजणार नाही १ डोळ्यांनी पाहावे, तोंडाने बोलावे, आणि चित्ताने सुखदुःखाचे धर्म समजावून घ्यावेत २ वास घेण्यासाठी नाकाचाच उपयोग होतो कानांनी ऐकण्याचे काम होते. एकाचे कार्य दुसऱ्याकडून कधीच होणार नाही ३ अशा प्रकारे एकाच देहाच्या मध्ये नाना इंद्रियांचे भिन्नभिन्न ज्ञानाचे धर्म ठेविले असून तो सूत्रधार श्रीहरी या पुतळ्यास, शरीरास इंद्रियांच्या द्वारे नाचवीत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ज्या अनंताची सत्ता आहे त्यास हे सर्व लोक का विसरतात ? ५

१ नये, २ दावियेल्या.

२९२४ न लगे द्यावा जीव सहजचि जाणार । आहे तो विचार जाणा कांहीं ॥ १ ॥
मरण जो मागे गाढवाचा बाळ । बोलिजे चांडाळ शुद्ध त्यासी ॥ २ ॥
तुका म्हणे कई[1] होईल स्वहित । निधान जो यीत टाकूं पाहे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपाः—यीत—व्यर्थ.

अर्थः— मुद्दाम होऊन जीव देण्याची काही जरूरी नाही. तो सहजच जाणार आहे. असा हा विचार नीटपणे जाणावा. १ देवाच्या जवळ जो मरण मागत असतो तो गाढवाचाच मुलगा समजावा. त्याला शुद्ध चांडाळ म्हणावे. २ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या जवळ असलेल्या आयुष्याचा हा ठेवा व्यर्थ टाकून देऊन आपले हित कसे साधले जाणार ? ३

२९२५ मोल वेचूनियां धुंडिती सेवका । आम्ही तरी फुका मागों बळें ॥ १ ॥
नसतां जवळी हित फार करूं । जीव भाव धरूं तुझ्या पायीं ॥ २ ॥
नेदूं भोग आम्ही आपुल्या शरीरा । तुम्हांसी दातारा व्हावें म्हूण ॥ ३॥
कीर्ती तुझी करूं आमुचे सायास । तूं का रे उदास पांडुरंगा ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज काय मागों आम्ही । फुकाचे कां ना भी म्हणसी ना ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः— सायास—प्रयत्नानें.

अर्थः— देवा, काही मोल देऊन तुम्ही सेवक मिळेल का म्हणून शोध घेत आहात; पण आम्ही तर तुमची सेवा फुकटच मागीत आहोत. १ तू जरी एखाद्या वेळेस आमच्या जवळ नसलास तरी आम्ही तुझेच फार मोठे हित करू. तुझ्या पायी जीवभाव धरून आम्ही राहू. २ दातारा, तुम्हांस सर्व सुखभोग प्राप्त व्हावेत म्हणून आमच्या शरीराच्या सुखार्थ आम्ही काहीच भोग भोगणार नाही. ३ आमच्या प्रयत्नाने आम्ही तुमचीच कीर्ती वाढवू. असे असताना, पांडुरंगा, तुम्ही आमच्याविषयी असे उदास का आहात ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुला आम्ही असे काय मागत आहोत रे ? 'भिऊ नकोस' असे म्हणून फुकटचे अभयदान तू आम्हांस का रे देत नाहीस ? ५

२९२६ काय लवणकणिकेविण[2] । एके क्षीण सागर ॥ १ ॥
मां हे येवढी अडचण । नारायणीं मजविण ॥ २ ॥
कुबेर अटाहासें जोडी । काय कवडी कारणें ॥ ३ ॥
तुका म्हणे काचमणि । कोण गणी भांडारी ॥ ४

शब्दार्थ व टीपाः— लवणकणिकेविण—एका लहानशा मिठाच्या खड्याशिवाय, क्षीण—कमी, मां—मग, भांडारी—कोशाचा अधिकारी.

अर्थः— एखादा मोठा सागर काय लहानशा मिठाच्या कणाशिवाय कधी कमी होतो काय ? १ मग मी क्षुद्र जर नसलो तर त्या नारायणाच्या ठिकाणी माझ्यावाचून काही कमतरता निर्माण होईल काय ? २ कुबेर मोठ्या प्रयत्नाने धनसंपत्ती जोडीत असतो, मिळवितो; तो काय एका कवडीसाठी जीव टाकील ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मोठ्या रत्नभांडाराच्या अधिकाऱ्यास काचमण्याची काय किंमत असणार ? ४

२९२७ तुज मज नाहीं भेद । केला सहज विनोद ॥ १ ॥
तूं माझा आकार । मी तों तूंच निर्धार ॥ २ ॥
मी तुजमाजी देवा । घेसी माझ्या अंगें सेवा ॥ ३ ॥

१ कायी. २ लवणकळिकेविण.

मी तुजमाजी अचळ । मजमाजी[1] तूं सबळ ॥ ४ ॥
तूं बोलसी माझ्या मुखें । मी तों तुजमाजी सुखें ॥ ५ ॥
तुका म्हणे देवा । विपरीत ठायीं नांवा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– अचळ–स्थिर

अर्थ.– देवा, तुझ्यात व माझ्यात तसा काही भेद नाही, पूर्वी कधी भेदभावाचे बोलणे केले असेल तर तो सहज घडलेला विनोद समजावा १ देवा, माझा सर्व आकार तूच असून मी जो आहे तो तूच आहेस असा माझा निर्धार आहे २ देवा, मी सर्व दृष्टींनी तुझ्यामध्येच आहे. तू माझ्याकडून सेवा घेतोस ३ देवा, मी तुझ्या ठिकाणी स्थिर असून माझ्यामध्ये असलेले सर्व बळ तुझेच आहे ४ देवा, तूच माझ्या मुखातून बोलतोस आणि त्यामुळे मी तुझ्यामध्ये मोठ्या सुखाने वास्तव्य करून आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्यामाझ्यातील नामरूपाचा हा विपरीत भेद वरवरचाच आहे ६

विवरण – या एका महत्त्वाच्या अभंगात तुकारामबुवानी देव-भक्ताच्या अभेदत्वाचे फार समर्पक रीतीने वर्णन केले आहे. देव व त्याचा भक्त ही नावे जरी वेगळीच असली तरी तत्त्वरूपाने दोघेही एकच आहेत. देव भक्ताच्या हृदयात आहे, आणि देवाच्या हृदयात भक्त आहे. सर्व भूतमात्रात ईश्वर समत्वाने एकवटलेला आहे. ' समोऽहं सर्वभूतेषु '–सर्व भूतमात्रात मी समत्वाने आहे अशी साक्ष भगवतानीही गीतेत दिलेली आहे. ' ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ' जे माझे भक्त भक्तीने भजन करतात ते माझ्या ठिकाणी आणि मीही त्यांच्या ठिकाणी असतो. गीतेच्या या देव-भक्तीतील ऐक्याच्या कल्पनेवरील ज्ञानेश्वर महाराजांचे भाष्य मोठे बहारदार व समर्पक आहे. देवभक्ताचे ऐक्य वर्णन करताना त्यांनी म्हटले आहे, ' ते वर्तत दिसती देहीं । परि ते देहीं ना माझ्या ठायीं । आणि मी तयांच्या हृदयीं । समग्र असें ॥ ' माझे भक्त देहाने निराळे दिसत असले तरी ते वस्तुतः तसे नसतात, तर ते माझ्याच ठिकाणी सर्वस्व समर्पण करून असतात व मीही त्यांच्या ठिकाणी निवास करतो या एकत्वास सुरेख दृष्टान्त देताना ज्ञानेश्वरानी म्हटले आहे, ' सविस्तर वटत्व जैसें । बीजकणिकेमाजीं असे । आणि बीजकणु घसे वटीं जेवीं ॥ तेवीं आम्हां तया परस्परें । बाहेर नामाचींचि अंतरें । वांचूनि आंतुवर वस्तुविचारें । मी तेचि ते ' वडाच्या झाडाचे बीज लहान असले तरी त्या कणातच वटवृक्षाचा सर्व विस्तार असतो आणि तो बीजकणच वृक्षाच्या विस्तारात असतो. त्याप्रमाणे देव व भक्त ही नावे जरी भिन्न असली तरी त्यांच्यात तसा भेद नसतो.

२९२८ वैराग्याचें भाग्य । संतसंग हाचि लाग[2] ॥ १ ॥
संतकृपेचे हे दीप । करी साधका निष्पाप ॥ २ ॥
तोचि देवभक्त । भेदाभेद नाहीं ज्यांत ॥ ३ ॥
तुका प्रेमें नाचे गाये । गाणियांत विरोन जाये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– लाग–लाभ, गाणियांत–प्रभुप्रेमाच्या गायनात.

अर्थ:– संतसंगाचा लाभ होणे हेच वैराग्य प्राप्त झाल्याचे भाग्य आहे. १ संत हे कृपेचे दीप असून त्यांच्यामुळे साधक निष्पाप होतात, ते साधकाना निष्पाप करतात २ ज्यांच्या दृष्टीत भेदाभेद उरलेला नाही तोच खरा देवभक्त होय ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी मोठ्या प्रेमाने या श्रीहरीचे नाम घेताना नाचतो, गातो, आणि त्या गाण्याच्या तल्लीनतेतच स्वतःस विसरून जातो. ४

२९२९ जप तप ध्यान न लगे धारणा । विठ्ठलकीर्तनामाजी सर्व[3] ॥ १ ॥
राहें माझ्या मना दृढ या वचनीं । आणिक तें मनीं न धरावें ॥ २ ॥

१ तुझें बळ, २ लाभ, ३ उभा.

कीर्तनसमाधि साधन ते मुद्रा । राहतील थारा घरोनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे मुक्ति हरिदासांच्या घरीं । वोळगती चारी ऋद्धिसिद्धी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- थारा-आश्रय, वोळगती-प्राप्त होतात, सेवा करतात, वावरतात.

अर्थः- ईश्वराच्या प्राप्तीसाठी जप, तप, ध्यान, धारणा यांची काही जरूरी नाही. या सर्व गोष्टी एका विठ्ठलाच्या नामसंकीर्तनातच प्राप्त होतात. १ माझ्या मना तू या वचनावर दृढ निश्चय करून विश्वास ठेव. याखेरीज दुसरे काहीही चित्तामध्ये ठेवू नकोस. २ समाधी, अनेक साधने, नाना मुद्रा इत्यादी गोष्टी हरिकीर्तनाचा आश्रय धरूनच राहातात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या दासांच्या घरी सलोकता, समीपता इत्यादी चारी मुक्ती आणि रिद्धीसिद्धी दास्यत्व करून वावरत असतात. ४

२९३० नाहीं तुज कांहीं मागत संपत्ती । आठवण चित्तीं असों द्यावी ॥ १ ॥
सरलिया भोग येईन सेवटीं । पायापें या भेटी अनुसंधानें ॥ २ ॥
आतां मजसाटीं याल आकारास । रोकडी हे आस नाहीं देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे मुखीं असो तुझें नाम । देईल तो श्रम देवो काळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- आस-आशा, इच्छा, श्रम-दुःख.

अर्थः- देवा, तुझ्याजवळ मी काही धनसंपत्तीची मागणी करीत नाही, परंतु तुझ्या चित्तात माझी आठवण व माझ्या चित्तात तुझी आठवण मात्र असावी. १ माझा सर्व प्रारब्धभोग सरल्यावर मी शेवटी तुमच्याच स्वरूपाच्या अनुसंधानाने तुमच्या पायांचा आश्रय घेण्यासाठी येईन. २ देवा, तुम्ही माझ्यासाठी सगुणसाकार रूप धारण कराल अशी रोकडी आशा मला नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या मुखामध्ये नेहमी तुझे नाम असावे. मग त्या काळाला मला काय दुःख द्यायचे असेल ते तो देवो. ४

२९३१ हितावरी यावें । कोणी वोलिलों या भावें ॥ १ ॥
नव्हे विनोदउत्तर । केले रंजवाया चार ॥ २ ॥
केली अटाअटी । अक्षरांची देवासाटीं ॥ ३ ॥
तुका म्हणे खिजों । नका जागा[1] येथें निजों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- चार-चट्टेचे उद्गार, अटाअटी-खटपट, प्रयत्न.

अर्थ:-लोकहो, तुम्ही तुमच्या हितास जाणावे म्हणून तर मी बोलत आहे. १ केवळ लोकांना रंजविण्यासाठी मी काही हे चट्टेचे उद्गार काढीत नाही २. या बोललेल्या अक्षरांची खटपट मी देवाच्या प्राप्तीसाठी केली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या अशा शब्दांनी तुम्ही खिजू नका किंवा झोपूनही जाऊ नका. नीट जागे राहा. ४

२९३२ संचित प्रारब्ध क्रियमाण । अवघा जाला नारायण ॥ १ ॥
नाहीं आम्हांसी संबंध । जरा मरण कांहीं बाध ॥ २ ॥
द्वैताद्वैतभावें । अवघें व्यापियेलें देवें ॥ ३ ॥
तुका म्हणे हरि । आम्हांमाजी क्रीडा करी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:-संचित-साठविलेले पूर्वकर्म, प्रारब्ध-सध्या भोगावे लागते ते, क्रियमाण-पुढे भोगण्यासाठी करीत आहे ते, जरा-वृद्धत्व, म्हातारपण.

१ रागा.

अर्थ :–संचित, प्रारब्ध व क्रियमाण हे आमचे सर्व हा नारायणच झालेला आहे. १ आता आमच्याशी यांचा कुणाचाही संबंध नाही. जन्म, व्याधी, मरण इत्यादींच्या बाधाही आम्हांस आता कधी होणार नाहीत. २ द्वैत, अद्वैत भावांच्या रूपाने हा देवच सर्वत्र व्यापून राहिलेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा सर्वव्यापी श्रीहरी आमच्यामध्ये क्रीडा करीत असतो. ४

२९३३ नेणें करूं सेवा । पांडुरंगा कृपाळुवा ॥ १ ॥
धांवें बुडतों मी काढीं । सत्ता आपुलिया ओढीं ॥ २ ॥
क्रियाकर्महीन । जालों इंद्रियां अधीन ॥ ३ ॥
तुका विनंती करी । वेळोवेळां पाय धरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–अधीन-स्वाधीन

अर्थ :–कृपाळू असणाऱ्या पांडुरंगा, सेवा कशी करावी हे मला काही समजत नाही. १ मी या भवसागरात बुडत आहे. तू मला आपल्या सत्तेच्या जोरावर त्यातून वर काढ. २ मी क्रियाकर्महीन झालो असून इंद्रियांच्या स्वाधीन बनलो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अनेक वेळा मी तुमच्या पायांना मिठी मारून अशा प्रकारची विनंती करीत आहे. ४

२९३४ जयापासोनि सकळ । महीमंडळ जालें ॥ १ ॥
तो एक पंढरीचा राणा । नये श्रुती अनुमाना ॥ २ ॥
विवादती जयासाठीं । जगजेठी तो विठ्ठल ॥ ३ ॥
तुका म्हणे तो आकळ । आहे सकळव्यापक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–महीमंडळ–पृथ्वीचा विस्तार, पृथ्वीमंडळ, विवादती–वादविवाद करतात, आकळ-न कळण्याजोगा.

अर्थ :–ज्याच्यापासून हे सर्व पृथ्वीमंडळ निर्माण झाले, १ असा हा एक पंढरीचा राणा आहे. त्याचे अनुमान वेदांनासुद्धा होऊ शकत नाही २ ज्याच्या स्वरूपाविषयी अनेक वादविवाद आहेत असा हा विठ्ठल या जगात बलवान आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तो सर्वांना न कळणारा असला तरी सर्व जगाला व्यापून राहाणारा आहे. ४

२९३५ नाहीं रूप नाहीं नांव । नाहीं ठाव धरावा ॥ १ ॥
जेथें जावें तेथें आहे । विठ्ठल मायबहीण ॥ २ ॥
नाहीं आकार विकार । चराचर भरलेंसे ॥ ३ ॥
नव्हे निर्गुण सगुण । जाणे कोण तयासी ॥ ४ ॥
तुका म्हणे भावाविण । त्याचें मन वोळेना ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :–ठाव–आश्रयस्थान, वोळेना–वळेना, समजेना.

अर्थ :–या श्रीहरीस काही रूप [नाही की नावही नाही. याला कुठे धरून ठेवावे तर त्याला एक असे आश्रयस्थान नाही १ जेथे जावे तेथे ही मायबहीण विठाईच सर्वत्र दिसून येत आहे. २ त्याला कसला आकार नाही, की कसला विकारही नाही, पण तो सर्व चराचरांत भरून राहिलेला आहे ३ हा श्रीहरी निर्गुण नाही की सगुणही नाही. अशास कोण कसे जाणणार ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्याच्याविषयी भावभक्ती असल्याशिवाय हा कळणार नाही. ५

२९३६ आहे सकळा वेगळा । खेळे कळा चोरोनि ॥ १ ॥
सूत्रसूत्राचिये परी । देव दोरी हालवितो ॥ २ ॥
आपण राहोनि निराळा । कैसी कळा नाचवी ॥ ३ ॥
जेव्हा असुडितो दोरी । भूमीवरी पडे तेव्हा ॥ ४ ॥
तुका म्हणे तो जाणावा । सखा करावा आपुला ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा -कळा-कला, क्रीडा

*अर्थ -हा श्रीहरी सर्वांहून वेगळा असून इतराला कळून न देता नाना प्रकारच्या क्रीडा करीत असतो १* एखाद्या कळसूत्री बाहुलीप्रमाणे हा देव सर्व सूत्रे हालवीत असतो २ हा देव आपण निराळा होऊन राहतो आणि कशा नाना क्रीडा करीत असतो ३ जेव्हा हा प्रारब्धाची दोरी हासडतो तेव्हा देहधारी मनुष्य भूमीवर गतप्राण होऊन पडतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्वसूत्रधार देव जाणावा व त्याला आपला सखा मानावे ५

२९३७ आतां पुढे मना । चाली[1] जाली नारायणा ॥ १ ॥
येथें[2] राहिले राहिले । कैसे गुतोनि उगले ॥ २ ॥
भोंवतें भोंवनीं । आलियाची जाली धणी ॥ ३ ॥
तुका म्हणे रंग रंगे । रंगले पांडुरंगे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -उगले-शांत झाले, भोंवनीं-पऱ्यात, धणी-तृप्ती

*अर्थ -नारायणा, माझ्या मनाची आता पुढे पुढे होणारी धाव संपत आली १ माझे हे मन आता तुमच्या* ठिकाणी कसे गुंतून शांत होऊन राहिले आहे ! २ सर्वत्र भोवतीच्या फेऱ्यात हिंडून शेवटी तुमच्याकडे ते आल्याने त्याची तृप्ती झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात त्याच्यावरील आता सर्व रंग या पांडुरंगाने रंगलेले आहेत ४

२९३८ आळस पाडी विषयकामीं । शक्ती देईं तुझ्या नामीं ॥ १ ॥
हेचि विनवणी विनवणी । विनविली धरा मनीं ॥ २ ॥
आणिक वचना मुकी वाणी । तुमच्या गर्जो द्यावी गुणीं ॥ ३ ॥
तुका म्हणे पाय डोळां । पाहे एरवी अंधळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -पाडी-निर्माण कर, आणिक-इतर, दुसऱ्या

*अर्थ -देवा, विविध विषय* सेवन करण्याच्या कामी माझ्या मनात आळस निर्माण कर आणि तुझ्या नामस्मरणासाठी मात्र चांगली शक्ती दे १ देवा, हीच विनवणी मी पुन पुन करीत आहे, ती तुम्ही तुमच्या चित्तात धारण करा २ इतर काही वचने गाण्यात माझी वाणी मुकी व्हावी, पण तुमच्या गुणाची गर्जना करण्यात मात्र ती प्रभावी व्हावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमचे पाय माझ्या डोळ्यांनी सतत पाहावेत, पण इतर पाहाण्याविषयी मात्र मी आंधळा व्हावे ४

२९३९ कोण वेची वाणी । आता क्षुल्लका कारणीं ॥ १ ॥
आतां हेचि काम करूं । विठ्ठल हृदयात धरूं ॥ २ ॥
मैंदाविया वृत्ति । आता उठोंचि वहुती ॥ ३ ॥
उपदेश लोकां । करूनी वेडा होतो तुका ॥ ४ ॥

---
[1] चाचा, [2] तेथें

स्पष्ट आहेत. मागे अभंग क्रमांक २६६८ ते २६७१ पर्यंतच्या अभंगावरील विवरणात याविषयी विस्ताराने चर्चा झालेली आहे. शरीराचा भाव प्रेतरूप होतो म्हणजे काय व आपल्याच हाताने आपला देह वोळविणे म्हणजे काय हे आपण पाहिले आहे. देहबुद्धीचे हे समर्पण म्हणजे एक प्रकारचा मृत्यूच होय. हा एक पुनर्जन्मच मानतात.. '.मीच मज व्यालों । पोटीं आपुलिया आलों ' असे एके ठिकाणी तुकोबांनी म्हटले आहे. या पुनर्जन्मानंतर आपलेच मरण आपल्या डोळयांनी अनुभविल्यानंतर सर्व संशय दूर होतात. कुणाची सेवा करण्याचा प्रसंग उरत नाही. पापपुण्याचे बंधन उरत नाही. कारण सर्व काही देवच बोलवितो, करवितो हा अनुभव आलेला असतो. ' पापपुण्या ठाव नाहीं सुखदु:खा । हानिलाभशंका नासलिया ' असा एकदा अनुभव आल्यावर मग जे काही सर्व घडत राहील ते त्याच्याच सत्तेतून, इच्छेतून. आपले या ठिकाणी सर्वस्व संपून जाते. 'जितां मरण आलें आपपर गेलें । मूळ हें छेदिलें संसाराचें ' अशा मनस्थितीचे मोठे मूलगामी व अनुभवसंपन्न वर्णन करताना तुकोबांनी म्हटले आहे, ' तुका म्हणे देह पाहिला विठ्ठलीं । तेव्हांच घडली सर्वपूजा ।'

२९४८ लागों नेदीं बोल पायां तुझ्या हरी । जीव जावो परि न करीं आण ॥ १ ॥
परनारी मज रखुमाईसमान । वमनाहूनि धन नीच मानीं ॥ २ ॥
तुका म्हणे याची लाज असे कोणा । सहाकारी दीना ज्याची तया ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा:– वमनाहूनि–ओकाहून, ओकलेल्यापेक्षा.

अर्थ:– देवा, ज्यामुळे तुमच्या पायांकडे दोष येईल असे मी काहीसुद्धा करणार नाही. या संबंधात प्राण गेला तरी विपरीत वर्तन माझ्याकडून होणार नाही. १ परस्त्रियांना मी रखुमाईप्रमाणे मानले असून धनसंपत्तीस तर मी ओकलेल्यापेक्षा नीच मानले आहे. २ तुकाराम महाराज म्हणतात, दीनांना साहाय्य करणारा जो परमेश्वर तो माझा साहाकारी असल्याने माझी लाज त्यालाच आहे. इतर कुणास कशी असणार ? ३

२९४९ हेचि भेटी साच रूपाचा आठव । विसावला जीव आवडीपें ॥ १ ॥
सुखाचें भातुकें करावें जतन । सेविल्या ताहान भूक जाय ॥ २ ॥
दुरील जवळी आपणचि होतें । कवळिलें चित्तें जिवापासीं[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम घेतों वेळोवेळां । होतील सकळा शीतळा नाडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– साचा-खरोखर, आवडीपें-प्रेमात, आवडीत, भातुकें-प्रेमाचा खाऊ, शीतळ-थंड.

अर्थ:– खरोखर देवाची सतत आठवण करावी व त्याच्या प्रेमात आपल्या जीवास विसावा द्यावा, हाच खरी त्या देवाची भेट आहे. १ प्रभुप्रेमाचे सुख, खाव एका खाऊवे मोठ्या निष्ठेने जतन करावे, म्हणजे आपणास तहानभूक लागणार नाही. २ त्या प्रेममय प्रभूस आपल्या चित्तात साठवून ठेविला म्हणजे तो दूर असला तर अगदी जवळ आल्यासारखा होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी त्या प्रभूचे नाम वेळोवेळी घेत असतो. त्यामुळे शरीराच्या सर्व नाड्या शीतळ होऊन मोठे सुख प्राप्त होते. ४

२९५० आपुलिया बळें नाहीं[2] मी बोलत । सखा भगवंत वाचा[3] त्याची ॥ १ ॥
साळुंकी मंजूळ बोलतसे वाणी । शिकविता धनी वेगळाची ॥ २ ॥
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । चालवी[4] पांगळा पायांविण ॥ ४ ॥

१ जीवनासी, २ नाहीं बोलवत । मज कृपावंत०– ३ कृपा ४ चालवा.

शब्दार्थ व टीपा – खडावरी–खट वसूल करण्याच्या मूळ मुद्यावर, निवाडा करण्याच्या मुद्यावर, बुझवावें–समजूत काढावी

अर्थ – देवा, आमच्या भक्तिभावामुळेच तुला देवपण आलेले आहे हे काय तू विसरून गेलास ? १ देवा, तुम्ही सर्वसमर्थ असल्यामुळे तुम्हास नीट आठवण दिल्यावाचून उपकाराचे स्मरण होत नाही २ तुमचे चलनवलन माझ्यासारख्या एकनिष्ठ सेवकामुळेच होत असते तुम्ही मात्र तुमचे निर्गुणपण सांभाळीत असता ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी आता या बाबतीत मुद्यावर, निवाडा करण्याच्या वायद्यावर येऊन पोचलो आहे, श्रीहरी, मला तुमचे प्रेम देऊन माझी समजूत तुम्ही काढावी ४

विवरण – ईश्वराशी प्रेमकलह करण्यातील एक महत्त्वाचा मुद्दा साधुसंत नेहमी पुढे करीत असतात. तो म्हणजे या देवास देवपण तरी कुणी दिले ? या प्रश्नाचा होय बाळामुळे जसे बाईस आईपण, तसे भक्तामुळे ईश्वरास देवपण आले असल्याचे थोर संतानी व भक्तानी वारंवार सांगितले आहे आणि याची आठवण देवाने नीटपणे ठेवावी म्हणून भक्त कलहाच्या भूमिकेवरून विनवीत असतात आपण आपले काम सांभाळू, देवाने आपले सांभाळावे, असाही भाव कित्येकदा संताचा असतो देवास अनाथनाथ, पतितपावन अशी नावे तरी कुणामुळे मिळाली ? आम्ही भक्त अनाथ आहोत, पतित आहोत म्हणूनच देवास ही बिरुदावली प्राप्त झाली यामुळेच ना देवाचा गौरव झाला ? स्वतःस मोठेपण मिळाल्यावर ज्यामुळे हे मोठेपण आपणास मिळाले त्याचा विसर पडणे बरोबर नाही. ' जरि मी नव्हतों पतित । तरि तू पावन कैंचा तेथ ॥ म्हणोनि माझें नाम आधीं । मग तू पावन कृपानिधी ॥ ' याप्रमाणे आपल्या कर्तृत्वाची साक्ष तुकोबानी एके ठिकाणी दिलेली आहे 'आम्ही पापी तू पावन । हे तो पूर्वापार जाण' ही वहिवाटही त्यानी एका अभंगात सांगितली आहे ही गिरासदारी उभयतानी सांभाळावी

२९४७ आम्ही मेलो तेव्हा देह दिला देवा । आतां करूं सेवा कोणाची मी ॥ १ ॥
सूत्रधारी जैसा हालवितो कळा । तैसा[1] तो पुतळा नाचे छंदें ॥ २ ॥
बोलतसें जैसे[2] बोलवितो देव । मज हा संदेह कासयाचा ॥ ३ ॥
पाप पुण्य ज्याचे तोचि जाणे कांहीं । संबंध हा नाहीं आम्हांसवें ॥ ४ ॥
तुका म्हणे तुम्ही आइका हो मात[3] । आम्ही या अतीत देहाहूनी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – संदेह–संशय, कासयाचा–काय म्हणून ? मात–गोष्ट, हकीकत, अतीत–वेगळे, पलीकडचे.

अर्थ – जेव्हा आम्ही आमचा देह या देवास समर्पण केला तेव्हाच आम्ही लौकिक दृष्टीने मरण पावलेलो आहोत आता आम्ही सेवा तरी कुणाची करावी ? १ सर्व जगाचे व्यवहार करणारा हा सूत्रधारी देव ज्याप्रमाणे सूत्र हालवून क्रीडा करवून घेईल त्याप्रमाणे आमच्या या देहाचा पुतळा नाचत राहील २ ज्याप्रमाणे मला देव बोलवील त्याप्रमाणे मी बोलत असतो मग मला संशय कशाचा ? ३ पाप घडले, की पुण्य घडले, हे त्याच सूत्रचालकाने जाणावे आमचा त्याच्याशी काही संबंध नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या शरीराहून वेगळे आहोत हे वृत्त तुम्ही ऐका ५

विवरण – आत्मनिवेदनपर अशा या एका महत्त्वाच्या अभंगात तुकाराम महाराजानी दोन गोष्टी स्पष्ट केल्या आहेत एक म्हणजे आपण या शरीराने वर्तत असलो तरी आपण आता त्याच्या व्यापाराहून वेगळे आहोत, आणि दुसरी म्हणजे या शरीराकडून होणाऱ्या साऱ्या क्रिया सर्वसत्तात्मक प्रभूकडून होत असतात ही होय या दोन्ही वृत्तींची छाप तुकोबाच्या अनेक अभंगायन्त दिसून येते आपला देह आपण प्रभूस समर्पण केला, तो आता त्याचा झाला आहे, त्यामुळे त्याच्याकडून होणाऱ्या पापपुण्यात्मक क्रियाचा संबंध आता आपणाकडे नाही, हा विचार तुकोबानी अनेकदा व्यक्त केलेला आहे ' देह तुझ्या पायीं । ठेवूनि जालों उतराई ', 'देह नव्हे मी हें सरे । उरला उरे विठ्ठल', ' देहभाव आम्ही राहिलों ठेवूनि । निवांत चरणीं विठोबाच्या ' इत्यादी वचनातून देह व देहभावसमर्पणाचे उल्लेख

१ नाचवी पुतळा, २ तैसें, ३ सत.

स्पष्ट आहेत. मागे अभंग क्रमांक २६६८ ते २६७१ पर्यंतच्या अभंगावरील विवरणात याविषयी विस्ताराने चर्चा आलेली आहे. शरीराचा भाव प्रेतरूप होतो म्हणजे काय व आपल्याच हाताने आपला देह वोळविणे म्हणजे काय हे आपण पाहिले आहे. देहबुद्धीचे हे समर्पण म्हणजे एक प्रकारचा मृत्यूच होय. हा एक पुनर्जन्मच मानतात.. 'मीच मज व्यालों । पोटीं आपुलिया आलो ' असे एके ठिकाणी तुकोबानी म्हटले आहे. या पुनर्जन्मानंतर आपलेच मरण आपल्या डोळ्यानी अनुभविल्यानंतर सर्व संशय दूर होतात. कुणाची सेवा करण्याचा प्रसंग उरत नाही. पापपुण्याचे बंधन उरत नाही. कारण सर्व काही देवच बोलवितो, करवितो हा अनुभव आलेला असतो. 'पापपुण्या ठाव नाहीं सुखदु:खा । हानिलाभशंका नासलिया ' असा एकदा अनुभव आल्यावर मग जे काही सर्व घडत राहील ते त्याच्याच सत्तेतून, इच्छेतून. आपले या ठिकाणी सर्वस्व संपून जाते. 'जितां मरण आलें आपपर गेलें । मूळ हें छेदिलें संसाराचें ' अशा मनस्थितीचे मोठे मूलगामी व अनुभवसंपन्न वर्णन करताना तुकोबानी म्हटले आहे, 'तुका म्हणे देह वाहिला विठ्ठलीं । तेव्हांच घडली सर्वपूजा ।'

२९४८ लागों नेदीं बोल पायां तुझ्या हरी । जीव जावो परि न करीं आण ॥ १ ॥
परनारी मज रखुमाईसमान । वमनाहूनि धन नीच मानीं ॥ २ ॥
तुका म्हणे याची लाज असे कोणा । सहाकारी दीना ज्याची तया ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा:– वमनाहूनि–ओकाहून, ओकलेल्यापेक्षा.

अर्थ:– देवा, ज्यामुळे तुमच्या पायांकडे दोष येईल असे मी काहीसुद्धा करणार नाही. या संबंधांत प्राण गेला तरी विपरीत वर्तन माझ्याकडून होणार नाही १ परस्त्रियांना मी रखुमाईप्रमाणे मानले असून धनसंपत्तीस तर मी ओकलेल्यापेक्षा नीच मानले आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, दीनांना साह्य करणारा जो परमेश्वर तो माझा साह्यकारी असल्याने माझी लाज त्यालाच आहे. इतर कुणास कशी असणार ? ३

२९४९ हेचि भेटी साच रूपाचा आठव । विसावला जीव आवडीयें ॥ १ ॥
सुखाचें मातुकें करावें जतन । सेविल्या ताहान भूक जाय ॥ २ ॥
दुरील जवळी आपणचि होतें । कवळिलें चित्तें जिवापासीं[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम घेतों वेळोवेळां । होतील सकळा शीतळा नाडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– साचा–खरोखर, आवडीयें–प्रेमात, आवडीत, मातुकें–प्रेमाचा खाऊ, शीतळ–थंड.

अर्थ.– खरोखर देवाची सतत आठवण करावी व त्याच्या प्रेमात आपल्या जीवास विसावा द्यावा, हीच खरी त्या देवाची भेट आहे. १ प्रभुप्रेमाचे सुख, याच एका लाडूवे मोठ्या निष्ठेने जतन करावे, म्हणजे आपणांस तहानभूक लागणार नाही. २ त्या प्रेममय प्रभूस आपल्या चित्तात साठवून ठेविला म्हणजे तो दूर असला तर अगदी जवळ आल्यासारखा होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी त्या प्रभूचे नाम वेळोवेळी घेत असतो, त्यामुळे शरीराच्या सर्व नाड्या शीतळ होऊन मोठे सुख प्राप्त होते ४

२९५० आपुलिया बळें नाहीं[2] मी बोलत । सखा भगवंत वाचा[3] त्याची ॥ १ ॥
साळुंकी मंजूळ बोलतसे वाणी । शिकविता धनी वेगळाची ॥ २ ॥
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याची कोण जाणे कळा । चालवी[4] पांगळा पायांविण ॥ ४ ॥

१ जीवपासी, २ नाही बोलवत । सखा कृपावंत०– ३ कृपा ४ चालवी.

शब्दार्थ व टीपा:– धणी–धनी, स्वामी, मालक, कळा–कोडकौतुक.

अर्थ:– मी आपल्या स्वतःच्या सामर्थ्याने बोलत आहे असे नाही. तो माझा सखा भगवंत आहे, त्याचीच ही वाणी आहे. त्याची ही कृपा आहे. १ साळुंकी अतिशय गोड गोड शब्द करीत असते; पण तिला असे शब्द काढायला लावणारा तिचा धनी वेगळाच असतो. २ एऱ्हवी मी पामराने कोणते शब्द उच्चारावेत ? पण त्या विश्वंभर प्रभूने मला बोलते केले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या प्रभूचे कोडकौतुक कोण जाणणार ? तो श्रीहरी पायांशिवाय जो पांगळा असतो त्यासही चालता करतो. ४

विवरण:– वर सांगितल्याप्रमाणे देहभाव नष्ट झाल्यावर जे जे काही घडते त्याच्या मागची प्रेरणा प्रभूची ठरते. तुकोबांना आपल्या पांडुरंगमिश्रित वाणीची यथार्थ जाणीव होती. भावारूढ झालेल्या अवस्थेत तुकोबांच्या मुखातून जे स्रवले ते अभंगरूपाने कायम झाले, अमर झाले. कारण वरवर दिसणाऱ्या देहाची ती क्रिया नव्हती. साळुंकी मंजुळ स्वरांनी बोलत असली तरी तिला हे बोल शिकविणारा धनी कुणी वेगळाच असतो. त्याचप्रमाणे तुकोबांच्या मुखातून विश्वाला भरून राहाणारा श्रीहरी बोलत राहात असे. ' तुका म्हणे मज बोलवितो देव ' असे एका अभंगात त्यांनी स्पष्टपणे म्हटले आहे. कवित्व आपण स्वतःच्या बळावर करतो ही भावना बुवांची नव्हती. आपल्या युक्तीचा हा प्रकार नसून ' मज विश्वंभर बोलवितो ' अशीच त्यांची निष्ठा व्यक्त झालेली आहे. ' वदवी गोविंद तेंचि वदे ' असे त्यांनी आपल्या बोलण्यामागचे रहस्य स्पष्ट केले आहे.

२९५१ हित सांगे तेणें दिलें जीवदान । घातकी तो जाण मनामागें ॥ १ ॥
बळें हे वारावे अधर्म करितां । अंधळें चालतां आडरानें ॥ २ ॥
द्रव्य देऊनियां धाडावें तीर्थासी । नेदावें चोरासी चंद्रबळ ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें आहे हें पुराणीं । नाहीं माझी वाणी पदरींची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– नेदावें– न द्यावे, चंद्रबळ–मदत.

अर्थ :– आपले हित सांगून जीवदान देणारा मनुष्य जर माझ्याच मनाप्रमाणे वाग असे सांगणारा असेल तर घातकी समजावा. १ कुणी अधर्माने वागत असेल तर त्याला आपल्या सामर्थ्याने दूर करावे. आडरानाने चाललेल्या आंधळ्या माणसास नीट रस्ता दाखवावा. २ आपल्या जवळचे द्रव्य दुसऱ्यास देऊन त्याला तीर्थयात्रेसाठी पाठवावे. आणि जे चोर आहेत त्यांना कुठल्याही प्रकारची मदत करू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे बोलणे काही माझ्या पदरचे नाही; तर हे सर्व पुराणांतून सांगितले आहे. ४

२९५२ ऐसा[1] घेईं कां रे संन्यास । करीं संकल्पाचा न्यास[2] ॥ १ ॥
मग तूं राहें भलते ठायीं । जनीं वनीं खाटे भोईं ॥ २ ॥
तोडीं जाणिवेची कळा । होईं वृत्तीसी वेगळा[3] ॥ ३ ॥
तुका म्हणे नभा । होईं आमुचा ही भागा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– न्यास–नाश, भोईं–भूमीवर, कळा–युक्त्या.

अर्थ:– अरे, सर्व संकल्पांचा नाश होईल असा संन्यास तू घ्यावास १ मग तू लोकांत, वनात, खाटेवर अथवा भूमीवर, कुठल्याही ठिकाणी राहिलास तरी चालेल २ जाणतेपणाच्या सर्व युक्त्या तू सोडून टाक; अहंपणाच्या वृत्तीपासून तू वेगळा हो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमचा देव जसा सर्व आकाशात व्यापून राहिलेला आहे तसा तू हो. ४

१ घई रे सन्यास, २ नाश, ३ निराळा.

२९५३ सोळा सहस्र होऊं येतें । भरलें रितें आह्मांपें ॥ १ ॥
ऐसे तुह्मां ठायाठाव । देव म्हूण संपादे ॥ २ ॥
कैंची चिरामध्यें चिरे । मना बरें आलें तें ॥ ३ ॥
तुका म्हणे पांडुरंगा । अंगलगा[1] भिन्न परा[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- रितें-कमी, उणीव, चिरामध्यें-वस्त्रातून, अंगलगा-आपल्या संगतीतून, अंगसंगापासून.

अर्थः- देवा, सोळा सहस्र गोपींच्या निमित्ताने तुम्ही तितकी रूपे धारण करता. हे तुम्हांस नीट जमते, आणि आमच्यासाठी मात्र तुम्ही परिपूर्ण असून कमी ठरता. १ अशा प्रकारे तुम्ही कमीअधिक फरकाने वागता. केवळ तुम्ही देव म्हणूनच तुम्हांला हे शोभून दिसते. २ द्रौपदीच्यावर वस्त्रहरणाचे संकट आले तेव्हा तुम्ही वस्त्रांतून वस्त्र बनून तिला साह्य केलेत; हे तुमच्या मनास बरे वाटले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तुम्ही आम्हांस आपल्या अंगसंगापासून दूर करता हे बरे नाही ४

२९५४ इहलोकीं आम्हां भूषण अवकळा । भोपळा वाकळा आणि[3] भिक्षा ॥ १ ॥
निमोली संपदा भयविरहित । सर्वकाळ चित्त समाधान ॥ २ ॥
छिद्राचा आश्रम उंदीरकुळवाडी । धन नाम जोडी देवाचें[4] तें ॥ ३ ॥
तुका म्हणे एक सेवटीं राहाणें । वर्ततों या जना विरहित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- निमोली-बिनमोलाची, छिद्र-बीळ.

अर्थः- या लोकी वावरत असताना भिक्षेचे अन्न, पाण्यासाठी फुटका भोपळा, आणि पांघरण्यासाठी वाकळ अशी बरबर दिसणारी अवकळाच आम्हांस भूषणाप्रमाणे आहे १ कारण ही संपत्ती बिनमोलाची असली तरी हिला कसलीही भीती नाही. त्यामुळे सतत चित्त समाधानाने भरून असते २ आमचा आश्रम, आमचे खोपटे अनेक छिद्रांचे, बिळाचे असून त्यात उंदरांनी वसती केलेली आहे देवाचे नाम हेच धन आम्ही प्राप्त करून ठेविले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, शेवटी आम्हांला एकटेच राहायचे असल्याने आम्ही या लोकांच्या पेक्षा वेगळे वर्तन करीत आहोत. ४

२९५५ आम्ही भाग्याचे भाग्याचे । आम्हां तांबे भोपळ्याचे ॥ १ ॥
लोकां घरीं गाई म्हैसी । आम्हां घरीं उंदिरघुसी ॥ २ ॥
लोकां[5] घरीं हत्ती घोडे । आम्हां आधोडीचे जोडे ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही तुडके । आम्हां देखोन काळ धाके ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- आधोडीचे-अर्धवट फाटलेले, तुडके-दरिद्री, लंगोटी नेसलेला.

अर्थः- आम्ही कसे भाग्यवत आहोत पाहा. भोपळ्याच्या भांड्याचे आम्ही पाणी भरण्यासाठी तांबे करीत असतो. १ लोकांच्या घरी भरपूर दूध देणाऱ्या गाई व म्हशी आहेत, पण आमच्या घरी मात्र उंदीरघुशींचा सुकाळ असतो. २ लोकांच्या घरी हत्ती आणि घोडे झुलतात; पण आम्हांस मात्र पायांत फाटलेलेच जोडे घालावे लागतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे आम्ही अतिशय दरिद्री असल्यामुळे आम्हांस पाहून प्रत्यक्ष काळालाही भीतीची धडकी भरते ४

२९५६ गाऊं नेणें कळा कुसरी । कान धरोनि म्हणें हरी ॥ १ ॥
माझ्या बोबडिया बोला । चित्त द्यावें बा विठ्ठला ॥ २ ॥

१ अंगसंगा, २ करा, ३ अन्न, ४ देवाची ते, ५ लोकांघरीं तांबे पाळे । आम्हां घरीं परळ काळे ॥

मज हंसतील लोक । परि मी गाईन नि:शंक ॥ ३ ॥
तुझे नामीं मी निर्लज्ज । काय जनासवें काज ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी विनंती । तुम्ही परिसा कमळापती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:– कळा–कला, शास्त्रयुक्त गाणे, काज–काम, परिसा–ऐका, कमळापती–लक्ष्मीचे पती.

अर्थ:– मी काही गायनशास्त्रातील कलाकुसर जाणीत नाही, पण कानावर हात ठेवून 'राम कृष्ण हरी' असे मात्र मनोभावे म्हणतो. १ अरे विठ्ठला, माझ्या या बोबड्या बोलांकडे तू नीट लक्ष द्यावेस २ मला लोक हसत राहिले तरी चालेल; पण मी नि:शंक मनाने गात राहीन. ३ देवा, तुझ्या नामाच्या बाबतीत मी निर्लज्ज झालो आहे मला लोकांशी काय काम आहे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, लक्ष्मीच्या पती, माझी ही अशी विनंती तुम्ही ऐकावी. ५

२९५७ विष पोटीं सर्पा । जन भीतें तया दर्पा ॥ १ ॥
पंच भूतें नाहीं भिन्न । गुण दुःख देती शीण ॥ २ ॥
चंदन प्रिय वासें । आवडे तें जातीऐसें ॥ ३ ॥
तुका म्हणे दाणा । कुचर मिळों नये अन्ना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– दर्पा–दराऱ्यास पात्र, कुचर–न शिजणारा

अर्थ :– सर्पाच्या पोटात विष असल्यामुळे त्याच्या दराऱ्यास लोक फार भितात. १ एऱ्हवी सर्वांचे देह पंचमहाभूतांचेच बनले आहेत, त्यांच्यात भिन्नता नाही. पण चांगल्यावाईट गुणांमुळे सुखदु:ख अथवा त्रास होत असतो. २ चंदन स्वत:च्या वासामुळे प्रिय होते. प्रत्येकजण स्वत:च्या जातिगुणाने प्रिय होत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, न शिजणारा दाणा अन्नापासून वेगळाच राहतो, तो शिजलेल्या अन्नात कधी मिसळत नाही.४

२९५८ देव अवघें प्रतिपादी । वंदी सकळां एका निंदी ॥ १ ॥
तेथें अवघें गेलें वांयां । विष घास एके ठायां ॥ २ ॥
सर्वांग कुरवाळी । उपटी एक रोमावळी ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्त । नाहीं जयाचें अंकित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रोमावळी–केसांची रांग, अंकित–ताब्यात.

अर्थ :– सर्वत्र ईश्वरच भरून राहिलेला आहे, असे प्रतिपादन करून सर्वांना वंदन करणाराने एकाचीच निंदा करावी याचा अर्थ काय ? १ हे सर्व वाया गेल्यासारखेच आहे. सुग्रास जेवणात एखादाच विषाचा घास लागला तर कसे होईल ? २ प्रेमाने सर्वांगास कुरवाळावे; पण मध्येच केसांच्या रांगेस धक्का लागला तर ? एखादा केस उपटला गेला तर ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचे चित्त स्वत:च्या ताब्यात नाही त्याची गत ही अशीच व्हायची. ४

२९५९ मज माझा उपदेश । आणिकां नये याचा रीस ॥ १ ॥
तुम्ही अवघे पांडुरंग । मीच दुष्ट सकळ चांग ॥ २ ॥
तुमचा मी शरणागत । कांहीं करा माझें हित ॥ ३ ॥
तुका पाय धरी । मी हें माझें दुर करीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– रीस–राग, राग.

अर्थ :– मी केलेला हा उपदेश माझा मलाच आहे त्याचा त्रास इतरांना कुणास वाटू नये १ तुम्ही सर्व लोक पांडुरंगाप्रमाणे चांगले आहात व मी मात्र दुष्ट आहे. २ यासाठी मी तुम्हांस शरण आलेलो आहे. माझे काही तरी हित तुम्ही करावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमचे पाय धरतो, मी, माझा देह या भावापासून मला तुम्ही दूर करावे ४

२९६० जाणे त्याचें वर्म नेणे त्याचें कर्म । केल्याविण धर्म नेणवती ॥ १ ॥
मैथुनाचें सुख सांगितल्या शून्य । अनुभवाविण कळूं नये ॥ २ ॥
तुका म्हणे जळो शाब्दिक हें ज्ञान । विठोबाची खूण विरळा जाणे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा:– मैथुनाचे–स्त्रीसंभोगाचे

अर्थ.–जाणत्या लोकाचे खरे वर्म व नेणत्या लोकाचे कर्म हे प्रत्यक्ष घडल्यावाचून त्यांचा अनुभव येत नाही. १ स्त्रीसंभोगाच्या सुखाचे नुसते वर्णन करून सांगितल्यास काय उपयोग? ते काहीच समजणार नाही. अनुभवाशिवाय काहीच समजून येणार नाही. २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे ज्यांना केवळ शाब्दिक ज्ञान आहे ते जळून जावे, विठोबाच्या स्वानुभवाची खूण जाणणारे क्वचितच दिसतील. ३

२९६१ अभिमानी पांडुरंग । गोवा काशाचा हो[१] मग ॥ १ ॥
अनुसरा लवलाहीं । नका विचार करूं कांहीं ॥ २ ॥
कोठें राहातील पापें । जालिया हो अनुताप ॥ ३ ॥
तुका म्हणे येचि घडी । उभ्या पाववील थडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.–गोवा–गुंता, अनुताप–पश्चात्ताप, थडी–पैलतीर.

अर्थ:–एकदा पांडुरंगाने जर आपला अभिमान धरला तर मग प्रपंचाचा गुंता कुठून राहिला हो? १ यासाठी काही एक विचार न करता या श्रीहरीस शरण जा. २ जर तुम्हास खरोखरीच पश्चात्ताप झाला तर मग तुमच्या ठिकाणी पाप कुठून राहाणार? ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे जर झाले तर याच घटकेला तो श्रीहरी उभ्याउभीच तुम्हाला भवसागराच्या पैलतीराला नेऊन पोचवील. ४

२९६२ तुझें वर्म हातीं । दिलें सांगोनियां संतीं ॥ १ ॥
मुखीं नाम धरीन कंठीं । अवघा सांटवीन पोटीं ॥ २ ॥
नवविधा वेढिन आधीं । सांपडलासी भावसंधी ॥ ३ ॥
तुका म्हणे बळिये गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– नवविधा–श्रवण, कीर्तन, स्मरण, पादसेवन, अर्चन, वंदन, दास्य, सख्य व आत्मनिवेदन अशा नऊ प्रकाराची भक्ती, भावसंधी–भावाच्या तावडीत, बळिये–बलवान.

अर्थ.– देवा, तुझ्या प्राप्तीचे वर्म या संतांनी माझ्या हातात दिले आहे, मला सांगितले आहे. १ त्याप्रमाणे हे तुझे नाम आता मी माझ्या कंठात धारण करीन व त्या सर्वव्यापी श्रीहरीस मी माझ्या हृदयात साठवीन. २ तू तर आमच्या भावांच्या तावडीत सापडला आहेस. तुला आता मी नवविधा भक्तीने वेढून टाकीन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या प्रभुप्रेमामुळे मोठे बलवान असल्यामुळे प्रत्यक्ष यमही आमच्या पाया पडत असतो. ४

१ हा.

२९६३ माझ्या मना लागो चाळा । पहावया विठ्ठल डोळां ॥ १ ॥
आणीक नाहीं चाड । न लगे संसार हा गोड ॥ २ ॥
तरिच फळ जन्मा आलों । सरता पांडुरंगीं जालों ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । देईं चरणांची सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाड–इच्छा, सरता–मान्य.

अर्थ :– श्रीविठ्ठल डोळ्यांनी पाहावा हाच एक चाळा माझ्या मनास सतत असावा. १ याखेरीज मला दुसरी कसलीही इच्छा नाही, मला लौकिकाचा संसारही गोड वाटत नाही. २ या पांडुरंगास मी जर मान्य झालो तरच माणसाच्या जन्मास आल्याचे सफळ सार्थक झाले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्या चरणांची सेवा तुम्ही मला द्यावी. ४

२९६४ अवघें जेणें पाप नासे । तें हें असे पंढरीसी ॥ १ ॥
गात जागा गात जागा । प्रेम मागा विठ्ठला ॥ २ ॥
अवघी सुखाचीच राशी । पुंडलिकाशीं वोळली हे ॥ ३ ॥
तुका म्हणे जवळी आलें । उभें ठेलें[1] समचरणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोळली–प्राप्त झाली.

अर्थ :– ज्याच्यामुळे सर्व प्रकारचे पाप नष्ट होते ते हे विठ्ठल दैवत पंढरपुरास उभे आहे. १ या विठ्ठलाचे गुणगान गात गात तुम्ही जागरण करा, जागृत राहा. या विठ्ठलास प्रेम मागा. २ सर्व प्रकारच्या सुखांचा ठेवा असलेली ही ठेव पुंडलिकास प्राप्त झालेली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे दैवत आमच्या जवळ येऊन समचरणांनी उभे राहिले आहे. ४

२९६५ देह तुझ्या पायीं । ठेवूनि जालों उतराई ॥ १ ॥
आतां माझ्या जीवा । करणें तें करीं देवा ॥ २ ॥
बहु अपराधी । मतिमंद हीनबुद्धि ॥ ३ ॥
तुका म्हणे नेणें । भावभक्तीचीं लक्षणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नेणें–जाणीत नाही.

अर्थ :– देवा, मी माझा देह तुझ्या पायांवर समर्पण करून उतराई झालो आहे. १ आता माझ्या जे तुम्हांला करायचे असेल ते तुम्ही करा. २ मी अगदी मतिमंद, हीनबुद्धीचा आणि अनेक अपराध करणारा आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमच्याविषयीच्या भावभक्तीची लक्षणेही जाणीत नाहीं ४

२९६६ जन हें सुखाचें दिल्याघेतल्याचें । अंत हें काळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥
जाल्या हीन शक्ति नाकडोळे गळती । सांडोनि पळती रांडापोरें ॥ २ ॥
बाइल म्हणे खर मरता तरी बरें । नासिलें हें घर थुंकोनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे माझीं नव्हतील कोणी । तुज चक्रपाणी वांचूनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सांडोनियां–सोडून, खर–गाढव.

अर्थ:– भोवतीचे लोक हे सुखाचे सोबती आहेत, त्यांना काही दिल्यानेच ते आपल्या उपयोगी पडतात. अंतकाळाच्या वेळेस त्यांतील कुणीही उपयोगी पडत नाही. १ आपल्या शक्ती कमी झाल्या, नाकडोळे गळायला

१ ठाले,

लागले की बायकामुले सर्वजण आपणांस सोडून जातील. २ आपली पत्नीसुद्धा आपला तिरस्कार करून म्हणेल, या म्हाताऱ्या गाढवाने थुंकून थुंकून सारे घर नासून टाकले, हा मरेल तर बरे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, चक्रपाणी, शेवटच्या समयास एका तुझ्यावाचून मला दुसरे कुणीही नाहीत. ४

२९६७ जाणोनि नेणतें करीं माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनियां ॥ १ ॥
मग मी व्यवहारीं असेन वर्तत । जेवीं जळाआंत पद्मपत्र ॥ २ ॥
ऐकोनि नाईकें निंदास्तुति कानीं । जैसा कां उन्मनीं योगिराज ॥ ३ ॥
देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टीं । स्वप्नींचिया सृष्टि चेविल्या जेवीं ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसें जालियावांचून । करणें तें तें सीण वाटतसे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वर्तत–वागत, पद्मपत्र–कमळाचे पान, उन्मनी–समाधीच्या अवस्थेतील, चेविल्या–जागे झाल्यावर.

अर्थ :– देवा, मला तुझ्या प्रेमाची खूण दाखवून माझे मन सर्व काही जाणते होऊनही नेणते, न जाणणारे कर, जाणिवेची जाणीव मला उरू देऊ नकोस. मी सर्व जाणले असा अभिमान माझ्या मनात येऊ देऊ नकोस १ एवढे झाले म्हणजे मी मोठ्या सुखाने व्यवहारात वागत राहीन. पाण्यात कमळ असले तरी त्याची पाने जशी पाण्याबाहेर असतात, त्याप्रमाणे मी प्रपंचात असून वेगळा राहीन. २ समाधीच्या अवस्थेतील योगी पुरुषास ज्याप्रमाणे जगाचे भान नसते त्याप्रमाणे मलाही मग लोकाकडून होणारी निंदास्तुती कधीच ऐकू येणार नाही. ३ स्वप्नात पाहिलेली सृष्टी जागे झाल्यावर जशी खोटी ठरते, त्याचप्रमाणे मी डोळ्यानी प्रपंच पाहात असूनही तो नाही असे मानीन. त्याचे अस्तित्व मानणार नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशी माझी मनस्थिती झाल्याशिवाय इतर काही जे जे मी करीन ते व्यर्थ कष्टदायक मात्र वाटेल मला ५

२९६८ विठ्ठला विठ्ठला । कंठ आळवितां फुटला ॥ १ ॥
कईं कृपा करिसी नेणे । मज दीनाचें धांवणे ॥ २ ॥
जाल्या येरझारा । जन्मां बहुतांचा फेरा ॥ ३ ॥
तुका म्हणे नष्टा । अबोलण्या तुझ्या चेष्टा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– येरझारा–खेपा, अबोलण्या–न बोलण्यासारख्या, धावणे–रक्षण

अर्थ :– अरे विठ्ठला, तुझे नाम घेता घेता, तुला हाका मारता मारता माझा कंठ फुटून गेला रे. १ तू माझ्यावर कधी कृपा करशील हे काही समजत नाही. मज गरिबाचे रक्षण तू कधी करशील ? २ मी पुष्कळ जन्माच्या खेपा करून तुझ्याकडे आलो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अरे नष्टा, तुझ्या या सर्व चेष्टा न सांगण्यासारख्या आहेत. ४

२९६९ ज्यासी विषयाचें ध्यान । त्यासी कैंचा नारायण ॥ १ ॥
साधु कैंचा पापीयासी । काय चांडाळासी काशी ॥ २ ॥
काय पतितासी पिता । काय अधमासी[1] गीता ॥ ३ ॥
तुका म्हणे निरंजनी । शठ कैंचा ब्रह्मज्ञानी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निरंजनी–मलरहित, शठ–लुच्चा, ठक, फसविणारा.

---

१ मद्यपासी.

अर्थ – ज्याच्या चित्तास नाना विषयाचे ध्यान असते त्याला नारायणाची प्राप्ती कशी काय होणार? १ जो पापी आहे त्याला साधुसंताची संगत कशी काय मानवणार? चांडाळाला काशीची यात्रा कशी घडणार? २ जो पतित आहे त्याला जगत्पिता परमेश्वराचा लाभ कसा होणार? अधमापुढे गीता सांगून काय उपयोग? ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो लुच्चा आहे तो मलरहित व ब्रह्मज्ञानी कसा होणार? ४

२९७० वरतें करोनियां तोंड । हाका मारितो प्रचंड ॥ १ ॥
राग आळवितो नाना । गातो काय तें कळेना ॥ २ ॥
आशा धरोनि मनी । कांहीं देईल म्हणऊनि ॥ ३ ॥
पोटा एका सांटीं । तुका म्हणे जाले कष्टी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – राग–संगीतामधील स्वराची विशिष्ट रचना.

अर्थः–उगाच वरती तोंड करून जो कुणी मोठमोठ्याने हाका मारीत असतो १ तो जरी गायनातील नाना राग म्हणत असला तरी त्यातील लोकांना काहीच समजत नाही. २ कारण त्या गाण्यात त्याचे मन नसते. गाणे ऐकून लोक आपल्याला काही देतील अशी इच्छा त्याच्या मनात असल्याने ते व्यर्थ होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे लोक एका पोटासाठी व्यर्थ कष्टी मात्र झाले आहेत. ४

२९७१ प्रपंच वोसरो । चित्त तुझे पायीं मुरो[1] ॥ १ ॥
ऐसें करिं गा पांडुरंगा । शुद्ध रंगवावे रंग ॥ २ ॥
पुरे पुरे आतां । नको दुजियाची सत्ता ॥ ३ ॥
लटिकें तें फेडा । तुका म्हणे जाय पीडा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः–वोसरो–लीन होवो, फेडा–दूर करा.

अर्थ – देवा, माझ्या मनात प्रपंचाविषयी असलेली भावना दूर व्हावी आणि माझे चित्त तुझ्या पायी लीन होवो १ पांडुरंगाने तुझ्या प्रेमाच्या रंगाने माझें चित्त रंगेल असे काही तरी तू करावेस. २ आता माझ्यावर दुसऱ्या कुणाचीही सत्ता चालू नये. अशी ही धरसोड आता पुरे झाली. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे काही खोटे आहे ते देवा, तुम्ही दूर करावे, म्हणजे त्यामुळे माझी पीडा दूर होईल ४

२९७२ ऐका कलीचें हें फळ । पुढें होईल ब्रह्मगोळ ॥ १ ॥
चारी वर्ण अठरा याती । भोजन करिती एके पंक्ती ॥ २ ॥
पूजिती असुरा रांडा । मद्य प्राशितील पेंढा ॥ ३ ॥
वामकवळ मार्जन । जन जाईल अध:पतन ॥ ४ ॥
तुका हरिभक्ति करी । शक्ति पाणी वाहे घरीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –ब्रह्मगोळ–गोलकार, सरमिसळ, चारी वर्ण–ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण, अठरा याती–तांबट, पाथरवट, लोहार, सुतार, सोनार, कासार, कुंभार, गुरव, धनगर, गवळी, वाणी, जैन, कोळी, साळी, चितारी, माळी, तेली, आणि रंगारी या अठरा पगड जाती, असुरा–भयंकर वृत्तीच्या, पेंढा–जोंधळ्यापासून काढलेली एक प्रकारची दारू, वामकवळ–डाव्या हाताने घास घेणे, मार्जन–पाण्याचे सिंचन, शिंपडणे.

---

[1] मरो.

अर्थ:- लोकहो, तुम्ही कलियुगाचे फळ नीटपणे ऐका. या कलियुगात सर्वत्र सवगोलंकार होईल. १ चार वर्ण आणि अठरा जाती एका पंगतीस भोजन करतील. २ भयानक वृत्तीच्या मांगांच्या स्त्रियांचे पूजन होत राहील आणि लोक त्यांच्या पूजेनंतरचे मद्य सेवन करतील. ३ डाव्या हाताने ग्रास घेण्याचे व मार्जन करण्याचे विधी जे करतात ते लोक अध पातास जातील. ४ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून तुम्ही फक्त श्रीहरीची भक्ती करावी, त्यामुळे शक्तिदेवता तुमच्या घरी पाणी भरीत राहील. ५

विवरण :-या अभंगात तुकोबाचा रोख शाक्त पंथाच्या आचारविचारावर दिसतो. शक्तीच्या उपासनेच्या निमित्ताने मद्य, मांस, मैथुन इत्यादी अनाचाराने शाक्तपंथात जो किळसवाणा प्रकार सुरू झाला होता त्याचे लोण महाराष्ट्रातही पोचले होते. 'मद्यभक्षण मांगिण जातीं । विटाळ चित्तीं सांठविला' अशा भाषेत तुकोबानी या शाक्तांना दोष दिलेला आहे. *या पंथीयांच्या विलक्षण आचाराचा वीट मराठी साधुसंतांना आलेला होता.* देवीच्या भक्तीस हे जे विकृत व समाजघातक असे रूप येत होते त्यास संतानी विरोध करून शुद्ध भक्तिमार्गाचा पुरस्कार केला.

२९७३ गुरुमार्गामुळें भ्रष्ट[1] सर्वकाळ । म्हणती याती कुळ नाहीं ब्रह्मीं ॥ १ ॥
पवित्राला म्हणती नको हा कंटक । मानिती आत्मिक अनामिका ॥ २ ॥
डोहोर होलार दासी बलुती बारा । उपदेशिती फारा रांडापोरा[2] ॥ ३ ॥
कांहीं टाण्या टोण्या विप्र शिष्य होती । उघडी[3] फजिती स्वधर्माची ॥ ४ ॥
नसता करुनी होम खाती एके ठायीं । म्हणती पाप नाहीं मोक्ष येणें ॥ ५ ॥
इंद्रियांचे पेठे भला कौल देती । मर्यादा जकाती माफ केली ॥ ६ ॥
नाहीं शास्त्राधार पात्रापात्र नेणे । उपदेशून घेणें द्रव्य कांहीं ॥ ७ ॥
तुका म्हणे ऐसे गुरु शिष्य पूर्ण[4] । विठोबाची आण नरका जाती ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :- आत्मिक-संबंधित, अनामिक-अंत्यजादी लोक, डोहोर-ढोर, कातडे रंगविणारी जात होलार-महार, माग इत्यादी जातींचे वाजंत्री वाजविणारे लोक, बलुती बारा-सुतार, लोहार, महार, माग, कुंभार, चांभार, परीट, न्हावी, भट, मुलाणा, गुरव आणि कोळी हे जुन्या काळातील गावगाड्याचे हक्कदार. याच्याकडे विविध कामे वाटून दिलेली असत. टाण्याटोण्या-काही जादुटोणा असेल तर, विप्र-ब्राह्मण

अर्थ – भोंदू गुरूंच्या मार्गामुळे शाक्त लोक नेहमीच भ्रष्ट झालेले दिसतात. परब्रह्माच्या ठिकाणी कसलाच यातिकुळात्मक भेद दिसत नाही असे हे म्हणतात. १ जे कुणी पवित्र व आचरणशील असतील त्यांना ते नीच समजून स्वत:पाशी येऊ देत नाहीत व जे कुणी अंत्यजादी जातींचे आहेत त्यांना मात्र संबंधित मानतात. २ कातडे रंगविणारे ढोर, महार, मांग व बारा बलुतदार यांच्या दासाना व त्यांच्यांतील रांडापोराना हे पुष्कळच उपदेश देतात ३ त्यांच्यापाशी जर काही जादुटोण्याचा प्रकार असला तर त्यांचे शिष्यत्व ब्राह्मण लोकही पत्करतात; आणि आपल्या धर्माची फजिती उघडउघड करतात. ४ एखाद्या ठिकाणी एखादा खोटाच होम करून त्या ठिकाणी सर्वजण एकत्र जमून काय वाटेल ते खातात, आणि वर म्हणतात, यात पाप काहीच नसून उलट मोक्षच यामुळे प्राप्त होईल. ५ इंद्रियांच्या व्यापारात यानी फारच मोकळीक घेतलेली असते. कसल्याही प्रकारच्या मर्यादारूपी जकातीची याना माफीच असते ६ त्यांच्या वर्तनाला कधी शास्त्राधार असत नाही, की कधी ते पात्रापात्र जाणत नाहीत; वाटेल त्याला हवा तसा उपदेश करून हे लोक द्रव्य मात्र लुबाडतात. ७ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे हे गुरुशिष्य विठ्ठलाची शपथ नरकास जातील असे समजा. ८

१ भ्रष्टले सकल, २ राडापोरे, ३ उघड, ४ जाण.

२९७४ बोलाचे[1] गौरव । नव्हे माझा हा अनुभव ॥ १ ॥
माझी हरिकथा माउली । नव्हे आणिकासी पागिली ॥ २ ॥
व्याली वाढविले । निजपदी निजविले ॥ ३ ॥
दाटली वो रसे । त्रिभुवन ब्रह्मरसे ॥ ४ ॥
विष्णु जोडी कर । माया रज वंदी हर ॥ ५ ॥
तुका म्हणे बळ । तोरडीं[2] हा कळिकाळ ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पागिली–अंकित झालेली, दाटली–भरून राहिलेली, हर–शिव, रज–धूळी, तोरडीं–तोडरीं–जिंकले आहे, वठणीस आणले आहे

अर्थ – हरिकथेचा गौरव मी केवळ शब्दानेच करितो असे नाही, तर त्याविषयी मला स्वत ला अनुभव आलेला आहे १ अशी ही माझी हरिकथामाऊली इतराच्या अंकित झालेली नाही, इतर साधनाच्या तत्राने वागणारी नाही २ तीच आम्हाला व्याली, तिने आम्हास जन्म दिला, तिने वाढविले आणि स्वत च्या पदावर तिनेच आम्हास बसविले ३ अशी ही माऊली प्रेमरसाने त्रिभुवनात भरून राहिलेली आहे ४ भगवान विष्णू हिला हात जोडतात आणि शिव हिच्या चरणावरील धूलिकणाना वदन करतात ५ तुकाराम महाराज म्हणतात, आणि ही हरिकथामाऊली एवढी बलवान आहे की ती प्रत्यक्ष कळिकाळासही वठणीवर आणते ६

२९७५ सेवट तो भला । माझा बहु गोड जाला ॥ १ ॥
आलो निजाच्या माहेरा । भेटो रखुमाईच्या वरा ॥ २ ॥
परिहार जाला । अवघ्या दु खाचा मागिल्या ॥ ३ ॥
तुका म्हणे वाणी । गेली आता घेऊ धणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भला–चागला, वरा–पतीस, परिहार–शेवट, नाश, धणी–तृप्ती

अर्थ – माझ्या आयुष्याचा शेवट फार चागला व गोड झाला १ कारण मी रखुमाईचा जो पती व माझा आईबाप त्याच्याकडे, माझ्या माहेरास मी येऊन पोचलो २ यामुळे मागील सर्व दु खाचा शेवट झाला ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझी वाणी त्या श्रीहरीकडे समर्पित झालेली असल्याने तृप्ती होईपर्यंत त्याचेच गुणगान करू ४

२९७६ तुझे नाम गाऊ आता । तुझ्या रगीं नाचो था था ॥ १ ॥
तुझ्या नामाचा विश्वास । आम्हा कैचा गर्भवास ॥ २ ॥
तुझे नामीं विसर पडे । तरी कोटी हत्या घडे ॥ ३ ॥
नाम घ्या रे कोणी फुका । भावे सागतसे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – था था–थैं थैं, थय थय

अर्थ – देवा, आम्ही आता तुझेच नामस्मरण करू, तुझेच नाम गाऊ आणि त्या प्रेमरगात थय थय नाचू १ तुझ्या नामावरच आमचा विश्वास आहे, तर मग आम्हाला गर्भवास कुठून घडणार ? २ तुझ्या नामाचा जर आम्हास विसर पडेल तर मला कोटी जीवाची हत्या घडो ३ तुकाराम महाराज म्हणतात, फुकटचे हरिनाम सर्वांनी घ्यावे असे मी मोठ्या भक्तिभावाने सागत आहे ४

---

१ बोलाचा, २ तोडरी

२९७७ वाइल तरी ऐसी व्हावी । नरकीं गोवी अनिवार ॥ १ ॥
घडो नेदी तीर्थयात्रा । केला कुतरा हातसोका ॥ २ ॥
आपुलींच करवी सेवा । पुजवी देवासारिखें ॥ ३ ॥
तुका म्हणे गाढव पशु । केला नाशु आयुष्या[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– गोवी–गुतवील, हातसोका–हातसवयीचा, आधीन झालेला

अर्थ – अनिवार अशा नरकामध्ये गुतवील अशी बायको बहुधा असते १ ती कधी नवऱ्याकडून तीर्थयात्रा घडू देत नाही त्याला आपल्यापाशी कुत्र्याप्रमाणे आधीन करून ठेविते २ ती नवऱ्याकडून स्वतःची सेवा करून घेते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने वागणारे जे कुणी लोक आहेत ते गाढवाप्रमाणे पशू होत त्यांनी आपल्या आयुष्याचा व्यर्थ नाश केला ४

२९७८ वाइले अधीन होय ज्याचें जिणे । तयाच्या अवलोकने पडिजे दाड ॥ १ ॥
कासया ते जत जिताती ससारी । माकडाच्या परी गारोड्याच्या ॥ २ ॥
बाइलेच्या मना येईल ते खरें । अभागी तें पुरे बाइलेचे ॥ ३ ॥
तुका म्हणे मेंग्या गाढवाचे जिणे ॥ कुतऱ्याचे खाणें लगबगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दाड–त्रास, कष्ट, जिताती–जिवत राहातात, जगतात, मेंग्या–मद बुद्धीच्या

अर्थ – ज्याचे सर्व जिणे बायकोच्या आधीन झालेले असते त्याच्या दर्शनानेच मला फार कष्ट होतात १ असे हे हीन जतू जगतात तरी कशासाठी ? त्याचे सर्व वागणे गारुड्याच्या माकडाप्रमाणे असते २ बायकोच्या मनात जे येईल तेच हा खरे मानतो, असा हा बाईलबुद्धीचा मनुष्य पूर्णपणे अभागी असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, मद बुद्धीच्या गाढवाप्रमाणे अशा माणसाचे जिणे असते कुत्र्याच्या लगबग खाण्याप्रमाणे याचे वागणे किळसवाणे असते ४

२९७९ जगीं मान्य केले हा तुझा देकार । कीं कांहीं विचार आहे पुढें ॥ १ ॥
करितों कवित्व जोडितो अक्षरे । येणे काय पुरें जाले माझे ॥ २ ॥
तोवरि हे माझी न सरे करकर । जो नव्हे विचार तुझ्या मुखें ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज पुडलिकाची आण । जरी कांहीं वचन करिसी मज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – देकार–देणगी, करकर–कटकट, वचन–फसवणूक

अर्थ – देवा, या जगतात माझी एवढी मान्यता वाढविलीत ही तुम्ही मला सेवेबद्दलची देणगी दिलीत की काय ? की आणखी काही विचार पुढे आहे ? १ शब्दाला शब्द जोडून मी काही कवित्व करीत असतो यापासून माझी काय पूर्णता झालेली आहे ? २ जोपर्यंत तू तुझ्या मुखान यासबधी काही खुलासा करीत नाहीस तोपर्यंत तुझ्यामागची माझी ही कटकट कधी सपणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात तू जर माझी काही फसवणूक करशील तर तुला भक्तश्रेष्ठ पुडलिकाची शपथ आहे ४

२९८० कोडिला गे माज । निरोधुनी द्वार । राखण ते बरे । येथें करा कारण ॥ १ ॥
हा गे हा गे हरि । फरिता सापडला चोरी । घाला गाठी धरी । जीवे माय त्रासाया ॥ २ ॥
तेंचि पुढें आड । तिचा लोभ तिला नाड । लावुनी चरफड । हात गोउनी पळावे[2] ॥ ३ ॥

---
१ आयुष्याचा, २ पळा वगी

संशयाचे बिरडे[1] । याचे निरसले भेटी । घेतली ते तुटी । आता घेता फावेल ॥ ४ ॥
तुका येतो काकुलती । वाउगिया सोड । यासीचि निवाड । आम्ही भार वाहिका ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – माज–आत, हृदयात, निरोधुनी–बंद करून, गोउनी–गुतवून, बिरडें–गाठ, निरसलें–सुटले

अर्थ – इंद्रियाची दारे बंद करून हृदयात या श्रीहरीला कोंडले असताना त्याचे रक्षण करणे हेच याच चागले असल्याने तेच करीत राहावे १ अगे, हा श्रीहरी चोरी करताना सापडला, आईला त्रास देणाऱ्या या श्रीहरीला जीवाने सभोवती धरून पकडले २ हा तिचा लोभच तिच्या आड येऊन त्याने तिला फसविले कारण या देवाने तिचे हात गुतवून तिला चरफडत ठेविले व आपण मात्र पळून गेला ३ तिच्या अंत:करणामध्ये संशयाची जी गाठ होती ती याच्या भेटीने सुटली अशा प्रकारचा संशय फिटल्यावरच त्याची प्राप्ती होते ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी काकुळतीस येऊन विनती करीत आहे की, ज्याचें वागणे वावगे आहे त्याना तू सोड आम्ही भारवाहक आहोत असा त्यानीच निवाडा केलेला आहे ५

२९८१ झड मारोनिया बैसलो पगती । उठविता फजिती दातयाची ॥ १ ॥
काय तें उचित तुम्हा का न कळे । का हो झाका डोळे पाडुरगा ॥ २ ॥
घेईन इच्छेचे मागोनि सकळ । नाहीं नव्हे काळ बोलायाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे जालो माना अधिकारी । नाहीं लोक परी लाज देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – झड–झेप, झडप

अर्थ – मी झेप घेऊन बळेच या पगतीस बसलो आहे आता येऊन मला उठविले तर जो अन्नदाता आहे त्याचीच फजिती होईल १ पाडुरगा, जे काय उचित आहे ते तुम्हास समजत नाही की काय ? तुम्ही उगाच डोळे झाकून का घेता ? २ मला जे माझ्या इच्छेस येईल ते मी आता मागून घेईन मिळणार नाही असे म्हणण्याचा काही हा काळ नव्हे ३ तुकाराम महाराज म्हणतात मी अशा प्रकारचा मोठा मान मिळविण्यासाठी अधिकारी झालो आहे याकरिता देवा मला लोकलाज नाही ४

२९८२ नाम न वदे ज्याची वाचा । तो लेक दो बापाचा ॥ १ ॥
हेचि ओळख तयाची । खूण जाणा अभक्ताची ॥ २ ॥
ज्यासी विठ्ठल नाहीं ठावा । त्याचा सग न करावा ॥ ३ ॥
नाम न म्हणे ज्याचे तोंड । तेंचि चर्मकाचे कुड ॥ ४ ॥
तुका म्हणे त्याचे दिवशीं । राड गेली महारापाशीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – चर्मकाचे–चामाराचे, कुड–कातडे भिजविण्याचे भाडे

अर्थ – ज्याची वाचा श्रीहरीचे नाम घेत नाही तो दोन बापाच्या पोटचा आहे असे समजावे १ अभक्ताची खूण ही अशीच आहे असे समजावे २ ज्याला श्रीविठ्ठल हे दैवत माहीत नाही त्याची सगत कधीही धरू नये ३ ज्याच्या मुखातून श्रीहरीचे नाम येत नाही ते चांभाराचे कातडे धुण्याचे, भिजविण्याचे कुड आहे असे समजावे ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या माणसाचा गर्भ ज्या दिवशी राहिला त्या दिवशी त्याची आई महारापाशी गेली होती ५

---

१ बिरुडें

२९८३ पतित मी पापी शरण आलो तुज । राखें माझी लाज पांडुरंगा ॥ १ ॥
तारियेले भक्त न कळे तुझा अंत । थोर मी पतित पांडुरंगा ॥ २ ॥
द्रौपदी बहिणी वैरीं[1] गांजियेली । आपणाऐसी केली पांडुरंगा ॥ ३ ॥
प्रल्हादाकारणे स्तंभीं अवतार । माझा का विसर पांडुरंगा ॥ ४ ॥
सुदामा ब्राह्मण दरिद्रे[2] पीडिला । आपणाऐसा केला पांडुरंगा ॥ ५ ॥
तुका म्हणे तुज शरण निजभावे[3] । पाप निर्दाळावे पांडुरंगा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – निजभावे–नि सीम भक्तीने, निर्दाळावे–नाहीसे करावे

अर्थ – पांडुरंगा, मी पापी असून पतित असून मी तुम्हास शरण आलो आहे माझी लाज तुम्हीच देवा, रक्षण करा १ पांडुरंगा, तुम्ही किती भक्ताचा उद्धार केलात यासंबंधी काहीच अंत लागत नाही मी मोठाच पतित आहे २ पांडुरंगा, तुमची बहीण द्रौपदी, हीस कौरवानी त्रास दिला तेव्हा तुम्हीच तिला आपणासारखी केली भर पंगतीत तिला चतुर्भुज करून तिच्या चोळीची गाठ बांधण्यास तुम्ही तिला स्वत प्रमाणे चार हात दिलेत ३ पांडुरंगा, प्रल्हादासाठी तुम्ही नरसिंहाच्या रूपाने खांबातून प्रकट झालात मग तुम्हाला माझाच का हो विसर पडला ? ४ तुमचा मित्र सुदामदेव दारिद्र्याने पीडून गेला होता पण त्याला तुम्ही आपल्यासारखेच श्रीमंत करून सोडले ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी भक्तिभावाने तुम्हास शरण आलो आहे पांडुरंगा, माझेही पाप तुम्ही नाहीसे करावे ६

२९८४ कस्तूरीचे रूप अति हीनवर । माजी असे सार मोल तया ॥ १ ॥
आणीक ही तैसीं चंदनाचीं झाडें । परिमळें वाढे मोल तयां ॥ २ ॥
काय रूपें असे परीस चांगला । धातु केली मोला वाढ तेणें ॥ ३ ॥
फिरंगी आटिता नये बारा रुके । गुणें मोले विकें सहस्रवरी ॥ ४ ॥
तुका म्हणे नाहीं जातीसवे काम । ज्याचे मुखीं नाम तोचि धन्य ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – फिरंगी–पोलादी तलवार, रुके–पया

अर्थ – कस्तुरीचे रूप वरवर पाहाता फारच वाईट दिसते, पण त्याच्यातच सुगंधाचे अतिशय मौल्यवान असे सार असते १ त्याचप्रमाणे आणखीही किती तरी चंदनाची झाडे आहेत, त्याच्या सुवासामुळे त्याना महत्त्व येते, त्याना मोल आले आहे २ परीस काय रूपाने चांगला असतो ? पण त्याच्या स्पर्शाने अगदी सामान्य धातूसही मोल चढते ३ चांगली पोलादी तलवार आटवून विकली तर तिच्या बारा पयाही येणार नाहीत, पण ती जशीच्या तशीच विकली तर आपल्या अंगच्या गुणाच्या जोरावर हजार रुपयाना विकली जाईल ४ तुकाराम महाराज म्हणतात येथे काही जातीचा संबंध नाही जो मुखाने हरिनाम घेईल तोच धन्य आहे ५

२९८५ नव्हें मी स्वतंत्र अंगाचा पाईक । जे हे सकळिक सत्ता वारूं ॥ १ ॥
तुम्हां आळवावे पाउला पाउलीं । कृपेची साउली करीं मज ॥ २ ॥
शक्तिहीन तरी जालो शरणागत । आपला वृत्तांत जाणोनिया ॥ ३ ॥
तुका म्हणे भवाभेणें धरिले पाय । आणीक उपाय नेणें[4] काहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंगाचा–स्वतंत्र पाईक–सेवक, दास, वारूं–निवारण करू भवाभेण–संसाराच्या भीतीमुळे

१ वैरियें गांजिली, २ दारिद्रे, ३ जीवेभावे, ४ नेणा

अर्थ– सर्व प्रपंचाची सत्ता स्वतःच्या बळाने निवारण करू, एवढ्या स्वतंत्र शक्तीचा मी काही सत्ताधारी नाही. मी केवळ सेवक आहे १ देवा, तुम्हास आम्ही पावलोपावली आळवावे हे आम्ही जाणतो, तरी तुम्ही माझ्यावर कृपेची छाया करावी. २ देवा, मी जरी शक्तिहीन झालो असलो तरी तुम्ही सर्व शक्तिमान आहात असे जाणून मी तुम्हास शरण आलो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या संसाराच्या भीतीने तुमचे पाय धरले आहेत याखेरीज दुसरा कुठलाही उपाय मी जाणीत नाही ४

२९८६ पाहों ग्रंथ तरी आयुष्य नाहीं हातीं । नाहीं ऐसी मति अर्थ कळे ॥ १ ॥
होईल तें हो या विठोबाच्या नावें । आचरलें[1] भावें जीवीं धरूं ॥ २ ॥
एखादा अंगासी येईल प्रकार । विचारितां फार युक्ति वाढे ॥ ३ ॥
तुका म्हणे आळी करितां गोमटी । मायबापा पोटीं येते दया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मति–बुद्धी, विचारिता–विचार करीत असताना, आळी–हट्ट, गोमटी–चांगली

अर्थ – अनेक प्रकाराचे ग्रंथ वाचावेत तर तेवढे आयुष्य आपल्या हाती नाही, त्याचा अर्थ धडपणे समजेल अशी बुद्धीही मला नाही १ यासाठी विठोबाचे नाम घेण्याने जे होईल ते होवो. ज्याचे आजवर चिंतन पूजन केले, तोच जिवाभावाने जतन करू. २ अनेक प्रकारचे विचार करीत असताना एखादा इष्ट असा विचार आपणास प्राप्त होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, मुलाने चांगला हट्ट धरला तर आईबापाना त्याच्याविषयी दया येतेच ४

२९८७ पाहातां रूप डोळां भरें । अंतर नुरे वेगळें ।
इच्छावशें खेळ मांडी । अवघे सांडी बाहेरी ॥ १ ॥
तो हा नंदानंदन बाइये । यासी काय परिचार यो ॥ २ ॥
दिसतो हा नव्हे तैसा । असे दिशाव्यापक ।
लाघव हा खोळेसाटीं[2] । होतां भेटी परतेना ॥ ३ ॥
म्हणोनि उभी ठालीयें । परतलीयें या वाटा[3] ।
आड करोनिया तुका । जो या लोकां दाखवितो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परिचार–सेवा, विचारपूस, लाघव–चातुर्य

अर्थ– या श्रीहरीचे रूप एकदम त्याला पाहाताच डोळ्यात भरते. मग अंतःकरण त्याच्याहून वेगळे उरतच नाही हा श्रीहरी आपल्या इच्छेनुरूप नाना प्रकारचे खेळ मांडीत असतो; व भक्ताच्या मनातील नाना विकार हा दूर करतो १ बायानो, असा हा नंदाचा पुत्र असून त्याची सेवा कशी कशी करावी हो ? २ हा जसा दिसतो तसा नाही, हा सर्व दिशाना भरून राहिलेला आहे नाना प्रकारच्या क्रीडा करण्यासाठी हा चातुर्य दाखवितो त्याची एकदा भेट झाली की पुनः त्याचा वियोग कधी होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून मी या वाटेला परतून उभी राहिले आहे मी येथे थांबून लोकाना वाट दाखवीत आहे ४

## कान्होबा देवाशीं भांडले ते अभंग ॥ ३७ ॥

२९८८ दुःखें दुमागलें हृदयसंपुष्ट । गहिवरें कंठ दाटताहे ॥ १ ॥
ऐसें काय केलें सुमित्रा सखया । दिलें टाकोनिया वनामाजी ॥ २ ॥
आक्रंदती बाळें करुणावचनीं । त्या शोकें मेदिनी फुटो[4] पाहे ॥ ३ ॥

१ अर्जिले ते भावे, २ खेळे साटीं, ३ साटीं, ४ कांपा

काय हें सामर्थ्य नव्हतें तुजपाशीं । सवें न्यावयासी अंगभूता ॥ ४ ॥
तुज ठावे आम्हा कोणी नाहीं सखा । उभयलोकीं तुका तुजविण ॥ ५ ॥
कान्हा म्हणे तुझ्या वियोगें पोरटीं । जालों दे रे भेटी बधुराया ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – सुमित्रा– चांगल्या मित्रा, मेदिनी–पृथ्वी

अर्थ – माझे हृदय दु खाने दुभंगून गेले आहे आणि कंठ गहिवराने दाटून येत आहे १ सख्या, सुमित्रा, तू मला या वनात टाकून देऊन असे का रे केलेस ? २ करुण वाणीने बालके येथे रडत आहेत त्यांच्या शोकाने पृथ्वी जणू फाटून निघत आहे ३ तुझेच अंगभूत असलेले आम्ही असून आम्हाला बरोबर न्यायला काय तुझ्यात सामर्थ्य नाही काय ? ४ तुक्या, बांधवा उभय लोकांत तुझ्याशिवाय मला दुसरा प्रिय सखा कुणी नाही हे तुला माहीत आहे ५ कान्होबा म्हणतात, बंधुराया, तुझ्या वियोगाने आम्ही पोरके झालो आहोत, म्हणून तू आम्हाला एकदा भेट दे ना. ६

२९८९ सख्यत्वासी गेलों करीत सलगी । नेणेंचि अभागी महिमा तुझा ॥ १ ॥
पावलों आपुलें केलेलाहेरास । निर्दैवा परिस काय होय ॥ २ ॥
कष्टविलासी म्या चाडाळें संसारीं । अद्यापिवरि तरि उपदेशीं ॥ ३ ॥
उचित अनुचित सांभाळिलें नाहीं । कान्हा[1] म्हणे काहीं बोलों आता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निर्दैवा–दुर्दैवी माणसास केलेलाहेरास–केलेल्या ह्रासास, ऱ्हास

अर्थ – तुकोबाराया, आम्ही तुझी किंमत ओळखली नाही रे सख्यत्वामुळे आम्ही तुझ्याशी सलगीने वागलो पण आम्ही अभागी लोकांनी तुझे मोठेपण कधीच जाणून घेतले नाही १ या वर्तनाचे दुर्दैवी फळ आम्हास पावले आहे दुर्दैवी लोकांना परिसाची किंमत काय असणार ? २ मी चांडाळाने संसारात तुला फारच कष्ट दिले आणि अद्यापपर्यंतही मी तुला उपदेश करीत होतो ! ३ कान्होबा म्हणतात, मी योग्य, अयोग्य कोणते, या विचाराने कधी वागलो नाही आता आणखी काय सांगावे ? ४

२९९० असो आता काहीं करोनियां ग्लाती । कोणा काकुलती येइल येथें ॥ १ ॥
करूं काहीं दिस राहें तों सायास । झोंबों[2] त्या लागास प्रावाझिये ॥ २ ॥
करिता[3] रोदना बापुडें म्हणती । परि नये अंतीं कामा कोणी ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे पडिलिया वनीं । विचार तो मनीं बोलिला हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ग्लाती–पश्चात्ताप, सायास–प्रयत्न, लागास–लाभास रोदना–रडल्यास

अर्थ – असो, आता झाल्या गोष्टीचा पश्चात्ताप करून काय उपयोग ? आता येथे आमच्याविषयी कुणास कधी कीव येणार आहे ? १ आपला भाऊ ज्या मार्गाने गेला त्या मार्गाचा लाभ करून घेण्यासाठी काही दिवस आपणही प्रयत्न करावेत २ उगाच रडत बसल्यास लोक बापुडा म्हणून कीव करतील, पण अंतकाळी कुणीही उपयोगी पडणार नाही ३ तुकयाचे बंधू कान्होबा म्हणतात, या वनामध्ये पडल्यानंतर जो विचार मनात आला तो मी बोलून दाखविला ४

२९९१ चरफडें चरफड शोकें शोक होये । कार्यमूळ आहे धीरापाशीं ॥ १ ॥
कल्पतसे मज ऐसें हें पाहाता । करावी ते चिंता मिथ्या खोटी ॥ २ ॥

१ तुका, २ झावें, ३ करिती रुदना बापुडीं

न चुके होणार साडिल्या शूरत्वा । फुकटचि सत्त्वा होईल हानी ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे दिल्या यद मना । वाचूनि निधाना न पवीजे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कल्पतसे–वाटतसे, निधाना–स्वसुखाच्या ठेव्याची

अर्थ – चरफडून काय होणार ? चरफडच वाढणार शोकाने शोकच वाढणार पण धीर धरल्यास मात्र कार्य होईल कार्याचे मूळ धीर हेच आहे १ अशा प्रकारे विचार करून पाहाता वाटते की, व्यर्थ चिंता करणे उगाच आहे २ शौर्य वा धीर सोडल्याने होणारी गोष्ट कधीच चुकत नाही तसे न केल्यास मात्र फुकटची सत्त्वहानी मात्र होईल ३ तुकयाबंधू म्हणतात, मनावर नियंत्रण ठेविल्याशिवाय स्वसुखाच्या ठेव्याची प्राप्ती होणार नाही ४

२९९२ न लगे चिंता आता अनुमोदन हाता । आले मूळ भ्राता गेला त्याचे ॥ १ ॥
घरभेद्या येथें आहे ते[1] सुकानु । धरितो कवळून पाय दोन्ही ॥ २ ॥
त्याचे त्याचिया मुखें पडिले ठावे । न लगे सारावे मागें पुढें ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे करील भेटी भावा । सोडीन तेधवा या विठ्ठला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भ्राता–भाऊ, सुकानू–ज्याच्या हातात सुकाणू सव सूत्रे आहेत असा

अर्थ – आता कशाचीच चिंता करायला नको कुणाचे अनुमोदनही घ्यायला नको मला माझा भाऊ का गला याचे कारण समजले १ ज्याच्या हातात सर्व सूत्रे आहेत असा तो देवच या ठिकाणी घरभेद करणारा असून त्याच्याच पायास मिठी मारून मी बसलो आहे २ हे त्याचेच कृत्य असल्याचे मला त्याच्याच तोंडाने समजले आता याबाबतीत मागपुढे करण्याची गरज नाही ३ तुकयाबंधू म्हणतात, हा विठ्ठल जेव्हा माझ्या भावाची भेट घडवून आणील तेव्हाच मी त्याच्या पायाना मारलेली मिठी सोडून देईन ४

२९९३ मूळस्थळ ज्याचे गोमतीचे तीरीं । तो हा सारी दोरी खेळवितो ॥ १ ॥
ऐसे हे कळले असावे सकळा । चोर त्या वेगळा नाहीं दुजा ॥ २ ॥
वैष्णव हे[2] हेर तयाचे पाळती । खूण हे निरुती सांगितली ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे आले अनुभवास । तेणेंच आम्हास नागविले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोमती–डाकूर येथील तीर्थाचे नाव निरुती–खरीखुरी

अर्थ — ज्याचे निवासस्थान गोमतीच्या तीरावर आहे तोच सर्वांना नाचविणारा सूत्रधारी परमेश्वर आहे १ असे हे सर्वांना कळले असावे त्याच्याशिवाय दुसरा चोर कुणीच नाही २ वैष्णव हे हेर असून त्याच्या पाळतीवर असतात त्यानीच ही खरीखुरी खूण मला सांगितली ३ तुकयाबंधू म्हणतात, हीच गोष्ट माझ्याही अनुभवास आली असून त्यानेच आम्हास फसविले आहे ४

२९९४ बरा ते निर्गुणा नष्ट नारायणा । घरबुडवणा भेटलासी ॥ १ ॥
एके घरीं कोणी कोणासी न धरी । ऐसी अपरापरी केली आम्हा ॥ २ ॥
कान्हा म्हणे का रे निष्काम देखिले । म्हणोनि मना आले करितोसी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – अपरापरी–दुर्दशा, वाताहत

अर्थ – नारायणा तू निर्गुण असूनही अतिशय निष्ठुर आहेस आमचे घर बुडविणारा बरा तू आम्हास भेटलास १ एकाच घरात कुणी कुणाचा विश्वास अथवा संबंध धरीत नाहीत, अशी तू आमच्या घराची दुर्दशा केलीस २ कान्होबा म्हणतात तुला आम्ही निष्काम म्हणून पाहिले म्हणून काय मनास येईल त्याप्रमाणे तू करावेस ? ३

---

१ तो, २ वैष्णव हे रे तयाच

२९९५ धांदिधांदि[1] तुझ्या करीन धिंदिड्या । ऐसें काय वेड्या जाणितलें ॥ १ ॥
केली तरी बरें मज भेटी भावास । नाहीं तरि नास आरंभिला ॥ २ ॥
मरावें मारावें या आलें प्रसंगा । बरें[2] पांडुरंगा कळलेंसावें ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे तुझी माझी उरी । उडाली न धरीं भीड कांहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— धांदिधांदि-फजिती, चिंधडे, धिंदिड्या-चिंधड्या, सावें-अवघे, सर्व, उरी-मर्यादा

अर्थ – तुझी फजिती करून मी तुझ्या कीर्तीच्या चिंधड्या करून टाकीन. वेड्या देवा, तू आमचे असे काय जाणले आहेस रे ? १ माझी व माझ्या भावाची भेट घडवून आणलीस तर बरे, नाही तर मी असा नाश करायला निघालोच आहे २ पांडुरंगा, आता हा प्रसंग असा आहे की, आपण तरी एक मरावे, नाही तर तुला तरी मारावे, हे आता आम्हास सर्व काही चांगले समजून आले आहे ३ तुकयाबंधू म्हणतात, देवा, तुमची व आमची आता काही मर्यादा राहिली आहे असे नाही म्हणून मी काही तुमची भीड धरणार नाही ४

२९९६ भुक्ति मुक्ति तुझें जळो ब्रह्मज्ञान । दे माझ्या आणोनी भावा वेगीं ॥ १ ॥
रिद्धी सिद्धी मोक्ष ठेवीं गुंडाळून । दे माझ्या आणोन भावा वेगीं ॥ २ ॥
नको आपुलिया नेऊं वैकुंठासी । दे माझ्या भावासी आणुन वेगीं ॥ ३ ॥
नको होऊं कांहीं होसील प्रसन्न । दे माझ्या आणून भावा वेगीं ॥ ४ ॥
तुकयाबंधु म्हणे पाहा हो नाहींतरी । हत्या होईल शिरीं पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :— भुक्ती-भोग, वेगीं-त्वरेने, लौकर

अर्थ :— नाना भोग, मुक्ती आणि ब्रह्मज्ञान या तुझ्या गोष्टींना आग लागो अगोदर तू माझ्या भावाला लौकर आणून दे १ ऋद्धीसिद्धी आणि मोक्ष यांना गुंडाळून ठेव व माझ्या भावाला आधी तू लौकर आणून दे २ त्याला व मला हवे तर तुझ्या वैकुंठातही नेऊ नकोस अगोदर माझ्या भावाला आणून दे ना ३ तुला जर प्रसन्न व्हायचे नसेल तर नको होऊस, पण आधी माझ्या भावास आणून दे ४ तुकयाबंधू म्हणतात, पांडुरंगा, यासंबंधी तू नीट विचार कर, नाही तर माझ्या हत्येचा दोष तुझ्या शिरावर येईल. ५

२९९७ *मुख्य आहे आम्हां मातेचा पटंगा । तुज पांडुरंगा कोण लेखी ॥ १ ॥*
नको लावूं आम्हां सवें तूं तोवरी । पाहा दूरवरी विचारूनी ॥ २ ॥
साहे संतजन केले महाराज । न घडे आतां तुज भेईन मी ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे अइक्यें ऐक्यता । वाढतें[3] अनंता दुःखें दुःख ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मातेचा-साधुसंताचा, पटंगा-आश्रय पाठिंबा, सवें-सवय, विचारूनी-विचार करून, भेईन-भिईन

अर्थ – साधुसंतरूपी मातेचा आम्हास मुख्यत्वेकरून आश्रय आहे मग पांडुरंगा, तुला कोण किंमत देणार ? १ जोपर्यंत या संतांचा आधार आम्हांस आहे तोपर्यंत तू आम्हास तुझी सवय लावू नकोस नीट दूरवर विचार करून पाहा ना २ संतजन हे महाराज हे मी आपल्यास साहाय्यभूत करून घेतले आहेत आता मी तुला भिईन हे कधीच घडणार नाही ३ तुकयाबंधू म्हणतात, अनंता, एकीने एकी वाढते आणि दुःखाने दुःख वाढते. ४

२९९८ नये सोमसरी उपचाराची हरी । करकरेचे करीं काळें तोंड ॥ १ ॥
मागतो इतुकें जोडूनियां कर । ठेऊनियां शीर पायांवरी ॥ २ ॥

१ धिंद धिंद, २ बरें पांडुरंगा पाहातांसी, ३ वाढे त्वरा

तुम्हां आम्हां एके ठायीं सहवास । येथें द्वैत द्वेष काय बरा[1] ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे बहुतां बहुतां रीती । अनंता विनंती परिसावी हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सोम–सौम्य, सरो–बरोबरी, करकरेचें–किरकिरीचे, कटकटीचे, परिसावी–ऐकावी.

अर्थ :– श्रीहरी, सौम्य उपचारांना बरोबरी नसल्याने या कटकटीचे तोंड काळे होईल असे कर. १ हात जोडून आणि पायांवर मस्तक ठेवून मी इतकेच मागीत आहे. २ देवा, तुमचे व आमचे वास्तव्य एकाच ठिकाणी आहे म्हणून येथें द्वैत अथवा द्वेष बरा आहे का ? ३ तुकयाबंधू म्हणतात, अनंता, बहुत रीतींनी मी तुम्हांस ही विनंती करीत आहे, ती तुम्ही ऐका. ४

२९९९ लालुचाईसाटीं वळकाविसी भावा । परी मी जाण देवा जिरों नेदीं ॥ १ ॥
असों द्या निश्चय हा मनीं मानसीं । घातली येविशीं दृढ कास ॥ २ ॥
मज आहे बळ आळीचें सबळ । फोडीन अंत्राळ हृदय तुझें ॥ ३ ॥
करुणारसें तुकयाबंधु म्हणे भुलवीन । काढूनि घेईन निज वस्तु ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लालुचाईसाठी–लोभासाठी, आळी–हट्ट, अंत्राळ–आकाश.

अर्थ :– काही लोभासाठी माझ्या भावास तू वळकावलेस काय ? पण देवा, मी ही गोष्ट काही तुला पचू देणार नाही हे नीट समज १ तुम्ही आपल्या मनात निश्चय असा ठेवा की, मी यासंबंधी दृढ मनाने कास कसली आहे. २ हट्ट करण्याचे सबळ बळ माझ्याजवळ असल्याने मी त्या योगें तुझे हृदयरूपी आकाश फोडीन. ३ तुकयाबंधु म्हणतात, करुणेच्या रसाने तुझ्या हृदयास मी भुलवीन व मी आपली निजवस्तू तुजपासून काढून घेईन. ४

३००० तुझीं वर्में आम्हां ठावीं नारायणा । परी तूं शाहाणा होत नाहीं ॥ १ ॥
मग कालाबुली हाका देते वेळे । होतोसि परी डोळे नुघडिसी ॥ २ ॥
जाणोनि अज्ञान करावें मोहरें । खोटी खोडी हे रे तुझी देवा ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे कारण प्रचीति । पाहातों वेळ किती तेच गुण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कालाबुली–कासाविसी, करावें मोहरें–दर्शविता, कारण–कार्य

अर्थ :– नारायणा, तुझी सर्व वर्मे आम्हांस आता माहीत झाली आहेत. तरी पण तू काही शहाणा होत नाहीस. १ तुला हाक मारली की तू फार कासावीस होतोस. पण तुझे काही डोळे उघडत नाहीत. २ देवा, तुम्ही सर्व काही जाणता. पण अज्ञान दर्शविता, ही तुझी फार वाईट खोड आहे ३ तुकयाबंधू म्हणतात, अशी ही तुझ्या एकंदर कृत्याची प्रचिती आहे कित्येक दिवस मी तुझे हेच गुण पाहात आहे. ४

३००१ अवघीं तुज बाळें सारिखीं नाहीं तें । नवल वाटतें पांडुरंगा ॥ १ ॥
म्हणतां लाज नाहीं सकळांची माउली । जवळी धरिलीं[2] एकें दुरी ॥ २ ॥
एकां सुख द्यावें घेऊनि वोसंगा । एक[3] दारीं गळा श्रमविती ॥ ३ ॥
एकां नवनीत पाजावें दाटून । एकें अन्न अन्न करितील ॥ ४ ॥
एकें वाटतील न वजावीं दुरी । एकांचा मत्सर जवळी येतां ॥ ५ ॥
तुकयाबंधु म्हणे नावडतीं त्यांस । कासया व्यालास नारायणा[4] ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– वोसंगा–मांडीवर, नवनीत–दूधलोणी, न वजावी–न जावीत

१ खरा, २ धरियेली, ३ एकें, ४ पांडुरंगा.

अर्थ – पांडुरंगा, तुझी सर्व मुले तुला सारखी वाटत नाहीत, याचे मला फार नवल वाटते १ मी सर्वांची आई आहे असे म्हणताना तुला लाज कशी रे वाटत नाही ? काहींना तू जवळ केलेस व काहींना दूर धरलेस २ कित्येकाना तू मांडीवर घेऊन सुख देतोस, तर कित्येकाना आपल्या दारात आक्रोश करायला लावून दमवितोस ३ कित्येकाना वळातेच दूधलोणी पाजतोस आणि कित्येकाना अन्न अन्न करायला तू लावले आहेस ४ कित्येकांविषयी तुला असे वाटते की, त्यांनी दूर जाऊ नये, आणि कित्येक जवळ येताच तू त्याचा मत्सर करितोस ५ तुकयाबंधू म्हणतात, नारायणा, जी तुझी नावडती आहेत त्याना तू जन्म तरी का रे दिलास ? ६

३००२ निनाव हें तुला । नाव साजें रे विठ्ठला ।
बरा शिरविला । फाटक्यामध्यें पाव ॥ १ ॥
काहीं तरी विचारिले । पाप पुण्य ऐसे केले ।
मुरळें घातले । एकाएकीं भावासी ॥ २ ॥
मुद्राधारण माळा टिळे । बोल रसाळ कोंवळे ।
हातीं फाशाचे गुडाळे । कोण चाळे गृहस्था हे ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे मिस्किन । करितोसी देखोन ।
पाहा दुरिवरी विच्छिन्न । केला परी ससार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निनाव–नाव नसलेला, निर्गुणनिराकार, पाव–पाय, विचारिले–विचार केला, मिस्किन–वाहेरून गरीब पण आतून लुच्चा

अर्थ – विठ्ठला, तुला नाव नाही, तू निनाव आहेस हे तुला फार शोभून दिसते अशा रीतीने फाटक्यामध्ये पाय तू बरा गुतवला आहेस १ अशा प्रकारे तू जे पापपुण्य केले आहेस त्याचा काही तरी विचार केला आहेस का ? माझ्या भावास एकाएकी असी तू मुरळ घातलीस २ नाना मुद्रा धारण करणे, टिळेमाळा करणे, रसभरीत असे मृदू भाषण करणे, आणि हातात फाशाचे गुडाळे घेणे, गृहस्था, असे हे चाळे कशासाठी रे ? ३ तुकयाबंधू म्हणतात, देवा, तू जाणूनबुजून लुच्चेगिरी करतोस आमच्या ससाराची सर्व पागापाग झाली आहे, याचा तू दूरवर विचार कर ना ४

३००३ नाहीं घटिका म्हणसी । लाग लागला तुजपाशीं ।
पडिला हृषीकेशी । जाब सकळ करणें ॥ १ ॥
माझें नेले पाघरण । ठावे असोन दुर्बळ दीन ।
माणसामधून । उठविले खाणोन्या ॥ २ ॥
आम्हीं हें जगऊनि होतो पाणी । सदीं देवदेव करूनि ।
जालासी कोठोनि । पेंदा चोरा देहाच्या[1] ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे केले । उघडें मजचि उमगिले ।
ऐसे काय गेलें । होतें तुज न पुरतें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घटिका–वेळ, लाग–माग, खाणोन्या–खाणाऱ्या चोरा, जगवूनी–वाजवून, पाणी–हात, टाळधा, सदीं–सधी

अर्थ – हृषीकेशी, तुझा माग आता आम्हांला सापडला आहे आता घटकेचा वेळ नाही असे म्हणशील तर ते काही चालणार नाही आता सर्व जबाबदारी तुझ्याकडेच आहे १ देवा, मी दीन व दुर्बळ आहे असे तुम्हांस

[1] देवाच्या

माहीत असतानाही तुम्ही मासे पाषाण नेलेत अरे खाणाऱ्या चोरा, तू असे मला माणसातून उठविलेस. २ आम्ही देव देव असे तुझ्या नावाने भजन करून टाळचा वाजवीत होतो, तोच तू संधी साधून देहाच्या ठिकाणी चोरासारखा कुठून तरी प्रकट झालास. ३ तुकयाबंधू म्हणतात, अशा प्रकारे तू आम्हास उघडे केलेस हे समजले. देवा, तुला पुरणार नाही असे काय रे तुझ्या जवळचे गेले होते ? ४

३००४ कनवाळ कृपाळ । उदार दयाळ मायाळ ॥
म्हणवितोसी परि केवळ । गळेकाटू दिसतोसी ॥ १ ॥
काय केले होते आम्हीं । सांग तुझें एकये जन्मी ।
जालासी जो स्वामी । एवढी सत्ता करावया ॥ २ ॥
भलेपणाचा पवाडा । बरा दाविला रोकडा ।
करुनि बंधु वेडा । जोडा माझा विखंडिला ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे भला । कैसे म्हणताती तुजला ।
जीव आमुचा नेला । अंत पाहिला कांहींतरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– पवाडा–कीर्ती, रोकडा–प्रत्यक्ष, उघड करून, विखंडिला–हिरावून नेला, ताटातूट केली.

अर्थ:– देवा, तू मोठा कनवाळू, कृपाळू, उदार, दयाळू, ममताळू आहेस असे स्वत:ही समजतोस पण मला तर तू केवळ गळाकापू दिसतोस. १ तू दिलेल्या या एका जन्मात आम्ही तुझे काय केले होते ते सांग ना. की तू एवढी सत्ता आमच्यावर गाजवायला लागलास. स्वामी होऊन राहिलास आमचा ? २ तुमच्या चांगलेपणाची कीर्ती तुम्ही लोकात चांगल्या प्रकारे उघडी करून दाखविली माझ्या भावास स्वत:च्या नादी लावून, वेडे करून आम्हा बंधूंच्यात चांगलीच ताटातूट तुम्ही केलीत ३ तुकयाबंधू म्हणतात, तुला चांगले कसे म्हणावे ? तू तर आमचा जीव घेऊन गेलास. यासंबंधी आमचे काय होईल हे काहीही पाहिले नाहीस. ४

३००५ आतां कळों आले गुण । अवघेचि यावरोन ।
चोखट लक्षण । धरिलें हे घरघेणें ॥ १ ॥
या नावें कृपासिंधु । म्हणवितोसी दीनबंधु ।
मज तरी मंदु । दिसतोसी पाहाता ॥ २ ॥
अमळ दया नाहीं पोटीं । कठीण तैसाचि कपटी ।
अंधळ्याची काठी । माझी गुदरसीच ना ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे पुरता । नाहीं म्हूण बरे अनंता ।
एरवीं असतां । तुझा घोट भरियेला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चोखट–चागले, मंद–कपटी, ढोंगी, गुदरसी–नाहीशी केलीस

अर्थ: – आता यावरून तुझे गुण चांगलेच समजून आले. तू जो हा चांगुलपणा धारण केला आहेस ते तुझे घर घेण्याचेच लक्षण मोठे चांगले आहे १ दीनबंधू, कृपासिंधू या नावानी तू स्वत:स म्हणवून घेतोस पण नीट पाहू गेलो तेव्हा तू मला मात्र पक्का कपटी दिसतोस. २ तुझ्या पोटात थोडीसुद्धा दयामाया नाही, तू कठीण हृदयी असून कपटीही आहेस. माझी आंधळ्याची काठी तू नाहीशी केलीस ना ? हिरावून नेलीस ना ? ३ तुकयाबंधू म्हणतात, तू आम्हाला पूर्ण घोट घेता येईल इतका मोठा नाहीस, नाही तर मी तुझा घोट घेतला असता. ४

३००६ काय सांगों हृषीकेशा । आहे अनुताप आला ऐसा ।
गिळायासी निमिषा । निमिष लागों नेदावें ॥ १ ॥
माझें बुडविलें घर । लेंकरें बाळें दारोदार ।
लाविलीं काहार । तारातीर करोनि ॥ २ ॥
जीव घ्यावा किंवा द्यावा । तुझा आपुला केशवा ।
इतुकें उरलें आहे । भावाचिया निमित्यें ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे जग । बरें वाईट म्हणो मग ।
या कारणें परी लाग । न संडावा सर्वथा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निमिष–क्षण, काहार–आक्रोश, तारातीर–ताडातोडी, ताटातूट.

अर्थ :– हृषीकेशा, काय सांगू रे ? अशा प्रकारचा अनुताप मला झालेला आहे. खरे म्हणजे आमचे पाप गिळायला तुला एक क्षणवेळील लागू नये. १ पण उलट माझे घर तू बुडविलेस, मुलाबाळांना दारोदार पाठविलेस, सर्वांचीच ताटातूट होऊन आक्रोश करायला लावलेस. २ केशवा, माझ्या भावासाठी मी जीव द्यावा किंवा तुझा तरी घ्यावा, एवढेच बाकी आता उरले आहे. ३ तुकयाबंधू म्हणतात, जग मग मला या करण्यामुळे बरे म्हणो की वाईट म्हणो. मी काही तुझा या कामी पाठलाग कधीच सोडणार नाही. ४

३००७ मायबाप निमाल्यावरी[1] । घातलें भावाचे आभारीं ।
तो ही परि हरी । तुज जाला असमाई ॥ १ ॥
हे कां भक्तिचे उपकार । नांदतें विध्वंसिलें घर ।
प्रसन्नता व्यवहार । सेवटीं हे जालासी ॥ २ ॥
एका जिवावरी । होतों दोनी कुटुंबारी ।
चाळवूं तो तरीं[2] । तुज येतो निर्लज्जा ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे भला । आणीक काय म्हणावें तुला ।
वेडा त्यानें केला । तुजसवें संबंधु ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निमाल्यावरी–मरण पावते वेळी, आभारीं–पदरात, असमाई–असह्य, चाळवूं– फसविलेस.

अर्थ :– आईबापांनी मरण पावतेवेळी मला भावाच्या पदरी घातले. पण श्रीहरी, हेही तुला असह्य झाले ? १ देवा, आम्ही तुझी भक्ती केली त्याचेच हे उपकार की काय ? चांगले नांदते असणारे आमचे घर विध्वंसून टाकले. असा तू प्रसन्नतेचा व्यवहार का केलास ? २ एकाच जीवावर आमची दोनही कुटुंबे अवलंबून होती; पण त्या माझ्या भावाला निर्लज्जा, तू फसविलेस तरी कसे ? ३ तुकयाबंधू म्हणतात, असा तू फार चांगला आहेस ! आणखी आम्ही काय तुला म्हणावे ? आमचा भाऊच वेडा म्हणून त्याने तुमच्याशी संबंध केला ना ! ४

३००८ पूर्वी पूर्वजांची गती । हेचि आईकिली होती ।
सेवे लावूनि श्रीपती । निश्चिती केली तयांची ॥ १ ॥
कां रे पाठी लागलासी । ऐसा सांग हृषीकेशी ।
अद्यापवरी[3] न राहासी । अंत पाहासी किती म्हूण ॥ २ ॥

१ मौनल्यावरी, २ उरी, ३ अद्याप तरी.

जन्मजन्मांतरीं दावा । आम्हां आपणां केशवा ।
निमित्य चालवा । काईसयास्तव हें ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे अदेखणा[1] । किती होसी नारायणा ।
देखों सकवेना । खातयासी न खात्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अदेखणा–न पाहणारा, आंधळा.

अर्थ :– आमच्या पूर्वीच्या पूर्वजाची गती अशीच ऐकिली होती की, तू श्रीपती त्यांना आपल्या सेवेस लावून त्यांची निश्चिती केलीस १ हृषीकेशी, असा आमच्या पाठीशी का रे लागलास ? ते साग एकदा. अजूनही तू स्वस्थ राहात नाहीस किती म्हणून तू असा अंत पाहाणार आहेस ? २ केशवा, जन्मजन्मातरीचा असा हा दावा तुमच्या-आमच्यात आहे. कशासाठी उगाच आपले निमित्त चालविता ? ३ तुकयाबंधू म्हणताल, मत्सराने तू आंधळा तरी किती होणार आहेस रे ? न खाणारा असा तू असल्यामुळे तुला कुणी खाणार असेल तर पाहावत नाही. ४

३००९ निसुर संसार करून । होतों पोट भरून ।
केलो विवसी निर्माण । देवपण दाखविलें ॥ १ ॥
ऐसा काढियेला निस । काय म्हूण सहित वंश ।
आणिलें शेवटास । हाउस तरी न पुरे ॥ २ ॥
उरलों पालव्या सेवटीं । तें ही न देखवे दृष्टी ।
दोघांमध्यें तुटी । रोकडीचि पाडीली ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे गोड । बहु जालें अति वाड ।
म्हणोनी कां बुड । मुळचांसहित खावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निसुर–निष्काळजी, निश्चित, विवसी–पिशाच, निस–निवाडा, निर्णय, वाड–मोठे, थोर.

अर्थ :– निश्चितीने चागला पोटभर संसार करून सुखाने रहात होतो. पण देवपण दाखवून एक नवेच पिशाच मात्र निर्माण करण्यात आले. १ त्यानी असा निकाल केला काय ? की, आमचा सर्व वंश नाहीसा केला, सर्व काही अखेरीस येऊन ठेपले, तरी त्याची हौस काही फिटत नाही. २ शेवटी आम्ही पाल्याप्रमाणे उरलो, तेही त्याला डोळ्यानी पाहावले नाही, उघड उघड आम्हा दोघा भावात त्याने कायमची तुटी निर्माण केली ३ तुकयाबंधू म्हणतात, एखादे झाड मोठे व गोड झाले म्हणून काय त्याच्या मुळच्या बुडासहित खाव्यात की काय ? ४

३०१० बरा जाणतोसी धर्मनीती । उचित अनुचित श्रीपती ।
करूं येते राती । ऐसी डोळे झांकूनि ॥ १ ॥
आतां जाब काय कैसा । देसी तो दे जगदीशा ।
आणिला बोळसा । आपणां भोंवता ॥ २ ॥
सेवेचिया सुखास्तव । बळें धरिले अज्ञानत्व ।
येइल परि हा भाव । ज्याचा त्यासी कारणा ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे नाहीं । आतां आम्हां बोल कांहीं ।
जडोनियां पायीं । तुझे त्वांचि घेतलें ॥ ४ ॥

---

[1] न देखणा.

शब्दार्थ व टीपा – राती–रात्र, वोळसा–भोवरा

अर्थ – श्रीपती, तू उचित व अनुचित आणि खरी धर्मनीती चागली जाणतोस म्हणून तुला डोळे झाकून अशी रात्र करता येते १ जगदीशा आता तू याचा भाव कसा काय देशील ? ते साग तुझ्या भोवती मी हा असा प्रश्नाचा भोवरा निर्माण केला आहे २ भक्ताकडून सेवेचे सुख घेता यावे म्हणून बळेच तू हे अज्ञानपण धारण केले आहेस पण भक्ताचा जसा भाव असेल तसा तो त्याला फलद्रूप होईल ३ तुकयाबधू म्हणतात, आता आमच्याकडे काही बोल नाही, तू स्वत मिळवून तुझे तूच घेतले आहेस ४

३०११ काहीं विपत्ति अपत्या । आता अमुचिया होता ।
काय होईल अनता । पाहा बोलो कासया ॥ १ ॥
बरें अनायसे जाले । सायासेविण बोले चाले ।
काबाड चुकले । केले कष्टावेगळें ॥ २ ॥
बरा सापडलासी वोजा । वर्मावरी केशीराजा ।
बोलायासी तुझा । उजुरचि नाहींसा ॥ ३ ॥
तुकयाबधु म्हणे दगा । बरा दिला होता वागा ।
झडकरी चलागा[1] । चाग दैवे पावलो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अपत्यां–मुलाना, काबाड–परिश्रम, वोजा–सहज, उजुरचि–सबब सागण्याजोगा, वागा–वाघाच्या गजराने

अर्थ – अनता, आता आमच्या मुलाना काही विपत्ती आल्यास काय होईल ? ते तूच पाहा ना मी कशाला बोलू ? १ अनायासे हे बरे झाले बोलण्याचालण्याच्या सायासावाचून हे परिश्रम सपून आम्हास तू कष्टावेगळे केलेस २ केशीराजा, तू आता बरा सहजासहजी सापडला आहेस तू असा वर्मी सापडलेला असल्यामुळे तुला सबब सागण्यासारखे काही उरलेलेच नाही ३ तुकयाबधू म्हणतात, चागला वाघाच्या गजराने तू आम्हास दगा दिला होतास आता लौकर चल ना तुझे दैव चागले म्हणून मी तुला सापडलो आहे ४

३०१२ देवा तुजपें माझ्या पूर्वजाचे ऋण । आहे तें का नेदिसी अझून ।
अवगलासी झोडपणें । परी मी जाण जीवे जिरो नेदीं ॥ १ ॥
फळो येईल रोकडें । उभा करिन सतापुढें ।
तुझें काय एवढें । मय आपुलें मागता ॥ २ ॥
आजिवरी होतो नेणता । तो तुज फावले रे अनता ।
कवडीचा तो आतां । पडो नेदीन फेर ॥ ३ ॥
ठेविला ये जीवनीं जीव । म्हणे तुकयाचा बधव ।
माझा गळा तुझा पाव । एके ठायीं बाधेन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तुजपें–तुझ्याजवळ, अवलगासी–स्वच्छदपणे वागतोस, झोडपणे–दाडगेपणाने, निलाजरेपणाने, फेर–फरक

अर्थ – देवा, तुझ्यापाशी आमच्या पूर्वजाचे भक्तिऋण फार मोठे आहे ते तू अजून का परत करीत नाहीस ? उगाच स्वच्छदपणे का वागतोस ? दाडगेपणाने का वागतोस ? पण मी तुला काहीही जिरू देणार नाही हे तू नीटपणे जाण १ जेव्हा मी तुला सतापुढे उभा करीन तेव्हा तुला प्रत्यक्ष अनुभव येईल आम्ही आमचाच हिशेब मागताना

[1] चलागा

दिसतोसी बरा बोल कोंवळे । गुण मंदाचे चाळे ।
दिसताती ये वेळे । काय करूं विसंबोनि ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे देखतां । अंध बहिर ऐकतां ।
कैसें व्हावें आतां । इतकियाउपरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – फिके–पोकळ, व्यर्थ, सरता–माघार घेणे, मंदाचे–कपटी माणसाचे

अर्थ – आता तुला हे कधी सुटणार नाही की चुकणार नाही उगाच व्यर्थ बोलून का दवडतोस ? मी, माझे संबधित लोक व जन धाना या कामाच्यासाठी सोडून दिले आहे १ आता या ठिकाणी माघार घेणे चालले नाही तू आपले दिवाळे काढून बसला आहेस हे तुझे लक्षण आम्हास समजले आहे २ तू दिसायला चांगला आहेस तुझे भाषणही मृदू व कोवळे आहे, पण तुझ्या अंगचे चाळे मात्र कपटी माणसाचे दिसतात तेव्हा अशा वेळी तुझ्यावर विसबून मी काय करू ? ३ तुकयाबधू म्हणतात, देवा, तू पाहात असतानाही आंधळा आहेस, आणि ऐकत असतानाही बहिरा आहेस आता इतक्याउपर आमचे होणार तरी कसे ? ४

३०१८ तिही ताळीं हेचि हाक । म्हणती पांढरा स्फटिक ।
अवघा बुडविला लौकिक । मुखेंचि भीके[1] लाविलीं ॥ १ ॥
थोटा नांव शिरोमणी । नाहीं जोडा त्रिभुवनीं ।
म्हणोनि शाहाणे ते कोणी । तुमे दारीं बैसतिना ॥ २ ॥
निर्गुण निलाजिरा निनांवा । लंड झोंड कुडा देवा ।
नागवणा[2] या नांवा । वांचूनि दुजा नाइकों ॥ ३ ॥
सर्वगुणें संपन्न । कळो आलासी संपूर्ण ।
तुकयाबंधु म्हणे चरण । आतां जीवें न सोडीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तिहीं ताळीं–तीन लोकात, थोंटा–कुभाडी, ठक, लंड–दाडगा, झोड–लुच्चा, कुडा–वाईट

अर्थ :– तुझ्यासंबधी देवा, तीनही लोकात हीच प्रसिद्धी आहे की, तुला पाढरा स्फटिक म्हटले जाते लोकांचा सर्व लौकिक तू बुडविलास. सुखाने संसारात असलेल्याना तू भिकेस लावलेस १ ठक लोकात तू शिरोमणी शोभतोस त्रिभुवनात तुला जोडीदार कुणीच नाही म्हणून जे कुणी शहाणे आहेत ते तुझ्या दारात कधी बसत नाहीत २ देवा, तू निर्गुण आहेस, निलाजरा, निनावा, दाडगा, लबाड व वाईट आहेस लोकाना नागविणार तुझ्याशिवाय दुसरा कुणीही ऐकलेला नाही ३ तुकयाबधू म्हणतात, तू सर्वगुणसंपन्न असून परिपूर्ण आहेस हे समजून आल्यामुळे मी आता तुझे चरण जीव गेला तरी सोडणार नाही ४

३०१९ तोचि प्रसंग आला सहज । गुज धरितां नव्हे काज ।
न संडितां लाज । पुढें वोज न दिसे ॥ १ ॥
तूं तर न होसी शाहाणा । नये सांगतों तें ही मना ।
आपण आपणा । आतां प्रयत्न देखावा ॥ २ ॥
न पुरवी पाहातां वाट । द्यावें प्रमाण[3] चोखट ।
कास घालूनियां नीट । चौघाचार करावा ॥ ३ ॥
आतां श्रमाचें कारण । नव्हे व्हावें उदासीन ।
न पडे तयाविण । गांठी तुकयाबंधु म्हणे ॥ ४ ॥

१ भीक लागली, २ नागविसी रूपनावा, ३ प्रमाणाचे खट

शब्दार्थ व टीपा – गुज–गुप्त, काज–कार्य, वोज–भले, चागले, चोखट–चागला, चौचार–पचायती-मधील विचार.

अर्थ – आता तुझ्यासबधी काही गुप्त ठेवून आपले कार्य होणार नाही असे सहजच प्रसगावरून ध्यानात आले आता जर आम्ही लाज सोडली नाही तर पुढे काही चागले दिसत नाही १ देवा, तू तर काही शहाणा होत नाहीस आणि मी जे काही सागतो तेही तुझ्या मनास येत नाही तेव्हा आपणच आपली सोय पाहाण्याचा प्रयत्न करावा २ आम्ही तुझी कितीही वाट पाहिली तरी तू कधी मनातील इच्छा पूर्ण करीत नाहीस तेव्हा आता निर्धाराची कास बळकटपणे घालून चारचौघात चागला निवाडा करून घ्यावा ३ तुकयाबधू म्हणतात, आता प्रयत्न करण्याचाच प्रसग आलेला आहे उदासीन राहून काही चालणार नाही, कारण त्याशिवाय गाठ पडणारच नाही ४

45994

३०२० हळूहळू जाड । होत चालिले लिगाड ।
जाणवेल निवाड । न करिसी परी पुढे ॥ १ ॥
मी तो सांगून उतराई । जालो[1] आता तुज काई ।
कळो येईल भाई । तैसा करीं विचार ॥ २ ॥
मागे युगे अठ्ठाविस । जालीं दिवसाचा दिवस ।
मुदल व्याज कासावीस । होसी देवा ये कामें ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे राखे । आतां टाकीं तुझी तीं सुखे ।
जगजाहिर ठाउके । जाले नाहीं खंडलेसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जाड–भरपूर, लिगाड–लचाड, कटकट

अर्थ – आता हळूहळू हे कर्जाचे लचाड भरपूरपणे वाढतच चालले आहे त्याचा तू जर निकाल लावला नाहीस तर पुढे ते तुला चागलेच जाणवेल १ तुला जे काही सागायचे आहे ते मी सागून आता उतराई झालो आहे, भाई, आता तुला जसे समजेल त्याप्रमाणे तू विचार कर २ दिवसादिवसाचा हिशेब करताना अशी अठ्ठावीस युगे उलटून गेली पण देवा, मुद्दल व व्याज याचा हिशेब पूर्ण करण्याविषयी तू फारच कासावीस होत आहेस ३ तुकयाबधू म्हणतात, तू आता आपली सर्व सुखे टाकून दे तू आपले ब्रीद धारण कर अजून तुझामाझा व्यवहार संपत आला आहे, हे जगजाहीर झालेले नाही ४

३०२१ पत्र उचटिलें प्रेत्नें । ग्वाही कराया[2] कारणें ।
नाहींतरी पुण्यें । तुझ्या काय उणे आम्हा ॥ १ ॥
नाव तुझेचि करोनि । आहों सुखें पोट भरोनि ।
केली जाणवणी । म्हणउनि नाहीं म्हणसील ॥ २ ॥
आता इतकियाउपरी । दे नको भलतें करीं ।
म्हणती ऋणकरी । आमुचा इतके उदंड ॥ ३ ॥
तुकयाबंधु जागा । अळवावया पांडुरंगा ।
केला कांहीं मागायाची नव्हती गरज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पत्र–पुराव्याचा लेख, उचटिले–शोधून काढिले, उदड–पुष्कळ

अर्थ – भक्कम पुरावा मिळावा म्हणूनच हा लेख आम्ही शोधून काढला नाही तर तुझ्या पुण्याईने आम्हाला काय कमी आहे रे ? १ तुझ्याच नावावर अजून आम्ही सुखाने पोट भरून आहोत, पुढे कधी नाही

[1] आला, [2] करावया

म्हणशील म्हणून तुला जाणीव करून दिली इतकेच २ आता इतके करूनही काही दे अथवा देऊ नकोस हवे ते तू कर तुला आमचा ऋणकरी म्हणशील इतकेही पुष्कळच आहे ३ तुकयाबंधू म्हणतात, पांडुरंगा, तुला जागे करण्यासाठीच आम्ही एवढी आळवणी केली काही मागावे अशी आमच्या मनात इच्छा नाही ४

३०२२ माझ्या भावे केली जोडी । न सरेसी कल्पकोडी ।
आणियेले धाडी । घालुनि अवघे वैकुंठ ॥ १ ॥
आता न लगे यावे जावे । कोठें काहींच करावे ।
जन्मोजन्मीं खावे । सुखे बैसोनसे जाले ॥ २ ॥
असख्य सख्या नाहीं पार । आनदें दाटल अबर ।
न मावे अपार । त्रिभुवनीं साटविता ॥ ३ ॥
अवघें भरले सदोदित । जाले सुखाचे पर्वत ।
तुकयाबधु म्हणे परमार्थ । धन अद्‌भुत सापडले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–प्राप्ती, अबर–आकाश

अर्थ – माझ्या भावाने ज्या लाभाची प्राप्ती करून घेतली आहे ती कोटचावधी कल्पानीही सपणारी नाही अवघ्या वैकुंठावरच घाला घालून त्याने श्रीहरीस भूलोकी आणले आहे १ आता कुठे जावे याचे अथवा काही कर्म करावे असे राहिले नाही जन्मोजन्मी सुखाने बसून खावे इतके प्राप्त झाले आहे २ ज्याची सख्येने मोजदाद करवत नाही अशा अपार आनदाने आकाश भरून गेले आहे हा अपार आनद त्रिभुवनात साठविला तरी तो तेथे मावत नाही ३ तुकयाबधू म्हणतात, अशा प्रकारे सुखाचे पर्वत सदोदित भरून परिपूर्ण आहेत असे हे परमार्थरूपी धन मला अद्‌भुत रीतीने सापडले आहे ४

३०२३ आता चुकले देशावर । करणे अकरणे सर्वत्र ।
घरासी आगर । आला सकळसिद्धींचा[1] ॥ १ ॥
जालो निधाई निधानें । लागले अनतगुणरत्न ।
जन्माचे विच्छिन्न । दु ख जाले दारिद्र ॥ २ ॥
तारू सागरिचे अवचिते । हेदोवले आले येथें ।
ओढिले सचितें । पूर्वदत्तें लाधले[2] ॥ ३ ॥
तुकयाबधु म्हणे सीमा । नाहीं आमुचिया दैवा ।
आला पुरुषोत्तमा । ऐसा सवदागर सापडला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – देशावर–देशान्तर, आगर–साठा, ठेवा, निधाई–धन्य, कृतार्थ, निधानें–साठा प्राप्त झाल्याने, हेदोवलें–हेलकावून, सवदागर–व्यापारी

अर्थ – आता यापुढे देशांतराला जाणे अथवा काही करणे, न करणे हे सगळे सपले आहे कारण सर्व प्रकारच्या सिद्धींचा साठाच आमच्या घरास येऊन पोचला आहे १ या प्रकारच्या अलौकिक साठ्याच्या प्राप्तीने मी कृतार्थ झालो आहे अनत गुणाची रत्ने या साठ्यामध्ये असल्यामुळे आमचे अनेक जन्माचे दु ख व दारिद्रच नाहीसे झाले आहे २ सागरावरील तारू आकस्मिक रीतीने लाटांनी हेलकावून आमच्या ठिकाणी आले पूर्वसचिताच्या उदयामुळे याचा लाभ आम्हास झाला आहे ३ तुकयाबधू म्हणतात, आता आमच्या भाग्यास सीमा नाही कारण पुरुषोत्तमासारखा व्यापारी आम्हास लाभलेला आहे ४

१ सिद्धाचा २ लागले

३०२४ सांपडलें जुनें । आमुच्या वडिलांचें ठेवणें ।
केली नारायणें । कृपा पुण्यें पूर्वींचिया ॥ १ ॥
सुखें आनंदरूप आतां । आम्ही आहों याकरितां ।
निवारली चिंता । देणें घेणें चुकलें ॥ २ ॥
जालें भांडवल घरिंचें । अमुप नाम विठ्ठलाचें ।
सुकृत भावाचें । हें तयानें दाविलें ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे फिटला । पांग नाहीं बोलायला ।
चाड दुसरी विठ्ठला । वांचूनियां आणीक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– ठेवणें–मौल्यवान साठा, ठेवा, सुकृत–पुण्याई, पांग–दारिद्र्य, चाड–इच्छा.

अर्थ – आमच्या वडिलांचे जे जुनेंपुराणे असे परमार्थाचे ठेवणे होते ते आम्हास सापडले कारण या नारायणाने पूर्वपुण्याईच्या बळाने आमच्यावर ही अशी कृपा केली १ म्हणून आम्ही आता मोठ्या सुखाने आनंदरूप आहोत आमची सर्व चिंता निवारण झाली आहे सर्व देणेंघेणें आमचे चुकते झाले आहे २ विठ्ठलाच्या असंख्य नामाचे भांडवल आता आमच्या घरी साठलेले आहे आमच्या भावाचे पुण्यकृत्य आम्हास त्यायोगे समजून आले, किंवा भावाच्या पुण्याईमुळे आम्हांस नामाचे हे भांडवल प्राप्त झाले ३ तुकयाबंधू म्हणतात, आता सर्व प्रकारचे दारिद्र्य संपून गेले आहे एका विठ्ठलाशिवाय दुसरे काही बोलायची इच्छाच मनात काही उरलेली नाही ४

विवरण :– वरील सदतीस अभंग तुकोबांचे धाकटे बंधू कान्होबा यांचे असून ते त्यांनी तुकोबांच्या निर्याणानंतर केलेले दिसतात. मागे नाटाचे अभंग (क्र. ६६५ ते ६७१) याच तुकयाबंधू कान्होबांनी केलेले आपण पाहिले आहेत. आता या ठिकाणी तुकोबांच्या या कनिष्ठ भावाने तुकोबांच्या निर्याणानंतर जो अपरंपार शोक केला आणि आपला भाऊ परत मिळावा म्हणून देवाशी जो मजेदार व उत्कट असा प्रीतिकलह केला त्याचे मोठे रेखीव व हृदयभेदक वर्णन या अभंगातून आले आहे. यातील पहिले दोन अभंग स्वतःलाच उद्देशून केलेले दिसतात. पुढे मात्र अभंगक्रमांक २९९४ पासून कान्होबांनी ईश्वरास बोल दिलेला दिसतो आपला बंधू हिरावून नेणाऱ्या श्रीहरीस त्यांनी अत्यंत कटू शब्दांनी जाब विचारला आहे यातील कारुण्य, यातील बंधुप्रेम आणि यातील श्रीहरीवरील निष्ठा अनन्यसाधारण अशीच आहे.

तुकोबाचे हे धाकटे बंधू कान्होबा प्रथम प्रथम तुकोबांना विरोध करीत त्यांच्याशी भांडून वेगळेच निघाले होते. तुकोबांचे सारे लक्ष ईश्वराच्या भजनात असल्याने त्यांच्या संसाराचा भार बंधू कान्होबांवर पडू लागला. हे कान्होबांना मानवले नाही, म्हणून ते वेगळेपणाने संसार करू लागले परंतु पुढे तुकोबांचा अधिकार वाढला, त्यांच्या भक्तीचा सुगंध सर्वत्र दरवळू लागला तेव्हा कान्होबांच्या मनातील अढी दूर झाली तेही तुकोबांचा महिमा मानू लागले. तुकोबांच्या चौदा प्रमुख टाळकऱ्यांत कान्होबांची गणना होत राहिली. तुकोबांच्या निर्याणानंतरच्या वरील अभंगात क्रमांक २९८९ च्या अभंगाने कान्होबांनी आपण प्रपंचात असताना आपल्या बंधूंना उगाच त्रास दिला असल्याची कबुली देऊन पश्चात्तापही व्यक्त केलेला आहे. 'कष्टविलासी म्यां चांडाळें संवसारीं–' असा उल्लेख करून त्यांनी आपल्या मनाची व्यथा व्यक्त केली आहे. आईबाप निवर्तल्यानंतर आपणास याच बंधूचा आधार होता पण चांगले नांदणारे घर विध्वंसून टाकायचे हाच त्या श्रीहरीचा उद्योग असल्याने त्याने आपल्या भावास नेले अशी तक्रार त्यांची आहे. 'माझें बुडविलें घर । लेंकरेंबाळें दारोदार । लाविली फाहार । तारातीर करनी', 'आक्रंदती बाळें करुणावचनीं । या शोकें मेदिनी फुटों पाहे', 'माझें नेलें पांघरुण । ठायें असोन दुर्बळवीण । माणसांमधून खाणोन्या' अशा शब्दांनी हृदयास पाझर फोडणारा शोक कान्होबांनी

केलेला आहे. रागाच्या भरात त्यानी विठ्ठलास नाना प्रकारचे वडवट शब्दही वापरले आहेत, नष्टा, दुष्टा, खाणोऱ्या, निर्गुणा, निलाजरा, निनावा, ठक, झोड, मुंडा, गळेकाटू, इत्यादी अपशब्दानी कान्होबानी जरी श्रीहरीला बोल दिला आहे तरी रागाचा भर ओसरल्यावर 'तुम्हा आम्हा एके ठायीं सहवास। तेथें द्वैत द्वेष काय वरा ?' असा सामोपचाराचा विचारही त्याना सुचलेला दिसतो. 'भुक्तीमुक्ती तुझें जळो ब्रह्मज्ञान। दे माझ्या आणून भाव येगी,' 'उभा करिन सतापुढे,' 'गाठ पडली कुणब्यासवे,' 'जीव घ्यावा किंवा द्यावा' 'धींदधींद तुझ्या करीन धींदड्या', 'हत्या होईल शिरीं पांडुरंगा' अशा प्रकारे एकेरीवर येऊन बोलणारे कान्होबा शेवटी शेवटी 'सर्वगुणें संपन्न। कळों आलासी संपूर्ण। तुकयाबंधु म्हणे चरण। आता जींवें न सोडी' अशा अनन्यावर आलेले आहेत. आपण आता आनंदरूप आहोत, आता कसलीही चिंता मनात नाही, सर्व प्रकारचे दारिद्र्य नष्ट झाले, आता विठ्ठलावाचून दुसरे काहीही नको असे तृप्ततेचे उद्गारही त्यानी शेवटी काढलेले आहेत अभंगक्रमांक ३०१३ मधील 'धरणें हो विवत तेरा। माझ्या भावे घेतले' हा उल्लेखही लक्षणीय आहे नाटाचे अभंग, आशीर्वाद, ललित, गौळणी इत्यादीवरून कान्होबाची कीर्ती वारकरी परंपरेत अजूनही आहे 'वचन ऐके कमळापती। माझी रकाची विनती॥ कर जोडितो कथा काळीं। आपण असावे जवळी॥ घेई घेई ऐसी भाक। जरी कां मागेन आणीक॥ तुकयाबंधु म्हणे देवा। शब्द तुकाचि राखावा' (अभंगक्रमांक ४८३) यासारख्या त्याच्या अभंगात तुकोबाच्या उत्कटतेची व प्रसादाची छाप स्पष्टपणे अनुभवास येणारी आहे 'तूंचि मायबाप बंधु सखा आमुचा' (अभंगक्रमांक ४८६), 'केला अंगीकार पंढरीच्या देवें' (अभंगक्रमांक ४९१), 'गाऊं टाळी रंगी नाचों उदास' (अभंगक्रमांक ४८८) इत्यादी अभंगातून कान्होबाच्या उत्कट भक्तीचे दर्शन होण्यासारखे आहे 'पाहा हो कलिचें महिमान' (अभंगक्रमांक ३०३५) हाही अभंग 'तुकयाचा सेवक' कान्होबा याचाच असल्याचे आपण पाहाणार आहोत पुढील बारा अभंगही तुकारामबंधूचेच आहेत

३०२५ काम क्रोध अहंकार नको देहीं। आशा तृष्णा माया लज्जा चिंता काहीं।
वास पंढरीचा जन्म सदा देईं। आणीक दुजें मागणें तुज नाहीं॥ १॥
कृपा देईं दान हरि मज कृपा देईं दान। नासीं त्रिमिर दाखवी चरण।
आर्त पुरवावे भेटी देऊन। नको उपेक्षूं आलिया शरण॥ २॥
नाम अखंड हृदयीं राहो वाणी। न पडो विसर क्षण ज्यागृति स्वप्नीं।
संतसमागम ऐसा दे लावुनि। आणीक दुजें कांहीं नेणें तुजवाचूनि॥ ३॥
पंथपुरिचा रविसुत पुरे आता। आड करावा भवसिंधु ऐसा नव्हता।
नाहीं आडताळा त्रैलोक्यामाजी सरता। विनवी तुकयाबंधु चरणीं ठेवूनि माथा॥ ४॥

शब्दार्थ व टीपा – दुजें–दुसरे, त्रिमिर–अज्ञानाचा अंधार, आर्त–इच्छा, रविसुत–सूर्याचा पुत्र यम, आडताळा–अडथळा

अर्थ–देवा, काम, क्रोध, अहंकार, आशा, तृष्णा, माया, लज्जा, चिंता इत्यादी विविध विकार माझ्या देहाच्या ठिकाणी राहू देऊ नकोस. आणि मला अनेक जन्म पंढरपूरचा निवास होईल असे कर यावेरीज दुसरे काही मी तुला मागीत नाही १ श्रीहरी, तू मला अशा कृपेचे दान दे माझ्यातील अज्ञानरूपी अंधार दूर करून देवा, तुझे चरण मला दाखीव अशी माझी इच्छा तू भेट देऊन पूर्ण करावीस शरण आलेल्याची उपेक्षा तू करू नकोस २ तुझे नाम माझ्या हृदयात व मुखात अखंडपणे असावे त्याचा विसर जागेपणी अथवा स्वप्नातही कधी पडू नये, आणि अशाच अवस्थेतील संताचा समागम लावून दे मला, कारण ते तुझ्यावाचून दुसरे काहीच जाणीत नाहीत ३ तुकयाबंधू म्हणतात, सूर्यपुत्र जो यम त्याच्या गावी जाण्याचा रस्ता मला आता नको हा भवसागर तुम्ही जणु तो नव्हताच असा दूर करा कारण सबंध त्रैलोक्यात तुम्हाला कुणी अडथळा करील असे नाही. अशी ही विनंती मी तुमच्या चरणावर मस्तक ठेवून करीत आहे ४

३०२६ तटाचे जातीला नाहीं भीड भार । लाता मारी थोर लाहान नेणे ॥ १ ॥
परी त्या विशेष मनुष्य होऊनि । करी खड मान वडिलांचा ॥ २ ॥
बेरसा गाढव माया ना वहीण । भुंके चवीविण भलतेंचि ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे बोकड मातले । न विचारी[1] आपुले तोंडीं मुते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– तटाचे–गाढवाच्या, बेरसा–विचारशून्य

अर्थ – गाढवाच्या जातीला कुणाचीच कधी भीडभाड वाटत नाही लहानथोर न जाणून ते कुणालाही लाथा मारीत असते १ पण माणसाच्या जन्मास येऊनही जो वडील माणसाचा मान खडित करतो तो गाढवाहूनही विशेष होय २ आपली मायबहीण न जाणता तो विचारशून्यतेने गाढवाप्रमाणे हीन रुचीने शिवीगाळ करीत असतो. ३ तुकायाबधू म्हणतात, माजलेले बोकड अविचारी बनून प्रसगी आपल्याच तोडात देखील मुतत असते. ४

३०२७ मायझवा खर गाढवाचें बीज । तें ऐसें सहज कळों येतें ॥ १ ॥
आपमानिलें जेणें श्रेष्ठाचें वचन । तेचि त्याची खुण ओळखावी ॥ २ ॥
मद्यपी तो पुरा अधम यातीचा । तया उपदेशाचा राग वायां ॥ ३ ॥
तुकयाबधु म्हणे पिसाळलें सुनें । आप पर तेणें न विचारावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– खर–गाढव, दुष्ट, अधम–दुष्ट, यातीचा–जातीचा, सुनें–कुत्रे, न विचारावें–विचार करीत नाही

अर्थ :– पुढीलप्रमाणे ज्याचे वागणे असते तो मात्रागमनी असून त्याचे बीज गाढवाचे आहे असे सहजच समजून येण्यासारखे आहे १ ज्याने श्रेष्ठ साधुसताच्या वचनाचा धिक्कार केलेला असतो त्याची खूण वरील लक्षणावरून ओळखावी २ असा मनुष्य दुष्ट जातीचा असून मद्य पिणारा असतो त्याला जर कुणी उपदेश करायला गेले तर त्यावरच तो व्यर्थ रागावतो ३ तुकयाबधू म्हणतात, पिसाळलेले कुत्रे कधी आपले–परक्याचे असा विचार करीत नाहीं, तसेच अशा अधम माणसाचे असते ४

३०२८ मत्स्यकूर्मशेषा कोणाचा आधार । पृथिवीचा भार वाहावया ॥ १ ॥
काय धाक आम्हां कासयाची चिंता । ऐसा तो असतां साहाकारी ॥ २ ॥
शंखचक्रगदा आयुधें अपार । वागवितो भार भक्तांसाटीं ॥ ३ ॥
पांडवां जोहरी राखिलें कुसरी । तो हा बंधुचा कैवारी तुकयाच्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– मत्स्य–मासा, कूर्म–कासव, शेष–एक नाग, जोहरीं–लाक्षागृहातून, कुसरी–कौशल्याने,

अर्थ :– मत्स्य, कूर्म व शेष हे सर्व पृथ्वीचे ओझे वाहातात; मग त्याना आधार कुणाचा असतो ? १ असा जो परमेश्वर त्याचे साह्य आम्हाला असताना कसलाही धाक वाटण्याचे कारण नाही. कसलीही चिंता नको. २ शख, चक्र, गदा ही याची आयुधे अगणित असून अशा शस्त्राचे ओझे श्रीहरी आपल्या भक्तासाठी वागवीत आहे. ३ तुकयाबधू म्हणतात, लाक्षागृहातून ज्या श्रीहरीने मोठ्या कौशल्याने पाडवाचे रक्षण केले तो हा देव तुकारामांच्या बंधूचा कैवारी आहे ४

३०२९ राम म्हणतां कामक्रोधाचें दहन । होय अभिमान देशधडी ॥ १ ॥
राम म्हणता कर्म तुटेल भवबंधन । नये श्रम सीण स्वप्नास ही ॥ २ ॥

[1] विचारिता

राम म्हणता जन्म नाहीं गर्भवास । नव्हे दारिद्रास पात्र कधीं ॥ ३ ॥
राम म्हणता यम शरणागत बापुडे । आढळ पद पुढे काय तेथें ॥ ४ ॥
राम म्हणता धर्म घडती सकळ । तिमिरपडळ नासे हेळा ॥ ५ ॥
राम म्हणता म्हणे तुकयाचा बंधु । तरिजेल भवसिंधु संदेह नाही ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – दहन–जळणे, तिमिरपडळ–अज्ञानाच्या अंधाराचा पडदा, हेळा–एका क्षणात

अर्थ – रामाचे नाम घेताच कामक्रोधादी विकार जळून जातात आणि देहाचा अभिमान देशोधडीस जातो १ रामनामाच्या योगाने कर्माचे व संसाराचे बंधन सुटेल आणि श्रम स्वप्नातही होणार नाहीत २ रामनामाच्या उच्चाराने गर्भवासाचे व जन्माचे दुःख नाहीसे होईल व कोणतेही दारिद्र्य मग कधी येणार नाही ३ रामनामाच्या उच्चारावरोबर यम बापडा शरण येतो या रामनामापुडे अढळपदाची किंमत काहीच नाही ४ रामनामाच्या योगाने सर्व प्रकारचे धर्म घडतील आणि अज्ञानाच्या अंधाराचा पडदा एका क्षणात दूर होईल ५ तुकयाबंधू म्हणतात, रामनामाच्या योगाने भवसिंधू तरून जाता येईल यात कसलाही संशय नाही ६

३०३० मरोनि जाईन गुणनामावरूनि । तुझ्या चक्रपाणी मायबापा ॥ १ ॥
चुकविलीं दुःखें मायेचा वोळसा । तोडोनिया आशापाश तेणे ॥ २ ॥
केली काया तनु हिंवसी शीतळ । चिंतातळमळ नाही ऐसी ॥ ३ ॥
काळे तोंड काळ करूनि राहिलें । भूतमात्र जालें सज्जनसखे ॥ ४ ॥
तुकयाबंधु म्हणे अवघ्या दशदिशा । मुक्त रे परेशा तुझ्या पुण्यें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वोळसा–भोवरा, फेर, काया तनु–शरीर, हिंवसी–तापलेली, परेशा–श्रेष्ठ परमेश्वरा

अर्थ – चक्रपाणी, मायबापा, मी तुझ्या नामरूपावरून जीव ओवाळून टाकीन १ कारण तुझ्या या नामरूपानेच माझी दुःखे दूर केली आणि मायेच्या भोवऱ्यातून मला वाचविले यानेच मला आशापाशातून मुक्त केले २ माझा देह त्रिविध प्रकारच्या तापानी तप्त झाला होता तो यानेच शीतल करून माझ्या मनातील चिंता व तळमळ नाहीशी केली ३ याच्यामुळेच प्रत्यक्ष काळही काळे तोंड करून राहिला व सर्व प्राणिमात्र मला सोयऱ्या-प्रमाणे व मित्राप्रमाणे झाले ४ तुकयाबंधू म्हणतात, देवा, श्रेष्ठ परमेश्वरा, सर्वांच्या पलीकडे असणाऱ्या श्रीहरी, तुझ्यामुळे मला सव दशदिशा मुक्त झाल्या आहेत ५

३०३१ आता मागतो तें ऐक नारायणा । भावपूर्वक मनापासूनिया ॥ १ ॥
असो दे मोकळी जिव्हा जरि गाइल गुण । नाहीं तरी खिळुन टाकी परती ॥ २ ॥
मातेचिया परी देखती परनारी । ठेवीं नेत्र तरी नाहीं तरि नको ॥ ३ ॥
तरी बरे काटाळा करिती निंदास्तुतीचा । नाहीं तरि कानाचा ही देख प्रेत्न ॥ ४ ॥
सकळ इंद्रियाचा निग्रह करूनि एक । राखावी पृथक तोडोनि भ्रम ॥ ५ ॥
तुकयाबन्धु म्हणे तेचि वाट प्राणा । पडता नारायणा विसर तुझा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – खिळुन–उखडून, पृथक–वेगळी

अर्थ – नारायणा, मी मनापासून व भावपूर्वकपणाने असे पुढील मागणे तुझ्यापाशी मागत आहे १ माझी जीभ जर तुझेच गुणगान करीत असेल तर ती मोकळी असू दे नाही तर ती उखडून टाकलीस तरी चालेल २ परस्त्रियाकडे मातेसमान पाहाणारे डोळ असतील तरच ते ठेव, नाहीतर त्याची मला जरूरी नाही. ३ निंदास्तुती ऐकण्याचा कटाळा असेल तरच कानाचा उपयोग, नाहीतर त्याचीही गत वरीलप्रमाणेच व्हावी ४ सर्व इंद्रियांचा निग्रह करून त्याचे तू रक्षण करावेस संसारभ्रम तोडून त्याना वेगळेच ठेवावे ५ तुकयाबंधू म्हणतात, नारायणा, माझ्या प्राणास जर तुझा विसर पडत असेल तर त्याचीही वरीलप्रमाणेच तू वाट लाव ६

३०३२ नमस्कारी भूतें विसरोनि याती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ १ ॥
परउपकारीं वेचियेल्या शक्ती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ २ ॥
द्वैताद्वैतभाव नाहीं जया चित्तीं । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ ३ ॥
जयाचिये वाचे नये निंदास्तुती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ ४ ॥
उचित अनुचित जाणे धर्मनीती । दृढ भाव भक्ति मानव तो ॥ ५ ॥
तुकयाबंधु म्हणे वरकड ते येर । संसाराचे खर भारवाही ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – भूतें–विविध प्राणी याती–जाती येर–इतर, खर–गाढव

अर्थ – जातिभेदाचा विचार मनात न आणता जो विविध प्रकारच्या प्राणिमात्राना नमस्कार करतो त्यानेच खरी आत्मस्थिती जाणली आहे असे समजावे त्यालाच आत्मानुभव आला आहे असे जाणावे १ ज्याने आपल्या सर्व शक्ती दुसऱ्यावर उपकार करण्यासाठी खर्च केल्या त्यानेच खरी आत्मस्थिती जाणली असे समजावे २ द्वैत या अद्वैत असा भाव ज्याच्या मनास शिवत नाही त्यालाच आत्मानुभव आला आहे असे समजावे ३ ज्याच्या वाणीत कधी निंदास्तुती येत नाही त्यानेच आत्मस्थिती जाणली असे समजावे ४ जो उचित काय अनुचित काय हे जाणतो, जो धर्म व नीती जाणतो व ज्याच्या मनात दृढ अशी भावभक्ती असते तोच खरा मनुष्य समजावा ५ तुकयाबंधू म्हणतात, इतर जे वरकड लोक आहेत ते संसाराचे ओझे वाहणाऱ्या गाढवाप्रमाणे समजावेत ६

३०३३ चवदा भुवनें लोक तिन्हीं दाढे जो कवळी । सपुष्ट तो सबळीमध्यें देखा ॥ १ ॥
उत्पत्तिसंहारकरिता जो पाळण । तो नंदा[1] नंदन म्हणवीतसे ॥ २ ॥
असुर तोडरी[2] दैत्याचा काळ । जाला द्वारपाळ बळीचा तो ॥ ३ ॥
लक्ष्मीचा स्वामी क्षीराच्या सागरा । उच्छिष्टकवळा पसरी मुख ॥ ४ ॥
तुकयाबंधु म्हणे चतुराचा रावो । भावें तो पाहा हो केला वेडा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – सबळीमध्यें–देवाची उपकरणी ठेवण्यासाठी केलेल्या पेटीत, नंदन–मुलगा, पुत्र, तोडरी–जिंके, रावो–राजा

अर्थ – चौदा भुवनें आणि तीनही लोक जो आपल्या मुखातील दाढेने कवळतो तो हा श्रीहरी देव ठेवण्याच्या संपुष्टात अथवा सबळीत सामावून राहिलेला आहे पाहा १ सर्व जगाची उत्पत्ती आणि संहार करणारा व पालनपोषण करणारा हा देव स्वतःस गोकुळातील नंदाचा लहान पुत्र म्हणवून घेत आहे २ याने अनेक असुराना जिंकले, हा दैत्याचा काळ आहे, पण हाच देव बलिराजाचा द्वारपाळ होऊन राहिलेला आहे ३ क्षीरसागरावर निवास करणारा लक्ष्मीचा हा स्वामी भक्तांनी दिलेल्या उच्छिष्टाच्या घासासाठी आपले मुख पसरवीत आहे ४ तुकयाबंधू म्हणतात, हा श्रीहरी चतुराचा राजा असून हा भावभक्तीने कसा वेडा केला जातो ते पाहा ना ५

३०३४ कोण या पुरुषार्थाची गति । आणियेला हातोहातीं ।
जाहाज पृथ्वीपति । केली ख्याती अद्भुत ॥ १ ॥
भला रे पुंडलिका भला । महिमा नव जाये वर्णिला ।
दगा देउनि अवघियाला । साटविलें अविनाश ॥ २ ॥
केलें एके घरीं केणें । भरलीं सदोदित दुकानें ।
दुमदुमिलीं सुखानें । हे भाग्याची पंढरी ॥ ३ ॥

---
१ नंदाचा, २ तारडी

तुकयाबंधु म्हणे किल्या । संताचे हातीं दिल्या ।
आंगावेगळें आपुल्या । टाकुनि जाला महिमान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गति–महत्त्व, योग्यता, केणे–माल

अर्थ :– या पुण्पार्याची योग्यता केवढी आहे पाहा सव ब्रह्माडाचा धनी असलेला हा देव त्याने हातोहाती आणला व त्याला भवसमुद्र तरुन जाण्याचे जहाज केले या पुडलिकाने केवढी ही कीर्ती केली आहे पाहा १ पुडलीका, तू फार चागला आहेस रे सर्व इद्रियविकाराना दगा देऊन तू या अविनाशी पाडुरगाचा सग्रह केलास हा तुझा महिमा एवढा मोठा आहे की त्याचे कधी वर्णन केले जाणार नाही ३ हा विठ्ठलरुपी माल तू एका ठिकाणी भरलास त्यानेच सर्व दुकाने सदोदित भरुन गेली आहेत आणि या सुखाने सारी पढरपूर नगरी दुमदुमून गेली आहे म्हणून ही नगरी मोठीच भाग्याची आहे तुक्याबधू म्हणतात, आणि या भाडाराच्या किल्ल्या त्याने सताच्या हाती दिल्या व आपण अंगावेगळे झाला त्यामुळे त्याचे महत्त्वही फारच वाढले आहे ४

३०३५ पाहा हो कलिचे महिमान । असत्यासी रिझले जन ।
पापा देती अनुमोदन । करिती हेळण संतांचे ॥ १ ॥
ऐसे अधर्माचे बळ । लोक झकविले सकळ ।
केलें धर्माचे निर्मूळ[1] । प्रळयकाळ आरंभला ॥ २ ॥
थोर या युगाचे आश्चर्य । ब्रह्मकर्म उत्तम सार ।
सांडूनियां द्विजवर । दावलपीर स्मरताती ॥ ३ ॥
ऐसे यथार्थाचे अनर्थ । जाला बुडाला परमार्थ ।
नाहीं जाली ऐसी नीत । हा हा भूत पातलें ॥ ४ ॥
शांति क्षमा दया । भावभक्ति सत्क्रिया ।
ठाव नाहीं सांगावया । सत्त्वधैर्य भंगिलें ॥ ५ ॥
राहिले वर्णाश्रमधर्म[2] । अन्योन्य विचरती कर्म ।
म्हणवितां रामराम । श्रम महा[3] मानिती ॥ ६ ॥
थेर भोरपाचे[4] विशीं । धांवती भूतें आमिषां तैसीं ।
कथा पुराण म्हणता सिसी । तिडीक उठी नकऱ्याचे[5] ॥ ७ ॥
विषयलोभासाटीं । सर्वार्थेसीं प्राण साटी ।
परमार्थी पीठ मुठी । मागता उठती सुनींसीं ॥ ८ ॥
धनाढ्य देखोनि अनामिक । तयातें मनितो[6] आवश्यक ।
अपमानिले वेदपाठक । सात्त्विक शास्त्रज्ञ संपन्न ॥ ९ ॥
पुत्र ते पितियापाशीं । सेवा घेती सेवका ऐसी ।
सुनांचिया दासी । सासा जाल्या आदण्या ॥ १० ॥
खोटे जालें आली विवसी । केली मर्यादा नाहींसी ।
भार्या भ्रतारेंसी । रंक तैसीं मानिती ॥ ११ ॥
नमस्कारावया हरिदासां । लाजती धरिती कांहीं गर्वसा ।
पोटासाटीं खोसा । वंदिती मलिछाच्या[7] ॥ १२ ॥

१ वाटोळें, २ वर्णावर्णधर्म, ३ महाश्रम, ४ भोरप्याचे, ५ नरक्याचे, ६ मानिती, ७ मिलिंदाच्या

बहुत पाप जाले उचबळ । उत्तम न म्हणती चांडाळ ।
अभक्ष भक्षिती विटाळ । कोणी न धरी कोणाचा ॥ १३ ॥
कैसे जाले नष्ट वर्तमान । एकादशीस खाती अन्न ।
विडे घेऊनि ब्राह्मण । अविद्वाणी वदताती ॥ १४ ॥
कामिनी विटंबिल्या कुळवंती । वदनें दासीचीं[1] चुंबिती ।
सोवळयाच्या स्फीती[2] । जगीं मिरविती पवित्रता[3] ॥ १५ ॥
मद्यपानाची सुराणी । नवनीता न पुसे कोणी ।
फेंळवती व्यभिचारिणी । दैन्यवाणी पतिव्रता ॥ १६ ॥
केवढी दोषाची सबळता । जाली पाहा हो भगवंता ।
पुण्य धुडावोनी सत्ता । तीर्थी हरी आणिली ॥ १७ ॥
भेणें मंद जाल्या मेघवृष्टि । आकातली कांपे सृष्टि ।
देव रिगाले कपाटीं । आटाआटी प्रवर्तली ॥ १८ ॥
अपीक धान्य दिवसे दिवसे । गाई म्हैसी चेवल्या गोरसे ।
नगरे दिसती उध्वसे । पिकलीं बहुवसे पाखाडें ॥ १९ ॥
होम हरपलीं हवनें । यज्ञयाग अनुष्ठानें ।
जपतपादिसाधनें । आचरणें भ्रष्टलीं ॥ २० ॥
अठरा यातींचे व्यापार । करिती तस्कराई विप्र ।
सांडोनिया शुद्ध शुभ्र । वस्त्रें निळीं पांघरती ॥ २१ ॥
गीता लोपली गायत्री । भरले चमत्कार मंत्रीं ।
अश्वाचियापरी । कुमारी विकिती वेदवक्ते ॥ २२ ॥
वेदाध्ययनसंहितारुचि । भकाधा[4] करिती तयाची ।
आवडी पंडिताची । मुसाफावरी बैसली ॥ २३ ॥
मुख्य सर्वोत्तम साधनें । तीं उच्छेदुनि केलीं दीनें ।
कुडी कापटयें महा मोहनें । मिरविताती दुर्जन ॥ २४ ॥
कळाकुशळता चतुराई । तर्कवादी भेद निंदेठायीं ।
विधिनिषेधाचा वाही । एक ही ऐसीं नाडलीं ॥ २५ ॥
जे सन्यासी तापसी ब्रह्मचारी । होता वैरागी दिगांबर निस्पृही वैराग्यकारी ।
कामक्रोधें व्यापिले भारी । इच्छाकरीं न सुटती ॥ २६ ॥
कैसे विनाशकाळाचें कौतुक । राज जाले प्रजांचे अंतक ।
पिते पुत्र सहोदर । एकाएक शत्रुघातें वर्तती ॥ २७ ॥
केवढी ये राडेची अगवण । भ्रमविले अवघें जन ।
याती अठरा चाऱ्ही वर्ण । कर्दम करूनि विटाळले[5] ॥ २८ ॥
पूर्वीं होतें भविष्य केलें । संतीं तें यथार्थ जालें ।
ऐकत होतों तें देखिलें । प्रत्यक्ष लोचनीं ॥ २९ ॥

१ दासीची प्रीती चुंबिती, २ स्थिति, ३ पवित्र, ४ काथा, ५ टाकिली,

तुकोबाच्या वेळचे आणखी एक मोठे संतकवी म्हणजे समर्थ रामदास होत. त्यांनी तर उभा माळ पडे हिडून अस्मानीसुलतानी संकटाचे अतिशय हृदयभेदक चित्रण केले आहे. ' पदार्थ मात्र तितुका गेला । नुस्ता देशचि उरला ' असे म्हणून ते लिहितात ' माणसा खावया धान्य नाहीं । आंथरुण पांघरुण तेंहि नाहीं । घर कराया सामग्री नाहीं । काये करिती ? ' कित्येक अनाचाराने पीडित झाले, कित्येक यातिभ्रष्ट झाले कित्येकांनी मरणाऱ्हा निघा मारली कित्येक गुर्जरिणी भ्रष्ट झाल्या. कित्येक सुंदर स्त्रियांचा व्यापाराच्या निमित्ताने अपहार झाला कुठ तिची लेकरे सोडून गेली, कित्येकांनी भरल्या नदीत उड्या घेतल्या, कित्येकांनी वीष खाऊन प्राण दिले कुणाला चाकरी मिळेना तर कुणाचा धदाच चालेना, यामुळे समस्त जनतत अनाचाराचे, ढोंगाचे पीक पिकले अशा वेळी लोकांच्या असाह्य स्थितीचा फायदा घेण्यासाठी अनेक ढोंगी, कपटी व स्वार्थसाधू लोक निर्माण होऊन देवाच्या व धर्माच्या नावाखाली लोकांना लुबाडायला प्रवृत्त होतात अशा धर्मठकांचाही भरपूर समाचार तुकोबांनी वेळोवेळी घेतलेला आहे कलियुगातील अशा विविध अनाचारापासून व पापकर्मापासून समाजास वाचवून शुद्ध प्रेमावर आधारलेल्या भक्तिमार्गाकडे वळविले त संतपुरुषानाच हे विसरून चालणार नाही.

३०३६ केली हाणोळा अघोळी । येऊनि बैसलो राउळीं ॥ १ ॥
अजिचें जालें भोजन । राम कृष्ण नारायण ॥ २ ॥
तुकयाबंधु म्हणे नास । नाहीं कल्पांती जयास ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – हाणोळा– ओघात, प्रवाहात

अर्थ – मी या प्रवाहात आघोळ करून देवाच्या देवळात येऊन बसलो आहे १ रामकृष्ण, नारायण या नामरसाचे भोजन आज तृप्त मनाने झाले आहे २ तुकयाबंधू म्हणतात, आता या आत्मसुखाच्या लाभाचा नाश कल्पांतीही होणार नाही, ३

३०३७ तुजलागीं माझा जीव जाला पिसा । अवलोकितो[१] दिशा पांडुरंगा ॥ १ ॥
सांडिला व्यवहार माया लोकाचार । छंदनिरंतर हाचि मनीं ॥ २ ॥
आइकिले कानीं तें रूप लोचन[२] । देखावया सीण करिताति ॥ ३ ॥
प्राण हा विकळ होय कासावीस । जीवनाविण मत्स्य तयापरी ॥ ४ ॥
तुका म्हणे आता कोण तो उपाय । करूं तुझे पाय आतुडे तो ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पिसा–वेडा, अवलोकितों–पाहातो, सांडिला–सोडला, लोकाचार–लोकांशी वर्तन, लोचन–डोळे, जीवनाविण–पाण्याशिवाय, उपाव–उपाय, आतुडे–मिळतील, प्राप्त होतील

शब्दार्थ व टीपा– मात– हकीगत, वाणिता– वर्णन करीत असता, क्षेम– आलिंगन, घडी–घटका, वेळ

अर्थ – हा माझ्या विठ्ठल कोणत्या गावास आहे ते जर तुम्हा कोणास माहीत असेल तर मला सांगा ना हो १ यासाठी मी तुमच्या पायावर लोटांगण घेऊन शरण येत आहे या विठ्ठलाची हकीगत कुणीतरी मला सांगा २ या संतानी याचे गुणरूप वर्णन केले आहे ते ऐकून याला आलिंगन देताना मला फारच सुख होते ३ जो कुणी मला हा पांडुरंग दाखवील त्याच्या चरणावर मी माझा जीव सर्वभावे ठेवीन ४ तुकाराम महाराज म्हणतात, गाईची व तिच्या वत्साची ताटातूट केल्याप्रमाणे अवस्था झाली आहे अशा वियोगात एक एक घटका मोठ्या कष्टाने जात आहे ५

३०३९ एकाचिये सोई कवित्वाचे वाधे । वाधिलिया साधे काय तेथे ॥ १ ॥
काय हातीं लागे भुसाचे कांडणीं । सत्यासी दाटणी करुनि काय[1] ॥ २ ॥
कवित्वाचे रुढी पाया पाडी जग । सुखावोनि मग नरका जाय ॥ ३ ॥
तुका म्हणे देव केल्याविण साहे । फजिती ते आहे लटिक्या अंगीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाधे– रचना, बाधिलिया– रचिल्यामुळे, दाटणी–अडचण, साहे–साह्यभूत.

अर्थ – कुणा एकाचे कवित्व पाहून आपण कवित्वाची रचना करण्यात काय अर्थ आहे ? त्यामुळे कोणता लाभ होणार आहे ? १ उगाच भूस कांडून आपल्या हातीं काय लागणार आहे ? सत्याच्या व्यवहारात उगाच अडचण कशाला निर्माण करावी ? २ कवित्वाच्या रूढीमुळे कविलोक स्वत च्या पायावर जगाला नमवतात; त्यामुळे त्याना सुखही होत असेल, पण शेवटी त्याना नरकालाच जावे लागते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवाला साह्यभूत करून घेतल्याशिवाय खोट्या व्यवहाराच्या पायी पदरात फजितीच पडणार आहे ४

३०४० भल्याचे दर्शन । तेथें शुभचि वचन[2] ॥ १ ॥
बोलावी हे धर्मनीत । क्षोभें होत नाहीं हित ॥ २ ॥
मर्यादा ते बरी । वेळ जाणावी चतुरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु । लागे ऐसे वरें मऊ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– भल्याचें–चांगल्याचे, सज्जनाचे, चतुरीं–चतुर लोकानी

अर्थ – सज्जनाचे दर्शन झाले म्हणजे त्याबरोबर सुखदायक वचन ऐकू येतेच १ ते जे बोलतात ते धर्मनीतीचेच असते त्याच्याविषयी मनात कुणी क्षोभ धारण केला तर त्यायोगे कोणाचेच हित होणार नाही २ म्हणून चतुर लोकानी प्रसंगवेळ पाहून नीट मर्यादेने वागावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे मृदू बोलणेच नेहमी चांगले असते ४

३०४१ आवडीने धरिलीं नावे । प्रियभावे चिंतन ॥ १ ॥
वेडा जाला वेडा जाला । लांचावला भक्तीसी ॥ २ ॥
निचाडचा[3] चाड धरी । तुळसी करीं दळ मागे ॥ ३ ॥
धरिला मग न करी बळ । तुका म्हणे कळ पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निचाडचा–इच्छारहित, निरीच्छ, चाड–इच्छा, कळ–युक्ती

अर्थ – मोठ्या प्रीतीने भगवताने नाना नावे धारण केली त्याचेच आम्ही प्रेमभावाने चिंतन करीत असतो १ हा देव खरोखरीच भक्तीसाठी वेडा झालेला दिसतो २ इच्छारहित असणारा हा देव आपल्या भक्ताजवळ

१ ठेवी, २ शकुन, ३ निचाड हा

तुळशीच्या पानाची इच्छा धरीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, याला एकदा मनात साठवून धरला की मग तो कसलाही जोर करीत नाही त्याचे पाय धरणे हीच एक युक्ति आहे ४

३०४२ कंठीं राहो नाम । अंगीं भरोनियां प्रेम ॥ १ ॥
ऐसें द्यावें कांहीं दान । आलों पतित शरण ॥ २ ॥
संतांचिये पायीं । वेळोवेळां ठेवीं डोई ॥ ३ ॥
तुका म्हणे तरें । भवसिंधु एका[1] सरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.- सरें-मान्य होण्याने

अर्थ - देवा, तुमचे नाम माझ्या कठात राहावे व त्याच्याविषयी अगात सर्वत्र प्रमभाव भरून राहावा १ मी पातकी तुम्हास देवा, शरण आलो आहे असे काही दान मला तुम्ही द्यावे २ संताच्या पायावर मी अनेकदा मस्तक ठेविले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या एका मान्यतेमुळेच मी हा भवसिंधू तरून जाणार आहे ४

३०४३ विठ्ठल विठ्ठल येणें छंदें । ब्रह्मानंदें गर्जावें ॥ १ ॥
वाये[2] टाळ टाळयाटाळी । होइल होळी विघ्नाची ॥ २ ॥
विठ्ठल आदि अवसानीं । विठ्ठल मनीं स्मरावा[3] ॥ ३ ॥
तुका म्हणे विठ्ठलवाणी । वदा कानीं आईका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - वाये-वाहे, वाजतात, अवसानीं-शेवटी

अर्थ.- विठ्ठल, विठ्ठल असा नामघोष करून ब्रह्मानंदात गर्जत राहावे १ टाळ व हातानी टाळ्या वाजवाव्यात, त्यामुळें सकटाची होळी होऊन जाईल २ प्रथमपासून शेवटपर्यंत या विठ्ठलाचेच मनात स्मरण करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, वाचेने विठ्ठलाचे नाम घ्यावे व कानानी हेच नाम ऐकावे ४

३०४४ पंढरीचे वारकरी । ते अधिकारी मोक्षाचे ॥ १ ॥
पुंडलिका दिला[4] वर । करुणाकरें विठ्ठलें ॥ २ ॥
मूढ पापी जैसे तैसे । उतरी कासे लावूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे खरें[5] जालें । एका बोलें संताच्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - करुणाकरें-करुणेच्या सागराने, कासे-काखोटीस.

अर्थ.- जे पंढरीची वारी नित्य करणारे आहेत तेच मोक्षाचे खरे अधिकारी आहेत १ या करुणासागर विठ्ठलाने पुंडलिकास असाच वर दिलेला आहे २ जे कोणी मूढ व पापी असतील त्यानाही ते जसे असतील तसेच काखोटीस घेऊन हा देव भवसागराच्या पैलतीरास नेऊन उतरवितो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या संताच्या एका बोलण्याने या बाबतीतील सर्व काही खरे झाले आहे ४

३०४५ अमृताचीं फळे अमृताची[6] वेली । तेचि पुढें चाली बीजाची[7] ही ॥ १ ॥
ऐसियाचा संग देईं नारायणा । बोलावा वचना जयाचिया ॥ २ ॥
उत्तम सेवन सितळ कंठासी । पुष्टी काती तैसी दिसे वरी ॥ ३ ॥
तुका म्हणे तैसे होइजेत सगे । वास लागे अंगें चंदनाच्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - चाली- रीत, वाढ, बोलावा-प्रेम

१ एकसरे, २ वाहे, ३ धरावा, ४ दिधला, ५ गोविंयेलें ६ अमृतचि, ७ बीजाचिया.

अर्थ – अमृताच्या वेलीस अमृताचीच फळे येणार व पुढेही याच रीतीने वाढ होणार १ नारायणा, याप्रमाणे ज्यांच्या वचनात नित्य प्रभुप्रेमाचा ओलावा आहे अशांचीच संगत मला तुम्ही द्यावी २ उत्तम पदार्थांचे सेवन कंठाला शीतलत्व देते व त्यामुळे शरीरासही चांगली पुष्टी व कांती प्राप्त होत राहाते ३ तुकाराम महाराज म्हणतात चंदनाच्या संगतीने ज्याप्रमाणे भोवतीच्या वृक्षांना वास लागतो त्याप्रमाणे संतांच्या संगतीने संतांचे गुण अंगी येत असतात ४

३०४६ पंढरीसी जा रे आलेनो संसारा । दीनाचा सोयरा पांडुरंग ॥ १ ॥
वाट पाहे उभा भेटीची आवडी । कृपाळू तातडी उतावीळ ॥ २ ॥
मागील परिहार पुढें नोव्हे[1] सीण । जालिया दर्शन एकवेळा ॥ ३ ॥
तुका म्हणे नेदी आणिकाचे हातीं । बैसला तो चित्तीं निवडेना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आलेनो–आलेल्यांनो, निवडेना–वेगळा न होता, अखंडपण

अर्थ – संसारास आलेल्यांनो, पंढरपुरास जाऊन तो दीनाचा सोयरा पांडुरंग आहे त्याला जाऊन भेटा ना १ मोठ्या प्रीतीने तो आपल्या भक्ताची वाट पाहात कृपाळू व उतावीळ असा होऊन भेटीसाठी उत्सुक होऊन तेथे उभा आहे २ त्याच्या एक वेळच्या दर्शनाने यापूर्वीच्या कष्टांचे व पापी जीवनाचा परिहार होईल व त्याच्यामुळे पुढेही काही शीण होणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, याला एकदा शरण गेल्यानंतर हा कुणा दुसऱ्याच्या हाती कधी आपणास सोपवीत नाही तोच आपण होऊन त्याच्या चित्तात वेगळा न राहता अखंडपणे बसून राहतो ४

३०४७ न कळे तें कळों येईल उगलें । नामें या विठ्ठले एकाचिया ॥ १ ॥
न दिसे तें दिसों येईल उगलें । नामें या विठ्ठले एकाचिया ॥ २ ॥
न बोलो तें बोलों येईल उगलें । नामें या विठ्ठले एकाचिया ॥ ३ ॥
न भेटे ते भेटो येईल आपण । करिता चिंतन विठोबाचे ॥ ४ ॥
अलभ्य तो लाभ होईल अपार । नाम निरंतर म्हणता वाचे ॥ ५ ॥
तुका म्हणे आसक्त जीव[2] सर्वभावें । तरतील नावें विठोबाच्या ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –उगलें–आपोआप

अर्थ – या एका विठ्ठलाच्या नामचिंतनाने जे आतापर्यंत कळले नव्हते ते आपोआप कळू लागले १ या विठ्ठलाच्या नामामुळे आजवर जे दिसले नव्हते ते आपोआपच दिसू लागेल २ या विठ्ठलाच्या नामामुळे पूर्वी तो जो आपल्याशी बोलत नव्हता तोच आता आपोआप बोलू लागेल ३ या विठोबाचे चिंतन केल्यानंतर पूर्वी जे आपणास भेटले नव्हते ते आपणहून भेटेल ४ आपल्या वाणीने या विठ्ठलाचे नाम सतत घेत राहिल्यास अपार व अलभ्य असा लाभ आपणास होईल ५ तुकाराम महाराज म्हणतात, संसाराविषयी आसक्त असणाऱ्या सर्व जीवांनी मनोभावे या विठोबाचे नामस्मरण केले तर ते तरून जातील ६

३०४८ बहुजन्में केला लाग । तो हा भाग लाधलों ॥ १ ॥
जीव देइन हा[3] बळी । करीन होळी संसारा ॥ २ ॥
गेले मग नये हाता । पुढती चिंता वाटतसे[4] ॥ ३ ॥
तुका म्हणे तातडे करूं । पाय धरूं बळकट ॥ ४ ॥

१ नाही, २ जडजीव, ३ पायातळीं, ४ वाढत असे

शब्दार्थ व टीपा -लाग-पाठलाग, लाधलो प्राप्त झाला, तातड- त्वरा

अर्थ -मागे अनेक जन्मात प्रभुकृपेसाठी जो पाठलाग केला त्यामुळे अशा प्रकारचा हा लाभ प्राप्त झाला आहे १ मी आता यासाठी माझा जीव बळी देऊन सर्व संसाराची होळी करून टाकीन २ एकदा हा प्राप्त झालेला नरदेह हातून गेल्यानंतर मग काही पुनः हाताशी येणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून त्वरा करून याचे पाय बळकटपणे धरून ठेव ४

३०४९ भक्तिप्रेमसुख नेणवे आणिका । पंडित वाचका ज्ञानियासी ॥ १ ॥
आत्मनिष्ठ जरी जाले जीवन्मुक्त । तरी भक्तिसुख दुर्लभ त्या ॥ २ ॥
तुका म्हणे कृपा करिल नारायण । तरिच हे वर्म पडे ठावे[1] ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा -नेणवे-समजणार नाही, वर्म-रहस्य

अर्थ - कुणी कितीही पंडित, ग्रंथवाचक व ज्ञानी झाले तरी ते काही भक्तिसुखास जाणतात असे नाही १ कुणी कितीही आत्मनिष्ठ झाले, जीवन्मुक्त झाले तरी त्यांना भक्तीचे सुख हे दुर्लभच आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, नारायण जर कृपा करील तरच भक्तीच्या सुखाचे हे रहस्य माहीत होईल ३

३०५० दुधाळ गाढवी जरी जाले पाहे । पावेल ते काय धेनुसरी ॥ १ ॥
कागाचिया गळा पुष्पाचिया माळा । हंसाची ते कळा काय जाणे ॥ २ ॥
मर्कटें अंघोळी लावियेले टिळे । ब्राह्मणाचे लीळे वर्तूं नेणे ॥ ३ ॥
जरी तो ब्राह्मण जाला कर्मभ्रष्ट । तुका म्हणे श्रेष्ठ तिहीं लोकीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -धेनुसरी-गाईची बरोबरी, कागाचिया-कावळ्याच्या, कळा-रूप, मर्कटें-माकडाने

अर्थ - गाढवी कितीही जरी दूध देणारी झाली तरी कधी गाईची बरोबरी करू शकणार नाही १ कावळ्याच्या गळ्यात कितो जरी फुलांच्या माळा बांधल्या तरी काय त्याला हंसासारखे देखणे रूप प्राप्त होईल ? २ माकडाने स्नान करून कपाळावर कितीही गंधाचे टिळे लावले तरी त्याच्या हातून कधी ब्राह्मणाचे वर्तन होणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, जरी एखादा ब्राह्मण चुकून कर्मभ्रष्ट झाला तरी तो तीनही लोकात श्रेष्ठ आहे ४

३०५१ देव भक्तालागीं करूं नेदी संसारा । अंगें वारावार करोनि[2] ठेवी ॥ १ ॥
भाग्य द्यावे तरी अंगीं भरे ताठा । म्हणोनि करटा करोनि ठेवी ॥ २ ॥
स्त्री द्यावी गुणवती नसती गुंते आशा । यालागीं कर्कशा पाठी लावी ॥ ३ ॥
तुका म्हणे मज[3] प्रचित आली देखा । आणीक या लोका काय सांगों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -अंगें-स्वत , वारावार-आवरासावर, प्रचित-अनुभव

अर्थ - हा देव आपल्या भक्तास कधी सुखाने नीटपणे संसार करू देत नाही तो स्वत च त्याच्या संसाराची आवरासावर करून ठेवतो १ भक्ताला चांगले भाग्य व ऐश्वर्य द्यावे तर त्यांच्या अंगी अभिमानाचा ताठा भरतो, म्हणून तो त्याला दरिद्री, करटा करून ठेवितो २ चांगली गुणवती स्त्री त्याला द्यावी तर तिच्यातच त्याची नसती आशा गुंतून राहते, म्हणून तो चांगली कर्कशा स्त्री त्याच्यामागे लावतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला यासंबंधी अनुभव असल्याने मी आणखी या लोकांना सांगू तरी काय ? ४

---

१ ठायीं, २ करीतसे, ३ साक्ष मज आली

३०५२ वाघें उपदेशिला कोल्हा । सुखें खाऊं द्यावें[1] मला ॥ १ ॥
अंती मरसी ते न चुके । मज हीं[2] मारितोसी भुके ॥ २ ॥
येरू म्हणे भला भला । निवाड तुझ्या तोंडें जाला ॥ ३ ॥
देह[3] तंव जाणार । घडेल हा[4] उपकार ॥ ४ ॥
येरू म्हणे मनीं । ऐसें जावें समजोनि ॥ ५ ॥
गांठी पडलीं ठका ठका । त्याचा[5] धर्म बोले तुका ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतीं–अखेरीस, शेवटी, येरु–दुसरा, निवाड–निर्णय, ठका–फसविणाऱ्याची

अर्थ – एकदा वाघाने कोल्ह्याला असा उपदेश केला की, मी तुला खातो मला सुखाने खाऊ दे १ तू तर शेवटी मरणारच आहेस. ते काही चुकणार नाही मग मला विनाकारण भुकेने का मारतोस ? २ त्यावर कोल्हा म्हणाला, हा निर्णय तुझ्याच तोंडाने झाला हे फार फार बरे झाले ३ वाघ त्यानंतर म्हणाला, तुझा देह हा तर जाणारच आहे. मी जर तुला खाल्ले तर तुला तेवढेच पुण्य तरी लाभेल ना. ४ त्यावर तो कोल्हा म्हणाला, हा नियम तुलासुद्धा लागू होईल असे तू मनात समज ना ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने एकमेकांस फसविणाऱ्यांची गाठ पडली तरी मी त्याचे मर्म चांगलेच जाणीत आहे. ६

३०५३ जेथें आठवती स्वामीचे ते पाय । उत्तम ते ठाय रम्य स्थळ ॥ १ ॥
रान अथवा घर एकांत लोकांत । समाधान चित्त तें ते घडी ॥ २ ॥
धन्य तो हा काळ सरे आनंदरूप । वाहातां संकल्प गोविंदाचे ॥ ३ ॥
तुका म्हणे लाभकाळ तेंचि जीणें । भाग्य नारायण उत्तम तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –ठाय–स्थळ, घडी–वेळेस

अर्थ –ज्या ठिकाणी स्वामीच्या पायाचे चिंतन, स्मरण चालू आहे ते स्थळ उत्तम व रम्यच असते. १ मग ते रान असो अथवा घर असो, एकान्ताचे असो अथवा गर्दीचे असो त्याचे चिंतन झाले की, त्या वेळेस चित्तास समाधानच होते. २ या गोविंदाचेच संकल्प ज्या वेळी मनात नित्य वसत असतात, तो काळ धन्य व आनंदरूपच असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लाभकाळाचा फायदा होणे हेच जिणे योग्य असते असे हे उत्तम भाग्य नारायणाच्या कृपेने प्राप्त होते ४

३०५४ तुज न भें मी कळिकाळा । मज नामाचा जिव्हाळा ॥ १ ॥
माझा वळिया नेणसी कोण । संतां साहे नारायण ॥ २ ॥
शंख वधिला सागरीं । वेद घेउनि आला चारी ॥ ३ ॥
कूर्में दैत्य वधिला जेठी । हात पाय लपवी पोटीं ॥ ४ ॥
वाराहरूप धरिलें गाढें । धरा प्रतापें धरिली दाढे ॥ ५ ॥
हिरण्यकश्यप विदारिला । भक्त प्रल्हाद[6] रक्षिला ॥ ६ ॥
वामन जाला दिनानाथ । बळी पाताळीं घातला दैत्य ॥ ७ ॥
छेदुनियां सहस्र भुजा । कामधेनू आणिली वोजा ॥ ८ ॥
शिळा प्रतापें सागरीं तारी । स्थापी बिभीषण रावण मारी ॥ ९ ॥
मारोनियां कंसराव । पिता सोडविला वसुदेव ॥ १० ॥

१ दे रे मला, २ का, ३ तो ४ पर, ५ त्याच वर्म बोले, ६ प्रल्हाद.

पांचाळीसी गांजितां वैरी । वस्त्रें आपण जाला हरी ॥ ११ ॥
गजेंद्र स्मरे राम राम । त्यासी पाववी वैकुंठधाम ॥ १२ ॥
तुका म्हणे हरिरूप जाले । पुन्हा जन्मा नाहीं आले ॥ १३ ॥

शब्दार्थ व टीपा –न भें–भीत नाही, साहे–साहाय्यभूत होणारा, शंख–शंखासुर, कूर्मे–कासवाने, जेठी–बलवान, वाराहरूप–डुकराच्या रूपाने गाढे–बलवान धरा-पृथ्वी, विदारिला–फाडून काढला, वोजा–नीट व्यवस्थित रीतीने, शिळा–दगड, बिभीषण–रावणाचा बंधू राव–राजा पांचाळीसी–द्रौपदीस

अर्थ — कळिकाळा, मी काही तुला यत्किंचित भिणार नाही कारण मला श्रीहरीच्या नामाचा जिव्हाळा प्राप्त झाला आहे १ माझा हा रक्षक कसा बलवान आहे हे तू जाणीत नाहीस का ? तो संताना साह्य करणारा नारायण आहे २ मत्स्यावताराच्या वेळी त्यानेच शंखासुराचा वध सागरात केला व चार वेद वर घेऊन तो आला ३ कूर्मावतारातही महान दैत्याचा वध करून त्याने आपले हातपाय पोटात घेतले ४ वराहाच्या रूपाने यानेच बलवान असे स्वरूप धारण करून आपल्या दाढेत मोठ्या पराक्रमाने पृथ्वी धारण केली ५ हिरण्यकशिपूस फाडून यानेच प्रल्हादाचे रक्षण केले ६ दीनाचा स्वामी जो वामन तो हाच असून त्याने बली दैत्याला पाताळात घातले ७ यानेच सहस्रार्जुनाचे हजार हात तोडून व्यवस्थितपणे पळवून नेलेली कामधेनू परशुरामाच्या अवतारात आणली ८ स्वतःच्या पराक्रमाने यानेच रामावतारात आपल्या नामाच्या योगाने शिळा तारल्या रावणास मारून यानेच बिभीषणास राज्यावर बसविले ९ यानेच कंसराजास मारून आपला पिता जो वसुदेव त्यास बंदिवासातून मुक्त केले १० दुष्ट अशा कौरव शत्रूंनी द्रौपदीस भरसभेत त्रास दिलेला असताना यानेच वस्त्रे होऊन तिचे रक्षण केले ११ गजेंद्राने राम राम असे स्मरण करताच यानेच त्याला वैकुंठधामास नेले १२ तुकाराम महाराज म्हणतात अशा प्रकारे याच्या कृपेने जे जे हरिरूप झाले ते पुन काही जन्मास आले नाहीत १३

३०५५ सर्वां भूतीं द्यावें अन्न । द्रव्य पात्र विचारोन ।
उपतिष्ठे कारण । तेथें बीज पेरीजे[1] ॥ १ ॥
पुण्य करितां होय पाप । दुग्ध[2] पाजोनि पोशिला साप[3] ।
करोनि अघोर जप । दुःख विकत घेतले ॥ २ ॥
भूमी पाहातां नाहीं वेगळी । माळ बरड एक काळी ।
उत्तम निराळी । मध्यम कनिष्ठ ॥ ३ ॥
म्हणोनि विवेकें । काहीं करणें निकें ।
तुका म्हणे फिके । रुची नेदी मिष्टान्न ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पात्र–योग्यता, विचारोन–विचार करून, उपतिष्ठे–प्राप्त होते, उगवून येते, निकें–चांगल

अर्थ – सर्व भूतमात्रास अन्न द्यावे, पण द्रव्य देताना मात्र योग्य–अयोग्य असा विचार करूनच द्यावे कारण ते बीज उगवून येण्याची शक्यता आहे तेथेच ते पेरावे १ नाहीतर पुण्य करता पाप मात्र हातून होईल सापाला दूध पाजल्यासारखे होईल अघोर असे जप करून दुःखच विकत घेतल्यासारखे होईल. २ भूमी एकंदर पाहाता ती काही निराळी वाटत नाही, पण वास्तविक पाहाता माळरान, खडकाळ, काळी, अशी तिची उत्तम, मध्यम व कनिष्ठ रूपे असून ती वेगळीच वाटते ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून जे काही करायचे ते नीट विचार करून करावे कारण पक्वान्न जरी झाले तरी ते जर फिके असले तर मात्र त्याची रुची चांगली राहाणार नाही. ४

१ पेराव २ दूध, ३ सर्प

३०५६ देवावरी भार । वृत्ति अयाचित सार ॥ १ ॥
देह देवाचे सांभाळी । सार योजे यथाकाळीं ॥ २ ॥
विश्वासीं निर्धार । विस्तारील विश्वंभर ॥ ३ ॥
तुका म्हणे व्हावे । बळ एकचि जाणावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अयाचित–काही न मागण्याची

अर्थ – देवावर सर्वस्वाचा भार घालून आपण अयाचित वृत्तीने असावे हेच एक सारभूत तत्त्व आहे १ आपला देहही देवाच्या स्वाधीन करावा व त्याचा उपयोग योग्य तेथे नीटपणे करणे हे सार आहे २ या जगतास भरून राहिलेला हा देव आहे असा निर्धार विश्वासाने केला म्हणजे तो सर्व व्यवस्था नीट लावतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची अवस्था असणे हेच एक प्रकारचे सामर्थ्य आहे असे जाणावे ४

३०५७ वर्त्तता बासर[1] । काय करावे शरीर ॥ १ ॥
ठेवा नेमून नेमून । माझें तुमचे पायीं मन ॥ २ ॥
नेदावियां वृत्ती । कोठे फाकोंचि श्रीपती ॥ ३ ॥
तुका म्हणे भले । जन्मा येऊनियां जाले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बासर–स्वच्छंदी, अनियंत्रित

अर्थ – देवा, हे शरीर जर स्वच्छंदी बनले तर मग त्याचा काय उपयोग ? १ म्हणून श्रीहरी, माझे मन तुमच्या पायाशी नेमून घ्या २ श्रीपती, माझ्या मनाच्या वृत्ती इतरत्र कुठे फाकू देऊ नका. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे ज्याची वृत्ती झाली तेच जन्माला येऊन भले झाले असे समजावे. ४

३०५८ केली प्रतिज्ञा मनाशीं । तंई मी दास सत्यत्वेशीं ।
नेईन पायापाशीं । स्वामी मूळ पढरिये ॥ १ ॥
तोवरी हें भरीं पोट । केला तो मिथ्या बोभाट ।
नाहीं सांपडली वाट । सइराट फिरतसे ॥ २ ॥
ज्यावे आदराचे जिणे । स्वामी कृपा करी तेणे ।
पाळिल्या वचने । सत्यत्वाचा अनुभव ॥ ३ ॥
घडे तैसे घडो आता । मायबापाची हे सत्ता ।
तुका म्हणे चिंता । काय पाहे मारगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सईराट–स्वैरपणाने, ज्यावें–जगावे

अर्थ – पढरीस असणारा जो मूळचा स्वामी त्याच्या पायाशी सत्यत्वाने जावे, त्याचा दास व्हावे अशी माझ्या मनाशी प्रतिज्ञा केली आहे १ तोपर्यंत मी हे पोट कसेतरी भरीन त्याच्याविषयी उगाच बोभाटा करायचा कशासाठी ? पढरपूरची वाट जोपर्यंत सापडलेली नाही तोपर्यंत मी स्वैरपणाने फिरतच राहीन २ स्वामींनी कृपा केली म्हणजे आदराचे जिणे जगल्यासारखे होईल व त्यामुळे वचन पाळल्यामुळे सत्यत्वाचा अनुभव येईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या मायबापाच्या सत्तेने आता जे व्हायचे असेल ते व्हावे मी पढरपूरच्या मार्गाची वाट पाहात असल्यामुळे मला चिंता कसली आहे ? ४

१ बसर

३०५९ नेत्र झाकोनियां काय जपतोसी । जंव[1] नाहीं मानसीं भावप्रेम[2] ॥ १ ॥
उघडा मंत्र जाणा राम कृष्ण म्हणा । तुटती यातना गर्भवास ॥ २ ॥
मंत्र[3] यंत्र कांहीं करिसी जडी बुटी । तेणें भूतसृष्टी पावशील ॥ ३ ॥
सार[4] तुका जपे बीजमंत्र एक । भवसिंधुतारक रामकृष्ण[5] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जंव–जोपर्यंत.

अर्थ :– जोपर्यंत तुझ्या मनात भावभक्तीचे प्रेम नाही तोपर्यंत डोळे झाकून काय जपतोस रे ? १ त्यापेक्षा रामकृष्ण हा उघडा मंत्र का म्हणत नाहीस ? त्यामुळे तुझ्या गर्भवासाच्या यातना तुटतील २ याखेरीज उगाच मंत्र तंत्र यंत्र इत्यादी काही जडीबुटी करशील त्यामुळे भूतसृष्टीस मात्र जाऊन पोचशील ३ तुकाराम महाराज म्हणतात, रामकृष्ण हाच एक सारभूत असा बीजमंत्र आहे त्यामुळेच भवसागरातून तरून जाता येईल यासाठी त्याचाच एक जप कर. ४

३०६० संत मारगीं चालती । त्याची लागो मज माती ॥ १ ॥
काय करावीं साधनें । काय नव्हे एक तेणें ॥ २ ॥
शेष घेईन[6] उच्छिष्ट । धाय धणीवरी पोट ॥ ३ ॥
तुका म्हणे संतां पायीं । जीव ठेविला निश्चयीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– शेष–उरलेले, धाय–संतुष्ट होईन, धणीवरी–तृप्ती येईपर्यंत.

अर्थ :– संतांनी दाखविलेल्या मार्गाने जे कुणी चालतात त्याच्या चरणांची माती माझ्या अंगास लागो. अथवा संत ज्या मार्गाने चालतात त्याची धूळ माझ्या अंगास लागो. १ इतर साधनांची मग काय जरूरी आहे ? या एका साधनाने काय होणार नाही ? २ त्याचे उच्छिष्टाचा, उरलेला भाग मी मनाची तृप्ती होईपर्यंत, संतुष्ट होईपर्यंत सेवन करीन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी निश्चयाने या संताच्या पायांवर मी माझा जीव समर्पण केला आहे ४

३०६१ जैसें तैसें बाळ मातेसी आवडे । बोलतां बोबडे शब्द गोड ॥ १ ॥
आपुले आवडी लेववी खाववी । पाहोनियां जीवीं सुख वाटे ॥ २ ॥
तुका म्हणे काय देऊं परिहार । काय तें साचार जाणतसें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–आवडीने, प्रेमाने, परिहार–समर्थन, साचार–खरे

अर्थ :– मातेला बाळ जसे असेल तसेच आवडते. त्याचे बोबडे शब्द तिला फारच गोड लागतात. १ ती आपल्या आवडीप्रमाणे त्याला अलंकार व वस्त्रे घालते, जेवायला घालते व त्याला पाहून तिच्या जीवास फारच सुख वाटते. २ तुकाराम महाराज म्हणतात, याविषयी मी आणखी समर्थन काय करू ? जे काय खरे आहे ते संत हो, तुम्ही जाणीत आहातच. ३

३०६२ देवाचिया वस्त्रा स्वप्नीं ही नाठवी । स्त्रियेसी पाठवी उंच साडी ॥ १ ॥
गाईचें पाळण नयेचि विचारा । अश्वासी खरारा करी अंगें ॥ २ ॥
लेकराची रास[7] स्वयें धांवे क्षाळूं । न म्हणे प्रक्षाळूं द्विजपायां ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याच्या तोंडावरि थुंका । जातो यमलोका भोगावया ॥ ४ ॥

---

१ जरी, २ प्रेमभाव, ३ मंत्र तंत्र सध्या करिसा, ४ तुका म्हणे ऐक सुंदर मंत्र एक ५ रामनाम. ६ सेवीन, ७ गाड.

शब्दार्थ व टीपा :- अश्वासी-घोड्याला, रास-धान्याचा ढीग, क्षाळूं-धुवू पाहातो, प्रक्षाळू-श्रद्धेने धुणे, द्विजपाया-ब्राह्मणाच्या पायाम.

अर्थ :- घरातल्या देवाला वस्त्र असावे अशी स्वप्नातही या माणसास कधी आठवण होत नाही पण तोच आपल्या बायकोस मात्र उंची किमतीची साडी घेतो. १ एखादी चांगली गाय पाळावी असे कधी याच्या मनात येत नाही. पण घोड्याला मात्र स्वतः खरारा करीत असतो. २ ब्राह्मणाच्या पायाचे श्रद्धेने पूजन कधी हा करणार नाही, पण मुलाचे ढुंगण मात्र स्वतःच्या हातानी धूत असेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाच्या तोंडावर थुंकावे. तो यमलोक भोगायलाच जातो. ४

३०६३ उरा लावी उर आळंगितां कांता । संतासी भेटतां अंग चोरी ॥ १ ॥
अतीत देखोनि होय पाठमोरा । व्याहुचासी सामोरा जाय वेगीं ॥ २ ॥
द्विजा नमस्कारा मनीं भाव कैचा । तुर्काचे दासीचा लेंक होय ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कांता-पत्नी, अतीत-अतिथी, द्विजा-ब्राह्मणास

अर्थ :- पत्नीस आलिंगन देताना हा उराला उर लावून मिठी मारतो, पण साधुसंताना भेट देताना मात्र अंग चोरून वागतो. १ एखादा अतिथी पाहाताच हा दारातूनच पाठमोरा होतो. पण व्याही वगैरे येताच त्याना आदराने सामोरा जातो. २ ब्राह्मणाला नमस्कार करताना याच्या मनात कधीच भाव नसतो. पण मुसलमानाच्या दासीस मात्र लेकराप्रमाणे मानतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माझ्या रागाच्या बोलण्यामुळे तुम्ही क्रोध करू नका. कारण आपापल्या स्वभावाला कोण काय करणार ? ४

३०६४ ब्रह्मज्ञान जरी कळे[१] उठाउठी । तरि का हिंपुटी वेदशास्त्रें ॥ १ ॥
शास्त्रांचें भांडण जप तीर्थाटण । उर्वीचें भ्रमण याच साटीं ॥ २ ॥
याचसाटीं जप याचसाटीं तप । व्यासें ही अमुप ग्रंथ केले ॥ ३ ॥
याच साटीं संतपाय हे सेवावे । तरिच तरावें तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - उठाउठी-त्वरित, एकाएकी, हिंपुटी-कष्टी, उर्वीचे-पृथ्वीचे, अमुप-पुष्कळ

अर्थ :- ब्रह्मज्ञान जर एकाएकी त्वरित समजते तर मग वेदशास्त्रानी कशासाठी कष्टी व्हावे ? १ याचसाठी विविध शास्त्राचे भांडण आहे, याचसाठी जपतप, तीर्थाटणे, सर्व पृथ्वीचे भ्रमण होत असते २ जपतपादी साधने यासाठीच होत असतात. यासाठीच श्रीव्यासानी पुष्कळ ग्रंथ केले ३ तुकाराम महाराज म्हणतात, याचसाठी संताच्या पायाचे सेवन करावे, म्हणजे भवसागरातून तरून जाता येईल ४

३०६५ गायत्री विकोन पोट जे जाळिती । तया होय गति यमलोकीं ॥ १ ॥
कन्येचा जे नर करिती विकरा । ते जाती अघोरा नरकपाता ॥ २ ॥
नाम गाऊनियां द्रव्य जे मागती । नेणों तयां गति कैसी होय[२] ॥ ३ ॥
आमुचा सांगाती आहे तो श्रीहरि । न लगे दुराचारी तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- गायत्री-एक देवता, या ठिकाणी एक पवित्र गाय

१ केले, २ कैसे होइल त्याचे तेच हो जाणती । आम्हासी संगति नलगे त्याची ॥ हे चरण अधिक

शब्दार्थ व टीपा :– गोण्या–लहान पोती, पिशव्या, करबाडें–कडबा, येर–इतर, गव्हारा–मूर्खा

अर्थ :–बैलाच्या पाठीवर साखरेची पोती पुष्कळ असली तरी त्याला शेवटी खायला कडबाच मिळत असतो. १ उंटाच्या पाठीवरून खाद्य पदार्थांचे पेटारे वाहिले जातात, पण त्याला शेवटी झाडाचे काटेच ओरबडून खावे लागतात २ त्याप्रमाणे आशा वाढविणारे नाना व्यापारधंदे व्यर्थ आहेत कारण त्यापासून मिळालेले धन आज लोक जागच्या जागीच ठेवतात व त्याला मात्र बांधून यमाच्या हाती देतात ३ ज्याला ज्यापासून लाभ आहे त्याची गोडी तोच जाणीत असतो. त्याशिवाय इतर गरीब मात्र व्यर्थ शिणून जातात. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मूर्खा, तू नीट शहाणा हो ना उगाच चौऱ्याशी लक्ष योनींतून फिरू नकोस ५

३०७१ चिरगुटें घालूनि वाढविलें पोट । गऱ्हवार बोभाट जनामध्यें ॥ १ ॥
लटिकेची डोहळे दाखवी प्रकार । दुध स्तनीं पोर पोटीं नाहीं ॥ २ ॥
तुका म्हणे अंतीं वांजचि ते खरी । फजिती दुसरी जनामध्यें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – लटिके–खोटे

अर्थ :– पोटावर चिरगुटे बांधून उगाच एखाद्या बाईने आपण गरोदर आहोत असा बोभाटा केल्याने काय होणार आहे ? १ तिला झालेल्या डोहाळ्याचा सर्व प्रकार उगाच खोटाच असतो कारण तिच्या स्तनात दूध नसते की पोटात पोर नसते २ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही स्त्री शेवटी वांझ असते हेच खरे बाहेर येते पुनः लोकात फजिती होते ती निराळीच. ३

३०७२ माझी सर्व चिंता आहे विठोबासी । मी त्याच्या पायांसी न विसंभें ॥ १ ॥
विसरेना[1] रूप क्षण एक चित्तीं । जिवलग मूर्ती सांवळी ते ॥ २ ॥
विसरतां हरी क्षण एक घडी । अंतरली जोडी लक्षलाभ ॥ ३ ॥
तुका म्हणे माझ्या विठोबाचे पाये । संजीवनी आहे हृदयामाजी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– न विसंभें–दूर करणार नाही

अर्थ :–माझी सर्व चिंता त्या विठोबास आहे मी त्याच्या पायाना एक क्षणभरही विसरणार नाही १ जी जिवलग अशी सावळी मूर्ती माझ्या हृदयात वसलेली आहे तिचा विसर माझ्या चित्तात एक क्षणभरदेखील होत नाही २ या श्रीहरीचा मला एक क्षणभर जरी विसर झाला तरी लक्षावधी किंमतीची प्राप्ती बुडाली असे मला वाटेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, या विठोबाचे पाय म्हणजे माझ्या हृदयात असणारी अमृताची संजीवनीच होय ४

३०७३ काय तीं करावीं मोलाचीं माकडें । नाचततो[2] पुढें संसाराच्या ॥ १ ॥
झाडा देतेवेळे विचकिती दांत । घेती यमदूत दंडवरी ॥ २ ॥
हात दांत कान हलविती मान । दाखविती जन मानावया ॥ ३ ॥
तुका म्हणे किती जालीं हीं[3] फजित । मागें नाहीं नीत भारवाही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – झाडा–केल्या कार्यांचा हिशेब नीत–नीती.

अर्थ :—ससारात लौकिकाच्या इच्छेने सदोदित नाचणारी माकडे काय कामाची ? १ केल्या कर्माचा हिशेब देण्याच्या वेळी ते दात विचकून उभे राहतात मग यमाचे दूत त्याना दडाने शिक्षा करीत राहतात २ लोकानी आपला मान वाढवावा म्हणून अशी माणसे आपले हात, कान, दात हालवून, वचकून गप्पागोष्टी

१ विसरता, २ नाचतील, ३ ती.

करतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही माणसे किती फजीत झाली त्याला सीमाच नाही तरीसुद्धा ही ससारभार वाहतातच त्याना नीती कसलीही नसते ४

३०७४ थोर ती गळाली पाहिजे अहंता । उपदेश घेता सुख वाटे ॥ १ ॥
व्यर्थ भरामर केले पाठातर । जोवरी अतर शुद्ध नाहीं ॥ २ ॥
घोडे काय थोडें वागविते ओझें । भावेविण तैसे पाठातर ॥ ३ ॥
तुका म्हणे धरा निष्ठावत भाव । जरी पंढरीराव पाहिजे तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- अहता-मीपणाचा अभिमान, अतर-मन

अर्थ -तुला कुणाकडून तरी उपदेश घेणे सुखाचे वाटते, पण अगोदर मीपणाचा अभिमान नाहीसा व्हायला पाहिजे हे ध्यानात असू दे १ जोपर्यंत मनात शुद्ध भाव नाही तोपर्यंत भरामर शब्द व्यर्थ पाठ करून काय उपयोग ? २ घोडें काय पाठीवर थोडें ओझें वागविते ? त्याचा त्याला काय उपयोग ? त्याप्रमाणे भावाशिवाय पाठातराचा काहीच उपयोग नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही एकनिष्ठेने मनात भाव धारण करा, तरच तुम्हास पढरीरायाची प्राप्ती होईल ४

३०७५ जाय जाय तूं पंढरी । होय होय वारकरी ॥ १ ॥
साडोनियां वाळवंट । काय इच्छिसी वैकुंठ ॥२ ॥
खांद्या पताकांचे भार । तुळसीमाळा आणि अबीर ॥ ३ ॥
साधुसंताच्या दाटणी । तुका जाय लोटांगणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - अबीर-बुक्का, दाटणीं-समुदायात.

अर्थ -अरे माणसा, तू पढरपुराला जा पढरीचा वारकरी तू हो १ तेथील चद्रभागेच्या तीरावरचे वाळवट सोडून वैकुठाची इच्छा का रे करतोस ? २ ज्याच्या खाद्यावर पताकाचे ओझे आहे, ज्याच्या गळयात तुळशीची माळ आहे आणि ज्याच्या कपाळावर अबीरबुक्का आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा साधु-सताच्या समुदायास मी लोटागण घालीत आहे ४

३०७६ जगीं ऐसा बाप व्हावा । ज्याचा वंश मुक्तिस जावा ॥ १॥
पोटा येता हरले पाप । ज्ञानदेवा मायबाप ॥ २ ॥
मुळीं बाप होता ज्ञानी । तरी आम्ही लागलो ध्यानीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मी पोटींचे बाळ । माझी पुरवा ब्रह्मींची आळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - आळ-हट्ट, इच्छा

अर्थ -या जगामध्ये बाप असा असावा की, ज्याच्या पोटी जन्मास आल्याने साऱ्या वशासच मुक्ती मिळावी १ मायबापा, ज्ञानदेवा, तुम्ही असेच आहात, तुमच्या पोटी आल्याने सर्व प्रकारचे पाप नाहीसे झाले २ आमचा मूळचा बाप ज्ञानी असल्यानेच आम्ही असे तुमच्या ध्यानी लागलो आहोत ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्ञानदेवा, मी तुमच्या पोटीचे बाळ आहे असे समजून माझा ब्रह्मप्राप्तीविषयीचा हट्ट पुरवावा ४

३०७७ सताच्या हेळणें बाटले जें तोंड । प्रत्यक्ष ते कुंड चर्मकाचे ॥ १ ॥
मेसळीचे वीर्य ऐशा अनुभवे । आपुले परावे नाहीं खळा ॥ २ ॥

शब्दार्थ व टीपा :- येटे-मर्दी, श्लेष्मपुरी-शेंबडाचा पूर, सर्व काम-सर्व लौकिक इच्छा.

अर्थ :-यानंतर म्हातारपणी पडसे, खोकला, सर्दी, अशासारखे रोग झाल्यामुळे हा नेहमी कपाळाला हात लावून बसतो. १ त्याचे मुख खोबऱ्याच्या वाटीप्रमाणे ओबडधोबड झाले असून नाकातून सारखा शेंबडाचा पूर वाहात असतो. २ इतराशी काही बोलायला लागला तर धडपणे शब्द काही उमटत नाही कफ फार दाटून आल्यामुळे घशातून घरघर असा आवाज येत असतो. ३ याची अशी कटकट पाहून शेजारी असलेले म्हणतात, हा म्हातारा मरेना का; याने भारी कटाळा आणला आहे आम्हाला ४ तुकाराम महाराज म्हणतात, लोकहो, हे सर्व जाणून तुम्ही सर्व लौकिक इच्छा सोडा आणि प्रत्येक क्षणास राम राम असे नामस्मरण करा ना ५

*विवरण :- वरील तीन अभंगातून तुकारामबुवानी सर्वसामान्य माणसाचे आयुष्य ईश्वराच्या स्मरणा-* शिवाय कसे जात असते याचे शब्दचित्र रंगविले आहे लहानपणी नाना प्रकारचे खेळ खेळण्यात आयुष्य जाते, तरुणपणी अहंकारात व इंद्रियसुखात व म्हातारपणी असाध्य अशा रोगाशी झगडण्यात आयुष्य गेल्यानंतर मग स्वहिताच्या जपणुकीस आणि प्रभुचिंतनास अवसर कोठला ? श्री शंकराचार्यांनी ' बालस्तावत्क्रीडासक्तस्तरुणीरक्त ॥ वृद्धस्तावच्चिन्तामग्न परे ब्रह्मणि तु कोऽपि न लग्न' :- लहानपणी खेळ खेळण्यात, तरुणपणी रतिविलासात, म्हातार-पणी रोगपरिहाराच्या चिंतात आयुष्य जाते. पण परब्रह्माविषयी आस्था कुणासच नसते, हे जाणून तुकाराम महाराजानी जोवर सर्व शक्ती शिल्लक आहेत, इंद्रिये शाबूत आहेत, तोपर्यंतच श्रीहरीचे नाम घ्यावयास सांगितले आहे

सर्वच साधुसंतानी माणसाच्या आयुष्याचा हिशेब करून स्वहितासाठी प्रथमपासूनच सावध असण्यासाठी विनविले आहे तत्त्वज्ञान, परमार्थ, भजनपूजन, संतसंग, सद्ग्रंथश्रवण या सर्व गोष्टी सावकाश म्हातारपणी करू असे *म्हणून थांबण्यासारखे नाही जो देह ईश्वराने आपणास दिला त्याचा उपयोग त्याच्या प्राप्तीसाठी बालपणापासूनच* करणे अगत्याचे आहे; असा संताच्या उपदेशाचा भावार्थ आहे. ज्या देहाच्या व इंद्रियाच्या सुखासाठी मनुष्य एवढी धडपड करतो, एवढे परिश्रम करतो, तो देह व ती इंद्रियसुखे आहेत तरी कशी ? त्याचे मोठे भयानक चित्र साधुसंत काढतात अशा चित्रातून देहाची व इंद्रियव्यापाराची घाणेरडी वर्णने येतात ही गोष्ट खरी असली तरी त्याच्या मागचा हेतू समजावून घेण्यासारखा आहे खोबऱ्याच्या वाटीप्रमाणे तोंड होते, आणि नाकातून शेंबडाचा पूर वाहू *लागतो यात असत्य काय आहे ? कंठात कफ दाटून येतो आणि तोंडातून शब्द बाहेर फुटत नाही; अशा म्हातार-* पणी हातून काय होणार ? मरे ना का म्हातारा ! असा तिटकारा मात्र भोवतीची माणसे करीत असतात. तरुण-*पणाची ऐट व बेपर्वाई तर काय वर्णावी ? एक दीड पान हातात असले तरी भल्या भल्या लोकाना डावलण्याची* इच्छा मनात येते. परनारीवर दृष्टी जाते, सारा जन्म टवाळी करण्यात जातो माजलेल्या रेड्याप्रमाणे सदा धुसफूस चाललेली असते, आणि लहानपणी तर बरोबरीच्या मित्राशी खेळ खेळण्यात आणि हुंदडण्यात बरीच वर्षे खर्च होतात आयुष्याच्या या धावपळीत ज्याने हा नरदेह दिला त्याची आठवण कुणास होणार ?

म्हणूनच आयुष्याचा हिशेब नीट ध्यानात आणावा. इतकेच नव्हे तर मृत्यूचा धाक, वृद्धत्वाची आठवण यासाठी मनात सतत असावी अशी त्यांची इच्छा आहे ज्ञानेश्वरानीही या वार्धक्याचे व नाना रोगाचे घृणा येईल असे वर्णन एवढ्यासाठी दिले आहे की, देह व देहसंबंधी इंद्रिये याचे खरे स्वरूप माणसाच्या ध्यानी यावे. म्हातार-पणी नाक उंटाच्या गुढघ्याप्रमाणे होत, डोळे पिकलेल्या पडवळाप्रमाणे होतील, भुवईचे पडदे झाडाच्या जुन्या साली-*प्रमाण खाली लोंबतील आणि अश्रूच्या पाण्याने ऊर भिजून कुजेल बाभळीच्या खोडास ज्याप्रमाणे सरडे गिरबडून* टाकतात त्याप्रमाणे म्हातारपणी तोंड थुंकीच्या पिचकारीने भरून जाईल, नाकात शेंबडाचे बुडबुडे उठतील तरुण-पणातील सुंदर मुखात म्हातारपणी कफाचा लोट येईल आणि दाढा दातासकट पडून जातील. म्हातारपणी जीभ काही केल्या वर उचललीच जाणार नाही. आषाढ महिन्यात ज्याप्रमाणे पावसाच्या एकसारख्या झडीने पर्वताची शिखरे पाझरतात त्याप्रमाणे दाताच्या खिडीतून लाळेचे पूर वाहतील, पुष्ट असलेले शरीर म्हाताऱ्या माकडाप्रमाणे बेडौल होईल पायांत पाय अडकतील, हात वाकडे पडतील आणि मग ? ' मळमूत्रद्वारें । होऊनि ठाकती खोंकरें ।

नवसि यें होती इतरे । मातिया निधनीं ' नातेवाईकांनी व आपल्या स्वकीयानी आपल्याच मृत्यूविषयी नवस करावा असे महादुःख म्हातारपणी निर्माण होते म्हणून ऐन वयातच जे काही साधायचे असते ते साधून घेणे हिताचे असते ' तैसे वार्धक्य यावें । मग जें वाया जावें । तें आताचि आघवें । सवतें केलें ' म्हातारपणी जे व्यर्थ होते ते आताच, म्हणजे तरुणपणीच हातावेगळे केलेले बरे रामदासांनीही या जन्मदुःखाचे तपशी ने वर्णन केले आहे

३०८४ जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ।। १ ।।
बुका लावू नये भाळा । माळ घालूं नये गळा ।। २ ।।
तटावृषभासी दाणा । तृण मागो नये जाणा ।। ३ ।।
तुका म्हणे द्रव्य घेती । देती ते ही नरका जाती ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – तटावृषभासी–घोड्यासाठी किंवा बैलासाठी, तृण–गवत

अर्थ – ज्या ठिकाणी श्रीहरीचे कीर्तन करावे त्या ठिकाणी हरिदासाने अन्नाचे सेवन करू नये १ तेथील बुक्का कपाळाला लावू नये, की तेथील फुलाची माळ गळ्यात घालू नये २ त्या ठिकाणी हरिदासांनी आपल्या घोड्यास अथवा बैलास दाणे मागू नयेत, की गवताचा चाराही मागू नये, असे नीट समजावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, कीर्तन करून जे गुणी द्रव्य घेतील ते घेणारे व देणारे दोघेही नरकास जातील ४

३०८५ लंकेमाजी घरें किती तीं आइका । सांगतसे संख्या जैसीतैसी ।। १ ।।
पांच लक्ष घरें पाषाणाचीं जेथें । सात लक्ष तेथें विटेबंदी ।। २ ।।
कोटि घरें जेथें कांशा आणि तांब्याचीं । शुद्ध कांचनाचीं सप्त कोटी ।। ३ ।।
तुका म्हणे ज्याची संपदा एवढी । सांगातें कवडी गेली नाहीं ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – विटेबंदी–विटांनी बांधलेली, संपदा–संपत्ती, सांगातें–बरोबर

अर्थ –रावणाच्या लंकेमध्ये घरे किती होती ते ऐका आता जेवढी होती तेवढी संख्या सांगतो १ त्या ठिकाणी पाच लक्ष घरे दगडाची होती, सात लक्ष घरे विटांनी बांधलेली होती २ काशाची व तांब्याची घरे एक कोटी होती आणि शुद्ध सोन्याची तर सात कोटी घरे होती ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याची एवढी संपत्ती होती त्या रावणाच्या बरोबर एक कवडीसुद्धा गेली नाही ४

३०८६ व्यभिचारिणी गणिका कुंटणी । विश्वासचि मनीं राघोबाचा ।। १ ।।
ऐसी ही पापिणी वाहिली विमानीं । अचळ भुवनीं ठेवियेली ।। २ ।।
पतितपावन तिहीं लोकीं ठसा । कृपाळू कोंवसा अनाथांचा ।। ३ ।।
तुका म्हणे विठोबाची धरा सोय । आणिक उपाय नेणो किती ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – राघोबाचा–राघू पक्ष्याचा, अचळ–स्थिर, भुवनीं–स्थान कोंवसा–आश्रयस्थान, आधार

अर्थ –गणिका या नावाची एक व्यभिचारिणी कुंटणी ( वेश्या ) होती तिच्या मनात तिच्या राघूविषयी फारच प्रेम होते १ मरताना तिने त्या राघवाची फारच आठवण केली ती रामाला पावली व त्याने तिला नेऊन अचल असे जे स्थान वैकुंठपीठ तेथे नेऊन ठेवली २ याप्रमाणे तू पतितपावन आहेस अशी तुझी कीर्ती सर्वत्र पसरलेली आहे अनाथांचे तू कृपाळू आश्रयस्थानच आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी तुम्ही विठोबाचा मार्ग धरा याशिवाय आणखी काही उपाय मी जाणीत नाही ४

३०८७ गजेंद्र तो हस्ती सहस्र वरुषें । जळामाजी नक्रें पीडिलासे ।। १ ।।
सुहृदीं सांडिलें कोणी नाहीं साहे । अंती वाट पाहे विठो तुझी ।। २ ।।

कृपेच्या सागरा माझ्या नारायणा । तया दोघाजणा तारियेले ॥ ३ ॥
तुका म्हणे नेले वाऊनि विमानी । मी ही आईकोनी विश्वासलो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हस्ती–हत्ती, सुहृदीं–सबधितानी, साहे–साह्यास, वाऊनि–वाहून

अर्थ –गजेन्द्र नावाचा एक हत्ती हजार वर्षेपर्यंत पाण्यामध्ये मगराकडून त्रासलेला होता १ अशा सकटप्रसंगी त्याला त्याच्या सबधितानी सोडून दिल्यामुळे कुणीच साह्यास नव्हते शेवटी विठो, त्याने तुझी वाट पाहिली. तुझा धावा केला २ कृपेच्या सागरा, माझ्या नारायणा, शेवटी तू त्वरेनें धावत आलास व नक्र आणि गजेंद्र या दोघाचाही तू उद्धार केलास ३ तुकाराम महाराज म्हणतात तुम्ही त्याना विमानात घालून नेले, ही हकीकत ऐकून माझा विश्वास तुमच्या ठिकाणी दृढ झालेला आहे ४

३०८८ ब्रह्मयाचे वेद शखासुरे नेले । त्यासाठीं धरिले मत्स्यरूप ॥ १ ॥
तेणे आत्मा नव्हता नेला ब्रह्मांडासी । काय ब्रह्मयासी नव्हते ज्ञान ॥ २ ॥
परि तेणे धावा केला आवडीने । जाले नारायण कृपासिंधु ॥ ३ ॥
तुका म्हणे विठोबा मी नामधारक । पोसनें सेवक भेटी देई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पोसनें–पोसणे

अर्थ -ब्रह्मदेवाचे वेद ज्यावेळी शखासुर नावाच्या दैत्याने नेले तेव्हा ते आणून देण्यासाठी देवा, तू मत्स्याचे रूप धारण केलेस १ यासाठी त्या ब्रह्मदेवाने काय केले होते ? आता आत्मज्ञानाने ब्रह्मांडाचे चिंतन करता आले नसते का ? त्याला काय निराकार देवाचे ज्ञान नव्हते ? २ परंतु त्याने मोठ्या प्रेमाने तुझा धावा केला व नतर नारायणा, कृपासिंधू त्यावर तू प्रसन्न झालास ३ तुकाराम महाराज म्हणतात, मीही त्याचप्रमाणे विठोबाचा नामधारक आहे या सेवकाचे पोषण तू केले पाहिजेस तू मला लौकर भेट दे. ४

३०८९ देवीं आणि दैती सिंधू गुसळिला । भार पृथ्वीस जाला साहावेना ॥ १ ॥
जालासी कासव धरिली पाठीवरी । चिंता तुज हरी सकळांची ॥ २ ॥
तये काळी देव करिताती स्तुती कृपाळु श्रीपती म्हणोनिया ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे उदड पवाडे । ज्यासी सहस्र तोडें सिणला तो ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सिंधू–समुद्र, उदड–पुष्कळ, पवाडे–कीर्तीची स्तवने

अर्थ –जेव्हा देवानी व दैत्यानी सागराचे मथन केले तेव्हा त्याचा भार पृथ्वीस सहन झाला नाही. १ म्हणून देवा, तू कासवाचे रूप धारण करून पृथ्वीस पाठीवर घेतलेस. श्रीहरी, तुला सर्वांची चिंता आहे. २ त्यावेळी देवानी तुझी स्तुती तू कृपाळू, श्रीपती म्हणून केली ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची कीर्तीची पुष्कळ स्तवने करताना सहस्र तोंडाचा शेषही शिणून गेला ४

३०९० हिरण्याक्ष दैत्य मातला जे काळीं । वरदाने बळी शकराच्या ॥ १ ॥
इंद्रपदराज्य घेतले हिरोनी । देवा चक्रपाणी म्हणती धाव[1] ॥ २ ॥
तई पाडुरगा शूकर जालेती । तया दैत्यपती मारियेले[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याचीं राज्यें त्यासी दिलीं । ऐसी तूं माउली पाडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मातला–माजला- शूकर–डुक्कर, वराह,

१ धावा, २ मारावले

अर्थः–देवा, हिरण्याक्ष नावाचा दैत्य त्यावेळी फार माजला होता. शंकराच्या वरप्रसादाने तो फारच बलवान झाला होता. १ त्याने इंद्रपदाचे राज्य हिसकावून घेतले तेव्हा सर्वांनी देवा, चक्रपाणी धाव अशी तुझी प्रार्थना केली. २ त्यावेळी पांडुरंगा तू वराहरूपे रूप घेतलेस व त्या मत्त झालेल्या दैत्याला मारलेस. ३ तुकाराम महाराज म्हणतात. अशा रीतीने त्या दैत्याचा नाश करून ज्यांची राज्ये त्यांना देऊन टाकलीस. पांडुरंगा, अशा प्रकारे तू कृपाळू आहेस. ४

३०९१ प्रल्हादाकारणें नरसिंह जालासी । त्याचिया बोलासी सत्य केलें ॥ १ ॥
राम कृष्ण गोविंद नारायण हरि । गर्जे राजद्वारीं भक्तराज ॥ २ ॥
विठ्ठल माधव मुकुंद केशव । तेणें दैत्यराव दचकला[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे तयां कारणें सगुण । भक्तांचें वचन सत्य केलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:–दैत्यराव–दैत्याचा राजा हिरण्यकशिपू

अर्थ.–देवा, तू प्रल्हादाच्या रक्षणासाठी नरसिंह झालास. कारण त्याचे बोलणे तुला सत्य करून दाखवायचे होते. १ हा भक्तराज प्रल्हाद राजाच्या दारात तोंडाने एकसारखे राम, कृष्ण, गोविंद, नारायण, हरी या वचनांची गर्जना करीत होता. २ विठ्ठल, माधव, मुकुंद, केशव इत्यादी नामांच्या उच्चारांनी तो दैत्यराज दचकून गेला. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या भक्त प्रल्हादासाठी तू नरसिंहाच्या रूपाने सगुण झालास व आपल्या भक्ताचे वचन खरे करून दाखविलेस. ४

३०९२ नामांचें सामर्थ्य कां रे दवडीसी । कां रे विसरसी पवाडे हे ॥ १ ॥
खणखणां हाणती खर्गें प्रल्हादासी । न रुपे आंगासी किंचित ही ॥ २ ॥
राम कृष्ण हरी ऐसी मारी हाक । तेणे पडे धाक बळियासी ॥ ३ ॥
असों द्यावीं सामर्थ्यें ऐसिया कीर्तीचीं । आवडी तुक्याची भेटी देईं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– पवाडे–कीर्तीची स्तवने, खर्गे–खड्गे, शस्त्रे.

अर्थ.–असे हे तुझ्या नामाचे देवा, सामर्थ्य आहे. ते का रे फुकट घालवितोस ? तू तुझ्याच कीर्तीची स्तवने विसरून का रे जातोस ? १ प्रल्हादाला ते दैत्य खणाखणा करून शस्त्रांनी मारू लागले तेव्हा त्याच्या अंगास त्यांतील एकही लागले नाही की रुतून बसले नाही. २ उलट त्याने राम, कृष्ण, हरी अशा हाका मारल्यानंतर त्या बलवान दैत्याला धाकच पडला. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या कीर्तीची ही अशी सामर्थ्यें असू द्यात. माझी आवड तुमची भेट घ्यावी अशीच आहे ४

३०९३ वाटीभर विष दिलें प्रल्हादासी । निर्भय[2] मानसीं तुझ्या बळें ॥ १ ॥
भोक्ता नारायण केलें तें प्राशन । प्रतापें जीवन जालें तुझ्या ॥ २ ॥
नामाच्या चिंतनें विषाचें तें आप । जाहालें देखत नारायणा ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे तुझे बडिवार । सिणला फणीवर वर्णवेना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आप–पाणी, बडिवार–सामर्थ्य, फणीवर–सर्पश्रेष्ठ शेष.

अर्थ:–त्या दैत्यराजाने प्रल्हादास वाटीभरून विष दिले. पण तो तुझ्या सामर्थ्याच्या विश्वासावर मनातून निर्भय होता. १ सर्व काही भोक्ता नारायणच असल्याने त्यानेच ते विष प्राशन केले. तुझ्या प्रतापाने त्याचे पाणी होऊन गेले. २ तुझ्या नामाचे चिंतन केल्याबरोबर त्या विषाचे पाणी नारायणा, सर्वांच्या देखत झाले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे तुझे सामर्थ्य सर्पराज शेषासही वर्णन करता येत नाही. ४

१दचके मनी, २ निर्भर.

३०९४ अग्निकुंडामाजी घातला प्रल्हाद । तरी तो गोविंद विसरेना ॥ १ ॥
पितियासी म्हणे व्यापक श्रीहरि । नांदतो मुरारी सर्वां ठायीं ॥ २ ॥
अग्निरूपें माझा सखा नारायण । प्रल्हाद गर्जून हाक मारी ॥ ३ ॥
तुका म्हणे अग्नि जाहाला शीतळ । प्रताप सबळ विठो तुझा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– प्रताप-सामर्थ्य, कीर्ती, सबळ–बलवान

अर्थ.– त्या दैत्याने प्रल्हादास अग्निकुंडातही घातले, पण तो काही केल्या गोविंदास विसरेना १ उलट आपल्या बापास म्हणू लागला, श्रीहरी सर्वत्र व्यापून राहिलेला आहे हा मुरारी सर्व ठिकाणी नांदत असतो. २ या अग्नीच्या रुपाने हा नारायणच सखा होऊन मला भेटत आहे, असे म्हणून प्रल्हादाने गर्जून नारायणास हाक मारली. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्यावरोबर तो अग्नी थंड झाला. विठोबा, असा हा तुझा प्रताप मोठाच आहे.४

३०९५ कोपोनियां पिता बोले[1] प्रल्हादासी । सांग हृषिकेशी कोठें आहे ॥ १ ॥
येरू म्हणे काष्ठीं पाषाणीं सकळीं । आहे वनमाळी जेथें तेथें ॥ २ ॥
खांबावरी लात मारिली दुर्जनें । खांबीं नारायण म्हणतांचि ॥ ३ ॥
तुका म्हणे कैसा[2] खांब कडाडिला । ब्रह्मा दचकला सत्यलोकीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– येरू—दुसरा, येथे प्रल्हाद

अर्थ :– 'सांग, तुझा हृषिकेशी आहे तरी कुठे ?' असे रागावून प्रल्हादास त्याचा पिता विचारू लागला. १ त्यावर प्रल्हाद म्हणाला, माझा वनमाळी काष्ठी, पाषाणी सर्वत्र जेथे पाहाल तेथे आहे २ प्रल्हादाने खांबातही नारायण आहे म्हणताच त्या दुर्जन दैत्याने खांबावर लाथ मारली ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्यावरोबर तो खांब एकदम कडाडून गेला त्या वेळी सत्यलोकातील ब्रह्मदेवही दचकून गेला ४

३०९६ डळमळिला मेरु आणि तो मांदार । पाताळीं फणिवर डोई झाडी ॥ १ ॥
लोपे तेजें सूर्य आणीक हा[3] चंद्र । कांपतसे इंद्र थरथरां ॥ २ ॥
ऐसें रूप उग्र हरीनें धरिलें । दैत्या मारियेलें मांडीवरी ॥ ३ ॥
तुका म्हणे भक्ताकारणें श्रीहरि । बहु दुराचारी निर्दाळिले[4] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– निर्दाळिले–नाहीसे केले

अर्थ :– प्रल्हादाच्या पित्याने खांबावर लाथ मारताच नारायण कडाडून प्रकट झाला, त्यावेळी मेरू आणि मांदार पर्वत डळमळून गेले आणि पृथ्वी डोक्यावर धारण करणाऱ्या शेषराजाने आपले डोके हालविले १ त्यामुळे सूर्यचंद्राचे तेज लोपून गेले आणि इंद्र थरथरा कापू लागला २ अशा प्रकारे श्रीहरीने त्यावेळी उग्र रूप धारण केले, आणि त्याने त्या दैत्याला मांडीवर घेऊन मारले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे या श्रीहरीने आपल्या भक्तासाठी पुष्कळच दुराचारी लोकांना नाहीसे केले.४

३०९७ बहुत कृपाळु दीनाचा दयाळु । जगीं भक्तवत्सळु नाम तुझें ॥ १ ॥
मानियेला चित्तीं बळीचा उपकार । राहूनि त्याचें द्वार राखसील ॥ २ ॥
काय त्याच्या भेणें बैसलासी द्वारीं । नाहीं तुज हरि कृपा बहु ॥ ३ ॥
तुका म्हणे भक्तजनाची ममता । तुम्हांसी अनंता अलोलिक ॥ ४ ॥

१ पुस, २ ऐसा, ३ ता, ४ मर्दियेले.

शब्दार्थ व टीपा – बळीचा–बळी राजाचा, द्वार–दार भेणे–भयाने, अलोकिक–अलौकिक

अर्थ – श्रीहरी, तू फारच कृपाळू व दीनाचा दयाळू आहेस, यामुळे तुझे नाव सर्व जगात भक्तवत्सल म्हणून प्रसिद्ध झाले आहे १ तू बळी राजाचा उपकार मनात मानून त्याच्या द्वारावर द्वारपाल होऊन अद्यापही रक्षण करीत आहेस २ तू काय त्याच्या भीतीने त्याच्या दाराशी बसलास की काय ? श्रीहरी अशी भीती तुझ्याजवळ नाही तू फारच कृपाळू आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, अनंता, अशा रीतीने तुम्हास आपल्या भक्तलोकाची ममता अलौकिक रूपाची आहे ४

३०९८ पांडुरंगा तुझे काय वाणू गुण । पवाडे हे धन्य जगीं तुझे ।। १ ।।
दंडिले दुर्वासा सुरा असुराने । तो आला गाऱ्हाणे सांगावया ।। २ ।।
बळिचिये द्वारीं तुम्ही बैसलेती । दुर्वास विनंती करी भावे ।। ३ ।।
तुका म्हणे कृपासागरा श्रीहरी । तुझी भक्तावरी प्रेमच्छाया ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा — वाणू–वर्णन करू

अर्थ – पांडुरंगा, तुझ्या गुणाचे वर्णन मी काय करू ? तुझ्या कीर्तीचे पवाडे या जगी धन्य आहेत १ जेव्हा देवदैत्यानी दुर्वासास शासन केले तेव्हा तो आपले गाऱ्हाणे सांगण्यासाठी तुमच्याकडे आला २ त्यावेळी तुम्ही बळी राजाच्या द्वारावर बसला होता तुम्हास दुर्वासाने मोठ्या भाविकतेने विनंती केली ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपासागरा, श्रीहरी, आपल्या भक्तावर नेहमीच तुमची प्रेमाची छाया असते ४

३०९९ दुर्वासया स्वामी गुतलो भावेंसी । पुसा जा बळीसी निरोप द्यावा ।। १ ।।
त्याचे आज्ञेविण आम्हा येता नये । द्वारपाळ राहे होऊनिया ।। २ ।।
पुसे दुर्वासया बळीसी जाऊनि । येरू म्हणे क्षणी बोलो नका ।। ३ ।।
तुका म्हणे केला अन्यत्राचा त्याग । तेव्हा पांडुरंग सखा जाला ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – भावेंसी–प्रतिज्ञा म्हणून, क्षणी–झटकन, एका क्षणात

अर्थ – त्यावेळी स्वामी, तुम्ही दुर्वासाला म्हणालात, मी बळीची प्रतिज्ञा म्हणून गुंतून राहिलो आहे त्याने मला निरोप दिला तर तुम्ही तेवढे जाऊन विचारा १ त्याच्या अनुज्ञेशिवाय आम्हास येता येणार नाही मी येथे द्वारपाल होऊन राहिलो आहे २ त्यासाठी दुर्वासऋषी, तुम्ही बळीस जाऊन विचारून या त्यावर तो म्हणाला, एका क्षणात मी बळीस विचारून येतो आता तुम्ही बोलू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने दुसऱ्या गोष्टींचा जेव्हा त्याग घडतो तेव्हाच तो पांडुरंग सखा म्हणून प्राप्त होतो ४

३१०० बळी म्हणे आजि दुर्वासया स्वामी । मागो नका तुम्ही नारायणा ।। १ ।।
बहुता प्रयासीं[1] जोडला श्रीहरी । बैसविला द्वारीं राखावया ।। २ ।।
परतला दुर्वास मग हो तेथूनि । चिंतातुर मनीं उद्वेगला ।। ३ ।।
काय तू एकाचा आहेसी अंकित । होई कृपावंत तुका म्हणे ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – प्रयासीं–कष्टाने, परिश्रमाने, जोडला–मिळविला, अंकित–स्वाधीन

अर्थ – त्यावर बळी दुर्वासाला म्हणाले स्वामी दुर्वासा, तुम्ही या माझ्या नारायणाला मागू नका १ फार प्रयत्न करून मी याची प्राप्ती करून घेतली आहे मी हा श्रीहरी माझ्या दारावर बसवून घेतला आहे २ यानंतर

१ प्रवासी

दुर्वास मुनी चिंतेने आतुर व उद्वेगलेला असा तेथून परत फिरला ३ तुकाराम महाराज म्हणतात, यावर दुर्वास म्हणाले, श्रीहरी, अशा रीतीने तुम्ही काय एकाचेच अंकित आहात काय? तुम्ही कृपावंत व्हा ना ४

३१०१ त्रैलोक्यांचा नाथ सकळांचा आधार । बळिचें तुवां घर धरियेलें ॥ १ ॥
आम्हां मोकलिलें कोणां निरविलें । कोणा हातीं दिले तिन्ही लोक ॥ २ ॥
अनाथांचा बंधु दासांचा कैवारी । ब्रिदें तुझीं हरी जाती वांयां ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें बोलिला दुर्वास । वाटला संतोष पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- मोकलिले-सोडून दिले, निरविले-सोपविले

अर्थ :- यावर दुर्वासऋषी नारायणाला म्हणाले, देवा, तुम्ही तीनही लोकाचे स्वामी व सर्वांचे आधार आहात. असे असताना तुम्ही एकट्या बळीचेच घर काय म्हणून धरिले? १ तुम्ही आम्हास का सोडून दिले? आम्हास कुणाच्या हाती सोपविले? या तीनही लोकाची जबाबदारी कुणाच्या हातात सोपविली? २ तू अनाथाचा बंधू आहेस, दासाचा कैवारी आहेस; श्रीहरी, ही तुझी सर्व ब्रीदे वायाच जाणार ना? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने दुर्वासऋषी बोलल्यानंतर पांडुरंगास फारच संतोष वाटला ४

३१०२ बोलिले ते देवऋषी दुर्वासया । जाय पुसावया मागत्यानें ॥ १ ॥
मागुता दुर्वास पुसे बळिराया । निरोप जावया देईं देवा ॥ २ ॥
बळी म्हणे त्यासी जाय मी न म्हणें । जाईल नारायण लागलाची ॥ ३ ॥
मजपाशीं राहे कोठें तरी जाय । तुका म्हणे पाय न सोडीं मी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- मागत्यानें-पुन, नंतर.

अर्थ.- त्यावर देवानी व ऋषीनी दुर्वासाने पुन. बळीकडे विचारण्यासाठी जावे असे सांगितले. १ त्यानंतर दुर्वास पुन. बळीकडे गेला व म्हणाला, 'देवाला जाण्यासाठी तू आता निरोप द्यावास' २ त्यावर बळीराजा त्याला म्हणाला, मी नारायणाला तू जा असे कधीच म्हणणार नाही; कारण तो मग लागलीच निघून जाईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, बळीराजा पुन. पुन. असे म्हणाला की देवा, तू माझ्याजवळच राहा उगाच कोठे जाणार? मी काही तुझे पाय कधी सोडणार नाही अथवा देवा, माझ्यापाशी राहून तू कुठेही जावेस, मी काही तुझे पाय सोडणार नाही. ४

३१०३ दुर्वासें निरोप आणिला ये रितीं । मग वाढलेती नारायणा ॥ १ ॥
ठेविले चरण बळिचिये द्वारीं । शीर अंगावरी लांबविलें ॥ २ ॥
पाडियेलें द्वार द्वारावतियेसी । वरि हृषीकेशी निघालेती ॥ ३ ॥
तेथूनियां नाम पडिलें द्वारका । वैकुंठनायका तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- रितीं-रीतीने, प्रकारचा

अर्थ :- दुर्वासाने अशा प्रकारचा निरोप आणल्यानंतर नारायणाने आपले अंग वाढविण्यास सुरुवात केली. १ आपले पाय त्याने बळीच्या दारात ठेवून आपले अंग व मस्तक वाढविले २ या वाढत्या अंगामुळे आणि हृषिकेशी वरवरच निघाल्यामुळे द्वारावती नगरीस एक दार पडले ३ तुकाराम महाराज म्हणतात, वैकुंठनायकाच्या या नगरीस त्यावेळेपासून द्वारका हे नाव पडले ४

३१०४ मुरकुश दोन्ही मारिले आसुर । दुर्वास ऋषीश्वर सुखी केला ॥ १ ॥
मारियेला मुर म्हणोनी मुरारी । नाम तुझें हरी पडियेलें ॥ २ ॥

पूर्वीहुनी ऐसा भक्तिप्रतिपाळ । केला त्वां सांभाळ नारायणा ॥ ३ ॥
तुका म्हणे येचि वेळे काय जालें । कां सोंग धरिलें मोहनाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- मुर-एक दैत्य, असुर, कुश-एक दैत्य, मोहनाचें-मौनाचे.

अर्थ:- याप्रमाणे श्रीहरीने मुर आणि कुश हे दोनही दैत्य मारून दुर्वास ऋषीला सुखी केले. १ मुर नावाच्या दैत्यास मारले म्हणून श्रीहरी, तुझे नाव मुरारी असे पडले. २ पूर्वीपासून तू असाच प्रतिपाळ आपल्या भक्तांचा केलास. नारायणा, तूच त्यांना सांभाळलेस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मग याच वेळेला काय झाले रे ? तू असे मौनाचे सोंग का धारण केलेस ? ४

३१०५ गुरुपादाग्रींचें जळ । त्यास मानी जो विटाळ ॥ १ ॥
संतीं वाळिला जो खळ । नरकीं पचे चिरकाळ ॥ २ ॥
गुरुतीर्थी अनमान । मद्यासांग मद्यपान ॥ ३ ॥
गुरुअंगुष्टा न चोखी । मुख घाली वेश्येमुखीं ॥ ४ ॥
तुका म्हणे सांगों किती । मुखीं पडो त्याचें माती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:- गुरुपादाग्रींचें-सद्गुरुनाथाच्या पायाच्या बोटाचे, जळ-पाणी, वाळिला-सोडला, त्यागला खळ-दुष्ट.

अर्थ:- आपल्या सद्गुरुनाथांच्या पायाचे तीर्थ घेताना याला विटाळ झाल्यासारखे वाटते. १ अशा या दुष्टाला संतांनी त्यागलेले असते, तो चिरकाल नरकात पिचत राहातो. २ सद्गुरूच्या तीर्थाचा त्याने अपमान केलेला असतो. मद्यासांग मद्यपानात तो रमतो. ३ सद्गुरूच्या पायांस हा कधी मुखाने स्पर्श करणार नाही, पण वेश्येच्या मुखाशी मात्र तोंड लावील. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या दुष्टाचा अनाचार मी सांगू तरी किती ? त्याच्या मुखात माती पडो.५

३१०६ वाढविलें कांगा । तुम्ही एवढें पांडुरंगा ॥ १ ॥
काय होती मज चाड । एवढी करावया बडबड ॥ २ ॥
ब्रह्मसंतर्पण । लोकीं करावें कीर्तन ॥ ३ ॥
निमित्याचा धणी । तुका म्हणे नेणे कोणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा- चाड-इच्छा.

अर्थ:- पांडुरंगा, तुम्ही एवढा विस्तार तरी का म्हणून वाढविला ? १ अशी एवढी बडबड करण्याची काय मला इच्छा होती ? २ या लोकांत कीर्तन करून ब्राह्मणांना भोजनें घालण्याची काय जरुरी मला होती ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या सर्वांत निमित्ताचा धनी असून तुम्हीच सर्व आहात हे कुणी जाणतच नाही. ४

३१०७ साही शास्त्रां अतिदुरी तो परमात्मा श्रीहरि । तो दशरथाचे घरीं क्रीडतो राम ॥ १ ॥
शिवाचें निजध्येय वाल्मीकाचें निजगुह्य । तो भिल्लटीचीं फळें खाय श्रीराम तो ॥ २ ॥
योगियांचे मनीं नातुडे चिंतनीं । तो वानरांचे कानीं गोष्टी सांगे ॥ ३ ॥
चरणीं शिळा उद्धरी नामें गणिका तारी । तो कोळिया घरीं पाहुणा राम ॥ ४ ॥
क्षण एक सुरवरा नातुडे नमस्कारा । तो रिसा आणि वानरा क्षेम दे राम ॥ ५ ॥
राम सांवळा सगुण राम योगियाचें ध्यान । राम राजीवलोचन तुका चरण वंदितो ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– साही शास्त्रां–धर्म, सांख्य, वेदान्त, न्याय, काम व योग या सहा शास्त्रांना, नातुडे–सापडत नाही, सुरवरा–श्रेष्ठ देवाना, रिसा–अस्वल, क्षेम–आलिंगन.

अर्थ – सहा शास्त्रांच्या अभ्यासकाना अति दूर वाटणारा हा श्रीहरी परमात्मा राम होऊन दशरथाच्या घरी मात्र आनंदाने खेळत असतो. १ शिवाने ज्याला आपले ध्येय मानले, वाल्मीकीस जो निजगुहचाप्रमाणे वाटला तो हा श्रीराम भिल्लीणीची बोरे मोठ्या आवडीने खातो २ हा कधी योग्याच्या मनात अथवा चिंतनात येत नाही, पण वानरांना जमा करून त्यांच्या कानात मात्र गोष्टी सांगतो ३ हा चरणस्पर्शाने शिळेचाही उद्धार करतो. नामोच्चारामुळे गणिकेसही तारतो असा हा राम कोळयाच्या घरचा पाहुणचार प्रेमाने घेतो. ४ देवादिकानी, श्रेष्ठ देवानी कितीही नमस्कार याला केले तरी कधी हा त्यांना सापडत नाही ! पण हा राम अस्वले व वानरे यांना मात्र आलिंगन देतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा श्रीराम सावळा, सगुण व योगी लोकाचे ध्यानस्थानी असलेला राजीवलोचन आहे याचे डोळे कमळाप्रमाणे आहेत मी त्याच्या पायाना वदन करतो ६

३१०८ विठ्ठल माझा जीव विठ्ठल माझा भाव। कुळधर्म देव विठ्ठल माझा ॥ १ ॥
विठ्ठल माझा गुरु विठ्ठल माझा तारूं। उतरील पारु भवनदीचा ॥ २ ॥
विठ्ठल माझी माता विठ्ठल माझा पिता। विठ्ठल चुलता बहिणी बंधु ॥ ३ ॥
विठ्ठल हे जन विठ्ठल माझें मन। सोयरा सज्जन विठ्ठल माझा ॥ ४ ॥
तुका म्हणे माझा विठ्ठल विसावा। नस्वरित[1] गांवा जाइन त्याच्या ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – तारू–तरून नेणारी नाव, पारु–पैलतीर, नस्वरित, नसंवरित, नस्वरीत–त्वरित, सत्वर

अर्थ:– हा विठ्ठल माझा जीव, माझा भाव असून माझा सर्व कुळधर्म हाच एक विठ्ठल आहे १ हा विठ्ठल माझा गुरू असून मला तारून नेणारी नौका हीच आहे याच्याचमुळे मी भवनदीचा पैलतीर गाठीन २ विठ्ठल माझी माता, माझा पिता, माझा चुलता, बहीण व बधूही आहे. ३ हे सर्व लोक विठ्ठलच असून माझे मनही विठ्ठलमय आहे माझा सोयरा व सज्जन मित्र हा विठ्ठलच आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठल माझा विसावा असून मी त्याच्या गावास त्वरित जाईन ५

३१०९ न मनावी चिंता। कांहीं माझेविशीं आतां ॥ १ ॥
ज्याणे लौकिक हा केला। तो हें निवारिता भला ॥ २ ॥
माझे इच्छे काय। होणार[2] ते एक ठाय ॥ ३ ॥
सुखा आणि दु खा। म्हणे वेगळा मी तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मनावी–मानावी, करावी.

अर्थ :– लोकहो, तुम्ही माझ्याबद्दल कसलीही चिंता करू नका १ ज्याने हा माझा लौकिक वाढविलेला आहे तोच भलेपणाने त्याचे निवारण करील २ माझ्या इच्छेने इथे काय होते ? जे होणार ते होईलच. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी सर्व सुखदुःखापासून वेगळाच आहे. ४

३११० माझा पाहा अनुभव। केला देव आपुला ॥ १ ॥
बोलविलें तेंचि द्यावें। उत्तर व्हावें ते काळीं ॥ २ ॥
सोडिलिया जग निंद्य। मग गोविंद म्हणियारा ॥ ३ ॥
तुका म्हणे धीर केला। तेणें याला गोविलें ॥ ४ ॥

१ नसंवरित, २ जाणार

सोपी वाट अनुसरणेच योग्य आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे रहस्य मला साधुसंतानी दाखविले आहे. याखेरीज जीवाला दुसरी विश्रांती कोणतीच नाही. ६

३११४ लोभावरी ठेवुनि हेत । करी असत्य न्याय नीत ॥ १ ॥
त्याच्या पूर्वजां पतन । नरकीं किडे होती जाण ॥ २ ॥
कोटिगोहत्यापातक । त्यासी घडेल निष्टंक ॥ ३ ॥
मासां श्रवे जे सुंदरा । पाजी विटाळ पितरां ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसियासी । यम गांजील सायासी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- हेत-हेतू निष्टक-निश्चयाने

अर्थः- काही लाभावर नजर ठेवून, हेतू ठेवून जो असत्याचा व रीत सोडून न्याय देतो १ त्याच्या पूर्वजाचे नरकात पतन होते ते नरकात किडे होतील असे जाणा २ असे केल्याने त्याच्या हातून कोटी गोहत्येचे पातक निश्चयाने घडेल. ३ असे करण्याने दरमहा स्रवणारा विटाळ ते पितराना पाजतात असे होईल ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशाना यम फार गाजेल ५

३११५ देह जाईल जाईल । यासी काळ बा खाईल ॥ १ ॥
कां रे नुमजसी दगडा । कंचे हत्ती घोडे वाडा ॥ २ ॥
लोडे वालिस्ते सुपती । जरा आलिया फजिती ॥ ३ ॥
शरीरसंबंधाचें नातें । भोरड्या बुडविती सेतातें ॥ ४ ॥
अझुनि तरी होई जागा । तुका म्हणे पुढें दगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा - नुमजसी-समजून घेत नाहीस, वालिस्ते-तक्क्या, सुपती-गादी, भोरड्या-पाखरे, जरा-म्हातारपण.

अर्थ.- अरे, हा देह जाणार आहे हे नीट लक्षात ठेव यास खात्रीने काळ खाणार आहे. १ दगडाप्रमाणे असणाऱ्या जड जीवा, तू हे का समजावून घेत नाहीस ? हत्ती, घोडे, राजवाडे हे कसले घेऊन बसला आहेत ? २ लोड, तक्क्या, गाद्यागिर्द्या या ठीक असल्या तरी म्हातारपण आल्यावर सर्वत्र फजिती आहे असे नीट ध्यानात धर. ३ पिकलेल्या शेतास जशी पाखरे खाऊन फस्त करतात त्याप्रमाणे शरीरसबंधाचे नातेवाईक तुला लुटतील. ४ तुकाराम महाराज म्हणतात, तू अजून तरी जागा हो पुढे फार मोठा दगा आहे ५

३११६ मागें बहुतां जनां राखिलें आडणी । धांवसी निर्वाणी नाम घेतां ॥ १ ॥
ऐसे ठावें जाले मज बरव्या परी । म्हणऊनि करीं धांवा तुझा ॥ २ ॥
माझेविशीं तुज पडिला विसरु । आता काय करूं पांडुरंगा ॥ ३ ॥
अझुनि कां नये तुम्हांसी करुणा । दुरि नारायणा धरिलें मज ॥ ४ ॥
तुका म्हणे जीव जाऊं पाहे माझा । आता केशीराजा घालीं उडी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:- निर्वाणीं-संकटसमयास, बरव्या परी-चागल्या रीतीने

अर्थ.- देवा, यामागे पुष्कळच अडाणी लोकाचे तुम्ही रक्षण केलेत. तुमचे नाम संकटसमयास ज्यानी ज्यांनी घेतले त्याच्यासाठी तुम्ही धावून आलात. १ हे मला चागल्या प्रकारे देवा, समजून आले आहे म्हणून तर मी तुझा धावा करीत आहे २ पाडुरगा, माझ्याविषयी मात्र तुला विसर पडला, आता मी करू तरी काय ? ३ नारायणा, अजूनसुद्धा तुम्हांस माझ्याबद्दल काही करुणा येत नाही ? तुम्ही मला असे दूर का हो धरले ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, केशीराजा, आता माझा जीव जात चालला आहे तू उडी घालून माझे रक्षण कर ना ५

३११७ कळलें माझा तुज नव्हे रे आठव । काय काय जीव ठेवूं आतां ॥ १ ॥
तूं काय करिसी माझिया संचिता । धिग हे अनंता जालें जिणें ॥ २ ॥
पतितपावन राहिलों या आशा । आइकोनि ठसा कीर्ती तुझी ॥ ३ ॥
आतां कोण करी माझा अंगीकार । कळलें निष्ठुर जालासी तूं ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी मांडिली निरास । करितो जीवा नास तुजसाटीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – काज–कारण, संचित–प्रारब्धाला, दैवाला, अंगीकार–स्वीकार, निरास–निराशा

अर्थ – देवा, माझी आठवण तुला होत नाही हे मला नीट समजले रे मग आता मी कोणत्या कारणासाठी माझा जीव ठेवू ? १ तू तरी माझ्या प्रारब्धाला काय करणार ? अनंता, मला हे जगणेसुद्धा कष्टाचे व धिक्काराचे झाले आहे २ तू पतितांना पावन करणारा आहेस, या आशेवर मी आजपर्यंत राहिलो होतो तुझी कीर्ती मी ऐकून होतो हाच ठसा माझ्या मनावर होता ३ पण आता माझा स्वीकार कोण करील रे ? तू तर निष्ठुर झाला आहेस हे मला समजले ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू माझी फार निराशा केलीस म्हणून मी माझ्या जीवाचा नाश तुझ्यासाठी करणार आहे ५

३११८ तरि कां मागें वायां कीर्ती वाढविली । जनांत आपुली ब्रीदावळी ॥ १ ॥
साच करितां आतां फिरसी माघारा । ठायींचें दातारा नेणवेचि ॥ २ ॥
संतांसी श्रीमुख कैसें दाखविसी । पुढें मात त्यांसी सांगईन ॥ ३ ॥
घईन डोंगरा तुझिया नामाचा । नव्हे अनाथाचा नाथ ऐसा ॥ ४ ॥
तुका म्हणे आधीं[1] राहिलों मरोनि । तूं कां होसी धनी निमित्याचा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–खरी, मात–हकीकत, डांगोरा–प्रसिद्धी

अर्थ – तू मला प्रसन्न होत नाहीस तर मग देवा, आम्ही आपली कीर्ती उगाच या जनात का वाढविली ? पतितपावन, अनाथनाथ अशी ब्रीदावली उगीच का वाढविली ? १ दातारा, मग आता आपले हे ब्रीद खरे करून दाखवताना मागे का रे फिरतोस ? हे मूळचे ब्रीद तुला कळत कसे नाही ? २ मग तू साधुसंतांना आपले तोंड कसे दाखविणार ? कारण मी त्यांना ही सर्व हकीकत सांगणारच आहे ३ देवा, तू काही अनाथाचा नाथ नाहीस अशी प्रसिद्धी मी तुझ्या नामाची सर्वत्र करीन ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी आधीच मरून राहिलो आहे तू उगाच निमित्ताचा धनी का होतोस ? ५

३११९ आम्ही तुझ्या दासीं । जरि जावें पतनासी[2] ॥ १ ॥
तरि हे दिसे विपरीत । कोठें बोलिली हे नीत ॥ २ ॥
तुझें नाम कंठीं । आम्हां संसार आटी ॥ ३ ॥
तुका म्हणे काळ । करी आम्हांसी विटाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नीत–नीती, आटी–खटपट.

अर्थ – देवा, आम्ही तुझ्या दासांनी नरकात जावे, पतन व्हावे १ हे तर फारच विपरीत दिसत आहे. हरीच्या दासांना नरक ही नीती कुठे बोलली जाते ? २ तुझे नाम आम्ही आमच्या कंठामध्ये धारण करतो व आम्हास संसाराची खटपट करावी लागते, ही नीती कुठली ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांस काळ विटाळ करतो ही तरी न्यायरीत कुठली रे ? ४

१ आम्ही, २ नरकासी

३१२० लाजती पुराणें । वेदा येऊं पाहे उणें ॥ १ ॥
आम्ही नामाचे धारक । किविलवाणीं दिसों रंक ॥ २ ॥
बोलिले ते संतीं । बोल वांयांविण जाती ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । रोकडी हे मोडे सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- रंक-गरीब, रोकडी-प्रत्यक्ष, उघडउघड.

अर्थ :- पुराणाना लाज वाटू लागली आहे आणि वेदाना उणेपणा येऊ पाहात आहे १ कारण आम्ही नामाचे धारक असूनही केविलवाणे गरीब दिसत आहोत. २ यापूर्वी जे साधुसतानी सांगितले ते सर्व वायाच गेलेले दिसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा या करण्याने तुमची सेवा मात्र उघडपणे मोडली जाईल.४

३१२१ आहारनिद्रे न लगे आदर । आपण सादर तेचि होय ॥ १ ॥
परिमितीविणें बोलणे ते वांयां । फार थोडें[1] काया पिंड पीडी ॥ २ ॥
समाधान त्याचें तोचि एक जाणे । आपुलिये खुणे पावोनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे होय पीडा ते न करीं । मग राहें परी भलतिये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काया-शरीर, परी-प्रकाराने, परिमितीविणे-मोजक्या शिवाय

अर्थ :- आहार व निद्रा याचा आदर हेतुसहित कधी करावा लागत नाही. कारण या प्रवृत्ती आपल्या आपणच सादर होतात १ मोजके बोलण्याशिवाय उगाच वायफळ बोलणे व्यर्थच होय. त्यामुळे आपल्या देहाला थोडोफार पीडा होणारच. २ जो आपल्या स्वत च्या खुणेने निजपदास जातो त्यालाच खरे समाधान म्हणजे काय हे समजते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यामुळे पीडा होणार नाही तेच करावे मग वाटेल त्या प्रकाराने राहिले तरी चालेल ४

३१२२ भूमि अवघी शुद्ध जाणा । अमगळ हे वासना ॥ १ ॥
तैसे वोसपले जीव । सांडी नसता अंगीं घाव ॥ २ ॥
जीव अवघे देव । खोटा नागवी संदेह ॥ ३ ॥
तुका म्हणे शुद्ध । मग तुटलिया भेद ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वोसपले-त्रस्त झाले, भयभीत झाले.

अर्थ:- सर्व भूमी शुद्ध आहे असेच जाणावे पण वासना ही नेहमी अमगळ असते १ त्यामुळेच हे जीव भयभीत झाले कारण त्यानी अंगास कसलाही घाव न घेता हा परमार्थाचा मार्ग सोडून दिला. २ सर्व जीव हे देवच आहेत हे खरे, पण खोटा संदेहच सर्वांना फसवीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आत्मा-परमात्मा, जीव व शिव याच्यातील भेदबुद्धी नष्ट झाली की मग सर्वत्र शुद्ध ईश्वरच आहे ४

३१२३ सरते[2] माझे तुझें । तरि हें उतरते ओझें ॥ १ ॥
न लगे सांडावे मांडावें । आहे शुद्धचि स्वभावें ॥ २ ॥
घातला तो आशा । मोहोजाळें गळां फासा ॥ ३ ॥
सुखाचा[3] तो मान । नाहीं दुःखाचा तो शीण ॥ ४ ॥
करितां नारायण । एवढे वेंचिता वचन ॥ ५ ॥
लाभ हानि हे समान । तैसा मान अपमान ॥ ६ ॥
तुका म्हणे याचे । नांव सोवळें साचें[4] ॥ ७ ॥

१ थोर काया पिंडापीडी, २ सरे, ३ सुखदु खाचा, ४ तयाचे.

शब्दार्थ व टीपा – वेचितां–बोलता

अर्थ – माझें–तुझे असा द्वैतभाव नाहीसा करावा, तरच हे जीवावरील ओझे उतरले जाईल १ यासाठी काही सोडावे लागत नाही, की काही धरावे लागत नाही ते स्वभावत च शुद्ध स्वरूपाचे आहे २ पण प्रपंचाच्या आशेने मोहाच्या मुळे जीवाच्या गळयात हा फास लागलेला आहे ३ खरे पाहाता सुखाचा मान वाटू नये की दुःखाचा शीण वाटू नये ४ सर्व काही करणारा तो नारायण आहे एवढेच वचन बोलत असावे ५ हानी व लाभ आणि मान व अपमान हे समान मानावेत ६ तुकाराम महाराज म्हणतात, याचेच नाव खरे सोवळे आहे ७

३१२४ तुज करिता होती ऐसे । मूढ चतुर पंडित पिसे ॥ १ ॥
परि[1] वर्म नेणे ते कोणी । पीडाखाणी भोगितील ॥ २ ॥
उलंघिते पांगुळ गिरी । मुके करी अनुवाद ॥ ३ ॥
पापी होय पुण्यवंत । न करी घात दुर्जन ॥ ४ ॥
अवघें हेळामात्रे[2] हरि । मुक्त करी ब्रह्मांड ॥ ५ ॥
तुका म्हणे खेळे लीळा । पाहे वेगळा व्यापूनि ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मूढ–मूर्ख, पिसे–वेडे, पांगुळ–पंगू, लंगडा, गिरी–पर्वत, हेळामात्रें–क्षणात

अर्थ – देवा, तू जर करायचे म्हटलेस तर, जे मूर्ख व वेडे आहेत ते चतुर पंडित होऊन जातील १ पण हे वर्म कुणीच जाणीत नाही, त्यामुळे ते जन्ममृत्यूच्या पीडादायक खाणी भोगतील २ पण जर तुझी कृपा होईल तर जे पंगू आहेत तेही पर्वत चढू शकतील मुकी माणसे गहन विषयाचा अनुवाद करू शकतील ३ पापी मनुष्य पुण्यवान होईल दुर्जन कधी कुणाचा घात करणार नाहीत ४ हा श्रीहरी एका क्षणात सारे ब्रह्मांड मुक्त करून सोडील ५ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरीच सर्व प्रकारची क्रीडा करीत आहे तोच सर्वांना व्यापून निराळा होऊन राहिलेला आहे ६

३१२५ पिकवावे धन । ज्याची आस करी जन ॥ १ ॥
पुरोनि उरे खाता देता । नव्हे खंडन मविता ॥ २ ॥
खोलीं पडे ओली बीज । तरीच हाता लागे निज ॥ ३ ॥
तुका म्हणे धणी । विठ्ठल अक्षरें या तिन्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आस–इच्छा, मविता–मोजले असताना धणी–तृप्ती

अर्थ – (हा अभंग मागे १८९४ क्रमांकाचा म्हणून आलेला आहे त्याच संदर्भाने अर्थ ध्यानात घ्यावा.) लोक ज्या धनधान्याची इच्छा करतात तेच तुम्ही पिकवावे १ ते इतके पिकवा की कितीही खाल्ले तरी ते उरावेच त्याची मोजदाद करताना ते कधी संपूच नये २ खोल व सजल जमिनीत जर बीज पडेल तरच स्वतःच्या हातात उत्तम पीक येईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला मात्र 'विठ्ठल' या तीन अक्षरानीच तृप्ती वाटते ४

३१२६ करिसी लाघवे । तू हे खेळसी आघवे ॥ १ ॥
अहंकार[3] आड । आम्हा जगासी हा नाड ॥ २ ॥
येथें[4] भुते यावे । दावू लपो ही जाणावे ॥ ३ ॥
तुका म्हणे हो श्रीपती । आता चाळवाल किती ॥ ४ ॥

१ परि हे वर्म नेणती कोण, २ तारी, ३ केला अहंकार ०, ४ इत्थंभूत यावे

शब्दार्थ व टीपा – लाघवे–कौतुकाने, नाड–अडचणी, चाळवाल–फसवाल

अर्थ – देवा, या जगाचे स्वरूप म्हणजे तुझेच कौतुकाने खेळणे आहे १ पण देहाचा अहंकार हीच एक या जगात मोठी अडचणी निर्माण झाली आहे २ येथे जे जे प्राणी येतात त्याना चाळविण्याचे व लपविण्याचे कार्य तूच एक जाणतोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो श्रीपती, तुम्ही आता आम्हास फसवाल तरी किती? ४

३१२७ घालिती पव्हया । वाटे अनाथाच्या[1] दया ॥ १ ॥
तैसे का[2] हे नये करू । पांडुरंगा आम्हा तारू ॥ २ ॥
रोगियासी काढा । देउनि वारितील पीडा ॥ ३ ॥
बुडत्यासाटीं उडी । घालितील का हे जोडी ॥ ४ ॥
सारितील[3] काटे । पुढें मागिलाचे वाटे ॥ ५ ॥
तुका म्हणे भार । घेती भागल्याचा फार ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पव्हया–पाणपोया, तारू–तारण्यासाठी साधन वारितील–निवारण करतात, जोडी–लाभ

अर्थ – कित्येक लोक दयाबद्धीने अनाथासाठी वाटेत पाणपोया घालतात १ पांडुरंगा, आम्हाला तरून जाण्यासाठी तुम्ही एखादे साधन का हो करू नये? २ वैद्य लोक रोगी माणसाना कडू काढा देऊन त्याच्या पीडा दूर करतात ३ जो बुडणारा आहे त्याला काढण्यासाठी जे उडी घालतात त्याना खरे म्हणजे कोणता लाभ होणारा असतो? ४ पण वाटेमधले काटे दूर करून पुढे जाणारे मागीलासाठी काढूनच टाकतात ५ तुकाराम महाराज म्हणतात, जे कुणी भागलेले आहेत त्याचे ओझे परोपकारी लोक घेत असतात ६

३१२८ नका[4] दंतकथा येथे सांगो कोणी । कोरडे ते मानी बोल कोण ॥ १ ॥
अनुभव येथें व्हावा[5] शिष्टाचार । न चलती चार आम्हांपुढें ॥ २ ॥
निवडी वेगळें क्षीर आणि पाणी । राजहंस दोन्ही वेगळालीं ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें पाहिजे जातीचे । येरा गाबाळाचे काय[6] काम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चार–वरवरची बडबड, क्षीर–दूध, येरा–दुसऱ्या

अर्थ – येथे नुसत्या कोरडया दंतकथा कुणी सांगू नयेत कारण ते कोरडे बोल कोण ऐकणार? कोण मानणार? १ येथे आमच्यापुढे खऱ्याखुऱ्या शिष्टाचाराचा अनुभव पाहिजे उगाच पोकळ वरवरची बडबड चालणार नाही २ राजहंस हा दूध व पाणी याना वेगळे करून वेगवेगळे निवडून काढतोच ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रत्येक ठिकाणी जातिवंत व अनुभवी मनुष्यच पाहिजे, येथे कुणा इतर गबाळाचे काही काम नाही ४

३१२९ न करि त्याचे गाढेपण । नारायण सिद्ध उभा ॥ १ ॥
सर्वसिंधूचा थडवा केला । बोलाविला पाहिजे ॥ २ ॥
याचे सोई पाउल वेचे । मग कैंचे आडथळे ॥ ३ ॥
तुका म्हणे खरें खोटें । न म्हणे मोटें लहान ॥ ४ ॥

१ अनाथाची, २ काहो नये, ३ झाडिताती ४ नको, ५ पाहिजे साचार, ६ काम नाही

शब्दार्थ व टीपा – गाढेपण–दुबळेपणा, भित्रेपणा, थडग्या–ल्हानसे तळे

अर्थ – जीवाना तारण्यासाठी हा नारायण सिध्द होऊन उभा असताना त्याची जर आपण कृपा संपादन केली नाही तर तो आपला भित्रेपणाच होईल १ अपार असलेल्या भवसागराचे त्याने एक लहानसे तळे केले यातून तरून जाण्यासाठी त्याचेच साह्य घ्यावयास हवे २ माच्यावरूनच एकदा पावले पडू लागली की मग अडथळे तरी कसले आले आहेत ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा त्याच्यावर विश्वास टाकला की तो कधी खरे खोटे, लहानथोर असे म्हणत नाही ४

३१३० रिकामे तू नको मना । राहो क्षणक्षणा हो ॥ १ ॥
वेळोवेळा पारायण । नारायण हें करीं ॥ २ ॥
भ्रमणाच्या मोडीं वाटा । न भरें फाटा आडरानें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझ्या जीवे । हेचि घ्यावे धणीवरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – फाटा भरणे–भटकणे, धणीवरी–तृप्ती होईपर्यंत

अर्थ – मना, तू क्षणोक्षणी उगाच रिकामा राहू नकोस १ एकसारखे नारायण नारायण या नामाचे पारायण करीत जा २ इतरत्र भ्रमणाच्या वाटा तू मोडून टाक उगाच आडरानात भटकूही नकोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जीवाने तृप्ती होईपर्यंत याचेच सेवन करावे ४

३१३१ पंचभूताचिये सापडलो सर्दी[1] । घातलोसे बर्दी अहंकारें ॥ १ ॥
आपल्या आपण बांधविला गळा । नेणेचि निराळा असतां हो ॥ २ ॥
कासया हा सत्य लेखिला[2] संसार । कां हे केले चार माझें माझें ॥ ३ ॥
कां नाहीं शरण गेलो नारायणा । कां नाहीं वासना आवरिली ॥ ४ ॥
किंचित सुखाचा धरिला अभिळास । तेणें बहु नास केला पुढें ॥ ५ ॥
तुका म्हणे आतां देह देऊं बळी । करूनि सांडू होळी संचिताची[3] ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – सर्दी–पेचात, चार–वेडे चाळे, अभिळास–इच्छा.

अर्थ – पंचमहाभूताच्या पेचात मी पूर्णपणे सापडलो आहे त्याच्याच अहंकाराने मी बंदिवासात सापडलो आहे १ मी या देहाहून वेगळा आहे असे समजावून न घेतल्यामुळे आपला गळा आपणच गुतवून घेतलेला आहे २ हा सर्व बाह्य संसार मी कशासाठी खरा मानला ? हे सर्व माझे असे चाळे तरी मी का केले ? ३ मी योग्य वेळी नारायणालाच का शरण गेलो नाही ? मी माझी प्रपंचवासना का आवरून धरली नाही ? ४ मी या किंचित अशा लौकिक सुखाची इच्छा धरल्याने पुढे फारच नाश झाला ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता माझा हा देह देवाच्या पायावर बळी देतो, आणि सर्व संचितकर्माची होळी करून टाकतो ६

३१३२ देव जाले अवघे जन । माझे गुण दोष हारपले ॥ १ ॥
बरवे जाले बरवे जालें । चित्त धालें महालाभें ॥ २ ॥
दर्पणीचे दुसरें भासे । परि तें असे एक तें ॥ ३ ॥
तुका म्हणे सिंधुभेटी । उदका तुटी वाहाळासी[4] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हारपले–नाहीसे झाले, बरवें–चांगले, धालें–संतुष्ट झाले, दर्पणीचे–आरशामधील, वाहाळासी–लहानशा ओढ्यास

१ संधी, २ मानिला, ३ संसाराची, ४ ओहळासी

अर्थ – मला आता हे सर्व लोक देव झाल्याप्रमाणेच वाटतात माझे सर्व गुणदोष नाहीसे झाले आहेत. १ हे फार फार चांगले झाले या आत्मसुखाच्या महालाभाने माझे चित्त संतुष्ट झाले २ आरशामधील प्रतिबिंब जरी दुसरे भासले तरी ते आणि पाहाणारा या गोष्टी एकच असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा समुद्राची भेट झाली की लहानशा ओढ्यास समुद्राचेच रूप येते त्याचा ओढेपणा संपून जातो ४

३१३३ बहु प्रकार गव्हाचे । जिव्हा नाचे आवडी ॥ १ ॥
सरले परि आवडी नवी । सिंधु दावीं तरंग ॥ २ ॥
घेतले घ्यावें वेळोवेळा । माय बाळा न विसबे ॥ ३ ॥
तुका म्हणे रस राहिला वचनीं । तोचि पडताळूनि सेवीतसे ॥ ४ ॥

*शब्दार्थ व टीपा – सिंधु–समुद्र, तरंग–लहरी, लाटा.*

अर्थ – एका गव्हाचे पुष्कळ प्रकार करता येतात, आणि त्याच्या सेवनाविषयी जीभ सतत नाचत असते १ पदार्थ संपून गेले तरी त्याची आवड नित्य नवी असते समुद्रावर येणाऱ्या नाना तरंगाप्रमाणे या आवडीचे प्रकार असतात २ आई आपल्या बालकास पुन पुन घेत असते ती त्याला कधीच वितंबत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या बालकाच्या बोलण्यात जो रस राहिलेला असतो तोच ती पुन पुन पडताळून सेवन करीत असते ४

३१३४ आम्हा सोइरे हरिजन । जनीं भाग्य निकंचन ॥ १ ॥
ज्याच्या धैर्या नाहीं भंग । भाव एकविध रंग ॥ २ ॥
भुके तान्हे चित्तीं । सदा देव आठविती ॥ ३ ॥
तुका म्हणे धन । ज्याचे निज[1] नारायण ॥ ४ ॥

*शब्दार्थ व टीपा – निकंचन–गरीब, दरिद्री*

अर्थ – श्रीहरीचे भक्त हेच आमचे सगेसोयरे आहेत या लोकात ते गरीब आहेत, पण हेच त्याचे भाग्य आहे १ त्यांच्या धैर्याला कधीही भंग नसतो व त्यांच्या अंतःकरणावर एकविध भावाचा रंग चढलेला असतो २ त्याना तहानभूक लागली की नेहमी ते या श्रीहरीलाच आठवतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायण हे त्यांचे निजभावाचे धन असते. ४

३१३५ म्हणवितो दास न करिता सेवा । लडपणे देवा पोट भरीं ॥ १ ॥
खोटें कोठें सरे तुझे पायापाशीं । अंतर जाणसी पांडुरंगा ॥ २ ॥
आचरण खोटें आपणासी ठावे । लटिके बोलावे दुसरें तें ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसा आहे अपराधी । असो कृपानिधी तुम्हा ठावा ॥ ४ ॥

*शब्दार्थ व टीपा – लडपणें–दांडगाईने, अंतर–अंतःकरण.*

अर्थ – देवा, काहीएक सेवा न करताच मी तुझा दास आहे असे म्हणतो, आणि मोठ्या दांडगाईने कसे तरी पोट भरतो १ पांडुरंगा, तुझ्या पायांपाशी खोटे कसे खपेल ? तू अंतःकरण जाणणारा आहेस २ आपले आचरणच खोटे असल्याचे आपण जाणतो मग मी तुझा सेवक आहे असे सांगून आणखी दुसरे खोटे कशासाठी बोलावे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपानिधी, असा मी फार अपराधी आहे, हे तुम्हास माहीत आहेच ४

---

१ वित्त.

३१३६ जळालें[1] तें बाह्य सोंग । अंतर व्यंग पडिलिया ॥ १ ॥
कारण तें अंतरलें । वाइट भलें म्हणवितां ॥ २ ॥
तांतडीनें नासी । तांतडीनेंच संतोषी ॥ ३ ॥
तुका म्हणे धीर । नाहीं बुद्धि एक स्थिर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- अंतर-मन, अंतःकरण, कारण-कार्य.

अर्थ:- अंतःकरणात जर सद्भाव नसेल तर मग वरवरचे बाह्य सोंग जळून जावो. १ जर वाईटानेच चांगले म्हणवून घ्यायला सुरुवात केली तर मग होणारे कार्यच बुडाले असे समजावे. २ कोणत्याही कामात वृथा तातडी केली तर ते काम नासून जाते आणि योग्य कामात तातडी केली की कार्यपूर्तीने संतोषही होतो.३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याची बुद्धी एका ठिकाणी स्थिर नाही त्याला धैर्य कधीच येत नसते.४

३१३७ चित्ताचें बांधलें जवळी तें वसे । प्रकाशीं प्रकाशे सर्वकाळ ॥ १ ॥
अंतरीं वसावी उत्तम ते भेटी । होऊं कांहीं तुटी न सकेचि ॥ २ ॥
ब्रह्मांड कवळे आठवणेसाटीं । धरावा तो पोटीं वाव बरा ॥ ३ ॥
तुका म्हणे लाभ घरिचिया घरीं । प्रेमतंतु दोरी न तुटतां[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- चित्ताचें-चित्ताने.

अर्थ.- देवास एकदा आपल्या चित्ताने बांधून ठेवल्यावर तो आपल्याच जवळ वसत असतो. त्यामुळे त्याच्या प्रकाशाने आपले अंतःकरण सतत प्रकाशित राहाते. १ आपल्या अंतःकरणामध्ये ईश्वराची वसती असावी ही फार उत्तम गोष्ट आहे. त्यामुळे त्याचा वियोग कधीच होऊ शकणार नाही २ याची आठवण झाली की ब्रह्मांडास कवळल्यासारखे होईल. म्हणून आठवणीने त्याला आपल्या पोटातच वाव द्यावा हे बरे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रेमाच्या तंतूची दोरी न तुटता याचा लाभ घरच्या घरीच होत असतो. ४

३१३८ दुखवलें चित्त आजिच्या प्रसंगें । बहु पीडा जगें केली देवा ॥ १ ॥
कधीं हा संबंध तोडिसी तें नेणें । आठवूनि मनें पाय असें ॥ २ ॥
आणिकांची येती अंतरा अंतरें । सुखदुःख बरेंवाइट तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे घडे एकांताचा वास । तरिच या नास संबंधाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- अंतरा-अंतःकरणात, अंतरें-अंतरते.

अर्थ :- देवा, या जगाने आज मला फार पीडा केली रे. त्यामुळे या प्रसंगाने माझ्या चित्तास फारच दुःख झाले. १ देवा, मी तुमचे पाय माझ्या मनात आठवण करून धरीत आहे. या जगाचा व माझा संबंध तू कधी तोडशील हे काही मला समजत नाही. २ अनेक लोकांची बरी वाईट सुखदुःखे माझ्या अंतःकरणात आल्यामुळे देवा, तुझ्या सेवेत मात्र अंतर पडते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जर मला एकान्ताचा वास घडेल तरच जगाच्या या संबंधाचा नाश होऊ शकेल. ४

३१३९ धनवंत एक बहिर[3] अंधळे । शुभ्र कुष्ठ काळे भोग अंगीं ॥ १ ॥
प्रारब्धाची गति न कळे विचित्र । आहे हातीं सूत्र विठोबाचे ॥ २ ॥
आणीक रोगांचीं नांवें घेऊं[4] किती । अखंड असती जडोनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे नष्ट संचिताचें दान । पावे खातां पण सुख नेदी ॥ ४ ।

१ जळो, २ तुटता, ३ बहिरट, ४ सांगो.

शब्दार्थ व टीपा – बहिर–बहिरे.

अर्थ – कित्येक घनवतात एक बहिरा असतो तर दुसरा आधळा असतो किंवा काहींना पांढरे अथवा काळे कुष्ट अंगी येऊन भोग भोगावे लागतात १ अशी ही प्रारब्धाची गती विचित्र असून तिचे टाहोच समजत नाही हे सर्व सूत्र त्या विठोबाच्या हाती आहे २ मी आणखी रोगाची चिंती म्हणून काय घेऊ ? अनेक रोग अगासी जडलेले असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, नष्ट अशा सचिनाचे दान मिळते, पण त्याचा उपभोग घेण्याने सुख मिळत नाही. ४

३१४० भेदाभेदताळा न घडे घालितां । आठवा रे आता नारायणा ॥ १ ॥
येणे एक केले अवघें होय साग । अच्युताच्या योगें[1] नामें छंदें ॥ २ ॥
भोवरे खळाळ चोर वाटा घेती । पावल मारिती सिवेपाशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें भावेविण पार । न पविजे सार हेंचि आहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ताळा–ताळमेळ, हिशेब, साग–परिपूर्ण, पावले–येणारे.

अर्थ – भेदाभेदाचा ताळमेळ घालावयास गेले तर तो काही घातला जात नाही यासाठी तू नारायणाची आठवण कर १ या अच्युताच्या योगाने, याच्या नामाच्या छंदाने सव काही पूर्ण होते २ नदीमधील भोवऱ्याप्रमाणे व खळाळाप्रमाणे चोर चोरवाटेने येतात व शिवेपर्यंत येणारे जे कुणी आहेत त्याना लुबाडतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून येथे श्रीहरीवर भाव ठेविल्याचाचून ससारसागरातून पार पडता येणार नाही हेच एक सारभूत असे तत्त्व आहे ४

३१४१ जे गाती अखंड विठ्ठलाचे गीत । त्यांचे पायीं चित्त ठेवीन मी ॥ १ ॥
जयासी आवडे विठ्ठलाचे नाम । ते माझे परम प्राणसखे ॥ २ ॥
जयासी विठ्ठल आवडे लोचनीं । त्याचें पायवणी स्वीकारीन ॥ ३ ॥
विठ्ठलासी जिहीं दिला सर्व भाव । त्याच्या पायीं ठाव[2] मागईन ॥ ४ ॥
तुका म्हणे रज होईन चरणींचा । म्हणविती त्याचा हरिचे दास ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – लोचनीं–डोळयानी, पायवणी–पायाच तीर्थ, जिहीं–ज्यानी, रज–कण.

३१४६ राहो येचि ठायीं । माझा भाव तुझे पायीं ॥ १ ॥
करीन नामाचे चिंतन । जाऊ नेदीं कोठें मन ॥ २ ॥
देईन ये रसीं । आता बुडी सर्वविशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । साटी करोनिया जीवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नेदी–देणार नाही

*अर्थ* – देवा, माझा आता भाव तुझ्याच पायाच्या ठिकाणी राहो १ मी सर्वकाळ तुझ्या नामाचेच चिंतन करीन माझ्या मनाला इतरत्र कुठेही भटकू देणार नाही २ आता या भक्तिरसात अथवा ऐक्यरसात मी सर्व-भावांनी बुडी देईन ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी हे सर्व माझ्या जीवावर उदार होऊन करीत आहे ४

३१४७ तैसे नव्हो[1] आम्ही विठ्ठलाचे[2] दास । यावें आणिकास काकुलती ॥ १ ॥
स्वामिचिया सत्ता ठेंगणे सकळ । आला कळिकाळ हाताखालीं ॥ २ ॥
अंकिताचा असे अभिमान देवा । समर्पूनि हेवा असों पायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हा इच्छेचे खेळणें । कोड नारायणें पुरवावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंकिताचा–सेवकाचा, हेवा–हाव, कोड–इच्छा

अर्थ – इतर अनेक दैवताना काकुळतीस येऊन विनवावे असे काही आम्ही विठ्ठलाचे दास नव्होत १ या स्वामीच्या सत्तेमुळे आम्हास ब्रह्मांड ठेंगणे होऊन गेलेले आहे व प्रत्यक्ष कळिकाळही आमच्या हाती आलेला आहे २ देवास आम्हा सेवकाचा अभिमान वाटत असतो म्हणून आम्ही आपली हाव देवाच्या चरणी अर्पण केलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आपल्या इच्छेप्रमाणे खेळ खेळत आहोत नारायणाने आमची सर्व इच्छा पूर्ण करावी ४

३१४८ मोक्ष देवापाशीं नाहीं । लटिक्या घाई विळवतें[3] ॥ १ ॥
काय खरें न धरी शुद्धी । गेली बुद्धी भ्रमलें ॥ २ ॥
अहंकारास उरलें काई । पांचाठायीं हें वांटे ॥ ३ ॥
तुका म्हणे कुये भारें । लटिके खरें मानुनिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खरें–गाढवाने पांचाठायीं–पाच महाभूताच्या ठिकाणी

अर्थ – मोक्षाचा ठेवा काही देवाजवळ नसतो तो तुझ्याजवळच असून तू उगाचच देहाच्या अभिमाने विव्हळत असतोस १ असल्या या गाढवाने शुद्धी काय म्हणून धरू नये ? याची बुद्धी नष्ट झाल्यामुळे भ्रमल्या-सारखाच झाला आहे हा २ देहाच्या अहंकाराचा नाश झाल्यावर, त्यातील पाच महाभूते विरून गेल्यावर मग काय उरणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, खोट्या देहाला खरे मानून त्याच्या अभिमानाने लोक उगाचच कुथत असतात ४

३१४९ आपला तो एक देव करुनि घ्यावा । तेणेंविण जीवा सुख नव्हे ॥ १ ॥
येर तीं माइके दुःखाचीं जनितीं । नाहीं आदिअंतीं अवसान ॥ २ ॥
अविनाश करी आपुलिया ऐसे । लावीं मना पिसे गोविंदाच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे एका मरणेंचि सरें । उत्तमचि उरे कीर्ति मागें ॥ ४ ॥

१ नव्हे, २ विठोबाचे ३ विवळतो.

शब्दार्थ व टीपा :- येर-इतर, दुसरे, जनितीं-जन्म देणारी, अवसान-शेवटच्या प्रसंगी, पिसे-वेड

अर्थ :- हा एक देव तुम्ही आपलासा करून घ्यावा. त्याशिवाय तुमच्या जीवाला कधीच सुख होणार नाही. १ या देवावाचून इतर सर्व गोष्टी माहित असून दुःखालाच जन्म देणाऱ्या आहेत शेवटच्या प्रसंगी आश्रिती करेल असे सुख देण्याचे सामर्थ्य कुणाच्यातच नाही २ आपल्या मनास तुम्ही या गोविंदाचे वेड लावून घ्या आणि ही अविनाशी वस्तू आपलीशी धरून घ्या ३ तुकाराम महाराज म्हणतात, एवढे केल्याने तुम्ही एका मरणातूनच मुक्त व्हाल; अनेक वेळा जन्ममृत्यूचे कारण राहणार नाही व उत्तम अशी श्रेष्ठ प्रकारची कीर्ती तुमच्या मागे उरेल ४

३१५० आजिचे हे मज तुम्हीं कृपादान । दिले संतजन मायबापीं ॥ १ ॥
आलीं मुखावाटा अमृतवचने । उत्तीर्ण[1] तीं येणे नव्हे जन्में ॥ २ ॥
तुका म्हणे तुम्हीं उदार कृपाळ । शृंगारिले बाळ कवतुके ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- उत्तीर्ण-उतराई.

अर्थ :- तुम्ही मायबाप संतजनांनी मला दर्शन देऊन आजचे हे कृपादान दिलेले आहे १ तुमच्यामुळेच माझ्या मुखातून ही अमृतासारखी वचने बाहेर येत आहेत मी या जन्मी काही तुमच्या उपकारातून उतराई होईन असे वाटत नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही उदार व कृपाळू असून कौतुकाने या बालकास अलंकार घालून शृंगारले आहे ३

३१५१ स्तुती अथवा निंदा करावी देवाची । अधम तो वेची व्यर्थ वाणी ॥ १ ॥
आइकोनि होती बहिर हे बोल । वेचूनि ते मोल नरका जाती ॥ २ ॥
इह लोकीं थुका उडे[2] तोंडावरी । करणे अघोरीं वास लागे ॥ ३ ॥
तुका म्हणे माय वाचेऐसे निके । भरले नरके निंदेसाटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वेची-खर्च करतो, इहलोकीं-या लोकात, अघोरीं-अघोर अशा नरकात, निके-चांगले.

अर्थ :- जी काय स्तुती अथवा निंदा करावयाची असेल ती देवाची करावी याखेरीज जो आपली वाणी इतरत्र खर्च करतो तो अधमच म्हणावा लागेल १ माझे हे बोलणे कुणीच ऐकत नाहीत लोक बहिरेच होतात. पण इतरत्र मात्र नाना साधने करण्यासाठी द्रव्य खर्चून नरकास मात्र जातात. २ अशा लोकांच्या तोंडावर या लोकी थुका उडतोच पण मेल्यानंतरही त्यांना अघोर असा नरकवास भोगावा लागतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, वाणीसारखे उत्तम माप केवळ दुसऱ्याची निंदा केल्याने भरले जाते ४

३१५२ लोह कफ गारा सिद्ध हे सामुग्री । अग्नि टणत्कारी दिसो येतो ॥ १ ॥
सांगावे ते काई सागावे ते काई । चित्ता होय ठायीं अनुभव तो ॥ २ ॥
अन्नें सांगो येतो तृप्तीचा अनुभव । करूनि उपाव घेऊ हेवा ॥ ३ ॥
तुका म्हणे मिळे जीवनीं जीवन । तेथें कोणा कोण नाव[3] ठेवी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- लोह-लोखंड, कफ-कापूस, टणत्कारी-घर्षणाने, उपाव-उपाय, हेवा-हाव, जीवनीं-जीवन-पाण्यामध्ये पाणी

शब्दार्थ व टीपा - लोखंड, कापूस, गारा ही सामग्री एकत्र झाली की त्याच्या घर्षणाने अग्नीची निर्मिती दिसू लागते. १ यासंबंधी आणखी काय सांगावे ? तुम्ही चित्त एका ठिकाणी करा म्हणजे तुम्हास हा अनुभव येईल २ अन्न खाऊन पाहिल्यानेच तृप्त झाल्याचा अनुभव येईल असाच उपाय करून आम्ही याची हाव धरू ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा पाण्यात पाणी मिसळल्यावर मग कोण कोणत्या पाण्यास नावे ठेवणार ? ४

१ उत्तीर्णता येणें, २ पडो ३ नावे

एकसरें आज्ञा केली । असों चाली ते नीती[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे जोहारितों । आहें होतों ते ठायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- बाहीं-बाजूंस, कास-कसोटा एकसरें-एकदम, जोहारितों-नमस्कार करतो.

अर्थ :- भोवतालचे जगत व देवा तुम्ही; अशा दोनही बाजूंस निवास करून आम्ही कास घालून खबीर-पणे उभे आहोत. १ स्वामींची सत्ता व सेवकाची सेवा असे उभय प्रकारचे बोलणे आम्ही बोलू. २ तुम्ही जी आज्ञा एकदम केली ती आम्ही नीटपणे चालवू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी ज्या ठिकाणी पूर्वी होतो तेथेच असून तेथून मी तुम्हांला नमस्कार करतो. ४

३१५७ ऐका जी देवा माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
सन्निध पातलों सांडूनियां[2] शंका । सन्मुखचि एकाएकीं पुढें ॥ २ ॥
जाणविलें कोठें पावे पायांपाशीं । केलो या जिवासी साटी म्हूण ॥ ३ ॥
तुका म्हणे माझे हातीं द्या उद्धार । करीं करकर म्हणवूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- सन्निध-जवळ, पातलों-येऊन पोचलो, करकर-कटकट.

अर्थ :- अहो देवा, माझी एक विनवणी ऐका ना. मी तुमच्या चरणांवर मस्तक ठेवीत आहे १ मी सर्व प्रकारच्या शंका सोडून तुमच्याजवळ एकाएकी पुढे येऊन उभा राहिलो आहे. २ मी माझ्या जीवावर उदार होऊन तुमच्या पायांपाशी येऊन सर्व काही समजावून सांगितले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात मी फारच कटकट करीत आहे. म्हणून माझ्या हाती उद्धाराचे दान द्या ना. ४

३१५८ बैसलों तों कडियेवरी । नव्हे दुरी वेगळा ॥ १ ॥
घडलें हें बहुया[3] दिसां । आतां इच्छा पुरवीन ॥ २ ॥
बहु होता जाला सीण । नाहीं क्षण विसांवा ॥ ३ ॥
दुःखी केलें मीतूंपणें । जवळी नेणें होतें तें ॥ ४ ॥
पाहात जे होतों वास । तेचि आस पुरविली ॥ ५ ॥
तुका म्हणे मायबापा । झणी कोपा विठ्ठला ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:- बहुवा-पुष्कळ, वास-वाट, आस-इच्छा, झणी-नको.

अर्थ :- देवा, मी आता तुमच्या कडेवर बसलो आहे, तेथून मी काही आता दूर होणार नाही; वेगळा होणार नाही. १ फार दिवसांनी हे घडून आले आहे. आता मी माझ्या मनाची इच्छा पूर्ण करीन. २ आजपर्यंत मला

३१५३ बाळाचे जीवन । माता जाणें भूक तान ॥ १ ॥
काय करूं विनवणी । असो मस्तक चरणीं ॥ २ ॥
ठेविलिये ठायीं । चित्त ठेवुनि असे पायीं ॥ ३ ॥
करितो हे सेवा । चिंतन सर्वां ठायीं देवा ॥ ४ ॥
न्यून तेंचि पुरें । घ्यावें करोनि दातारें ॥ ५ ॥
तुका म्हणे बुद्धि । अल्प असे अपराधी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – न्यून-कमी

अर्थ – बाळाला लागणारी तहानभूक व त्याच्या जीवनाच्या आवश्यक गोष्टी आईच नीटपणे जाणीत असते १ मी आणखी विनवणी कोणती करू ? माझे मस्तक आपल्या चरणावर असो २ तुम्ही ज्या ठिकाणी मला ठेवाल त्या ठिकाणी मी चित्त ठेवून राहीन ३ देवा तुम्ही सर्वत्र आहात असे जे मी चिंतन करीत आहे तीच माझी सेवा आहे ४ दातारा, जे काही कमी असेल ते तुम्ही पुरते करून घ्यावे ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी अपराधी असून माझी बुद्धी अतिशय अल्प अशी आहे ६

३१५४ जाणतों समये । परि मत[1] कामा नये ॥ १ ॥
तुम्ही सांगावे तें बरे । देवा सकळ विचारें ॥ २ ॥
फुकाचिये पुसी । चिंता नाहीं होते ऐसी ॥ ३ ॥
तुका म्हणे आहे । धर पाय मज साहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पुसी-पुसण्याने, विचारपूस केल्याने, धर-आधार, साहे-साह्य

अर्थ – मी चांगला समय जाणून असतो पण माझे मत कुणास आवडत नाही अथवा माझे परिमित आचरण कुणाच्याच कामास येत नाही १ यासाठी देवा, सर्व प्रकारचा विचार करून तुम्हीच सांगावे हे बरे २ तुमची विचारपूस केल्याने आमचे काही खर्च होत नाही, उलट आमची चिंता नाहीशी होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला आधार तुमच्या पायाचाच आहे मला तुम्ही साह्य करावे ४

३१५५ द्वारपाळ विनंती करी । उभे द्वारीं राउळा ॥ १ ॥
आपुलिया शरणागता । वाहो चिंता नेदावी[2] ॥ २ ॥
वचना या चित्त द्यावे । असो ठावें पायासी ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपासिंधू । दीनबंधू केशवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – राउळा-देवळाच्या

अर्थ – देवा या देवळाच्या दारात मी द्वारपाल म्हणून उभा असून एक विनंती करीत आहे १ ती ही की, तुम्हास शरण आलेल्या दासाला कोणतीही चिंता उरू देऊ नका २ देवा, तुम्ही माझ्या या वचनाकडे चित्त द्यावे आपल्या पायापाशी हे सव माहीत असावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, केशवा, तुम्ही कृपासिंधू व दीनबंधू आहात ४

३१५६ दोहीं वाहीं आम्हा वास । असो कास घालूनि ॥ १ ॥
बोल बोलो उभयता । स्वामीसत्ता सेवेची ॥ २ ॥

---

१ परमित, २ न द्यावी

एकसरें आज्ञा केली । असों चाली ते नीती[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे जोहारितों । आहें होतों ते ठायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाहीं–बाजूंस, कास–कसोटा एकसरें–एकदम, जोहारितों–नमस्कार करतो.

अर्थ :– भोवतालचे जगत व देवा तुम्ही; अशा दोनही बाजूंस निवास करून आम्ही कास घालून खंबीरपणे उभे आहोत. १ स्वामींची सत्ता व सेवकाची सेवा असे उभय प्रकारचे बोलणे आम्ही बोलू. २ तुम्ही जी आज्ञा एकदम केली ती आम्ही नीटपणे चालवू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी ज्या ठिकाणी पूर्वी होतो तेथेच असून तेथून मी तुम्हांला नमस्कार करतो. ४

३१५७ ऐका जी देवा माझी विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसें ॥ १ ॥
सन्निध पातलों सांडूनियां[2] शंका । सन्मुखचि एकाएकीं पुढें ॥ २ ॥
जाणविलें कोठें पावे पायांपाशीं । केली या जिवासी साटी म्हूण ॥ ३ ॥
तुका म्हणे माते हातीं द्या उद्धार । करीं करकर म्हणवूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सन्निध–जवळ, पातलों–येऊन पोचलो, करकर–कटकट.

अर्थ :– अहो देवा, माझी एक विनवणी ऐका ना. मी तुमच्या चरणांवर मस्तक ठेवीत आहे १ मी सर्व प्रकारच्या शका सोडून तुमच्याजवळ एकाएकी पुढे येऊन उभा राहिलो आहे. २ मी माझ्या जीवावर उदार होऊन तुमच्या पायांपाशी येऊन सर्व काही समजावून सांगितले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात मी फारच कटकट करीत आहे. म्हणून माझ्या हाती उद्धाराचे दान द्या ना. ४

३१५८ बैसलों तों कडियेवरी । नव्हें दुरी वेगळा ॥ १ ॥
घडलें हें वहुवा[3] दिसां । आतां इच्छा पुरवीन ॥ २ ॥
बहु होता जाला सीण । नाहीं क्षण विसांवा ॥ ३ ॥
दुःखी केलें मीतूंपणें । जवळी नेणें होतें तें ॥ ४ ॥
पाहात जे होतों वास । तेचि आस पुरविली ॥ ५ ॥
तुका म्हणे मायबापा । झणी कोपा विठ्ठला ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– बहुवा–पुष्कळ, वास–वाट, आस–इच्छा, झणी–नको.

अर्थ :– देवा, मी आता तुमच्या कडेवर बसलो आहे, तेथून मी काही आता दूर होणार नाही; वेगळा होणार नाही. १ फार दिवसांनी हे घडून आले आहे. आता मी माझ्या मनाची इच्छा पूर्ण करीन. २ आजपर्यंत मला फारच शीण झाला होता. एक क्षणभरसुद्धां विसावा मला नव्हता. ३ मीतूपणाच्या विचाराने मला दुःखी केले होते. त्यामुळे तुम्ही जवळ असूनही मी ते जाणले नाही. ४ आजपर्यंत मी ज्याची वाट पहात होतो तीच माझ्या मनाची इच्छा आज पूर्ण झाली. ५ तुकाराम महाराज म्हणतात, मायबापा, तुम्ही आता माझ्यावर रागावू नका. ६

३१५९ तुझें नाम मुखीं तयासी विपत्ति । आश्चर्य हें चित्तीं वाटतसे ॥ १ ॥
काय जाणों काय[4] होसील निजला । नेणों जी विठ्ठला मायबापा ॥ २ ॥
भवबंधनाचे तुटतील फांसे । तें कां येथें असे[5] अव्हेरिलें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें दचकलें मन । वाटे वांयांविण श्रम[6] केला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वांयांविण–व्यर्थ.

१ गोती, २ टाकोनिया, ३ बहुता, ४ देवा, ५ ऐसे, ६ शीण.

अर्थ – देवा, तुझे नाम ज्याच्या मुखात आहे त्याला विपत्ती येते हे मोठे आश्चर्यच माझ्या चित्तास वाटते १ विठ्ठला, मायबापा तुम्ही निजलेले आहात हे मी कसे काय जाणावे, मला काही समजत नाही २ या ठिकाणी संसारबंधनातले फासे तुटणारे आहेत त्याचा तुम्ही हा असा अव्हेर का केला हो ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे पाहून माझे मन दचकून गेले उगाच हा खटाटोप व्यर्थ केला, व्यर्थ श्रम झाले असे वाटते ४

३१६० सेवके करावे सांगितले काम । सिवयाचा तो धर्म स्वामी राखे ॥ १ ॥
काय देवा नेणो आले गाढेपण । तुम्ही शक्तिहीन जाले दिसा ॥ २ ॥
विष्णुदास आम्ही निर्भर ज्याबळे । ते दिसे या काळे अव्हेरिले ॥ ३ ॥
तुका म्हणे मूळ पाठवा लौकरी । किंवा हरी काय करू सांगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाढेपण–दुबळेपण भित्रेपण, निर्भर–निष्काळजी, निश्चित, मूळ–आमंत्रण

अर्थ – सेवकाने सांगितलेले काम करावे आणि सिवयावा, स्वामित्वाचा जो काही धर्म असेल तो स्वामीने रक्षण करावा १ असे असूनही देवा, तुम्हाला हे दुबळेपण कशामुळे आले आहे ते काही समजत नाही तुम्ही तर शक्तिहीन झाले आहात असे दिसते २ ज्या बळावर आम्ही विष्णुदास निश्चित राहतो ते बळ या समयास नाहीसे झालेले दिसले ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही मला घेऊन जाण्यासाठी लौकर आमंत्रण पाठवा श्रीहरी, मी येथे काय करू ते सांगा ४

३१६१ खेळता[1] न भ्याचे समर्थाच्या बाळें । तयाच्या सकळ सत्तेखालीं ॥ १ ॥
तरी लेवविला शोभे अळंकार । नाहीं तरी भार मानाविण ॥ २ ॥
अवघीच दिशा असावी मोकळी । मायबाप बळी म्हणऊनि ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें ऐसे आहे देवा । म्हणऊनि सेवा समर्पिली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बळी–सामर्थ्यवान

अर्थ – सामर्थ्यवान आईबापाच्या मुलाने खेळ खेळताना भिऊ नये कारण त्याच्या सत्तेखाली सर्व काही असते सवजण त्याचीही सत्ता मानतात १ असे असले तरी त्याला एखादा अलंकार घातला तर तो शोभून दिसतो पण सामर्थ्यवान आईबापाचा मान नसेल तर मात्र तो ओझ्याप्रमाणे वाटतो २ आईबाप सामर्थ्यवान असल्याने मुलाला सव दिशा मोकळ्याच असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे हे असेच असल्याने मी ही सेवा तुम्हास समर्पण केली आहे ४

३१६२ निरंजनीं[2] एकटवाणें । संग नेणे दुसरा ॥ १ ॥
पाहा चाळविले कैसे । लावुनि पिसे गोवळे ॥ २ ॥
लपले अगें अंग । दिला संग होता तो ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हतें ठावे । जाले भावे वाटोळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निरंजनीं–प्रकाशरूप अवस्थेत, पिसे–वेड.

अर्थ – प्रकाशरूप अशा अवस्थेत मी एकटाच होतो तेथे कुणाचीही दुसऱ्याची सोबत नव्हती १ या गोपाळाने मला आपले वेड लावून कसे फसविले पाहा २ याने आपली सोबत मला दिल्यामुळे त्याच्या अंगात माझे अंग लपून गेले ३ तुकाराम महाराज म्हणतात, देव असे करील हे मला माहीत नव्हते त्याच्यावरील माझ्या भावाने माझ्या अस्तित्वाचा हा असा नाश झाला आहे ४

---

१ खेळता निजमाय समर्थाचे बाळ, २ निरांजनी

३१६३ नव्हती भेटी तोंचि बरें । होतां चोरें नाडिलें ॥ १ ॥
अवघियांचा केला झाडा । रिता वाडा खोंकर ॥ २ ॥
चिंतनाचें मूळ चित्त । नेलें वित्त हरूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे मूळा आलें । होतें केलें तैसेंचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नाडिलें–फसविले, खोंकर–मोडकळीस आलेला, पडका

अर्थ :– त्याची भेट झाली नव्हती तोपर्यंत बरे होते. पण भेट झाल्यावर मात्र या चोराने मला फसविले. १ या माझ्या देहाचा वाडा मोडकळीस आलेला होता, त्याचा अनेक विकारांसाठी झाडा घेऊन तो रिकामा केला. २ त्याच्या चिंतनाचे मूळ जे चित्त तेच द्रव्य त्याने हरण करून नेले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी जसे केले होते तेच मला प्राप्त झाले आहे ४

३१६४ जये ठायीं आवडी ठेली । मज ते बोली न संडे ॥ १ ॥
पुरवावें जीवींचें कोड । भेटी गोड तुज मज ॥ २ ॥
आणिलें तें येथवरी । रूप दुरी न करावें ॥ ३ ॥
तुका म्हणे नारायणा । सेवाहीना धिग वृत्ति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठेली–ठेवली, न संडे–सोडवत नाही, कोड–इच्छा.

अर्थ :– देवा, ज्या ठिकाणी माझी आवड राहिलेली आहे ते बोलणे मला सोडवत नाही. १ तुम्ही माझ्या मनातील इच्छा पूर्ण करावी. तुमची भेट यामुळे मला गोड वाटेल २ देवा, ज्या रूपाने तुम्ही येथवर आला आहात ते माझ्यापासून दूर करू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, सेवा माझ्याकडून होत नसल्यामुळे माझ्या वृत्तीला धिकार असो. ४

३१६५ सरलियाचा सोस मनीं । लाजोनियां राहिलों ॥ १ ॥
आवडीनें बोलावितों । येथे तें तों लपावें ॥ २ ॥
माझें तेंचि मज द्यावें । होतें भावें जोडिलें ॥ ३ ॥
तुका म्हणे विश्वंभरा । आळीकरा बुझावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सोस–हौस, हाव, आळीकरा–हट्ट करणाऱ्या मुलास, बुझावा–समजूत काढा.

अर्थ :– जे सरले आहे त्याचीच हाव माझ्या मनात असून मी त्यामुळे लाजून राहिलो आहे. १ मी तुला मोठ्या आवडीने बोलावतो, तर तू आपला लपूनच राहातोस. २ जे मोठ्या भावाने मी तुझे रूप मिळविले होते ते माझेच असल्याने मला द्यावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विश्वंभरा, हट्ट करणाऱ्या या मुलाची समजूत तुम्ही काढावी. ४

३१६६ नाचावेंसें वाटे मना । छंद गुणा अधीन ॥ १ ॥
चेष्टविलीं माझीं गात्रें । सत्तासूत्रें हालती[1] ॥ २ ॥
नामरूपें रंगा आलीं । तेचि चाली स्वभावें ॥ ३ ॥
तुका म्हणे पांडुरंगें । अंग संगें कवळिलें[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चेष्टविलीं–चाळविली, कार्यप्रवृत्त केली.

१ हालविती, २ कवळिली.

अर्थ :– माझ्या मनास नाचावेसे वाटते. याच गुणांच्या छंदाच्या आधीन मी झालो आहे. १ या प्रभूने माझी सर्व इंद्रिये हातात सत्तेचे सूत्र घेऊन कार्यप्रवृत्त केली. २ श्रीहरीच्या नामरूपाच्या रंगांत तो रंगल्यामुळे त्यांची प्रवृत्तीही सहजच तिकडे झाली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला या पांडुरंगाने आपल्या अंगसंगाने कवटाळून घेतले आहे. ४

३१६७ खेळतों ते खेळ पायांच्या प्रसादें । नव्हती हीं छंदे नासिवंतें ॥ १ ॥
माझा मायबाप उभा विटेवरी । कवतुकें करी कृपादान ॥ २ ॥
प्रसादाची वाणी वदे[1] तीं उत्तरें । नाहीं मतांतरें जोडियेलीं ॥ ३ ॥
तुका म्हणे रस वाढितिया[2] अंगें । छाया पांडुरंगें केली वरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नासिवंतें–नाशवंत, नाहीसे होणारे

अर्थ :– मी जे काही खेळ खेळत आहे ते श्रीहरीच्या पायांच्या प्रसादानेच खेळतो. हे माझे छंद काही नाहीसे होणारे नाहीत. १ माझा हा मायबाप विटेवर उभा असून मोठ्या कौतुकाने कृपेचे दान करीत आहे. २ माझ्या मुखातून प्रकट होणारे सर्व शब्द प्रासादिक आहेत. त्यांत मी माझ्या बुद्धीने काही मतमतांतरे जोडून दिलेली नाहीत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा माझ्या शब्दांतील रस वाढत्या अंगाने असून माझ्यावर या पांडुरंगाने बरी छाया केलेली आहे. अथवा या प्रसादाचा रस त्याच्यामुळेच वाढत असून पांडुरंगाने माझ्यावर बरी छाया केली आहे. ४

३१६८ अखंड मुडतर । सासुरवास करकर ॥ १ ॥
याची जाली[3] बोळवण । आतां न देखों तो शीण ॥ २ ॥
बहुतांची दासी । तये घरीं सासुरवासी ॥ ३ ॥
तुका म्हणे मुळें । खंड जाला एका[4] वेळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मुडतर–दुःख, दैन्य, करकर–कटकट.

अर्थ :– दुःखदायक, दैन्यवाणी अशा सासुरवासाची कटकट सतत होत होती. १ पण आता याची बोळवण झाली असल्याने आता मला कसलेही दुःख कधी होऊ शकत नाही. २ ही मूढता अशी आहे की पुष्कळ दासींना तिच्या घरी सासुरवास होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, परंतु आज मात्र याच्यामुळे या सासुरवासाचा खंड झाला, सासुरवासाची कटकट नाहीशी झाली किंवा हा सासुरवास मुळापासून संपला. ४

३१६९ अवघा भार वाटे देवा । संतसेवा न घडतां ॥ १ ॥
कसोटी हे असे हातीं । सत्य भूतीं भगवंत ॥ २ ॥
चुकलोंसा दिसें पंथ । गेले संत तो ऐसा ॥ ३ ॥
तुका म्हणे सोंग वांयां । कारण या अनुभवें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पंथ–मार्ग.

अर्थ :– देवा, संतसेवेशिवाय इतर सर्व गोष्टींचा मला भार वाटतो. १ सर्व भूतमात्रांत सत्यत्वाने भगवंत आहे अशी कसोटी हाती यावी. २ संत ज्या मार्गाने गेले तो मार्ग मी चुकलो की काय असे मला वाटते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या अनुभवावरून मला असे वाटते की, संतसेवेवाचून सर्व सोंग व्यर्थच आहेत. ४

१ वदती उत्तरे, २ वाढीतया, ३ जालिया, ४ एक.

३१७० आतां तुम्ही कृपावंत । साधु संत जिवलग ॥ १ ॥
गोमटें ते करा माझें । भार ओझें तुम्हांसी ॥ २ ॥
वंचिलें तें पायापाशीं । नाहीं यासीं वेगळें ॥ ३ ॥
तुका म्हणे सोडिल्या गांठी । दिली मिठी पायांसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोमटें–चांगले, वंचिले–लपविले, दडविले.

अर्थ :– तुम्ही कृपावंत असे साधुसंतच माझे जिवलग असे आप्त आहात १ माझे जे काही चांगले असेल ते करा माझा सर्व भार तुमच्यावर आहे २ आतापर्यंत मी आपल्यापासून जे दडविले ते आता यापुढे निराळे नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता विकल्पाच्या गाठी सोडून मी तुमच्या पायावर मिठी मातली आहे ४

३१७१ सुख वाटे परी वर्म । धर्माधर्म न कळे ॥ १ ॥
गायें नाचें एवढें जाणे । विठ्ठल म्हणे निर्लज्ज ॥ २ ॥
अवघे माझें एवढें धन । साधन हीं सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे पायां पडें । तुमच्या कोडें संतांच्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा '– कोडें–कौतुकाने.

अर्थ – मला सुख वाटले तरी धर्म काय व अधर्म काय याचे मर्म काही कधीच समजत नाही १ निर्लज्ज होऊन विठ्ठल विठ्ठल म्हणावे, गावे, नाचावे एवढेच मी जाणतो २ माझे हेच एक सर्व धन साधनरूपाने आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी मोठ्या कौतुकाने तुमच्या पाया पडत आहे. ४

३१७२ धरिलीं जीं होतीं चित्तीं । डोळा तींच दिसती ॥ १ ॥
आले आवडीस फळ । जाले कारण सकळ ॥ २ ॥
घेईन भातुकें । मागोनिया कवतुकें ॥ ३ ॥
तुका म्हणे लाड । विठोबा पुरवील कोड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– कारण–कार्य, भातुकें–गोड खाऊ, कोड–इच्छा

अर्थ :– जे प्रिय दर्शन मी माझ्या चित्तात धरून ठेविले होते तेच माझ्या डोळ्यापुढेही दिसू लागले १ माझ्या आवडीला फळ येऊन सर्व कार्य सिद्धीस गेले २ मी आता कौतुकाने प्रेमाचा खाऊ मागून घेईन ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा विठोबा माझे सर्व लाड व माझ्या इच्छा पूर्ण करील. ४

३१७३ बहुतां दिसांची आजि जाली भेटी । जाली होती तुटी काळगती ॥ १ ॥
येथें सावकाश घेईन ते धणी । गेली अडचणी उगवोनि ॥ २ ॥
बहु दुःख दिलें होतें घरीं कामें । वाढला हा श्रमें श्रम होता ॥ ३ ॥
बहु दिस होता पडिला[1] मारग । क्लेशाचा त्या त्याग आजि जाला ॥ ४ ॥
बहु होती केली सोगसंपादणी । लौकिकापासूनि निर्गमलें ॥ ५ ॥
तुका म्हणे येथें जालें अवसान । परमानंदीं मन विसावलें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– काळगती–विपरीत काळाच्या योगाने, धणी–तृप्ती, उगवोनि–सुटून, कामें–कामनांनी वासनांनी, पडिला–सुटला, विसरला, निर्गमले–मुक्त झालो, अवसान–शेवटच्या प्रसंगी, अखेरीस

1. साडिला

महाराज सांगतात, ' राउळें तितुकें प्रमाण । तेथील तृण आणि पाषाण । तेहि देव जाणावे ', 'अवघी पंढरी भूवैकुंठ नगरी । मांडतसे हरि सर्व काळ ' ' इनामाची भरली पेठ । भूवैकुंठ पंढरी ' अगाध भूवैकुंठ नगरी। पंढरी हे चराचरी ' इत्यादी ओळीतून चोखोबानी या भूवैकुंठाचे वर्णन केले आहे 'धन्य धन्य हे नगर। भूवैकुंठ पंढरपूर । पंढरीचे सुख पुंडलिकासी झालें। तेणेंहि वाटिले भक्तालागीं ' म्हणून श्रीभानुदासानी पंढरपूर व पुंडलीक याचा गौरव केला आहे तुकाराम महाराजानीही अन्यत्र ' पुंडलीकें हाट भरियेली पेठ । अवघें वैकुंठ आणियेले ', ' सकळ तीर्थांचे माहेर । भूवैकुंठ निर्विकार ', ' धन्य ते पंढरी धन्य भीमातीर । आणियेलें सार पुंडलीकें ', ' धन्य तेहि भूमि धन्य तरुवर । धन्य तें सरोवर तीर्थरूप ॥ धन्य त्या नरनारी मुखीं नाम ध्यान । आनंदें भुवन गर्जतसे ॥ धन्य पशुपक्षी कीटक पाषाण । अवघा नारायण अवतरलासे ', ' वाराणसी गया पाहिली द्वारका । परी नये तुका पंढरीच्या ', ' सकळ तीर्थाहूनी । पंढरीनाथ मुकुटमणी । ' धन्य पुंडलिका बहु बरे केले । निधान आणिलें पंढरीयें । ' इत्यादी ओळीमधून पुंडलीक व पंढरपूर याचा मनापासून गौरव केलेला आहे

३१७७ देह मृत्याचे भातुकें । कळो आले कवतुकें ॥ १ ॥
काय मानियेले सार । हेचि वाटतें आश्चर्य ॥ २ ॥
नानाभोगाचीं संचितें । करूनि ठेविलें आइतें ॥ ३ ॥
तुका म्हणे कोडीं । उगवूं न सकती बापुडीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भातुकें-खाऊ

अर्थ – हा देह म्हणजे मृत्यूचा खाऊ असल्याचे सहज मला समजून आले आहे १ असे असताना देहाचो प्रपंचासच लोक सार मानतात, याचे फार मोठे आश्चर्य वाटते मला २ तसे पाहिले तर हे शरीर म्हणजे नाना प्रकारच्या भोगाचे व संचित कर्मांचे एक आयते स्थानच करून ठेवलेले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या संसारात वावरणारी ही दीन बापडी माणसे हे देहाचे व प्रपंचाचे कोडे काही उलगडू शकत नाहीत ४

३१७८ त्यागें[1] भोग माझ्या येतील अंतरा । मग मी दातारा काय करूं ॥ १ ॥
आता असो तुझे पायीं हे मोटळें[2] । इंद्रियें सकळें काया मन ॥ २ ॥
साडीमाडी विधिनिषेधाचा ठाव । न कळता भाव जाइल वाया ॥ ३ ॥
तुका म्हणे आता नको उजगरा । लपवीं दातारा अंगीं मज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतरा-मनात मोटळें-गाठोडे, उजगरा-प्रसिद्धी

अर्थ – लौकिक विषयाचा त्याग मी केला असला तरी त्यायोगेसुद्धा नाना भोग माझ्या मनात येतील दातारा, असे असेल तर मग मी काय करू ? १ म्हणून मी आता माझे हे मन, शरीर, इंद्रिये याचे गाठोडे तुझ्याच पायावर अर्पण करीत आहे २ विविध कर्मांची साडीमाडी करणे अथवा विधिनिषेधाच्या मागे लागणे बरे, पण त्यांचे खरे स्वरूप जर समजले नाही तर केलेले सर्वच वाया जाईल ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, दातारा, मला आता ही असली प्रसिद्धी नको तू आपल्या स्वरूपात मला लपवून ठेव ४

३१७९ दावूनियां बंड[3] । पुरे न करी तें भांड ॥ १ ॥
जळो जळो तैसें जिणें । फटमरें लाजिरवाणें ॥ २ ॥
घेतलें तें सोंग । बरवें संपादावें सांग ॥ ३ ॥
तुका म्हणे धीरें । देव नुपेक्षील खरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बंड-माड, पसारा, भांड-भाडखोर, निर्लज्ज, फटमरे-भित्रे, भ्याड, बरवे-नीट,चांगले, सांग-पूर्ण.

१ त्याग, २ मोटाळें, ३ मांड.

अर्थ :– परमार्थाचा फुकट पसारा मांडतात, पण तो पूर्ण करीत नाहीत; अशा लोकांना निर्लज्जच म्हणावे लागेल १ अशा प्रकारच्या निग्रहास आग लागो अशे जिथे भ्याड भमल्याने लाजिरवाणे असते २ जें आपण सोंग एकदा घेतले असेल त्याची सपादणी नीट पूर्णपणे करावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, देव धैर्यवान लोकांची कधीच उपेक्षा करीत नाही ४

३१८० न पालटे जातो जीवाचिये साटीं । बाहे[1] तेचि पोटीं दावी वरी ॥ १ ॥
अंतरीं सबाहो सारिखाचि रंग । वीट आणि भंग नाही रसा ॥ २ ॥
घणाचिया घायें पोटीं शिरे हिरा । सांडूं नेणे धीरा आपुलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे कढें करावी शीतळ । ऐसे जातिवळ चंदनाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– सबाहीं–बाहेरही, घायें–घावाने, कढें–तप्त

अर्थ :– जी वस्याची जात आहे ती आपले रूप जीव गेला तरी कधी पालटत नाही जे पोटात, अतरगात आहे तेच बाहेरही दाखविले जाते १ त्याच्या अतरगात व बाहेर एकाच प्रकारचा रग असतो त्यात या रसाचा कधी भंग होत नाही की कधी वीट येत नाही. २ घणाचा आघात हिऱ्यावर झाला तर हिरा तर भंगत नाहीच, पण तो हिराच घणाच्या पोटात शिरतो तो आपला कठिणपणा कधी सोडत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, किती तप्त झाले तरी शीतल करण्याचा गुण चदनाचा असतो तो जात नाही. ४

३१८१ दिली मान तरी नेघावी[2] शत्रूची । शरण आले त्यासी[3] जतन जोवें ॥ १ ॥
समर्थासी असे विचाराची आण । भलीं पापपुण्य विचारावें ॥ २ ॥
काकुळतीसाटीं सत्याचा विसर । पडिले अंतर न पाहिजे ॥ ३ ॥
तुका म्हणे यश कीर्ति आणि मान । करितां जतन देव जोडे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– नेघावी–न घ्यावी, आण–निश्चय, शपथ, विचारावें–विचार करावा, जोडे–प्राप्त होतो.

अर्थ :– आपल्या शत्रूने आपणापुढे स्वतःची मान दिली तरी ती कापू नये कारण शरण आलेल्यास जीवदान देणे हेच श्रेष्ठ आहे १ जे कुणी समर्थ आहेत त्यांच्यात विचाराचा निश्चय असावा म्हणून भल्या माणसानी पापपुण्याचा विचार करीत जावा २ कुणी आपणाजवळ काकुळतीस जरी आले तरी सत्याचा विसर कधी पडू देऊ नये. त्याच्याविषयी कधी अतर पडू देऊ नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, यश, कीर्ती व मान यांची जपणूक केली असता देवाची प्राप्ती होते ४

३१८२ विचारिले आधीं आपुल्या मानसीं । याचो येथें कैसीं कोण्या द्वारें ॥ १ ॥
तव[4] जाला साह्य हृदयनिवासी । बुद्धि दिली ऐसी नास[5] नाहीं ॥ २ ॥
उद्वेगाचे होतों पडिलो समुद्रीं । कोणें रीती तरी पाविजेल ॥ ३ ॥
तुका म्हणे दुःखें आला आयुर्भाव । जाला बहु जीव कासावीस ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विचारिले–विचार केला, आयुर्भाव–आयुष्यमर्यादा.

अर्थ :– या भवसागरातून कोणत्या साधनाने आपण जावू, याविषयी मी माझ्या मनाशी पुष्कळ विचार केला १ तेव्हा माझ्या हृदयात निवास करणारा श्रीहरी मला साह्यकारी झाला व त्याने मला अविनाशी अशी बुद्धी दिली २ मी आजपर्यंत उद्वेगाच्या समुद्रात बुडत होतो; कोणत्या मार्गाने आपण पैलतीरी जाऊ अशी चिंता माझ्या मनास होती ३ तुकाराम महाराज म्हणतात, आजपर्यंतचे आयुष्य फार दुःखामध्ये गेले त्यामुळे माझा जीव फारच कासावीस झाला होता. ४

१ बाहेय, २ न घ्यावी, ३ त्यासी ४ साह्य झाला, ५ नाश.

३१८३ आपुले वेचूनि खोडा घाली पाव । ऐसे[1] जया भाव हीनबुद्धि ते ॥ १ ॥
विषयाच्या सगें आयुष्याचा नास । पडियेले ओस स्वहितात्रे ॥ २ ॥
भुलल्याचे अग आपणा पारिखें । छदाच सारिखें वर्त्ततसे ॥ ३ ॥
तुका म्हणे दु ख उमटे परिणामीं । लपटासी कामीं रतलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पाव-पाय, कामीं-विषयात, रतलिया-रमल्यावर

अर्थ – आपले स्वत चे खर्चून जो खोडयात पाय घालतो तो हीन बुद्धीचा असतो १ विषयाच्या सगतीने आयुष्याचा नाश होऊन लोक स्वहितास पारखे होतात २ जे या विषयाना भुलतात त्याना स्वत चे अग स्वत लाच पारखे होते ते स्वत च्याच छदाप्रमाणे वाटेल तसे वागतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे लपट लोक विषयात रमल्यावर परिणामी दु खच भोगतात ४

३१८४ केले शकुनें प्रयाण । आता मागें फिरे कोण ॥ १ ॥
होय तैसे होय आता । देह[2] बळी काय चिंता ॥ २ ॥
पडिले पालवीं । त्याचा धाक आहे जीवीं ॥ ३ ॥
तुका म्हणे जीणे । देवा काय हीनपणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पालवीं-पदरात

अर्थ – शकून पाहून प्रयाण केल्यावर आता मागे कोण फिरणार ? १ आता हा देह तर बळी दिलेला आहे जे काय व्हायचे असेल ते होऊ द्या २ जो लाभ पदरात पडला त्याचा धाक जीव नेहमी वागवीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा आम्ही हीनपणाने जगावे हे काय उचित आहे का ? ४

३१८५ आळणी ऐसे कळो आलें । त्यासी भले मौनचि ॥ १ ॥
नये काहीं वेचूं वाणी । वेडे घाणीसागातें ॥ २ ॥
वेगळें तें देहभावा । भ्रम जीवा माजिरा ॥ ३ ॥
तुका म्हणे कवतुक केले । किंवा भले दवडिता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – माजिरा-माजलेला

अर्थ – भोजनास केलेला पदार्थ आळणी आहे असे जरी समजून आले तरी त्याविषयी काही न बोलता मौन धरून राहाणेच बरे १ यासाठी आपली वाणी उगाच खर्च करू नये वेडयाच्या अथवा घाणेरडया व्यक्तीच्या बाबतीत कशाला लक्ष द्यावे ? २ ज्याच्यात भ्रम माजलेला आहे त्याना देहभान नसतेच ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा व्यक्तीचे वागणे कौतुकावर तरी न्यावे किंवा त्याचा त्याग करणे हेही भलेच आहे ४

३१८६ चित्ताचा चाळक । त्याचे उभय सून एक ॥ १ ॥
नाचविते नानाछदें[3] । सुखें आपुल्या विनोदे ॥ २ ॥
चद्र कमळणी । नाहीं धाडीत सागोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे उठी । लोह चुबकाचे वृष्टी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कमळणी-चद्रविकासी कमळ

अर्थ – जो देव चित्ताचा चालक आहे त्याच्याच हाती चित्ताचे व स्वत चे सूत्र आहे १ तोच आपल्या नाना प्रकारच्या छदानी जीवाना नाचवितो, त्याचे हे करणे म्हणजे त्याची सहजलीला आहे २ चद्रविकासी कमळाला चद्र काही बोलावणे पाठवीत नाही, ते चद्रोदयाबरोबर उमलतेच ३ तुकाराम महाराज म्हणतात, चुबक दृष्टीस पडल्यानतर लोखड जागच्या जागी हालचाल करणारच ४

१ ऐसा तो हा जीव हीनबुद्धि, २ देहबळ ३ नाचछदें

३१८७ करितां तडातोडी । वत्सा माते सोई ओढी ॥ १ ॥
करित्याचा[1] आग्रह उरे । एक एकासाटीं झुरे ॥ २ ॥
भुके इच्छी अन्न । ते ही त्यासाटीं निर्माण ॥ ३ ॥
तुका म्हणे जाती । एक एकाचिये चित्तीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तडातोडी–ताटातूट.

अर्थ :– गाईची व वासराची जर कुणी ताटातूट केली तर ते वत्स आपल्या आईच्या ओढीनेच धावत जाते १ मग ताटातूट करणाराचा आग्रह मात्र उरतो पण ते मात्र परस्परासाठी झुरत असतात २ भूक लागली की माणसास अन्नाची इच्छा निर्माण होते व ते अन्नही यासाठीच निर्माण झालेले असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, समान जातीचे जे असतात त्याच्या चित्तात एकमेकाविषयी ओढ असते. ४

३१८८ निघाले दिवाळें । जाले देवाचें वाटोळे ॥ १ ॥
आतां वेचूं नये वाणी । विचारावे मनिच्या मनीं ॥ २ ॥
गुंडाळिलीं पोतीं । भीतरी लावियेली वाती ॥ ३ ॥
तुका म्हणे करा । ऐसा राहे माजी घरा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारावें–विचार करावा.

अर्थ .– या देवाचे दिवाळेच निघाले त्यामुळे त्याचे वाटोळे झाले १ आता मनातल्या मनात नीट विचार करावा व उगाच वाणी खर्च करू नये. २ त्याने स्वतःच्या दुकानातील सर्व पोती गुंडाळून टाकली असून आतील बाजूस दिवा लावलेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा देव आपल्या हृदयरूपी घरात राहील असे करा ४

३१८९ तीर्थाचिये[2] पंथे चाले तो निदैव । पाविजेतो ठाव अंतराय ॥ १ ॥
म्हणऊनि भले निश्चळचि स्थळीं । मनाचिये मुळीं बैसोनिया ॥ २ ॥
संकल्पारूढ तें प्रारब्धेचि[3] जिणे । कार्यचि कारणे वाढलसे ॥ ३ ॥
तुका म्हणे कामा नाहीं एक मुख । जिरवितां सुख होते पोटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निदैव–दुर्दैवी.

अर्थ :– जो तीर्थयात्रेच्या मार्गात असतो तो दुर्दैवीच समजावा कारण यामुळे ईश्वराशी अंतराय पडतो, त्याच्या ठिकाणाशी अंतर पडते १ म्हणून मनाचे मूळ धरून त्याच ठिकाणी निश्चल होऊन राहाणेच बरे. २ ज्याचे मन संकल्पावर आरूढ झालेले आहे त्याचे जिणे प्रारब्धाच्या आधीन होऊन जाते ते आपणहीच कारणाने कारण वाढून परतंत्र होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, कामास एकच तोंड नसल्याने तो मनातल्या मनातच जिरविला तर मोठे सुख होते ४

३१९० क्षणक्षणा हाचि करावा विचार । तरावया पार भवसिंधु ॥ १ ॥
नाशिवंत देह जाणार[4] सकळ । आयुष्य खातो काळ सावधान ॥ २ ॥
संतसमागमीं धरूनि आवडी । करावी तातडी परमार्थीं ॥ ३ ॥
तुका म्हणे यहलोकींच्या वेव्हारें । नये डोळे धुरें भरुनि राहों ॥ ४ ॥

१ कारित्याच्या, २ तीर्थाचिये आस । पथ तो निट देव । ३ पराधीन जीणें ४ जाणा रे.

शब्दार्थ व टीपा – आवडी-प्रेम, यहलोकींच्या-या लोकातील

अर्थ – हा संसारसमुद्र तरून जाण्यासाठी क्षणोक्षणी पुढीलप्रमाणे विचार करावा १ हा देह नाहीसा होणारा असून आपले सर्व आयुष्य काळ खात आहे याविषयी सावध असावे २ संतांच्या सहवासाविषयी मनात प्रेम धरावे व परमार्थाच्या मार्गाविषयी त्वरा करावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, या लोकातील व्यवहाराविषयी डोळ्यावर धूर ओढून राहू नका आंधळे राहू नका ४

३१९१ कोणाशीं विचार करावा सेवटीं । एवढ्या लाभे तुटी जाल्या तरे ॥ १ ॥
सांभाळितो शूर आला घावडाव । पुढे दिला पाव न करी मागें ॥ २ ॥
घात तो या नांवें येथें अंतराय । अंतरल्या पाय गोविंदाचे ॥ ३ ॥
तुका म्हणे गडसदीचा[1] हा ठाय । केला तो उपाय कार्या येतो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घावडाव–आघात, पाव-पाय, अंतराय–वियोग, गडसदीचा-अडचणीची, धोक्याची जागा ठाव–स्थान

अर्थ – हा माणसाचा जन्म एकदा हातून गेल्यानंतर शेवटी विचार तरी कुणाबरोबर करावा ? १ या परमार्थमार्गात जो एकदा पाय पुढे टाकला आहे तो मागे घेऊ नये येणारे सर्व आघात या कामी जो सहन करतो तोच शूर मानावा २ या ठिकाणी गोविंदाचे पाय अंतरले, त्याच्याशी वियोग झाला की त्यासच मोठा घात म्हणावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे स्थान मनुष्यजन्माचे हे ठिकाण म्हणजे अवघड व धोक्याची जागा असल्याने जो उपाय करावा तो कारणी लागतो ४

३१९२ असा जी सोंवळे । आहां तैसेचि निराळे ॥ १ ॥
आम्हीं नयों तुमच्या वाटा । काय लटिकाचि ताठा[2] ॥ २ ॥
चिंतनचि पुरे । काय सलगी सवें धुरे ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । नका नावडे ते सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धुरें–श्रेष्ठ

अर्थ – देवा, निराळेपणाने तुम्ही अव्यक्ताच्या स्थितीत सोवळे आहात तेच ठीक आहे १ आम्ही काही त्या तुमच्या मार्गात येणार नाही कारण तेथे ब्रह्मभावाचा लटका ताठा मात्र आहे २ अशा अव्यक्त रूपाशी सलगी काय श्रेष्ठ आहे ? किंवा तुमच्यासारख्या श्रेष्ठ अव्यक्ताशी सलगी काय कामाची ? केवळ चिंतनच पुरे आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, ती अव्यक्ताची सेवा आवडत नसल्यामुळे तुम्ही आम्हास देऊ नका ४

३१९३ अहंकार तो नासा भेद । जगीं निंद्य ओंवळा ॥ १ ॥
नातळे तो धन्य यासी । जाला वंशीं दीपक ॥ २ ॥
करवितो आत्महत्या[3] । नेदी सत्या आतळों ॥ ३ ॥
तुका म्हणे गुरुगुरी । माथा थोरी धरोनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नातळे–वश होत नाही आतळों–भेटत

अर्थ – या जगात अतिशय निंद्य व ओवळा असा एक अभिमान असून त्यामुळे भेद वाढतात व एकदर नाशच होतो १ या अभिमानाला जो वश होत नाही तो धन्य समजावा तो वंशामधील कुलदीपकच समजावा २ कारण हा अभिमान आत्महत्येचा दोष करतो आणि सत्यास कधीच भेटत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या अभिमानामुळे आपणाकडे उगाच मोठेपणा घेऊन गुरुगुरी मात्र वाढत जाते ४

१ गडसधीचा, २ ताटा, ३ ब्रह्महत्या । नदी आत्या आतळा ।

विवरण -अहंकार अथवा अभिमान हा परमार्थसाधनास बाधक असतो अहंकार म्हणजे तरी काय? मीपणा, देहाभिमान, देह म्हणजेच सर्वस्व मानण्याची प्रवृत्ती, देहाखेरीज इतर सर्व खोटे असे मानून सर्व काही करणारा, करविणारा मी आहे असे मानणे म्हणजे अहंकार श्रीज्ञानेश्वरांनी याची व्याख्या करताना म्हटले आहे, 'तैसी पांचाहि गांठि पडे। जे देहाकारु घडे। तें नाचवी पहुकडे। तो अहंकार गा ॥' पंचमहाभूतांचा देह म्हणजे मीच असे समजून जो सर्वत्र नाचवितो तो अहंकार या अहंकाराची नवलाई अशी की तो 'विशेषें न लगे अज्ञाना- पाठीं। सज्ञानाचे झोंबे कंठीं। नाना संकटीं नाचवी।' हा अहंकार भेद पाडतो नाश करतो स्वानुभवाच्या प्रचीती- पासून 'मी'स दूर सारतो अहंकाराने पोळलेला मनुष्य कसा ताठ वागतो व स्वतःचा नाश करून कसा घेतो याचे मोठे समर्पक व उद्बोधक चित्र ज्ञानेश्वरांनी रेखाटले आहे अत्यजाला राज्यावर बसविले म्हणजे तो जसा फुगतो, अथवा अजगराने खांबाचे लाकूड गिळल्यावर ते जसे फुगते त्याप्रमाणे अहंकारी मनुष्य गर्वाने फुगत असतो 'जो लाटणें ऐसा न लवे। पाथरु तैसा न द्रवे। गुणियासि नागवे। फोडसे जैसें।' लाटण्याप्रमाणे हा मनुष्य न लवता ताठ राहातो, दगडाप्रमाणेच याला कधी पाझरच फुटत नाही फुरसे चावले असता मांत्रिकालादेखील उतरत नाही, त्याप्रमाणे या अहंकारी माणसाच अगदी उलट अहंकार नसलेल्या या महात्म्याची स्थिती कशी असते? वर्णाश्रमाप्रमाणे तो नित्य- कर्म आचरीत असतो, पण 'परि हें मियां केलें। कीं हे माझेनि सिद्धी गेलें। ऐसें नाहीं ठेविलें। वासनेमाजी ॥' वायूचा सर्वत्र संचार असतो ना? सूर्याचे उगवणे सहजच असते ना? वेद स्वभावत च बोलतात, गंगा सहजच वाहात असते त्याचप्रमाणे अहंकारावाचून या महात्म्याचे चलनवलन असते एकपदरी माळेची दोरी काढून घेतली की जशी फुले गळून पडतात, त्याप्रमाणे त्याच्या मनातील, कर्मातील, वाचेतील अहंकार गळून पडतो ज्या देहामध्ये तो असतो त्या देहाचेच भान त्याला नसते. म्हणूनच साधुसंतांची नेहमी प्रार्थना भगवंतापाशी असते ती अशी की, 'अहंकाराचा वारा न लागो राजसा। माझिया विष्णुदासा भाविकासी।'

३१९४ इच्छिले ते शकुनवती। होय देती तात्काळ ॥ १ ॥
क्षीरा नीरा निवाड करी। बराबरी विठ्ठल ॥ २ ॥
भाग्याविण कैंचे फळ। अंतर मळमूत्राचे ॥ ३ ॥
तुका म्हणे संचित कुडें। ते बापुडे करीतसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - शकुनवती-भविष्य सांगणारी, क्षीर-दूध, नीर-पाणी, कुड-वाईट

अर्थ - ही विठ्ठलरूप शकुनवती ज्याची इच्छा करावी ते तात्काळच देत असते १ दूध व पाणी यांचा निवाडा करणारी अशी ही विठाबाई आहे २ भाग्य उदयास आल्याशिवाय हिच्यापासून आपणांस फळ मिळणार नाही कारण आपले मन पापरूप मलमूत्राने भरलेले असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, वाईट असलेले प्रारब्धकर्मच लोकांना दीनवाणे करीत असते ४

३१९५ काशासाटीं आम्ही जाळिला संसार। न करा[1] विचार ऐसा देवा ॥ १ ॥
कैसे नेणो तुम्हां करवतें उदास। माझा प्रेमरस भंगावया ॥ २ ॥
समर्पूनि ठेलो देह हा सकळ। धरिता विटाळ न लजा माझा ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघी मोकलूनि आस। फिरतो उदास कोणासाटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - ठेलो-राहिलो आहोत, मोकलूनि-सोडून

अर्थ - देवा, आम्ही आपला संसार कशासाठी जाळून टाकला हो? तुम्ही यासंबंधी काही कसलाच विचार करीत नाही १ देवा, तुम्हाला मला उदास तरी कसे करवते? माझा प्रेमभंग तुम्ही करीत असता २ आम्ही मात्र आमचा सर्व देह तुम्हाला समर्पण करून राहिलो आहोत आणि तुम्ही आमचा विटाळ धरता, याची

१ कराया

लाज कधी नाही हो तुम्हास वाटत ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व आशा इच्छा सोडून आम्ही उदास होऊन फिरतो ते कुणासाठी हो ? ४

३१९६ नाहीं तुम्हा काहीं लाविले मागणे । कांटाळयाच्या भेणे आसलेती ॥ १ ॥
एखादिये परी टाळावी करकर । हा नका विचार देखो कांहीं ॥ २ ॥
पायांच्या वियोगें प्राणासवसाटी । नेघेवेसी तुटी जाली आता ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हा मागणे तें आतां । हेंचि कृपावता चरणीं वास ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कांटाळयाचा-टाळयाच्या भेणे-भीतीने, परी-प्रकाराने

अर्थ – देवा, मी काही तुमच्यापाशी मागण्याची भुणभुण लावलेली नाही मग कटाळा येईल या भीतीने उगीच का आसता ? १ एखाद्या प्रकारचे देऊन कशी तरी ही कटकट टाळावी हा विचार मात्र तुम्ही मनातदेखील करू नका २ तुमचा वियोग जर झाला तर आमचा प्राण जातो म्हणून तुमचा कधीच वियोग होणार नाही असे करा ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपावता, तुमच्या चरणी मला निवास द्यावा हेच एक मागणे आता आहे ४

३१९७ जग अमगळ । लागे देखता विटाळ ॥ १ ॥
धर्म भूताची ते दया । सत्य[1] कारण ऐसीया ॥ २ ॥
नव्हे माझें मत । साक्षी करूनि सागें संत ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवे । वावी उमलूनि अनुभवे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कारण-कार्य

अर्थ – जग हे अपवित्र आहे असे जो मानेल पाहेल तोच अपवित्र होईल १ सर्व भूतमात्रावर दया करणे हाच खरा धर्म आहे हेच खरे सत्कार्य आहे २ हे काही मी माझ्या मनातील सागत नसून याला मागे होऊन गेलेल्या सतांची साक्ष आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात हा अनुभव मी माझ्या जीवनात उमटवून वाखवितो ४

३१९८ दड अन्यायाच्या माथा । देखोनि करावा सर्वथा ॥ १ ॥
नये उगे बहुता घाटू । सिसे सोनियात आटू ॥ २ ॥
पापपुण्यासाटीं । नीत केली सत्ता[2] खोटी ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । दोष कोणाचा तो दावा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घाटू-सताव, त्रास देऊ

अर्थ – जो कुणी खरोखरच अन्याय करणारा असेल त्याच्या माथ्यावर शिक्षेचा प्रहार जरूर करावा १ इतर कुणाला विनाकारण त्रास देऊ नये, उगाच सोन्यात शिसे आटविण्यात काय अर्थ आहे ? २ पापपुण्यासाठी जो जो नीती देवा, तुम्ही केली आहे ती खोटी आहे तिची सत्ता खोटी आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा माझ्यामध्ये कोणता दोष आहे ते दाखवा ४

३१९९ आम्ही पापी[3] तू पावन । हे तो पूर्वापार जाण ॥ १ ॥
नवे करू नये जुनें । सामाळावे ज्याचे तेणे ॥ २ ॥
राखावा तो ठाव । मिरासी करोनि उपाय ॥ ३ ॥
वादें मारी हाका । देवा आइकवी तुका ॥ ४ ॥

---

१ सत, २ आतां, ३ आम्ही पतितपावन

शब्दार्थ व टीपा :- ठाव-स्थान, उपाव-उपाय, यावें-भांडण करून

अर्थ .- देवा, आम्ही पापी व तू पावन करणारा हे तर पूर्वीपासून चालत आले आहे असे तुम्ही जाणा १ मात्र काही नवे करू नये व जुने सांभाळून ठेवावे हे ज्याचे त्याने सांभाळावे. २ ही अशी जी मिरास उभयतांची आहे त्या स्थानाचे रक्षण करण्याचा उपाय तुम्ही करावा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, भांडण करून मी अशा प्रकारे तुम्हांस हाका मारीत आहे व त्या तुम्ही ऐकत आहात, मी तुम्हांस ऐकवीत आहे. ४

३२०० पाडावी ते बरी । गांठी धुरेसवें खरी[1] ॥ १ ॥
नयें मरों लंडीपणें । काय बापुडें तें जिणें ॥ २ ॥
लुटावें भांडार । तरी जया नाहीं पार ॥ ३ ॥
तुका म्हणे नांवें । कीर्ती आगळीनें ज्यावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा- धुरेसवें-श्रेष्ठांच्या, थोरांच्या, लंडीपणें-भित्रेपणाने. आगळीनें-विशेष प्रकारच्या, ज्यावें-जगावे

अर्थ :- जे कुणी थोर वा श्रेष्ठ आहेत त्यांच्याशी गाठ पडलेली बरी १ उगाच भित्रेपणाने मरू नये किंवा दीनवाणीने जगूही नये २ ज्याला अंतपार नाही असेच भांडार लुटावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, विशेष प्रकारची कीर्ती करून जगावे हेच चांगले ४

३२०१ भजनेंचि[2] जालें । मग जीवाचें काय आलें ॥ १ ॥
येऊं नेदावी पुढती । आड भयाची ते जाती ॥ २ ॥
करितां सरोबरी[3] । कांहीं न ठेवावी उरी ॥ ३ ॥
तुका म्हणे शूर । व्हावे धुरेसींच धुर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- भजनेंचि-भजनाचा, विध्वसनाचा, पराजयाचा, सरोबरी-बरोबरीचा मामला. धुरेसी-मोठ्याशी, धुर-मोठे

अर्थ :- पराजयाचाच प्रसंग येऊन ठेपला तर मग आपल्या जीवाची पर्वा न करता प्रतिकार करावा १ त्याच्यापुढे जाताना कोणतेही भय आड येऊ देऊ नये २ आपल्या शत्रूशी बरोबरी करीत असताना त्याच्यात व आपल्यात काही उणीव ठेवू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, मोठ्याशी मोठेपणाने वागूनच शूर व्हावे ४

३२०२ जन्मांतरी शुद्ध नाही आचरण । यालागीं चरण अंतरले ॥ १ ॥
वोडवलें संचित येणें जन्मे पाहतां । आतां पंढरिनाथा कृपा करीं ॥ २ ॥
पतितपावन ब्रिद साच करीं देवा । यालागीं कुढावा[4] करीं माझा ॥ ३ ॥
अपराधी पातकी दुष्ट दुराचारी । आहाळलों भारी संवसारें ॥ ४ ॥
कामक्रोध आदि कल्पनेच्या त्रासें । तुज न पवें ऐसें जालें[5] देवा ॥ ५ ॥
हा ना तोसा ठाव जाला पांडुरंगा । नयेचि उपेगा काय करूं ॥ ६ ॥
आपुलिया नांवा धांवणिया धांवे । लवकरी यावें तुका म्हणे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा- वोडवलें-प्राप्त झाले, उदयास आले, साच-खरो, कुढावा-रक्षण, आहाळलों-पीडलो, नासलो, ठाव-स्थान, धावणिया-रक्षण करण्यासाठी

१ करी, २ भजनेंचि, ३ सरोभरी, ४ कुडावा, ५ जालो

अर्थ :- अनेक जन्मांत मी शुद्ध आचरण कधी केलेले नव्हते, म्हणून देवा, तुमच्या चरणांचा मला वियोग झाला. १ पंढरीनाथा, या जन्मी आता माझे काही प्रारब्ध उदयास आले असेल तर माझ्यावर कृपा करावी २ देवा, पतिताला पावन करण्याचे जे तुमचे ब्रीद आहे ते खरे करून दाखवा ना आणि यासाठीच तुम्ही माझे संरक्षण करावे. ३ मी फार अपराधी आहे, पातकी आहे, दुष्ट आणि दुराचारी आहे. या संसाराच्या ओझ्याने मी फारच त्रासून गेलेलो आहे. ४ देवा, माझ्यामधील कामक्रोधादी विकारांच्या कल्पनेच्या त्रासानेच तुमच्याजवळ मी येईनासा झालो आहे. ५ पांडुरंगा इकडे धड प्रपंच नाही, तिकडे धड तुमची प्राप्ती नाही, अशी दोनही स्थाने मी अंतरलो आहे. मी कुठेच उपयोगी होत नाही याबद्दल काय करू ? ६ तुकाराम महाराज म्हणतात, पतितपावन हे तुझे नाव देवा, रक्षण करण्यासाठी तू लौकर माझ्याकडे धावत ये ७

३२०३ प्रथमभेटी[1] आलिंगण । मग चरण वंदावे ॥ १ ॥
ऐसा माझा भोळा बाप । हरी ताप कवळोनि ॥ २ ॥
न सांगतां सीण भाग । पांडुरंग जाणतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपावंतें । द्यावें भातें न मागतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .- हरी-हरण करतो, दूर करतो, भातें-खाऊ

अर्थ :- या देवाला प्रथम भेटीतच आलिंगन द्यावे आणि मग याच्या चरणांना वंदन करावे १ असा हा विठ्ठल माझा भोळाभाबडा बाप असून पहिल्या भेटीतच आलिंगन देऊन माझ्या मनाचा ताप दूर करतो. २ याला आपले दु.ख व त्रास सांगावे लागत नाही. तो आपण होऊन जाणत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याला जो हवा तो प्रेमळ खाऊ तुम्ही कृपावंत होऊन द्यावा. ४

३२०४ वचनाचा अनुभव हातीं । बोलविती देव मज ॥ १ ॥
परि हें न कळे अभाविकां । जडलोकां जिवांसी ॥ २ ॥
अश्रुत[2] हे प्रसादिक । कृपा भीक स्वामीची ॥ ३ ॥
तुका म्हणे बराबरी । जातों तरी सांगत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- अभाविका-जे भाविक नाहीत त्याना, अश्रुत-पूर्वी न ऐकलेली, बराबरी-वरचेवर, एकसारखें.

अर्थ :- लोकहो, जी वचने माझ्या मुखातून निघतात त्यांचा अनुभव माझ्या हाती आलेला असतो. कारण प्रत्यक्ष देवच मला बोलते करीत असतो. १ पण जे जड व अभाविक, अश्रद्ध लोक त्यांना हे समजत नाही. २ पूर्वी कधी कुणी ऐकलेली नाही अशा प्रकारची कृपेची भीक मला माझ्या स्वामींनी घातलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तरी मी हे वरचेवर सांगतच असतो ४

३२०५ कां रे तुम्हीं ठेवा बहुतां निमित्तें । माझिया संचितें वोडवलें ॥ १ ॥
भक्तिप्रेमगोडी बैसली जिव्हारीं । आनंद अंतरीं येणें झाला ॥ २ ॥
पुसिलें पडळ तिमिर विठ्ठलें । जगचि भरलें ब्रह्मानंदें ॥ ३ ॥
तुका म्हणे केलों कामनेवेगळा । आवडी गोपाळावरी वसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वोडवलें-प्राप्त झाले, पडळ-पडदा, पटल, तिमिर-अज्ञानाचा अंधार.

अर्थ :- तुम्ही अशी अनेक निमित्ते ठेवून का वागता हो ? मला माझ्या पूर्वपुण्याईमुळे हे प्राप्त झाले आहे. १ माझ्या अंत.करणांत भक्तिप्रेमाची गोडी बसलेली आहे त्यामुळे मला अतिशय आनंद झाला आहे. २ या

१ प्रेमभेटी, २ अनश्रुत

विठ्ठलाने माझ्या डोळ्यावर आलेले अज्ञानाचे पटल दूर केले आहे, म्हणून मला आता हे जगत सर्वत्र ब्रह्मानंदाने भरलेले दिसत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे प्रेम या गोपाळावर बसले असून त्याने मला सर्व प्रकारच्या कामनांपासून वेगळे केले आहे ४

३२०६ आसन शयन भोजन गोविंदें । भरले आनंदें त्रिभुवन ॥ १ ॥
अवघियां केलो काळें तडातोडी । अवसर घडी पुरी नये ॥ २ ॥
वांटणी घातले शरीराचे भाग । दुजियाचा लाग खंडियेला ॥ ३ ॥
आंवडीच्या आले आहाराशी रूप । पृथक संकल्प मावळले ॥ ४ ॥
काम तरी क्रोध बुद्धि मन नासे । भ्रमाचे वोळसे गिळिले शांती ॥ ५ ॥
तुका म्हणे मना श्रीरंगाचा रंग । बैसला अभंग एकविध ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा -तडातोडी-तातातूट, अवसर-विसावा, घडी-क्षणभर, लाग-लाभ, सत्ता पृथक-वगळे, अभंग-भंग न होणारा

अर्थ -आसनावर बसताना अंथरुणावर निजताना, भोजन करताना मी या गोविंदाचेच ध्यान करीत असून त्याच्या योगाने त्रिभुवन आनंदाने भरून गेले आहे १ काळाने सर्वांची तातातूट केलेली असल्यामुळे एक क्षणभर देखील मला विसावा मिळत नाही २ त्याविषयीं मी माझ्या शरीराचे भाग वाटून दिले असल्यामुळे त्यावरील दुसऱ्याची सत्ता संपलेली आहे ३ या देवाच्याच रूपाचा आहार मी मोठ्या आवडीने केला असून माझे निरनिराळे संकल्प मावळून गेले आहेत ४ कामक्रोधादी विकारामुळे मन व बुद्धी यांचा नाश होत असतो, पण त्यांचा मी नाश करून ते शांतीला प्राप्त झाले व माझे मन सर्व भ्रमदुःख नाहीसे झाले ५ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या मनावर एकदा श्रीरंगाचा रंग चढल्यामुळे तो अखंडपणे बसला असून त्याचा भंग कधीही होणार नाही ६

३२०७ ज्वरल्यासी काढा औषध पाचन । मूढा नारायण स्मरवितो[1] ॥ १
भवव्याधि येणें तुटेल रोकडी । करूनिया झाडी[2] निश्चयेंसी ॥ २ ॥
आणिका उपाया अनुपान कठिण । मार्गें बरे सीण शीघ्रवत ॥ ३ ॥
तुका म्हणे केला उघडा पसारा । भाग्य आले घरा दारावरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - ज्वरल्यासी-त्रिविध तापानी पाळलेल्या रोकडी-तावडतोब, अनुपान-औषधाबरोबर अथवा नतर घ्यावयाचा पदार्थ

अर्थ -त्रिविध प्रकारच्या तापानी जो तप्त झाला आहे त्या मूर्खाला नारायणाचे स्मरण देणे हेच एक काढ्याचे औषध आहे १ यामुळे संसाराचे दुःख तावडतोब तुटेल व निश्चयाने सर्व रोगाचा झाडा होईल २ इतर उपायाच्या बाबतीत अनुपान कठीण असल्यामुळे त्यापासून शीण होतो पण नारायणस्मरण औषध तसे नाही याचा लौकर गुण येतो ३ तुकाराम महाराज म्हणतात मी हा पसारा उघड केला असून तुमच्या घरीदारी हे भाग्य आले आहे ४

३२०८ जपाचे निमित्त झोपेचा पसरु । देहाचा[3] विसरु पाडूनिया ॥ १ ॥
ऐसीं तीं भजने अमंगळवाणी । सोंगसवादणी बहुरूप्याची[4] ॥ २ ॥
सेवेसी[5] विकिले लोभाचिये आसे । तया कोठे असे उरला देव ॥ ३ ॥
तुका म्हणे मानवम जया चित्तीं । तयाची फजीती करू आम्ही ॥ ४ ॥

१ श्रमवितो, २ झाडा, ३ दता हा विचार पाडूनिया, ४ भोरप्याची, ५ सर्वेविणी केल लोभा

शब्दार्थ व टीपा :- आसें-आशेने.

अर्थ :- जप करण्याचे निमित्त करुन याला देहाचा विसर पडतो व तो झोपेच्या स्वाधीन होतो. १ अशा प्रकारची भजने अमंगळ असतात कारण येथे बहुरुप्याप्रमाणे नुसती सोंगसंपादणी असते २ काही एक मनात लोभाची आशा धरुन लोक सेवा करीत असतात, त्यांना देवाची प्राप्ती कशी होईल? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या चित्तामध्ये मान, दंभ यांना स्थान असते त्याची आम्ही पुरती फजिती करु. ४

३२०९ परद्रव्य परकांता । नातळे जयाचिया चित्ता । आणि कर्मी तो तत्वता । बांधला न वजाय ॥१॥
ऐसा अनुभव रोकडा । विश्वासीतो जीवा जोडा । एकांत त्या पुढां । अवघा करी उकल ॥२॥
सकट आंबलें तें अन्न । शोधि तें चि मद्यपान । विषमानें भिन्न । केलें शुद्धाशुद्ध ॥ ३ ॥
तुका म्हणे नित । बरवें अनुभवें उचित । तरी काय हित । मोलें घ्यावें लागतें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- नातळे-येत नाही, रोकडा-प्रत्यक्ष, विषमानें-वाईटाने, नित-नीती, बरवें-चांगले.

अर्थ :-दुसऱ्याचे द्रव्य, दुसऱ्याची स्त्री ही ज्याच्या चित्तात कधीही येत नाहीत तो इतर पापकर्मांनी कधीही बांधला जाणार नाही; हे निश्चयाने सांगतो १ असा हा प्रत्यक्ष अनुभव असून जो विश्वास ठेवणारा आहे, त्यालाच त्याचा लाभ होईल. त्याच्यापुढे एकान्तातील सर्व रहस्यांचा उकल होत जाईल. २ आंबलेले अन्न मिळवून जर त्याचे सेवन केले तर ते मद्यपानाप्रमाणेच होईल जे वाईट आहे त्याच्या योगाने वाईटच होते अशुद्धाच्या योगाने शुद्धही अशुद्ध होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात अशी ही नीती नीटपणे अनुभवात आणावी. मग जे स्वहित आहे त्यास काय मोल द्यावे लागेल ? ४

३२१० भूक पोटापुरती । तृष्णा भरवी[1] वाखती । करवी फजीती । हांवें भार वाढला ॥ १ ॥
कुळिकेसी लांस फांस । डोई दाढी बोडवी दोष । अविहितनाश । करवी वजन[2] चुकतां ॥२॥
विधिसेवनें विहितें । कार्यकारणापुरतें । न बाटे जो चित्तें । अधर्माच्या तो त्यागी ॥ ३ ॥
आज्ञापालणें ते सेवा । भय धरोनियां जीवा । तुका म्हणे ठेवा । ठेविला तो जतन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- वाखती-पोटाची खळी, कुळिकेसी-अजीर्णास, लांस-डाग, डागण्याचा उपाय, अविहितनाश-अयोग्य उपायाने नाश, वजन-वचन असावे, बोललेला

अर्थ - आपणाला खरे म्हणजे भूक पोटापुरतीच लागते, पण वाढणारी आशा आपणाला फसविते आणि पोटाची खळी भरायला लावून आपली फजिती करते तिच्यामुळेंच हाव फार वाढते १ मोडशीचा अथवा अजीर्णाचा विकार झाला असताना योग्य तो इलाज करावा उगाच डाग देणे, फास देणे यांचा काय उपयोग ? उगाच दाढी व डोई मुडन दोषच पदरात यायचा सांगितलेला उपाय न केल्यास, चुकल्यास अयोग्य उपायाने नाशच होणार. २ विधियुक्त रीतीने सेवन केल्यासच हितकर असते. कारणाइतकेच कार्य करीत असावे. या कामी जो विपरीत कृत्याने चित्ताने बाटत नाही त्याने अधर्माचा त्याग केला असेच मानावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या मनात भय धरुन सेवा करीत असावे म्हणजेच आपणांस जतन करुन ठेवलेला स्वसुखाचा ठेवा प्राप्त होईल ४

३२११ कळे न कळे त्या धर्म । ऐका सांगतों रे वर्म । माझ्या विठोबाचें नाम । अटाहासें उच्चारा ॥१॥
तो या वाळवील वाटा । तया[3] पाहिजे त्या नीटा । कृपावंत मोटा । पाहिजे तो कळवळा ॥२॥
पुसतां चुका होतो वाटा । सवें बोळावा[4] गोमटा । मोडों नेदी कांटा । घेऊं सांटा चोरासी ॥३॥
तुका म्हणे मोल । न लगे द्यावें वेचावे बोल । विठ्ठल विठ्ठल । ऐसा छंद मनासी ॥ ४ ॥

१ भरी, २ वचन, ३ जया, ४ ओळवा

शब्दार्थ व टीपा – अट्टाहासें–मोठ्याने, बोळावा–पोचविण्यास आलेला दम, सांटा–सुतळीचा तोडा, विकायचा माल, चीजवस्तू

अर्थ – ज्याना धर्म कळतो किंवा कळत नाही, त्याच्यासाठी मी एक रहस्य सांगतो, ते नीट ऐका माझ्या विठोबाचे नाव मोठ्याने तुम्ही उच्चारा १ ज्याला जी वाट पाहिजे ती हा नीटपणे दाखवील, किंवा ज्याला जशा प्रकारचा वाटा हवा असेल तसा प्रकारचा वाटा हा नीटपणे देईल हा देव मोठा कृपावत आहे पण त्याच्याविषयी आपल्या पोटात कळवळा मात्र पाहिजे २ इतर कुणा गैरमाहितगारास आपण विचारले तर वाट चुकते, किंवा चुकीचा वाटा आपल्या हाती येतो परंतु आपल्या बरोबर हा चागला वाटाड्या पोचविणारा असल्यानतर काहीच चिंता नाही हा आपल्या भक्ताच्या पायांस काटा मोडू देत नाही किंवा चोराना त्याची चीजवस्तू लुबाडू देत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्यासाठी काहीं किंमत द्यावी लागत नाही फक्त आपल्या वाणीने विठ्ठल विठ्ठल असे शब्द काढावेत हाच एक छद आपल्या मनास असावा ४

३२१२ तरी का वोळगणें । राजद्वारीं होती सुने ॥ १ ॥
अगीं दावुनि निष्कामता । पोकळ पोकळी ते वृथा ॥ २ ॥
कासया मोकळ । भोवतें शिष्याचे गावाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे डाळे । बाहेर[1] गुवे तें निराळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वोळगणें–आश्रय घेणे, वळणे, सुने–कुत्रे, गवाळ–समुदाय, डाळें–बाहेरून वागण्याच्या देखाव्याने

अर्थ – पुढीलप्रमाणे स्थिती असून सुद्धा हे लोक कुत्र्याप्रमाणे राजद्वाराचा आश्रय का घेत असतात ? १ ते आपल्या मनाची निष्कामता दाखवितात, पण ती त्याची पोकळ बढाई असते २ हे लोक आपल्याभोवती शिष्याचा समुदाय उगाच का बरे गोळा करतात ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा त्याचा नुसता बाहेरून देखावा आहे त्याचे अतरग निराळेच असते ४

३२१३ हरिच्या दासा सोपें वर्म । सर्व धर्म पाउले ॥ १ ॥
कडिये देव बाहेर[2] खांदी । वैष्णव मांदी क्रीडेसी ॥ २ ॥
सरती येणे आटाआटी । नाहीं तुटी लाभाची ॥ ३ ॥
तुका म्हणे समाधान । सदा मन आमुचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मांदी–समुदाय, सरती–सपते आटाआटी–श्रम

अर्थ –या श्रीहरीच्या पावलाचे चिंतन करावे हेच एक हरिदासाना सोपे असे वर्म सापडले आहे १ याना देव हातावर अथवा कडेवर घेत असतो अथवा हे देवास खांद्यावर अथवा कडेवर वागवतात यांना खेळण्यासाठी वैष्णवांचे समुदाय तत्पर असतात २ याच्यामुळे सर्व खटाटोप सपतात आणि स्वसुखाच्या लाभाचीही हानी होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात या प्रकारात आमचे मन सर्वोचित समाधानी असते ४

३२१४ भूताचिये नादे जीवीं । गोसावीच सकळा ॥ १ ॥
क्षणक्षणा जागा ठायीं । दृढ पायीं विश्वास ॥ २ ॥
बायूनिया सोग बुजें । अतर बीजें वसततें ॥ ३ ॥
तुका म्हणे जाणे धर्म । धरी तें वर्म चिंतन ॥ ४ ॥

१ बाहेर रग ते निराळें, २ बाहे खांदीं

शब्दार्थ व टीपा :– आसें–आशेने.

अर्थ :– जप करण्याचे निमित्त करून याला देहाचा विसर पडतो व तो स्रोपेच्या स्वाधीन होतो. १ अशा प्रकारची भजने अमंगळ असतात. कारण येथें बहुरूप्याप्रमाणे नुसती सोंगसंपादणी असते २ काही एक मनात लोभाची आशा धरून लोक सेवा करीत असतात, त्यांना देवाची प्राप्ती कशी होईल? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या चित्तामध्ये मान, दंभ याना स्थान असते त्याची आम्ही पुरती फजिती करू. ४

३२०९ परद्रव्य परकांता । नातळे जयाचिया चित्ता । आणि कर्मी तो तत्वता । बांधला न वजाय ॥१॥
ऐसा अनुभव रोकडा । विश्वासीतो जीवा जोडा । एकांत त्या पुढां । अवघा करी उकल ॥२॥
सकट आंबलें तें अन्न । शोधि तें चि मद्यपान । विषमानें भिन्न । केलें शुद्धाशुद्ध ॥ ३ ॥
तुका म्हणे नित । बरवें अनुभवें उचित । तरी काय हित । मोलें घ्यावें लागतें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नातळे–येत नाही, रोकडा–प्रत्यक्ष, विषमानें–वाईटाने, नित–नीती, बरवें–चांगले.

अर्थ :–दुसऱ्याचे द्रव्य, दुसऱ्याची स्त्री ही ज्याच्या चित्तात कधीही येत नाहीत तो इतर पापकर्मांनी कधीहीं बांधला जाणार नाही; हे निश्चयाने सांगतो १ असा हा प्रत्यक्ष अनुभव असून जो विश्वास ठेवणारा आहे, त्यालाच त्याचा लाभ होईल त्याच्यापुढे एकान्तातील सर्व रहस्यांचा उकल होत जाईल. २ आंबलेले अन्न मिळवून जर त्याचे सेवन केले तर तें मद्यपानाप्रमाणेच होईल जे वाईट आहे त्याच्या योगाने वाईटच होते. अशुद्धाच्या योगाने शुद्धही अशुद्ध होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात अशी ही नीती नीटपणे अनुभवात आणावी. मग जे स्वहित आहे त्यास काय मोल द्यावे लागेल ? ४

३२१० भूक पोटापुरती । तृष्णा भरवी[1] वाखती । करवी फजीती । हांवें भार वाढला ॥ १ ॥
कुळिकेसी लांस फांस । डोई दाढी बोडवी दोष । अविहितनाश । करवी वजन[2] चुकतां ॥२॥
विधिसेवनें विहितें । कार्यकारणापुरतें । न वाटे जो चित्तें । अधर्माच्या तो त्यागी ॥ ३ ॥
आज्ञापालणें ते सेवा । भय धरोनियां जीवा । तुका म्हणे ठेवा । ठेविला तो जतन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– वाखती–पोटाची खळी, कुळिकेसी–अजीर्णास, लांस–डाग, डागण्याचा उपाय, अविहितनाश–अयोग्य उपायाने नाश, वजन–वचन असावे, बोललेला

अर्थ – आपणाला खरे म्हणजे भूक पोटापुरतची लागते, पण वाढणारी आशा आपणाला फसविते आणि पोटाची खळी भरायला लावून आपली फजिती करते तिच्यामुळेच हाव फार वाढते १ मोडशीचा अथवा अजीर्णाचा विकार झाला असताना योग्य तो इलाज करावा उगाच डाग देणे, फास देणे यांचा काय उपयोग ? उगाच दाढी व डोई मुंडून दोषच पदरात यायचा सांगितलेला उपाय न केल्यास, चुकल्यास अयोग्य उपायाने नाशच होणार. २ विधियुक्त रीतीने सेवन केल्यासच हितकर असते. कारणाइतकेच कार्य करीत असावे. या कामी जो विपरीत दृष्टाने चित्ताने वाटत नाही त्याने अधर्माचा त्याग केला असेच मानावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या मनात भय धरून सेवा करीत असावे म्हणजेच आपणांस जतन करून ठेवलेला स्वसुखाचा ठेवा प्राप्त होईल ४

३२११ कळे न कळे त्या धर्म । ऐका सांगतों रे वर्म । माझ्या विठोबाचें नाम । अट्टाहासें उच्चारा ॥१॥
तो या दाखवील वाटा । तया[3] पाहिजे त्या नीटा । कृपावंत मोटा । पाहिजे तो कळवळा ॥२॥
पुसतां चुका होतो वाटा । सवें बोळावा[4] गोमटा । मोडों नेदी कांटा । घेऊं सांटा चोरासी ॥३॥
तुका म्हणे मोल । न लगे द्यावें वेचावे बोल । विठ्ठल विठ्ठल । ऐसा छंद मनासी ॥ ४ ॥

---

१ भरी, २ वचन, ३ जया, ४ ओळखा

शब्दार्थ व टीपाः- अटाहासें-मोठ्याने, बोळावा-पोचविण्यास आलेला देव, सांटा-सुतळीचा तोडा, विकायचा माल, चीजवस्तू.

अर्थ – ज्यांना धर्म फळतो किंवा फळत नाही, त्याच्यासाठी मी एक रहस्य सांगतो, ते नीट ऐका. माझ्या विठोबाचे नाव मोठ्याने तुम्ही उच्चारा. १ ज्याला जी वाट पाहिजे ती हा नीटपणे दाखवील, किंवा ज्याला जशा प्रकारचा वाटा हवा असेल तशा प्रकारचा वाटा हा नीटपणे देईल हा देव मोठा कृपावंत आहे. पण त्याच्याविषयी आपल्या पोटात कळवळा मात्र पाहिजे. २ इतर कुणा गैरमाहितगारास आपण विचारले तर वाट चुकते, किंवा चुकीचा वाटा आपल्या हाती येतो. परंतु आपल्या बरोबर हा चांगला वाटाड्या, पोचविणारा असल्यानंतर काहीच चिंता नाही. हा आपल्या भक्तांच्या पायांस काटा मोडू देत नाही किंवा चोरांना त्याची चीजवस्तू लुबाडू देत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्यासाठी काहीं किंमत द्यावी लागत नाही फक्त आपल्या वाणीने विठ्ठल विठ्ठल असे शब्द काढावेत. हाच एक छंद आपल्या मनास असावा ४

३२१२ तरी कां वोळगणें । राजद्वारीं होती सुनें ॥ १ ॥
अंगीं दावुनि निष्कामता । पोकळ पोकळी ते वृथा ॥ २ ॥
कासया मोकळ । भोंवतें शिष्यांचें गाबाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे ढाळे । बाहेर[1] गुवे तें निराळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- वोळगणें-आश्रय घेणे, वळणे, सुनें-कुत्रे, गबाळ-समुदाय, ढाळें-बाहेरून वागण्याच्या देखाव्याने.

अर्थ – पुढीलप्रमाणे स्थिती असून सुद्धा हे लोक कुत्र्याप्रमाणे राजद्वाराचा आश्रय का घेत असतात ? १ ते आपल्या मनाची निष्कामता दाखवितात, पण ती त्यांची पोकळ बढाई असते. २ हे लोक आपल्याभोवती शिष्यांचा समुदाय उगाच का बरे गोळा करतात ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा त्याचा नुसता बाहेरून देखावा आहे त्याचे अंतरंग निराळेच असते ४

३२१३ हरिच्या दासां सोपें वर्म । सर्व धर्म पाउलें ॥ १ ॥
कडिये देव बाहेर[2] खांदी । वैष्णव मांदी क्रीडेसी ॥ २ ॥
सरती येणें आटाआटी । नाहीं तुटी लाभाची ॥ ३ ॥
तुका म्हणे समाधान । सदा मन आमुचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- मांदी-समुदाय, सरती-संपते, आटाआटी-श्रम

अर्थः-या श्रीहरीच्या पावलाचे चिंतन करावे हेच एक हरिदासाना सोपे असे वर्म सापडले आहे. १ यांना देव खांद्यावर अथवा कडेवर घेत असतो अथवा हे देवास खांद्यावर अथवा कडेवर वागवतात यांना खेळण्यासाठी वैष्णवांचे समुदाय तत्पर असतात. २ याच्यामुळे सर्व खटाटोप संपतात आणि स्वसुखाच्या लाभाचीही हानी होत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या प्रकारात आमचे मन सर्वोदित समाधानी असते. ४

३२१४ भूतांचिये नांदे जीवीं । गोसावीच सकळां ॥ १ ॥
क्षणक्षणां जागा ठायीं । दुजे नाहीं विश्वास ॥ २ ॥
बाधूनियां सोंग दुजें । अंतर बीजें वसतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे जाणे धर्म । धरी तें वर्म चिंतन ॥ ४ ॥

---

१ बाह्य रंग ते निराळे, २ बाहे खांदी.

शब्दार्थ व टीपाः- भूतांचिये-प्राणिमात्राच्या, दुजें-दुसरे, निराळें.

अर्थः-हा गोस्वामी श्रीहरी सर्व प्राणिमात्राच्या जीवात नांदत असतो, वास्तव्य करून असतो १ याच्या पायी दृढ विश्वास ठेवून क्षणाक्षणाला तुम्हीं जागत असावे. २ हा निराळे सोंग दाखवीत असला तरी हा बीजरूपाने सर्वांच्या मनात वस्ती करून असतोच. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीचे चिंतन करणे हाच एक धर्म आहे असे नीट ध्यानात घ्यावे. ४

३२१५ संत आले घरा । तों मी अभागी दातारा ॥ १ ॥
कासयानें पूजा करूं । चरण हृदयींच धरूं ॥ २ ॥
काया कुरवंडी । करून ओंवाळून सांडी ॥ ३ ॥
तुका म्हणे भावें । हात जोडीं असो ठावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- काया-शरीर, सांडी-टाकून देतो.

अर्थः-दातारा, देवा, माझ्या घरी हे संत आले आहेत. पण मी हा असा अभागी. मी त्यांचे स्वागत तरी कसे करू? त्यांची पूजा मी कशाने करू? मी त्यांचे चरण हृदयाशी मात्र धरून ठेवीत आहे २ मी माझे शरीर त्यांच्यावरून ओवाळून टाकून देईन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी त्यांना मनोभावे हात जोडून नमस्कार करीत आहे हे नीट माहीत असावे ४

३२१६ भेद तुटलियावरी । आम्ही तुमचीच हो हरी ॥ १ ॥
आतां पाळावे पाळावे । आम्हां लडिवाळांचे लळे ॥ २ ॥
आणिकांची देवा । नाहीं जाणतचि सेवा ॥ ३ ॥
तुका म्हणे हेवा । माझा हेत पायीं देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- हेवा-हाव, इच्छा, हेत-हेतू.

अर्थः- भेदभावाची कल्पना एकदा संपल्यावर श्रीहरी, आम्ही तुमचेच आहोत की १ म्हणून तुम्ही आम्हां लडिवाळांचे लाड आता पुरवावेत २ देवा, मी तुमच्यावाचून इतर कुणाचीही सेवा कधी जाणीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्या पायीच माझा हेतू आहे. या विषयीच मला हाव आहे ४

३२१७ आमुचि विश्रांति । तुमचे[1] चरण कमळापती ॥ १ ॥
पुढती पुढती नमन । घालूनियां लोटांगण ॥ २ ॥
हेंचि एक जाणें । काया वाचा आणि मनें ॥ ३ ॥
नीच जनालोकां । तळिले[2] पायरीस तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- काया-शरीराने, तळिले-तळातील, पायरीस-पायरीवर.

अर्थः- कमलापती, तुमचे चरण हीच एक आमची खरी विश्रांती आहे. १ म्हणूनच आम्ही तुम्हाला पुनः पुनः नमन करून लोटांगण घालीत आहोत. २ आम्हीं कायावाचामनेकरून फक्त तुमचेच चरण जाणतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी नीच लोकांच्या पायाखालील पायरीवर देवा, उभा आहे. ४

३२१८ विनवितों सेवटीं । आहे तैसें माझे पोटीं ॥ १ ॥
कंठीं राहावें राहावें । हेंचि मागतसें भावें ॥ २ ॥
पुरली वासना । येणें होईल नारायणा ॥ ३ ॥
तुका म्हणे जो देहाडा । तोचि वर्णीन पवाडा ॥ ४ ॥

१ तुमें, २ तळील

शब्दार्थ व टीपा.– देहाडा–देह

अर्थः– देवा, जशी कशी भावना माझ्या पोटात आहे तशीच विनती मी तुला करीत आहे. १ तुझे नाम माझ्या कंठात नित्य राहावे हेच मी मनोभावे मागत आहे. २ नारायणा, याचमुळे माझी सर्व वासना पूर्ण झाल्यासारखी होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा माझा देह तुझाच फक्त पोवाडा गात राहील ४

३२१९ आवडीची सलगी पूजा । विषम दुजा भाव तो ॥ १ ॥
ऐसीं उफराटीं वर्मे । कळो भ्रमें न येती ॥ २ ॥
न लगे समाधान मोल । रुचती बोल प्रीतीचे ॥ ३ ॥
तुका म्हणे एका जीवें । सूत्र व्हावे गुतले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडीची–प्रेमाने, विषम-प्रतिकूल

अर्थ :– मोठ्या प्रेमाने श्रीहरीशी सलगी करणे हीच खरी त्याची पूजा होय. याशिवाय दुसरा भाव मनात धारण करणे म्हणजे प्रतिकूल वृत्तीचा होय. १ अशी ही या श्रीहरीच्या पूजेची उलटी वर्मे आहेत. अनेकाना भ्रमामुळे ही समजून येत नाहीत. २ या श्रीहरीचे समाधान करण्यासाठी काही मोल द्यावे लागत नाही त्याला प्रेमाचे बोल तेवढे रुचतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या भावाचे सूत्र एकचित्ताने त्याच्यापाशी गुतलेले असावे. ४

३२२० बाळ माते लाते वरी । मारी तेणें संतोषे ॥ १ ॥
सुख वसे चित्ता अंगीं । तें हे रंगीं मिळाले ॥ २ ॥
भक्षी त्याचा जीवभाग[१] । आला भाग तो बरा ॥ ३ ॥
तुका म्हणे ऋणानुबंधें । सांगे सुदें सकळां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लाते–लाथा, सुदें–सरळ, स्पष्ट.

अर्थ – लहान बालक आपल्या आईला लाथा देत असते, पण आईला त्यामुळे संतोषच होत असतो. १ अशा या प्रेमाच्या रंगात मिसळून गेल्यावर चित्तामध्ये सुखच निर्माण होते. २ आई जो आवडता पदार्थ खाते त्याचा चागला भाग काढून आपल्या मुलासाठी ठेवते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा प्रेमाचा ऋणानुबंध मी सर्वांना स्पष्टपणे सागत आहे ४

३२२१ शिजल्यावरी जाळ । वांयां जायाचें तें मूळ ॥ १ ॥
ऐसा वारावा तो श्रम । अतिशयीं[२] नाहीं काम ॥ २ ॥
साभाळावें वर्म । उचिताच्या काळें धर्म ॥ ३ ॥
तुका म्हणे कळे । ऐसें कारणाचे वेळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वारावा–दूर करावा, निवारण करावा, कारणाचे–कार्याच्या.

अर्थ :– अन्न शिजून झाल्यावर उगाच जाळ लावण्यात काय अर्थ आहे ? तो वायाच जाणार. १ असे विनाकारण होणारे श्रम निवारण करावेत, अतिशयत्वाने काम करण्यात काही अर्थ नसतो २ योग्य वेळी योग्य ते करणे हाच धर्म असल्याने तो नीटपणे साभाळावा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कोणत्याही कार्याच्या वेळेस याचे महत्त्व समजून येईल ४

---

१ जीव मागे, २ अतिशयाई.

३२२२ उभा ऐल थडी । तेणे घालू नये उडी ॥ १ ॥
पुढें गेल्याचे उपाय । करावे ते केले काय ॥ २ ॥
दिसते आहारीं । नये जाऊ ऐशावरी ॥ ३ ॥
आळसाची धाडी । तुका म्हणे बहु नाडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ऐलथडी–अलीकडच्या तीरावर, आहारीं–आटोक्यात, नाडी–फसविते, अडविते

अर्थ – जो मनात भीती धरून अलीकडच्या काठावर उभा आहे त्याने पाण्यात उडी घालण्याचे साहस करू नये १ पाण्यातून तरून जाताना जे पुढे गेले आहेत त्याचे उपाय पाहून आपणही त्याप्रमाणे करावेत २ सर्व आपल्या आटोक्यात आहे अशा विश्वासावर जाऊ नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, आळसाची धाड एकदा येऊन पडली की मग ती फसविते ४

३२२३ शक्ती द्याव्या[1] देवा । नाही पार्थिवाची[2] सेवा ॥ १ ॥
मुख्य आहे ऐसा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥ २ ॥
मना पोटीं देव । जाणे जैसा तैसा भाव ॥ ३ ॥
तुका म्हणे सोसे । लागे लाविल्याचे पिसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पार्थिवाची–देहाची, पिसे–वेड

अर्थ – देवा, मला तुमची भक्ती करण्याची तेवढी शक्ती द्यावी देहादी वस्तूची सेवा करण्याची इच्छा नाही १ जाणते लोकहो, देहादी वस्तूची सेवा करू नये हाच एक मुख्य धर्म आहे असे समजा २ मनामध्ये जसा भाव असेल तसा देव होत असतो हे तुम्ही नीट जाणावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मनाला ज्याचा ध्यास असतो तसेच वेड त्याला लागत असते ४

३२२४ कार्यंचि कारण । तृष्णा पाववितें[3] सीण ॥ १ ॥
काय करुनि ऐसा संग । सोसेंचि तू पांडुरंग ॥ २ ॥
रूपीं नाहीं गोडी । हावे हावे ऊर फोडी ॥ ३ ॥
तुका म्हणे पडे भरी । ऐशा वरवळाचे थोरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भरी–भरीस, वरवळाचे–वरवरच्या, बाह्यस्वरूपाच्या

अर्थ – प्रपंचामधील नाना प्रकारची कारणे व त्यानुसार होणारी कर्मे याची तृष्णाच कष्ट देणारी असते १ म्हणून अशा कष्टदायक व्यवहाराचा संग करून काय उपयोग ? तुम्ही आपल्या हौसेने पांडुरंगाचेच चिंतन करावे २ जर देवाच्या रूपात बरोबरीच गोडी नसेल तर उगाच हावेहावेने ऊर फोडण्यात काय अर्थ आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा वरवरच्या थोरपणाला भरीस पडणे व्यर्थ आहे ४

३२२५ संसाराच्या नावे घालूनिया शून्य । वाढता हा पुण्य केला धर्म ॥ १ ॥
हरिभजनें हे धवळिलें जग । चुकविला लाग कळिकाळाचा ॥ २ ॥
कोणा ही नलगे साधनाचा पांग । करणें केला त्याग देहबुद्धी ॥ ३ ॥
तुका म्हणे सुख समाधि हरिकथा । नेणे भवव्यथा गाईल तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शून्य घालणे–पाणी सोडणे, धवळिले–प्रकाशित केले, लाग–लाभ, पांग–नातेदारी, ताब्यात असणे

१ द्यावी, २ पदार्थी, ३ वाढवित

*अर्थ* – मी स्वत त्या संसारावर पाणी सोडून पुढीलप्रमाणे वाडत्या प्रकारचा पुण्यदायक असा धर्म संपादन केला आहे. १ मी श्रीहरीच्या भजनाच्या योगे सारे विश्व प्रकाशित करून टाकले आहे; त्यामुळे कळिकाळाचा सर्व लाभच मी चुकविलेला आहे २ मी आता कोणत्याही साधनांच्या ताब्यात नाही, मी देहबुद्धीचा सर्वस्वी त्याग केला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हरिकथा हीच खरी सुखाची समाधी आहे या हरिकथेचे गायन जो करील त्याला संसाराचे दु ख कोणतेच उरणार नाही ४

३२२६ विश्वासिया नाहीं लागत सायास । रंग[1] अनायासें अंगा येतो ॥ १ ॥
लेंकराच्या हातें घास मागे माता । वोरसोनि चित्ता सुख पावे ॥ २ ॥
गौरव त्या[2] मानी आरुषा वचनीं । भूषण ते वाणी मिरवावी ॥ ३ ॥
तुका म्हणे आहे सकळ ही साक्षी । माझा कई पक्षी पांडुरंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विश्वासिया–विश्वास ठेवल्यावर, सायास–कष्ट, वोरसोनि–पान्हा फुटून, स्नेहभरित होऊन, आरुषा–बोबडया, कईपक्षी–कैवार घेणारा.

*अर्थ* – एकदा श्रीहरीवर दृढ विश्वास ठेविल्यानंतर मग फसलेच कष्ट उरत नाहीत अंगात हरिकृपा भरून प्रेमरसाचा रग निर्माण होतो १ आपल्या लहान बालकाच्या हातून कौतुकाने आई घास मागीत असते तो तिला मिळाला की ती पान्हा फुटून स्नेहभरित होते. २ त्याच्या बोबडया बोलांनी तिला सुख होते ती गौरव मानते त्याची वाणी हेच एक भूषण आहे असे समजून ती मिरवीत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा पांडुरंग सर्वसाक्षी असून त्याने माझा कैवार घेतलेला आहे ४

३२२७ वैभवाचे धणी सकळा[3] शरणागत । सत्यभावें चित्त अर्पिले ते ॥ १ ॥
नेदी उरों देव आपणावेगळें । भावाचिया बळें ठायाठाव ॥ २ ॥
जाणोनि नेणोनि अंगा आली दशा । मग होय इच्छा आपणच ॥ ३ ॥
तुका म्हणे बरे धाकटयाचे जिणे । माता स्तनपानें वाढविते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नेदी–देत नाही, ठायाठाव–योग्य जागी योग्य ते स्थान.

*अर्थ* – ज्याने आपले चित्त सत्यत्वाने भगवतास अर्पण केले आहे व जे त्याला शरण गेले आहेत तेच सर्व वैभवाचे धनी होतात १ त्याला देव आपणाशिवाय वेगळे कधीच होऊ देत नाही, तरीसुद्धा भावबळाच्या योगाने ते स्वामीसेवकाचे योग्य असे स्थान राखून असतात २ सर्व काही जाणून नेणतेपणाची दशा त्याच्या अंगाला लावलेली आहे. त्याच्या इच्छेप्रमाणेच देह स्वत होत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून आपले लहान मुलाचे जिणे फार बरे, त्याला आई स्तनपान देऊन वाढवीत असते. ४

३२२८ कई ऐसी दशा येईल माझ्या आंगा । चित्त पांडुरंगा स्मरतसे ॥ १ ॥
नाठवुनि देह पायाचें चिंतन । अवसान ते क्षण नाहीं मधीं ॥ २ ॥
काय[4] ऐसा पात्र होईन लाभासी । नेणो हृषीकेशी तुष्टईल ॥ ३ ॥
तुका म्हणे धन्य मानीन संचित । घेईन तें नित्य प्रेमसुख ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कई–केव्हा, अवसान–अंतर, तुष्टईल–संतुष्ट होईल

१ अनायास रंग अंगा, २ तो, ३ सकळ ४ कई

३२२२ उभा ऐल थडी । तेणे घालू नये उडी ॥ १ ॥
पुढें गेल्याचे उपाय । करावे ते केले काय ॥ २ ॥
दिसते आहारी । नये जाऊ ऐशावरी ॥ ३ ॥
अळसाची धाडी । तुका म्हणे बहु नाडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ऐलथडी–अलीकडच्या तीरावर, आहारीं–आटाक्यात नाडी–फसवित, अडविते

अर्थ – जो मनात भीती धरून अलीकडच्या काठावर उभा आहे त्याने पाण्यात उडी घालण्याचे करू नये १ पाण्यातून तरून जाताना जे पुढे गेले आहेत त्याचे उपाय पाहून आपणही त्याप्रमाणे करावेत : सर्व आपल्या आटोक्यात आहे अशा विश्वासावर जाऊ नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, आळसाची धाड एकदा येऊन पडली की मग ती फसविते ४

३२२३ शक्ती द्याव्या[1] देवा । नाहीं पार्थिवाची[2] सेवा ॥ १ ॥
मुख्य आहे ऐसा धर्म । जाणते हो जाणा वर्म ॥ २ ॥
मना पोटीं देव । जाणें जैसा तैसा भाव ॥ ३ ॥
तुका म्हणे सोसे । लागे लाविल्याचे पिसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पार्थिवाची–देहाची, पिसे–वेड

अर्थ – देवा, मला तुमची भक्ती करण्याची तेवढी शक्ती द्यावी देहादी वस्तूची सेवा करण्याची इच्छा नाही १ जाणते लोकहो, देहादी वस्तूची सेवा करू नये हाच एक मुख्य धर्म आहे असे समजा २ मनामध्ये जसा भाव असेल तसा देव होत असतो हे तुम्ही नीट जाणावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मनाला ज्याचा ध्यास असतो तसेच वेड त्याला लागत असते ४

३२२४ कार्यचि कारण । तृष्णा पावविते[3] सीण ॥ १ ॥
काय करुनि ऐसा संग । सोसेचि तू पांडुरंग ॥ २ ॥
रूपीं नाही गोडी । हावे हावे ऊर फोडी ॥ ३ ॥
तुका म्हणे पडे भरी । ऐशा वरदळाचे थोरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भारी–भरास वरदळाचे–वरवरच्या, बाह्यस्वरूपाच्या

अर्थ – प्रपंचामधील नाना प्रकारची कारणे व त्यानुसार होणारी कर्मे याची तृष्णाच कष्ट देणारी असते १ म्हणून अशा कष्टदायक व्यवहाराचा संग करून काय उपयोग ? तुम्ही आपल्या हौसेने पांडुरंगाचेच चिंतन करावे २ जर देवाच्या रूपात खरोखरीच गोडी नसेल तर उगाच हावेहावेने ऊर फोडण्यात काय अर्थ आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात अशा वरवरच्या थोरपणाला भरीस पडणे व्यर्थ आहे ४

३२२५ संसाराच्या नावे घालूनिया शून्य । वाढता हा पुण्य केला धर्म ॥ १ ॥
हरिभजने हे धवळिले जग । चुकविला लाग कळिकाळाचा ॥ २ ॥
कोणा ही नलगे साधनाचा पाग । करणे केला त्याग देहबुद्धी ॥ ३ ॥
तुका म्हणे सुख समाधि हरिकथा । नेणे भवव्यथा गाईल तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शून्य घालणे–पाणी सोडणे धवळिले–प्रकाशित केले लाग–लाभ, पाग–जबाबदारी, ताब्यात असणे

१ द्यावी, २ पदार्थी, ३ वाढवित

पण ती चिंता आता निवारण झाली आता येथे फक्त रिकामी राळवण मात्र उरलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देहासंबंधीच्या आशेमुळे मला फार कष्ट झाले होते, पण मी आता त्या नष्ट दुष्ट आशेला दूर केले आहे ४

३२३२ देव तीर्थं[1] येर दिसे जया ओस । तोचि तया दोष जाणतिया ॥ १ ॥
तया बरे फावे देवा चुकवितां । संचिताची सत्ता अंतराय ॥ २ ॥
शुद्धाशुद्धठाव पापपुण्यबीज । पाववील दुजे फळभोग ॥ ३ ॥
तुका म्हणे विश्वंभराऐसें वर्म । चुकविल्या धर्म अवघे मिथ्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ओस–रिकामे

अर्थ – ज्याला तीर्थात फक्त देव दिसतो व इतर ठिकाणे रिकामी दिसतात हा एक मोठाच दोष त्या जाणत्या माणसातही राहातो. १ देवाला चुकवण्यात त्याला चांगलेच फावते त्याच्याच प्रारब्धाच्या सत्तेमुळे देवा-विषयी दूरत्व निर्माण होते २ हे स्थान शुद्ध. हे अशुद्ध हा विचार म्हणजे पापपुण्याचेच बीज आहे असे मानण्या न मानण्यावर विविध प्रकारचे फळभोग प्राप्त होतील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी सर्व विश्वात भरून राहिलेला आहे हे वर्म नीट जाणावे हेच जर तुम्ही चुकवाल तर मग सर्व धर्म खोटेच आहेत असे मानावे लागेल ४

३२३३ काय करूं सांगता ही न कळे वर्म । उपस्थित भ्रम उपजवितो ॥ १ ॥
मन आधीं ज्याचे आले होइल हाता । तयावरी सत्ता केली चाले ॥ २ ॥
अभुकेचे अगीं चवी ना सवाद । मिथ्या ऐसा वाद दुराग्रह ॥ ३ ॥
तुका म्हणे आप राखावे आपणा । संकोचोचि कोणा नये आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अभुकेचे–भूक नसलेल्याच्या, मिथ्या–खोटा

अर्थ – लोकांना मी कितीही सांगितले तरी स्वहिताचे मर्म समजत नाही त्याला काय करू ? नवो नोच भ्रम त्यांच्या ठिकाणी उत्पन्न होतो १ ज्याचे मन अगोदर माझ्या हाताशी येईल त्याच्यावरच मला हवी तशी सत्ता करता येईल २ ज्याला भूक नाही त्या माणसाच्या तोंडास कसलीच चव नसते त्याचे बोलणे हा खोटेपणा-चाच दुराग्रह असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपण संकोच कुणाचाच न करता आपले आपणांस सांभाळावे ४

३२३४ अमृत अव्हेरे उचळले[2] जाता । विष आर्तभूतां आवश्यक ॥ १ ॥
आदरासी मोल नये लावूं केजें । धीर शुद्धबीजे गोमटा तो ॥ २ ॥
खऱ्याचिये अंगीं आपणचि चाली । लावणी लाविली[3] काय लागे ॥ ३ ॥
तुका म्हणे चाडे करा वेवसाव । आम्हांसी तो वाव धीर आहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आर्तभूतां–इच्छा करणारांना, केजें–नारळ वा धान्य, लावणी–चाल रीत, चाडें–इच्छेने, वाव–व्यर्थ

अर्थ :– उचंबळून येणाऱ्या अमृताचा लोक अव्हेर करतात आणि प्राणघातक विषाची मात्र अवश्य इच्छा करतात १ आदराने दिल्या गेलेल्या नारळाची कधी कुणी किंमत करू नये शुद्धभोजापोटी जे धैर्य असते तेच चांगले समजावे २ खऱ्याची चाल सहजच खऱ्यासारखी असते खोट्यांना खऱ्याची रीत लावल्याने कधी लागेल काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही आपल्या इच्छेने आपला व्यवसाय करा आम्ही मात्र त्याला व्यर्थ मानतो हेच आमचे धैर्य आहे ४

१ तीर्थी, २ उचंबळे, ३ लागली

अर्थः– पांडुरंगा, पुढीलप्रमाणे माझी अवस्था केव्हा बरे होईल ? या विचाराने माझे चित्त झुरत राहिलेले आहे. १ देहाचा विसर पडून मला देवा, तुमच्याच पायांचे चिंतन सतत घडावे एक क्षणभरही त्यामध्ये अंतर पडू नये. २ अशा या लाभास मी कधीकाळी पात्र होईन का ? हा हृषीकेशी माझ्यावर कधी संतुष्ट होईल हे काही मला समजत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे एकदा झाले म्हणजे मी माझे संचित धन्य मानीन, आणि नित्य प्रेमसुखाचा भोग घेत राहीन. ४

३२२९ नाहीं वागवीत जाणिवेचें ओझें । स्वामिसेवा काज निर्धारें हा ॥ १ ॥
आज्ञा ते प्रमाण हा मनीं निर्धार । येणे फिटे भार निश्चयेंसी ॥ २ ॥
आळीकरें आम्ही एकविध चित्तें । तैसें होऊं येतें मायबापें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी ये जातीची सेवा । घातलासे देवावरी भार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– काज-कार्य, भार-ओझे, आळीकरें-हट्ट करणारे.

अर्थ :– जाणतेपणाचे ओझे मी माझ्या शिरावर मुळीच वागवणार नाही स्वामीची सेवा करणे हेच एक माझे कार्य आहे १ स्वामीची आज्ञा प्रमाण मानणे हाच माझा निर्धार असून यामुळे माझ्यावरील प्रपंचाचे ओझे निश्चयाने कमी होणार आहे असा माझा विश्वास आहे. २ आमचे चित्त एकनिष्ठ असल्याने आम्ही स्वामीजवळ लडिवाळपणाने हट्ट करणारे झालो आहोत, म्हणून आमच्या हट्टाप्रमाणे या मायबापास व्हावे लागते ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी स्वामीची सेवा ही अशा जातीची आहे मी आपला सारा भार देवावर घातलेला आहे. ४

३२३० काय नाहीं माझे अंतरीं वसति । व्यापक हा भूतीं सकळा[1] नांदे ॥ १ ॥
चित्तासी प्रसाद होईल चळण । तेचि तें वळण मनासही ॥ २ ॥
सर्व शक्ति जीवीं राहिल्या कुंटित । नाहीं केलें हीत आपुलें तें ॥ ३ ॥
तुका म्हणे दोरी खांब सूत्र्या हातीं । नाचवी नाचती जडें तैसीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– अंतरीं-मनात, चित्तामधे, जड–निर्जीव.

अर्थः– हा श्रीहरी सर्वत्र व्यापकपणाने नांदत असताना तो काय माझ्या चित्तामध्ये राहात नाही ? १ त्याची जर कृपा झाली तर माझ्या चित्ताचे चलनवलन ठीक होईल व तसेच वळण माझ्या मनासही लागेल २ माझ्या सर्व शक्ती माझ्याच जीवात गुंतून राहिलेल्या होत्या, मी आपले हित साधलेले नव्हते ३ तुकाराम महाराज म्हणतात, परंतु देवा, बाहुल्या नाचविणाराच्या हाती सर्व सूत्रे असून तोच ती दोरी हालवून निर्जीव अशा बाहुल्या नाचवीत असतो ४

३२३१ देवाचें निर्माल्य कोण शिवे हातीं । संकल्पासी होती विकल्प ते ॥ १ ॥
वाहिलें देह हें देवा एकसरें । होईल तें बरें तेणें[2] द्वारें ॥ २ ॥
होता भार त्याची निवारली खंती । येथें आतां रिती साटवण ॥ ३ ।
तुका म्हणे इच्छे पावविले कष्ट । म्हणऊनि नष्ट दुरावली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खंती-चिंता, रिती-रिकामी.

अर्थ :– देवाला एकदा अर्पण केल्यावर ते निर्माल्य होते त्याचा स्वीकार कोण व उगाच संकल्पाविषयीचे विकल्प निर्माण होईल. १ मी हा माझा देह एकदम देवास वाहिला माझ्या जीविताचे चांगले होणार आहे २ माझ्या देहाचा, देहबुद्धीचा भार माझ्या शि

[1] सकळाच्या, [2] त्याच्या.

पण ती चिंता आता निवारण झाली. आता येथे फक्त रिकामी साठवण मात्र उरलेली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देहासंबंधीच्या आशेमुळे मला फार कष्ट झाले होते; पण मी आता त्या नष्ट दुष्ट आशेला दूर केले आहे ४

३२३२ देव तीर्थ[1] येर दिसे जया ओस । तोचि तया दोष जाणतिया ॥ १ ॥
तया वरें फावे देवा चुकवितां । संचिताची सत्ता अंतराय ॥ २ ॥
शुद्धाशुद्धठाव पापपुण्यबीज । पावविल दुजे फळभोग ॥ ३ ॥
तुका म्हणे विश्वंभराऐसें वर्म । चुकविल्या धर्म अवघे मिथ्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ओस–रिकामे

अर्थ:– ज्याला तीर्थात फक्त देव दिसतो व इतर ठिकाणे रिकामी दिसतात हा एक मोठाच दोष त्या जाणत्या माणसातही राहातो. १ देवाला चुकवण्यात त्याला चांगलेच फावते त्याच्याच प्रारब्धाच्या सत्तेमुळे देवा-विषयी दूरत्व निर्माण होते. २ हे स्थान शुद्ध, हे अशुद्ध हा विचार म्हणजे पापपुण्याचेच बीज आहे असे मानण्या न मानण्यावर विविध प्रकारचे फळभोग प्राप्त होतील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी सर्व विश्वात भरून राहिलेला आहे हे वर्म नीट जाणावे हेच जर तुम्ही चुकवाल तर मग सर्व धर्म खोटेच आहेत असे मानावे लागेल ४

३२३३ काय करूं सांगतां ही न कळे वर्म । उपस्थित भ्रम उपजवितो ॥ १ ॥
मन आधीं ज्याचें आलें होइल हातां । तयावरी सत्ता केली चाले ॥ २ ॥
अभुकेचे अंगी चवी ना सवाद । निश्चा ऐसा वाद दुराग्रह ॥ ३ ॥
तुका म्हणे आप राखावें आपणा । संकोचोंचि कोणा नव्हे आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अभुकेचे–भूक नसलेल्याच्या, मिथ्या–खोटा

अर्थ – लोकाना मी कितीही सांगितले तरी स्वहिताचे मर्म समजत नाही त्याला काय करू ? नवी नवी तीच भ्रम त्यांच्या ठिकाणी उत्पन्न होतो. १ ज्याचे मन अगोदर माझ्या हाताशी येईल त्याच्यावरच मला हवी तशी सत्ता करता येईल. २ ज्याला भूक नाही त्या माणसाच्या तोंडास कसलीच चव नसते त्याचे बोलणे हा खोटेपणा-चाच दुराग्रह असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपण संकोच कुणाचाच न करता आपले आपणास सांभाळावे ४

३२३४ अमृत अव्हेरें उचळले[2] जातां । विष आर्त्तभूतां आवश्यक ॥ १ ॥
आदरासी मोल नये लावूं केजे । धीर शुद्धबीजें गोमटा तो ॥ २ ॥
खन्याचिये अंगीं आपणचि चाली । लावणी लाविली[3] काय लागे ॥ ३ ॥
तुका म्हणे चाडे करा वेवसाव । आम्हांसी तो वाव धीर आहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आर्त्तभूतां–इच्छा करणाराना, केजें–नारळ वा धान्य, लावणी–चाल रीत, चाडें–इच्छेने, वाव–व्यर्थ.

अर्थ :– उचंबळून येणाऱ्या अमृताचा लोक अव्हेर करतात आणि प्राणघातक विषाची मात्र अवश्य इच्छा धरतात १ आदराने दिल्या गेलेल्या नारळाची कधी कुणी किंमत करू नये. शुद्धबीजापोटी जे धैर्य असते तेच चांगले समजावे. २ खन्याची चाल सहजच खन्यासारखी असते खोट्यांना खऱ्याची रीत लावल्याने कधी लागेल काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही आपल्या इच्छेने आपला व्यवसाय करा. आम्ही मात्र त्याला व्यर्थ मानतो हेच आमचे धैर्य आहे ४

---

१ तीर्थी, २ उचंबळें, ३ लागली

पण तो चिंता आता निवारण झाली. आता येथे फक्त रिकामी साठवण मात्र उरलेली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देहासंबंधीच्या आशेमुळे मला फार कष्ट झाले होते; पण मी आता त्या नष्ट दुष्ट आशेला दूर केले आहे. ४

३२३२ देव तीर्थं[1] येर दिसे जया ओस । तोचि तया दोष जाणतिया ॥ १ ॥
तया बरें फावे देवा चुकवितां । संचिताची सत्ता अंतराय ॥ २ ॥
शुद्धाशुद्धभाव पापपुण्यबीज । पाववील दुजे फळभोग ॥ ३ ॥
तुका म्हणे विश्वंभराऐसें वर्म । चुकविल्या धर्म अवघे मिथ्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ओस–रिकामे.

अर्थ:– ज्याला तीर्थात फक्त देव दिसतो व इतर ठिकाणे रिकामी दिसतात हा एक मोठाच दोष त्या जाणत्या माणसातही राहातो. १ देवाला चुकवण्यात त्याला चांगलेच फावते त्याच्याच प्रारब्धाच्या सत्तेमुळे देवाविषयी दूरत्व निर्माण होते. २ हे स्थान शुद्ध, हे अशुद्ध हा विचार म्हणजे पापपुण्याचेच बीज आहे असे मानण्या न मानण्यावर विविध प्रकारचे फळभोग प्राप्त होतील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी सर्व विश्वात भरून राहिलेला आहे हे वर्म नीट जाणावे हेच जर तुम्ही चुकवाल तर मग सर्व धर्म खोटेच आहेत असे मानावे लागेल ४

३२३३ काय करूं सांगतां ही न कळे वर्म । उपस्थित भ्रम उपजवितो ॥ १ ॥
मन आधीं ज्याचें आलें होइल हातां । तयावरी सत्ता केली चाले ॥ २ ॥
अभुकेचे अंगीं चवी ना सवाद । मिथ्या ऐसा वाद दुराग्रह ॥ ३ ॥
तुका म्हणे आप राखावें आपणा । संकोचोचि कोणा नये आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– अभूकेचे–भूक नसलेल्याच्या, मिथ्या–खोटा

अर्थ :– लोकाना मी कितीही सांगितले तरी स्वहिताचे मर्म समजत नाही त्याला काय करू? नको तोच भ्रम त्यांच्या ठिकाणी उत्पन्न होतो. १ ज्याचे मन अगोदर माझ्या हाताशी येईल त्याच्यावरच मला हवी तशी सत्ता करता येईल. २ ज्याला भूक नाही त्या माणसाच्या तोंडास कसलीच चव नसते त्याचे बोलणे हा खोटेपणाचाच दुराग्रह असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपण संकोच कुणाचाच न करता आपले आपणांस सांभाळावे ४

३२३४ अमृत अव्हेरें उचळले[2] जातां । विष आर्त्तभूतां आवश्यक ॥ १ ॥
आवरासी मोल नये लावूं केजे । धीर शुद्धबीजें गोमटा तो ॥ २ ॥
त्याचिये अंगीं आपणचि चाली । लावणी लाविली[3] काय लागे ॥ ३ ॥
तुका म्हणे चाडे करा वेवसाव । आम्हांस[4] [illegible] ॥ ४ ॥

३२३५ अनुभवाचे रस देऊं आर्तभूतां । सोडूं चोजवितां पुढें पोतीं ॥ १ ॥
देवाचा प्रसाद रत्नाच्या ओवणी । शोभतील गुणीं आपुलिया ॥ २ ॥
आधीं भाव सार शुद्ध ते भूमिका । बीज आणि पिका चिंता नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याचें नाम गुणवंत । तें नाहीं लागत पसरावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- आर्तभूतां-गरजू लोकांना, इच्छा करणारांना, चोजवितां-शोध घेतल्यास.

अर्थ.- जे कुणी गरजू लोक आहेत त्यांना आम्ही अनुभवाचे सार देऊ. आत्मज्ञानाविषयी जे कुणी शोध घेणारे आहेत त्यांच्यापुढे आम्ही अध्यात्मज्ञानाची पोथी सोडू १ देवाचा प्रसाद ही एक रत्नाची ओवलेली माळ आहे. ती आपल्या गुणांनी शोभून दिसते २ आत्मसुखाच्या मार्गात शुद्ध भूमिका असणे हेच एक सार आहे. मग आत्मविचाराच्या बीजाची पेरणी केल्यावर भरघोस पिकाला काही चिंता नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचे नावच गुणवत आहे तो तसाच असतो. त्याचे नाव मुद्दाम घेऊन काही प्रसृत करावे लागत नाही. ४

३२३६ काय मज एवढा भार । हे वेव्हार चालवाया[1] ॥ १ ॥
उकल तो जाणे धणी । मज भोजनीं कारण ॥ २ ॥
चिंता ज्याची तया शिरीं । लेंकरीं तें खेळावें ॥ ३ ॥
तुका म्हणे सेवट झाला । देव या बोला भोगिता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- उकल-उलगडा, कारण-कार्य.

अर्थ:- हा सर्व व्यवहार चालण्याविषयी एवढा भार कशासाठी मी घ्यावयास हवा? १ या सर्वांचा उलगडा करण्याचे काम स्वामी जाणतच आहे मी फक्त भोजन करण्याचे काम जाणतो २ व्यवहाराची चिंता ज्याची त्यास असावी, ती स्वामीस आहेच आम्ही लेकरानी मात्र मनसोक्तपणे खेळत असावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देव सर्व काही भोगणारा आहे या बोलण्याने शेवट झाला आहे ४

३२३७ न गमे न गमे न गमे हरिविण । न गमे न गमे न गमे मेळवा शाम कोणी गे ॥ १ ॥
तळमळ करी तैसा जीव जळाविण मासा । दिसती दिशा ओसा वो ॥ २ ॥
नाठवे भूक तान विकळ जालें मन । घडी जाय प्रमाण जुगा एकी वो ॥ ३ ॥
जरी तुम्ही नोळखा सांगतें ऐका । तुकयाबंधूचा सखा जगजीवन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- न गमे-करमत नाही, ओसा-शून्य, रिकाम्या, विकल-व्याकुळ, घडी-क्षण जुगा-युगाप्रमाणे.

अर्थ :- या श्रीहरीवाचून मला मुळीच करमत नाही गे. मला या श्यामवाचून करमत नसल्याने कुणी तरी त्याची प्राप्ती करून द्या ना गे. १ पाण्याशिवाय मासा जसा तळमळ करतो, त्याप्रमाणे माझा जीव तगमगत आहे मला साऱ्या दिशा शून्य दिसत आहेत. २ मला तहान आठवत नाही की भूक आठवत नाही, माझे मन व्याकुळ होऊन गेले आहे. एक क्षण यामुळे एका युगाप्रमाणे भासत आहे ३ तुकयाबंधू म्हणतात, तुम्ही जरी ओळखले नाही तरी हा माझा स्वामी सर्व जगाचा जीवन आहे ४

३२३८ विठ्ठला रे तुझे वर्णितां गुणवाद । विठ्ठला रे दग्ध जालीं पापें ॥ १ ॥
विठ्ठला रे तुझें पाहातां श्रीमुख । विठ्ठला रे सुख जालें नयना ॥ २ ॥
विठ्ठला रे तुज देतां आलिंगन । विठ्ठला तनमन निवाल्या बाह्या ॥ ३ ॥

१ चाळवाया.

विठ्ठला रे तुझी ऐकतां कीर्ति । विठ्ठल हे विश्रांति पावले स्मरणें ॥ ४ ॥
विठ्ठला रे तुकयाबंधु म्हणे देहभाव । विठ्ठला जीवी पाव धरिता गेला ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पाव–पाय.

अर्थ :– विठ्ठला, तुझे गुणगान वर्णन करताना माझी सर्व पापे दग्ध होऊन गेली १ विठ्ठला, तुझे श्रीमुख पाहाताना माझ्या डोळ्याला फारच सुख झाले २ विठ्ठला, तुला आलिंगन देताना माझे तनमन व माझे हात निवून तृप्त झाले ३ विठ्ठला, तुझी कीर्ती ऐकताना, तुझे स्मरण केले असताना मनाला विश्रांती लाभली ४ तुकयाबंधू म्हणतात, विठ्ठला, तुझे पाय मी जीवेभावेकरून धरल्यावर माझा देहभाव नाहीसा झाला ५

३२३९ एकांतीं लोकांतीं करूं गदारोळ । लेश तो ही मळ नाहीं येथें ॥ १ ॥
घ्यावें द्यावें आम्हीं आपुलिया सत्ता । न देखों पुसता दुजा कोणी ॥ २ ॥
भांडाराची किल्ली माझे हातीं आहे । पाहिजे तो पाहे वान येथें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां विश्वासाच्या बळें । ठेविले मोकळें देवें येथें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गदारोळ–गर्जना, लेश–थोडाही, वान–वाण, नमुन्याचा माल.

अर्थ :– एकान्तात असताना अथवा समुदायात असताना आम्ही श्रीहरीच्या नामाची गर्जना सतत करू. याविषयी शंकेच्या मळाचा थोडाही अंश मनात धरण्याचे कारण नाही १ काही घ्यायचे असेल तर अथवा काही द्यायचे असेल तर ते आम्ही आमच्या सत्तेवरच करू, याविषयी आम्हास कुणी दुसरा विचारणाराही नाही हे नीट पाहू २ या श्रीहरीच्या कृपेच्या भांडाराची किल्ली माझ्या हातात आहे ज्याला ज्या नमुन्याचा माल हवा असेल तो या ठिकाणी आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमचा देवावर विश्वास असल्यामुळे त्याने आम्हास येथे मोकळे, स्वतंत्र ठेविले आहे. ४

३२४० स्मरणाचे वेळे । व्हावे सावध[1] न कळे ॥ १ ॥
पडिलो विषयांचे ओढी । कोणी न दिसेसे काढी ॥ २ ॥
भांडवल माझें । वेच जाले भूमी ओझें ॥ ३ ॥
तुका म्हणे कळे । तूंचि धावे ऐसे वेळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेच–खर्च

अर्थ – श्रीहरीचे स्मरण करताना वृत्ती सावध ठेवावी हे कळत नाही. १ मी या नाना विषयांच्या ओढीत सापडलो आहे. यातून कुणी काढणारे मला दिसत नाही २ माझ्या जवळचे सर्व भांडवल खर्च झाले व आता मी देहभावाच्या अवस्थेने या भूमीस भारभूत झालो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा वेळेस तूच एक धावत येतोस व रक्षण करतोस हे समजते ४

३२४१ पाहा हो देवा कैसे जन । भिन्न भिन्न संचिते ॥ १ ॥
एक नाहीं एका ऐसे । दावी कैसे शुद्ध हीन ॥ २ ॥
पंचभूतें एकी रासी । सूत्रें कैसी खेळवी[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे जे जे जाती । तैसी स्थिति येतसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संचिते–प्रारब्धाचे.

१ सावधान कळे, २ खेळवी.

शब्दार्थ व टीपा:– आन–आणखी, दुसरे, हेवा–हाव.

अर्थ – देवा, आमच्या जवळचे बळ हे आम्हास तुझ्या नामामुळेच प्राप्त झाले आहे. १ या नामामृताचे आम्ही सेवन करू. याच्याशिवाय आणखी दुसरे काहीच आम्ही जाणीत नाही. २ सुखदुःख अथवा पीडा व रोग हे ज्याचे त्याचे भोग असल्याने ते भोगतीलच. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझी हाव तुमच्या पायांविषयीच आहे. ४

३२४६ आर्त माझ्या बहु पोटीं । व्हावी भेटी पायांशी ॥ १ ॥
यासी तुम्ही कृपावंता । माझी चिंता असों द्या ॥ २ ॥
तळमळ करी चित्त । अखंडित वियोगें ॥ ३ ॥
तुका म्हणे पंढरिनाथा । जाणें[1] वेथा अंतरिची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आर्त–तीव्र इच्छा, वेथा–व्यथा, दुःख

अर्थ:– देवा, तुमच्या पायांची भेट व्हावी हीच एक तीव्र इच्छा माझ्या मनात आहे. १ यासाठी कृपावंता, माझी चिंता काही थोडी तुमच्या मनात असू द्यावी २ तुमचा एकसारखा वियोग होत असल्याने माझे चित्त तळमळत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीनाथा, माझ्या चित्ताची ही व्यथा तुम्ही नीट जाणून घ्या. ४

३२४७ बहु जन्मांतरें फेरे । केले येरे सोडवीं ॥ १ ॥
आळवितों करुणाकरे । विश्वंभरे दयाळे ॥ २ ॥
वाहवतों मायापुरीं । येथें करीं कुढावा[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे दुजा कोण । ऐसा सीण निवारी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– कुढावा–कुडावा, रक्षण.

अर्थ – देवा मी अनेक जन्मातून मला फिरुन आलो आहे, आता तू यातून मला सोडीव रे. १ करुणेच्या सागरा, विश्वंभरा, दयाळा, मी तुला ही विनंती आळवून करीत आहे. २ मी या संसारसागरातून वाहून चालली आहे. यातून माझे रक्षण कर. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे दुःख निवारण करणारा असा तुझ्यावाचून दुसरा कोण आहे ? ४

३२४८ कराल तें काय नव्हे जी विठ्ठला । चित्त द्यावें बोला बोबडिया ॥ १ ॥
सोडवूनि ध्यावें काळचक्रा हातीं । बहुत विपत्ती भोगविल्या ॥ २ ॥
ज्याले जीवों नेदी मारिलेंचि मरे । प्रारब्ध तें उरे मागुतालें ॥ ३ ॥
तुका म्हणे दुजा खुंटला उपाय । म्हणऊनि पाय आठविले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– ज्यालें–जन्मास आलेल्यास.

अर्थ – विठ्ठला, तुम्ही मनात आणले तर काय करणार नाही ? यासाठी माझ्या बोबड्या बोलाकडे लक्ष द्यावे. १ मला या काळचक्राच्या हातून देवा, सोडवा ना मी फार आपत्ती आजपर्यंत भोगल्या. २ मागच्या प्रारब्धामुळे जन्मास आलेल्याना नीट जगता येत नाही, मरणाराना नीट मरु देत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्हाला शरण येण्याखेरीज दुसरा उपाय मला माहीत नाही; म्हणून देवा, तुमचे पाय आठवले आहेत ४

३२४९ डौरलो भक्तिसुखें । सेवूं अमृत हें मुखें ॥ १ ॥
संतसगें सारूं काळ । प्रेमसुखाचा कल्लोळ ॥ २ ॥

१ जाणा, २ कुडावा.

ब्रह्मादिकांसी शिराणी । तो हा आनंद मेदिनी ॥ ३ ॥
नाहीं वैकुंठींचा पांग । धांवे कथे पांडुरंग ॥ ४ ॥
मुक्त व्हावें काशासाटीं । कैंची येणें रसें भेटी[1] ॥ ५ ॥
तुका म्हणे गोड । हेंचि पुरे माझें कोड ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा:– डौरलो–शोभिवंत झालो, सारूं–घालवू, सपवू, शिराणी–आवड, मेदिनी–पृथ्वीवर, पांग–उत्कट इच्छा, कोड–इच्छा.

*अर्थ:– श्रीहरीच्या भक्तिसुखाने मी शोभिवंत झालो आहे. याच्या नामामृताचे सेवन आता मुखाने करू. १* संतांच्या संगतीत काळ घालवू. कारण तेथेच प्रभुप्रेमाचा सुकाळ आहे २ ब्रह्मादिकांनाही ज्याची आवड आहे तो हा प्रभुकृपेचा आनंद या पृथ्वीवर मोठाच आहे. ३ या पांडुरंगास वैकुंठात राहाण्याची उत्कट इच्छा नाही, तेथील तावेदारी तो मानीत नाही. पण आपल्या भक्तांच्या कथेत मात्र तो धावत येतो ४ मुक्त होण्याची आता इच्छा कशासाठी करावी ? मग या भक्तिरसाची भेट कशी होणार ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, हा संतसंग व भक्तीचे हे सुख मला पुरे आहे. येथेच माझी इच्छा परिपूर्ण होत असते ६

विवरण:– आपण मोठ्या डौलाने भक्तिसुखात दंग होऊन जाऊ, अशा भूमिकेवरील या अभंगात तुकाराम बुवा भक्तिसुखाचे मोठे चविष्ट वर्णन येथे करीत आहेत सतत नामामृताचे सेवन करावे, संतसंगतीत सुखाने काळ व्यतीत करावा, प्रेमसुखाच्या कल्लोळात काळ घालवावा, यात त्याना कमालीचे सौख्य वाटते. त्याच्या प्रेमाचा पांडुरंगासही केवढा लोभ असतो. त्याला वैकुंठीचा निवास कधी आवडत नाही, तर भक्त 'धांवे कथे पांडुरंग' त्याची धाव भक्त ज्या ठिकाणी कथाकीर्तन करतात तेथे असते. 'कीर्तनाची आवडी देवा । वैकुंठाहुनी धांवे धावा नवल वैकुंठींच नसे । तो कीर्तनीं नाचतसे' असे एकनाथ महाराजानी म्हटले आहे या देवाला मुख्यत कीर्तनाची गोडी फारच असते. *'कीर्तनाची आवडी मोठी । प्रेमें देव घाली मिठी' असे त्यानीच आणखी एका ठिकाणी म्हटले* आहे. सर्वच संतानी देवाच्या या कीर्तनप्रेमाचे मनापासून कौतुक केले आहे. ' नावडे वैकुंठ शेषशयन । वैष्णवसदन आवडले ' अशी त्याची साक्ष एकनाथानी दिलेली आहे. तुकोबानी म्हटले आहे, स्वर्गातील देवसुद्धा या मृत्युलोकात जन्म यावा म्हणून उत्सुक होतात. कारण येथे ' नारायण नामें होऊं जीवन्मुक्त । कीर्तनीं अनंत गाऊं गीतीं ' अशी त्याना खात्री वाटते.

*या कीर्तनसुखापुढे, भक्तिप्रेमापुढे साधुसंताना मुक्तीची कधीच पर्वा वाटत नाही 'मुक्त व्हावे कशासाठी ?'* असा प्रश्न तुकाराम महाराजानी या अभंगात विचारलेला आहे. कारण मुक्ती मिळाल्यावर मग या भक्तिरसाची गोडी कशी चाखता येणार ? साधुसंताना नित्य सत्संग, ईश्वरदर्शन, हरिकीर्तन-नामस्मरण यातच मुक्ती मिळाल्याचा आनंद वाटतो. या सुखासाठी अनेक प्रकारचे गर्भवासही सहन करण्याची त्याची तयारी असते पंढरीची वारी सोडून मुक्ती मागणारा कमनशिबीच समजावा, असे नामदेवानी म्हटले आहे ' साडुनि पंढरीची वारी । मोक्ष मागती ते भिकारी ' असे त्याचे म्हणणे आहे मुक्तिपदाची अभिलाषा धारण करून परमेश्वराच्या पायाचे चिंतन दूर करावे हे साधुसंताना कधीच मानवत नाही मुक्ती दीनरूप धारण करून कुणी आपणास घेईल का ? असे काकुळतीने विचारीत पंढरपूरच्या वाळवंटात हिंडते असे नामदेवानी म्हटले आहे. ज्या वैकुंठाहून देवच मृत्युलोकात भक्ताच्या दारी येऊन उभा राहातो तेथे भक्त जाईल तरी कशाला ? ' न लगे भुक्ति मुक्ति वैकुंठीचा वास । सुखें पंढरीस राहीन देवा ' असे चोखोबानी म्हटले आहे.

३२५० फोडिलें[2] भांडारें । माप घेऊनियां खरें ॥ १ ॥
केली हरिनामाची वरो । मागितलें आतां सरो ॥ २ ॥
देशांत सुकाळ । जाला हारपला काळ ॥ ३ ॥
घ्यावें धणीवरी । तुका म्हणे लहान थोरीं ॥ ४ ॥

१ तुटी, २ फोडिले भांडार

शब्दार्थ व टीपा:– घरो–रेलचल, पुष्कळ अमलसामग्री, काळ–दुष्काळ, धणीवरी–तृप्ती होईपर्यंत.

अर्थ:– या श्रीहरीच्या कृपेचे भांडार मी फोडले आहे. आणि मी भक्तिप्रेमाचे खरे माप हाती धरले आहे.१ श्रीहरीच्या नामाची रेलचेल करून सोडली आहे. २ सर्वत्र देशात श्रीहरीच्या नामाचा सुकाळ झाला असून मागील दुष्काळ संपून गेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता लहानथोरांनी मनाची तृप्ती होईपर्यंत याचे सेवन करावे. ४

विवरण:– कधी कधी तुकारामबुवा आपल्या अनुभूतीची अभिव्यक्ती स्वत:च्या व्यवसायाच्या रूपकामधून करतात. ते स्वतः व्यवसायाने वैश्य म्हणजे दुकानदार होते. म्हणून पंढरीचा बाजार, पुंडलीकपेठ, द्वारकेच्या बंदराचे जहाज, हरिनामाचा माल, धन्याचे भांडार, भजनमाप, भांडवल, मुद्दल, व्याज, वाण, सणग इत्यादी भाषेत तुकारामबुवा वारंवार आपले मनोगत व्यक्त करतात. याही अभंगात आपण हरिनामाचे भांडार फोडले असल्याचे तुकोबा सांगतात. तुकोबाचा हा ' व्यापार ' सचोटीचा आहे. येथे त्यांनी खरेखुरे माप धरलेले आहे त्यामुळे हरिनामाचा माल भरपूर निर्माण झाला असून देशात सर्वत्र सुकाळ प्रकटला असल्याचे त्यांनी या अभंगात म्हटले आहे. त्यामुळे दुष्काळाची भीती संपलेली आहे आता कुणीही लहानथोरांनी यावे आणि मनाची तृप्ती होईपर्यंत या हरिनामाच्या मालाचे सेवन करावे. लौकिक व्यापारात अथवा व्यवसायात बुवांनी लक्ष घातले नाही, पण भक्तीच्या ' व्यापारा 'ची मात्र फार बारकाईने त्यांनी विचारपूस केली आहे व्यापारी वृत्तीस आवश्यक असणारी चोखंदळ दृष्टी आणि सावधानता बुवांना आहे पण ती त्यांनी परमार्थाच्या क्षेत्रात मार्गस्थ केलेली दिसते

३२५१ आनंदाचे डोहीं आनंदतरंग । आनंदचि अंग आनंदाचे ॥ १ ॥
काय सांगो जालें कांहींचियाबाही । पुढें चाली नाहीं आवडीनें ॥ २ ॥
गर्भाचे आवडी मातेचा डोहळा । तेथींचा जिव्हाळा तेथें बिंबे ॥ ३ ॥
तुका म्हणे तैसा ओतलासे ठसा । अनुभव[1] सरिसा मुखा आला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– डोहळा–इच्छा, सारिसा–त्यासारखा.

अर्थ :– मी आता प्रभुप्रेमाच्या आनंदाच्या डोहात पोहत आहे या डोहातील लाटा आनंदाच्याच आहेत आणि या आनंदाचे अंगही आनंदाचे झाले आहे १ मला झालेल्या या अलौकिक सुखासंबंधी काय सांगू ? काहीच्याबाहीच सारे होऊन गेले आहे. त्याच्या प्रीतीमुळे माझी पुढची चालच खुंटून गेली २ गर्भात असणाऱ्या जीवाची जशी आवड असते तशी इच्छा आईस होत असते. गर्भामधील जिव्हाळा आईच्या ठिकाणीच प्रकट झालेला असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याप्रमाणेच अनुभवाचा जो ठसा माझ्या चित्तावर उमटलेला आहे, त्यानुसार माझ्या वाणीतून तो प्रकट झाला आहे ४

विवरण.— या एका अभंगात तुकाराम महाराज आपल्या अद्वैतानुभूतीचे वर्णन संक्षेपाने करीत असताना दिसतात. ईश्वराची भेट, ब्रह्माशी ऐक्य, परमात्म्याशी मीलन, जीवशिवाची भेट झाल्यानंतर जे अद्वितीय समाधान वा सुख मिळते त्याचे वर्णन ऋषिमुनींनी व साधुसंतांनी अनेकदा केलेले आढळते वास्तविक पाहाता ब्रह्म, ईश्वर, परमात्मा अथवा शिव यांचे रूपच आनंदमय आहे तो सत्, चित्, आनंद यानीच परिपूर्ण आहे म्हणूनच यास आनंदमय परमात्मा असेही नाव आहे आत्मानंद, निजानंद, परमानंद, नित्यानंद, ब्रह्मानंद, महानंद, स्वानंद इत्यादी शब्दांनी या दिव्य व अलौकिक आनंदाचे वर्णन केले जाते न बोलण्यासारखा व न सांगण्यासारखा असा हा विषय असला तरी सत्पुरुषांनी आनंदाच्या या अनुभूतीचे वर्णन समर्पक व मोजक्या शब्दात केलेले आढळते आनंदस्वरूप असणाऱ्या परमेश्वराशी एकदा संग जडला म्हणजे सर्वत्र आनंदी आनंदच होऊन जातो यात नवल काय ? आनंदाच्या डोहावर आनंदाचेच तरंग येतात, आनंदाचे अंगभूत अवयव हा आनंदच असतो या अनुभवामुळे काहीच्या बाहीच होऊन जाते असे जे येथे तुकोबा म्हणतात त्याचा थोडा विस्तार करणे येथे अगत्याचे आहे

१ अनुभवा.

वेद आणि उपनिषदे यातून सर्वत्र आनंदाचेच स्वरूप भरून राहिले असल्याचे वर्णन आले आहे विश्वात आदिअंती सर्वत्र आनंदाचाचेच साम्राज्य पसरून राहिले आहे 'आनंदमयोऽभ्यासात्' असा ब्रह्मसूत्राचा सिद्धान्त आहे याच आनंदमय परब्रह्माची अनुभूती व्हावी म्हणून सारा अट्टहास असतो सर्व विश्वाचे चलनवलन याच आनंदावर आधारलेले असल्यामुळे त्याची अनुभूती हे एक मोठे साध्य साधुसंतांनी मानले आहे 'को ह्येवान्यात्कः प्राण्यात् यदेष आकाश आनंदो न स्यात्' हा विश्वव्यापी आनंद जर नसता तर विश्वाचे श्वसनच चालले नसते या तैत्तिरीय उपनिषदाच्या सिद्धान्ताचा पडताळा साधुसंताच्या वचनातून येत असतो 'आनन्दो ब्रह्मेति व्यजानात्'— सर्वच आनंदस्वरूप असल्याचे ज्ञान झाले पाहिजे, हा उपनिषदाचा निष्कर्ष संताच्या वाङ्मयात अनुभूतीच्या मार्गाने प्रत्ययास येतो तैत्तिरीय व बृहदारण्यक या उपनिषदातून ही आनंदमीमांसा विस्ताराने आलेली आहे तैत्तिरीयोपनिषदाच्या ब्रह्मानंदवल्ली प्रकरणाच्या सहाव्या अनुवाकामध्ये आनंदमय परमेश्वराचे वर्णन करून सातव्या अनुवाकात रसमय जीवनाचा आनंदमय परमेश्वराशी असलेला संबंध स्पष्ट केला आहे 'रसो वै स । रसंह्येवाय लब्ध्वानन्दी भवति । को ह्येवान्यात्कः प्राण्यात् यदेष आकाश आनन्दो न स्यात् । एष ह्येवानन्दयाति' म्हणजे हा आनंदमय परमेश्वर रसरूप असून जीवात्मा या रसरूप परमात्म्याची प्राप्ती करून आनंदयुक्त होतो आकाशाप्रमाणे परिपूर्ण असणारा हा आनंदस्वरूप परमात्मा जर नसता तर कोण जिवंत राहिले असते ? श्वसनक्रियाच कशी संभवली असती ? खरे पाहाता हा आनंदघन परमात्माच सर्वांना आनंदित करीत असतो याच उपनिषदात पुढे 'सैषाऽऽनन्दस्य मीमांसा भवति', 'एतमानन्दमयात्मानमुपसंक्रमति', 'आनन्दं ब्रह्मणो विद्वान न बिभेति कुतश्चन' 'विज्ञानमानन्दं ब्रह्म' इत्यादी ठिकाणी आनंद व आनंदमय शब्दांनी सर्वशक्तिमान परमेश्वराचा व त्याच्या आनंदमय स्वरूपाचाच उल्लेख आलेला आहे तैत्तिरीयोपनिषदाच्या ब्रह्मानंदवल्लीत आनंदाच्या अनुभूतीच्या श्रेणीही वर्णन केलेल्या आहेत संपूर्ण पृथ्वीचे स्वामित्व हाती आले की तो मानुषानंद होतो याच्या शतपट मनुष्यगन्धर्वानन्द, याच्या शतपट देवगन्धर्वानन्द, याच्या शतपटीने पितृगणानन्द, पितृगणाच्या शतपट म्हणजे देवतानन्द, याच्या शतपटीने कर्मदेवतानंद, अशा चढत्या श्रेणीने देवानन्द, इन्द्रानंद, बृहस्पत्यानंद, प्रजापत्यानंद आणि शेवटी ब्रह्मानंद वर्णन केला आहे मथितार्थ असा की, इंद्रियांच्या विषयापासून मिळणारा आनंद हा बाह्य स्वरूपाचा, लौकिक स्वरूपाचा म्हणून निकृष्ट असतो तरी सुद्धा याच लौकिक आनंदाच्या द्वाराच ब्रह्मानंदाची अनुभूती येऊ शकते, असाही निर्देश येथ आहे लौकिक आनंद निकृष्ट खरा, पण याच्याच साह्याने मानविषयातून बुद्धी निर्लेप होऊन ब्रह्मानंदाकडे वळू शकते कारण लौकिक आनंद हासुद्धा ब्रह्मानंदाचाच अंश आहे (लौकिकोऽप्यानन्दो ब्रह्मानंदस्यैव)

जगाची उत्पत्ती, स्थिती, लय, जीवशिवऐक्य इत्यादी विषयाची चर्चा वेदांत व उपनिषदांत जी आलेली आहे तिची परिणती शेवटी आनंदाच्या अनुभूतीत आहे ब्रह्मज्ञान किंवा आत्मज्ञान झाले की जे सुख होते ते आनंदस्वरूपाचे असते सुख, प्रेम, आनंद हेच विषय प्रामुख्याने वेद व उपनिषदे यातून वर्णन केले असल्याने आत्मानुभूती म्हणजे आनंदाची, आत्यंतिक आनंदाची प्राप्ती होय आत्यंतिक सुख, अमृतत्व, आनंद, आत्यंतिक प्रेम यासारख्या शब्दांनी ब्रह्मानुभूतीचे वर्णन केले जाते लौकिक आनंदाची ओळख करून घेऊन वैराग्य, अनुताप, अभ्यास, अनासक्ती इत्यादी मार्गांनी आत्म्याचा प्रवास आनंदघन परमात्म्याच्या स्वरूपाकडे होऊ लागतो जो आत्मा द्वैतरूपी पापाने रहित, जरारहित, मृत्युरहित म्हणजे त्याचे भय न मानणारा, खाण्यापिण्याची म्हणजे उपभोगाची इच्छा नसलेला, सत्यकाम व सत्यसंकल्प म्हणजे खऱ्या आनंदाचा काम व संकल्प करणारा असा आहे, त्याचा शोध करावा व तो जाणून घ्यावा त्या आत्म्याचा विचार करून त्याला जो जाणतो तोच सर्व लोकांना मिळवितो व सर्व कामांत म्हणजे सर्व प्रकारच्या आनंदास मिळवितो' असे छांदोग्य उपनिषदात म्हटले आहे 'तो हा म्हणजे सर्वच पाहणारा, अज, अन्न खाणारा म्हणजे प्राणयुक्त आत्मा-जीवात्मा वसु म्हणजे आनंद देणारा आहे हे जो जाणतो, त्याला वसु म्हणजे आनंद मिळतो तो हा म्हणजे सर्वच स्वतः पाहणारा महत्संज्ञक, न जन्मलेला जीवात्मा, जरारहित आनंदयुक्त (अमृत) आणि अभय आहे हे जो जाणतो तो ब्रह्मच बनतो' असे बृहदारण्यक उपनिषदात म्हटले आहे 'विद्ययाऽमृतमश्नुते' म्हणजे आत्मविद्येने अमृत म्हणजे आत्यंतिक आनंद मिळतो असे ईशोपनिषद म्हणते याच अर्थाने केनोपनिषदात 'विद्यया विन्दतेऽमृतम्' असे वचन आले आहे. आत्म्यालाच जाणून घ्या, कारण हा आत्माच अमृताच

म्हणजे अत्यानंदाचा सेतू म्हणजे पूल अथवा साधन आहे असे मडुक उपनिषदात सांगितले आहे. साराश, कर्तृत्वादिकामुळे होणाऱ्या दु.खाची निवृत्ती होऊन नित्य आनंदप्राप्ती व्हावी हेच सर्व उपनिषदांचे मुख्य प्रयोजन आहे. जीवाने आत्मानंदाची प्राप्ती कशी करून घ्यावी याचे उत्तम दर्शन उपनिषदातून घडते

सुखाचे, आनंदाचे स्वरूप प्राचीन धर्मग्रंथातून अनेकदा वर्णन केले जाते. भगवद्गीतेत सुख दुखविवेकाचे सर्वोत्तम वर्णन आलेले आहे व्यावहारिक, लौकिक सुखे क्षणिक असून त्याच्या अतिरेकाने नाश होतो अशीही कल्पना पुढे दृढ झाली. योगवासिष्ठात आनंदाचे प्रकार सांगताना दृष्ट पदार्थाची इच्छा झाली असता होणारा आनंद प्रिय, इष्ट वस्तूची प्राप्ती झाली की होणारा आनंद मोद, आणि इष्ट वस्तूचा प्रत्यक्ष उपभोग म्हणजे प्रमोद–असे तीन प्रकारचे आनंद सांगितले आहेत. सुखाचे अथवा आनंदाचे वसतिस्थान विषयात अथवा वस्तूत नसून आत्मा हाच आनंदाचे स्थान आहे असाही निर्वाळा योगवासिष्ठाने दिलेला आहे दृष्टा व दृश्य यांच्या सयोगापासून होणारा आनंद हा विषयापासून नसून आत्मतत्त्वाचाच आहे असाही विचार येथे आला आहे

उपनिषदासारख्या चितपर ग्रंथातून जी आनंदमीमासा आहे ती भक्तिसुखासही लागू पडते मानवीजीवनाची पूर्तता मीलनाच्या आनंदात, सुखात आहे, हीच भाषा आध्यात्मिक मीलनातही येते. स्वत ब्रह्म हेच आनंदमय असल्याने त्याचा अनुभव आनंदरूपच असणार ' आनंदु रे आजी आनंदु रे । सबाह्य अभ्यंतरी परमानंदु रे ' या ज्ञानदेवाच्या श्रेष्ठ अनुभूतीत हाच एक दिव्यानंद भरून राहिला आहे ' आनंदाच्या कोटी । साठवल्या आम्हा पोटीं ' ' आनंद अद्वय नित्य निरामय । जे का निजध्येय योगियांचे ', ' आनंदाचा थारा । सुखें मोहरला झरा ', ' आनंदें एकांतीं प्रेमें वोसडत । घेऊ अगणित प्रेमसुख ' इत्यादी वचनातून तुकारामबुवा याच आनंदाचा वर्षाव करीत आहेत याच आनंदाचे आवारू जगतावर घालावे असे ज्ञानदेवाना वाटते

हा दिव्यानंद, परमानंद, ब्रह्मानंद, निजानंद, लौकिक आनंदापासून किती निराळा आहे ? या दोहोत अंतर आहे ते प्रकृतिधर्माचे की केवळ तीव्रतेच्या स्वरूपाचे ? पेढा खाल्ल्यामुळे होणारा आनंद, पुनर्जन्मामुळे होणारा आनंद, धनप्राप्तीमुळे होणारा आनंद, विषयसुखापासून होणारा आनंद, याचे ब्रह्मानंदाशी, दिव्यानंदाशी काय नाते असते ? दोहोची जात एकच का ? असे अनेक महत्त्वाचे प्रश्न आनंदमीमासेत उत्पन्न होतात लौकिक आनंद हा ब्रह्मानंदाचाच एक लहान अश असल्याची ग्वाही उपनिषदानी दिलेली आहे पुढे याच लौकिक आनंदावर अनेक प्रकारचे संस्कार करून त्याला दिव्यत्वाकडे नेता येत असल्याची विचारसरणी सुरू झाली. यामुळे शारीरिक आनंद व आध्यात्मिक आनंद वेगळा मानण्याची चाल पडली ब्रह्मानंदाच्यामुळे साधक शांत व तृप्त झाला तरी त्याच्या इतर काही वृत्ती उल्हसितही होतात. ब्रह्मानंदाच्या प्रभावाने भक्तश्रेष्ठ नाचूबागडू लागतात, हे श्रीचैतन्यदेवापासून साध्या वारकऱ्यापर्यंत पाहिल्यास ध्यानात येईल नारदाच्या भाषेत तर ब्रह्मानंदाने भक्त ' मत्त ' होताल एकदा येथे टाळी लागली की मग देहाचे इतर उपचार थाबले तरी नृत्यगायन, बेहोषी याच्यात भक्त बुडून जातात या अवस्थेचे मोठे समर्पक वर्णन करताना एकनाथ म्हणतात, ' गाता पदोपदीं निजसुख । कोंदटे अधिकाधिक ।। ओसडलो परम हरिख । स्वानंदें अलौकिक नाचू लागे ।। जो मोले मदिरा खाये । मदिरानंदें नाचे गाये ।। मा जेणे ब्रह्मानंदु सेविलाहे । तो केंवि राहे आवरिला ? '

३२५२ म्हणऊनि धरिले पाय । अवो माय विठ्ठले ।। १ ।।
आपुलेचि करुनि घ्यावे । आश्वासावे[1] ना भीसे ।। २ ।।
वाढली ते तळमळ चित्ता[2] । शम आतां करावी ।। ३ ।।
तुका म्हणे जीवीं वसे । मज नसे वेगळी ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा– ना भीसे–भिऊ नको असे, शम–शांत.

१ आम्हास, २ चिंता

अर्थ – अगे विठ्ठलमाये, पुढील कारणासाठी मी तुझे पाय हृदयाशी धरले आहेत १ तू मला आपलेसे करून घ्यावेस, आणि 'भिऊ नकोस' असे आश्वासन द्यावेस २ माझ्या चित्तात जी तळमळ वाढली आहे ती तू आता शांत करावीस ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू माझ्या जीवाच्या ठिकाणी वास्तव्य कर माझ्या शिवाय तू निराळी राहूच नकोस. ४

३२५३ कल्याण या आशीर्वादें । जाती द्वंद्वें नासोनि ॥ १ ॥
आश्वासिले नारायणे । प्रेमदानें अंतरिच्या ॥ २ ॥
गेली निवारोनि आतां । सकळ चिंता यावरि ॥ ३ ॥
तुका म्हणे गाता गीत । आले हित सामोरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – द्वंद्वें–सुखदुःख्या जोड्या

अर्थ – या श्रीहरीने एकदा 'कल्याण होवो' असा आशीर्वाद दिल्यानंतर मग सुखदुःख, आशानिराशा ही सर्व द्वंद्वे नाहीशी होतील १ आता या नारायणाने तर मला अंतःकरणातील प्रेमाने आशीर्वाद देऊन आश्वासन दिले आहे २ आता माझी सर्व चिंता दूर झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीच्या प्रेमाचे गीत गातागाताच माझे हित माझ्या समोर येऊन ठेपले आहे ४

३२५४ हरिनामवेली पावली विस्तार । फळीं पुष्पीं भार वोल्हावली ॥ १ ॥
तेथें माझ्या मना होईं पक्षिराज । साधावया काज तृप्तीचे या ॥ २ ॥
मुळींचिया बीजें दाखविली गोडी । लवकरचि जोडी जालियाची ॥ ३ ॥
तुका म्हणे क्षणक्षणा जातो काळ । गोडी ते रसाळ अंतरेल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वोल्हावली–भारावलेली, काज–कार्य

अर्थ – श्रीहरीच्या नामरूपी वेलीचा विस्तार भरपूर झाला असून तो रसदार फुलाफळांनी भारावलेली आहे १ माझ्या मना, या वेलीवर पक्षीराज होऊन तू तृप्तीचे कार्य साधण्यासाठी जाऊन बैस २ या फळात मुळच्या बीजाचीच गोडी आलेली आहे अशा या फळाची प्राप्ती तू लौकर करून घे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा काळ क्षणाक्षणाने व्यर्थ जात आहे यामुळे या फलप्राप्तीची गोडी हळूहळू कमी होईल तरी तू लौकर हे कार्य साधून घे ४

विवरण – या एका सुंदर अशा रूपकात्मक अभंगात तुकोबांनी आपल्या मनास पक्षिराज होऊन हरिनामाच्या वेलीवर विसावण्यास सांगितले आहे. श्रीहरीच्या नामसंकीर्तनाने या कलियुगात सर्व लोक तरून जातात, असेच साक्ष सर्व साधुसंतांची आहे एकचित्ताने केलेले नामस्मरण हे एक महत्त्वाचे साधन सांगितले आहे या नामस्मरणाच्या भक्तीचा उल्लेख एका बहारदार रूपकाचा आश्रय घेऊन बुवा येथे करीत आहेत श्रीहरीच्या नामाची ही एक वेल विस्तारलेली आहे फुलांनी व फळांनी ती भारावून गेली आहे आपल्या मनाने स्वतःचे कार्य साधण्यासाठी तेथे पक्षी होऊन राहावे असा तुकोबांचा मानस आहे हरिनामाची प्रीती सर्व साधुसंतांना मनापासून होती 'नाम पवित्र आणि परिकर । कल्पतरूहूनी उदार ।' अशी नामाची महती ज्ञानदेवांनी गाइली आहे या नामामुळेच अनेक लहानमोठे तरून गेले नामदेवराय हे तर नामभक्तीचे आचार्य होत 'नामाचा प्रताप काय वानू वाचे । अक्षय सुखाचे स्थान दावीं ।' अशा शब्दात त्यांनी नाममाहात्म्य वर्णन केले आहे वैष्णवांना म्हणूनच हे नाम अमृतापेक्षाही गोड वाटते या नामाशिवाय दुसरा कुठलाच मंत्र त्रिभुवनात नाही असे त्यांना वाटते सर्व साधनात अत्यंत सोपा मार्ग म्हणजे श्रीहरीच्या भक्तीचा होय नामाच्या उच्चाराबरोबर संसाराच्या सर्व व्यथा दूर होतील असा त्यांचा विश्वास आहे या नामाशिवाय इतर साधने संतांना किरकोळ वाटतात 'एक नाम अवघें सार वरकड अवघें ते असार' असे जनाबाईने म्हटले आहे 'नाम फुकट चोखट । नाम घेता न वीट' अशी नामाची महती तिने वर्णन केली आहे 'अवघ्या साधनाचे सार । रामकृष्ण हा उच्चार' असे चोखोबाने म्हटले आहे 'ऐका नामाचे

महिमान। नाम पावन तें जाण ॥ हास्य विनोदें घेता नाम। तरती जन ते अधम' अशी महती एकनाथांनी गाइली आहे 'सकळ साधनाचे सार। मुखीं नामाचा उच्चार', 'साधन सोपें नाम वाचे। पर्वत भगती पापाचे', 'एक वेळ गाय विठ्ठलाचे नाम। मोक्ष मुक्ति सकाम पुढे उभे' इत्यादी शब्दांनी त्यांनी नामाचे सामर्थ्य वर्णन केले आहे तुकोबांचीही या नामसंकीर्तनावर फार प्रीती आहे समुद्रवलयांकित पृथ्वीचे दानही नामाबरोबर होणार नाही, असे त्यांनी एका अभंगात म्हटले आहे 'नाम पावन पावन। त्याहूनि पवित्र आहे कोण ?', 'नाम गोड नाम गोड। पुरे कोड सकळही', 'प्रेम तेथेंच वास करी। मुखीं उच्चारिता हरी', 'विठोबाचे नाम ज्याचे मुखीं नित्य। त्या देखिल्या पतित उद्धरती' इत्यादी ओळीतून तुकोबांची नामप्रीती ध्यानात येते म्हणून तर ते नामरूपी वेलीवर पक्षिराज होऊन विसावतात

३२५५ बरवे ऐसे आले मना। नारायणा या काळें ॥ १ ॥
देव आम्हा प्राणसखा। जाले दु:खा खंडण ॥ २ ॥
जन्मांतरिच्या पुण्यरासी। होत्या त्यासी फळ आले ॥ ३ ॥
तुका म्हणे निजठेवा। होईल देवा[1] लाधलो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बरवे–चांगले, लाधलों–प्राप्त झाला

अर्थ – नारायणा, यावेळी चांगले असेच तुमच्या मनात आले आहे १ देव आमचा प्राणसखा असून त्याच्या प्राप्तीने आमच्या दु:खाचे खंडण झाले आहे २ अनेक जन्मांच्या पुण्यराशी होत्या त्या त्यांच्या प्राप्तीच्या रूपाने फळास आल्या ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, यामुळे निजसुखाचाच ठेवा प्राप्त झाला असे झाले आहे ४

३२५६ जरि हे आड येती लाज। कैसे काज साधते ॥ १ ॥
करणे केले उठाउठी। पायीं मिठी घातली ॥ २ ॥
समर्पिला जीव भाव। धरिला भाव अखंड ॥ ३ ॥
तुका म्हणे आड काहीं। काळ नाहीं घातला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काज–काय

अर्थ – जर ही लाज प्रभुप्राप्तीच्या मार्गात आड येणार असेल तर मग हे कार्य कसे साधणार ? १ यासाठी जे काय करायचे आहे ते साधण्यासाठी त्याच्या पायांना मिठीच मी घातली २ माझा सर्व जीवभाव मी त्याला समर्पण केला आणि त्याच्याविषयी अखंडित भाव मी माझ्या मनात धारण केला. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे करण्यात मी काही काळ मध्ये व्यर्थ घालविला नाही ४

३२५७ पात्र शुद्ध चित्त ग्वाही। न लगे काही सांगणे ॥ १ ॥
शूर तरी सत्यचि व्हावे। साटी जीवे करूनि ॥ २ ॥
अमुपच सुखमान। स्वामी जन मानावे ॥ ३ ॥
तुका म्हणे जैसी वाणी। तैसे[2] मनीं परिपाक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न लगे–लागत नाही, अमुप–अपार, परिपाक–स्थिती

अर्थ – पात्र शुद्ध असल्याची ग्वाही चित्त देऊ शकते त्याच्याविषयी काही सांगावे लागत नाही १ शूर व्हायचे असेल तर जीवावर उदार होऊन खऱ्या अर्थाने तरी व्हावे २ यामुळे अपार अशा सुखाचा लाभ होतो, आणि लोकांत व स्वामीकडे मानमान्यता मिळते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याप्रमाणे बोलणे असते त्याप्रमाणे मनाची स्थिती होत असते ४

१ हेवा, २ तैसा

३२५८ प्रगटलें ज्ञान । नारायण भूतीं तें ॥ १ ॥
अनुभवच घेऊं व्हावा । विनती देवा करूनिया ॥ २ ॥
देखोवेखीं वदे वाणी । पडिल्या कानीं प्रमाणे ॥ ३ ॥
तुका म्हणे योगक्षेम । घडे ते वर्म साधावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – देखोवेखीं–अनुभव नसताना, नुसते ऐकून, पाहून

अर्थ – सर्व प्राणिमात्रात एक नारायण आहे हें ज्ञान प्रकट झाले १ याविषयी देवाला विनती करून पुन पुन अनुभव घ्यावासा वाटतो २ असा अनुभव नसला तरी एकमेकाचे ऐकून व पाहून वाणी याप्रमाणे बोलत राहाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यामुळे सर्व प्रकारचा योगक्षेम होईल ते वर्म साध्य करून घ्यावे ४

३२५९ मुख्य आधीं विषयत्याग । विधिभाग पाळणे ॥ १ ॥
मन पावे समाधान । हेंचि दान देवाचे ॥ २ ॥
उदासीन वृत्ति देहीं । चाड नाहीं पाळणे ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं भय । सम सोय विषमाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–इच्छा, सम विषम–अनुकूल, प्रतिकूल

अर्थ – आधी विषयाचा त्याग करणे हे मुख्य आहे याच विधीचे पालन करावे १ यामुळे मनास समाधान प्राप्त होईल, हेच देवाचे दान होय २ देहाविषयी आपली वृत्ती उदासीन असावी त्याच्या परिपोषणाची इच्छा मनात नसावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, अनुकूल-प्रतिकूल भावाचा त्याग करून मनाची अवस्था निर्भय अशी व्हावयास हवी ४

३२६० आता हेंचि सार हेचि सार । मूळबीज रे आइका ॥ १ ॥
आवडीने आवडी उरे । जें ज्या झुरे तें त्यासी ॥ २ ॥
प्रेमाचिया सूत्रदोरी । नाहीं उरी उरवी ॥ ३ ॥
तुका म्हणे चिंतन वरे । आहे खरें खऱ्यावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–प्रेम, उरी–उणीव, उरवी–शिल्लक ठेवीत

अर्थ – आता हे सारभूत असे मूळबीज आहे ते नीटपणे ऐका १ प्रेमाने प्रेमच उरते आणि ते ज्याविषयी असते त्याच्याविषयीच जीव नेहमी झुरत असतो २ ज्याविषयी प्रेम आहे ते प्रेमसूत्र कसलीच उणीव शिल्लक ठेवीत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे कुणी खऱ्या वागणुकीचे आहेत त्याच्या ठिकाणी प्रभूचे चिंतन तेवढे उरते ४

३२६१ केला तैसा अंगीकार । माझा भार चालवीं ॥ १ ॥
होऊं अंतराय बुद्धी । कृपानिधी नेदावी ॥ २ ॥
आम्ही तरी जड जीव । कैंचा भाव पुरता ॥ ३ ॥
अनन्यभावे घ्यावी सेवा । आम्हा देवा घडेसी ॥ ४ ॥
तुम्हीं आम्ही शरणागते । कृपावंतें रक्षीजे ॥ ५ ॥
तुका म्हणे भाकू कींव । असो जीव जड आम्ही ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अंगीकार–स्वीकार, अंतराय–वियोग, घडेसी–जशी घडेल तशी

अर्थ – देवा, तुम्ही माझा जसा आता स्वीकार केला आहे त्याप्रमाणे माझा भार तुम्ही घेतला पाहिजे १ कृपानिधी, तुमच्या विषयी माझी जी बुद्धी आहे तीत मधी वियोगाची भावना निर्माण होऊ नये. २ देवा, आम्ही तर केवळ जडजीव आहोत, तुमच्याविषयी परिपूर्ण असा भाव कसा होणार ? ३ म्हणून देवा, अनन्यभावाने जशी पडेल तशी सेवा तुम्ही आमच्याकडून घ्यावी ४ कृपावंता, आम्ही तुला शरण आलो आहोत, तू आमचे रक्षण कर. ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही जडजीव आहोत, म्हणून तर तुमची करुणा भाकीत आहोत. ६

३२६२ सोसे बहुगर्भवासीं । मेलों असों उपवासीं । नाही सखीं ऐसीं । तेथे कोणी भेटलीं ॥ १ ॥
करीं करीं रे स्वहित । देह तंव हे अनित्य । नाहीं दिलें चित्त । सोडवूं मोहापासोनि ॥ २ ॥
पाळी तोंडींचिया घासे । तेचि होय अनारिसे । ज्या नव्हे ऐसें । खेदी परि सोडवीना ॥ ३ ॥
तुका म्हणे धनमाने । माझ्या बाटलो[1] मीपणें । नाहीं दिला जने । देखो लाभें[2] हा लाभ ॥४॥

शब्दार्थ व टीपा – सोसे-सोसाने, आवडीने, हौसेने, अनित्य-न राहाणारा, न टिकणारा, मर्त्य, अनारिसे-वेगळे, निराळे, खेदी-खेद करते

अर्थ – फार मोठ्या हौसेने मी अनेक प्रकारचे गर्भवास धारण केले. त्यात मी मेलो आहे की उपाशी आहे याची चौकशी करणारी येथे एकही मैत्रीण मला भेटलेली नाही, १ मना, यासाठी तू आपले हित साधून घे कारण हा देह मर्त्य असूनही मला मोहापासून चित्ताची सुटका करवून घेता आली नाही २ तोंडातील घास भरवून जी पालनपोषण करते ती आईसुद्धा अशा वेळी वेगळी होते, तिला काय याविषयी खेद होत नाही ? ती खेद करते पण ती काही अशाकाळी आपणास सोडवीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या प्रपंचातील धनामुळे व मानामुळे आणि मीपणाच्या भावनेमुळे मी बाटून गेलो आहे माझ्या मनाने यासबधी लाभ अथवा नुकसानी याविषयी विचारच करू दिला नाही ४

३२६३ इच्छिती तयांसी व्हावे जी अरूप । आम्हासी स्वरूपस्थिती चाड ॥ १ ॥
आता नव्हे माझा भाव अनारिसा । पाउलांनी इच्छा गोवियेली ॥ २ ॥
लेकरासी कोठें जाणत्याची परी । करू येते दुरी धरावया ॥ ३ ॥
लागली न सुटे नामाची आवडी । माझी भावजोडी भगूं नका ॥ ४ ॥
घेसील[3] वेढे मुक्तीच्या अभिळासे । चाळवी जा पिसे ब्रह्मज्ञानी ॥ ५ ॥
तुका म्हणे माझा कोठें भक्तिरस । पाडावया ओस चाळविसी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अरूप-निराकार, अव्यक्त, चाड-इच्छा, अनारिसा-वेगळा, परी-प्रमाणे, वेढे-आढेवेढे, अभिळासे-इच्छेने, पिसे-वेडे.

अर्थ –देवा, ज्याना तुमच्या निराकार, अव्यक्त रूपाची इच्छा आहे त्याच्यासाठी तुम्ही तसे व्हावे आम्हाला मात्र तुमच्या सगुण स्वरूपाविषयीच इच्छा आहे. १ याखेरीज आता माझा भाव काही वेगळा होणार नाही तुमच्या चरणानी माझी इच्छा स्वत च्या ठिकाणी गुतवून ठेविली आहे २ लहान मुलास कधी जाणत्याची बरोबरी करता येते काय ? जाणत्याप्रमाणे वागता येते काय ? त्याला कधी जाणत्याप्रमाणे दूर धरता येते ? ३ देवा, तुमच्या नामाची जी गोडी मला लागलेली आहे ती कधी सुटेल का ? यासाठी माझ्या भावाची, प्रेमभावाची जोडी कधी भग देऊ नका ४ आम्ही मोक्ष मागू या भीतीने तू आढेवेढे घेत आहेस, पण तो आम्हास नको ५ तुकाराम महाराज म्हणतात, जे कुणी ब्रह्मज्ञानासाठी वेडे झाले असतील त्याना फसवीत जा माझ्या भक्तिप्रेमास तू फसवीत आहेस ६

१ बाटविला, २ लाभ आलाभ, ३ घेसी आढेवेढे

विवरण :- या एका महत्त्वाच्या अभंगात तुकारामबुवा आपल्या सगुण भक्तीच्या प्रेमाचा पुरस्कार करीत आहेत. जे कुणी योगी, तपी, सिद्ध असतील त्याना वाटल्यास निर्गुणनिराकार रूप दाखवावे. पण आम्हास मात्र देवा, तुझ्या सगुण रूपाचीच इच्छा आहे, असे बुवा या ठिकाणी म्हणत आहेत सगुण रूपाच्या प्रेमाने नामभक्तीत एकदा दंग झाल्यावर मग कशाचीच आठवण भक्तास उरत नाही त्यामुळे या भक्तिप्रेमाच्या आनंदातच साधुसंत सुखावलेले असतात. त्याना त्यापुढे मुक्तीची किंवा मोक्षाची बिलकुल इच्छा नसते म्हणूनच या अभंगात तुकाराम महाराज म्हणतात, जे कुणी मुक्तीसाठी वेडे झाले असतील त्यांना वाटल्यास मुक्ती किंवा मोक्ष द्यावा आम्हाला सगुण रूपाची भक्तीच थोर वाटते. मोक्षस्थिती प्राप्त झाल्यावर मग या सगुण प्रेमाचे वैभव कुठून येणार ? शिवाय निराकार निर्गुण रूपाची उपासना शरीरकष्ट देणारी, मार्ग चुकविणारी, अडचणीत टाकणारी; त्यापेक्षा सगुणावर आधारलेला भक्तिमार्ग सुखाचा व बिनधोकपणाचा वाटतो. यज्ञयाग, योगादी साधने, व्रतवैकल्ये, कर्मकांड इत्यादिकापेक्षा नामसंकीर्तनाचा वा सगुणभक्तीचा मार्ग संतानी नेहमीच श्रेष्ठ मानला आहे अव्यक्ताच्या उपासनेत शरीरकष्ट तरी किती असतात! इंद्रपदाची वाटमारी, ऋद्धिसिद्धीचा अडथळा, कामक्रोधाचे उपद्रव, रात्रंदिवस होत असलेली शरीरयातना, इंद्रियाचा निरोध, तापदायक नियम इत्यादी कठोर कर्मकांड म्हणजे पतीवाचून नित्य नवा असा अग्निप्रवेशच असतो. नित्य झुंज मरणाबरोबर असते. म्हणून श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात, " म्हणोनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा । तया दुःखाचाचि वांटा । भागा आला ' यासाठी हा कष्टाचा मार्ग सोडून नामसंकीर्तनाने साध्य होणाऱ्या सगुणप्रीतीचा लोभ माणसाने धरावा अशी शिकवण सर्वच साधुसंताची आहे. भक्तिरसातील सौख्य कधी विटणारे नाही, कधी कमी होणारे नाही उलट नित्य वाढतच राहाणारे असून विनासायास ईश्वराचा लाभ करून देणारे आहे.

३२६४ आम्हां भाविकांची जाती । एकविध जो श्रीपती । अळंकारयुक्ति । सरों तेथें शकेचि ना ॥१॥
जाणें माउली त्या गुणा । क्षोभ उपजों नेदी मना । शांतवूनि स्तना । लावीं अवो कृपाळे॥२॥
तुज अवघें होऊं येतें । मज वाटों नये चित्तें । उपासने परतें । नये कांहीं आवडों[1] ॥ ३ ॥
करूं रूपाची कल्पना । मुखीं नाम उच्चारणा[2] । तुका म्हणे जना । जल स्थल देखतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- अवो-अगे, परतें-शिवाय

अर्थ:- अहो श्रीपती, एकनिष्ठपणे तुमची भक्ती करणे हीच आम्हा भाविकांची जात आहे नाना अलंकार व युक्तिप्रयुक्तीचे प्रकार येथे कधी खपतच नाहीत. १ अगे कृपाळू, माऊली बालकाच्या सर्व खुणा जाणते. ती त्याच्या मनात कधीच क्षोभ निर्माण होऊ देत नाही, ती ते रडायला लागले तर आपल्या स्तनांशी घेऊन त्याला शांत करते. २ देवा, तुला नाना प्रकारची रूपे धारण करता येतात, पण तितक्या रूपांना माझे चित्त काही मला वाटता येत नाही. कारण तुझे रूप हेच माझे उपास्य असल्याने त्याच्याशिवाय मला दुसरे काहीही आवडत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, तुम्ही जरी नाना रूपे धारण केली तरी आम्ही मात्र आम्हांस आवडणाऱ्या तुमच्या एकाच रूपाची कल्पना करू, आणि त्याचेच नाव मुखाने उच्चारू. अशी ही आमची एकविध भक्ती पाणी, जमीन व लोक यांच्या देखत होत असते. ४

३२६५ ज्यावें हीनपणें । कासयाच्या प्रयोजनें ॥ १ ॥
प्रारब्धीं संसार । बरी हिमतीची यार ॥ २ ॥
होणार ते कांहीं । येथें अवकळा नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे देवें । कृपा केलिया बरवें ॥ ४ ॥

---

१ आवडे २ नारायणा.

शब्दार्थ व टीपा – ज्याचे–जगावे, कासयाच्या–कोणत्या, प्रयोजनें–कारणासाठी, भार–थारा, आश्रय, बरवें–बरे, चांगले.

अर्थ – कोणत्या कारणासाठी आम्ही हीनपणाने जगावे ? १ प्रारब्धामध्ये हा संसारच जर असेल तर त्यासाठी मोठ्या हिंमतीस आश्रय द्यावा लागेल २ प्रभुकृपेविषयी जे काय होणार ते होईल येथे कसल्याही प्रकारची अवकळा नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा वेळी देवाने कृपा केली तर चांगले होईल ४

३२६६ किती रांडवंडे । घालूनि व्हाल रे बापुडे । संसाराचे भिडे । कासावीस जालेती ॥ १ ॥
माझ्या स्वामी शरण रिघा । कृपाळुवा पांडुरंगा । ठेवी अंगसंगा । विश्वासियां जवळी ॥२॥
कांहीं न मागतां भलें । होईल तेंचि काम केलें । नसावें आथिलें । कांहीं एका संकल्पें ॥३॥
तुका म्हणे भाव । पाववील ठायाठाव । एकविध जीव । ठेविलिया सेवेसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– रांडवडे–शिव्यागाळी, रिघा–जा, आथिलें–असलेले, ठायाठाव–स्वस्वरूपाच्या ठिकाणी

अर्थः– अहो लोकहो, तुम्ही एकमेकांना शिव्यागाळी करून किती दीनवाणे होणार ? तुम्ही आधीच संसाराच्या भिडेमुळे कासावीस झालेले आहात १ माझा स्वामी जो कृपाळू पांडुरंग त्याला तुम्ही शरण जा ना जे कुणी त्याच्यावर विश्वास ठेवून असतील त्याना तो स्वतःचा अंगसंग देतो. २ काही न मागणे हे चांगले असते जे होईल ते काम करावे; ते कोणत्याही एका संकल्पाने असलेले नसावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीच्या ठिकाणी एकनिष्ठपणे भाव ठेवल्यास जीवास तो स्वस्वरूपाच्या ठिकाणी स्थापन करील ४

३२६७ बाप करी जोडी लेकराचे ओढी । आपुली करवंडी[1] वाळवूनी ॥ १ ॥
एकाएकीं केला मिरासीचा धनी । कडिये वागवूनी भार खांदीं ॥ २ ॥
लेवऊनी[2] पाहे डोळा अळंकार । टेवा[3] दावी थोर करूनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे नेदी गाजूं आणिकांसी । उदार जीवासी आपुलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–प्राप्ती, करवडी–पोटाची खाच.

अर्थ –आपल्या मुलाच्या लोभाने बाप स्वतःच्या पोटाची खाच वाळवून, हाडे वाळवून अनेक प्रकारची संपत्ती जमा करून ठेवितो १ त्याला स्वतःच्या कडेवर व खांद्यावर वागवून, त्याचा भार सहन करून एकदम तो आपल्या संपत्तीचा मालक करून टाकतो २ त्याच्या अंगावर नानाप्रकारचे अलंकार घालून आपल्या डोळ्यांनी तो कौतुकाने पाहातो यात तो आपले ऐश्वर्य फार मोठे आहे असे दाखवितो ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा पिता आपल्या बालकास कुणासही गाजू देत नाही त्याच्या सांभाळाविषयी तो स्वतःच्या जीवावरही उदार झालेला असतो ४

३२६८ या रे हरिदासानो जिंको कळिकाळा । आम्हुचिया बळा पुढें किती बापुडें ॥ १ ॥
रंग सुरंग घमंडी नाना छंदें । हास्यविनोदें मनाचिये आवडी ॥ २ ॥
येणे तेणे प्रकारे बहुता सुख जोडे । पूजन तें घडे नारायणा अंतरी ॥ ३ ॥
वांकड्या नाना बोल बोलावे आर्त । येईल तो त्यांस छंद पढीये गोविंदा ॥ ४ ॥
आपुलाले आवडी एकापुढें एक नटा । नाहीं थोर मोठा लहान या प्रसंगीं ॥ ५ ॥
तुका म्हणे येथे प्रेम भंगू नये कोणी । देव भक्त दोन्ही मिळविता पालक ॥ ६ ॥

---

१ करवडी, २ घालूनिया, ३ ठेवा

शब्दार्थ व टीपा- नरा-माणसाची.

अर्थ:-आजपर्यंत माणसाची स्तुती करून आयुष्याचे मातेरे केले १ या एका नारायणाशी दूरत्व निर्माण झाल्याने हातून सर्व प्रकारची पापे घडली. २ ज्याने आपणांस जीव दान म्हणून दिला आहे त्याची मानखंडना हातून होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीशिवाय इतर काही ज्याची वाणी ऐकते त्याचे कान दोषपूर्णच आहेत. ४

३२७२ संतां नाहीं मान । देव मानी मुसलमान ॥ १ ॥
ऐसे पोटाचे मारिले । देवा[1] आशा विटंबिले ॥ २ ॥
घाली लोटांगण । वंदी नीचाचे चरण ॥ ३ ॥
तुका म्हणे धर्म । न कळे माजल्याचा भ्रम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- पोटाचे-पोटासाठी.

अर्थ -साधुसंताना हा कधी मान देत नाही. पण मुसलमानांना मात्र देव मानतो. १ असे हे लोक पोटासाठी मारले गेले आहेत देवा, यांची आशेने मोठीच विटंबना झाली आहे. २ हा नीचाच्या पायांवर लोटांगण घालतो, त्यांचे चरण धरतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकाना धर्म कळत नाही. कारण ते उन्मत्त झालेले असतात ४

३२७३ अहो कृपावंता । होईं बुद्धीचा ये[2] दाता ॥ १ ॥
जेणें पाविजें उद्धार । होय तुझे पायीं थार ॥ २ ॥
वदवीं हे वाचा । भाव पांडुरंगीं साचा ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । माझे अंतर वसवा[3] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- थार-थारा, आश्रय, साचा-परोपर, अंतर-मनात.

अर्थ - अहो कृपावंत देवा, अशा प्रकारच्या बुद्धीचे दाते तुम्ही व्हा १ जीमुळे आमचा उद्धार होईल आणि तुमच्या पायाशी आश्रय मिळेल २ एका पांडुरंगाच्याच ठिकाणी खरा भाव आहे असे वाणी नित्य वदत राहील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझ्या अंतःकरणात तुम्ही वसती करा ४

३२७४ नाहीं म्या वंचिला मंत्र कोणापाशीं । राहिलों जीवासीं धरूनि तो ॥ १ ॥
विटेवरीं भावें ठेवियेलें मन । पाउलें समान चिंतीतसें ॥ २ ॥
पावविलों पार धरिला विश्वास । घालूनियां कास घळकट ॥ ३ ॥
तुका म्हणे मागें पावले उद्धार । तिहीं हा आधार ठेविलासे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.- वंचिला-फसवणूक, तिहीं-यांनी.

अर्थ -मी कोणापाशी मंत्राची फसवणूक केलेली नाही. त्याला मी माझ्या जीवापाशीच धरून ठेविले आहे. १ मी आपले मन एकनिष्ठेच्या भावाने विटेवरच ठेविले आहे. आणि तीवरील समान पावलांचे चिंतन मी सतत करीत आहे २ मी यांच्यावर दृढ विश्वास ठेविल्याने हा भवसागर पार तरून गेलो आहे. यासाठी मी बळकटपणे कास घातलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, यापूर्वी अनेक भाविक संतजन उद्धरून गेले आहेत. त्यांनीच हा आधार पुढल्या लोकांसाठी निर्माण केला आहे ४

---

[1] देवें २ तें ३ वसावा

शब्दार्थ व टीपा – आर्य–वेडेवाकडे, बोबडे, पढिये–आवडता

अर्थ – हरिदासानो, या, आपण सर्व मिळून त्या कळिकाळास जिंकू आपणा सर्वांच्या बळापुढे तो बापुडा किती टिकाव धरणार? १ नाना प्रकारच्या प्रेमरंगात,नानाप्रकारच्या कवितछंदात मोठ्या घमेंडीने व हास्यविनोदाने मनाच्या आवडीने रंगून जा २ या अशा प्रकाराने बहुतेकांच्या अंतःकरणात सुख निर्माण होईल व त्यामुळे अंतःकरणात नारायणाचे पूजन घडेल ३ नाना वाकड्या चालीने वेड्यावाकड्या बोलांनी त्या श्रीहरीचे गुणगान करावे ज्याला जो छंद असेल तो या प्रभूला आवडता आहे ४ आपापल्या आवडीप्रमाणे एकापेक्षा एक सुशोभित व्हा अशा प्रसंगी कुणी लहान, कुणी थोर असे नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, या ठिकाणी देवभक्ताच्या प्रेमाचा भंग कुणी करू नये देव व भक्त यांना वेगळे कुणी मानेल तर ते पातक आहे ६

३२६९ अवघाचि अन्यायी । तेथें एकल्याचें काई ॥ १ ॥
आता अवघें एकवेळें । जळोनि सरो तें निराळें ॥ २ ॥
काय माझें खरें । एवढेंच राखो बरें ॥ ३ ॥
तुका म्हणे आता । परिहार न लगे चित्ता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परिहार–समर्थन करणे

अर्थ – मी सर्व बाजूंनी अन्यायीच आहे. तेथे एकट्या दोषाचे विशेष काय? १ पण आता या एका वेळेस सर्व दोष जळून जावेत व मी त्यांच्या विरहित उरावा २ जे माझे खरे आहे तेवढेच राखावे हे बरे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझ्या चित्ताचे याविगळे समर्थन करावे लागणार नाही ४

३२७० काय वृंदावन[1] मोहियेलें गुळें । काय जिरें काळें उपचारिलें ॥ १ ॥
तैसी अधमाची जातीच अधम । उपदेश श्रम करावा तो ॥ २ ॥
न फळे विचासी कुरवाळिलें अंग । आपले ते रंग दावीतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे नये पाकासी दगड । शूकरासी गोड जैसी विष्ठा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –वृंदावन–एक प्रकारचे कडू फळ, मोहियेले–माखले, पाकासी–शिजण्याच्या अवस्थेत, शूकरासी–डुकराला

अर्थ – कडू वृंदावन कितीही गुळाने माखून टाकले तरी त्याचा काय उपयोग होणार? काळ्या जिऱ्यावर कितीही उपचार गोडीसाठी केले तरी त्याचा उपयोग काहीच नाही १ त्याप्रमाणे दुष्ट मनुष्य दुष्टच राहातो त्याला उपदेश केल्यास फुकटचे श्रम मात्र होतात २ विषारी विंचवाचे अंग कितीही प्रेमाने कुरवाळले तरी काय होणार? तो दंश करून आपले गुण दाखविणारच ३ तुकाराम महाराज म्हणतात दगड कितीही शिजवला तरी तो कधीच शिजणार नाही डुकराला नेहमी विष्ठाच गोड वाटणार अधमाची जात अशीच आहे ४

३२७१ स्तवूनिया नरा । केला आयुष्याचा मातेरा ॥ १ ॥
नारायणाचिया लोपें । घडलीं अवघींचि पापें ॥ २ ॥
जीव ज्याचें दान । त्याचा खडूनिया[2] मान ॥ ३ ॥
तुका म्हणे वाणी । आइके त्या दोष कानीं ॥ ४ ॥

---

१ इंद्रावण, २ खडू नये

शब्दार्थ व टीपा – नरा-माणसाची

अर्थ –आजपर्यंत माणसाची स्तुती करून आयुष्याचे मातेरे केले १ या एका नारायणाशी दूरत्व निर्माण झाल्याने हातून सर्व प्रकारची पापे घडली २ ज्याने आपणास जीव दान म्हणून दिला आहे त्याची मानखंडना हातून होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीशिवाय इतर काही ज्याची वाणी ऐकते त्याचे कान दोषपूर्णच आहेत ४

३२७२ संता नाहीं मान । देव मानी मुसलमान ॥ १ ॥
ऐसे पोटाचे मारिले । देवा[1] आशा विटंबिले ॥ २ ॥
घाली लोटांगण । वंदी नीचाचे चरण ॥ ३ ॥
तुका म्हणे धर्म । न कळे माजल्याचा भ्रम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पोटाचे-पोटासाठी

अर्थ –साधुसंतांना हा कधी मान देत नाही पण मुसलमानांना मान देव मानतो १ असे हे लोक पोटासाठी मारले गेले आहेत देवा यांची आशेने मोठीच विटंबना झाली आहे २ हा नीचाच्या पायांवर लोटांगण घालतो, त्यांचे चरण धरतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकांना धर्म कळत नाही कारण ते उन्मत्त झालेले असतात ४

३२७३ अवो कृपावंता । होईं बुद्धीचा ये[2] दाता ॥ १ ॥
जेणें पाविजे उद्धार । होय तुझे पायीं थार ॥ २ ॥
वदवीं हे वाचा । भाव पांडुरंगीं साचा ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । माझे अंतर वसवा[3] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – थार-थारा आश्रय, साचा-खरोखर, अंतर-मनात

अर्थ – अहो कृपावंत देवा अशा प्रकारच्या बुद्धीचे दाते तुम्ही व्हा १ जीमुळे आमचा उद्धार होईल आणि तुमच्या पायाशी आश्रय मिळेल २ एका पांडुरंगाच्याच ठिकाणी खरा भाव आहे असे वाणी नित्य वदत राहील ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा माझ्या अंतःकरणात तुम्ही वसती करा ४

३२७४ नाहीं म्या वंचिला मंत्र कोणापाशीं । राहिलों जीवासीं धरूनि तो ॥ १ ॥
विटेवरी भावें ठेवियेलें मन । पाउलें समान चिंतीतसें ॥ २ ॥
पावविलो पार धरिला विश्वास । घालूनिया कास बळकट ॥ ३ ॥
तुका म्हणे मागें पावले उद्धार । तिहीं हा आधार ठेविलासे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वंचिला-फसवणूक तिहीं-त्यांनी

अर्थ –मी कोणापाशी मंत्राची फसवणूक केलेली नाही त्याला मी माझ्या जीवापाशीच धरून ठेविले आहे १ मी आपले मन एकनिष्ठेच्या भावाने विटेवरच ठेविले आहे आणि तीवरील समान पावलांचे चिंतन मी सतत करीत आहे २ मी याच्यावर दृढ विश्वास ठेविल्याने हा भवसागर पार तरून गेलो आहे यासाठी मी बळकटपणे कास घातलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, यापूर्वी अनेक भाविक संतजन उद्धरून गेले आहेत त्यांनीच हा आधार पुढल्या लोकांसाठी निर्माण केला आहे ४

---

१ देव २ तू, ३ वसावा

३२७५ चंचळीं चचळ निश्चळीं निश्चळ । वाजवी खळाळ उदकासी ॥ १ ॥
सोपे वर्म परि मन नाहीं हातीं । हा हा भूत चित्तीं भ्रम गाढा ॥ २ ॥
रविबिंब नाहीं तुटत उदका । छायेची ते नका सरी धरू ॥ ३ ॥
तुका म्हणे भय धरी रज्जूसाटीं । नाहीं साच पोटीं कळले तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सरी–बरोबरी, रज्जूसाठी–दोरीस पाहून, साच–खरे

अर्थ– पाणी सपाट भूमीवर निश्चल असते, उचसखल भूमीवर चचल होते उताराच्या दिशेने त्याचा खळखळ आवाज जोरात होतो १ प्रभुप्राप्तीचे वर्म याप्रमाणे फार सोपे आहे पण आपल्या हातात आपले मन नाही ते दृढ भ्रमाने भयभीत झालेले आहे अरे रे २ पाण्यात सूर्याचे बिंब जरी पडलेले असले तरी ते काही पाण्यापासून वेगळे होत नाही पाण्यातील छाया खऱ्या सूर्यबिंबाप्रमाणे मानू नका ३ तुकाराम महाराज म्हणतात, रज्जू हाच सर्प आहे अशा भ्रांतीमुळे भीती वाटते पण खरा प्रकार समजताच ती भीती सपते. ४

३२७६ आवडी येते[1] कळो । गुणे चिन्हे उमटती ॥ १ ॥
पोटीचे ओठीं उभें राहे । चित्त साहे मनासी ॥ २ ॥
डोहोळियाची[2] भूक गर्भा । ताटीं प्रभा प्रतिबिंबे ॥ ३ ॥
तुका म्हणे मानोन घ्यावे । वाटे खावे वाटते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–प्रेम, साहे–साह्य

अर्थ – गुणाची चिन्हे प्रकट झाली की प्रीती समजून यते १ जी गोष्ट पोटात असते तीच ओठाच्या द्वारे समजून येते कारण चित्त हे मनास साह्य करणारे असते २ आईला जे डोहाळे होतात ते गर्भस्थ जीवाच्या भुकेप्रमाणेच असतात भानुबिंब जसे असेल तसेच प्रतिबिंब ताटावर पडत असते किंवा माडवावर तशीच प्रभा पडत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात जे जे मनापासून आवडते, रुचकर वाटते, खावेसे वाटते ते मागून घ्यावे ४

३२७७ काय ऐसी वेळ । वोडवली अमगळ ॥ १ ॥
आजि दुखवले मन । कथाकाळीं जाला सीण ॥ २ ॥
*पापाचिया गुणे[3] । त्याचिया वेळे दर्शणें ॥ ३ ॥*
तुका म्हणे कानीं । घालू आले दुष्टवाणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वोडवली–ओढवली, निर्माण झाली सीण–त्रास

अर्थ – पुढे दिल्याप्रमाणे आज कशी अमगल वेळ निर्माण झाली ? १ आज हरिकथेच्या वेळेस मन दुखावले जाऊन फारच क्षीण झाला २ हे सर्व त्यांच्या पापाच्या दर्शनामुळें झाले असावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे दुर्जन आपली दुष्टवाणी माझ्या कानावर घालण्यासाठी आले आहेत ४

३२७८ कितीवेळा जन्मा यावे । नित्य[4] व्हावे फजीत ॥ १ ॥
म्हणऊनि जीव भ्याला । शरण गेला विठोबासी ॥ २ ॥
प्रारब्ध पाठी गाढें । न सरे पुढें चालता ॥ ३ ॥
तुका म्हणे रोकडी हे । होती पाहे फजीती ॥ ४ ॥

---

*१ येते गुणे । कळो चिन्हे, २ डाहळे याची ३ मुळें, ४ किती*

शब्दार्थ व टीपा:- गाढें-मोठें, जबरदस्त, रोकडी-उघडउघड

अर्थ:- किती वेळा जन्मास येऊन आम्ही नित्य फजीत व्हावे ? १ यामुळे आमचा जीव म्याला व विठ्ठलास शरण गेला. २ आमचे प्रारब्ध फार मोठे आहे. ते आमच्या पाठीमागे लागले असून आम्ही पुढे जात असतानाही ते काही सरत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी आमची उघड उघड कितीतरी फजिती होते हे पाहा ना ४

३२७९ होतों सांपडलों वेठी । जातां भेटी संसारा ॥ १ ॥
तों या वाटे कृपा केली । भेटी जाली विठोबासी ॥ २ ॥
होता भार माथां माझे । बहु ओझें अमुप ॥ ३ ॥
तुका म्हणे केली चिंता । कोण दाता भेटेल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.- अमूप-पुष्कळ.

अर्थ - संसाराची भेट घेण्यासाठी जात असताना मी या जन्ममृत्यूंच्या वेठबिगारीत सापडलो होतो १ परंतु अशाही वेळी मी या भक्तिमार्गाच्या वाटेवर आलो तेव्हा विठोबाची मोठीच कृपा म्हणून त्याची भेट झाली. २ संसाराचे फार मोठे ओझे माझ्या माथ्यावर होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा मला दाता कोण भेटेल ही चिंता माझ्या मनास होती ४

३२८० भुंकुनियां सुनें लागे हस्तीपाठी । होऊनि हिंपुटी दुःख पावे ॥ १ ॥
काय त्या मशकें तयाचें करावें । आपुल्या स्वभावें पीडतसे ॥ २ ॥
मातलें बोकड[1] विटवी पंचानना । घेतलें मरणा धरणें तें[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे संतां पीडितील खळ । घेती तोंड काळें करूनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- सुनें-कुत्रें हस्तीपाठी-हत्तीच्या मागे, हिंपुटी-कष्टी, मशकें-चिलटानें, मातलें-माजलेल्या, विटवी-वेडावणें, पचानना-सिंहास, खळ-दुष्ट लोक.

अर्थ:- हत्तीच्या पाठीमागे एखादे कुत्रे लागते आणि भुंकत राहाते, परंतु शेवटी ते कष्ट पावून दुःखीच होते १ हत्तीपुढे चिलटाप्रमाणे असणाऱ्या त्या कुत्र्याने करावे तरी काय ? ते आपल्या स्वभावाप्रमाणे कष्टी होऊन भुंकतच राहाते २ माजलेला बोकड सिंहाला वेडावणे दाखवीत असतो, पण असे करण्याने त्याने मरणाचेच धरणे धरलेले असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे जे दुष्ट लोक संताना पीडा देतील ते स्वतःचे तोंड काळे करून घेतील. ४

३२८१ जा रे तुम्ही पंढरपुरा । तो सोयरा दीनांचा ॥ १ ॥
गुण दोष नाणी मना । करी आपणासारिखें ॥ २ ॥
उभारोनि उभा कर । भवपार उतराया ॥ ३ ॥
तुका म्हणे तांतड मोठी । जाली भेटी उदंड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.- नाणी-न आणी, आणीत नाही, उदंड-पुष्कळ.

अर्थ.- लोकहो, तुम्ही पंढरपुरास जा ना. तेथे दीनांचा सोयरा पांडुरंग उभा आहे १ तो कुणाचेच गुणदोष मनात न आणता सर्वांनाच आपणासारखे करून टाकतो २ आपल्या भक्तांना संसारसमुद्रातून तारण्या-

१ माकड, २ तेणें.

साठी आपला हात वर करून उभा आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या भक्तजनांना भेटण्यासाठी तो मोठाच उतावीळ झालेला असतो त्याची भेट होणे हाच पुष्कळ लाभ आहे ४

३२८२ गर्जत जावें नामावळी । प्रेमें टाळी वाहोनि ॥ १ ॥
येणें सुखें पुढती धांवे । भेटी सवें गोपाळा ॥ २ ॥
लोटांगण घाला तळीं । वंदा धुळी संतांची ॥ ३ ॥
तुका म्हणे विठ्ठल लाहो । ऐसा बाहो उभारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाहोनि–वाजवून, लाहो–लाभ व्हावा म्हणून

अर्थ – प्रेमाने हाताची टाळी वाजवून मुखाने श्रीहरीच्या नामाची गर्जना करावी १ या सुखामुळे भक्तजनाची भेट घेण्यासाठी तो पुढे धावत येतो २ जमिनीवर लोटांगण घाला आणि संतांच्या चरणाची धूळ वंदन करा ३ तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलाचा लाभ होईल अशा रीतीने तुम्ही तुमचे बाहू उभारावेत ४

३२८३ अनुसरे तो अमर जाला । अंतरला संसारा ॥ १ ॥
न देखती गर्भवास । कधीं दास विष्णूचे ॥ २ ॥
विसंभेना माता बाळा । तैसा लळा पाळावा ॥ ३ ॥
त्रिभुवनीं ज्याची सत्ता । तुक्या रक्षिता तो जाला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लळा–लाड

अर्थ – जो श्रीहरीला अनुसरून राहिला तो अमर झाला यामुळे तो संसाराला आचवला आहे १ विष्णूच्या दासांना कधी गर्भवासाची दुःखे भोगावी लागत नाहीत २ आई आपल्या बालकास कधी विसरत नाही, त्याप्रमाणे हा देव आपल्या भक्ताचे हट्ट पूर्ण करतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे तीनही लोकांत ज्याची सत्ता आहे तोच माझे रक्षण करणारा बनला आहे ४

३२८४ आतां केशीराजा हेचि विनवणी । मस्तक चरणीं ठेवीतसे ॥ १ ॥
देह असो माझा भलतिये ठायीं । चित्त तुझ्या पायीं असो द्यावें ॥ २ ॥
काळाचें खंडण घडावें चिंतन । धनमानजनविन्मुख[1] तो ॥ ३ ॥
कफवातपित्त देहअवसानीं । ठेवावी वारुनि दुरितें हीं ॥ ४ ॥
सावध तो माझीं इंद्रियें सकळें । दिली एका वेळे हाक आधीं ॥ ५ ॥
तुका म्हणे तूं या सकळांचा जनिता । येथें ऐकता सकळांसी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – केशीराजा–विष्णूचे एक नाव येथे विठ्ठला, भलतिये–कोणत्याही, वारुनि–दूर करून, दुरितें–पातके

अर्थ – विठ्ठला, आता एकच विनवणी तुला तुझ्या चरणावर मस्तक ठेवून करीत आहे १ माझा देह कोणत्याही ठिकाणी असला तरी माझे चित्त मात्र तुझ्याच पायाशी असावे २ धनसंपत्ती, मानसन्मान, लोकांचे प्रेम यापासून दूर होऊन मी तुझ्याच चिंतनात काळ व्यतीत करावा ३ कफ, वात, पित्त याची पातके माझ्या देहाच्या ठिकाणी असून ती तुम्ही दूर करावीत ४ जोपर्यंत माझी सर्व इंद्रिये सावध आहेत तोपर्यंतच एकदा मी तुला हाक मारलेली आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, तूच या सर्वांना जन्म देणारा आहेस आणि शेवटी ही सर्व तुलाच येऊन मिळणार आहेत ६

१ तनमनधनविन्मुखता

३२८५ चित्त तें चिंतन कल्पनेची धाव । जे जे वाढे हाव इंद्रियाची ॥ १ ॥
हात पाव दिसे शरीर चालता । नावे भेद सत्ता जीवाची ते ॥ २ ॥
रवीचिये अंगीं प्रकाशक[1] कळा । वचनें निराळा भेद दिला ॥ ३ ॥
तुका म्हणे माप वचनाच्या अंगीं । मौन्य काय रंगीं निवडावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पाव–पाय, मौन्य–मौन

अर्थ – विविध इंद्रियाची जसजशी हाव वाढत जाते त्याप्रमाणे विषयाच्या कल्पना वाढून त्याचेच चिंतन सुरू होते यालाच चित्त असे नाव आहे १ आपले हे शरीर हातानी, पायानी चालते असे दिसते पण ही नावे भिन्न असली तरी सर्व सत्ता एका जीवाचीच असते २ सूर्याच्या पासूनच प्रकाश मिळतो हे खरे असले तरी सूर्य व प्रकाश हे दोन शब्द वेगळे असल्यामुळे वरवर भेद दिसतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, कोणत्याही वस्तूचे माप वचनानी करता येते पण येथेच जर मौन धारण केले तर कुणाला कसला रंग निवडता येईल ? ४

३२८६ बोलोनिया काय दावू । तुम्ही जीऊ जगाचे ॥ १ ॥
हेचि आता माझी सेवा । चिंतन देवा करितो ॥ २ ॥
विरक्तासी देह तुच्छ । नाहीं आस काशाची[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे पायापाशीं । येईन ऐसी वासना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जीऊ–जीव, काशाची–कशाचीही, देहाची सुद्धा

अर्थ – देवा, तुम्ही या सर्व जगताचे जीव आहात असे मी काय बोलून दाखवायला हवे ? १ देवा, मी आता तुमचे चिंतन करीत आहे हीच माझी सेवा आहे २ जो कुणी विरक्त आहे त्याने आपल्या देहाला तुच्छ मानलेले असते त्याला कशाचीच इच्छा उरलेली नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या पायांजवळ यावे अशी माझी इच्छा आहे ४

३२८७ निजो नेदी सकाळवेळीं । रातीकाळी चिनचिनी ॥ १ ॥
बोगळाने घेतली पाठी । केली आटी जीवासी ॥ २ ॥
मेळऊनि सवे[3] जन । चिंता नेणे देवळींच ॥ ३ ॥
*तुका म्हणे आलो घरा । तोंडा घोरा बाइलेच्या ॥ ४ ॥*

शब्दार्थ व टीपा – चिनचिनी–कटकट, घोर–कठोर

अर्थ – सकाळच्या वेळी हा धडपणे निजूसुद्धा देत नाही आणि रात्रीच्या वेळी एकसारखी याची कटकट सुरू असते १ असा हा वाईट नवरा माझ्या एकसारखा पाठीशी लागलेला आहे जीव अगदी त्रासून गेला आहे यामुळे २ स्वत च्या बरोबर नाना प्रकारचे लोक जमवतो आणि देवळातच भजन करीत बसतो घराची चिंता याला कधीच वाटत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे ही बायको कठोर भाषण करीत असल्यामुळे मी घरी आलो आहे ४

विवरण – मागे अभंग ५६६ ते ५७२ पर्यंत 'स्वामीच स्त्रीने स्वामीस कठिण उत्तर केलें अभंग ७' या नावाखाली जे अभंग आहेत त्यामधीलच हा एक अभंग दिसतो बाहेर व्यापाराची व व्यवसायाची सर्व घडी विसकटून गेली, पत बुडाली आणि इकडे घरी कुणाची दुसरी बायको पजाग अथवा कर्कशा निघाली अशा प्रकारच्या दुहेरी आपत्तींमुळे त्याचे मन मोठ्या विचित्र परिस्थितीत सापडून व्याकुळ झाले. मूळचीच असलेली

१ प्रकाश सकळा २ दहाचा, ३ बया बरण
– गाथा–३ .१९

भगवन्नामप्रीती वर उसळून आली. त्याना नामस्मरणाची, कथाकीर्तनाची, वृक्षवल्लींच्या सोबतीची गोडी वाटू लागली. त्याचे चित्त ससारात रमेना. आणि जिजाई अथवा आवली तर पूर्णपणे ससारात मुरलेली. पोराच्या, ससाराच्या खस्ता खाता खाता त्रासलेली दिसते या तोंडाळ बाईने बुवाना अनेकदा कटू शब्दानी प्रहार केलेला आहे एक सासारिक बाई म्हणून तिची तक्रार खरीही वाटते तिचे तुकोबाच्यावर मनापासून प्रेमही आहे. पण पती सदोदित टाळ कुटीत राहातो, भजनात तल्लीन होतो, नामस्मरणात दग होतो आणि त्यामुळे ससाराची घडी विसकटून जाते, अशी तिची मुख्य तक्रार आहे. पूर्वजन्मीचा दावेदार असणारा हा पती होऊन आपणास छळत आहे. मी आता किती दु:ख सोसू ? वारवार कुणाकडे तोंड वेगाडू ? ससारातील फजिती किती सहन करू ? पोराना खायला तरी काय देऊ ? इत्यादी प्रश्न विचारून जिजाईने आपली कैफियत माडली आहे. वरील अभगात अशाच प्रकारची एक तक्रार तुकोबाच्या बायकोची आहे तुकोबाना रात्रदिवस भजनाचा व नामस्मरणाचा छद असल्यामुळे तिला रात्रभर झोप येत नाही. आणि हा तिला सकाळीही झोपू देत नाही. कधी लोक भोवती जमा करून देवळात जाऊन कल्लोळ करतो. याला घराची कशी ती ओढच नाही. बायको अशा प्रसगी कधी फारच कठोर बोलली तर तुकोबाना घरी यावे लागत असे ते या तोंडाळ बायकोची समजूत काढण्याचाही प्रयत्न करीत 'देवासाठीं जालें ब्रह्मांड सोइरें' म्हणून ते बायकोची समजूत काढीत मागे अभगक्र. १९८१ ते १९९१ पर्यंतच्या अभगात बुवानी जो जिजाईस उपदेश केला त्याचा मथितार्थ आपण पाहिला आहेच आपल्या पत्नीनेही 'देव पाहावया सायास' करावेत अशी त्याची इच्छा आहे. पोटाची, वस्त्राची तिने चिंता करू नये कारण सर्व प्रकारचा साभाळ करणारी माऊली पाडुरग समर्थ आहे असा त्याचा उपदेश आहे. 'सडा समार्जन तुळसी वृंदावन। अतीत पूजन ब्राह्मणाचे। वैष्णवांची दासी होईं सर्वभावें। मुखीं नाम घ्यावें विठोबाचें।' अशा अर्थाचा पूर्णबोध तुकारामबुवानी आपल्या बायकोस केल्याचे आपण पाहिलेच आहे

३२८८ मायबाप सवे नये धनवित्त । करावे संचित भोगावे तें ॥ १ ॥
म्हणऊनि लाभ काय तो विचारीं । नको चालीवरी चित्त ठेवूं ॥ २ ॥
आयुष्य सेवटीं सांडूनि जाणार । नव्हेचि साचार शरीर हें ॥ ३ ॥
तुका म्हणे काळें लावियेलें माप । भरा घरी पापपुण्याची हो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– संचित–प्रारब्धकर्म, विचारीं–विचार कर, सांडूनि–सोडून, टाकून साचार–खरे

अर्थ .– अखेरच्या प्रसगी आपल्या बरोबर आईबाप येणार नाहीत, धनदौलत येणार नाही. जसे आपले प्रारब्धकर्म असेल त्यानुसार होणारे भोग मात्र बरोबर राहातात १ म्हणूनच यशामध्ये कसला लाभ आहे याचा तू विचार कर व्यवहारामधील वरवरच्या चालीरीतींवर कधी लक्ष ठेवून राहू नकोस २ अखेरच्या वेळी आयुष्य तुला टाकून जाणार आहे. आणि हा देह खरा असल्याचे तू मानू नकोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, या काळाने आयुष्याचे माप लावलेले असून तो पापपुण्याचा जमाखर्च करून त्याप्रमाणे तुला वागवील ४

३२८९ मोटळें हातीं सोडिल्या गांठी । विकन्या घातले कण ।

ज्याचे भाग त्यासी देऊन वारिले । सारूनि लिगाड दान[1] ।
खरें माप हातीं घेऊनि बैसलो । मानितो ते चौघे जन[2] ।
खरें वित्त तेथें आले चोजवीत । गिन्हाइक संतजन ॥ १ ॥
झाडिला पालव केला हाट वेच । जाली सकाळींच अराणूक ।
पाल तरि तुम्ही करा लगबग । आमचे ते कोणी लोक ॥ २ ॥

---

१ दाणे, २ जणे.

एक ते उत्तम मध्यम कनिष्ठ । वित्ताचे प्रकार तीन ।
बहुतां जनाचे बहुल प्रकार । वेगळाले थाण ।
लाभ हाणि कोणा मुदल जालें । कोणासी पडिलें खाण ।
अर्धमर्ध कोणीं गुंतोनि राहिले । थोडे तैसे बहु जन ॥ ३ ॥
एके सांतें आले एके गांवीहून । येकामेचि नव्हे जाणें ।
येतां जातां रुजू नाहीं दिवाणा । काळतोंडीं एकें तेणें ।
लाग भाग एकीं एकानी गोविलें । मागील पुढिलां ऋणें ।
तुका म्हणे आतां पाहूं नये वास । साधावें आपुलें पेणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– मोटळें–मोटकुळे, गाठोडे, विकऱ्या–विक्रीसाठी, वारिले–दूर केले, सपविलें, लिगाड–लचाड, चोजवीत–शोध करीत, पालव–पदर, हाट–बाजार, वेंच–खर्च, अराणूक–विश्रांती, वित्त–भारी किमतीचा माल, थाण–प्रकार, खाण–नुकसानी, तोटा, सांतें–बाजारास, दिवाणा–स्वामीस, वास–वाट, पेणें–मुक्काम.

अर्थ :– मी या संसाराच्या बाजारात देहरूपी मोटकुळाची गाठ सोडली असून त्यातील कण आता विक्रीसाठी मांडून ठेविले आहेत पंचमहाभूताना ज्याचे त्याना वाटे देऊन मी हे लचाड संपविले आहे. मी आता खरेखुरे माप हातात घेऊन बसलो आहे हे माप चारचौघाना अथवा चार वेदाना मान्य आहे या ठिकाणी खराखुरा माल आता असल्याने त्याचा शोध घेत घेत हे साधुसंत गिऱ्हाईक म्हणून आले आहेत. १ या बाजारात मी माझ्या संचित कर्मांचा खर्च करून पदर झटकून टाकला आहे यामुळे मला सर्व प्रकारची विश्रांती मिळालेली आहे तेव्हा येथे जे कुणी येणारे आहेत त्यानी लगबग करून यावे. आमचे म्हणून जे कुणी असतील ते पावेतच २ या माझ्या बाजारात काही माल उत्तम प्रकारचा आहे, काही मध्यम प्रकारचा आहे आणि काही कनिष्ठ प्रकारचा आहे अशा तीन प्रकाराच्या मालास गिऱ्हाईकही तसेच आहे कारण या जगात लोकही वेगवेगळ्या प्रकारचे व स्वभावाचे आहेत त्यांमुळे त्यांच्यासाठी वेगवेगळे मालाचे प्रकार आहेत म्हणून या बाजारात जे कुणी सात्विक वृत्तीचे येतात त्यांना लाभ होतो. जे कुणी राजस वृत्तीचे आहेत त्याचे मुद्दल तेवढे वचावते, व जे कुणी तामसी वृत्तीचे असतात त्यांना तोटाच सहन करावा लागतो कुणी अर्धमुर्ध गुतून राहातात पण असे थोडेच लोक असून मागे सांगितल्या-प्रमाणच लोक पुष्कळ असतात ३ यातील सर्व ग्राहक लोक एकाच ठिकाणाहून या बाजारात जमा झाले आहेत. पण आपण कोठून आलो, कशासाठी आलो, हे काही ते जाणीत नाहीत आले तेव्हा व जातात तेव्हा त्यानी स्वामीची भेट घेण्याचा प्रयत्न केला नाही यामुळे काहींचे तोंड काळे झाले आहे काहींनी आपल्या लाभाच्या वाटघात इतराना गुतवून टाकले. काही आपल्या मागच्या प्रारब्धकर्मांच्या ऋणात गुंतले व काहींनी पुढील ऋणाची व्यवस्था करून ठेविली तुकाराम महाराज म्हणतात, या बाजाराच्या ठिकाणी स्वसुखाच्या लाभासाठी कुणी कुणाची वाट पाहू नये ज्याने त्याने आपले मुक्कामाचे ठिकाण गाठावे. ४

३२९० करा करा लागवाट । धरा पंढरीची वाट ।
जंव नाहीं चपेट । घात पडिला काळाचा ॥ १ ॥
दुजा ऐसा नाहीं कोणी । जो या काढी भयांतूनि ।
करा म्हणऊनि । हा विचार ठायींचा ॥ २ ॥
होती गात्रें वेंवळीं । दिवस अस्तमाना[1] काळीं ।
हातपायटाळी । जों मोकळीं आहेती ॥ ३ ॥
कां रे घेतलासो सोसें । तुज वाटताहे फंसें ।
तुका म्हणे ऐसें । पुढें के लाहासी ॥ ४ ॥

१ अस्तमानकाळीं । हातें वाहा टाळी । जों मोकळी आहे तो ॥

शब्दार्थ व टीपा – लागपाट–लगबग चपेट–तडाखा बेंबळी–क्षीण दुबल, टाळी–टाळा व जीभ सोसे–हावेने, लाहासी–मिळेल

अर्थ – लोकहो, जोपर्यंत तुम्ही काळाच्या तडाख्यात सापडला नाहीत तुमचा यामुळे घात झालेला नाही तोपर्यंतच लगबग करून तुम्ही पंढरीची वाट धरा १ काळाच्या या भयातून तुम्हाला काढील असा या विठ्ठलावाचून दुसरा कुणी नाही म्हणून तुम्ही याविषयी नीट विचार करा २ तुमच्या आयुष्याच्या सूर्याचा अस्त जोपर्यंत झालेला नाही आणि जोपर्यंत तुमची सर्व इंद्रिये शिथिल झाली नाहीत तोपर्यंत हातपाय चांगले असल्याने त्यांचा उपयोग करा आपल्या जिभेचाही नीट उपयोग करा तुम्ही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू मोठ्या हौसेने संसाराची हाव का धरलीस ? तुला आता कसे वाटत आहे ? या जन्मासारखा लाभ पुढे कधी तरी मिळेल का ? ४

३२९१ यत्न आता तुम्ही करा । मज दातारा सत्तेने ॥ १ ॥
विश्वास तो पायावरि । ठेवुनि हरी राहिलो ॥ २ ॥
जाणतचि दुजें नाहीं । आणीक काहीं प्रकार ॥ ३ ॥
तुका म्हणे शरण आलो । नेणें बोलो विनविता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुजें–दुसरे

अर्थ – दातारा माझे रक्षण करण्याविषयी तुम्हीच तुमच्या सत्तेने आता प्रयत्न करा १ श्रीहरी, मी तुमच्या पायावर विश्वास ठेवून राहिलो आहे २ याशिवाय मी इतर कुठलाही दुसरा प्रकार जाणीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुला विनवावे कसे हे मी जाणीत नसल्याने मी फक्त शरण आलो आहे ४

३२९२ अनाथा जीवन । आम्हा तुमचे चरण ।
करूनि साटवण । धरीयेले हृदयीं ॥ १ ॥
पुष्ट जाली अंगकांति । आनंद न समाये चित्तीं ।
कवतुके प्रीती । गाऊ नाचो उल्हासे ॥ २ ॥
करुणाउत्तरीं । करू आळवण हरी ।
जाऊ नेदू दुरी । प्रेमप्रीतिपडिभरें ॥ ३ ॥
मोहो माते[1] करी गोवा । ऐसें आहे जी केशवा ।
तुका म्हणे सेवा । आणीक नाहीं जाणत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साटवण–साठवण, साठा, न समाये–मावत नाही, पडिभरें–आधिक्याने आवडीने, गोवा–गुंतवणूक

अर्थ – श्रीहरी आम्हा अनाथांना तुमचे पाय हेच जीवन आहे म्हणून त्यांचेच साठवण करून आम्ही आमच्या हृदयात धारण केले आहे १ त्यामुळे आमची अंगकांती चांगली पुष्ट व तजेल झाली आहे आनंद आमच्या चित्तात मावत नाही आता याच कौतुकाने प्रीतीने व उल्हासाने आम्ही गाऊ, नाचू २ श्रीहरी, करुणेच्या वाणीने आम्ही तुझी विनवणी करू, आणि प्रेमरसाच्या आवडीने आम्ही तुम्हाला दूर जाऊ देणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, केशवा मला कधी कधी मोह गुंतवून ठेवतो तरी मी तुमच्या सेवेशिवाय दुसरे काही जाणीत नाही अथवा मी मोहममतेने तुम्हाला गुंतवून ठेवीन या सेवेशिवाय मी दुसरे काहीच जाणीत नाही ४

[1] ममत

३२९३ सुखाची वसति जाली माझे जीवीं । तुमच्या गोसावी कृपादानें ॥ १ ॥
रूप वेळोवेळां आठवीं अंतरीं । बैसोनि जिव्हारीं राहिलें तें ॥ २ ॥
विसांवलें मन विठ्ठलें प्रपंचा । गोडावली वाचा येणें रसें ॥ ३ ॥
तुका म्हणे कांहीं नाठवेसें केलें[1] । दुसरें विठ्ठलें मज आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विसांवले–स्थिर झाले, नाठवेसें–आठवत नाहीसे

अर्थ– : गोसावी, तुमच्या कृपेच्या दानामुळे माझ्या जीवाच्या ठिकाणी सुखाची वसती झालेली आहे. १ माझ्या अंत:करणात जे रूप स्थिर झाले आहे त्याचीच आठवण मला पुन: पुन: होत आहे २ प्रपंचावरून निघालेले माझे मन विठ्ठलाच्या ठिकाणी स्थिरावले, म्हणून या हरिनामाच्या रसाने माझी वाणी गोड होऊन गेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठले, आता मला तुझ्याशिवाय दुसरे काही आठवेनासे झाले आहे ४

विवरण.– एकदा विठ्ठलाची भेट झाली, त्याच्या कृपेने सर्व सुखाचा लाभ झाला की दुसरे काही आठवेनासे होते, दुसरे काही सुचेनासे होते भक्तिरसाच्या गोडीने एकदा जीभ लालचावली की तिला दुसऱ्या कशातच गोडी वाटत नाही. ज्या रूपाचे ध्यान वारंवार केले जाते तेच रूप चित्तात साकार होते. त्या रूपावरच मन गुंतून राहाते. ऐक्यभावाच्या या अनुभूतीचे व तीमधील गोडव्याचे वर्णन करता येण्यासारखे नसले तरी अनेक ठिकाणी संतांनी त्याच्या काही हृद्य छटा प्रकट केल्या आहेत अशा प्रकारच्या मीलनाचे सौख्य अवर्णनीय असते. या प्रकारच्या दिव्य सुखाची वसती एकदा जीवात जडली की मग दुसरीकडचे भान कधीच राहात नाही. हे सुख अविनाशी आहे. हे कधी सरत नाही, विटत नाही कोमेजून जात नाही 'सुख एक आहे हरि आठवितां । इतर जपतां दुःख बहु । सुखरूप धन्य जाणावा संसारीं । सदा वाचें हरी उच्चारी जो ' अशा शब्दांनी या सुखाचे वर्णन केले आहे. ज्ञानेश्वरांनी तर याम 'सर्व सुखाचें आगर बाप रखुमादेवीवर ' म्हणून याचा गौरव केला आहे हा विठ्ठल म्हणजे 'सुखाचा निधी सुखसागर जोडला ' असे त्यांनीच म्हटले आहे 'सुख अनुपम संतांचे चरणीं ' म्हणून चोखोबांनी सुखाची दिशा दाखविलेली आहे 'सुखाचा सुखरामो पंढरीसी आहे । जावोनिया पाहे अरे जना ' म्हणून त्यांनी सुखाचे स्थान दर्शविले आहे. ' सुख पंढरीसी आले । पुंडलिकें साठविलें,' 'सुख या सतसमागमें । नित्य दुणावें तुझिया नामें ' 'सुखरूप ऐसा दुजा कोण सांगा । माझ्या पांडुरंगासारिखा तो ? ' इत्यादी ओळीतून तुकोबांनी या सुखाचा ठावाठिकाणा सांगितलेला आहे. ' सुखसुखा भेटे । मग तोडिल्या न तुटे ' अशी त्या सुखाची जात तुकोबांनी वर्णन केली आहे, ' सुखाचे ओतिले । दिसे श्रीमुख चांगलें '

अशा प्रकारच्या सुखाचा लाभ झाल्यानंतर दुसऱ्या कोणत्याच गोष्टीचे भान राहात नाही. हे 'रूप पाहतां लोचन सुखावले ' अशी अवस्था होऊन जाते 'तुका म्हणे माझें हेंचि सर्वसुख । पाहीन श्रीमुख आवडीनें॥ ' हीच भक्ताच्या मनाची एकमेव इच्छा राहाते

३२९४ आम्हां कांहीं आम्हां कांहीं । आतां नाहीं या बोलें ॥ १ ॥
मोल सांगा मोल सांगा । घेणें तिहीं या पुसावें ॥ २ ॥
कैसें घडे कैसें घडे । बडबड तुज मज ॥ ३ ॥
मुदलें साटी मुदलें साटी । लाभ पोटीं त्याच मधीं ॥ ४ ॥
तुका म्हणे सादवूं घरीं । आडल्या काळें पुसती तरी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– तिहीं–त्यांनीच, पुसावें–विचारावे.

अर्थ :– आम्हांला काही तरी परमार्थ घडू द्या असे लोक वारंवार बोलतात पण असे नुसते बोलण्याने सर्व काही मिळते असे नाही १ उगाच विमर मांगा, विमर सांगा, असे का म्हणावे ? ज्यांना मनापासून याविषयी

१ जालें

आस्था आहे, घ्यावयाचे आहे त्यानीच विचारावे २ व्यर्थ तुझे माझे अशी बडबड करून काय मिळणार ? ३ एकवा मुद्दलच जपून ठेविले की त्यापासूनच फार लाभ होत असतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे श्रीहरीकृपेचे मुद्दल आपल्या घरी साठवून ठेवू म्हणजे कुणी आडले की त्यावेळेस ते मला यासबधी विचारतील ५

३२९५ घ्या रे भाई घ्या रे भाई । कोणी कांहीं थोडें बहु ॥ १ ॥
येच हाटीं येच हाटीं । बांधा गाठी पारखून ॥ २ ॥
वेच आहे वेच आहे । सरले पाहे मग खोटें ॥ ३ ॥
उघडें दुकान उघडें दुकान । रात्री जाली कोण सोडी मग ॥ ४ ॥
तुका म्हणे अंतकाळीं । जाती टाळीं बैसोनि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – हाटीं–बाजारात, वेच–खर्च, टाळी–मुख, जीभ

अर्थः– अहो भाइहो, कुणी तरी हा परमार्थविचार थोडा बहुत तरी घ्या ना. १ याच जन्माच्या बाजारात नीट पारखून हा माल विकत घ्या २ तुमच्या जवळच्या पैशास सतत खर्च आहेच तो एकदा सपून गेला की मग खोटे पडाल हे पहा ना. ३ म्हणून तुमच्या जवळ पैसा आहे आणि माझ्या वाणीचे हे दुकान उघडे आहे तोपर्यंत विचार करा कारण, एकदा आयुष्याची सध्याकाळ येऊन रात्र झाली की मग दुकान बद झाल्यावर तुम्हाला कोण सोडणार आत ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, आयुष्याच्या अखेरच्या वेळी तुमचे मुख बद होईल, तोड गप्प होईल ५

३२९६ मार्ग चुकले विदेशीं एकले । तयावरि जाले दिशाभुली ॥ १ ॥
हातीं धरूनियां पावविले घरा । त्याच्या उपकारा काय द्यावे ॥ २ ॥
तैसा मी कुडकुडा होतों केशीराजा । सेवा न घडे लाजा म्हणऊनि ॥ ३ ॥
सांडियेला गर्भ उबगोनि माउली । नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध ॥ ४ ॥
उष्ण तान भूक एवढिये अकांतीं । वोसंगा लाविती काय म्हणिजे ॥ ५ ॥
खांद्यावरी शूळ मरणाचे वाटे । अन्याय हि मोटे साच केले ॥ ६ ॥
हातींचें हिरोनि घातला पाठीसी । तुका म्हणे ऐसी परी जाली ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– कुडकुडा–सकोचित, उबगोनि–कटाळून, त्रासून, वोसगा–माडीवर, परी–प्रकार

अर्थ :– कुणी परदेशात पडल्यामुळे मार्ग चुकले, आणि त्यात ते एकटे पडल्यामुळे त्याची दिशाभूल झाली १ अशा वेळी त्याच्या हातास धरून जे कुणी त्याना घरी आणून पोचते करतात, त्याच्या उपकारासाठी त्याना काय द्यावे ? २ केशीराजा, त्याचप्रमाणे मी वृत्तीने सकोचित झालो आहे रे माझ्या हातून तुमची सेवा घडत नाही म्हणून मनात लज्जा निर्माण झाली आहे ३ पोटातील गर्भ आईने काहीसा कटाळूनच टाकून दिला. त्या स्थानाची भूमी शुद्ध आहे की नाही हेही तिने पाहिले नाही ४ अशा प्रसगी तो ऊन व तहानभूक यानी व्याकुळ झालेला असताना त्याला माडीवर काय म्हणून घेतले जाते ? ५ त्याने जे मोठे मोठे व खरेखुरे अन्याय केलेले असतात त्याच्यामुळे त्यास खाद्यावर शूळ घेऊनच मरणाच्या वाटेस जावे लागते ६ तुकाराम महाराज म्हणतात, पण अशाही माणसास काळाच्या हातून हिरावून घेऊन पाठीशी घालण्याचा प्रकार येथे घडला आहे. ७

३२९७ जैसी तैसी तरि वाणी । मना आणी माउली ॥ १ ॥
लेकरांच्या स्नेहें गोड । करी कोड त्या गुणे ॥ २ ॥
मागें पुढें रिघे पोटीं । साहे खेटी करीते ॥ ३ ॥
तुका विनवी पांडुरंगा । ऐसे पै गा आहे हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड–कौतुक, खेटी–खपा

अर्थ – लहान बालक आपल्या बोबडच्या वाणीने कसेतरी वेडेवाकडे शब्द करीत असते पण त्याच स्वरूपात त्याची आई त्याला आपल्या मनात धारण करीत असते १ कारण तिला आपल्या मुलाचा स्नेह फार गोड वाटत असल्याने ती त्याचे कोडकौतुक करीत असते २ ती आई आपल्या मुलाच्या मागेपुढे खेपा करून कष्ट करीत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, अशा प्रकारची ही स्थिती असल्याने मी तुम्हास विनंती करीत आहे ४

३२९८ गुणाची आवडी वाचेचा पसरु । पडिला विसरु इतराचा[१] ॥ १ ॥
आदिमध्यअंतीं नाहीं अवसान । जीवनीं जीवन मिळोनि गेले ॥ २ ॥
रामकृष्णनाममाळा हे साजिरी । ओविली गोजिरी कंठाजोगी ॥ ३ ॥
तुका म्हणे तनु जालीसे शीतळ । अवघी सकळ ब्रह्मानंदें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–प्रेम, अवसान–वेळ, अंतर, तनु–शरीर.

अर्थ – श्रीहरीच्या गुणाचे प्रेम माझ्या चित्तात असल्यामुळे तोच माझ्या वाणीचा विस्तार झालेला आहे यामुळे इतर विषयाचा मला विसर पडून गेला आहे १ यामध्ये प्रारंभापासून अखेरपर्यंत कुठेही खंड नाही भगवताच्या जीवनात माझे जीवन मिसळून गेले आहे २ रामकृष्ण या नामाची एक चांगली सुशोभित माळ मी श्रीहरीच्या कंठात शोभेल अशी गुंफलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे माझे संपूर्ण शरीर या ब्रह्मानंदाच्या प्राप्तीमुळे शीतळ बनून गेले आहे ४

३२९९ देवाची भांडारी । आदा विनियोग करी ॥ १ ॥
आता न माखे हातपाय । नेणो होतें ऐसें काय ॥ २ ॥
देवें नेली चिंता । जाला सकळ करिता ॥ ३ ॥
तुका म्हणे धणी । त्यासी अवघी पुरवणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आदा–प्राप्ती, जमा, धणी–मालक

अर्थ – मी या देवाचा भांडारप्रमुख त्याच्या प्राप्तीचा विनियोग नीटपणाने करीत आहे १ आता माझे हातपाय कशानेही माखलेले जात नाहीत काय होत आहे हेही समजत नाही २ देवाने माझी सर्व चिंता दूर केली आहे कारण आता तोच सर्व कर्ता झाला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तो मालक असल्याने त्याला सर्व काही पुरवावेच लागते ४

३३०० पेणावलें[२] ढोर माथ खाय पाठी । बैसले ते नुठी तेथूनिया ॥ १ ॥
तैसी माझ्या मना परी जाली देवा । धांवे अहंमाया साडावलों ॥ २ ॥
कडा घालीं उडी मागिलाच्या भेणें । मरणामरण[३] न कळेचि ॥ ३ ॥
तुका म्हणे जालो त्यापरी दुःखित । असें बोलावीत पांडुरंगा ॥ ४

शब्दार्थ व टीपा – पेणावले–मुक्कामाचा विश्राता घेण्याच्या बेतात असलेले उठवणीस आलेले, नुठी–न उठी उठत नाही, परी–प्रकार, भेणें–भीतीने

अर्थ – मुक्कामाची विश्रांती घेण्याच्या बेतात असलेले, थकलेले ढोर पाठीवरचा सर्व भाराने मुकाटपणे सहन करते पण त्या जागेवरच बसल्यानंतर काही उठत नाही १ देवा, तसाच प्रकार माझ्या मनाचा बनला आहे,

१ सर्वरसा, २ येणावल, ३ पडण मरण

म्हणून तू लौकर धावत ये. मी माझा सर्व अहंकारभाव सोडून दिलेला आहे २ मागे येणाराच्या भीतीने घाबरून मोठमोठ्या कड्यांवरूनही उडी घातली जाते. तेथे आपण पडून मरून जाऊ हेही अशा वेळी ध्यनात येत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, मी त्याप्रमाणे दु:खित झालो आहे म्हणून मी तुला बोलावीत आहे ४

विवरण:– ईश्वराच्या भेटीसाठी आपले मन किती हट्टी व आग्रही बनले आहे हे समजावून देण्यासाठी तुकारामबुवानी येथे स्वत:च्या व्यापारी जीवनातील एक समर्पक दृष्टान्त दिलेला आहे कोकणातून देशावर येताना वा देशावरून कोकणात जाताना व्यापारी लोकाचा जेथे मुक्काम होई ते पेण गाव प्रसिद्ध आहे. ' पेण लाणे ' म्हणजे मुक्काम घेणे अशा अर्थाचा शब्द तयार झाला. ओझे वाहणारे जनावर पेणावते; म्हणजे मुक्कामाची इच्छा करते, पण मालक त्याला वसू देत नाही, त्याला पुढचा मार्ग आक्रमण करायचा असतो यासाठी तो त्याच्या पाठीवर कोरडे ओढतो पण ते ढोर असे हट्टी असते की सडकून मार खाते, पण जाग्यावरून मान उठत नाही. त्याप्रमाणे आपली मोठी दयनीय व करुणापूर्ण अवस्था झाली असल्याचे तुकोबा येथे सागतात

३३०१ जालिया दर्शन करीन मी सेवा । आणीक[1] ही देवा न लगे दुजें ।। १ ।।

प्रारब्धा अधीन[2] अन्न आच्छादन । स्थिर करोनि मन ठेवीं पायीं ।। २ ।।
ये गा ये गा ये गा कृपाळुवा हरी । निववीं अभ्यंतरी देउनि भेटी ।। ३ ।।
आसावलें मन जीवनाचे ओढी । नामरूपें गोडी लावियेली ।। ४ ।।
काय तुम्हांपाशीं नाहीं भांडवल । माझे मिथ्या बोल जाती ऐसे ।। ५ ।।
काय लोखंडाचे पाहे गुण दोष । सिवोनि परिस सोनें करी ।। ६ ।।
तुका म्हणे माझें अवघें असों द्यावें । आपुलें करावें ब्रीद साच ।। ७ ।।

शब्दार्थ व टीपा:– दुजें–दुसरे, आसावले–इच्छा करू लागले, साच–खरे

अर्थ:– देवा, तुमचे दर्शन झाल्यानंतर मी तुमची सेवाच करीन. याखेरीज मला दुसरे काहीसुद्धा नको. १ अन्न व वस्त्र या गोष्टी प्रारब्धाच्या स्वाधीन असतात म्हणून या चिंतेतून मुक्त करून माझे मन तू आपल्या पायी स्थिर करून ठेव २ कृपाळू श्रीहरी, तू ये ना मला भेट देऊन माझे अंत:करण शात कर. ३ मला तुमच्या नामरूपाची गोडी लागली असल्यामुळे माझे मन याच जीवनाच्या ओढीची इच्छा करीत आहे ४ देवा, तुमच्यापाशी काय भांडवल नाही? मग मी जे बोलतो ते व्यर्थ जाईल असे का तुम्ही करता? ५ परीस कधी लोखंडाचे गुणदोष पाहातो काय? तो त्याला स्पर्श करून त्याचे एकदम सोनेच करून टाकतो ६ तुकाराम महाराज म्हणतात, माझे जे काही गुणदोष असतील ते सर्व असू द्यात पण तुम्ही आपले अनाथनाथ अथवा पतितपावन हे ब्रीद खरे करून दाखवा ना ७

३३०२ येथे आड कांहीं न साहे आणीक । प्रमाण तें एक हेंचि जाले ।। १ ।।
गाऊं नाचों टाळी वाऊं गीत छंदे । डोलवूं विनोदे अंग तेणें ।। २ ।।
मथुनियां सार काढिले बाहेरी । उपाधि ते येरी निवडिली ।। ३ ।।
तुका म्हणे जगा लाविली शिराणी । सेवितां हे धणी होत नाहीं ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा:– वाऊं–वाजवू, येरी–इतर, उरलेली, शिराणी–आवड, धणी–तृप्ती.

अर्थ:– या ठिकाणी आता मला दुसरा कसलाही प्रतिबंध होत नाही. पुढीलप्रमाणे करण्याचा माझा एक निश्चयच झालेला आहे. १ या देवाचे नाव गाऊ, त्याच्या प्रेमात नाचू, टाळी वाजवू, आणि त्याच्याच प्रीतीचे गीत

१ काही, २ अगी.

म्हणून त्याच्याच संगतीत कौतुकाने अंग डोलवू २ सर्वांचे मथन करून मी हेच सार बाहेर काढले आहे; आणि इतर उपाधी निवडून दूर केलेली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच नामसंकीर्तनाची आवड आम्ही जगाला लावली आहे त्याचे कितीही जरी सेवन केले तरी तृप्ती होत नाही ४

३३०३ शरणागत जालो । तेणे मीपणा मुकलो ॥ १ ॥
आतां दिल्याचीच वाट । पाहीं नाहीं खटपट ॥ २ ॥
नलगे उचित । काहीं पाहावे संचित ॥ ३ ॥
तुका म्हणे सेवा । मानें[1] तैसी करू देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नलगे–लागत नाही. संचित–प्रारब्धकर्म.

अर्थ – देवा, मी तुला शरण आलेलो आहे यामुळे मी माझ्या मीपणास मुकून गेलो आहे १ आता तुम्ही मला जे वचन दिले आहे त्याची मी वाट पाहात आहे याशिवाय दुसरी कोणतीच खटपट मी करणार नाही २ यावेळी तुम्हास माझे उचित, अनुचित कर्म पाहावे लागणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्ही मनास येईल त्याप्रमाणे तुमची सेवा करू अथवा देवास मान्य होईल अशी सेवा आम्ही करू ४

३३०४ वाचेचिया आळा कवळिले ब्रह्म । चुकविला श्रम पृथक तो ॥ १ ॥
सुलभ जाले सुलभ जाले । जवळी आले पंढरिये ॥ २ ॥
नामरूपाचे बांधले मोटळे । एक एका वेळे सारियेले ॥ ३ ॥
तुका म्हणे वाटे चुकली[2] वसती । उद्धार[3] तो हाती आणियेला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आळा–आळ्याने, गवताचा भारा बांधण्यासाठी केलेली गवताची दोरी, पृथक–निरनिराळे, वेगळे, मोटळ–गाठोडे

अर्थ – मी वाणीच्या आळ्याने श्रीहरीचे ब्रह्मरूप कवळून ठेविले आहे त्यामुळे निरनिराळ्या प्रकारची खटपट करण्याचे सपले आहे १ पंढरीचा हा श्रीहरी अगदी जवळ आल्यामुळे त्याची सेवा करणे फारच सुलभ झाले आहे २ एकाच वेळेस मी श्रीहरीच्या नामरूपाचे गाठोडे बांधून इतर सर्वांचा निकाल लावला आहे, इतरांना बाजूला सारले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या वाटेने पुन जन्म घेण्याची वाट चुकली कारण या हरीच्या कृपेने स्वत चा उद्धार हाताशी आला आहे अथवा हा श्रीहरी जो उद्धार, दूर होता तो प्रत्यक्ष हातात आणलेला आहे ४

३३०५ सवंग जाले सवंग जाले । घरा आले बंदरींचे ॥ १ ॥
आता हेवा करा सोस । भक्तिरस बहु गोड ॥ २ ॥
पाउल वेचे चिंता नाहीं । आड काहीं मग नये ॥ ३ ॥
तुका म्हणे संचिताचे । नेणे काचे राहो ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सवंग–स्वस्त, हेवा–हाव, वेचे–पडले, काचे–कच्चे

अर्थ – श्रीकृष्ण परमात्म्याचे हे रूप फार स्वस्त झाले आहे जे द्वारकेला होते ते आज त्या बंदराहून आमच्या घरी आले आहे १ आता त्याचीच हाव मोठ्या हौसेने धरा कारण हा भक्तिरस फारच गोड आहे, २ या भक्तिमार्गाकडे एकदा पाऊल पडले की मग कसलीच चिंता उरत नाही याच्या आड कसलेच विघ्नही येत नाही ३

१ मौन्य, २ चुकविली, ३ उधार

शब्दार्थ व टीपा.– पारतियाचा–परकीयाचा.

अर्थः– मी ज्याच्या पाठीशी लागेन त्याला संसारापासून दूर ओढून काढीन. १ देवा, आणि असे करून मी पुनः तुमच्या पायांशी येऊन दडेन आणि पुनः छू कराल, आज्ञा कराल तेव्हां धावून जाईन २ कुणा परक्याचा वास जरी आला तरी खडबडून मी उठून त्याच्या मागे लागेन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा मी सर्व लोकांना धाक लाविला आहे की, कुणाला प्रपंचाचे साररूपी ताकही खाऊ देणार नाही. ४

३३०८ सांखळिलों प्रीती गळां । मुंके वेळा जाणोनियां ॥ १ ॥
तुमचें मी केशीराजा । सुनें या काजा पाळिलों[1] ॥ २ ॥
आलें गेलें कळे वाटा । कोण निटा वाकडिया ॥ ३ ॥
तुका म्हणे आलें वारी । दुरितें दुरी नातळतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– सांखळिलों–साखळीने बांधला गेलो सुनें–कुत्रे, काजा–कामासाठी, निटा–नीट, वाकड्या दुरिते–संकट, नातळतां–स्पर्श न होताच

अर्थ :– श्रीहरीच्या प्रीतीच्या साखळीने मी बांधला गेलो आहे आणि समय ओळखून मी भुंकत असतो. १ केशीराजा, याच कामासाठी मी तुमचे पाळलेले कुत्रे आहे. २ कोण कोणत्या वाटेने येते, कोणत्या वाटेने जाते, कुणाच्या वाटा नीट आहेत, कुणाच्या वाकड्या आहेत हे सर्व मला समजते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आणि जर एखादे संकट आले तर ते अंगाशी येऊन भिडत आहे तोच, स्पर्श न होताच मी त्याचे निवारण करतो. ४

३३०९ सुनियांचा हाचि भाव । आपला ठाव राखावा ॥ १ ॥
दुजियाचा येऊं वारा । नेदूं घरावरी येऊं[2] ॥ २ ॥
केली याची फाडाफाडी । तडामोडी क्षेत्राची ॥ ३ ॥
पातेजत नाहीं लोकां । तुका देवावांचूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– सुनियांचा–कुत्र्याचा, ठाव–स्थान, दुजियाचा–दुसऱ्याचा, दुसरेपणाचा, नेदूं–येऊ देणार नाही, क्षेत्राची–देहाची पातेजत–विश्वास ठेवीत.

अर्थः– आपले स्थान आपण राखावे हाच खरा कुत्र्याचा भाव असतो. १ स्वतःच्या घरावर तो कधी दुसऱ्याचा वारा आणू देत नाही २ कुणी दुर्जनपणाची वृत्ती दाखवू लागला तर मी हा कुत्रा त्याच्या देहाची फाडाफाड आणि लचकेतोड करतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या देवावाचून आणखी कुणाचाच विश्वास धरीत नाही ४

३३१० सुनियांची आवडी देवा । घेत सेवा नाहीं कांहीं ॥ १ ॥
सिकविलें जवळी वैसों । जेथें असों तेथेंचि ॥ २ ॥
नेदी दुजे बोलों करूं । गुरुगुरु न साहे ॥ ३ ॥
तुका म्हणे कुर्वाळितां । अंग सत्ता संगाची[3] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सुनियांची–कुत्र्याची, आवडी–प्रेम, नेदी–देत नाही, दुजे–दुसरे.

अर्थ – देवा, या कुत्र्याची आवड अशी आहे की, तुम्ही काही तरी सेवा याच्याकडून घेत जावी. १ हे शिकवल्याप्रमाणे त्याच्या जवळच बसते जेथे आहे त्याच ठिकाणी स्थिरावते. २ श्रीहरीच्या नामाशिवाय हे दुसरे

१ पाळिले, २ देऊ, ३ सत्तांची

तुकाराम महाराज म्हणतात, या मार्गास अनुसरल्यानंतर मग संचित कर्म कच्चे राहात नाही अथवा मग संचित कर्माचा काच उरत नाही. ४

३३०६ तुम्ही संत मायबाप कृपावंत । काय मी पतित कीर्ती वाणूं ॥ १ ॥
अवतार तुम्हां धराया कारण । उद्धरावे जन जड जीव ॥ २ ॥
वाढविलें सुख भक्ति भाव धर्म । कुळाचार नाम विठोबाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे गुण चंदनाचे अंगीं । तैसे तुम्ही जगीं संतजन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:- वाणूं-वर्णन करू.

अर्थ – अहो संतलोकहो, तुम्ही कृपावंत असे माझे मायबाप आहात मी पतित असून तुमची कीर्ती किती वर्णन करावी ? १ जड जीवांचा उद्धार करण्यासाठीच तुम्ही अवतार धारण केलेला आहे २ या जगात तुम्ही भक्ती, भाव, धर्म याचे सुख वाढविले असून या विठोबाच्या नामाचा कुळाचारही तुम्हीच चालविला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, इतर वृक्षाना सुगंधित करण्याचा गुण जसा चंदनाच्या अंगी असतो त्याप्रमाणे तुमच्यामुळे सर्वसामान्य लोकांचाही उद्धार होऊ शकतो. ४

विवरण.– तुकाराम महाराजांनी या अभंगात मायबाप संताचे गुणगान केले आहे जड जीवाच्या उद्धारासाठी अवतार धारण करणारे हे साधुसंतच भक्तीचा मार्ग वाढवितात, विठोबाचा कुळाचारही तेच चालवितात. याच्यामुळेच इतराना भावभक्तीचा सुगंध प्राप्त होतो. प्रत्यक्ष ईश्वरालाही संतभेटीने सुख वाटते. मग सर्वसामान्याचे जीवन उजळून निघेल यात काय संशय ? हे संत म्हणजे ईश्वराचे अवतारच असून जगाचा उद्धार करणे हे त्याचे महत्कार्य असते, असा विश्वास सर्वच साधुसंतानी व्यक्त केला आहे. ' ब्रह्ममूर्ती संत जगीं अवतरले । उद्धराया आले दीन जना ' असे नामदेवानी म्हटले आहे. या संताचा महिमा कोण वर्णन करणार ? त्यानीच एका अभगात म्हटले आहे, ' संताचा महिमा कोण जाणे सीमा । सीणला हा ब्रह्मा बोलवेना । संताची हे कळा पहाला न कळे । खेळोनिया खेळ वेगळेची ' नामदेवाना हे साधुसंत कसे वाटतात ? तर ' माझे मायबाप साधुसंतजन । माझे जीवप्राण अंतरीचे ' संत हेच खरेखुरे कृपावंत असे मायबाप असल्यामुळे ' संताच्या चरणा द्यावे आलिंगन । जीवे निंबलोण उतरावे ' अशी त्याच्या मनाची एकमेव आस आहे. या हरिदासाना अथवा संताना ' आकल्प आयुष्य व्हावे ' म्हणून नामदेवाची नेहमी परमेश्वरास प्रार्थना असते कित्येक प्रसंगी साधुसंतानी संताना देवापेक्षाही श्रेष्ठत्व दिलेले दिसून येते. ' संत आधी देव मग । हाचि उमग आणा मना ' असे एकनाथानी म्हटले आहे. ' संतापोटीं देव वसे । देवापोटीं संत वसे ।' असे उभयताचे नाते त्यानी वर्णन केले आहे. या संताचे दर्शन झाले की भाग्याचा उदय झाल्यासारखे त्याना वाटते. तुकारामबुवानी तर वारवार जागृती देणाऱ्या या संताचे माहात्म्य अनेक प्रकारानी गाइले आहे. ते दारात आले की त्याना दसरा, दिवाळी आल्याप्रमाणे आनंद होतो. ' भाग्याचा उदय । ते हे जोडी संतपाय ' असा त्याचा विश्वास आहे त्याना आपले सगेसोयरे संतजनच वाटतात हेच साधुजन त्याना कृपेचे सागर वाटतात. याच्याच भेटीची आर्तता त्याच्या मनास नेहमीच असते या संताचा महिमा केवढा असतो ? तुकोबानी म्हटले आहे, ' संतचरण लागता सहज । वासनेचे बीज जळोन जाय ।' म्हणूनच तुकोबा संतपदाचे दासानुदास बनतात. त्याच्या उष्टया पत्रावळी गोळा करून आपल्या मनाची तृप्ती करून घेतात. ' धन्य आजि दिन । जाले संताचे दर्शन । ' अथवा ' धन्य आजि दिन संत दरुशनाचा । अनंत जन्माचा शीण गेला ' अशासारख्या ओळीतून संतदर्शनामुळे मनाची होणारी तृप्तताही तुकोबानी अनेकदा वर्णन केली आहे

३३०७ पाठी लागे तया दवडीं दुरी । घालीं या बाहेरी संवसारा ॥ १ ॥
येउनि दडें तुमच्या पायीं । धांवे तई छी म्हणा ॥ २ ॥
पारखियाचा वास पडे । खडबडे उठी तें ॥ ३ ॥
तुका म्हणे लाविला धाक । नेदी ताक खाऊं कोणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पारतियाचा-परक्याचा.

अर्थ – मी ज्याच्या पाठीशी लागेन त्याला संसारापासून दूर ओढून काढीन १ देवा, आणि असे करून मी पुन्हा तुमच्या पायाशी येऊन दडेन आणि पुन्हा छू कराल, आज्ञा कराल तेव्हा धावून जाईन २ कुणा परक्याचा वास जरी आला तरी खडबडून मी उठून त्याच्या मागे लागेन ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा मी सर्व लोकांना धाक लाविला आहे की, कुणाला प्रपंचाचे सारस्पी ताकही चाऊ देणार नाही ४

३३०८ साखळिलो प्रीती गळां । भुंके वेळा जाणोनियां ॥ १ ॥
तुमचे मी केशीराजा । सुने या काजा पाळिलो[1] ॥ २ ॥
आले गेले कळे वाटा । कोण निटा वाकडिया ॥ ३ ॥
तुका म्हणे आले वारी । दुरिते दुरी नातळतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साखळिलों-साखळीने बांधला गेलो सुनें-कुत्रे, काजा-कामासाठी, निटा-नीट, वाकड्या दुरितें-संकट, नातळता-स्पर्श न होताच

अर्थ – श्रीहरीच्या प्रीतीच्या साखळीने मी बांधला गेलो आहे आणि समय ओळखून मी भुंकत असतो १ केशीराजा, याच कामासाठी मी तुमचे पाळलेले कुत्रे आहे. २ कोण कोणत्या वाटेने येते, कोणत्या वाटेने जाते, कुणाच्या वाटा नीट आहेत, कुणाच्या वाकड्या आहेत हे सर्व मला समजते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आणि जर एखादे संकट आले तर ते अंगाशी येऊन भिडत आहे तोच स्पर्श न होताच मी त्याचे निवारण करतो ४

३३०९ सुनियांचा हाचि भाव । आपला ठाव राखावा ॥ १ ॥
दुजियाचा येऊं वारा । नेदूं घरावरी येऊं[2] ॥ २ ॥
केली याची फाडाफाडी । तडामोडी क्षेत्राची ॥ ३ ॥
पातेजत नाहीं लोकां । तुका देवावाचूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सुनियांचा-कुत्र्याचा, ठाव-स्थान, दुजियाचा-दुसऱ्याचा दुसऱ्याणाचा नेदूं-येऊ देणार नाही, क्षेत्राची-देहाची पातेजत-विश्वास ठेवीत

अर्थ – आपले स्थान आपण राखावे हाच खरा कुत्र्याचा भाव असतो १ स्वतःच्या घरावर तो कधी दुसऱ्याचा वारा आणू देत नाही २ कुणी दुर्जनपणाची वृत्ती दाखवू लागला तर मी हा कुत्रा त्याच्या देहाची फाडफाड आणि लचकेतोड करतो ३ तुकाराम महाराज म्हणतात मी या देवावाचून आणखी कुणाचाच विश्वास धरीत नाही ४

३३१० सुनियाची आवडी देवा । घेत सेवा नाहीं काहीं ॥ १ ॥
सिकविले जवळी बैसो । जेथें असो तेथेंचि ॥ २ ॥
नेदी दुजें बोलों करू । गुरुगुरु न साहे ॥ ३ ॥
तुका म्हणे कुर्वाळिता । अंग सत्ता सगाची[3] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सुनियाची-कुत्र्याची आवडी-प्रेम नेदी-देत नाही, दुजें-दुसरे

अर्थ – देवा या कुत्र्याची आवड अशी आहे की, तुम्ही काही तरी सेवा याच्याकडून घेत जावी १ हे शिकवल्याप्रमाणे त्याच्या जवळच बसते जेथे आहे त्याच ठिकाणी स्थिरावते २ श्रीहरीच्या नामाशिवाय हे दुसरे

१ पाळिलें, २ देऊं, ३ सत्ताची

काहीच बोलू देत नाही. आणि अभिमानाने गुरगुर करावी तर तीही त्याला सहन होत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीने माझे अंग प्रेमाने कुरवाळिले असल्याने त्याच्या अंगसंगतीने राहाण्याची सत्ता मला प्राप्त झाली आहे ४

३३११ सिळें खातां आला वीट । सुनें धोट पाय धरी ॥ १ ॥
काऱ्होबा ते जाणे खूण । उन उन घास घाली ॥ २ ॥
आपुलिये ठायींचें घ्यावें । लाड भावें पाळावा ॥ ३ ॥
तुका म्हणे मी जुनाट । मोहो आट परतला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सुनें-कुत्रे, मोहो-मोह, आट-हट्ट, नाम.

अर्थ – या धन्याच्या घरी शिळे खाना खाता मला फारच वीट आला म्हणून या कुत्र्याने मालकाचे पाय धरले आहेत १ कुत्र्याच्या प्रेमाची ही खूण कान्होबाने जाणली आणि त्याच्या मुखात कौतुकाने ऊन ऊन घास घातले. २ आपल्या ठिकाणचे प्रेम तो देत असतो व मोठ्या लाडाने आणि भावाने त्याचे पालनपोषण करीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीचे असे मी जुनाट कुत्रे असून त्यामुळे माझा मोह व माझा हट्ट नाहीसा झाला. ४

विवरण:– वरील तीनचार अभगात तुकारामबुवा स्वत म भगवताच्या घरचे कुत्रे समजतात कुत्र्याप्रमाण इमानी राहून आपण धन्याच्या पायाशी पडून त्याची सेवा करू, व प्रसग पडताच छू म्हटल्यावर दुसऱ्यावर धावून जाऊ, असा त्याचा भाव आहे दुसऱ्याचा कुणाचा सुगावा लागताच आपण खडबडून उठू आणि त्याचा समाचार घेऊ त्याचे लक्ष दूधताकावर असेल तर त्याला पिटाळून लावू. आपणास प्रीतीच्या साखळीने बांधले असून आपण नेहमी वेळ जाणून भक्त राहू पण देवा, तुम्ही मला आपल्या पायापाशी राखा मी तुमची सर्व प्रकारची सेवा करीन हा भाव तुकोबाच्या या अभगातून प्रकट झाला आहे कुत्र्याची इमानदारी, त्याचे धन्यावरील प्रेम, त्याची जागरूकता इत्यादी बाबींची आठवण ठेवून तुकोबाच्या या वृत्तीचा बोध घ्यावयास हवा धन्याची मोठ्या सचोटीने सेवा करणे आणि जो भाकरतुकडा पुढे येईल त्यावर मतुष्ट राहाणे ही कुत्र्याची मनोवृत्ती तुकोबांना स्वतःचा भाव व्यक्त करण्यास सोयीची वाटली म्हणनच ते आणखी एका ठिकाणी म्हणतात, 'तुझ्या दारींचा कुतरा। नको मोकलूं दातारा' एकनाथ महाराजांनीही अशाच वृत्तीने म्हटले आहे 'संतदारीं कुतरा झालों । प्रेमरसासी लोकलों । भुंकत भुकत द्वारा आलों । सारभारोळीं बैसलों ॥'

३३१२ लागले भरतें । ब्रह्मानंदाचें वरतें ॥ १ ॥
जाला हरिनामाचा तारा । सीड लागलें फरारा ॥ २ ॥
बैसोनि सकळ । बाळ चालिले[1] गोपाळ ॥ ३ ॥
तुका म्हणे वाट । बरवी सांपडली नीट ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– तारा–तार, जहाज बरवी–बरी, चांगली

अर्थ:– ब्रह्मानंदही बुडून जाईल असा आनंदाचे भरते मला आले आहे १ या ठिकाणी संसारसमुद्र तरून जाण्यासाठी हरिनामाचे जहाज आले असून त्यावरील हरिनामाचे शीड मोठ्या डौलाने फडकत आहे. २ त्यात सर्व बाळगोपाळ बसून गमतेत चालले आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही हरिनामाची वाट आम्हांस चांगली सापडली आहे. ४

१ चाले.

३३१३ धनें वित्तें कुळें । अवघियाने ते आगळे ॥ १ ॥
ज्याचे नारायण गाठीं । भरला हृदयं संपुटी ॥ २ ॥
अवघेंचि गोड । त्याचे पुरले सर्व कोड ॥ ३ ॥
तुका म्हणे अस्त । उदय त्याच्या तेजा नास्त ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आगळे–श्रेष्ठ, निराळे, गाठीं–पदरी, कोड–इच्छा, नास्त–असत नाही

अर्थ – धनदौलत, संपत्ती, कुळाची श्रेष्ठता यांच्यापेक्षाही पुढे दिलेली बाब फारच श्रेष्ठ आहे १ ज्याच्या पदरात नारायणरूपी धन बांधलेले आहे व ज्याच्या हृदयाच्या संपुष्टात तोच एक भरून राहिलेला आहे तो सर्वांपेक्षा श्रेष्ठ आहे २ त्याचे सर्व करणेच गोड असून त्यामुळे त्याची सर्व इच्छा परिपूर्ण होत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याच्या भक्तीच्या तेजाला कधीच उदय व अस्त असत नाही ४

३३१४ बोलावे ते आता आम्ही अबोलणे[1] । एकाचि वचनें सकळांसी ॥ १ ॥
मेघवृष्टि कांहीं न विचारी ठाव । जैसा ज्याचा भाव त्यासी फळे ॥ २ ॥
तुका म्हणे नाहीं समाधाने चाड । आपणा ही नाड पुढिलांसीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – अबोलणे–बोलू नये ते, अथवा बोलणे, ठाव–जागा, स्थान, चाड–इच्छा, नाड–अडचण

अर्थ – जे काही बोलायचे आहे ते आम्ही एका वचनाने सर्वांशी बोलत आहोत १ पावसाचा वर्षाव होत असताना तो कधी स्थानाच्या पात्रापात्रतेचा विचार करीत नाही त्याचप्रमाणे आमच्या बोलण्याचे आहे ज्याचा जसा भाव असेल तसे त्याला फळ मिळेल २ तुकाराम महाराज म्हणतात कुणाचे उगाच समाधान करावे अशी मनात इच्छा नाही कारण त्यामुळे आपली व दुसऱ्याची विनाकारण अडचण होते ३

३३१५ अधिकार तैसा करूं उपदेश । साहे ओझें त्यास तेंचि द्यावे ॥ १ ॥
मुंगीवरी भार गजाचे पाळण[2] । घालिता ते कोण कार्यसिद्धि ॥ २ ॥
तुका म्हणे फासे वागुरा कुऱ्हाडी । प्रसंगी तो काढी पारधी तो ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा –साहे–सहन होईल तेवढे, गजाचे–हत्तीचे, वागुरा–जाळी.

अर्थ – ज्याचा जसा अधिकार असेल तसा त्याला उपदेश आम्ही करू. ज्याला जे ओझे सहन होईल तेवढेच त्याच्या शिरावर द्यावे १ एखाद्या हत्तीच्या पालनपोषणाचा भार मुंगीवर घालून काय उपयोग ? यामुळे कोणती कार्यसिद्धी होणार आहे ? २ तुकाराम महाराज म्हणतात, पारध्याजवळ फासे, जाळी, कुऱ्हाडी वगैरे साधने असतात, पण प्रसंग पाहूनच तो त्याचा उपयोग करीत असतो ३

विवरण – ज्याचा जसा अधिकार असेल त्याप्रमाणे त्याला आम्ही उपदेश करू, असे तुकारामबुवा या अभंगात म्हणत आहेत ज्याची जशी मानसिक कुवत असेल त्याप्रमाणे उपदेश करावा असा एक विचार आहे आपण मेघवृष्टीप्रमाणे सर्वत्र सारखा वर्षाव करू, ज्याची जशी मनोभूमी सुपीक असेल त्याप्रमाणे तो उपदेश ग्रहण करील, असेही बुवानी एके ठिकाणी म्हटले आहे यात स्वतः गुरुत्वाचा अहंकार नसल्याचे जसे सिद्ध होते तसेच सर्व शिष्यजनही एकाच अरत्येचे नसल्याचेही स्पष्ट होते कारण बुवाच्या मताने 'गुरुशिष्यपण । हें तों अधमलक्षण' तेव्हा गुरुत्वाची भावना मनात धरून उपदेश न करता सर्वसाक्षी नारायणच आपल्या मुखातून बोलतो आहे ही भावना श्रेष्ठ प्रकारची असल्याची त्याची साक्ष आहे त्याचप्रमाणे ऐकणाराही आपल्या मनाची तयारी करून आला असेल तरच त्याला तो उपदेशही नीटपणे रुचेल व पचेल कारण तुकोबानीच म्हटले आहे, 'जैसा ज्याचा भाव त्यासी फळे' ज्याचा जसा भाव असेल तसे फळ त्याला मिळेल

[1] बोलणे, [2] पालण.

मेघाप्रमाणे सर्वांना सारख्याच वृष्टीचा लाभ होणारा असला तरी फलनिष्पत्ती मात्र सर्वत्र समान नसते. ज्याला जे ओझे उचलेल तेच ओझे देणे योग्य आहे. मुंगीच्या पाठीवर हत्तीचे पालाण ठेवून कसे चालेल ? पाश, कुऱ्हाडी ही विविध साधने शिकारीसाठी जरी पारध्याजवळ असली तरी ती एकाच वेळी उपयोगात येत नाहीत. जसा प्रसंग असेल तसा त्याचा उपयोग करावा हेच खरे. खळ, नष्ट, कृपण, सामारिक, विरक्त, राजस, शूर, पामर, तापसी, कामी इत्यादिकांना उपदेशाची तऱ्हा वेगवेगळी असणारच. तुकोबांनी एके ठिकाणी म्हटले आहे, 'तेजी इशारती । तट्टा फोकावरी घेती ' जातिवंत घोड्याला नुसता इशाराच पुरतो. परंतु अडेलतट्टू मात्र फोकाचे मार खाल्ल्याखेरीज पायच उचलत नाही. म्हणून तुकाराम महाराजाप्रमाणे थोर संतांजवळ उपदेशाच्या नाना तऱ्हा असाव्यात. रोगाचे स्वरूप पाहून 'तुका म्हणे लासू ', फासूं, देऊं डाग ', असे उपाय सुचवीत असावेत. ब्राह्मणाला, क्षत्रियाला, सिद्धाला, पामराला, शांतिस्वरूप भक्ताला, सामारिकाला, शूराला, भ्याडाला, विरक्ताला, मुमुक्षूला सर्वांना त्याचा उपदेश आपापल्या योग्यतेनुसार मिळत राहील.

कुणाला कोणत्या प्रकारचा उपदेश करायचा हे जसे संत ठरवितात, त्याचप्रमाणे कुणाला बोध करायचा नाही याबद्दलही त्यांना विवेक करावा लागतो. भगवान श्रीकृष्णांनी गीतेच्या रूपाने राज्यगुह्ययोग सविस्तर निवेदन केला, परंतु हे रहस्य अर्जुनाने कुणाला सांगू नये याविषयीही शेवटी स्पष्टपणे इशारा दिलेला आहे. ' इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन । न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति '–ज्याला तप नाही, गुरुभक्ती नाही, ऐकण्याची इच्छा नाही व जो माझी सतत निंदा करतो त्याला तू हे ज्ञान कधीही सांगू नकोस, असा निर्वाळा श्रीकृष्णांनी दिलेला आहे. तपोहीनाला गीताशास्त्र सांगून काय उपयोग ? किंवा एखादा तपस्वी आहे, पण त्याच्याजवळ गुरुभक्ती नाही तर तोही या उपदेशाला पात्र होणार नाही. अथवा एखादा तपस्वी आहे, गुरुभक्तही आहे, पण त्याला ऐकण्याची इच्छाच नसेल तर त्याला मुळीच काही सांगू नये. श्रोत्याचा अथवा उपदेश घेणाराचा अधिकार स्पष्ट करताना ज्ञानदेवांनी नेहमीच्या पद्धतीने फार समर्पक असे दृष्टान्त दिले आहेत. मोती फार उत्तम व सुंदर आहे, पण त्याला भोक नसेल तर सोन्याच्या तारेचा काय उपयोग ? सागर गंभीर खरा, पण त्यावर पाऊस पडल्याचा त्याला काय उपयोग ? तृप्त झालेल्या माणसास पक्वान्नाचे जेवण कशासाठी ? उपदेश घेणारा वाटेल तसा असो, पण त्याला ऐकण्याचीच इच्छा नाही तर त्याचा काय उपयोग ? गीताशास्त्राचा उपदेश कुणाला द्यावा हे सांगताना श्रीकृष्ण म्हणतात, ' म्हणौनि तपी भक्ती । पाहावे ते सुभद्रापति । परी शास्त्रश्रवणीं अनासक्ती । बोळावेचि ते ।। नातरी तपभक्ति । होऊनि श्रवणि आर्ति । आथी ऐसीही आयती । देखसी जरी ।। तरी गीताशास्त्रनिर्मिता । जो मी सकळ लोकशास्ता । तया मातें सामान्यता । बोलेल जो ।। माझ्या सज्जनेंसि मातें । पैशून्याचेनि आम्हातें । येक आहाती त्याते । योग्य न म्हण ।। ' गीताशास्त्राचा उपदेश ऐकणारा नुसता ज्ञानी, तपी असून चालणार नाही, कारण इतर सर्व गोष्टी म्हणजे ज्ञानदेवाच्या मते ' दीपेंवीण ठाणदिवी । रात्रीची जैसी ' होय. सर्व सामग्री आहे, पण ऐकण्याची तीव्र इच्छा मात्र नाही, श्रीहरीविषयी आस्था नाही त्याची अवस्था कशी असते ? ' अंग गोरें आणि तरुणें । वरि लेइलें आहे लेणें । परी येकलेनि प्राणें । सांडिले जेवी ।। सोनयाचें सुंदर । निर्वाळिलें होय घर । परी सर्पांगना द्वार । रुंधलें आहे ।। निपजे दिव्यान्न चोखट । परी माजीं असे काळकूट । असो मैत्र कपट– । गर्भिणी जैसी ।। तैसी तपभक्तिमेधा । तयाची जाण प्रबुध्दा । जो मातियाची का निंदा । माझीच करी ' श्रोत्यांना परमेश्वरस्वरूप मानणारे ज्ञानदेव उपदेश कुणाला द्यावा, कुणाला देऊ नये यासबंधी इतके सावध आहेत. ईश्वरप्रीती व श्रवणेच्छा या दोन गुणांना त्यांच्या मताने फार महत्त्वाचे स्थान आहे. तपश्चर्या, गुरुभक्ती, श्रवणाची इच्छा व ईश्वरप्रीती पाहून मग निजबोधाचे दान करावे असा त्यांच्या म्हणण्याचा मथितार्थ आहे.

३३१६ नव्हों वैद्य आम्ही अर्थाचे भुकेले । भलतें द्यावें पाले भलत्यासी ।। १ ।।
कुपथ्य करूनि विटंबावे रोगी । काय हे सलगी भीड त्याची ।। २ ।।
[1]का म्हणे लासूं फांसूं देऊं डाव[1] । सुखाचा उपाव पुढें आहे ।। ३ ।।

[1] डाग

शब्दार्थ व टीपा – अर्वाचि-वैद्याचे, पाले-वनस्पतीचे औषध, लासू-डाग देणे. फासू-फासण्या देणे

अर्थ – भलत्याच रोगावर भलत्याच औषधी वनस्पतीचा पाला देणाऱ्या द्रव्यलोभी वैद्याप्रमाणे आम्ही नव्होत. १ रोग्याला भलतेच खायला देऊन त्याची फजिती करावी काय? अशा प्रकारची सलगी व भीड काय कामाची? २ तुकाराम महाराज म्हणतात, प्रसग पडेल तर डाग देणे, फासण्या देणे हेही उपाय करावे लागतात. कारण यापासून क्षणाचे दु ख असले तरी हाच पुढच्या सुखाचा एक उपाय आहे. ३

३३१७ नव्हे परि म्हणवी दास । काही निमित्तास मूळ केले ॥ १ ॥
तुमचा तो धर्म कोण । हा आपण विचारा ॥ २ ॥
नाहीं शुद्ध आचरण । परी चरण चिंतितो ॥ ३ ॥
तुका म्हणे पाडुरंगा । ऐसे का गा नेणा हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मूळ-कारण, विचार-विचार करा

अर्थ :– देवा, मी काही यथार्थत्वाने तुमचे स्वरूप जाणीत नाही पण स्वत स मात्र तुमचा दास म्हणवून घेतो कारण तुमच्या प्राप्तीसाठी मी काही काही कारणाने प्रयत्न केलेला आहे. १ तुमचा आता जो काही धर्म असेल त्याचा विचार तुम्हीच करावा २ माझे आचरण काही फारसे शुद्ध नाही, पण मी तुमच्या चरणाचे चिंतन मात्र करीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, पाडुरगा, माझे हे असे आहे ते तुम्ही का जाणून घेत नाही? ४

३३१८ मागें चिंता होती आस । केला नास या काळें ॥ १ ॥
तुम्ही आम्हां उदासीन । भिन्नभिन्न वारिलें ॥ २ ॥
मोहजाळें दुःख वाढे । ओढे ओढे त्यास तें ॥ ३ ॥
तुका म्हणे कोण देवा । आतां हेवा वाढवी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आस-इच्छा, नास-नाश, वारिले-दूर केले, हेवा-हाव

अर्थ :– यापूर्वी माझ्या चित्तामध्ये अनेक प्रकारच्या इच्छांची चिंता होती, पण या कार्यामुळे त्या चिंतेचा नाश झालेला आहे १ कारण देवा, तुम्ही आमच्या विषयी उदासीन झालेले आहात त्यामुळे तुमच्याआमच्यातील भिन्नाभिन्नत्वाचा सबध दुरावला २ इच्छित वस्तूच्या मोहाच्या जाळ्यामुळे आमचे दु ख वाढते विषयाच्या ओढीमुळे आमचे चित्त त्याच्या ओढीनेच ओढले जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्याकडून आमचे कल्याण होईल. याविषयीची हाव आता कोण वाढवणार? ४

३३१९ आहो उभा विटेवरी । भरोवरी चुकविली ॥ १ ॥
निवारलें जाणें येणें । कोणा कोणें रुसावें ॥ २ ॥
सकल्पासी वेचे बळ । भारे फळ निर्माण ॥ ३ ॥
तुका म्हणे उभयता । भेटी सत्ता लोभाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भरोवरी-खटपट

अर्थ – विटेवर उभे राहाणाऱ्या अहो देवा, तुम्ही आमची सर्वच खटपट दूर केली १ आमच्या जन्म-मृत्यूच्या फेऱ्या तुम्ही चुकविल्या यासाठी आता कुणी कुणावर रुसावे? २ जसेजसे सकल्पाचे बळ खर्च करावे त्याप्रमाणे कमीजास्त भाराचे फळ पदरात पडते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता तुमची व आमची भेट होणे हे तुमच्या सत्तेवर व लोभावर अवलबून आहे ४

३३२० असो खटपट । आता वाउगे बोभाट ॥ १ ॥
परिसा हे विनवणी । असो मस्तक चरणीं ॥ २ ॥

अपराध करा । क्षमा घडले दातारा ॥ ३ ॥
तुका म्हणे वेथा । तुम्हा कळे पढरिनाथा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाउगे-उगाच, व्यथ, परिसा–ऐका, वेथा–व्यथा, दु ख

अर्थ – आता नाना प्रकारची खटपट करणे उगाच आहे उगाच कसला बोभाटा करणेही नको १ आता माझी ही विनवणी देवा, तुम्ही ऐकावी मी तुमच्या चरणावर मस्तक ठेविले आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, पढरीनाथा, माझ्या मनातील ही व्यथा तुम्हास समजते ३ दातारा, माझ्याकडून जे काही अपराध झाले असतील त्याची तुम्ही क्षमा करावी ४

३३२१ वारकरी पायापाशीं । आले त्यासी विनविले ॥ १ ॥
काय काय ते आइका । विसरो नका रकासी ॥ २ ॥
चिंतावोनि चिंता केली । हे राहिली अवस्था ॥ ३ ॥
तुका म्हणे ससारा । रुसलो खरा यासाठीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रकासी–गरिबाला

अर्थ – देवा, तुमच्या पायापाशी जे वारकरी आहेत त्याना मी विनती केली १ या गरिबाला तुम्ही विसरू नका अशी ही विनती तुम्ही नीट ऐका २ याच एका विषयाची चिंता मी सतत केली असल्याने तीच अवस्था मला प्राप्त झालेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठीच मी खरे म्हणजे या ससाराला विटलो ४

३३२२ जीवींचि का नेणा । परि हे आवडी नारायणा ॥ १ ॥
वाढवावे हे उत्तर । काहीं लाज[1] करकर ॥ २ ॥
कोठें वाया गेले । शब्द उत्तम चागले ॥ ३ ॥
तुका म्हणे बाळा । असतात प्रिय खेळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नेणा–जाणीत नाही, करकर–कटकट

अर्थ – देवा, आमच्या जीवाची आवड काय आहे, हे तुम्ही जाणीत का नाही ? नारायणा, प्रीतीच्या वचनाची आवड तुम्हास आहे १ काही तरी कारण करून उत्तर वाढवावे, लाडाने लाजेकाजेसाठी कटकट वाढवावी हे तुम्हास आवडते २ देवा, मी चागल्या शब्दानी जी तुमची स्तुती करीत आहे ती काय वाया गेली ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मुलाना खेळच प्रिय असतात ४

३३२३ वोडविले[2] अग । आता करूनि घ्यावे साग ॥ १ ॥
काय पूजा ते मी नेणे । जाणावे जी सर्वजाणे ॥ २ ॥
पोटा आले बाळ । त्याचे जाणावे सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे हरी । वाहावे जीं कडियेवरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वोडविले–समर्पित केला, साग–परिपूर्ण

अर्थ – देवा, मी आपला सव देहच तुम्हास समर्पण केला आहे आता सव काही यथासाग, परिपूर्ण करून घ्यावे १ देवा, तुम्ही सर्व काही जाणणारे आहात मी मात्र तुमची पूजा कशी काय करावी हे जाणीत नाही २ जे मूल आपल्या पोटी आले आहे त्याचे सर्वस्व आई जाणीत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे श्रीहरी, तुम्ही मला कडेवर घेऊन वागवावे ४

१ लाड, २ वाढविल

३३२४ सेवटींची हे विनंती । पाय चित्तीं रहावे ॥ १ ॥
ऐसें करा कृपादान । तुम्हां मन सन्निध ॥ २ ॥
भाग्याविण कैंची भेटी । नव्हे तुटी चिंतने ॥ ३ ॥
तुका म्हणे फळसा आलें । हें विठ्ठले परिसावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– फळसा आले–शेवटचे झाले, परिसावे–ऐकावे.

अर्थ :– देवा, तुमचे पाय माझ्या चित्तात सतत राहावेत हीच एक शेवटची माझी विनंती तुम्हांस आहे. १ तुमच्या जवळ माझे मन सदैव असावे अशाच कृपेचे दान तुम्ही मला द्यावे २ भाग्य असल्याखेरीज तुमचीआमची भेट कशी होणार ? तुमच्या पायाचे चिंतन मी करीत असल्याने तुमचा वियोग आता होणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे हे शेवटचे बोलणे असल्याने विठ्ठलाने ते ऐकावे. ४

३३२५ करूनियां शुद्ध मन । नारायण स्मरावा ॥ १ ॥
तरीच हा तरिजे सिंधु । भवबंधु तोडोनिया ॥ २ ॥
तेथे[1] सरे शुद्ध साचे । अंतरींचें बीज तें ॥ ३ ॥
तुका म्हणे लवणकळी । पडतां जळीं ते होय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तरिजे–तरून जाईल, सिंधु–भवसागर, भवबंधु–संसाराचे पाश, साचे–खरे, लवणकळी–मिठाचा खडा, जळीं–पाण्यात.

अर्थ :– आपले मन शुद्ध करून नारायणाचे स्मरण नित्य करीत असावे १ तरच या भवसागरातून तरून जाता येईल संसारपाश तोडून टाकता येतील. २ अंतःकरणातील शुद्ध व खरे बीज याच ठिकाणी फलद्रूप होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, मिठाचा खडा पाण्यात टाकल्याबरोबर तो विरघळून जलमय होऊन जातो त्याप्रमाणे आपले मन श्रीहरीशी एकरूप व्हावे. ४

३३२६ जिकडे पाहे देव । ऐसा भाव दे कांहीं ॥ १ ॥
काय केलो एकदेशी । गुणदोषीं सपन्न ॥ २ ॥
पडे तेथे तुझ्या पायां । करीं वायां न[2] वजें तें ॥ ३ ॥
तुका म्हणे विषमें सारी । ठाणे धरी जीवासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वजें ते–जाईल असे, विषमें–विषम भाव, सारी–दूर करा.

अर्थ :– मी जिकडे पाहीन तिकडे मला देवाचीच रूपे दिसतील असा काही तरी समत्वाचा भाव देवा, तुम्ही मला द्यावा १ अनेक प्रकारच्या गुणदोषानी सपन्न असल्यामुळे मी एकदेशी बनलो आहे. २ मी जेथ तुमच्या पायांवर मस्तक ठेवीन तेथून ते वाया जाईल असे तुम्ही करू नका ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या मनातील सारा विषम भाव दूर करून त्या ठिकाणी तुम्ही वास्तव्य करून असा ४

विवरण.– संताच्या दृष्टीत सर्वत्र वासुदेवतत्व भरलेले दिसू येते. जिकडे पाहू तिकडे प्रभू, तुमचेच रूप दिसावे अशी त्यांची इच्छा असते ' ज्या ज्या स्थळीं हें मन जाय माझें । त्या त्या स्थळीं हे हरि रूप तुझें, निजरूप तूझें,' असे समत्व श्रेष्ठ संताच्या दृष्टीत आलेले असते एकदा ईश्वरस्वरूपाचा साक्षात्कार झाला की मग सर्वत्र प्रभूच्याच रूपाचा व गुणाचा विलास त्याला जाणवू लागतो तुकोबांनीच एका ठिकाणी म्हटले आहे, ' चित्तचैतन्यीं पडता मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टी ' अशी सर्वव्यापकत्वाची अनुभूती आपणास यावी व ' जिकडे पाहे तिकडे देव । ' असा भाव मनात निर्माण व्हावा म्हणून या अभगात तुकाराममहाराज प्रभूपाशी विनवीत आहेत. यासाठ च

१ येथें, २ वजेंल.

त्याचा जीव एकसारखा तळमळत राही ' ऐसें भाग्य कई लाहता होईन । अवघें देखें जन ब्रह्मरुप ' अशी त्याच्या मनाची तीव्र लालसा आहे

सर्व चराचर सृष्टीत एकच ईश्वरतत्त्व भरून राहिले असल्याची श्रेष्ठ अनुभूती यावी म्हणून तुकाच्या मनाची ही व्याकुळती आहे ' मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव '-दोऱ्यात अनेक मणी ओवावेत त्याप्रमाणे माझ्या ठिकाणी हे सर्व विश्व भरून राहिले आहे या भगवताच्या उक्तीमधील सत्य अनुभवण्याची इच्छा साधुसंताना असते ' वासुदेव सर्वमिति ' असा श्रेष्ठ अनुभव आपणास यावा ही वांछा भक्ताच्या मनाची असते ' हें समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो । ' श्रेष्ठ संताना हवा असतो त्याना आपल्या दृष्टीने समत्वाने सर्वत्र अगभूत असलेले वासुदेवतत्त्व अनुभवायचे असते ' ते वेळीं जयाकडे वास पाहे । तेउता मीचि तया एकु आहे । अथवा निवान्त जरी राहे । तरी मीचि तया ॥ हें असो आणिक कांहीं । तया सर्वत्र मीवाचूनि नाहीं । जैसें सबाह्य जळ डोहीं । बुडलिया घटा ॥ तैसा तो मजभीतरीं । मी तया आतु बाहेरी । ' या भगवताच्या घोषणेनुसार थोर भक्ताला अनुभव घ्यायचा असतो. सोन्याच्या सुतात सुवर्णाचे मणी ओवल्यानतरचे ऐक्य त्याना भोगायचे असते

३३२७ जिकडे जाय[1] तिकडे सवे । आता यावें यावरी ॥ १ ॥
माझ्या अवघ्या भांडवला । तूं एकला जालासी ॥ २ ॥
आतां दुजें धरा झणी । पायाहूनि वेगळें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां देवा । नका गोवा यावरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सवे–बरोबर, झणी–नको, गोवा–गुतवू

अर्थ .– देवा, आता यावर मी जिकडे जाईन तिकडे तुम्ही माझ्याबरोबर यावे १ कारण आता तूच एक माझे भाडवल झाला आहेस २ आता तुम्ही मला स्वतःच्या पायापासून दूर ठेवू नका ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता मला कोणत्याही गोत्यात गुतवू नका. ४

३३२८ स्मरतां कां घडे नास । विष्णुदास यावरी ॥ १ ॥
ऐसी सीमा जाली जगीं । तरी मी वेगीं अनुसरलों ॥ २ ॥
धरिलें तें निवडे[2] आतां । न घडे चित्तावेगळें ॥ ३ ॥
तुका म्हणे नाश नाहीं । पुराणें ही गर्जती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– नास–नाश

अर्थ – या विष्णूचे एकदा दास्यत्व केल्यावर कधी नाश होईल का ? १ याच्या कीर्तीची सीमा या जगात अशाच प्रकारची असल्यामुळे मी मोठ्या त्वरेने त्याला अनुसरून राहिलो आहे २ आता याचे रूप मी जे चित्तात धारण केले आहे ते तेथून मला वेगळे काढता येणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाचे दास्यत्व करणाराचा कधीही नाश होणार नाही अशी गर्जना सर्व पुराणे करीत आहेत ४

३३२९ आधी नाहीं कळो आला हा उपाय । नाहीं तरी काय चुकी होती ॥ १ ॥
घालितों पायासी मिठी एकसरें । नेदीं तो दुसरें आड येऊं ॥ २ ॥
कासया पडतों लटिकियाचे भरी । नव्हता का शिरीं भार घेतों ॥ ३ ॥
तुका म्हणे कां हे घेतों गर्भवास । का या होतों दास कुटुंबाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – एकसरें–एकदम, नेदीं–देत नाही

अर्थ – पुढे दर्शविल्याप्रमाणे मला हा उपाय अगोदर समजला नव्हता नाहीतर माझ्याकडून ही अशी चूक कधी झाली नसती १ दुसरे कसलेही विघ्न आड येऊ न देता मी त्याच्या पायास मिठी घातली असती २ नाही

१ जावे, २ निवडी.

तर मी या लटक्या संसाराच्या भरीस का पडलो असतो ? उगाच नसता भार डोक्यावर का घेतला असता ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला जर हा उपाय अगोदरच समजला असता तर मी अनेक प्रकारचे गर्भवास कशाला सोसले असते ? या कुटुंबाचा व्यर्थ दास तरी कशासाठी झालो असतो ? ४

३३३० आता बरें जालें । माझें मज कळों आलें ॥ १ ॥
खोटा ऐसा संवसार । मज पायीं द्यावा[1] थार ॥ २ ॥
उघडले डोळे । भोग देताकाळीं कळे ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवा । होता तडातोडी देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – थार–थारा स्थान, तडातोडी–ताटातूट, फजितीचा प्रसंग

अर्थ – श्रीहरीच्या प्रीतीचे उपाय आता माझे मलाच समजून आले हे एक प्रकारे फार बरे झाले १ देवा, हा संसार फार खोटा असल्यामुळे मला तुमच्या पायाचा थारा द्यावा २ प्रारब्धकर्माप्रमाणे भोग भोगण्याची वेळ येते तेव्हाच आपले डोळे उघडतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, हे सर्व जीवाची ताटातूट होत असताना समजून आले ४

३३३१ बोलिलों ते धर्म अनुभव अंगें । काय पांडुरंगें उणें केलें ॥ १ ॥
सर्व सिद्धि पायीं वोळगती दासी । इच्छा नाहीं ऐसी व्हावें काहीं ॥
संतसमागमें अळंकार वाणी । करूं हे पेरणी शुद्ध बीजा ॥ ३ ॥
तुका म्हणे रामकृष्णनामें गोड । आवडीचे कोड माळ ओऊं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वोळगती–प्राप्त होतात, येतात, कोड–कौतुकाने

अर्थ – मी जे जे धर्मविषयक बोलत आहे ते माझ्या स्वतःच्या अनुभवाचे बोल आहेत या पांडुरंगाने मला काय कमी केले आहे ? १ सर्व प्रकारच्या सिद्धी शरण येऊन मला प्राप्त होण्यासारख्या आहेत पण मला त्यांची मुळीच इच्छा नाही २ संतांच्या सहवासात राहून आम्ही नाना प्रकारचे अलंकार आमच्या वाणीस घालू व याच शुद्ध बीजाची पेरणी सर्वत्र करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, रामकृष्ण हे नाम फारच गोड असल्याने त्याचीच गोडी असल्याने, त्याचीच माळ कौतुकाने व आवडीने ओवून गळ्यात घालू ४

३३३२ करूनि उचित खेळें भोवतालें । चित्त येथें आलें पायापाशीं ॥ १ ॥
येथें नाहीं खोटा चालत परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ २ ॥
सुख दुःख तुज देऊनि सकळ । नाहीं ऐसा काळ केला आम्ही ॥ ३ ॥
तुका म्हणे जाला देहाचा विसर । नाहीं[2] आतां पर आप कोणी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परिहार–निरसन, अंतर–मन, अंतःकरण, पर–दुसरा, आप–स्वतःचा

अर्थ – माझे चित्त भोवतीच्या नाना खेळांत गुंतले होते, ते उचित अशा मार्गाने वळवून तुमच्या पायापाशी आणले १ या ठिकाणी खोटे सांगून काही कृतींचे निरसन करण्यात व्यवहार कधी चालत नाही पांडुरंगा, तू अंतःकरणातील सर्व जाणतोसच २ तुला सर्व प्रकारची सुखदुःखे समर्पण केली आहेत यामुळे काळासही आम्ही नाही असे करून सोडले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हाला आमच्या देहाचा विसर पडलेला आहे म्हणून आमचा आता आपपरभाव उरलेला नाही ४

---

१ द्यावी, २ नाही आपपर मानी आता

३३३३ परिसाचे अंगें सोनें जाला विळा । वाकणें या कळा हीन नव्हे ॥ १ ॥
अंतरीं पालट घडला[1] कारण । मग समाधान तेंचि गोड[2] ॥ २ ॥
पिकली हे सेंद पूर्वकर्मा नये । अव्हेरु तो काये घडे मग ॥ ३ ॥
तुका म्हणे आणा पंगती सुरण । पृथक ते गुण केले पाकें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाकणें–वाकडा असल्याने, कळा–किंमत, सेंद–सेदाळ नावाचे फळ, पूर्वकर्मा–पूर्वीच्या कडूपणाच्या अवस्थेस, पृथक–वेगळे, पाकें–शिजवित्यावर.

अर्थ – लोखंडाच्या विळयास एकदा परीस लागल्याबरोबर त्याचे सोनेच बनून जाते. मग तो जरी वाकडा असला तरी त्यामुळे त्याच्या किंमतीत काही कमीपणा येत नाही १ याचे कारण अंतरंगात पालट होणे हे आहे. अशी समाधानस्थिती प्राप्त झाल्यावर मग तीच उत्तम म्हणावी लागेल २ एकदा शेंदाळाचे फळ पिकले की त्याचे पूर्वीचे कडुपण नाहीसे होते मग कुणी त्याचा कधी त्याग करतात काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, सुरण हे खाजरे असले तरी ते चांगले शिजल्यावर वेगळ्या गुणावर येते मग ते पंगतीत वाढण्यास काहीच हरकत नसते. ४

३३३४ ज्याचे माथां जो जो भार । तेचि फार तयासी ॥ १ ॥
मागें पुढें अवघें रितें । कळों येतें अनुभवें ॥ २ ॥
परिसा अंगी अमुपसोनें । पोटीं हीन धातुचि[3] ॥ ३ ॥
आपुला तो करी धर्म । जाणे वर्म तुका तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– रितें–रिकामे, अमुप–पुष्कळ.

अर्थ:– ज्याच्या माथ्यावर जो भार आहे तो त्याला फार वाटतो. १ मागेपुढे सर्व रिकामे आहे हे अनुभवाने समजून येते. २ परिसाच्या अंगी पुष्कळ सोने असते, पण हीन धातूला त्याचा स्पर्श होण्यानेच त्या सुवर्णाची प्रचीती येते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे जो तो आपल्या धर्माप्रमाणे वागत असतो हे वर्म मी जाणीत असतो ४

३३३५ पाहें तिकडे दिशा ओस । अवघी आस पायांपें ॥ १ ॥
मनचि[4] साच होईल कई । प्रेम देई भेटोनि ॥ २ ॥
सर्वांपरी पांगुळ असें । न कळे कैसें तें तुम्हां ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपावंता । तूं तों दाता दोंचाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– आस–इच्छा, पायांपें–पायापाशी, साच–खरें.

अर्थ – देवा, मी जिकडे पाहीन, तिकडची दिशा ओस असलेली मला दिसते. म्हणून माझी सर्व आशा आपल्या पायांपाशीच आहे. १ मनातील इच्छा खरी केव्हा होईल? देवा, मला भेटून तू प्रेम द्यावेस २ देवा, मी सर्वापेक्षा पंगू आहे हे तुम्हास कसेबरे समजत नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपावंता, तू दोघांचा दाता आहेस. ४

३३३६ चालवणें काय । ऐसे अगे[5] माझे माय ॥ १ ॥
धांव धांव[6] लवलाहें । कंठीं प्राण वाट पाहे ॥ २ ॥
पसरूनि कर । तुज चालिलों समोर ॥ ३ ॥
देसील विसांवा । तुका म्हणे ऐशा हांवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– चालवणें–चाळवणे, फसविणे, लवलाहे–त्वरित, लौकर, कर–हात, हावा–हाव, इच्छा.

१ घडावा, २ गोडी, ३ धातुचे, ४ मनींचे, ५ अगे, ६ पाव.

अर्थ – माझे आई, पांडुरंगे, तू मला अशा प्रकारे का फसवीत आहेस ? १ आई, तू त्वरेने धावत ये मा माझा प्राण कंठातून आला असून मी तुझी वाट पाहात आहे २ मी हात पसरून तुझ्यासमोर चालत येत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू मला विश्रांती देशील अशी इच्छा माझ्या मनाची आहे ४

३३३७ आवडीच्या ऐसे जाले । मुखा आले हरिनाम ॥ १ ॥
आता घेऊं धणीवरि । मागें उरी नुरेतो ॥ २ ॥
साटवण मनाऐसी । पुढें रासी अमुप ॥ ३ ॥
तुका म्हणे कारण जाले । विठ्ठल[1] तीं अक्षरीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धणीवरि–तृप्ती होईपर्यंत, अमुप–मोठी, कारण–कार्य तीं–तीन

अर्थ – मुखात श्रीहरीचे नाम प्रकट झाले ही गोष्ट मोठ्या आवडीची झाली. १ आता मागे काही उरणार नाही इतके त्याचे सेवन मनाची तृप्ती होईपर्यंत करू २ मनाच्या पात्रात त्याचे साठवण करू पुढे प्रभुकृपेची रास फार मोठी आहेच ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठल या तीन अक्षरानीच माझे कार्य झाले आहे ४

३३३८ त्याचिया चरणा माझें दंडवत । ज्याचें धनवित्त पांडुरंग ॥ १ ॥
येथें माझा जीव पावला विसावा । म्हणऊनि हावा भरलासे[2] ॥ २ ॥
चरणींचे रज लावीन कपाळा । जीं पदें राउळा सोई जाती ॥ ३ ॥
आणिक तीं[3] भाग्यें येथें कुरवंडी । करूनिया सांडीं इंद्राऐसी ॥ ४ ॥
वैष्णवाचे घरीं देवाची वसति । विश्वास हा चित्तीं सत्यभावें[4] ॥ ५ ॥
तुका म्हणे सखे हरिचे ते दास । आता पुढें आस नाहीं दुजी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – हावा–हाव इच्छा, पदें–पायचे राउळा–मंदिरात, कुरवंडी–ओवाळून टाकीत, आस–इच्छा, दुजी–दुसरी

अर्थ – ज्याना सारे धन व वित्त हा पांडुरंगच वाटतो त्यांच्या चरणावर माझे दंडवत आहेत १ त्याच ठिकाणी माझ्या जीवास विश्रांती मिळालेली असल्याने त्याची इच्छा माझ्या मनात सतत भरून राहिलेली आहे २ ज्याचे पाय श्रीहरीच्या मंदिराकडे वळतात त्यावरील धुळीचे कण मी माझ्या कपाळास लावीन ३ इंद्रादिकांना मिळण्यासारखी जी जी भाग्ये आहेत तीही मी त्याच्यावरून ओवाळून टाकीन ४ वैष्णवाच्या घरी देवाची वसती असते याविषयी माझ्या चित्तात खंबीर विश्वास आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, जे श्रीहरीचे दास आहेत तेच माझे सोबती आहेत आता यानंतर दुसरी कुठलीही इच्छा माझ्या मनात नाही ६

३३३९ उपजोनिया मरें । परि हेचि वाटे बरें ॥ १ ॥
नाहीं आवडीसी पार । न म्हणावें जालें फार ॥ २ ॥
अमृताची खाणी । उघडली नव्हे धणी ॥ ३ ॥
तुका म्हणे पचे । विठ्ठल हें मुखा साचें[5] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उपजोनिया–जन्मास येऊन, धणी–तृप्ती

अर्थ – अनेकदा जन्मास येऊन मरण आले तरी चालेल, कारण या काळात श्रीहरीची भेट होत असल्याने हेच बरे वाटते १ त्याच्याविषयीच्या प्रेमाला सीमा नसते आणि ते कितीही मिळाले तरी फार झाले असे म्हणता येत नाही २ या श्रीहरीच्या नामाची कृपा हीच अमृताची खाण असून तिचे कितीही सेवन केले तरी काही मनाची तृप्ती होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठलाचे हे नाम पचते आणि वाणीलाही रुचत असते ४

१ विठ्ठल याती २ भरिलीग, ३ त भाग्य, ४ सत्य भाव, ५ रुचे

३३४० सत्य तू सत्य तू सत्य तू विठ्ठला । का गा हा दाविला जगदाकार ॥ १ ॥
सांभाळीं आपुली हाक देतो माया । आम्हांसी का भयाभीत केलें ॥ २ ॥
रूप नाहीं त्यासी ठेवियेलें नाम । लटकाचि[1] श्रम वाढविला ॥ ३ ॥
तुका म्हणे का गा जालासी चतुर । होतासी निसुर निर्विकार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निसुर–निश्चित, बेफिकीर

अर्थ – विठ्ठला, तूच सत्य आहेस असे असून उगाच हा जगदाभास का दाखविला ? देवा तुम्ही आपल्या या मायेस नीट सांभाळून ठेवावे असे मी सांगतो आम्हाला हिच्यामुळे उगाच भयभीत का बरे केले ? २ ज्याला रूप नाही आकार नाही त्याला नाव ठेवून उगाच खोटा भ्रम तुम्ही का वाढविला ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही अव्यक्तात चांगले निश्चित होता, मग असे व्यक्त होऊन जगदाकार रूप धारण करण्याचा चतुरपणा का केलात ? ४

३३४१ अमच्या कपाळें तुज ऐसी बुद्धि । धरावी ते शुद्धी योगा नये ॥ १ ॥
काय या राहिलें विनोदावांचून । आपुलिया भिन्न केलें आम्हां ॥ २ ॥
कोठें मूर्त्तिमंत दावीं पुण्यपाप । काशासी संकल्प वाहाविसी ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां आवरावा चेडा । लटिकीच पीडा पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाहाविसी–करवितोस ?, चेडा–चटुक

अर्थ – आम्ही तुझ्यापासून दूर राहावे अशीच तुझी बुद्धी आमच्या प्रारब्धामुळे आहे ती आमचे प्रारब्ध काही शुद्ध करून घेत नाही १ देवा, तुम्ही आम्हास स्वत:पेक्षा भिन्न का केले हो ? या विनोदावाचून काय काही अडले होते का ? २ आमचे पापपुण्य मूर्तिमंत स्वरूपात कुठे काय आहे ते दाखवा पाहू मग आमच्या मनातील बरेवाईट संकल्प तरी तू का करवितोस ? ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा आता हे चेटुक आवरून ठेवा पांडुरंगा ही सर्व पीडा खोटीच आहे ४

३३४२ नो[2] बोलावे ऐसें जनासी उत्तर । करितों विचार बहु वेळा ॥ १ ॥
कोण पाप आड ठाकतें येऊन । पालटी तो गुण अंतरींचा ॥ २ ॥
संसारा हातीं सोडवूनि गळा । हे का अवकळा येती पुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे सेवे घडे अंतराय । यास करूं काय पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतराय–अंतर

अर्थ – लोकांशी संभाषण कधीच करू नये असा विचार मनात पुष्कळ वेळा येतो १ पण कोणते पाप आडवे येऊन उभे राहाते कुणास माहीत ? पण त्यामुळे मनातील निश्चय डळमळून जातो २ संसाराच्या बंधनातून मी माझा गळा सोडवून घेतलेला आहे तरी माझी अशी ही अवकळा पुढे का बरे होत राहाते ? ३ तुकाराम महाराज म्हणतात पांडुरंगा, तुमच्या सेवेत हे असे अंतर पडते यासाठी मी करू तरी काय ? ४

३३४३ आतां हें उचित माझें जना हातीं । पाहिजे फजीती केली काहीं ॥ १ ॥
मग हे तुमचे न सोडीं चरण । त्रासोनिया मन येइल ठाया ॥ २ ॥
वाउगे वाणीचा न धरीं कांटाळा । ऐसी का चांडाळा बुद्धि मज ॥ ३ ॥
तुका म्हणे जरि माथा बैसे घाव । तरि मग धांव नेघे पुढें ॥ ४ ॥

१ मिथ्याची का भ्रम वाढविला, २ न

शब्दार्थ व टीपा – ठाया–स्वस्थानात, वाव–उगाच, व्यर्थ.

अर्थ :— देवा, आता लोकाकडून चागली माझी फजिती व्हावी हेच उचित आहे १ मग मी तुमचे चरण कधी सोडणार नाही सर्व भाजूनी मन भासल्यावर ते तुमच्या ठिकाणी स्वस्थानास परत येईल. २ व्यर्थ वाणीचा कधी कटाळाच या मनास येत नाही, अशी बुद्धी माझ्यासारख्या चांडाळाची आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता जरी डोक्यावर कितीही दु खाचे घाव बसले तरी माझे चित्त उगाच इतरत्र धाव घेणार नाही. ४

३३४४ मायेवरी सत्ता आवडीची बाळा । मकोचोनि ल्ळा प्रतिपाळी ।। १ ।।
अपराध माझे न मनावे मनी । तुम्ही संतजनीं मायबापीं ।। २ ।।
आरुष वचन लेकुराची आळी । साहोनि कवळी मागुताली ।। ३ ।।
तुका म्हणे अंगीं काय नाहीं सत्ता । परि निष्ठुरता उपजेना ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– आवडीची–प्रेमामुळे, न मनावे–मानू नये, मनावर घेऊ नयेत, आरुष–बोबड्या, आळी–हट्ट, उपजेना–निर्माण होत नाही.

अर्थ – प्रेमामुळेच आईवर बाळाची सत्ता असते तो कधी सकोच करून आपल्या मुलाचे लाड पुरविते का ? त्याचे पालन करते का ? १ अहो, मायबाप सतजन, त्याचप्रमाणे तुम्ही माझे अपराध कधी मनावर घेऊ नका २ आपल्या बोबड्या बोलानी लेकरू हट्ट करीत असते, पण आई कौतुकाने त्याला वारवार कवटाळून धरत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या बालकास शासन करण्याची सत्ता काय माऊलीच्या हातात नसते काय ? पण तिच्या मनात कधी निष्ठुरता निर्माण होत नाही ४

३३४५ कैसा होतो कृपावंत । बहुसंत सागती ।
पुसणे नाहीं यातीकुळ । लागो वेळ[1] नेदावा[2] ।। १ ।।
ऐसी काय जाणो किती । उतरती उतरले[3] ।। २ ।।
दावी वैकुंठींच्या वाटा । पाहाता मोठा संपन्न ।
अभिमान तो नाहीं अंगी । भक्तालागी न बैसे ।। ३ ।।
तुका म्हणे आळस निद्रा । नाहीं थारा त्या अंगीं ।
आले धावे भलत्या काळें । विठ्ठल बळे आगळा ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– आगळा–श्रेष्ठ

अर्थ – हा विठ्ठल फारच कृपावत आहे असे पुष्कळ सत वारवार सागतात पण तो कसा आहे हो ? तो आपल्या भक्ताची जात पाहात नाही, कुळ पाहात नाही, आणि त्याच्या उद्धाराला वेळही लावत नाही १ अशा प्रकारे ससारसमुद्रात उतरलेले किती तरी लोक याच्या कृपेमुळे तरून गेले आहेत २ हा श्रीहरी त्यांना वैकुंठीच्या वाटा दाखवितो. हा मोठाच सपन्न असून याच्या अगी कसलाही मोठा अभिमान नाही विटेवर उभा राहिलेला हा देव भक्तासाठी कधी खाली बसत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाच्या अगी आळस व झोप याचा मागमूसही नाही. कुणीही कोणत्याही वेळेस आले तरी त्याला हा देव प्रेम देतो असा हा बलवत्तामध्ये श्रेष्ठ आहे ४

३३४६ सदैव हे वारकरी । जे पढरी देखती ।
पदोपदीं विठ्ठल वाचा । त्यासी कैचा ससार ।। १ ।।
दोष पळाले पळाले । पैल आले हरिदास ।। २ ।।

१ मळ, २ नेदावी, ३ उतरली

प्रेमभाते भरले अंगीं । निर्लज्ज रंगी नाचती ।
गोपी चंदनाची उटी । तुळसी कंठीं मिरवती ॥ ३ ॥
तुका म्हणे देव चित्तीं । मोक्ष हातीं रोकडा ।
दुर्बळा या शक्तिहीना । त्या ही जना पुरता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सदैव–सुदैवी, भाग्यवान, भातें–भातुके, प्रेमाचा साऊ, रोकडा–प्रत्यक्ष

अर्थ – जे वारकरी पंढरपुरास जातील ते मोठे भाग्यवान होतील त्यांच्या मुखात पावलोपावली विठ्ठलाचे नाम असते त्याना कसला आला आहे ससार ? १ ससारसमुद्राच्या पैलतीरावर असे हे हरिदास आले असल्याने सर्व प्रकारचे दोष नाहीसे झाले २ त्याच्या अगी प्रेमाचा साऊ भरून राहिलेला आहे ते प्रभुप्रेमात सर्व लाजलज्जा सोडून रगून नाचतात त्यांच्या अगास गोपीचंदनाची उटी लावलेली असते आणि त्याच्या गळयात तुळशीची माळ चागलीच शोभत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या चित्तात सतत देव आहे, त्याच्या हातात नेहमीच मोक्ष प्रत्यक्ष प्रकटलेला असतो जे कुणी दुर्बळ शक्तिहीन आहेत त्यानाही हा देव जवळ करतो ४

३३४७ ऐसीं ठावीं वर्मे । तरी साडवलो भ्रमें ॥ १ ॥
सुखें नाचतो कीर्तनीं । नाहीं आशंकित मनीं ॥ २ ॥
ऐसे आले हाता । बळ तरी गेली चिंता ॥ ३ ॥
सुख येथें जाले तरी । नाहीं आणिकाचीं उरी ॥ ४ ॥
ऐसे केले देवे । पुढे काहींचि न व्हावे ॥ ५ ॥
तुका म्हणे मन । आता जाले समाधान ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – साडवलो–मुक्त झालो आशंकित–सशयित

अर्थ – अशा प्रकारची वर्मे मला सापडली म्हणून तर या ससाराच्या भ्रमातून मी मुक्त झालो १ आता मी श्रीहरीच्या कीर्तनप्रसगी मोठ्या सुखाने नाचत असतो माझ्या मनात कसलीही शका बाकी राहात नाही २ अशा प्रकारचे बळ माझ्या हातात आले असल्यामुळे मला कसलीच चिंता आता उरलेली नाही ३ येथे अत्युच्च प्रकारचे सुख मिळाले असल्यामुळे कसल्याच प्रकारची कमतरता आता उरलेली नाही ४ या देवाने अशा प्रकारची सुखमय अवस्था करून दिली आहे याशिवाय पुढे दुसरे काहीच न व्हावे ५ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझ्या मनाचे पूर्ण समाधान झाले आहे ६

३३४८ चित्तीं बैसले चिंतन । नारायण नारायण ॥ १ ॥
न लगे गोड काहीं आता । आणीक दुसरे सर्वथा ॥ २ ॥
हरपला द्वैतभाव । तेणे देह जाला वाव ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे आम्ही । जालो निष्काम ये कामीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाव–व्यर्थ.

अर्थ – नारायण, नारायण अशा नामाचेच चिंतन सदैव आमच्या चित्तात स्थिरावले आहे. १ आता याशिवाय दुसरे काहीही गोड लागत नाही २ द्वैतभाव सपून गेलेला असल्यामुळे माझा देह मला व्यर्थच वाटू लागला आहे ३ तुकयाबंधू म्हणतात, आम्ही सर्व विषयाच्या बाबतीत निष्काम झालो आहोत ४

३३४९ व्यापिलें सर्वत्र । बाहेरी भीतरी अंतर ॥ १ ॥
ऐसें गोविंदें गोविलें । बोलें न वजायें बोलिलें ॥ २ ॥
संचिताची होळी । करूनि जीव घेतला बळी ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे नाहीं । आतां संसारा उरी कांहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतर–अंतःकरण, मन, न वजायें–जाणार नाही.

अर्थ :– या श्रीहरीने माझे मन अंतर्बाह्य स्वरूपात व्यापून टाकले आहे, शिवा अंतर्बाह्य व्यापून राहाणारा हा श्रीहरी माझ्या अंतःकरणात आहे १ या गोविंदाने मला आपल्या स्वरूपाने गुतवून घेतले आहे ते सर्व बोलू म्हटले तर बोलून दाखविले जाणार नाही. २ माझे सर्व संचितकर्म जाळून याने माझ्या जीवभावाचा बळी घेतलेला आहे ३ तुकयाबंधू म्हणतात, यामुळे आता संसारात काही शिल्लक राहिलेले नाही काही त्रुटी उरलेली नाही ४

३३५० तुम्हांआम्हांसी दरुषण । जालें दुर्लभ भाषण ॥ १ ॥
म्हणऊनि करितो आतां । दंडवत घ्या समस्तां ॥ २ ॥
भविष्याचें माथां देह । कोण जाणे होइल काय ॥ ३ ॥
म्हणे तुकयाचा बांधव । आमचा तो जाला भाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा '– दरूषण–दर्शन.

अर्थ '– संतहो, तुमचेआमचे दर्शन झाले, संभाषण झाले, हीच दुर्लभ गोष्ट प्राप्त झाली १ म्हणूनच मी तुम्हा सर्वांना भक्तिभावाने नमस्कार करीत आहे, तो तुम्ही घ्यावा. २ माझे शरीर मी भविष्यकाळाच्या स्वाधीन केले आहे त्याचे काय होणार आहे कोण जाणे ! ३ तुकयाबंधू म्हणतात, आमचा मात्र भाव स्पष्ट आहे ४

३३५१ अनंतजन्में जरी केल्या तपरासी । तरी हा न पवसी म्हणे देह ॥ १ ॥
ऐसें जें निधान लागलेंसे हातीं । त्याची केली माती भाग्यहीना ॥ २ ॥
उत्तमाचें सार वेदाचें भांडार । ज्याच्यानें पवित्र तीर्थें होतीं ॥ ३ ॥
म्हणे तुकयाबंधु आणीक उपमा । नाहीं या तों जन्मा द्यावयासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तपरासी–तपाच्या राशी, न पवसी–पावत नाही, निधान–साठा.

अर्थ :– अनंत जन्म जरी तपाच्या राशी केल्या तरी तरी देह हाच आत्मा मानणाराना हा श्रीहरी कधीच पावत नाही. १ या भाग्यहीनाना या श्रीहरीच्या प्राप्तीचा साठा घागला हातो लागला असून तो न ओळखल्यामुळे त्यानी त्याची माती करून टाकली आहे. २ हा श्रीहरी म्हणजे सर्व उत्तमाचे सार असून सर्व वेदाचे हेच भांडार आहे. याच्यामुळेच सर्व तीर्थांना पवित्रपणा आलेला आहे ३ तुकयाबंधू म्हणतात, त्याला या जन्मात तरी दुसरी उपमा द्यावयास नाही ४

३३५२ आम्हांपाशीं सरे एक शुद्ध भाव । चतुराई जाणीव न लगे कळा ॥ १ ॥
सर्वजाण[1] माझा स्वामी पांडुरंग । तया अंगसंग गोपाळांसी ॥ २ ॥
तुका म्हणे कर्में[2] धर्में नये हातां । तयावरि सत्ता भाविकांची ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – सरे–पुरा होतो, मान्य होतो, जाणीव–ज्ञान, कळा–कला, चातुर्य, अंगसंग–निकटची संगत.

१ सर्व जाणे, २ कर्मधर्में

अर्थ – आम्हाला एक शुद्ध भावच पुरा होतो त्याच्याशिवाय इतर ज्ञानाच्या गोष्टी वा चातुर्याच्या गोष्टी आम्हाला लागत नाहीत १ हा माझा स्वामी पांडुरंग सर्व जाणणारा असल्याने त्याचीच निकटची सोबत सर्व गोपाळांना आहे किंवा तो इंद्रियांचा सांभाळ करणारा असल्याने मला त्याचीच सतत सोबत आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, हा नाना प्रकारची कर्मे व धर्मप्रकार करून कधी हाती लागत नाही किंवा हा कर्मधर्मसंयोगाने हाती लागत नसला तरी त्याच्यावर भाविकाची मात्र सत्ता असते ३

३३५३ प्रीति करी सत्ता । बाळा भीती मातापिता ॥ १ ॥
काय चाले त्याशीं बळ । आळी करितां कोल्हाळ ॥ २ ॥
पदरीं घाली मिठी । खेदी माग पुढें लोटी ॥ ३ ॥
बोले मना आले । तुका साहिला विठ्ठलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आळी–हट्ट, कोल्हाळ–आक्रोश, खेदी–कष्टाने

अर्थ – बालक मोठ्या प्रीतीने आपल्या आईबापावर सत्ता करीत असते आणि तेही त्याची भीती बाळगतात १ ते हट्ट करून आक्रोश करू लागले की मग त्याच्यापुढे आईबापाचे बळ काही केल्या चालत नाही २ ते मूल आपल्या आईबापाच्या पदरास धरून त्यांना कष्टाने मागेपुढे लोटीतच असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी माझ्या जसे मनात येते तसे बोलतो आणि ते या विठ्ठलाने सहन केले आहे ४

३३५४ आवडीचे भेटी निवे । चित्त पावे विश्रांती ॥ १ ॥
बरवियाचा छंद मना । नारायणा अवीट ॥ २ ॥
तुळणे काहीं साम्या पुरे । हे तों नुरेये रुचि ॥ ३ ॥
तुका म्हणे बरवें जालें । फावलें हे कळे त्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बरवियाचा–चांगल्याचा, नुरेये–उरत नाही बरवें–चांगले

अर्थ – ज्याची आवड आपल्या मनात आहे त्याची भेट होताच मन निवते त्याला विश्रांती मिळते १ नारायणा, जे जे चांगले आहे, त्याचा छंद मनाला लागला तर काही त्याचा वीट कधी येत नाही २ अशी अवस्था झाल्यावर मग काय त्याला उपमा द्यायला उरणार आहे ? त्याच्यासारखी गोडी इतरत्र कुठे उरणारच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याला समजले त्यालाच हे प्राप्त झाले ही गोष्ट फारच चांगली झाली ४

३३५५ केलियाचें दान । करा आपुलें जतन ॥ १ ॥
माझी बुद्धि स्थिर देवा । नाहीं विषयाचा हेवा ॥ २ ॥
भावा अंतराय । येती अंतरती पाय ॥ ३ ॥
तुका म्हणे जोडी । आदीं अंतीं राहो गोडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हेवा–हाव जोडी–प्राप्ती, प्राप्त करून घ्यावी

अर्थ – देवा तुम्ही मला जे दान म्हणून दिले आहे त्याचा सांभाळ तुमचा तुम्हीच करावा १ माझी बुद्धी तुमच्या पायी स्थिर असून तिला इतर विषयाची हाव कधी उरलेली नाही २ या माझ्या भावात अंतर पडल्यास तुमच्या पायाशी अंतर पडेल ते दुरावतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याची गोडी प्रथमपासून शेवटपर्यंत राहील अशाची प्राप्ती करून घ्यावी ४

३३५६ माझे हातीं आहे करावें चिंतन । तुम्ही कृपादान प्रेम द्यावें ॥ १ ॥
मागति यां भांडवल आळवण । नामाची जतन दातियासी ॥ २ ॥
बाळक धांवोनि आड निघे स्तनीं । घालावा जननी कृपे पान्हां ॥ ३ ॥
तुका म्हणे करीं कासवाचे परी । आहे सूत्रदोरी तुझे हातीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आळवण-विनंती, परी-प्रकाराने.

अर्थ :– देवा, माझ्या हाती तुझे चिंतन करावे एवढेच आहे. आणि तुम्ही मात्र मला आपल्या कृपेचे धन प्रेमाने द्यावे १ याचकाने अंत करणपूर्वक विनंती करावी, हेच त्याचे भांडवल आहे आणि दात्याने आपल्या नामाचे, कीर्तीचे जतन करावे हे चांगले २ बालक धावत येते, आईच्या साडीवर बसून आपले मुख तिच्या स्तनाशी लावते आणि आई मोठ्या प्रेमाने आपल्या दुधाचा पान्हा त्याच्या मुखात घालते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याप्रमाणे कासवी आपल्या कृपादृष्टीने बालकाचें रक्षण करीत असते, त्याप्रमाणे तुझ्या हातातच सर्वांचे रक्षण करण्याचे सूत्र असते ४

३३५७ वाट दावी त्याचें गेलें काय । नागवला जो वारितां जाय ॥ १ ॥
ऐसीं मागें ठकलीं किती । सांगतां खाती विषगोळा ॥ २ ॥
विचारोनि पाहे त्यास । न वजे जीवें नव्हे नास ॥ ३ ॥
तुका म्हणे जो रुसला जीवा । तयासी केशवा काय चाले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वारिता–सोडून जातो, ठकलीं-फसली, विचारोनि–विचार करून, न वजे–जात नाहीत.

अर्थ :– जे चागला मार्ग दाखवितात त्याचे काय जाते ? पण जो त्या मार्गाने जात नाही वा तो मार्ग सोडून जातो तो मात्र फसला जातो १ असे यापूर्वी कित्येक लोक फसलेले आहेत; किती जरी सांगितले तरी ते ऐकत नाहीत; हट्टाने विषाचा गोळा ते खातातच २ जे कुणी या वाईट मार्गाने जात नाहीत त्याच्या जीवाचा नाश कधीच होत नाही; याविषयी तू नीट विचार करून पाहा ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो कुणी आपल्या जीवावरच विटलेला आहे, त्याच्यापुढे केशवा, कुणाचे काय चालणार आहे ? ४

३३५८ अनुभवावांचून सोंग संपादणें । नव्हे हें करणें स्वहिताचें ॥ १ ॥
तैसा नको भुलों बाहिरल्या रंगें । हित तेचि वेगें करूनि घेईं ॥ २ ॥
बहुरूपीं रूपें नटला नारायण । सोंग संपादून जैसा तैसा ॥ ३ ॥
पाषाणाचे नांव ठेवियेले देव । आणिका तारी भाव परि तो तैसा ॥ ४ ॥
कनक झाड म्हुण वंदियेले मायां । परि तें अर्थां न मिळे माजी ॥ ५ ॥
तुका म्हणे त्याचा भाव तारी त्यास । अहंभावीं नास तोचि पावे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पाषाणाचे–दगडाच्या देवाचे, आणिका–इतराना.

अर्थ :– परमार्थविषयक अनुभव अंगी पाहिजे त्याशिवाय नुसते बाह्यपात्कारी सोंग सजवणे हे काही स्वहिताचे नाही १ त्याप्रमाणे तू वरवरच्या रंगास भुलून जाऊ नकोस जे हिताचे आहे तेच लवकर साध्य करून घे २ हा बहुरूपी नारायण अनेक प्रकारची सोंगे घेऊन नटलेला आहे पण नाना प्रकारची सोंगे सजवूनही हा जसा होता तसाच राहिला आहे. ३ दगडाच्या मूर्तीला देव मानून जरी त्याची मनोभावे भक्ती केली तरी भाविक लोक

तरून जातात, पण तो दगड मात्र जसाच्या तसाच राहातो ४ आपटयाच्या झाडाला सुवर्णाचे झाड म्हणून किंमत दिली, त्याला वंदन केले, तरी ते काही खऱ्या अर्थाने सुवर्णाचे ठरत नाही. ५ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचा जसा भाव शुद्ध असेल तसा तो त्यास तारील, पण ज्याचा अहंभाव सुटला नाही तो नाशच पावेल ६

३३५९ मज नष्टा माया मोह नाहीं लोभ । अधिक हा[1] क्षोभ आदराचा ॥ १ ॥
धिग हे शरीर अनउपकार । न मनी आभार उपकाराचा ॥ २ ॥
मजहून नष्ट आहे ऐसा कोण । नावडे मिष्टान्न बहुमोल ॥ ३ ॥
न दिसती मज आपलेसे गुण । संचित तें कोण जाणे मागे ॥ ४ ॥
तुका म्हणे माझें[2] देखोनियां काई । पांडुरंगा पायीं राखियेलें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- न मनी-मानीत नाही

अर्थ :- मला कुणाची माया नाही, की कुणाचा लोभ नाही. म्हणून कुणी माझ्याविषयी आदर दाखविला तर मला फारच राग येतो असा मी नष्ट आहे १ दुसऱ्यांनी उपकार केले तर त्याचे आभारही मी मानीत नाही. असे हे माझे शरीर अनुपकारी आहे त्याचा धिक्कार असो २ मला कुणी चांगले किंमतवान मिष्टान्न जरी घातले तरी मला ते आवडत नाही या बाबतीत माझ्यासारखा नष्टदुष्ट कुणी तरी असेल का ? ३ मला माझ्या जवळचे गुण कधी दिसत नाहीत, आणि पूर्वसंचित काय आहे, हे तरी कुणी जाणले आहे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जवळचे कोणते पुण्य या पांडुरंगाने पाहिले व आपल्या पायाजवळ मला थारा दिला हे काही समजत नाही. ५

३३६० मतिविण[3] काय वर्णू तुझें ध्यान । जेथें पडिलें मौन वेदश्रुती ॥ १ ॥
करूनि गोजिरा आपुलिये मती । धरियेलें चित्तीं चरणकमळ ॥ २ ॥
सुखाचें ओतिलें पाहों तें श्रीमुख । तेणें हरे भूक तान माझी ॥ ३ ॥
रसना गोडावली ओव्या गातां गीत । पावलेसे चित्त समाधान ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी दृष्टि चरणांवरी । पाउलें गोजिरीं कुंकुमाचीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .- मतिविण-बुद्धीशिवाय, मती-मतीने, बुद्धीने, रसना-जीभ.

अर्थ :- देवा, बुद्धीशिवाय मी तुझ्या स्वरूपाचे वर्णन तरी कसे करू रे ? कारण तुझे वर्णन करताना वेद-श्रुतीसुद्धा मुक्या झाल्या आहेत १ म्हणून मी माझ्या अल्पबुद्धीनेच तुझ्या गोजिरवाण्या रूपाचा विचार करून तुझे चरणकमल मी माझ्या चित्तात धारण केले आहेत २ देवा, तुझे मुख हे जणु सुखाचेच ओतलेले दिसते तेच श्रीमुख मी वारंवार पाहीन. त्यामुळे माझी तहानभूक निवारण होऊन जाते ३ तुझ्या गुणाच्या ओव्या गातागाताच माझी जीभ सुखावून गेली आहे माझ्या चित्तास पूर्ण समाधान झाले आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमची पावले कुंकवासारखी लाल व मृदू असून शोभिवंत आहेत त्यांच्यावर माझी दृष्टी खिळून राहिलेली आहे ५

विवरण :-- या एका भावभक्ति अभंगात तुकोबा नम्रत्वाने, संकोचाने श्रीहरीच्या कृपेचे मोठे हृद्य वर्णन करीत आहेत या श्रीहरीचे वर्णन करताना वेदश्रुती मुक्या झाल्या तथे मी मतिहीन त्याचे वर्णन कसे करणार ? असे नम्रत्व मनात धारण करून तुकोबानी आपल्या चित्तात श्रीहरीचे चरणकमळ तेवढे धारण केले प्रत्यक्ष मूर्तिमंत सुखच असे त्याचे श्रीमुख पाहून ते तृप्त झाले त्यांची तहानभूक हरपून गेली त्याचे गुणगान गातागाता त्यांचे मन शांत झाले समाधानाने हृदय काठोकाठ भरले श्रीहरीची सुकुमार व कुंकुममिश्रित पावले पाहून त्यांचे चित्त भारावून गेले श्रीहरीशी ते तन्मय होऊन गेलेले दिसतात येथे

१ तो, २ आता, ३ मतिहीण.

३३६१ ओस जाल्या दिशा मज भिंगुळवाणे[1] । जीवलग नेणे मज कोणी ॥ १ ॥
भय वाटे देखें श्वापदांचे भार । नव्हे मज धीर पांडुरंगा ॥ २ ॥
अंधकारापुढे न चलवे वाट । लागतील खुंट कांटे अंगा ॥ ३ ॥
एकला नि संग फांकती मारग । मितो[2] नव्हे लाग चालावया ॥ ४ ॥
तुका म्हणे वाट दावूनि सद्गुरु । राहिला हा दुरु[3] पांडुरंग ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – भिंगुळवाणें–भयानक, उदासवाणे, भार–थवे, समुदाय, फांकती–फुटतात, निघतात, लाग–खटपट, प्रयत्न

अर्थ – देवा, तुझ्याशिवाय साऱ्या दिशा मला ओस पडलेल्या दिसत आहेत त्यामुळे मला भारी उदासवाणे वाटत आहे मला येथे कुणी जिवलग सखा आहे असे समजत नाही. १ अशा या अरण्यामध्ये भयानक श्वापदाचे थवे असून त्याचे मला फार भय वाटत आहे. पांडुरंगा, यामुळे येथे मला आता धीर धरवत नाही. २ पुढे मोठा अंधार पडलेला असल्याने मला वाट चालवत नाही आणि चालेन तर माझ्या अंगास काटेकुटे मात्र ओरबाडतात. ३ या अरण्यात वाटा तर अनेक फुटल्या आहेत, आणि मी तर एकटाच आहे म्हणून मार्ग चालण्याचा प्रयत्न करण्यात मी फार भीत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझा सद्‌गुरुनाथ पांडुरंग याने मला वाट दाखविली, पण नंतर मात्र तो दूर जाऊन उभा राहिला आहे ५

विवरण –यामागील अभंगाच्या उलट असा भाव या एका भावगम्य अभंगात आलेला आहे श्रीहरी दुरावलेला आहे जवळ कुणी इतर जिवलग नाही, आणि पांडुरंगा, आता रस्त्याने जाताना हिंस्र श्वापदाचे भय फार वाटत आहे रे मला आता धीर धरवत नाही मनाची ही कातरता व कंपायमान अवस्था तुकोबानी मोठ्या रेखीवपणे उभी केलेली आहे पुढे रस्त्यावर अंधार पसरलेला आहे. त्यामुळे पायास, अंगास काटेकुटे बोचतात या भयानक अवस्थेतून एकट्याने मार्ग तरी कसा सुधारावा ?कारण मध्येच अनेक मार्ग दिसतात यातून कोणता मार्ग सुधारावा ? असा मनास संभ्रम वाटतो. यातून कुणा सद्‌गुरूने, पांडुरंगाने हाती धरून वाट दाखवावी अशी बुवांची तीव्र इच्छा आहे बुवांच्या मनास ' भिंगुळवाणें ' वाटत असले तरी त्याही अवस्थेत एक प्रकारचे माधुर्य आहे

३३६२ उदार कृपाळ सांगसी जना । तरी कां त्या रावणा मारियेलें ।
नित्य नित्य पूजा करी श्रीकमळीं । तेणें तुझें काय केलें ॥ १ ॥
काय बडिवार सांगसी वांयां । ठावा पंढरिराया आहेसि आम्हां ।
एकलाचि जरी देऊं परिहार । आहे दुरिवरी सीमा ॥ २ ॥
कर्णाऐसा वीर उदार जुंझार । तो तुवां जर्जर केला बाणीं ।
पडिला भूमी परी नयेची करुणा । दांत पाडियेले दोन्ही ॥ ३ ॥
श्रियाळ बापुडे सात्विकवाणी । रांधलें कापूनि त्याचें पोर ।
ऐसा कठिण कोण होईल दुसरा । उखळीं कांडविलें शिर ॥ ४ ॥
शिबी चक्रवर्ती करितां यज्ञयाग । त्याचे चिरिले अंग ठायीं ठायीं ।
जाचउनि प्राण घेतला मागें । पुढें न पाहतां कांहीं ॥ ५ ॥
बळीचा अन्याय सांग होता काय । बुडविला तो पाय देउनि माथां ।
कोंडिलें दार हा काय कहार । सांगतोसी चित्र कथा ॥ ६ ॥

१ हिंगुळवाणें, २ होतो, ३ दुरी

तरून जातात, पण तो दगड मात्र जसाच्या तसाच राहातो. ४ आपट्याच्या झाडाला सुवर्णाचे झाड म्हणून किंमत दिली, त्याला वंदन केले, तरी ते काही खऱ्या अर्थाने सुवर्णाचे ठरत नाही. ५ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचा जसा भाव शुद्ध असेल तसा तो त्यास तारील, पण ज्याचा अहंभाव सुटला नाही तो नाशच पावेल ६

३३५९ मज नष्टा माया मोह नाहीं लोभ । अधिक हा[1] क्षोभ आदराचा ॥ १ ॥
धिग हे शरीर अनउपकार । न मनी आभार उपकाराचा ॥ २ ॥
मजहून नष्ट आहे ऐसा कोण । नावडे मिष्टान्न बहुमोल ॥ ३ ॥
न दिसती मज आपलेसे गुण । संचित तें कोण जाणे मागे ॥ ४ ॥
तुका म्हणे माझें[2] देखोनियां काई । पांडुरंगा पायीं राखियेलें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– न मनी–मानीत नाही

अर्थ :– मला कुणाची माया नाही, की कुणाचा लोभ नाही. म्हणून कुणी माझ्याविषयी आदर दाखविला तर मला फारच राग येतो असा मी नष्ट आहे १ दुसऱ्यांनी उपकार केले तर त्याचे आभारही मी मानीत नाही. असे हे माझे शरीर अनुपकारी आहे त्याचा धिःकार असो २ मला कुणी चांगले किंमतवान मिष्टान्न जरी घातले तरी मला ते आवडत नाही या बाबतीत माझ्यासारखा नष्टदुष्ट कुणी तरी असेल का ? ३ मला माझ्या जवळचे गुण कधी दिसत नाहीत; आणि पूर्वसंचित काय आहे, हे तरी कुणी जाणले आहे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जवळचे कोणते पुण्य या पांडुरंगाने पाहिले व आपल्या पायाजवळ मला थारा दिला हें काही समजत नाही. ५

३३६० मतिविण[3] काय वर्णू तुझें ध्यान । जेथें पडिलें मौन वेदश्रुती ॥ १ ॥
करूनि गोजिरा आपुलिये मती । धरियेलें चित्तीं चरणकमळ ॥ २ ॥
सुखाचें ओतिलें पाहीं तें श्रीमुख । तेणें हरे भूक तान माझी ॥ ३ ॥
रसना गोडावली ओव्या गातां गीत । पावलेंसे चित्त समाधान ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी दृष्टि चरणांवरी । पाउलें गोजिरीं कुंकुमाचीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मतिविण–बुद्धीशिवाय, मती–मतीने, बुद्धीने, रसना–जीभ.

*अर्थ :– देवा, बुद्धीशिवाय मी तुझ्या स्वरूपाचे वर्णन तरी कसे करू रे ? कारण तुझे वर्णन करताना वेद-*श्रुतीसुद्धा मुक्या झाल्या आहेत १ म्हणून मी माझ्या अल्पबुद्धीनेच तुझ्या गोजिरवाण्या रूपाचा विचार करून तुझे चरणकमल मी माझ्या चित्तात धारण केले आहेत २ देवा, तुझे मुख हे जणु सुखानेच ओतलेले दिसते तेच श्रीमुख मी वारंवार पाहीन. त्यामुळे माझी तहानभूक निवारण होऊन जाते ३ तुझ्या गुणाच्या ओव्या गाताना गाताच माझी जीभ सुखावून गेली आहे माझ्या चित्तास पूर्ण समाधान झाले आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमची पावले कुंकवासारखी लाल व मृदू असून शोभिवत आहेत त्यांच्यावर माझी दृष्टी खिळून राहिलेली आहे. ५

विवरण :-- या एका भावभरित अभंगात तुकोबा नम्रत्वाने, मनोभावाने श्रीहरीच्या कृपेचे मोठे हृद्य वर्णन करीत आहेत या श्रीहरीचे वर्णन करताना वेदश्रुती मुक्या झाल्या तेथे मी मतिहीन त्याचे वर्णन कसे करणार ? असे नम्रत्व मनात धारण करून तुकोबांनी आपल्या चित्तात श्रीहरीचे चरणकमळ तेवढे धारण केले प्रत्यक्ष मूर्तिमंत सुखच असे त्याचे श्रीमुख पाहून ते तृप्त झाले. त्याची तहानभूक हरपून गेली त्याचे गुणगान गाताना गाताना त्याचे मन शांत झाले समाधानाने हृदय काठोकाठ भरले श्रीहरीची सुकुमार व कुंकुममिश्रित पावले पाहून त्याचे चित्त भारावून गेले. श्रीहरीशी ते तन्मय होऊन गेलेले दिसतात येथे

१ तो, २ आता, ३ मतिहीण.

गेला शिवी हा एक दानशूर राजा याची परीक्षा पाहाण्यासाठी अग्नीने कपोताचे व इंद्राने श्येनाचे रूप धारण करून श्येन कपोताच्या मागे लागला कपोत शिवी राजापाशी आश्रय मागू लागला, तेव्हा राजाने त्याला आधार दिला त्यावर 'आपले भक्ष्य द्यावे' असा आग्रह श्येनाने धरला त्याच्या आग्रहपूर्वक विनतीचा स्वीकार म्हणून याने आपल्या शरीरातील मास श्येनास दिले याचे हे औदार्य पाहून अग्नी व इंद्र सतुष्ट झाले व स्तुती करून निघून गेले. याच्या दातृत्वाच्या आणखीही कथा आहेत यानेही आपल्या बृहद्गर्भ नावाच्या पुत्राचे मास एकदा अतिथीस शिजवून घातले होते

३३६३ जे केली आळी ते अवघी गेली वांयां । उरला पंढरिराया श्रम माझा ॥ १ ॥
काय समाधान केले कोणें वेळे । कोणे[1] माझें लळे पाळियेले ॥ २ ॥
आभास ही नाहीं स्वप्नीं दुश्चिता । प्रत्यक्ष बोलतां कइचा तो ॥ ३ ॥
आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसे जगामाजी जाले ॥ ४ ॥
तुका म्हणे आता नाहीं भरवसा । मोकलीसी ऐसा वाटतोसी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आळी–हट्ट, मोकलीसी–सोडून देतोस

अर्थ – पंढरीराया, मी जो जो हट्ट केला तो तो वायाच गेला असे वाटते माझे या बाबतीतील श्रम मात्र उरले आहेत १ तू माझे कधी कोणत्या वेळी समाधान केले आहेस ? कोणते माझे लाड पूर्ण केले आहेस ? २ तुझ्या भेटीचा माझ्या कष्टी चित्तात स्वप्नातसुद्धा आभास होत नाही मग तू प्रत्यक्ष भेटून बोलणेचालणे कुठून येणार ? ३ पांडुरंगा, तुझ्या भक्ताची ही अशी दशा झालीसे पाहून मला फारच लाज वाटू लागली आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला तुझा काहीच भरवसा नाही. तू मला सोडून देतोस असेच मला वाटते. ५

३३६४ समश्रुळित असतां वाचा । घोष न करिसी का नामाचा ॥ १ ॥
का रे वैष्णव नव्हेसी । कवण्या दंभें नागवलासी ॥ २ ॥
हरि हरि म्हणता लाजसी । गर्वें फुगोनि चालसी ॥ ३ ॥
तारुण्यें उताणा । पुंसेविण बांडा सुना ॥ ४ ॥
जालेसि महिमेचे वेडें । नाचों लाजसी दिंडीपुढें ॥ ५ ॥
अळकाराच्यानि बळें । वचलासी तुळसीमाळें ॥ ६ ॥
कैसा सकुमार जालासी । म्हणसी न स्के एकादशी ॥ ७ ॥
स्नान न करिसी आघोळी । विभुती न लाविसी कपाळीं ॥ ८ ॥
वरिवरि न्याहाळिसी त्वचा । उपेग नाहीं मासाचा ॥ ९ ॥
पद्मनाभी विश्वनाथ । तुका अङ्गून रडत ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – समश्रुळित-सुरेख, चांगली, नव्हेसी–होत नाहीस, बांडा–पांढरे-काळे, सुना–कुत्रा, वचलासी–वंचित झालास, न टके–सहन होत नाही, टिकाव धरवत नाही, त्वचा–चामडी, कातडे.

अर्थ – चांगली सुरेख वाणी दिलेली असताना तू नामाचा घोष का बरे करीत नाहीस ? १ तू अंत:करणाने वैष्णव का होत नाहीस ? कोणत्या अशा दभाने नागवला गेला आहेस ? २ श्रीहरीचे नाम घेताना मात्र लाजतोस, आणि इतरत्र मात्र गर्वाने फुगून चालतोस ३ तारुण्याच्या गर्वाने सतत छाती पुढे करून चालतोस तू. यामुळे शेपटाशिवाय एक काळ्यापांढऱ्या रंगाचा कुत्राच बनला आहेस ४ स्वत च्या माहात्म्याने तू वेडावून गेला आहेस, पण वारकऱ्यांच्या दिंडीत मात्र नाचण्यास लाजतोस ५ अंगावर नाना प्रकारचे अलंकार घालून तू बलवान

१ कोण.

हरिश्चंद्राचे राज्य घेउनिया सर्व । विकविला जीव डोंबाघरीं ।
पाडिला विघड नळा दमयंतीमधीं । ऐसी तुझी बुद्धि हरि ॥ ७ ॥
आणिकही गुण सांगावे किती । केलिया विपत्ति माउसीच्या ।
वधियेला मामा सखा पुरुषोत्तमा । म्हणे बंधु तुकयाचा ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :— श्रीकमळीं–शिरकमळांनी, बडिवार–महत्त्व, बडेजाव, परिहार–समर्थन, निरसन, खादले–खाल्ले.

अर्थ – श्रीहरी, आपण मोठे उदार व कृपाळू आहोत असे तू लोकांना सांगतोस मग त्या रावणास का मारलेस ? त्याने तुझे काय केले होते रे ? तो तर नित्य स्वतःची शिरकमळें वाहून तुझी पूजा करण्यास तयार होता १ पंढरीराया, उगाच स्वतःचा बडेजाव कशास सांगतोस ? काय आहे ते आम्हास माहीत आहे मी एकटाच असलो तरी मला या मुद्याचे समर्थन चांगले करता येईल तुझ्या या अशा कृत्याची मर्यादा दूरपर्यंत वाढविण्यासारखी आहे २ कर्णासारखा उदार व झुंजार वीर तू आपल्या बाणांनी जर्जर केलास तो शेवटी भूमीवर पडला तरी तुला त्याची दया आली नाही तू त्याचे दोनही दात पाडलेस ३ राजा श्रियाळ हा बापडा अगदी सात्त्विक असा होता पण तू त्याचे पोर कापून खाल्लेस त्याचे शिर तू उखळात काढून मागितलेस तुझ्यासारखा एवढा मोठा निष्ठुर दुसरा कोण आहे रे ? ४ चक्रवर्ती राजा शिबी याने यज्ञयाग आरंभला तेव्हा तुम्ही त्याचे अंग ठिकठिकाणी चिरलेत मागे-पुढे काहीच न पाहाता त्याचा प्राण तुम्ही त्याला जाच करून घेतला ५ बळी राजाचा काय अन्याय होता ते सांगा पाहू पण त्याच्या डोक्यावर पाय ठेवून तुम्ही त्याला बुडविले त्याचे दार कोंडून कहार केला अशा चित्रकथा आणखी किती सांगाव्यात ? ६ राजा हरिश्चंद्राचे सर्व राज्य तू घेतलेस, आणि त्याला त्याचा जीव डोंबाघरी विकावा लागला. नळदमयंती या पतिपत्नींत तू बिघाड केलास श्रीहरी, अशी तुझी बुद्धी आहे ७ तुकयाबंधू म्हणतात, पुरुषोत्तमा, आणखी तुझे गुण किती रे सांगावेत ? तू आपल्या मावशीस विपत्तीत लोटलेस सखा असलेल्या कंसमामाचा तू वध केलास ८

विवरण –– या एका अभंगात तुकयाबंधूनी उपरोधिक भाषेत श्रीहरीच्या कनवाळूपणाचे व उदारपणाचे वर्णन केले आहे हा श्रीहरी किती उदार व कृपाळू म्हणून सांगावा ? स्वतःची शिरकमळें वाहून पूजा करणाऱ्या रावणाचा हा वध करतो उदार व झुंजार अशा कर्णाला तो संकटप्रसंगी असताना हा जर्जर करून सोडतो सात्त्विक व बापुडा श्रीयाळ राजा किती सतावला गेला ! या श्रीहरीने त्याचे एकुलते एक पोर उखळात काढून मागितले चक्रवर्ती शिबिराजाचे याने अंग चिरून टाकले दानशूर बळी राजास याने पाताळात दडपून टाकले सत्यनिष्ठ हरिश्चंद्राचे राज्य तर याने हिरावून घेतलेच, पण त्याला डोंबाघरी कष्ट करायला लावले याने पुण्यश्लोक नळदमयंतीत बिघाड उत्पन्न केला याने आपल्या मावशीचा व मामाचाही घात केला श्रीहरीची ही वरवर घोर अन्यायाची वाटणारी कृत्ये वर्णन करून तुकयाबंधूनी त्याच्या उदार वृत्तीचे व कृपाळूपणाचे चांगलेच दर्शन घडविले आहे वरवर निष्ठुरपणाच्या वाटणाऱ्या श्रीहरीच्या या कृत्यामागे दडलेला कनवाळूपणा सर्वांच्या परिचयाचा आहे कधी सत्त्व पाहाण्यासाठी, कधी परीक्षा पाहाण्यासाठी, कधी कसोटी बघण्यासाठी श्रीहरी आपल्या भक्तावरही संकटाची परंपरा निर्माण करतो संकटातून व दुःखद प्रसंगातून ईश्वराच्या स्मरणाची तीव्रता अधिक वाढते संकटे व दुःखद प्रसंग याचे वास्तविक स्वरूपही ध्यानात येते या अभंगातील रावण, कर्ण, श्रियाळ राजा, शिबी राजा, बळी राजा, हरिश्चंद्र, नळदमयंती इत्यादींची उदाहरणे सर्वप्रसिद्ध अशीच आहेत

रावण हा पुलस्त्यपुत्र विश्रव्याचा मुलगा याला कुबेरासारखे श्रीमंत व्हावयाचे होते म्हणून तपश्चर्या करण्यासाठी हा गोकर्णक्षेत्रात गेला तेथे याने दहा हजार वर्षे तपश्चर्या केली प्रत्येक हजार वर्षांच्या शेवटी हा आपले एक एक मस्तक अग्नीत समर्पण करीत असे शेवटी यास ब्रह्मदेव अथवा शंकर प्रसन्न झाले व मनुष्येतर प्राण्यापासून अवध्यत्व मिळाले या वराने हा बेताल झाला याने इंद्रादी देवांना जिंकले, वेदवतीवर जबरी करण्याचा याने प्रयत्न केला रामचंद्राची पत्नी सीता याने पळवून आणली शेवटी रामरावणयुद्धात हा रामाकडून मारला

गेला. शिबी हा एक दानशूर राजा याची परीक्षा पाहण्यासाठी अग्नीने कपोताचे व इंद्राने श्येनाचे रूप धारण करून श्येन कपोताच्या मागे लागला. कपोत शिबी राजापाशी आश्रय मागू लागला, तेव्हा राजाने त्याला आधार दिला. त्यावर 'आपले भक्ष्य द्यावे' असा आग्रह श्येनाने धरला. त्याच्या आग्रहपूर्वक विनतीचा स्वीकार म्हणून याने आपल्या शरीरातील मास श्येनास दिले. याचे हे औदार्य पाहून अग्नी व इंद्र संतुष्ट झाले व स्तुती करून निघून गेले. *याच्या दातृत्वाच्या आणखीही कथा आहेत. यानेही आपल्या बृहद्गर्भ नावाच्या पुत्राचे मास एकदा अतिथीस शिजवून घातले होते.*

**३३६३ जे केली आळी ते अवघी गेली वांयां । उरला पंढरिराया श्रम माझा ॥ १ ॥**
**काय समाधान केलें कोणे वेळे । कोणे[1] माझे लळे पाळियेले ॥ २ ॥**
**आभास ही नाहीं स्वप्नीं दुश्चिता । प्रत्यक्ष बोलतां कइंचा तो ॥ ३ ॥**
**आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसे जगामाजी जाले ॥ ४ ॥**
**तुका म्हणे आतां नाहीं भरवसा । मोकलीसी ऐसा वाटतोसी ॥ ५ ॥**

शब्दार्थ व टीपा :– आळी–हट्ट, मोकलीसी–सोडून देतोस.

अर्थ – पंढरीराया, मी जो जो हट्ट केला तो तो वायाच गेला असे वाटते. माझे या बाबतीतील श्रम मात्र उरले आहेत. १ तू माझे कधी कोणत्या वेळी समाधान केले आहेस ? कोणते माझे लाड पूर्ण केले आहेस ? २ तुझ्या भेटीचा माझ्या कष्टी चित्तात स्वप्नातसुद्धा आभास होत नाही. मग तू प्रत्यक्ष भेटून बोलणेचालणे कुठून येणार ? ३ *पांडुरंगा, तुझ्या भक्ताची ही अशी दशा झालीसे पाहून मला फारच लाज वाटू लागली आहे.* ४ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला तुझा काहीच भरवसा नाही. तू मला सोडून देतोस असेच मला वाटते. ५

**३३६४ समश्रुळित असतां वाचा । घोष न करिसी का नामाचा ॥ १ ॥**
**का रे वैष्णव नव्हेसी । कवण्या दंभें नागवलासी ॥ २ ॥**
**हरि हरि म्हणता लाजसी । गर्वें फुगोनि चालसी ॥ ३ ॥**
**तारुण्यें उताणा । पुंसेविण बांडा सुना ॥ ४ ॥**
**जालेसि महिमेचें वेडें । नाचो लाजसी दिंडीपुढें ॥ ५ ॥**
**अळकाराच्यानि बळें । वंचलासी तुळसीमाळें ॥ ६ ॥**
***कैसा सुकुमार जालासी । म्हणसी न टके एकादशी ॥ ७ ॥***
**स्नान न करिसी आघोळी । विभुती न लाविसी कपाळीं ॥ ८ ॥**
**वरिवरि न्याहाळिसी त्वचा । उपेग नाहीं मांसाचा ॥ ९ ॥**
**पद्मनाभी विश्वनाथ । तुका अझून रडत ॥ १० ॥**

शब्दार्थ व टीपा – समश्रुळित-सुरेख, चांगली, नव्हेसी–होत नाहीस, बांडा–पांढरे-काळे, सुना–कुत्रा, वंचलासी–वंचित झालास, न टके–सहन होत नाही, टिकाव धरवत नाही, त्वचा–चामडी, कातडे.

अर्थ :– चांगली सुरेख वाणी दिलेली असताना तू नामाचा घोष का बरे करीत नाहीस ? १ तू अंत:करणाने वैष्णव का होत नाहीस ? कोणत्या अशा दंभाने नागवला गेला आहेस ? २ श्रीहरीचे नाम घेताना मात्र लाजतोस, आणि इतरत्र मात्र गर्वाने फुगून चालतोस. ३ तारुण्याच्या गर्वाने सतत छाती पुढे करून चालतोस तू. *यामुळे शेपटाशिवाय एक काळ्यापांढऱ्या रंगाचा कुत्राच बनला आहेस.* ४ स्वत:च्या माहात्म्याने तू वेडावून गेला आहेस, पण वारकऱ्यांच्या दिंडीत मात्र नाचण्यास लाजतोस. ५ अंगावर नाना प्रकारचे अलंकार घालून तू बलवान

[1] कोण.

विवरण – या एका अभंगात श्रीहरीच्या कृपेच्या अनुभवाने आपल्या मनाची तृप्ती कशी झाली याचे वर्णन तुकाराम महाराज करीत आहेत श्रीहरीची प्राप्ती होण्याआधी सर्वांग कसे तप्त झाले होते ! चिंतेने, विरहाच्या अग्नीने अंग होरपळून निघाले होते पण या विठ्ठलाचा साक्षात्कार झाला सर्वत्र जगात विठ्ठलच भरून राहिलेला आहे अशी अनुभूती आली, आणि तुकोबाचे अंग निवून गेले मग आतील दुःखाचा अंशही उरला नाही भेदाची भावना समूळ नष्ट झाली. कारण आपण व श्रीहरी वेगळे आहोत, या भेदभावनेतच तीव्र स्वरूपाचे दुःख आहे पण एकदा हा द्वैतभाव नाहीसा झाला की मग सुखच सुख अनुभवास येते केशवाच्या रंगाने, प्रीतीच्या रंगाने रंगून गेलेल्या जीवाचे सुख काय वर्णन करावे ?

३३६८ विठ्ठल सोयरा सज्जन विसावा । जाइन त्याच्या गावा भेटावया ॥ १ ॥
सीण भाग त्यासी सांगेन आपुला । तो माझा बापुला सर्व जाणे ॥ २ ॥
माय माउलिया बंधुवर्गा जाणा । भाकीन करुणा सकळिकांसी ॥ ३ ॥
संत महंत सिद्ध महानुभाव मुनि । जीवभाव जाऊनि सांगेन त्या ॥ ४ ॥
माझिये माहेरीं सुखा काय उणें । न लगे येणें जाणें तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– सीण भाग–त्रासाची, कष्टाची हकीगत, बापुला–बाप.

अर्थ – हा विठ्ठल माझा सज्जन असा सोयरा असून माझ्या विश्रांतीचे ते स्थान आहे मी त्याला भेटण्यासाठी त्याच्याच गावाला जाईन १ मी त्याला मला झालेले सर्व कष्ट सांगेन कारण तो माझा बाप असून सर्व जाणणारा आहे २ त्याच्याच ठिकाणी माझी माऊली आहे, बंधू इत्यादी आहेत, असे जाणा त्या सर्वांपुढे मी काकुळतीने करुणा भाकेन ३ संतमहंत, सिद्ध, ऐश्वर्याचा अनुभव घेणारे मुनी असे जे कुणी आहेत त्यांना मी माझ्या जीवाचे हितगुज जाऊन सांगेन ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या माझ्या माहेरच्या ठिकाणी सुखाला काय उणीव आहे ? येथे म्हणून जन्ममृत्यूचा प्रश्नच निर्माण होत नाही. ५

विवरण — या आणखी एका भावपूर्ण अभंगात तुकोबा विठ्ठलासच आपला एकमेव सोयरा मानतात लौकिक सृष्टीमधील मायबाप, बंधू, मित्र, आप्त, मुले यांचा प्रसंगी काहीही उपयोग होत नाही आपली खरी माऊली श्रीविठ्ठल, आपला खरा पिता श्रीविठ्ठल, हाच आपला सज्जन सोयरा होय, अशी तुकारामाच्या मनाची निष्ठा आहे मोठ्या लडिवाळपणे तुकोबा म्हणत आहेत, मी या माझ्या पित्याच्या गावा जाईन माझ्या मनास झालेला त्रास मी त्यालाच सांगेन त्याला पाहताच आपला सर्व शीण दूर होईल कारण हा ' बापुला आपले सर्व दुःख जाणत आहे त्याला सांगण्याचीही जरूरी नाही या आपल्या माहेरघरी काय कमी आहे ? एकदा तेथे गेल्यानंतर मग जाणेयेणे-सुद्धा सुटून जाते असा मोठा हृद्य व मनोरम भाव या अभंगात व्यक्त झाला आहे

३३६९ ध्याइन तुझें रूप गाइन तुझें नाम । आणीक न करीं काम जिव्हामुखें ॥ १ ॥
पाहिन तुझे पाय ठेविन तेथें[1] डोय । पृथक तें काय न करीं मनीं[2] ॥ २ ॥
तुझेचि गुणवाद आइकेन कानीं । आणिकांची वाणी पुरे आतां ॥ ३ ॥
करिन सेवा करीं चालेन मी पायीं । आणीक न वजें ठायीं तुजविण ॥ ४ ॥
तुका म्हणे जीव ठेविला तुझ्या पायीं । आणीक तो काई देऊं कोणा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पृथक–वेगळे, निराळे, न वजें–जाणार नाही

अर्थ – मी तुझ्या रूपाचे ध्यान करीन आणि गाईन तर तुझेच नाम गाईन यांशिवाय दुसरे कोणतेच काम माझी जीभ व माझे मुख करणार नाहीत. १ देवा, जेथे जेथे मी तुझे पाय पाहीन तेथे तेथे नम्र होऊन मी

१ मी, २ थान

झालास, व त्या गर्वामुळे तुळशीची पवित्र माळ गळयात घालण्यास मात्र मुकलास ६ एकादशीचा उपवास सहन होत नाही तुला, असा तू सुकुमार बनला आहेस ७ शुचिर्भूत होऊन तू कधी स्नान करणार नाहीस व कपाळाला भस्माची विभूती लावणार नाहीस ८ तू वरवर मात्र आपली कातडी न्याहाळून पाहातोस, पण या चर्ममासाचा काहीच उपयोग नाही. ९ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे लोक पाहून पद्मनाभो, विश्वनाथा, मी असाच अजून रडत उभा आहे. १०

३३६५ वाघाचा कालभूत[1] दिसे वाघाऐसा । परी नाही दशा साच अंगी ॥ १ ॥
बाहेरील रंग निवडी कसोटी । संघट्टणे भेटी आपेआप ॥ २ ॥
सिकविले तैसे नाचावे माकडें । न चले त्यापुढें युक्ति कांहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे करी लटिक्याचा सांटा । फजित तो खोटा शीघ्र होय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कालभूत-काळभूत, पेंढा भरून ठेवलेले वाघाचे रूप, साच-खरी, सांटा-साठा

अर्थ :- पेंढा भरून ठेवलेले वाघाचे रूप वाघासारखे दिसते, पण खरोखर तेथे वाघाचा जिवंतपणा काही नसतो. १ बाहेर मुलाम्याचा रंग जरी असला तरी त्या नाण्याचा खरेपणा कसोटीच्या दगडावर उतरतो. त्याचप्रमाणे नित्याच्या परिचयाने वारंवार भेट होताच आपोआप खरे स्वरूप समजून येते २ माकडास जसे शिकवावे तसे ते नाचते त्याच्यापुढे दुसरी युक्ती कुणाची कधी चालत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे याप्रमाणे खोट्याचाच संग्रह करतात, त्यांची तावडतोब अशी फजीती होत असते ४

३३६६ सिंदळीचे सोर[2] चोराची दया । तो ही जाणा तया सवसर्गी ॥ १ ॥
फुकासाटीं भोगे दुःखाचा तो वाटा । उभारोनि कांटा वाटेवरी ॥ २ ॥
सर्प पोसूनिया दुधाचा ही नास । केले थीता विष अमृताचे ॥ ३ ॥
तुका म्हणे यासी न करितां दंडण । पुढिल्या खंडण नव्हे दोषा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- सोर-सोयरे, आप्त, सवसर्गी-सोबतीत, संगतीत राहणारा, थीता-वृथा, उगाच.

अर्थ – जे कुणी वाईट चालीच्या स्त्रीचे आप्त आहेत आणि ज्याना चोराची दया येते ते त्याचेच संगतीत राहणारे असतात असे समजावे १ चांगल्या वाटेवर काटेकुटे पसरून राहणाऱ्या माणसाप्रमाणे हा फुकटच दु खाचा वाटा भोगत असतो २ सर्पाला दूध पाजले तर त्या दुधाचा नाशच होणार. अमृतासारख्या दुधाचे विनाकारण विष बनून जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या दुष्टाला शासन केल्याशिवाय पुढील दोषाचा नाश होणार नाही ४

३३६७ तेणें सुखे माझें निवाले हे अंग । विठ्ठल हे जग देखियेलें ॥ १ ॥
कवतुके करुणा भाकीतसें लाडें । आवडी बोबडें बोलोनिया ॥ २ ॥
मज नाहीं दशा अंतरीं दु खाची । भावना भेदाची समूळ गेली ॥ ३ ॥
तुका म्हणे सुख जाले माझ्या जीवा । रंगले केशवा तुझ्या रंगे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- आवडी-प्रेमाने

अर्थ :- सर्व जग हे विठ्ठलस्वरूप असल्याचे पाहिल्यामुळे त्या सुखाने माझे सर्व अंग शीतल होऊन गेले आहे १ मी आता मोठ्या प्रेमाने, बोबड्या बोलानी व मोठ्या करुण वाणीने त्या देवाची प्रार्थना करीत आहे. हेच मला मोठे कौतुकाचे वाटते २ माझ्या ठिकाणी असलेली देहभावाची भावना समूळ गेलेली असल्यामुळे माझ्या अंत करणात दु खाची भावना उरलेली नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या प्रेमरंगाने मी रंगलेला आहे. त्यामुळे माझ्या जीवास मोठेच सुख झालेले आहे ४

१ काळभूत, २ सोयर चोराचिया दया.

विवरण – या एका अभंगात श्रीहरीच्या कृपेच्या अनुभवाने आपल्या मनाची तृप्ती कशी झाली याचे वर्णन तुकाराम महाराज करीत आहेत. श्रीहरीची प्राप्ती होण्याआधी सर्वांग कसे तप्त झाले होते ! चिंतेने, विरहाच्या अग्नीने अंग होरपळून निघाले होते. पण या विठ्ठलाचा साक्षात्कार झाला. सर्वत्र जगात विठ्ठलच भरून राहिलेला आहे अशी अनुभूती आली, आणि तुकोबाचे अंग निवून गेले. मग आतील दुःखाचा अंशही उरला नाही. भेदाची भावना समूळ नष्ट झाली. कारण आपण व श्रीहरी वेगळे आहोत, या भेदभावनेतच तीव्र स्वरूपाचे दुःख आहे. पण एकदा हा द्वैतभाव नाहीसा झाला की मग सुखच सुख अनुभवास येते. केशवाच्या रंगाने, प्रीतीच्या रंगाने रंगून गेलेल्या जीवाचे सुख काय वर्णन करावे ?

३३६८ विठ्ठल सोयरा सज्जन विसावा । जाइन त्याच्या गावा भेटावया ॥ १ ॥
सीण भाग त्यासी सांगेन आपुला । तो माझा बापुला सर्व जाणे ॥ २ ॥
माय माउलिया बंधुवर्गा जना । भाकीन करुणा सकळिकांसी ॥ ३ ॥
संत महंत सिद्ध महानुभाव मुनि । जीवभाव जाऊनि सांगेन त्या ॥ ४ ॥
माझिये माहेरीं सुखा काय उणे । न लगे येणे जाणे तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– सीण भाग–त्रासाची, कष्टाची हकीगत, बापुला–बाप.

अर्थ :– हा विठ्ठल माझा सज्जन असा सोयरा असून माझ्या विश्रांतीचे ते स्थान आहे. मी त्याला भेटण्यासाठी त्याच्याच गावाला जाईन. १. मी त्याला मला झालेले सर्व कष्ट सांगेन. कारण तो माझा बाप असून सर्व जाणणारा आहे. २. त्याच्याच ठिकाणी माझी माऊली आहे, बंधू इत्यादी आहेत, असे जाणून त्या सर्वांपुढे मी काकुळतीने करुणा भाकेन. ३. संतमहंत, सिद्ध, ऐश्वर्याचा अनुभव घेणारे मुनी असे जे कुणी आहेत त्यांना मी माझ्या जीवाचे हितगुज जाऊन सांगेन. ४. तुकाराम महाराज म्हणतात, अशा या माझ्या माहेरच्या ठिकाणी सुखाला काय उणीव आहे ? येथे म्हणून जन्ममृत्यूचा प्रश्नच निर्माण होत नाही. ५.

विवरण –– या आणखी एका भावपूर्ण अभंगात तुकोबा विठ्ठलासच आपला एकमेव सोयरा मानतात. लौकिक सृष्टीमधील मायबाप, बंधू, मित्र, आप्त, मुले यांचा प्रसंगी काहीही उपयोग होत नाही. आपली खरी माऊली श्रीविठ्ठल, आपला खरा पिता श्रीविठ्ठल, हाच आपला सज्जन सोयरा होय, अशी तुकोबाच्या मनाची निष्ठा आहे. मोठ्या लडिवाळपणे तुकोबा म्हणत आहेत, मी या माझ्या पित्याच्या गावा जाईन. माझ्या मनास झालेला त्रास मी त्यालाच सांगेन. त्याला पाहताच आपला सर्व शीण दूर होईल. कारण हा 'बापुला' आपले सर्व दुःख जाणत आहे. त्याला सांगण्याचीही जरुरी नाही. या आपल्या माहेरघरी काय कमी आहे ? एकदा तेथे गेल्यानंतर मग जाणेयेणे सुद्धा सुटून जाते. असा मोठा हृद्य व मनोरम भाव या अभंगात व्यक्त झाला आहे.

३३६९ ध्याइन तुझें रूप गाइन तुझें नाम । आणीक न करीं काम जिव्हामुखें ॥ १ ॥
पाहिन तुझे पाय ठेविन तेथें[1] डोय । पृथक तें काय न करीं मनीं[2] ॥ २ ॥
तुझेचि गुणवाद आइकेन कानीं । आणिकांची वाणी पुरे आतां ॥ ३ ॥
करिन सेवा करीं चालेन मी पायीं । आणीक न वजें ठायीं तुजविण ॥ ४ ॥
तुका म्हणे जीव ठेविला तुझ्या पायीं । आणीक तो काई देऊं कोणा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पृथक–वेगळे, निराळे, न वजें–जाणार नाही.

अर्थ :– मी तुझ्या रूपाचे ध्यान करीन आणि गाईन तर तुझेच नाम गाईन. याशिवाय दुसरे कोणतेच काम माझी जीभ व माझे मुख करणार नाहीत. १. देवा, जेथे जेथे मी तुझे पाय पाहीन तेथे तेथे नम्र होऊन मी

१ मी, २ आन

डोके ठेवीन याशिवाय वेगळा विचार माझ्या मनातदेखील येणार नाही २ मी माझ्या कानानी तुझेच गुणकीर्तन ऐकेन इतराची वाणी आता मला पुरे झाली ३ मी तुझ्याकडे पायी चालत येईन, हीच माझी सेवा होईल किंवा पायी चालत येऊन मी माझ्या हातांनी तुझी सेवा करीन. तुझ्याशिवाय दुसऱ्या कुठल्याही ठिकाणी मी जाणार नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी माझा जीव तुझ्या पायावर समर्पण केला आहे तर मग आता इतर कुणाला आणखी काय मी देऊ ? ५

विवरण – श्रीहरीशी आपण किती अनन्य आहोत याचे मोठे रेखीव व प्रत्ययकारी चित्र तुकोबानी या अभगात रगविले आहे विठ्ठला, मी माझ्या मुखाने फक्त तुझेच रूप गाईन, तुझ्याच नामस्मरणात ते धन्य होईल माझे मस्तक तुझ्याच पायावर विनम्र होईल माझे कान तुझेच गुणगान ऐकतील हातानी मी देवा, तुझीच सेवा करीन. माझी पावले चालतील तो तुझ्याच भेटीसाठी आणि हा माझा जीव तरी मी इतर कुणाला देणार ? श्रीहरी, तो तुझ्याच पायावर समर्पण केला आहे याप्रमाणे बुवा सर्वांगानी श्रीहरीचीच उपासना करीत आहेत त्याच्या सर्वेंद्रियाना हेच एक वळण माहीत आहे हाच एक अनन्य असा महत्त्वाचा भाव तुकाराम महाराजानी ‘ तुजविण वाणी आणिकाची थोरी । तरी माझी हरी जिव्हा झडो ।’ ‘ जरी माझी कोणी कापितील मान । तरी नको आन वदो जिव्हें ’, ‘ घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचे ’, ‘ तुझें नाम मुखीं न घेता आवडी । जिव्हा तेचि घडी झडो माझी ’, ‘ कीर्तन ऐकावया भुललें श्रवण । श्रीमुख लोचन देखावया ’, ‘ येणें मुखें तुझें वर्णी गुणनाम । तेचि मज प्रेम देईं देवा ’, इत्यादी ओळीतून व्यक्त केला आहे अनन्यभावाच्या या चिंतनापोटी निर्माण झालेल्या प्रभुप्रेमाची गोडी वर्णन करावी तेवढी थोडीच.

३३७० देवाचे भजन का रे न करीसी । अखंड हव्यासीं पीडतोसी ॥ १ ॥
देवासी शरण कां रे न वजवे तैसा । बक मीना जैसा मनुष्यालागी ॥ २ ॥
देवाचा विश्वास कां रे नाहीं तैसा । पुत्रस्नेहे जैसा गुंतलासी ॥ ३ ॥
कां रे नाहीं तैसी देवाची हे गोडी । नागवूनि सोडी पत्नी जैसी ॥ ४ ॥
कां रे नाहीं तैसे देवाचे उपकार । माया मिथ्या भार पितृपूजना ॥ ५ ॥
का रे भय वाहासी लोकाचा धाक । विसरोनि[1] एक नारायण ॥ ६ ॥
तुका म्हणे कां रे घातले वांयां । अवघें[2] आयुष्य जाया भक्तिविण ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – न वजवे–जात नाही, बक–बगळा, मीन–मासा

अर्थ – अरे, तू अखंडपणे प्रापचिक हव्यास मनाशी धरून उगाच दु:खी कष्टी का रे होतोस ? त्यापेक्षा तू देवाचे भजन का नाही करत ? १ बगळा जसा माशासाठी खोटे ध्यान धरून बसतो, त्याप्रमाणे तू मनुष्याच्या ठिकाणी लोभावतोस पण तसाच तू देवाला शरण का रे जात नाहीस ? २ आपल्या पुत्रावरील प्रेमात तू गुंततोस, पण त्याचप्रमाणे देवावर तुझा विश्वास का रे बसत नाही ? ३ तुला सर्वस्वी लुबाडणारी पत्नी सतत गोड वाटते, पण देवाविषयी ही गोडी का बरे तुझ्या मनास वाटत नाही ? ४ तू खोट्या मायेच्या लोभामुळे लौकिकासाठी आईबापाची पूजा करतोस, पण देवाचे उपकार मात्र का रे मानीत नाहीस ? ५ तू एका नारायणाला विसरून इतर लोकाचे भय विनाकारण का रे बाळगतोस ? ६ तुकाराम महाराज म्हणतात तू तुझे आयुष्य भक्तीशिवाय उगाच वाया का घालवितोस ? ७

३३७१ माझें चित्त तुझे पायीं । राहे ऐसें करीं कांहीं ।
धरोनियां बाहीं । भव तारीं दातारा ॥ १ ॥
चतुरा तूं शिरोमणि । गुणलावण्याची खाणी ।
मुगुट सकळां मणि । तूंचि धन्य विठोबा ॥ २ ॥

---

१ नाठवोनि, २ सर्व.

करीं तिमिराचा नाश । दीप होउनि प्रकाश ।
तोडीं आशापाश । करीं वास हृदयीं ॥ ३ ॥
पाहें गुंतलो नेणता । तुज असो माझी चिंता ।
तुका ठेवी माथा । पायीं आता राखावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाहीं–हातात, तिमिराचा–आज्ञानाच्या अधाराचा

अर्थ :– देवा, माझे हे चित्त निरतर तुझ्या पायी राहील असेच कर आम्हाला आपल्या हाताल धरून दातारा, या संसारसागरातून तू मुक्त कर १ तू चतुर व सर्वश्रेष्ठ आहेस सर्व गुणाची व सौंदर्याची तू खाण आहेस. विठोबा, तू सर्वांचा मुकुटमणी असल्याने धन्य आहेस २ देवा, तू अज्ञानाच्या अधाराचा नाश कर तू आमच्या आयुष्यात विद्याचा प्रकाश होऊन ये आमचे ससारपाश तू दूर कर, आणि आमच्या हृदयात निवास कर ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा मी पाहा, या प्रपचात न जाणताच गुतून राहिलो आहे आता माझी काळजी तुलाच असू द्यावी मी तुकाराम आता तुझ्याच पायावर मस्तक ठेवीत आहे तू माझे रक्षण करावेस ४

३३७२ आमुचे उचित हेचि उपकार । आपलाचि भार घालूं तुज ॥ १ ॥
भूक लागलिया भोजनाची आळी । पांघुरणे काळीं शीताचिये ॥ २ ॥
जेणें काळें उठी मनाची आवडी । तेचि मागो घडी आवडे[1] ते ॥ ३ ॥
दु ख येऊं नेदी आमचिया घरा । चक्र करी फेरा भोवताला ॥ ४ ॥
तुका म्हणे नाहीं मुक्तीसवे चाड । हेचि आम्हा गोड जन्म घेता ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आळी–हट्ट घडी–घटकेस, वेळेस, चाड–इच्छा

अर्थ – देवा, आम्ही आमचा सर्व भार तुझ्यावर घालू हेच एक योग्य व उपकारकारक कर्तव्य होईल १ भूक लागली की भोजन करण्याचा हट्ट घ्यावा आणि थडी वाजू लागली की पाघरुणाची इच्छा करावी एवढेच आम्हास समजते २ ज्या वेळेस जी आवड आपल्या मनात निर्माण होईल त्या घटकेस तीच आम्ही मोठ्या प्रीतीने मागू. ३ आमच्या रक्षणासाठी आमच्याभोवती सुदर्शनचक्र फिरत असल्यामुळे आमच्या घरी दु ख कधीच येणार नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हास मुक्तीची काहीच इच्छा नाही देवा, तुझ्या सेवेसाठी वारंवार जन्म घेणेच आम्हाला गोड वाटते ५

विवरण – आपण भक्तीने काय करणे उचित आहे हे तुकाराम महाराजानी या अभगात स्पष्टपणे सांगितले आहे आपण कुणी वेगळ आहोत स्वतत्र आहोत, अशी भूमिका न ठेवता तो सर्वशक्तिमान प्रभूच आपले चलनवलन करवितो, या एक दृढ निश्चयाने आपला सर्व भार त्या प्रभूवर सोपविण कुणाला पसत आहे आपण अनेक बाबतीत व्यर्थ चिंता करतो आपणास वाटते, आपण चिंता केली की प्रश्न सुटतील सकटे दूर होतील परतु सतांना वाटते, आपण काय म्हणून चिन्ताग्रस्त व्हावे ? ज्याने जन्म दिला त्याला सर्व चिंता असावी की ! आपण फक्त भूक लागली की सुग्रास भोजनाचा हट्ट करायचा थडी वाजली की आपल्या आधी ती आपल्या आईस वोचाणे तीच मोठ्या ममत्वाळूपणे न कळत आपणास पाघरुण घालील ज्या वेळेस जे मनात येईल त्याचा हट्ट आईबापाजवळ धरायचा नाही तर कुठे ? अशा या एकनिष्ठपणामुळे भक्ताच्या घरी कधी विपरीत घडतच नाही प्रभूचे रक्षणकर्ते चक्र सतत त्याच्याभोवती फिरत असते अशा या अवस्थेत मुक्तीचे सुख मागण्यापेक्षा वारवार जन्म घेऊन श्रीहरीकडून सर्व लाड पूर्ण करून घेण्यातील सौख्य भक्ताना फारच मोठे वाटते प्रभूवर भार टाकून आपण निवांत असाव हा भाव तुकाराम महाराजानी अनेक प्रसगी व्यक्त केला आहे 'बाळ मातेपाशीं मागे तानभूक । उजायाचे दुःख काय जाणे ?', 'नलगे मायेसी बाळ निरवावे । आपुल्या स्वभावें ओढे त्यासी । मज का लागला करणे विचार । ज्याचा जारभार त्याचे माथा ', ' मायबापापुढें लेकराची आळी । आणीक हे पाळी कोण कळे ? ' बाळाचे

1 आवडत

ठोके ठेवीन. याशिवाय वेगळा विचार माझ्या मनातदेखील येणार नाही. २ मी मा. ऐकेन. इतरांची वाणी आता मला पुरे झाली. ३ मी तुझ्याकडे पायी चालत येईन, हो पायी चालत येऊन मी माझ्या हातांनी तुझी सेवा करीन. तुझ्याशिवाय दुसऱ्या कुठल नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी माझा जीव तुझ्या पायांवर समर्पण केला आ कुणाला आणखी काय मी देऊ ? ५

विवरण – श्रीहरीशी आपण किती अनन्य आहोत याचे मोठे रेखीव व प्रत्ययका अभगात रंगविले आहे विठ्ठला, मी माझ्या मुखाने फक्त तुझेच रूप गाईन, तुझ्याच नामस्म माझे मस्तक तुझ्याच पायावर विनम्र होईल माझे कान तुझेच गुणगान ऐकतील. हातांनी मी करीन. माझी पावले चालतील ती तुझ्याच भेटीसाठी. आणि हा माझा जीव तरी मी इतर कुणाल तो तुझ्याच पायावर समर्पण केला आहे. याप्रमाणे बुवा सर्वांगांनी श्रीहरीचीच उपासना करीत आहेत. याना हेच एक वळण माहीत आहे. हाच एक अनन्य असा महत्त्वाचा भाव तुकाराम महाराजानी ' आणिकांची थोरी । तरी माझी हरी जिव्हा झडो ।' ' जरी माझी कोणी कापितील मान । तरी नको आन ' घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ', ' तुझें नाम मुखीं न घेतां आवडी । जिव्हा तेचि घडी इ ' कीर्तन ऐकावया मुलले श्रवण । श्रीमुख लोचन देखावया ', ' येणें मुखें तुझें वर्णी गुणनाम । तेंचि भज देवा ', इत्यादी ओळींतून व्यक्त केला आहे. अनन्यभावाच्या या चिंतनापोटी निर्माण झालेल्या प्रभुप्रेमाच वर्णन करावी तेवढी थोडीच.

३३७० देवाचें भजन कां रे न करीसी । अखंड हव्यासीं पीडतोसी ॥ १ ॥
देवासी शरण कां रे न वजवे तैसा । बक मीना जैसा मनुष्यालागीं ॥ २ ॥
देवाचा विश्वास कां रे नाहीं तैसा । पुत्रस्नेहें जैसा गुंतलासी ॥ ३ ॥
कां रे नाहीं तैसी देवाची हे गोडी । नागवूनि सोडी पत्नी जैसी ॥ ४ ॥
कां रे नाहीं तैसे देवाचे उपकार । माया मिथ्या भार पितृपूजना ॥ ५ ॥
कां रे भय वाहासी लोकांचा धाक । विसरोनि[1] एक नारायण ॥ ६ ॥
तुका म्हणे कां रे घातलें वांयां । अवघें[2] आयुष्य जाया भक्तिविण ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– न वजवे–जात नाही, बक–बगळा, मीन–मासा.

अर्थ :– अरे, तू अखडपणे प्रापंचिक हव्यास मनाशी धरून उगाच दु:खी कष्टी का रे होतोस ? त्यापेक्षा तू देवाचे भजन का नाही करत ? १ बगळा जसा माशासाठी खोटे ध्यान धरून बसतो, त्याप्रमाणे तू मनुष्याच्या ठिकाणी लोभावतोस पण तसाच तू देवाला शरण का रे जात नाहीस ? २ आपल्या पुत्रावरील प्रेमात तू गुंततोस; पण त्याचप्रमाणे देवावर तुझा विश्वास का रे बसत नाही ? ३ तुला सर्वस्वी लुबाडणारी पत्नी सतत गोड वाटते; पण देवाविषयी ही गोडी का बरे तुझ्या मनास वाटत नाही ? ४ तू खोटया मायेच्या लोभामुळे लौकिकासाठी आईबापांची पूजा करतोस; पण देवाचे उपकार मात्र का रे मानीत नाहीस ? ५ तू एका नारायणाला विसरून इतर लोकाचे भय विनाकारण का रे बाळगतोस ? ६ तुकाराम महाराज म्हणतात, तू तुझे आयुष्य भक्तीशिवाय उगाच वाया का घालवितोस ? ७

३३७१ माझें चित्त तुझे पायीं । राहे ऐसें करीं कांहीं ।
धरोनियां बाहीं । भव तारीं दातारा ॥ १ ॥
चतुरा तूं शिरोमणि । गुणलावण्याची खाणी ।
मुगुट सकळां मणि । तूंचि धन्य विठोबा ॥ २ ॥

१ नाठवोनि, २ सर्व.

जीवन । माता जाणे भूक तहान ' इत्यादी ओळींतून तुकाराममहाराजांनी स्वत म विठ्ठलमाऊलीचे वरच सर्व भार टाकलेला दिसून येतो

३३७३ मी दास तयाचा जया चाड नाहीं । सुख दु ख दोहींविरहित जो ॥ १ ॥
राहिलासे उभा भींवरेच्या तीरीं । कट दोही करीं धरोनिया ॥ २ ॥
नवल काई तरी पाचारितां पावे । न स्वरित[1] धावे भक्तिकाजें ॥ ३
सर्व भार माझा त्यासी आहे चिंता । तोचि माझा दाता स्वहिताचा ॥
तुका म्हणे त्यास गाईन मी गीतीं । आणीक तें चित्तीं न धरीं काही ॥

शब्दार्थ व टीपा – चाड-इच्छा, कट-कंबर, करीं-हातांनी, पाचारितां-बोलावि न स्वरित, त्वरित, भक्तिकाजें-भक्तीच्या कार्यासाठी

अर्थ – ज्याला कसलीही इच्छा नाही अशा देवाचा मी दास आहे असा माझा देव आहे. १ हा देव भिवरेच्या काठावर उभा राहिलेला असून त्याने आपले दोनही हात रे या देवाचे नवल असे की, त्याला बोलाविल्याबरोबर तो धावत येतो आपल्या भक्तीच्या येतो ३ माझ्याविषयीचा सर्व भार व सर्व चिंता त्यालाच असून तोच माझ्या हिताचा महाराज म्हणतात, मी त्याला माझ्या गीतांनी गाईन ५

३३७४ यासी कोणी म्हणे निंदेचीं उत्तरें । नागवला खरें तोचि एक ॥ १ ॥
आड वाटे जाता लावी नीट सोई । धर्मनीत ते ही ऐसी आहे ॥ २ ॥
नाइकता सुखें करावे ताडण । पाप नाही पुण्य असे फार ॥ ३ ॥
जन्म व्याधि फार चुकतील दु खे । खडावा हा सुखें मान त्याचा ॥ ४ ॥
तुका म्हणे निंब दिलियावाचून । अतरींचा सीण कैसा जाय ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – नागवला-फसला गेला, ताडण-मार देणे, सीण-श्रम

अर्थ – मी पुढे जे म्हणत आहे त्यास कुणी निंदेची उत्तरे म्हणेल तर तो खराच एक जाणावे १ जो कुणी आडमार्गाला लागला आहे त्याची नीटपणे सोय लावावी हीच एक खरी अशी गोष्ट जर कुणी नीटपणे ऐकली नाही तर त्याला सुखाने मार द्यावा असे करण्यात काही पुण्यच आहे. ३ अशामुळे अनेक प्रकारची जन्मदु खे संपतील, म्हणूनच मोठ्या सुखाने त्याची म तुकाराम महाराज म्हणतात, कडूलिंबाचे औषध दिल्यावाचून त्याच्या अत करणातील त्रास वा होणार ? ५

३३७५ निवडे जेवण सेवटीच्या घासे । होय त्याच्या ऐसे सकळ ही ॥ १ ॥
न पाहिजे जाला बुद्धीचा पालट । केली खटपट जाय वाया ॥ २ ॥
संपादिले होय धरिले ते सोंग । विटंबणा[2] व्यंग पडिलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्म नेणता जो राधी । पावकी ते बुद्धि अवकळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निवडे-निवडून दिसते, चांगले ठरते, राधी-शिजवतो

अर्थ – शेवटचा गोड घास घेण्यानेच जेवण चांगले होते याप्रमाणे सर्वच कार्याचे १ जी सत्त्वबुद्धी आहे तिच्यात पालट होता कामा नये नाही तर केलेली खटपट वायाच जाणारी आ

१ न स्वरित, २ सांग पडिल्यानी

केले आहे त्याची संपादणी नीट बरोबर व्हावयास हवी. त्यात काही उणीव दिसेल तर फजीतीच होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, स्वयंपाक करण्याचे मर्म न समजताच जो अन्न शिजवील त्याच्या बुद्धीची अवकळाच होऊन जाते. ४

३३७६ न लगे मरावें । ऐसा ठाव दिला देवें ॥ १ ॥
माझ्या उपकारासाटीं । वागविला म्हूण कंठीं ॥ २ ॥
घरीं दिला ठाव । अवघा सकळ ही वाव ॥ ३ ॥
तुका म्हणे एके ठायीं । कोठें[1] माझें तुझें नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- ठाव-स्थान, म्हूण-म्हणून, वाव-व्यर्थ.

अर्थ :- ज्या ठिकाणी मरावे लागत नाही असे स्थान या देवाने मला दिले आहे. १ माझ्यावर त्याचे हे मोठेच उपकार आहेत म्हणूनच मी त्याला माझ्या कंठात धारण केला आहे २ या श्रीहरीने मला स्वतःच्या घरी आश्रय दिल्यामुळे इतर सर्वच व्यर्थ वाटू लागले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या एका ठिकाणी आता तुझे-माझे असा द्वैतभाव उरलेला नाही ४

३३७७ नाहीं लाग माग । न[2] देखेसें केलें जग ॥ १ ॥
आतां बैसोनियां खावें । दिलें आइतें या देवें ॥ २ ॥
निवारिलें भय । नाहीं दुसऱ्याची सोय ॥ ३ ॥
तुका म्हणे कांहीं । बोलायाचें काम नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- लाग-प्रवेश, माग-मार्ग

अर्थ :- ज्या ठिकाणी कुणासच प्रवेश करता येत नाही, कुणालाच जेथे जाण्यासाठी मार्ग नाही अशा ठिकाणी मला ठेवून या श्रीहरीने हे जग दिसणार नाही असे केले. १ आता या ठिकाणी खुशाल बसून खावे. या देवाने हे सर्व आयतेच मला दिलेले आहे. २ या श्रीहरीने माझी सर्व प्रकारची भीती दूर केलेली असल्यामुळे आता दुसऱ्याची आठवण करण्याचे कारणच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या ठिकाणी इतर काही बोलायचे कामच नाही. ४

३३७८ दिली हाक मनें नव्हे तो जतन । वेंटाळिल्या गुणें धांव घेतो ॥ १ ॥
काम क्रोध मद मत्सर अहंकार । निंदा द्वेष[3] फार माया तृष्णा ॥ २ ॥
इंद्रियांचे भार फिरतील चोर । खान[4] घ्यावया घर फोडूं पाहे ॥ ३ ॥
माझा येथें कांहीं न चले पराक्रम । आहे त्याचें वर्म तुझे हातीं ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां करितों उपाय । जेणें तुझे पाय आतुडती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- वेंटाळिल्या-वेढलेल्या, भार-समुदाय, खान-खाण, आतुडती-प्राप्त होतात.

अर्थ :- माझ्या मनाने स्वहिताचे रक्षण होत नाही, म्हणून देवा, मी तुला हाक दिली आहे. कारण माझे मन अनेक प्रकारच्या गुणावगुणांनी वेढलेले असल्यामुळे त्यांच्याबरोबरच ते धाव घेते. १ काम, क्रोध, मद, मत्सर, अहंकार, निंदा, द्वेष, माया, तृष्णा इत्यादी विकार माझ्या मनात फारच दाटून आले आहेत. २ इंद्रियविषयांचे हे चोर अथवा त्यांचा समुदाय घर फोडून आत घुसतात व जे काही असेल ते खाऊन टाकतात. ३ या ठिकाणी माझा पराक्रम चालत नाही. यातून माझी मुक्तता करण्याचे सर्व सामर्थ्य देवा, तुझ्या हातात आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, ज्यायोगे तुझ्या पायांची प्राप्ती होईल ते उपाय मी करीत आहे ५

१ केले, २ देखें हे, ३ हिंसा, ४ खाणें.

जीवन । माता जाणे भूक तहान ' इत्यादी ओळीतून तुकाराम बुवांनी स्वत म विठ्ठलमाऊलीचे वत्स कल्पून तिच्यावरच सर्व भार टाकलेला दिसून येतो

३३७३ मी दास तयाचा जया चाड नाहीं । सुख दु ख दोहींविरहित जो ॥ १ ॥
राहिलासे उभा भींवरेच्या तीरीं । कट दोही करीं धरोनिया ॥ २ ॥
नवल काई तरी पाचारितां पावे । न स्मरित[1] धावे भक्तिकाजें ॥ ३ ॥
सर्व भार माझा त्यासी आहे चिंता । तोचि माझा दाता स्वहिताचा ॥ ४ ॥
तुका म्हणे त्यास गाईन मी गीतीं । आणीक ते चित्तीं न धरीं काही ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड-इच्छा, कट कवर, करीं–हातानी, पाचारिता–बोलाविल्याबरोबर, न स्मरित–न रचरित, त्वरित, भक्तिकाज–भक्तीच्या कार्यासाठी

अर्थ – ज्याला कसलीही इच्छा नाही अशा देवाचा मी दास आहे असा माझा देव सर्व सुखदु खविरहित आहे. १ हा देव भिवरेच्या काठावर उभा राहिलेला असून त्याने आपले दोनही हात कवरेवर ठेविले आहेत २ या देवाचे नवल असे की, त्याला बोलावियाबरोबर तो धावत येतो आपल्या भक्तीच्या कार्यासाठी त्वरित धावून येतो ३ माझ्याविषयीचा सर्व भार व सर्व चिंता त्यालाच असून तोच माझ्या हिताचा दाता आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी त्याला माझ्या गीतानी गाईन ५

३३७४ यासी कोणी म्हणे निंदेचीं उत्तरे । नागवला खरे तोचि एक ॥ १ ॥
आड वाटे जाता लावी नीट सोई । धर्मनीत ते ही ऐसी आहे ॥ २ ॥
नाइकता सुखें करावे ताडण । पाप नाहीं पुण्य असे फार ॥ ३ ॥
जन्म व्याधि फार चुकतील दु खें । खडावा हा सुखें मान त्याचा ॥ ४ ॥
तुका म्हणे निंब दिलियावाचून । अतरींचा सीण कैसा जाय ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – नागवला–फसला गेला, ताडण–मार देणे, सीण–त्रास

अर्थ – मी पुढे जे म्हणत आहे त्यास कुणी निंदेची उत्तरे म्हणेल तर तो खराच एक फसला आहे असे जाणावे १ जो कुणी आडमार्गाला लागला आहे त्याची नीटपणे सोय लावावी हीच एक खरी धर्मनीती आहे २ अशी गोष्ट जर कुणी नीटपणे ऐकली नाही तर त्याला सुखाने मार द्यावा असे करण्यात काही पाप नसून उलट फार पुण्यच आहे ३ अशामुळे अनेक प्रकारची जन्मदु खे सपतील, म्हणूनच मोठ्या सुखाने त्याची मानखडना करावी ४ तुकाराम महाराज म्हणतात, कडूलिंबाचे औषध दिल्याबाचून त्याच्या अत करणातील त्रास वा रोगाचे दु ख दूर कसे होणार ? ५

३३७५ निवडे जेवण सेवटींच्या घासें । होय त्याच्या ऐसें सकळ ही ॥ १ ॥
न पाहिजे जाला बुद्धीचा पालट । केली खटपट जाय वाया ॥ २ ॥
सपादिले होय धरिले तें सोग । विटवणा[2] व्यग पडिलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्म नेणता जो राधी । पाववी ते वृद्धि अवकळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निवडे–निवडून दिसते, चागले ठरत, राधी–शिजवतो

अर्थ – शेवटचा गोड घास घेण्यानेच जेवण चागले होते याचप्रमाणे सर्वच कार्याचे समजावे १ आपली जो सत्त्वबुद्धी आहे तिच्यात पालट होता कामा नये नाही तर केलेली खटपट वायाच जाणारी आहे २ जे सोग धारण

१ न स्वरित, २ भाग पडियेली

केले आहे त्याची संपादणी नीट बरोबर व्हावयास हवी. त्यात काही उणीव दिसेल तर फजीतीच होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, स्वयंपाक करण्याचे मर्म न समजताच जो अन्न शिजवील त्याच्या बुद्धीची अवकळाच होऊन जाते ४

३३७६ न लगे मरावें । ऐसा ठाव दिला देवें ॥ १ ॥
माझ्या उपकारासाटीं । वागविला म्हूण कंठीं ॥ २ ॥
घरीं दिला ठाव । अवघा सकळ ही वाव ॥ ३ ॥
तुका म्हणे एके ठायीं । कोठें[1] माझें तुझें नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- ठाव-स्थान, म्हूण-म्हणून, वाव-व्यर्थ.

*अर्थ :- ज्या ठिकाणी मरावे लागत नाही असे स्थान या देवाने मला दिले आहे. १ माझ्यावर त्याचे हे मोठेच उपकार आहेत म्हणूनच मी त्याला माझ्या कंठात धारण केला आहे २ या श्रीहरीने मला स्वतःच्या घरी आश्रय दिल्यामुळे इतर सर्वच व्यर्थ वाटू लागले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या एका ठिकाणी आता तुझे-माझे असा द्वैतभाव उरलेला नाही ४*

३३७७ नाहीं लाग माग । न[2] देखेसें केलें जग ॥ १ ॥
आतां बैसोनियां खावें । दिलें आइतें या देवें ॥ २ ॥
निवारिलें भय । नाहीं दुसऱ्याची सोय ॥ ३ ॥
तुका म्हणे कांहीं । बोलायाचें काम नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- लाग-प्रवेश, माग-मार्ग

*अर्थ :- ज्या ठिकाणी कुणालाच प्रवेश करता येत नाही, कुणालाच जेथे जाण्यासाठी मार्ग नाही अशा ठिकाणी मला ठेवून या श्रीहरीने हे जग दिसणार नाही असे केले. १ आता या ठिकाणी खुशाल बसून खावे. या देवाने हे सर्व आयतेच मला दिलेले आहे. २ या श्रीहरीने माझी सर्व प्रकारची भीती दूर केलेली असल्यामुळे आता दुसऱ्याची आठवण करण्याचे कारणच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या ठिकाणी इतर काही बोलायचे कामच नाही ४*

३३७८ दिली हाक मनें नव्हे तो जतन । वेंटाळिल्या गुणें धांव घेती ॥ १ ॥
काम क्रोध मद मत्सर अहंकार । निंदा द्वेष[3] फार माया तृष्णा ॥ २ ॥
इंद्रियांचे भार फिरतील चोर । खान[4] घ्यावया घर फोडूं पाहे ॥ ३ ॥
माझा येथें कांहीं न चले पराक्रम । आहे त्याचें वर्म तुझे हातीं ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां करितों उपाय । जेणें तुझे पाय आतुडती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- वेंटाळिल्या-वेढलेल्या, भार-समुदाय, खान-खाण, आतुडती-प्राप्त होतात.

*अर्थ :- माझ्या मनाने स्वहिताचे रक्षण होत नाही, म्हणून देवा, मी तुला हाक दिली आहे. कारण माझे मन अनेक प्रकारच्या गुणावगुणांनी वेढलेले असल्यामुळे त्याच्याबरोबरच ते धाव घेते. १ काम, क्रोध, मद, मत्सर, अहंकार, निंदा, द्वेष, माया, तृष्णा इत्यादी विकार माझ्या मनात फारच दाटून आले आहेत. २ इंद्रियविषयांचे हे चोर अथवा त्यांचा समुदाय घर फोडून आत घुसतात व जे काही असेल ते खाऊन टाकतात ३ या ठिकाणी माझा पराक्रम चालत नाही. यातून माझी मुक्तता करण्याचे सर्व सामर्थ्य देवा, तुझ्या हातात आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, ज्यायोगे तुझ्या पायांची प्राप्ती होईल ते उपाय मी करीत आहे ५*

१ केले, २ देखें हे, ३ हिंसा, ४ खाणे.

३३७९ तुझा दास मज म्हणती अंकित । अवघे सकळिक लहान थोर ॥ १ ॥
हेंचि आतां लागे करावें जतन । तुझें थोरपण तुज देवा ॥ २ ॥
होउनी निर्भर राहिलों निश्चित । पावनपतित नाम तुझें ॥ ३ ॥
करितां तुज होय डोंगराची राई । न लगतां कांहीं पात्या पातें ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज काय ते आशंका । तारितां मशका मज दीना ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– अंकित–स्वाधीन, सेवक, निर्भर–पूर्णपणे, राई–मोहरी, पात्या पातें–डोळ्याचे पाते लवते न लवते तोच, मशका–चिलटास

अर्थ :– मी तुझा दास व सेवक आहे, असे सर्व लहानथोर लोक मला म्हणत आहेत. १ देवा, तुला आता स्वत:चा मोठेपणा सामाळला पाहिजे २ तुझे नाव पतितपावन असल्यामुळे मी आता पूर्णपणे निष्काळजी होऊन राहिलो आहे ३ देवा, तुझा पराक्रम असा आहे की, डोळ्याची पापणी लवते न लवते तोच तू मोहरीचा पर्वत करून दाखवितोस. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझ्यासारख्या चिलटाला तारण्यात तुला काय अशक्य आहे रे ? ५

३३८० काय मागावें कवणासी । ज्यासी मागों तो मजपाशीं ॥ १ ॥
जरी मागों पद इंद्राचें । तरी शाश्वत नाहीं त्याचें ॥ २ ॥
जरी मागों ध्रुवपद । तरी त्यासी येईल छंद ॥ ३ ॥
स्वर्गभोग मागों पूर्ण । पुण्य सरल्या मागुती येणें ॥ ४ ॥
आयुष्य मागों चिरंजीव । जीवा मरण नाहीं स्वभावें ॥ ५ ॥
तुका म्हणे एक मागे । एकपणा नाहीं भंग ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– शाश्वत–कायमचे टिकणारे.

अर्थ :– मी आता कुणापाशी काय मागावे ? ज्याला मागावे तो देव तर माझ्याजवळ आहे. १ इंद्रपद मागावे काय ? पण तेही कायम टिकणारे नाही. २ ध्रुवाचे अढळपद मागावे काय ? पण त्यालाही मृत्युलोकाचा छंद आहे ३ पूर्णपणे भोगता येतील असे स्वर्गातील भोग मागावेत काय ? पण तेथूनही पुण्य संपल्यावर मागे परत मृत्युलोकात यावे लागते ४ मग चिरजीवपणाचे आयुष्य मागावे काय ? पण जीव तर स्वभावत:च अमर आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून जेथे या माझ्या एकपणाच्या अनुभवास भंग नाही असे एक मागणे मी मागतो ६

विवरण –श्रीहरीला आपण काय मागावे ? या प्रश्नाचे फारच चागले उत्तर तुकाराम महाराजानी या अभगात दिलेले आहे कुणाला कन्या-पुत्राची जरूरी असते, कुणाला गुणवती स्त्री पाहिजे असते, कुणाला मानसन्मान हवा असतो बहुसख्य लोक ईश्वराला भौतिक सुखे मागतात कुणाला धन पाहिजे असते. कुणाला शतवाडी, कुणाला सत्ता, सामर्थ्य, व रूपवती स्त्री हवी असते. कुणाला नाना भोग या सर्वांसाठी लोक ईश्वराकडे धावतात त्याला नवस करतात, साकडे घालतात ऐहिकाच्या आणि भौतिकाच्या लालसेने लोक देवाकडे धाव घेतात थोडी अधिक प्रगती म्हणजे कुणाला इद्रपद हवे असते कुणाला ध्रुवाचे अढळपद हवे असते. कुणाला स्वर्ग भोग हवे असतात. कुणाला चिरजीवपद पाहिजे असते परंतु सताची दृष्टी याहून फार वेगळी असते त्याना फक्त प्रभूचे प्रेम हवे. डोळे भरून त्याची भेट हवी. दोन्ही बाहूनी त्याचे आलिंगन त्याना हवे त्याना हवे त्याचे गुणसंकीर्तन त्याना हवा हरिभक्ताचा सहवास त्याना हवी नामस्मरणातील व प्रभुचिंतनातील गोडी, त्याना हवे प्रभूच्या वियोगातील सौख्य

त्याना हवी भेटीसाठी तळमळ, मनाची तगमग. या प्रकारच्या सौख्यावरून त्यानी इतर सर्व सुखें ओवाळून टाकलेली असतात त्याना मोक्ष नको, की वैकुंठपदही नको प्रभूच्या प्रेमाखेरीज त्याना दुसरे काहीही नको असते

स्वर्ग व मोक्ष ही त्यातल्या त्यात उच्च दर्जाची मागणी परतु सतानी याचाही अव्हेर केलेला आहे स्वर्ग-भोगाची किंमत ती काय ? भगवद्गीतेनेच यासबधी निर्वाळा दिलेला आहे 'त्रैविद्या मा सोमपा. पूतपापा यज्ञैरिष्ट्वा-स्वर्गति प्रार्थयते । ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोकमश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥ ते त भुक्त्वा स्वर्गलोक विशाल क्षीणे पुण्ये मर्त्यलोक विशति '— तीन वेद जाणणारे, सोमपान करणारे, पाप नष्ट झालेले हे याज्ञिक यज्ञात माझे यजन करून स्वर्गसुखाची इच्छा करतात, पापरूप पुण्याचे जे फल तो इद्रलोक प्राप्त करून घेतात, आणि स्वर्गातील देवाचे दिव्य भोग भोगतात परतु तो विशाल स्वर्गलोक भोगल्यानतर त्याचे पुण्य क्षीण होते, आणि मग त्याना पुन मृत्यु-लोकात प्रवेश करावा लागतो या स्वर्गसुखाची काय किंमत उरली ? ज्ञानेश्वराच्या भाषेत तर या याज्ञिकानी— पुण्याचेनि नावे पाप' जोडलेले असते कारण श्रीहरीला चुकवून याची पावले स्वर्गाकडे वळतात कल्पतरूच्या तळवटी बसून हे दरिद्री लोक आपल्या भिक्षेच्या झोळीला गाठी मारतात अज्ञानाच्या या पुण्यमार्गावर ज्ञानदेवानी फार प्रखर शब्दात टीका केलेली आहे त्याच्या मताने स्वर्ग व नरक या दोनही वाटा चोराच्याच होत मग शुद्ध मार्ग कोणता ? ज्ञानदेवानी सागितले आहे, 'मग माते जेणे पाविजे । ते शुद्ध पुण्य ' पण या पुण्याची जरूरी कुणाला असते ? ज्याला त्याला स्वर्गसुखाची व इद्रपदाची इच्छा याची शेवटी कशी फजिती होते यासबधी वर्णन करताना ज्ञानदेवानी म्हटले आहे, ' मग या पुण्याची पाउटी सरे । सवेचि इद्रपणाची उटी उतरे । आणि येऊ लागती माघारे मृत्युलोका ॥ जैसा वेश्याभोगी कवडा वेचे । मग दारही चेपू नये तियेचे । तैसे लाजिरवाणे दीक्षिताचे । काय सागों ? '

असे हे इद्रपद, असा हा स्वर्गभोग, याचा लोभ सताना नाही तेथील ऐरावत, तेथील कल्पवृक्ष, तेथील अमृतकुभ, तेथील कामधेनू, तथील भोगविलास सताना नकोत विचारी माणसानी याचा लोभ धरू नये असा त्याचा उपदेश आहे क्षणात सर्व वस्तू सुवर्णाच्या करणा या परिसाचा लोभ वाटू नये लोखडाचे सोने करणारा परीस सताना खरा परीस वाटत नाही कबीरदासानी म्हटले आहे, ' जिस पारससे काचन निपजा वोहि पारस कच्चा । जिस पारससे पारस निकला वोहि पारस सच्चा ', सुवर्ण निघते परिसापासून, पण परीस कुणापासून निघतो? या मूलस्थानाकडे सताचे लक्ष नेहमी असते इद्रपद अथवा स्वर्गसुखाप्रमाणे सतानी मोक्षसुखही तुच्छ मानले आहे श्रीहरीचे पाय जेणेकरून अतरतील तो मोक्ष त्याना नको 'नलगे तुझी मुक्ति नलगे तुझी भुक्ति । मज आहे विश्रांति वेगळीच ', असे नामदेवाना वाटते कारण त्याना प्रेमसुखाची गोडी लागलेली असते मुक्तीचे पद मिळाल्यानतर मग हा सतसग कुठे पाहावा ? पढरीचा आनदसोहळा कुठे पाहावा ? अमृतसजीवनी असणारी हरिकथा कशी व कुठे ऐकावी ? अशी चिंता नामदेवाच्या मनास आहे 'साडुनि सुखाचा वाटा । मुक्ति मागे तो करटा ' असे तुकाराम-बुवानी यासाठीच म्हटले आहे ' मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ॥ मज भक्तीची आवडी । नाहीं अतरीं ती गोडी ' हीच एकमेव इच्छा तुकोबाची आहे

या सताना लौकिक सुख नको इद्रपद नको, स्वर्ग नको, मोक्ष नको, मग हवे काय ? कशासाठी त्याची तळमळ आहे? श्रीहरीच्या प्रीतीचा भग होऊ नये हीच एक त्याच्या मनाची आस आहे. अमृताहून गोड असणारे प्रभुनाम त्याना हवे सतसहवास त्याना हवा प्रभूचे दर्शन डोळे भरून त्याना हवे 'मी भक्त तू देव' असा अद्वैतावरील द्वैतभाव त्याना हवा. विठ्ठल भेटत नाही म्हणून त्याचा प्राण कासावीस होत असतो ' प्रेम द्यावे नारायणा । भूतदया परिपूर्ण ' अशी मागणी नामदेवाची आहे ' हेंचि देवा पै मागत । चरण सेवा अखडित ' अशीच एक त्याची इच्छा आहे ' आपुले रूपीं मज लपवी निरतर ' ही नामदेवांची मागणी आहे 'पुरवी आस माझी देवा । जेणें घडे तुझी सेवा ' अशी जनाबाईची आर्तता आहे ' मागणें तें एक आम्हा प्रती द्यावे । निरतर यावे जागरणा ' अशी प्रार्थना एकनाथ याची आहे. 'प्रेम सुख देई प्रेम सुख देईं । प्रेमेविण नाहीं समाधान ' असा त्याचा टाहो आहे 'तुज मागणें तें देवा । आम्हा तुझी चरणसेवा ' हीच एकमेव इच्छा तुकोबाची आहे ' मज दास करी त्याचा । सत दासाच्या दासाचा ', 'हेचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ', ' गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देई मज प्रेम सर्वकाळ ', 'हीच व्हावी माझी आस । जन्मोजन्मी तुझा दास ', 'देईं तुझें नाम मज

सर्व काळीं । मागणें वनमाळी हेंचि तुज ' इत्यादी उक्तीवरून तुकोबाच्या मनाचे भाव सहज स्पष्ट होण्यासारखे आहेत. ईश्वराजवळ काय मागावे व काय मागू नये, यासंबंधी नामदेवाचा एक सुंदर अभंग येथें देण्यासारखा आहे

'काय मागूं विठ्ठल धुरे । एक तुळसी दळ पुरे ॥ १॥ मागूं मुगुट माथाचा । तरी तो आणिला इंद्राचा ॥ २॥ मागूं कुंडले कर्णाचीं । तरी तीं आणिलीं कर्णाचीं ॥ मागू पितांबर शेला । तरी तो कासेसी कसिला ॥ मागू पादुका चरणींच्या । तरी त्या आणिल्या शेषाच्या ॥ मागू तोडर पायींचा । घाक जाईल असुराचा ॥ मागू जाता लक्ष्मीसी। रिद्धिसिद्धी जिच्या दासी ॥ मागूं म्हणे शख जरी । तरी तो मिरवे तुमच्या करीं ॥ मागों सुदर्शन दळ । त्या शस्त्राचें तुम्हां बळ ॥ मागो वैजयंती माळ। तरी शून्य दिसेल वक्ष स्थळ ॥ कारण तेंचि मागितलें । नामया केशवाचे प्रेम दिलें ॥ नामा म्हणे कांहीं न मागो । तुझें चरणीं लक्ष लागो ॥ '

३३८१ आम्ही ज्याचे दास । त्याचा पंढरिये वास ॥ १ ॥
तो हा देवांचा ही देव । काय कळिकाळाचा भेव ॥ २ ॥
वेद जया गाती । श्रुति म्हणती नेति नेति ॥ ३ ॥
तुका म्हणे निज । रूपडें हें तत्त्वबीज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- भेव-भीती

अर्थ :- आम्ही ज्याचे दास आहोत त्याचा निवास पंढरीस आहे. १ हा सर्व देवांचाही देव असल्यामुळे प्रत्यक्ष कळिकाळाचीही भीती कसली आहे ? २ या देवाची स्तुती वेदही गातात, आणि श्रुति ' नेति नेति ' म्हणून वर्णन करतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, तत्त्वबीजाचे हे जे निजरूप आहे तेच या पांडुरंगाचे रूप आहे ४

३३८२ भक्तवत्सल दिनानाथ । तिहीं लोकी ज्याची मात ॥ १ ॥
तो हा पुंडलिकासाटीं । आला उभा वाळवंटीं ॥ २ ॥
गर्भवास घरी । अंबऋषीचा कैवारी ॥ ३ ॥
सकळां देवां अधिष्ठान । एका मंत्राशी कारण ॥ ४ ॥
तुका म्हणे ध्यानीं । ज्यासि ध्यातो शूळपाणी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- मात-कीर्ती, कारण-कार्य शूलपाणी-शिव, शंकर

अर्थ - हा श्रीहरी आपल्या भक्तावर दया करणारा असून दीनाचा नाथ आहे तीनही लोकात त्याची कीर्ती गाजून आहे. १ तो हा श्रीहरी भक्तश्रेष्ठ पुंडलिकासाठी धावून आला आणि वाळवंटात उभा राहिला २ अंबऋषीचा कैवार घेऊन या देवाने गर्भवासाची दुःखे सहन केली आहेत ३ सर्व देवाना याचाच आधार आहे. कारण याच्या एका मंत्रानेच सर्व प्रकारचे कार्य होत असते ४ तुकाराम महाराज म्हणतात, शूलपाणी शंकर हा-सुद्धा याचेच ध्यान करीत असतो ५

३३८३ फटकाळ देव्हारा फटकाळ अंगारा । फटकाळ विचारा चालविले ॥ १ ॥
फटकाळ तो देव फटकाळ तो भक्त । करवितो घात आणिका जीवा[१] ॥ २ ॥
तुका म्हणे अवघे फटकाळ हे जन । अनुभवियें खूण जाणतील ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- फटकाळ-वाईट, वाह्यात

अर्थ :- उगाच वाह्यात देवाचा देव्हारा माजवणे, वाह्यातपणे अंगारा देणे यातून वाह्यात विचार मात्र चालू होतो. १ हा देवही वाह्यात असतो, त्याचा भक्तही असाच वाह्यात असतो. तो आणखी इतर जीवाचा घात

१ देवा.

करतो. २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे सर्व लोक या भावाने वाह्यात होतात ज्याना श्रीहरीच्या अनुभवाची खूण पटली आहे तेच हे वर्म जाणतील ३

३३८४ लावुनिया गोठी । चुकवूं आदरिली दिठी ।
देउनिया मिठी । पळे महिमा थुलिया ॥ १ ॥
पुढें तोचि करी आड । तिचा लोभ तिसी नाड ।
लावूनी[1] चरफड । हात गोऊनि पळावे ॥ २ ॥
आधीं काकुलती । मोहो घालावा पुढती ।
तोडीं पडे माती । फिरता मागें[2] कैंचा तो ॥ ३ ॥
तुका[3] म्हणे देवा । यासी रखवी याचा हेवा ।
भावे का हे सेवा । सुखे तुम्हा नार्पिती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोठी–गोष्टी, थुलिया–मोठा, स्थूल, हेवा–हाव, नार्पिती–अर्पण करीत नाहीत

अर्थ – हा श्रीकृष्ण इतर गोपींना काही तरी गप्पागोष्टी करून गुतवितो आणि त्याची दृष्टी चुकवून कुणा एकीस मोठ्या आदराने मिठी देऊन हा मोठा श्रीहरी पळून जातो अथवा या मोठ्या देवाने मिठी मारल्यामुळे तिच्या डोक्यावरील माठ फुटून गेला १ तिने स्वतःविषयी अथवा स्वतःजवळील दूधदह्याचा लोभ धरला त्यामुळेच तिची अडचण झाली तोच तिच्या आड आला हा श्रीहरी तिचे हात गुतवून पळून जातो व तिला चरफडायला लावतो २ प्रारंभी काकुळतीस येऊन आपला सर्व मोह श्रीहरीस समर्पण करावा नतर माघार घेतली तर मग त्याची प्राप्ती कशी होणार ? त्याच्या तोंडात मातीच पडणार ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, यांच्यात असलेली लौकिकाची हावच याना रडवीत आहे भावभक्तीने तुम्हास सर्व प्रकारची सेवा सुखाने का हे समर्पण करीत नाहीत ? ४

३३८५ नेत्राची वासना । तुज पाहावे नारायणा ॥ १ ॥
करीं याचे[4] समाधान । काय पहातोसी अनुमान ॥ २ ॥
भेटावे पढरिराया । हेचि इच्छितात्ती वाहया ॥ ३ ॥
म्हणतो जावे पढरीसी । हेंचि ध्यान चरणासी[5] ॥ ४ ॥
चित्त म्हणे पायीं । तुझे राहीन निश्चयीं ॥ ५ ॥
म्हणे बधु तुकयाचा । देवा भाव पुरवीं साचा[6] ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा .– वाह्या–बाहू, हात, साचा–खरोखर.

*अर्थ – नारायणा, तुझे रूप नीटपणे पाहावे हीच इच्छा आमच्या डोळयाना आहे १ या विषयीचे तू* समाधान कर उगाच अनुमान काय पाहात बसला आहेस ? २ पढरीराया, तुला भेटून आलिंगन द्यावे हीच इच्छा माझ्या हाताना आहे ३ पढरीस जावे हेच ध्यान माझ्या पायाना निरतर आहे ४ तुझ्या पायाशी निश्चयाने राहीन असे हे चित्त सतत म्हणत आहे ५ तुकयाचा बधू म्हणत आहे देवा, माझी ही भावना खरोखर तुम्ही पूर्ण करा ६

३३८६ मन सताविळ । जाले न राहे निश्चळ ॥ १ ॥
दे रे भेटी पढरिराया । उभारोनि चारी बाहया ॥ २ ॥

*१ पुरवी, २ मग, ३ तुका म्हणे देवा । यासी नाडी याची सेवा ॥, ४ त्याचें, ५ या मानसी, ६ याचा*
*तु गाथा–३ .२४*

सर्वांग तळमळी । हात पाय रोमावळी ॥ ३ ॥
तुकयाबंधु[1] म्हणे कान्हा । भूक लागली नयना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– बाह्या–बाहू, हात, रोमावळी–केसाची रांग

अर्थ :– देवा, माझे मन निश्चल कधीच राहात नाही. ते फारच उतावीळ झाले आहे रे १ पंढरीराया, तू मला आपले घरी हात उभारून भेट दे रे २ माझे सर्व अंग, हातपाय व त्यावरील रोमावळीही तुझ्या भेटीसाठी तळमळत आहे ३ तुकयाबंधू म्हणतात, कान्हा, तुझ्या भेटीची भूक माझ्या डोळ्यांना लागली आहे. ४

३३८७ म्हणसी दावीन अवस्था । तैसे नको रे अनंता ॥ १ ॥
होऊनिया सह्यकार । रूप दाखवीं सुंदर ॥ २ ॥
मृगजळाचियापरी । तैसे न करावे हरी ॥ ३ ॥
तुकयाबंधु म्हणे हरी । कामा नये बाह्यात्कारी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अवस्था–वेध, उत्कठा.

अर्थ :– अनंता, वेध, उत्कठा कशी असते हे दाखवीन असे तू म्हणतोस पण तसे तू करू नकोस रे १ तू मला साह्यकारी हो आणि तुझे सगुण सुंदर रूप मला डोळ्यांना दाखीव २ मृगजळाचा काय उपयोग ? त्याच्या-प्रमाणे तू सर्व व्यर्थ करू नकोस ३ तुकयाबंधू म्हणतात, श्रीहरी, उगाच बाह्यात्कारी देखावा कामास येणार नाही ४

३३८८ आकारवंत मूर्ति । जेव्हां देखेन मी दृष्टी ॥ १ ॥
मग मी राहेन निवांत । ठेवूनिया तेथें चित्त ॥ २ ॥
श्रुति वाखाणिती । तैसा येसील प्रचिती ॥ ३ ॥
म्हणे तुकयाचा सेवक । उभा देखेन सन्मुख ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– निवांत–निश्चित

अर्थ .– देवा, मी प्रत्यक्ष डोळ्यांनी तुझी आकाररूप अशी मूर्ती जेव्हा पाहीन १ तेव्हा मी माझे चित्त तेथे ठेवून निश्चित राहीन २ मग मला श्रुतींनी वाखाणलेली अशी प्रचीती येईल ३ तुकाराम महाराजांचा सेवक म्हणतो मग मी देवाला आपल्या समोर पाहीन ४

३३८९ जेणें तुज जालें रूप आणि नांव । पतित हे दैव तुझें आम्ही ॥ १ ॥
नाहीं तरी तुज कोण हे पुसतें । निराकारी तेथें एकाएकी ॥ २ ॥
अंधारें दीपका आणिला शोभा । माणिकासी प्रभा कोंदणाची ॥ ३ ॥
धन्वंतरी रोगें आणिला उजेडा । सुखी काय चाडा जाणावें ते ॥ ४ ॥
अमृतासी मोल विषाचिया गुणें । पितळें तरी सोनें उंच निंच ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही असोनिया जाण । तुज देवपण आणियेलें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – चाडा–गरज, कारण

अर्थ :– देवा, आम्हा पतितांमुळेच तू पतितपावन हे नामरूप धारण केलेस म्हणून आम्ही पतित, तुझे दैवत आहोत १ नाही तर देवा, तू भवशून्य निराकार स्वरूपस्थितीने असतास, तर तेथे तुला कोणी विचारले असते ? २ अंधकाराने दीपप्रकाशात शोभा आणली आहे व कोंदणाच्या योगाने माणिकास तेज प्राप्त झाले आहे.३ वैद्याला रोग्यानेच प्रसिद्धीस आणले, जर सर्व निरोगी, सुखी असते, तर त्या वैद्याकडे जाण्याचे काय कारण आहे ?४

१ तुका म्हणे.

अमृताची किंमत विषामुळे वाढली, आणि पितळ हो नीच धातू आहे म्हणून सोने श्रेष्ठ ठरले आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हो असे पतित होतो म्हणून तुला देवपणाच्या मोठेपणाला आणले हे तू समज ६

विवरण – श्रीहरीशी प्रेमकलह करताना तुकारामबुवा या अभंगात एक मोठा बिनतोड असा तात्त्विक मुद्दा देवासमोर मांडीत आहेत हा श्रीहरी पतितपावन, अनाथनाथ, करुणासागर या नामांनी प्रसिद्ध झाला ते कुणाच्या बळावर ? आम्ही येथे पतित आहोत, अनाथ आहोत, कष्टी आहोत, म्हणूनच ना तुमची ही बिरुदावली वाढली ? म्हणूनच ना तुमचा लौकिक वाढला ? मग कुणी कुणावर उपकार केला आहे हे नीट स्मरा ना 'आमुचिया भावें तुज देवपण । ते का विसरोन राहिलासी ?' म्हणून एक रोखठोक प्रश्न तुकोबांनी एकदा विचारला आहे भक्तामुळेच देवास देवपण आलले आहे या आमच्या उपकाराचे स्मरण देवास असावे ना ! या प्रभूने आम्हास निर्माण केले हे जसे खरे, तसेच आमच्याच भावभक्तीने तो जन्मास आला हेही खरेच की त्यामुळेच आम्ही ही त्या श्रीहरीचे देवत्व आहोत, नाही तर या निराकार व निर्गुण देवास कोण विचारते ? दिवा तजस्वी खरा, पण अंधार आहे म्हणूनच त्याची खरी शोभा आहे माणकाला कोंदण केले तरच त्याची प्रभा दुणावते खूप मोठा ज्ञाता वैद्य आहे, पण रोगी मनुष्य भेटल्याखेरीज त्याच्या गुणाची किंमत ती काय ? अमृतास विषाच्या तुलनेमुळे महत्त्व आहे पितळेसारख्या हीन धातूच्या सापेक्षतेने सोन्यास किंमत आहे त्याचप्रमाणे आम्हो पतित असे सेवक आहोत म्हणूनच देवा तुला देवपण आले आहे प्रेमकलहाचा हा मुद्दा तुकाराम महाराजांनी अनेकदा पुढे केलेला आहे कारण 'आम्ही पापी तू पावन । हें तों पूर्वापार जाण ' असे एका अभंगात त्यांनी भगवंताला बजावले आहे जरि मी नव्हतों पतित । तेरी तू पावन कैंचा तेथ ?' या आणखी एका अभंगात हाच एक भाव आहे लोखंड आहे म्हणून परिसाला किंमत आहे, नाहीतर त्याची अवस्था दगडासारखीच झाली असती कुणीतरी याचक उभा आहे, म्हणूनच कल्पतरूचे माहात्म्य वाढीस लागत असते

३३९० सुख वाटे येथें ठायीं । बहु पायीं संतांचे ॥ १ ॥
म्हणऊनि केला वास । नाहीं नास ते ठायीं ॥ २ ॥
न करवे हाली चाली । निवारिली चिंता हे ॥ ३ ॥
तुका म्हणे निवे तनु । रजकणु लागती[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नास–नाशी, ठायीं–ठिकाणी, तनु–शरीर, रजकणु–चरणरज

अर्थ – संतांच्या ठिकाणी मला फार सुख वाटत आहे १ या सुखास कधीही नाश नाही म्हणून मी त्या ठिकाणी वास्तव्य केले आहे २ आता तेथून हालचाल करता येत नाही त्यामुळे माझी चिंता नाहीशी झाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, संतांच्या चरणरजाचा स्पर्श झाला असता देहातील त्रिविधताप नाहीसे होऊन तो शांत होतो ४

३३९१ देऊं[2] कपाट । कीं कोण काळ राखों वाट ॥ १ ॥
काय होईल तें शिरीं । आज्ञा धरोनिया करीं ॥ २ ॥
करूं कळे ऐसी मात । किंवा राखावा एकांत ॥ ३ ॥
तुका म्हणे जागों । किंवा कोणा नेदू[3] वागों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कपाट–दार बंद करणे वागों–वाणी, वाचा

अर्थ – देवा, दार बंद करून कोठपर्यंत तुझी वाट पाहात बसावे ? १ आता जी तुम्ही आज्ञा कराल ती मी शिरसावंद्य करीन २ मला जसे वाटेल तसे मी करू किंवा एकांत धरून राहू ३ तुकाराम महाराज म्हणतात, या ठिकाणी मी जागृत राहू किंवा दुसऱ्या कुणाची वाणी बंद करू ह सांगा ४

१ लागती, २ देऊनि कपाट, ३ नेदो

३३९२ मायबापापुढें लेकराची आळी । आणीक हे पाळी कोण लळे ॥ १ ॥
सांभाळा जी माझीं विषमें अनंता । जवळी असतां अव्हेर कां ॥ २ ॥
आणिकाची चाले सत्ता आम्हांवरी । तुमची ते थोरी काय मग ॥ ३ ॥
तुका म्हणे आलों दुरोनि जवळी । आतां टाळाटाळी करूं नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - आळी-हट्ट, लळे-इच्छा लाड, विषमें-दुःखे

अर्थ - आपल्या आईबापाजवळ लेकराने हट्ट करून हवे ते मागावे, त्यावाचून त्याची इच्छा कोण पूर्ण करील ? १ अनंता, माझ्या ठिकाणी जी कामक्रोधाची विषम दुःखे आहेत ती तुम्ही नाहीशी करा तुम्ही माझ्याजवळ असून माझा अव्हेर का करिता ? २ जर आमच्यावर दुसऱ्याची सत्ता चालेल तर मग तुमचा थोरपणा तो काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्याजवळ लाबून आलो आहे आता आपण टाळाटाळी करणे योग्य नाही ४

३३९३ माझ्या मुखें मज बोलवितो हरि । सकळां अंतरीं नारायण ॥ १ ॥
न करावा द्वेष भूतांचा मत्सर । हा तंव विचार जाणों आम्ही ॥ २ ॥
तुका म्हणे दोष नाहीं या विचारें । हितांचीं उत्तरें शिकवितां ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा - तंव-तर

अर्थ - जो नारायण सर्वांच्या हृदयात आहे, तो मला माझ्या मुखाने बोलावीत आहे १ म्हणून कोणत्याही जीवाचा द्वेष अथवा मत्सर करू नये, हा विचार आम्ही जाणत आहोत २ तुकाराम महाराज म्हणतात, जर कोणाला हिताचा उपदेश केला, तर त्या योगाने पातक लागत नाही ३

३३९४ मास खातां हाउस[1] करी । जोडुनि वैरी ठेवियेला ॥ १ ॥
कोण त्याची करिल कींव । जीवें जीव नेणती ॥ २ ॥
पुढिलासाटीं पाजवी[2] सुरी । आपुली चोरी अंगुळी ॥ ३ ॥
तुका म्हणे कुटिती हाडें । आपुल्या नाडें रडती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - पाजवी-पाजळती, धार लावतो नाड-अडचण

अर्थ - जर पशूला वध करून आनंदाने कोणी मास खाईल, तर त्याने ते वैरी जोडून ठेविले असे समजावे १ आपल्या जीवाप्रमाणे दुसऱ्याचा जीव जाणत नाहीत, तर त्या दुष्टाची दया कुणास येईल ? २ दुसऱ्याचा वध करण्यास शस्त्राला धार लावतो त्यावेळी आपल्या कराङ्गुळीस धक्का लागेल म्हणून तो ती लपवून धरतो ३ तुकाराम महाराज म्हणतात दुसऱ्याची हाडे कुटून पीठ करतात, पण त्यांना पुढे अडचण निर्माण होऊन दुःख झाले की ते रडतील ४

३३९५ तुज जाणें तान्हें नाहीं पांडुरंगा । कां जी मज सांगा उपेक्षिलें ॥ १ ॥
तुज ठावें होतें मी पातकी थोर[3] । आधींच कां थार[4] दिधली पायीं ॥ २ ॥
अंक तो पडिला हरिचा मी दास । भेद पंगतीस करूं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही जिंतिलें तें खरें । आतां उणें पुरें तुम्हां अंगीं[5] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - थार-आश्रय, अंक-शिक्का, डागोरा

१ हुप भारी, २ पाजळी, ३ खरा, ४ थारा दिला, ५ लागी

अर्थ :– पांडुरंगा, लहान बालकाने तुला जाणावे असे नाही; असे असून माझी उपेक्षा तुम्ही का करिता हे सांगा ना. १ मी पातकी आहे असे जर तुला माहीत आहे, तर तू आपल्या पायांजवळ आधी मला का आश्रय दिलास ? २ मी तुझा सेवक आहे, असा जगात डांगोरा झाल्यामुळे संतांच्या ओळीला मी बसलो. आता त्या ठिकाणी वेगळेपणा करणे तुला योग्य नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आम्ही तुला खरोखर जिंकले आहे, म्हणून जो कमीजास्तपणा आमच्याकडे येईल तो तुझ्याकडेच आहे. ४

३३९६ आम्हां घरीं धन शब्दांचीच रत्नें । शब्दांचीच शस्त्रें यत्न करूं ॥ १ ॥
शब्दचि आमुच्या जीवाचें जीवन । शब्दें वांटूं धन जनलोकां ॥ २ ॥
तुका म्हणे पाहा शब्दचि हा देव । शब्देंचि गौरव पूजा करूं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– धन–संपत्ती

अर्थ – आमच्या घरी शब्दरूपी रत्नांचीच संपत्ती आहे व शब्दरूपी शास्त्र आम्ही जतन करू १ आम्हांला जगण्यास एक उपाय शब्दच आहे व तेच धन लोकांसही देऊ. २ तुकाराम महाराज म्हणतात, पाहा, हा शब्दच देव आहे व त्याची शब्दाच्याच गौरवाने आम्ही पूजा करू ३

विवरण –तुकाराम महाराज लौकिकातील सर्व धनसंपत्तीकडे पाठ फिरवून खऱ्या व शाश्वताच्या सुखाकडे वळले होते त्यांच्या घरी ना धन, ना दौलत. पण याही स्थितीचा त्यांना अभिमान होता. सद्‌गुरुकृपेने व संतप्रेरणेने त्यांच्या मुखातून जो ध्वनी शब्दरूपास आला त्याचे मोल करावे तेवढे थोडेच होणार होते त्यांची शब्दांनी साकार झालेली 'अभंग'वाणी खरोखरच अ–भग आहे लौकिक सृष्टीतील धनसंपत्ती विलयास गेली, पण बुवांची अभंगसंपदा कायमची टिकणारी आहे. शब्दरत्ने हेच आमचे धन, शब्द हेच आमचे जीवन, असे बुवा म्हणतात ते अगदी सत्य आहे. कारण बुवांच्या मुखातून जे जे ध्वनी उमटत ते ते परब्रह्माच्या स्फूर्तीच्या रूपाने असत नादाला, ध्वनीला म्हणजेच शब्दाला ब्रह्मस्वरूप मानले आहे. या शब्दांनीच देवाची पूजा करायला तुकोबा निघाले आहेत, आणि याच शब्दाच्या माध्यमातून ते लोकांना उपदेश करण्यास प्रवृत्त झाले आहेत. शब्दाचे खंडन करतानाही याचा गौरव ज्ञानदेवांनी अनुभवामृतात केलेला आहे त्यांच्या मताने हा शब्द 'स्मरणदानीं प्रसिद्ध' आहे. या शब्दामुळेच अमूर्त वस्तू डोळ्यासमोर मूर्तिमान झालेली आहे. वस्तुब्रह्माची अनुभूती आणून देणारे तुकोबाचे शब्द खरोखरच एक अलौकिक स्वरूपाची संपत्ती आहे.

३३९७ ब्रह्मज्ञान दारीं येतें काकुलती । अव्हेरिलें संतीं विष्णुदासीं ॥ १ ॥
रिघों पाहे माजी बळें त्यांचें घर । दवडिती दूर म्हणोनियां ॥ २ ॥
तुका म्हणे येथें न चले सायास । पडिलें उदास त्यांच्या गळां ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – रिघो–प्रवेश, शिरकाव, सायास–प्रयत्न

अर्थ :– संतांच्या दारामध्ये माझा स्वीकार करा म्हणून ब्रह्मज्ञान काकुळतीस येत असते, पण त्या विष्णुदासांनी त्याचा अव्हेर केला आहे. १ ते संत त्या ब्रह्मज्ञानाला दूर दवडतात, म्हणून ते त्यांच्या घरामध्ये बळाने प्रवेश करू इच्छिते २ तुकाराम महाराज म्हणतात, जे ब्रह्मज्ञान मोठ्या सायासाने प्राप्त होत नाही, ते जे कुणी उदास आहेत त्यांच्या गळ्यात पडते. ३

३३९८ कासया लागला याती चौवाचार । मुळींचा[1] वेव्हार निवडिला ॥ १ ॥
ग्वाही बहुतांची[2] घालूनियां वरि । महजर करीं आहे माझ्या ॥ २ ॥
तुम्हां वेगळा लागें आपल्याच ठायीं । होतें करुनि तें ही माझें माझें ॥ ३ ॥

१ मुक्तीचा, २ भक्तांची.

भांडण सेवटीं जाले एकवट । आता कटकट करूं नये ॥ ४ ॥
ठेविला ठेवा तो आला माझ्या हाता । आतां नाहीं सत्ता तुज देवा ॥ ५ ॥
तुका म्हणे वायाविण खटपटा । राहिलों मी वांटा घेऊनिया ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा - चौघाचार-चौघात न्याय, पचाईत, महजर-करार

अर्थ - देवा मुक्तीविषयीच्या व्यवहाराचा तुमच्याआमच्यात पूर्वीच निकाल झालेला आहे त्याविषयी आता पचाईत करण्याचे काय कारण आहे ? १ या सबधाने झालेला करार माझ्याजवळ आहे, त्यावर पुष्कळ सतांची साक्ष आहे २ ज्या वेळी मी माझेपणाच्या पसाऱ्यात गुतलो होतो, त्या वेळी मी देहअहतेने तुमच्यापासून वेगळा होतो ३ पूर्वी तुमचेआमचे भाडण होऊन अखेरीस तुमचीआमची एकी झाली आता कटकट करू नये ४ आम्ही तुमच्याजवळ जो ठेवा ठेविला होता तो मला हस्तगत झाला आहे आता देवा, तुमची त्याच्यावर सत्ता नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, माझा वाटा मला प्राप्त झाला आता त्याविषयी खटपट करणे हे व्यर्थ आहे ६

३३९९ देहबुद्धि वसे जयाचिये अगीं । पूज्यता ते जगीं सुख मानी ॥ १ ॥
थोर असे दगा जाला त्यासी हाटीं । सोडोनिया गाठी चोरीं नेली ॥ २ ॥
गाठीचे जाउनि नव्हे तो मोकळा । बांधिलासे गळा दभलोभें ॥ ३ ॥
पुढिल्या उदिमा जालेसे खडण । दिसे नागवण पडे गाठी ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसें बोलतील सत । जाणूनिया घात कोण करी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा - हाटीं-बाजारात, उदीमा-व्यापार व्यवहार

अर्थ - ज्याच्या ठिकाणी देहअहभाव आहे त्याला लोकाकडून पूजा व मान मिळाल्याने तो त्याचे सुख मानतो १ या ससारबाजारामध्ये त्या योगाने त्याला थोर दगा झाला आहे कारण त्याच्या पदरी जी काही पापपुण्याची सामग्री होती ती त्या मानदभरूपी चोरानी हरण करून नेली २ अशा प्रकारे पदरी असलेले पुण्य त्याच्या गाठीचे जाऊनही तो सुटला नाही, तर दभलोभानी त्याचा गळा बाधला आहे ३ त्या योगाने त्याच्याकडून पुढे होणारा सत्कर्मव्यवहार नाहीसा झाला व पदरी होते ते पुण्य गेल्यामुळे तो साफ बुडाला असे दिसते ४ तुकाराम महाराज म्हणतात असे वतमान सताच्या मुखाने एकले असे असताना ते जाणूनबुजून आपला घात कोण करून घेईल ५

३४०० निंबाचिया झाडा साकरेचें आळें । आपलीं तीं फळें न संडीच ॥ १ ॥
तैसें अधमाचें अमगळ चित्त । वमन तें हित करूनी सांडी ॥ २ ॥
परिसाचे अंगीं लाविले खापर । पालट अंतर नेघे त्याचें ॥ ३ ॥
तुका म्हणे वेळू चंदना सगतीं । काय ते नसती जवळिके ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - वमन-ओकण, नेघे-घत नाही, वेळू-कळक, बांबू

अर्थ - ज्याप्रमाणे लिंबाच्या झाडाला साखरेचे जरी आळे केले, तरी ते काही आपली कडूपणाची फळे टाकीत नाही १ त्याप्रमाणे दुर्जनाचे चित्त मळकट असते त्याला किती जरी हितोपदेश केला, तरी तो समजून न घेता ओकून टाकतो २ परिसाच्या अगाला कोणतीही धातू लाविली असता सोने होते, पण त्यास खापर लावले तर ते बिलकूल पालटत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, बाबूचे वन जरी चदनाच्या जवळ असले तरी त्याचा त्यास काय उपयोग आहे ? ४

३४०१ दुबळें सदैवा । म्हणे नागवेल केव्हा ॥ १ ॥
आपणासारिख त्या पाहे । स्वभावासी करिल काये ॥ २ ॥

मूढ सभे आत । इच्छी पडिताचा घात ॥ ३ ॥
गाढें देखुनि शूरा । उगें करिते बुरबुरा ॥ ४ ॥
आणिकाचा हेवा । न करीं शरण जाई देवा ॥ ५ ॥
तुका म्हणे किती । करू दुष्टाची फजिती ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – नागवेल–फमवणूक, वाटोळे करील, दुबळें–करटे, बुरबुरा–कुरकुर

अर्थ – जर भाग्यवतासमोर करटे आले, तर ते भाग्यवताचे वाटोळे केव्हा होईल असे म्हणते १ ते भाग्यवानास आपल्यासारखे करटे होण्याविषयी यत्न करते, असा त्याचा स्वभाव आहे, त्याला त्याने काय करावे ? २ सभेमध्ये बसलेल्या पडिताचा घात केव्हा होईल, अशी मूढ लोकाची इच्छा असते ३ एखाद्या शूराला पाहून नपुसक आपल्या मनामध्ये उगीच कुरकुरत असतो ४ अरे, तू दुसऱ्याचा हेवा करू नकोस एका देवाला शरण जा ५ तुकाराम महाराज म्हणतात, असल्या दुर्जनाची फजिती तरी किती करावी ? ६

३४०२ माझी आता लोक सुखें निंदा करू । म्हणती विचारू साडियेला ॥ १ ॥
कारण होय तो करावा विचार । काय भीड भार करू देवा ॥ २ ॥
तुका म्हणे काय करू लापनिक । जनाचार सुख नासिवत ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – लापनिक–लबाडीचा मसलत, शब्दपांडित्य, कारण–कार्य

अर्थ – याने आता विचार करणे सोडून दिले आहे असे लोक मला म्हणतात अशा प्रकारची माझी निंदा खुशाल करावी १ देवा, ज्या योगाने माझे कार्य होईल तो विचार मी करीन त्यावाचून मला कोणाची भीडपर्वा धरण्याचे कारण नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, असले हे लोकव्यवहारातले सुख नाशवत असून बाह्यात्कारांचे आहे, ते घेऊन मला काय करावयाचे आहे ? ३

३४०३ ढेंकणाचे सगें हिरा जो भगला । कुसगें नाडला तैसा साधु ॥ १ ॥
ओढाळाच्या सगें सात्विक[1] नासली । क्षण एक नाडली समागमें ॥ २ ॥
डाकाचे सगतो सोने हीन जाले । मोल तें तुटले लक्ष कोडी ॥ ३ ॥
विषानें पक्वान्नें गोड कडू जालीं । कुसगानें केली तैसी परी ॥ ४ ॥
भावे तुका म्हणे सत्सग हा बरा । कुसग हा फेरा चौऱ्याशीचा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – नाडला–सकटात पडला, फसला, डाकाचे–डागण्याने

अर्थ – जो हिरा घणाच्या घावाने फुटत नाही, त्यास ढेकणाचे रक्त लागले असता सहज फुटतो, त्याप्रमाणे वाईट लोकाच्या सगतीने साधू हा फसला जातो १ चागली गाय जर ओढाळाच्या सगतीने एक रात्र गेली तर तिच्या गळ्यात लोढणे बाधावे लागते अशा प्रकारे क्षणभर समागमाने देखील चागली बुद्धी भ्रष्ट होते २ डाग लागल्याच्या योगाने चागले सोने कमी कसाचे होते, आणि त्या सोन्याची किंमत कोट्यावधी रुपये जरी असली तरी ते कमी किंमतीत विकावे लागते ३ गोड असलेले पक्वान्न विषाच्या सगतीने कडू होते, तसा प्रकार वाईटाच्या सगतीने चागल्या लोकांचा होतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, याकरिता चागल्या भावाने सताची सगत धरावी हे बरे, नाहीपेक्षा दुर्जनाच्या सगतीने चौऱ्याशी लक्ष योनींच्या फेऱ्यात पडावे लागेल ५

३४०४ भलते जन्मीं मज घालिसील तरी । न सोडीं मी हरी नाम तुझें ॥ १ ॥
सुख दुःख तुज देईन भोगिता । मग मज चिंता कासयाची ॥ २ ॥

---

१ सात्विके

तुझा दास म्हणवीन मी अकिला । भोगिता विठ्ठला गर्भवास ॥ ३ ॥
कासया मी तुज भाकितो करुणा । तारीं नारायणा म्हणऊनि ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज येऊं पाहे उणे । तारिसील तेणे आम्हा तया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – भलते–कोणत्याही अकिला–स्वाधीन

अर्थ – हरी, तू मला कोणत्याही जन्मास घातलेस, तरी तुझे नामस्मरण मी सोडणार नाही १ त्या ठिकाणी सुख अथवा दु:खाचे भोग जे मला होतील ते तुलाच अर्पण करीन. मला काळजी कसाची आहे ? २ विठ्ठला, मी गर्भवास भोगीत असता, तुझा आज्ञाधारक सेवक आहे, असे म्हणवीन ३ नारायणा, तू माझा उद्धार कर, अशी मी तुला विनंती करीत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुला आमच्या कृपा हीन दशेने कमीपणा येण्याचा प्रसंग आला म्हणजे तू आमचा उद्धार करशील ५

३४०५ गातो नाचतो आनंदें । टाळघागरिया छंदें ॥ १ ॥
तुझी तुज पुढें देवा । नेणो भाव कैसी सेवा ॥ २ ॥
नेणो टाळ घात मात । भलते सवा पाय हात ॥ ३ ॥
लाज नाहीं शंका । प्रेम धाला म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सवा–बरोबर, धाला–संतुष्ट झाला

अर्थ – हातामध्ये टाळ व पायामध्ये घागऱ्या बांधून त्याच्या नादात मी आनंदाने गात आहे व नाचत आहे १ देवा, तुझ्यापुढे तुझी सेवा कशी करावी व तुजविषयी भाव कसा धरावा, हे मी जाणत नाही २ ताल कसा असतो व तो चुकला म्हणजे त्याचा घात कसा होतो हा प्रकार मी जाणत नाही म्हणून पायांनी बेताल नाचतो व त्याप्रमाणे हातांनी टाळ वाजवितो ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला कोणाची भीती नाही की लज्जा नाही असा मी तुझ्या प्रेमाने तृप्त झालो आहे ४

३४०६ रुसलो आम्हीं आपुलिया सवसारा । तेथें जनाचारा काय पाड ॥ १ ॥
आम्हा इष्ट मित्र सज्जन सोयरे । नाहीं या दुसरे देवाविण ॥ २ ॥
दुराविले बंधु सखे सहोदर । आणीक विचार काय तेथें ॥ ३ ॥
उपाधिवचन नाइकती कान । त्रासले हे मन बहु माझें ॥ ४ ॥
तुका म्हणे करा होईल ते दया । सुख दु:ख वाया न धरावे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – जनाचारा–लोकाचाराचा, लोकरीतीची पाड–किंमत, सहोदर–सख्खे बंधू

अर्थ – आम्ही आपल्याच संसारावर रुष्ट होऊन गेलो आहोत तेथे इतर लोकाचाराची आम्हांस काय किंमत आहे ? १ या देवाशिवाय आम्हास दुसरे कुणी इष्टमित्र आणि सज्जनसोयरे नाहीत २ आमचे सख्खे बंधु-सुद्धा यामुळे आम्हापासून दूर झाले मग इतरांचा विचार कसला आला आहे ? ३ आता माझे कान कोणत्याही उपाधीचा विचार ऐकण्यास तयार नाहीत कारण यामुळे माझे मन फार त्रासून गेले आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, सुखदु:खाची व्यर्थ चिंता न करता होईल तितकी दया लोकांवर करत जावी ५

३४०७ साडुनि सुखाचा वाटा । मुक्ति मागे तो करंटा ॥ १ ॥
का रे न घ्यावा जन्म । प्रेम लुटावें नाम ॥ २ ॥
येथें मिळती दहीं भात । वैकुंठीं ते नाहीं मात ॥ ३ ॥
तुका[1] म्हणे आता । मज न लगे सायुज्यता ॥ ४ ॥

१ तुका म्हणे मुक्ति नाम

शब्दार्थ व टीपा – मात–गोष्ट, हकीगत, सायुज्यता–एक प्रकारची मुक्ती.

अर्थ:– श्रीहरीच्या प्रेमसुखाचा वाटा सोडून जो कुणी मुक्तीची इच्छा धरतो तो करटाच होय. १ मुक्ती मिळवून काय होणार ? त्यापेक्षा वारंवार जन्म येणेच चांगले नाही का ? जन्म घ्यावा आणि हरिनामाचे प्रेम लुटीत राहावे. २ येथे श्रीहरीच्या प्रेमाचा, काल्याचा दहीभात मिळत असतो ही गोष्ट वैकुंठात मिळणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला आता सायुज्यता नावाची मुक्ती नको वाटते ४

विवरण:– थोर साधुसंतांना मुक्तीची किंवा मोक्षाची पर्वा नसते. हा विषय मागे अनेकदा स्पष्ट केलेला आहे. मानवीजीविताचे एकमेव सार्थक म्हणजे मोक्षप्राप्ती सांगितली जाते जेथून आपण आलो त्या मूलस्थानी म्हणजे परब्रह्मस्वरूपाशी येथील सर्व संबंधातून मुक्त होऊन मिळणे म्हणजे मुक्ती अथवा मोक्ष सर्व जीवांची यासाठी धडपड असते. यासाठी सारा अट्टहास असतो. मुक्तीचे चार प्रकार सांगितले आहेत. सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता पैकी सायुज्यता ही शेवटची मुक्ती श्रेष्ठ प्रकारची मानली जाते या प्रकारात ईश्वर व जीव यांचे संपूर्ण ऐक्य होऊन जाते अशी कल्पना आहे परंतु ब्रह्माशी अथवा परमेश्वराशीच संपूर्ण तादात्म्य अथवा ऐक्य साधुसंतांना मान्य नाही सगुण प्रेमभक्तीत रमलेले थोर अनुभवी संत सायुज्य मुक्तीत समाधान मानीत नाहीत ईश्वराला डोळे भरून पाहणे, त्याच्या श्रीमुखाच्या दर्शनाने तृप्त होणे, साधुसंतांच्या संगतीत वावरणे, हरिनामाच्या गजरात तल्लीन होणे, श्रीहरीचे दर्शन होत नाहीसे पाहून त्याच्यावर रागावणे, रुसणे, थोडासा पण खोटा प्रेमकलह करणे, त्याच्या रूपाचे, गुणाचे चिंतन करणे, यातील अलौकिक आनंद सोडून जो मुक्तीची इच्छा धरील तो करटाच मानावा असे बुवांना या ठिकाणी म्हणावयाचे आहे श्रीहरीच्या प्रेमाचा भोग मुक्तीच्या अवस्थेत कुठून असणार ? बहुतेक मुमुक्षु लोक जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटण्याच्या प्रयत्नात असतात पण साधुसंत म्हणतात, गर्भवासातही सुख आहे प्रभूच्या प्रेमाचा अनुभव घ्यालाही मानवी जन्मात समागत असूनही घेता येतो ही मुक्ती लाजवील असे येथील नामप्रेमाचे माहात्म्य आहे. प्रभूच्या बरोबर क्रीडाविलास केल्यानंतर काल्याच्या प्रसंगी जो दहीभात मिळतो त्याची गोडी प्रत्यक्ष वैकुंठातही कुठून येणार ?

या जन्मानंतर मोक्ष मिळविण्याची कल्पना संतांना मान्य नाही मुक्तीलाही लाजविणारे जे काही सौख्य मिळवायचे असेल ते याच जन्मी मिळवून घ्यावे. 'मोक्ष मेल्यापाठी आम्हासी होईल । ऐसे जे म्हणतील अति मूर्ख ' असे ज्ञानदेवांनी म्हणून स्पष्ट केले आहे की, 'जववरी देह आहे तववरी साधना । करुनियां ज्ञान सिद्ध करा ।।' या साधनासाठी तर हा मानवी देह आहे या जन्मी विठ्ठलाचे प्रेम संपादावे, सत्संग करावा, प्रभुनामात तल्लीन व्हावे, हीच खरी मुक्ती. 'सांडुनि पंढरीची वारी । मोक्ष मागती ते भिकारी' असे नामदेवांनी म्हटले आहे. श्रीहरीचे पाय जेणेकरून अंतरतील ती मुक्ती नामदेवांना नको आहे त्यांच्या मनाची विश्रांती वेगळीच आहे 'झणी मुक्तिपद देसी पांडुरंगा । मग या संतसंगा पाहू कोठे ?' अशी धास्ती नामदेवरायांची आहे हे मुक्तिपद दीनवाणे होऊन पंढरपूरच्या वाळवंटात हिंडत असते असे त्यांचे म्हणणे आहे श्रीहरीच्या भक्तांच्या संगतीचाच लोभ त्यांना आहे. प्रभुप्रेम, संतसहवास या मानवी जन्मातच मिळत असल्याने त्यांचे एवढे भय वाटण्याचे काय कारण ? 'गर्भवास भीती ते आधळे जन । मुक्तीसी कारण नाहीं आम्हा' असा एकनाथ महाराजांचा अभिप्राय आहे. त्यांनीच पुढे म्हटले आहे, 'गर्भवास झालिया संतसेवा घडती । मुक्त झालिया न कळे भगवद्भक्ती । आम्ही सुखें गर्भवास घेऊं देवा । मुक्तीचिया मस्तकी पाय देऊं ।।' येथील भक्तिसुखासाठी पुन: पुन: जन्म घ्यावा लागला तर बिघडले कोठे ? 'वारंवार जन्म घेऊं । परी पाहूं पंढरपुर' असे त्यांनाच म्हटले आहे श्रीहरीचे प्रेम सोडून उगाच मुक्तीच्या मागे का लागावे ? असे तुकोबानाही वाटत त्यांना एकदा स्पष्टपणे म्हटले आहे की, 'मोक्षपद तुच्छ केलीं या कारणें । आम्हा जन्म घेणें युगायुगीं' आम्हा विष्णुदासांना मुक्तीची पर्वा बिलकुल नाही असे ते म्हणतात. म्हणून ते श्रीहरीस विनंती करतात, 'देवा ऐकें हे विनंती । मज नको रे हे मुक्ती' मग तुकोबांना काय हवे ते सांगतात, 'या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी । नको वैकुंठीचा वास । असे तया सुखानास । अद्भुत हा रस । कृपाराशी नामाचा' या सुखासाठी जे संत उत्सुक झाले आहेत त्यांना मुक्तीची अथवा वैकुंठपदाची मुळीच इच्छा नसते. 'मी तो बहु सुखी

तुझा दास म्हणवीन मी अंकिला । भोगिता विठ्ठला गर्भवास ॥ ३ ॥
कासया मी तुज भाकितो करुणा । तारीं नारायणा म्हणऊनि ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज येऊं पाहे उणे । तारिसील तेणे आम्हा तया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – भलते–कोणत्याही, अंकिला–स्वाधीन

अर्थ – हरी, तू मला कोणत्याही जन्मास घातलेस तरी तुझे नामस्मरण मी सोडणार नाही १ त्या ठिकाणी सुख अथवा दुःखाचे भोग जे मला होतील ते तुलाच अर्पण करीन. मला काळजी कशाची आहे ? २ विठ्ठला, मी गर्भवास भोगीत असता, तुझा आज्ञाधारक सेवक आहे, असे म्हणवीन ३ नारायणा, तू माझा उद्धार कर, अशी मी तुला विनंती करीत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुला आमच्या कृपा हीन दशेने कमीपणा येण्याचा प्रसंग आला म्हणजे तू आमचा उद्धार करशील ५

३४०५ गातों नाचतो आनंदें । टाळघागरिया छंदें ॥ १ ॥
तुझी तुज पुढें देवा । नेणो भाव कैसी सेवा ॥ २ ॥
नेणों ताळ घात मात । भलने सवा पाय हात ॥ ३ ॥
लाज नाहीं शंका । प्रेम धाला म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सवा–बरोबर, धाला–संतुष्ट झाला

अर्थ – हातामध्ये टाळ व पायामध्ये घागऱ्या बांधून त्याच्या नादात मी आनंदाने गात आहे व नाचत आहे १ देवा, तुझ्यापुढे तुझी सेवा कशी करावी व तुजविषयी भाव कसा धरावा, हे मी जाणत नाही २ ताल कसा असतो व तो चुकला म्हणजे त्याचा घात कसा होतो हा प्रकार मी जाणत नाही म्हणून पायांनी बेताल नाचतो व त्याप्रमाणे हातांनी टाळ वाजवितो ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला कोणाची भीती नाही की लज्जा नाही असा मी तुझ्या प्रेमाने तृप्त झालो आहे ४

३४०६ रुसलो आम्हीं आपुलिया संवसारा । तेथें जनाचारा काय पाड ॥ १ ॥
आम्हा इष्ट मित्र सज्जन सोयरे । नाहीं या दुसरें देवाविण ॥ २ ॥
दुराविले बंधु सखे सहोदर । आणीक विचार काय तेथें ॥ ३ ॥
उपाधिवचन नाइकती कान । त्रासले हे मन बहु माझें ॥ ४ ॥
तुका म्हणे करा होईल ते दया । सुख दुःख वाया न धरावें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – जनाचारा–लोकाचाराचा, लोकरीतीची पाड–किंमत, सहोदर–सख्खे बंधू

अर्थ – आम्ही आपल्याच संसारावर रुष्ट होऊन गेलो आहोत तेथे इतर लोकाचाराची आम्हास काय किंमत आहे ? १ या देवाशिवाय आम्हास दुसरे कुणी इष्टमित्र आणि सज्जनसोयरे नाहीत २ आमचे सख्खे बंधु-सुद्धा यामुळे आम्हापासून दूर झाले मग इतरांचा विचार कसला आला आहे ? ३ आता माझे कान कोणत्याही उपाधीचा विचार ऐकण्यास तयार नाहीत कारण यामुळे माझे मन फार त्रासून गेले आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, सुखदुःखाची व्यर्थ चिंता न करता होईल तितकी दया लोकांवर करत जावी ५

३४०७ सांडुनि सुखाचा वांटा । मुक्ति मागे तो करंटा ॥ १ ॥
कां रे न घ्यावा जन्म । प्रेम लुटावें नाम ॥ २ ॥
येथें मिळतो दहीं भात । वैकुंठीं ते नाहीं मात ॥ ३ ॥
तुका[1] म्हणे आतां । मज न लगे सायुज्यता ॥ ४ ॥

---

१ तुका म्हणे मुक्ति नलगे

शब्दार्थ व टीपा– मात–गोष्ट, हकीगत, सायुज्यता–एक प्रकारची मुक्ती.

*अर्थः– श्रीहरीच्या प्रेमसुखाचा वाटा सोडून जो कुणी मुक्तीची इच्छा धरतो तो करटाच होय १ मुक्ती मिळवून काय होणार ? त्यापेक्षा वारंवार जन्म घेणेच चांगले नाही का ? जन्म घ्यावा आणि हरिनामाचे प्रेम लुटीत राहावे. २ येथे श्रीहरीच्या प्रेमाचा, काल्याचा दहीभात मिळत असतो ही गोष्ट वैकुंठात मिळणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला आता सायुज्यता नावाची मुक्ती नको वाटते. ४*

विवरण– थोर साधुसंतांना मुक्तीची किंवा मोक्षाची पर्वा नसते. हा विषय मागे अनेकदा स्पष्ट केलेला आहे. मानवीजीविताचे एकमेव सार्थक म्हणजे मोक्षप्राप्ती सांगितली जाते. जेथून आपण आलो त्या मूलस्थानी म्हणजे परब्रह्म-स्वरूपाशी येथील सर्व सबंधातून मुक्त होऊन मिळणे म्हणजे मुक्ती अथवा मोक्ष सर्व जीवांची यासाठी धडपड असते. यासाठी सारा अट्टाहास असतो मुक्तीचे चार प्रकार सांगितले आहेत. सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता. पैकी सायुज्यता ही शेवटची मुक्ती श्रेष्ठ प्रकारची मानली जाते या प्रकारात ईश्वर व जीव यांचे संपूर्ण ऐक्य होऊन जाते अशी कल्पना आहे परंतु ब्रह्माशी अथवा परमेश्वराशीच संपूर्ण तादात्म्य अथवा ऐक्य साधुसंतांना मान्य नाही सगुण प्रेमभक्तीत रंगलेले थोर अनुभवी संत सायुज्य मुक्तीत समाधान मानीत नाहीत ईश्वराला डोळे भरून पाहणे, त्याच्या श्रीमुखाच्या दर्शनाने तृप्त होणे, साधुसंतांच्या संगतीत वावरणे, हरिनामाच्या गजरात तल्लीन होणे, श्रीहरीचे दर्शन होत नाहीसे पाहून त्याच्यावर रागावणे, रुसणे, थोडासा पण खोटा प्रेमकलह करणे, त्याच्या रूपाचे, गुणाचे चिंतन करणे, यातील अलौकिक आनंद सोडून जो मुक्तीची इच्छा धरील तो करटाच मानावा असे बुवांना या ठिकाणी म्हणावयाचे आहे श्रीहरीच्या प्रेमाचा भोग मुक्तीच्या अवस्थेत कुठून असणार ? बहुतेक मुमुक्षु लोक *जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटण्याच्या प्रयत्नात असतात पण साधुसंत म्हणतात, गर्भवासातही सुख आहे प्रभूच्या प्रेमाचा अनुभव यालाही मानवी जन्मात संसारात असूनही घेता येतो ही मुक्ती लाजवील असे येथील नामप्रेमाचे माहात्म्य आहे प्रभूच्या बरोबर क्रीडाविलास केल्यानंतर काल्याच्या प्रसंगी जो दहीभात मिळतो त्याची गोडी प्रत्यक्ष वैकुंठातही कुठून येणार ?*

या जन्मानंतर मोक्ष मिळविण्याची कल्पना संतांना मान्य नाही मुक्तीलाही लाजविणारे जे काही सौख्य मिळवायचे असेल ते याच जन्मी मिळवून घ्यावे. 'मोक्ष मेल्यापाठी आम्हांसी होईल । ऐसे जे म्हणतील अति मूर्ख' असे ज्ञानदेवांनी म्हणून स्पष्ट केले आहे की, 'जववरी देह आहे तववरी साधना । करूनियां ज्ञान सिद्ध करा ॥' या साधनासाठी तर हा मानवी देह आहे या जन्मी विठ्ठलाचे प्रेम संपादावे, सत्संग करावा, प्रभुनामात तल्लीन व्हावे, हीच खरी मुक्ती 'सांडुनि पंढरीची वारी । मोक्ष मागती ते भिकारी' असे नामदेवांनी म्हटले आहे. श्रीहरीचे पाय *जेणेकरून अंतरतील तो मुक्ती नामदेवांना नको आहे त्यांच्या मनाची विश्रांती वेगळीच आहे* '*काशी मुक्तिपद देसी पांडुरंगा । मग या सत्संगा पाहू कोठे ?' अशी धास्ती नामदेवरायांची आहे हे मुक्तिपद दीनवाणे होऊन पंढरपूरच्या वाळवंटात हिंडत असते असे त्यांचे म्हणणे आहे श्रीहरीच्या भक्ताच्या संगतीचाच लोभ त्यांना आहे.* प्रभुप्रेम, संतसहवास या मानवी जन्मातच मिळत असल्याने त्याचे एवढे भय वाटण्याचे काय कारण ? 'गर्भवास भीती ते आंधळे जन । मुक्तीसी कारण नाहीं आम्हां' असा एकनाथ महाराजांचा अभिप्राय आहे. त्यांनीच पुढे म्हटले आहे, 'गर्भवास झालिया संतसेवा घडती । मुक्त झालिया न कळे भगवद्भक्ती । आम्ही सुखें गर्भवास घेऊं देखा । मुक्तीचिया मस्तका पाय देऊं ॥' येथील भक्तिसुखासाठी पुन पुन जन्म घ्यावा लागला तर बिघडले कोठे ? 'वारंवार जन्म घेऊं । परी पाहूं पंढरपुर' असे त्यांनाच म्हटले आहे श्रीहरीचे प्रेम सोडून उगाच मुक्तीच्या मागे का लागावे ? असे तुकारामांनाही वाटते त्यांना एकदा स्पष्टपणे म्हटले आहे की, 'मोक्षपदें तुच्छ केलीं या कारणें । आम्हां जन्म घेणें युगायुगीं' आम्हां विष्णुदासांना मुक्तीची पर्वा बिलकुल नाही असे ते म्हणतात. म्हणून ते श्रीहरीस विनंती करतात, 'देवा ऐकें हे विनंती । मज नको रे हे मुक्ती' मग तुकोबांना काय हवे ते सांगतात, 'या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी । नको वैकुंठीचा वास । असें तया सुखानास । अद्भुत हा रस । कथाकाळीं नामाचा' या सुखासाठी जे संत उत्सुकलेले आहेत त्यांना मुक्तीची अथवा वैकुंठपदाची मुळीच इच्छा नसते. 'मी तो बहु सुखी

आनंद भरिता । आहे साधुसंता मेळीं सदा ' अशी त्याची भूमिका आहे या वैकुंठपदाची काय विशेष थोरवी ? ' जववरी नाहीं देखिली पंढरी । तववरी थोरी वैकुंठीची ' असे तुकाबानी स्पष्टपणे म्हटले आहे 'नाहीं चाड मोक्षपदीं भजनीं आवड ' हे संताच्या जीविताचे सार तुकाराम महाराजाना सांगितले आहे.

३४०८ पदोपदीं पाया पडणे । करुणा जाण भाकावी ॥ १ ॥
ये गा ये गा विसावया । करुणा दयासागरा ॥ २ ॥
जोडोनिया करकमळ । नेत्र जळ भरोनि ॥ ३ ॥
तुका उभें दारीं पात्र । पुरवीं आर्त विठोबा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विसावया-विसावा देणारा आर्त-तीव्र इच्छा

अर्थ – पावलोपावली देवाच्या पाया पडून करुणा भाकावी १ आणि त्याला म्हणावे की, 'अरे करुणासागरा, विसावा देणाऱ्या श्रीहरी, तू माझ्यासाठी त्वरित धावत ये २ मी माझे हात जोडून डोळ्यात प्रेमाश्रू आणून उभा आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात मी तुझ्या कृपादानासाठी हातात पात्र घेऊन उभा आहे विठ्ठला, माझी एवढी तीव्र इच्छा पुरवावी ४

३४०९ आता हे सेवटी असो पायावरी । वदती वैखरी वागपुष्प ॥ १ ॥
नुपेक्षावे आम्हा दीना पांडुरंगा । कृपादानीं जगामाजी तुम्हीं ॥ २ ॥
बोळवुनी देह सांडियेली शुद्ध । सारियेला[1] भेद जीव शिव ॥ ३ ॥
तुका म्हणे मन तुमचे चरणी । एवढी आयणी पुरवावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वैखरी-वाणी, वाचा, वागपुष्प-वाणी रूपाने प्रकटलेले पुष्प, नुपेक्षावे-उपेक्षा करू नये, आयणी-इच्छा

अर्थ – देवा, माझ्या वाणीतून ही जी शब्दपुष्पे बाहेर पडतात ती शेवटी मी तुमच्याच पायावर समर्पण करीत आहे १ पांडुरंगा, आम्हा दीनांची तुम्ही कधी उपेक्षा करू नये कारण या जगामध्ये कृपेचे दान करणारे तुम्हीच एक आहात २ यासाठी आम्ही देहबुद्धी सोडून दिली लौकिक संसाराची शुद्ध सोडली आणि जीवाशिवातील भेदही दूर केला ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझे मन तुमच्या चरणावर राहावे एवढी माझ्या मनाची इच्छा तुम्ही तृप्त करावी ४

३४१० तरिच होय वेडी[2] । नग्न होय धडफुडी[3] ॥ १ ॥
काय बोलाचे गौरव । आत वरी दोन भाव ॥ २ ॥
मृगजळा न्याहाळिता । तान न वजाये सेविता ॥ ३ ॥
न पाहे आणिकाची आस । शूर बोलिजे तयास ॥ ४ ॥
तुका म्हणे या लक्षणे । संत अळंकार लेणें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – धडफुडी-धड फडी, चांगलं धड असलेले वस्त्र फेडते अथवा खरोखर न वजाये-जात नाही

अर्थ – जी स्त्री अंगावरचे धड वस्त्र खरोखर सोडून नागवी होते तीच वेडी समजावी १ नाहीतर अंतःकरणात एक भाव व वागण्यात वरवरचा दुसरा प्रकार, अशा बोलण्याचा गौरव काय म्हणून करावा ? २ मृगजळास पाहून कधी तहान शमत नाही ३ आपले कार्य साधण्यासाठी जो कधी कुणाची वाट पाहात नाही तोच,

१ तोडियेला, २ शोभ, ३ धड फाडी.

शूर समजला पाहिजे ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशाच लक्षणाचे अलंकार संतांनी आपल्या अंगावर धारण केले आहेत ५

३४११ आग्रहा नावें पाप । योगीं सारावे संकल्प ।। १ ।।
सहजा ऐसें भाडवल । असोनि कां सारा बोल ।। २ ।।
तें न भेटे तें काय । मना अंगींचे उपाय ।। ३ ।।
तुका म्हणे धरीं सोय । वासनेची फोडा डोय ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – सारावे–दूर करावेत, डोय–डोळे

अर्थ – विपरीत गोष्टीचा आग्रह धरणे याचेच नाव पाप असे आहे तरी अशा पापाचे संकल्प योगी लोकांनी दूर करावेत १ असे मांडवल सहजासहजी जवळ असताना तुम्ही का बोलत नाही ? २ आपले मन व आपले शरीर आपल्या स्वाधीन झाले की मग काय प्राप्त होणार नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही काही तरी नीट मार्ग धरा व वासनेचे डोळे फोडून टाका ४

३४१२ न करी पठण घोष अक्षराचा । बीजमंत्र आमुचा पांडुरंग ।। १ ।।
सर्वकाळ नामचिंतन मानसीं । समाधान मनासी समाधि हे ।। २ ।।
न करीं भ्रमण न रिघें कपाटीं । जाईन तेथें दाटी वैष्णवांची ।। ३ ।।
अनु नेणे काहीं न वजें तपासी । नाचे दिंडीपाशीं जागरणीं ।। ४ ।।
उपवास व्रत न करीं पारणें । रामकृष्ण म्हणे नारायण ।। ५ ।।
आणिकांची सेवा स्तुती नेणें वाणूं । तुका म्हणे आणु दुजें नाहीं[1] ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपा – बीजमंत्र–मूलमंत्र, मुख्य मंत्र कपाटीं–डोंगरातील गुहा अनु–आणीक, न वजें–जात नाही, वाणू–वर्णन करू, आणु–अणुमात्र

अर्थ – आम्ही कधी इतर अक्षराचा घोष अथवा पठन करीत नाही पांडुरंग हाच एक आमचा बीजमंत्र आहे १ आमच्या मनात नेहमी नामाचेच चिंतन असते त्यामुळे आमच्या मनास जे समाधान मिळते तीच खरी समाधी वाटते आम्हाला २ या श्रीहरीच्या स्थानावाचून आम्ही इतरत्र कुठे भ्रमण करीत नाही किंवा कधी डोंगरातील गुहांमधून फिरत नाही जेथे वैष्णवांचा मेळावा आहे तेथे मात्र निश्चयाने आम्ही जातो ३ आम्ही सतत जेथे हरिनामाची दिंडी असेल तेथे जागरण करतो याशिवाय दुसरा कोणताही तपादिकांचा प्रकार आम्ही जाणत नाही, की त्या वाटांनी जात नाही ४ आम्ही सतत रामकृष्ण, नारायण असे नामस्मरण करीत असतो. याखेरीज उपवासादी व्रते आणि पारण्याचे प्रकार आम्ही कधी करीत नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीशिवाय दुसऱ्याची सेवास्तुती करावी हे आम्ही जाणीतही नाही केवळ हा श्रीहरीच आम्ही जाणतो, याच्याशिवाय अणुमात्रही दुसरे आम्हास माहीत नाही ६

३४१३ पुंडलिकाचे निकटसेवे । कैसा धावे बराडी ।। १ ।।
आपुलें थोरपण । नारायण विसरला ।। २ ।।
उभा कटीं ठवुनि कर । न म्हणे पर बैससें ।। ३ ।।
तुका म्हणे जगदीशा । करणें आशा भक्ताची ।। ४ ।।

---

[1] वाहीं

महाराज या विठ्ठल माउलीला विनवीत आहेत कारण त्याची खात्री आहे की, 'विठ्ठल माउली कृपेची कोंवळी। आळविता घाली प्रेमपान्हा॥' तुकारामबुवांनी तर अनेक ठिकाणी या प्रेमळ मातेच्या वात्सल्याचे दर्शन घडविले आहे. 'मायें मोकलिले कोठें जावें बाळें ?' 'बाळ मातेपाशीं सागे तानभूक। उपायाचे दुःख काय जाणे ?', 'नलगे मागेसी बाळ निरवावें। आपुल्या स्वभावें ओढे त्यासी' इत्यादी वचनावरून तुकाराम महाराजांची विठ्ठलाशी जवळीक कोणत्या नात्याची व प्रकारची होती हे स्पष्ट होण्यासारखे आहे

३४१५ काय करितील केलीं नित्य पापें। वसे नाम ज्यापे विठोबाचे॥ १॥
तृणीं हुताशन लागला ते रासी। जळतील तैसीं क्षणमात्रें॥ २॥
विष्णुमूर्तिपाद पाहता चरण। तेथें कर्म कोण राहू शके॥ ३॥
तुका म्हणे नाम जाळी महादोष। जेथें होय घोष कीर्तनाचा॥ ४॥

शब्दार्थ व टीपा – ज्यापें–ज्याच्या मुखात, हुताशन–अग्नी

अर्थ – ज्याच्या मुखात नेहमीच विठोबाचे नाम असते त्याच्या हातून नेहमी पापाचरणे झाली तरी ती असे काय करतील त्याला ? १ गवताच्या गंजीस अग्नी लागल्यावर ती जशी जळून भस्मसात होते, त्याप्रमाणे विठ्ठलनामाने त्याची पातके एका क्षणात नष्ट होतील २ श्रीविष्णूच्या मूर्तीचे चरण दृष्टीस पडले असताना तेथे कुणाचे कर्म राहू शकेल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या ठिकाणी श्रीहरीच्या कीर्तनात नामघोष होत असतो तेथे महादोषाची पातके जळून जातात ४

३४१६ वेद नेले शंखासुरें। केले ब्रम्हयानें गान्हाणें॥ १॥
धांव धांव झडकरी[1]। ऐसें[2] कृपाळुवा हरी॥ २॥
गजेंद्र नाडियें गाजिला। तेणें तुझा धांवा केला॥ ३॥
[3] तुका म्हणे पद्मनाभा। जेथें पाहे तेथें उभा॥ ४॥

शब्दार्थ व टीपा :– निकटसेवे–नि:सीम सेवेमुळे, वराडी–आशाळभूत, उपाशी, पर–पलीकडे.

अर्थ :– पुंडलीकाने आपल्या आईबापांची केलेली नि:सीम सेवा पाहून हा श्रीहरी एखाद्या आशाळभूता-प्रमाणे त्याच्याकडे धावून आला. १ या प्रसंगी हा नारायण आपले थोरपण विसरून गेला. २ कमरेवर हात ठेवून हा उभा राहिला आहे, आणि आपल्या भक्तांपासून दूर, पलीकडे वसतो असे म्हणत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा जगदीश आपल्या भक्तांची आशा करीत असतो ४

३४१४ बाळ काय जाणे जीवनउपाय । मायबाप वाहे सर्व चिंता ।। १ ।।
आइतें भोजन खेळणें अंतरीं । अंकिताचे शिरीं भार नाहीं ।। २ ।।
आपुलें शरीर रक्षितां न कळे । सांभाळूनि लळे पाळी माय ।। ३ ।।
तुका म्हणे माझा विठ्ठल जनिता । आम्हुचि[1] ते सत्ता तयावरी ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :–जीवनउपाय–जगण्याचे उपाय, अंतरी–अंत:करणात, अंकिताचे–स्वाधीन असलेल्याच्या, जनिता–पिता.

अर्थ :– आपल्या जगण्याचे उपाय कधी लहान मूल जाणत असते का ? त्याची सर्व चिंता त्याचे आईबापच करीत असतात. १ त्याच्या अंत:करणात आयते भोजन व खेळणे एवढेच असते बालक आपल्या आईबापावर विसंबून असल्याने त्याच्या शिरावर कसलाही भार नसतो. २ आपल्या देहाचे रक्षण करण्याचेही बालकास समजत नाही. त्याचे नाना प्रकारचे लाड पुरवून त्याची आईच त्याचे रक्षण करीत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा विठ्ठल माझा पिता असून आमचा त्याच्यावर विशेष अधिकार आहे. ४

विवरण :– श्रीहरीची भक्ती विविध प्रकारची नाती जडवून केली जाते त्यातील सेव्य-सेवक हे नाते प्रधान मानले जाते. श्रवण, कीर्तन, स्मरण, अर्चन, दास्य, पादसेवन इत्यादी नवविधा भक्तीत हेच नाते प्रामुख्याने असते. परंतु या सर्व नात्यात एक प्रकारचा दुरावा अथवा संकोच आहे. श्रीहरी आपला स्वामी व आपण त्याचे सेवक. आपण सेवा वा स्तुती करून त्याची प्राप्ती करून घ्यायची ही भूमिका येथे आहे परंतु तुकोबासारख्या संतांची या बाबतीत निराळीच झेप दिसते आपण प्रार्थना करावी, आपण स्तुती करावी, आपण तपादी साधने करावीत; आणि मग श्रीहरीने आपल्यावर कृपा करावी हे संतांना मानवेना हा श्रीहरी आपला पिता ना ? श्रीविठ्ठल आपली माउली ना ? हिचीच आपण लेकुरे ना ? याच माउलीला एकाकी करमत नव्हते, म्हणून ती आपणास जन्म देती झाली ना ? म्हणजे आपणामुळेच या श्रीहरीला माहात्म्य लाभले. आपण त्याची मुले मुलांनी कधी स्वत:विषयी चिंता करायची असते का ? आईच सर्व जाणते मुलाची भूक आई प्रथम जाणते मुलाने रडावे, हट्ट करावा, खेळावे; आणि आईने त्याचे सर्व काही करावे, अशी जी व्यावहारिक जगातील रीत, तीच संतांनी श्रीहरीशी वागतानाही मनास लावली. आईकडे जाताना ना संकोच, ना भीडभाड खुशाल तिच्या मांडीवर बसावे, अपराध करून तिच्या पदराखाली लपावे, तिला वाटेल्या दुरया द्याव्यात. कारण यानेच तिला पान्हा फुटतो तिचे प्रेम जागे होते. भक्तीने जे साधन करायचे ते हेच. फक्त तीव्रतेने 'आई ऽऽ' म्हणून हाक मारायची, प्रसंगी तिच्यावर रागवायचे, रुसायचे, तिच्या जवळ हट्ट करायचा. या प्रेमसाधनेमुळे तिचे वात्सल्य जागृत होते सर्व अपराध विसरून ती आपल्या मुलाला पोटाशी धरते. स्तनपान करविते. प्रेमाचे दूध पिऊन बालक तृप्त होतो. त्याला पाहून माता तृप्त होते; असे हे अतिनिकटचे नाते संतांनी श्रीहरीशी जोडलेले असते त्यामुळे या वात्सल्यभक्तीत साधने करायची ती श्रीहरीने, माउलीने. कारण तिलाही यात तृप्ती आहे. जीवन कसे जगायचे हे बालकाला काय माहीत असते ? जे कुणाच्या तरी स्वाधीन आहे, कुणावर तरी अवलंबून आहे, त्याच्या शिरावर कसला आला आहे भार ?

या वात्सल्यमय भक्तीचा मोठा मजेदार आविष्कार मराठी संतांच्या अभंगातून झालेला दिसतो.' वत्साकारणें मोहाळु गाय । अनुसरल्या पान्हाय ।। तैसें तुझें वासरूं बांधलो मी असे । मज लावी कासें आपुलिया ' म्हणून नामदेव

[1] जेथे आमची.

महाराज या विठ्ठल माउलीला विनवीत आहेत कारण त्याची खात्री आहे की, 'विठ्ठल माउली कृपेची कोवळी । आळविता घाली प्रेमपान्हा ॥' तुकारामबुवांनी तर अनेक ठिकाणी या प्रेमळ मातेच्या वात्सल्याचे दर्शन घडविले आहे. 'मायें मोकलिले कोठें जावें बाळें ?' 'बाळ मातेपाशीं सांगे तानभूक । उपायाचें दुःख काय जाणे ?', 'नलगे मागेसी बाळ निरवावे । आपुल्या स्वभावें ओढे त्यासी' इत्यादी वचनावरून तुकाराम महाराजाची विठ्ठलाशी जवळीक कोणत्या नात्याची व प्रकारची होती हे स्पष्ट होण्यासारखे आहे

३४१५ काय करितील केलीं नित्य पापें । वसे नाम ज्यापें विठोबाचें ॥ १ ॥
तृणीं हुताशन लागला ते रासी । जळतील तैसीं क्षणमात्रें ॥ २ ॥
विष्णुमूर्तिशद पाहतां चरण । तेथें कर्म कोण राहू शके ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम जाळी महादोष । जेथें होय घोष कीर्तनाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ज्यापें–ज्याच्या मुखात, हुताशन–अग्नी

अर्थ – ज्याच्या मुखात नेहमीच विठोबाचे नाम असते त्याच्या हातून नेहमी पापाचरणे झाली तरी ती असे काय करतील त्याला ? १ गवताच्या गंजीस अग्नी लागल्यावर ती जशी जळून भस्मसात होते, त्याप्रमाणे विठ्ठलनामाने त्याची पातके एका क्षणात नष्ट होतील २ श्रीविष्णूच्या मूर्तीचे चरण दृष्टीस पडले असताना तेथे कुणाचे कर्म राहू शकेल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या ठिकाणी श्रीहरीच्या कीर्तनात नामघोष होत असतो तेथे महादोषाची पातके जळून जातात ४

३४१६ वेद नेले शंखासुरें । केले ब्रम्हयाने गाऱ्हाणे ॥ १ ॥
धाव धांव झडकरी[1] । ऐसें[2] कृपाळुवा हरी ॥ २ ॥
गजेंद्र नाडियें गांजिला । तेणें तुझा धावा केला ॥ ३ ॥
तुका म्हणे पद्मनाभा । जेथें पाहें तेथें उभा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शंखासुरें–शंखासुर नावाच्या दैत्याने, नाडियें–नक्राने, मगराने.

अर्थ – शंखासुर नावाच्या दैत्याने जेव्हा वेद नेऊन समुद्रात बुडविले तेव्हा देवा, ब्रह्मदेवाने तुमच्याकडे गाऱ्हाणे नेले १ कृपाळू असणाऱ्या श्रीहरी, तू त्वरित धावून ये २ मगराच्या मिठीत सापडलेल्या गजेंद्राने धावा केल्यावरोबर आलास ३ तुकाराम महाराज म्हणतात, पद्मनाभा, जेथे पाहावे तेथे तू भक्ताच्या रक्षणार्थ उभा आहेस ४

विवरण :– या अभंगात तुकोबांनी श्रीहरीच्या मत्स्यावताराचा उल्लेख केला आहे शंख नावाचा एक असुर समुद्राचा पुत्र असून समुद्रातच वसती करून होता याने आपल्या पराक्रमाने सर्व देवांना व लोकपालांना त्रस्त करून सुवर्णपर्वताच्या गुहेत वदिस्त करून टाकले. हे पुढे बलवान होऊ नयेत म्हणून शंखासुराने देवांचा एकमेव आधार असे जे चार वेद तेच समुद्रात बुडवून टाकले त्यामुळे देव निराधार झाले त्याची धर्मकृत्ये बंद झाली. लोकांना त्रास होऊ लागला म्हणून ब्रह्मदेवाने श्रीविष्णूकडे जाऊन वेदांना मुक्त करण्याविषयी प्रार्थना केली आणि विष्णूने मत्स्याचे रूप धारण करून शंखासुराचा वध केला व समुद्रातून वेद बाहेर काढले पुराणातील या कथा-संदर्भांचा येथे तुकारामबुवांनी उल्लेख केला आहे. गजेंद्राची कथाही सर्वप्रसिद्ध असीच आहे 'गजेंद्र पशु आर्ते मोकलिला' (अभंग क्र २४५५) आणि 'गजेंद्र तो हस्ती सहस्र वरुषें' (अभंग क्र ३०८७ ) या दोन अभंगातील तुकारामबुवांनी केलेला गजेंद्राचा उल्लेख आपण पाहिलेलाच आहे

३४१७ माकडा दिसती कवटी नारळा । भोंवता निराळा वरील सारी ॥ १ ॥
एका रस एका तोंडीं पडे माती । आपुलाले नेती विभाग ते ॥ २ ॥

1 लवकरी, 2 ऐके.

शब्दार्थ व टीपा :– निकटसेवे–नि.सीम सेवेमुळे, बराडी–आशाळभूत, उपाधी, पर–पलीकडे.

अर्थ :– पुंडलीकाने आपल्या आईबापाची केलेली नि सीम सेवा पाहून हा श्रीहरी एखाद्या आशाळभूता-प्रमाणे त्याच्याकडे धावून आला. १ या प्रसंगी हा नारायण आपले थोरपण विसरून गेला. २ कमरेवर हात ठेवून हा उभा राहिला आहे, आणि आपल्या भक्तांपासून दूर, पलीकडे बसतो असे म्हणत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा जगदीश आपल्या भक्तांची आशा करीत असतो. ४

३४१४ बाळ काय जाणे जीवनउपाय । मायबाप वाहे सर्व चिंता ॥ १ ॥
आइतें भोजन खेळणें अंतरीं । अंकिताचे शिरीं भार नाहीं ॥ २ ॥
आपुलें शरीर रक्षितां न कळे । सांभाळूनि लळे पाळी माय ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा विठ्ठल जनिता । आमुचि[1] ते सत्ता तयावरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–जीवनउपाय–जगण्याचे उपाय, अंतरी–अंत करणात, अंकिताचे–स्वाधीन असलेल्याच्या, जनिता–पिता.

अर्थ :– आपल्या जगण्याचे उपाय कधी लहान मूल जाणत असते का ? त्याची सर्व चिंता त्याचे आईबापच करीत असतात. १ त्याच्या अंत करणात आयते भोजन व खेळणे एवढेच असते बालक आपल्या आईबापावर विसंबून असल्याने त्याच्या शिरावर कसलाही भार नसतो. २ आपल्या देहाचे रक्षण करण्याचेही बालकास समजत नाही. त्याचे नाना प्रकारचे लाड पुरवून त्याची आईच त्याचे रक्षण करीत असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा विठ्ठल माझा पिता असून आमचा त्याच्यावर विशेष अधिकार आहे. ४

विवरण :– श्रीहरीची भक्ती विविध प्रकारची नाती जडवून केली जाते त्यातील सेव्य-सेवक हे नाते प्रधान मानले जाते. श्रवण, कीर्तन, स्मरण, अर्चन, दास्य, पादसेवन इत्यादी नवविधा भक्तीत हेच नाते प्रामुख्याने असते. परतु या सर्व नात्यात एक प्रकारचा दुरावा अथवा सकोच आहे. श्रीहरी आपला स्वामी व आपण त्याचे सेवक. आपण सेवा वा स्तुती करून त्याची प्राप्ती करून घ्यायची ही भूमिका येथे आहे. परतु तुकोबासारख्या सताची या बाबतीत निराळीच झेप दिसते आपण प्रार्थना करावी, आपण स्तुती करावी, आपण तपादी साधने करावीत, आणि मग श्रीहरीने आपल्यावर कृपा करावी हे सताना मानवेना हा श्रीहरी आपला पिता ना ? श्रीविठ्ठल आपली माउली ना ? हिचीच आपण लेकुरे ना ? याच माउलीला एकाकी करमत नव्हते; म्हणून ती आपणास जन्म देती झाली ना ? म्हणजे आपणांमुळेच या श्रीहरीला माहात्म्य लाभले. आपण त्याची मुले मुलानी कधी स्वतःविषयी चिंता करायची असते का ? आईच सर्व जाणते. मुलाची भूक आई प्रथम जाणते मुलाने रडावे, हट्ट करावा, खेळावे, आणि आईने त्याचे सर्व काही करावे, अशी जी व्यावहारिक जगातील रीत, तीच संतानी श्रीहरीशी वागतानाही मनास लावली. आईकडे जाताना ना सकोच, ना भीडभाड. खुशाल तिच्या मांडीवर बसावे, अपराध करून तिच्या पदराखाली लपावे, तिला वाटल्या दृश्या द्याव्यात. कारण यानेच तिला पान्हा फुटतो तिचे प्रेम जागे होते. भक्तीने जे साधन करायचे ते हेच. फक्त तीव्रतेने 'आई ऽऽ' म्हणून हाक मारायची, प्रसगी तिच्यावर रागवायचे, रुसायचे, तिच्या जवळ हट्ट करायचा. या प्रेमसाधनेमुळे तिचे वात्सल्य जागृत होते सर्व अपराध विसरून ती आपल्या मुलाला पोटाशी धरते. स्तनपान करविते. प्रेमाचे दूध पिऊन बालक तृप्त होतो. त्याला पाहून माता तृप्त होते; असे हे अतिनिकटचे नाते सतानी श्रीहरीशी जोडलेले असते. त्यामुळे या वात्सल्यभक्तीत साधने करायची ती श्रीहरीने, माउलीने. कारण तिलाही यात तृप्ती आहे. जीवन कसे जगायचे हे बाळकाला काय माहीत असते ? जे कुणाच्या तरी स्वाधीन आहे, कुणावर तरी अवलंबून आहे, त्याच्या शिरावर कसला आला आहे भार ?

या वात्सल्यमय भक्तीचा मोठा मजेदार आविष्कार मराठी सताच्या अभगातून झालेला दिसतो.' वत्साकारणें मोहाळु गाय । अनुसरल्या पान्हाय ॥ तैसें तुझें वासरूं बांधलो मी असें । मज लावो कासें आपुलिया ' म्हणून नामदेव

[1] जेथे आमची.

महाराज या विठ्ठल माउलीला विनवीत आहेत कारण त्याची खात्री आहे की, 'विठ्ठल माउली कृपेची कोवळी। आठवितां घाली प्रेमपान्हा ॥' तुकारामबुवानी तर अनेक ठिकाणी या प्रेमळ मातेच्या वात्सल्याचे दर्शन घडविले आहे. 'मायें मोकलिलें कोठें जावें बाळें ?' 'बाळ मातेपाशीं सांगे तानभूक। उपायाचे दुःख काय जाणे ?', 'नलगे मायेसी बाळ निरवावें। आपुल्या स्वभावें ओढे त्यासी' इत्यादी वचनावरून तुकाराम महाराजाची विठ्ठलाशी जवळीक कोणत्या नात्याची व प्रकारची होती हे स्पष्ट होण्यासारखे आहे

३४१५ काय करितील केलीं नित्य पापें। वसे नाम ज्यापें विठोबाचे ॥ १ ॥
तृणीं हुताशन लागला ते रासी। जळतील तैसीं क्षणमात्रें ॥ २ ॥
विष्णुमूर्तिपाद पाहता चरण। तेथें कर्म कोण राहू शके ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम जाळी महादोष। जेथें होय घोष कीर्तनाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ज्यापें–ज्याच्या मुखात, हुताशन–अग्नी

अर्थ – ज्याच्या मुखात नेहमीच विठोबाचे नाम असते त्याच्या हातून नेहमी पापाचरणे झाली तरी ती असे काय करतील त्याला ? १ गवताच्या गंजीस अग्नी लागल्यावर ती जशी जळून भस्मसात होते, त्याप्रमाणे विठ्ठलनामाने त्याची पातके एका क्षणात नष्ट होतील २ श्रीविष्णूच्या मूर्तीचे चरण दृष्टीस पडले असताना तेथे कुणाचे कर्म राहू शकेल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या ठिकाणी श्रीहरीच्या कीर्तनात नामघोष होत असतो तेथे महादोषाची पातके जळून जातात ४

३४१६ वेद नेले शंखासुरें। केले ब्रम्हयानें गाऱ्हाणें ॥ १ ॥
धाव धाव झडकरी[1]। ऐसे[2] कृपाळुवा हरी ॥ २ ॥
गजेंद्र नाडियें गांजिला। तेणें तुझा धावा केला ॥ ३ ॥
तुका म्हणे पद्मनाभा। जेथें पाहे तेथें उभा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शंखासुरें–शंखासुर नावाच्या दैत्याने, नाडियें–नक्राने, मगराने.

अर्थ – शंखासुर नावाच्या दैत्याने जेव्हा वेद नेऊन समुद्रात बुडविले तेव्हा देवा, ब्रह्मदेवाने तुमच्याकडे गाऱ्हाणे नेले १ कृपाळू असणाऱ्या श्रीहरी, तू त्वरित धावून ये २ मगराच्या मिठीत सापडलेल्या गजेंद्राने धावा केल्याबरोबर आलास ३ तुकाराम महाराज म्हणतात, पद्मनाभा, जेथे पाहावे तेथे तू भक्ताच्या रक्षणार्थ उभा आहेस ४

विवरण – या अभंगात तुकोबानी श्रीहरीच्या मत्स्यावताराचा उल्लेख केला आहे शंख नावाचा एक असुर समुद्राचा पुत्र असून समुद्रातच वसती करून होता याने आपल्या पराक्रमाने सर्व देवाना व लोकपालाना त्रस्त करून सुवर्णपर्वताच्या गुहेत बंदिस्त करून टाकले. हे पुढे बलवान होऊ नयेत म्हणून शंखासुराने देवाचा एकमेव आधार असे जे चार वेद तेच समुद्रात बुडवून टाकले त्यामुळे वेद निराधार झाले त्यांची धर्मकृत्ये बंद झाली लोकाना त्रास होऊ लागला म्हणून ब्रह्मदेवाने श्रीविष्णूकडे जाऊन वेदाना मुक्त करण्याविषयी प्रार्थना केली आणि विष्णूने मत्स्याचे रूप धारण करून शंखासुराचा वध केला व समुद्रातून वेद बाहेर काढले पुराणातील या कथा-संदर्भाचा येथे तुकारामबुवांनी उल्लेख केला आहे गजेन्द्राची कथाही सर्वप्रसिद्ध अशीच आहे 'गजेंद्र पशु आर्त्ते मोकलिला' (अभंग क्र २४५५) आणि 'गजेंद्र तो हस्ती सहस्र वरुषें' (अभंग क्र ३०८७) या दोन अभंगातील तुकारामबुवांनी केलेला गजेंद्राचा उल्लेख आपण पाहिलेलाच आहे

३४१७ माकडा दिसतो कवटी नारळा। भोक्ता निराळा वरील सारी ॥ १ ॥
एका रस एका तोंडीं पडे माती। आपुलाले नेती विभाग ते ॥ २ ॥

१ लवकरी, २ ऐकें.

सुनियासी क्षीर वाढिल्या[1] ओकवी । भोगित्यां[2] पोसवी धणीवरी ॥ ३ ॥
तुका म्हणे भार वागविती मूर्ख । नेतील तें सार परीक्षक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सारी–दूर करतो, सुनियासी–कुत्र्यापुढे, धणीवरी–तृप्ती होईपर्यंत.

अर्थ – नारळाच्या वर असलेली करवटीच तेवढी माकडाला दिसते परंतु जे कुणी शहाणे भोगते आहेत ते त्यावरील करवटी दूर सारून आतील खोबऱ्याचा व पाण्याचा स्वाद घेतील १ अशा रीतीने जे कुणी सारभूत तत्त्व पाहाणारे आहेत त्याच्या हाती रसाळ वस्तू येते, तर जे कुणी वरवर पाहाणारे आहेत त्याच्या तोंडात मातीच पडते जो तो आपापल्या वृत्तीप्रमाणे विभागाचा धनी होतो २ कुत्र्यापुढे चागली गोड खीर वाढली तर ती तो ओकून टाकतो, पण जो कुणी तिचा भोगता आहे त्यास तृप्ती होईपर्यंत ती उपयोगी पडते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मूर्ख लोक उगाचच आपल्या शिरावर भार वागवतात परंतु जे कुणी शहाणे परीक्षक आहेत ते मात्र सारभूत तत्त्व मात्र घेतात ४

३४१८ भेटीची आवडी[3] उताविळ मन । लागलेसे ध्यान जीवीं जीवा ॥ १ ॥
आता आवडीचा पुरवावा सोहळा । येऊनी गोपाळा क्षेम देईं ॥ २ ॥
नेत्र उन्मळित राहिले तातस्त । गंगा अश्रुपात वहावली ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही करा साचपणा । मुळीच्या वचना आपुलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी–प्रेम, क्षेम–आलिंगन, उन्मळित–उघडे राहून, साचपणा–खरेपणा

अर्थ – देवा, तुमच्या भेटीचे प्रेम माझ्या मनात तीव्रतेने वसत असल्याने ते फार उतावीळ बनून गेले आहे, तेच ध्यान माझ्या जीवास लागले आहे १ गोपाळा, आता मला आलिंगन देऊन माझ्या आवडीचा हा सोहळा तुम्ही पूर्ण करावा २ तुमच्या भेटीसाठी माझे डोळे उघडे राहून तटस्थ बनले आहेत त्यातून प्रेमाश्रूची गंगा वाहात आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपण भक्तवत्सल आहोत, पतिताला पावन करणारे आहोत हे तुमचे मूळ वचन आता खरे करून दाखवावे ४

३४१९ धवळले जगदाकार । आधार तो निरसला ॥ १ ॥
लपो जाता नाहीं ठाव । प्रगट पाहे पसारा ॥ २ ॥
खरियाचा दिवस आला । वाढी बोला न पुरे ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवे साटी । पडिली मिठी धुरेसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धवळले–प्रकाशित झाले निरसला–दूर झाला, ठाव–स्थान, धुरेसी–श्रेष्ठ अशा श्रीहरीशी.

अर्थ – श्रीहरीच्या कृपेने सारे विश्व प्रकाशित होऊन गेले आहे त्यामुळे अज्ञानाचा अंधार दूर झालेला आहे १ आता अज्ञानात कुठे लपावे असे स्थानच उरलेले नाही सर्वत्र प्रभुकृपेचा पसाराच प्रकटलेला दिसत आहे २ आज अशा प्रकारे खऱ्याखुऱ्या आत्मज्ञानाचा दिवस उजाडलेला आहे याचे वाणीने कितीही वर्णन केले तरी ते पूर्ण होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा श्रेष्ठ श्रीहरीशी जीवभावाने मिठी जडलेली आहे ४

विवरण – श्रीहरीच्या भेटीचा, कृपेचा, साक्षात्काराचा हा एक थोर अनुभव या अभगात तुकोबानी मोजक्या शब्दात चित्रित केला आहे मी कुणीतरी आहे, माझा देह, माझे व्यवहार, माझा संसार, यांना जोपर्यंत मी सीमित आहे तोपर्यंत अंधार आहे हा अज्ञानाचा अंधार दूर होणे अगत्याचे असते अज्ञानांधकार दूर झाला की मग सर्व विश्व प्रभुप्रेमात न्हाऊन निघाल्यासारखे दिसतं ऐक्याच्या, अनुभूतीच्या प्रकाशात सर्व विश्व चमकून निघते. प्रकाशमय प्रभू सब चराचर सृष्टीत व्यापून असल्याचा खूणगाठ पटते मग पुढे अंधारात, अज्ञानात लपावं म्हटले तरी संधी सापडत नाही एकदा त्या सर्वश्रेष्ठ अशा प्रभूची भेट झाली की तिकडे तिकडे आनंद, प्रकाश, उल्हास यांचेच राज्य असते

१ चारिल्या, २ भाक्ता तोचि सेवी धणीवरी, ३ तातडी

या दिव्य प्रभूचा प्रकाश कसा असतो ? या प्रकाशमय प्रभूचे माहात्म्य गीतेत अकराव्या अध्यायात आले आहे 'दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता । यदि भा सदृशी सा स्याद् भासस्तस्य महात्मन ' आकाशात जर एकाच वेळी एक हजार सूर्यांची प्रभा चमकल तरच ती या महात्म्याच्या कांतीसारखी थोडीशी दिसेल ! खरे म्हणजे या प्रकाशाला आणि त्याच्या अनुभवाला तुलनाच नाही. पण ज्ञातावरून काही अगम्य व अज्ञाताची कल्पना करता यावी म्हणून ही भाषा बोलली जाते. आणि हा प्रकाशही अंधाराच्या सापेक्षतेने नसतो तो स्वयंप्रकाश असल्याने अंधार तेथे उरूच शकत नाही देवाच्या या 'अगप्रमेचा नवलावो' वर्णन करताना ज्ञानदेवांनी म्हटले आहे, 'तैसे ते दिव्य-सूर्य सहस्रावरी । जरी उदयजती का एकेचि अवसरी । तऱ्ही तया तेजाची थोरी । उपमू नये ॥ आघवतयाचि विजूषा मेळावा कीजे । आणि प्रलयाग्नीची सर्व सामग्री आणिजे । तेयींचि दशगुटी मेळविजे । महातेजाचा ॥ तऱ्ही तिये अग-प्रमेचेनि पाडें । हे तेज काही काहीं होईल थोडें । आणि तया ऐसे कीर चोखडें । निशुद्धी नोहे ॥ ऐसे माहातम या श्रीहरीचे सहज । फाकतसें सर्वांगींचे तेज । तें मुनिकृपा जी मज । दृश्य जाहले '

या विलक्षण रूपाची अनुभूता तुकोबांसारख्या सत्पुरुषांना आली की तिचे वर्णन करणेही कठीण होते सत्पाखुया आत्मज्ञानाचा दिवस 'वाढी बोला न पुरे' असे जे तुका म्हणतात तच येथे खरे आहे ईश्वरी प्रकाशाची ज्योत खरे म्हणजे आपल्याच अंतःकरणात असते पण ती झाकोळून गेलेली असल्याने तिच्यावर फुंकर घालावी लागते याच ज्योतीच्या साहाय्याने ब्रह्मांडीची ज्योत अनुभवायची असते 'अंतरींची ज्योती प्रकाशिली दीप्ती । मुळींची जे होती आच्छादिली ' असे तुकानीच म्हटले आहे एकदा प्रभुकृपेचे अंजन डोळ्यात घालले की मग 'जनीं वनीं ऐसे । असे भरले प्रकाशें ' जे लावण्य त्याचा समर्थ असा अनुभव सत्पुरुषांना येत असतो प्रभूच्या [illegible] या प्रकाशाचा एक समर्पक दाखला येथे देण्यासारखा आहे तुर्कस्थानातील बसरा येथील एक श्रेष्ठ स्त्रीसाधक संत रबिया या नावाने होऊन गेली एका श्रीमान धन्याच्या घरी ही गुलाम म्हणून काम करी दिवसभर काम करून ही रात्री आपल्या खोलीत गेली की ती प्रभूच्या चिंतनात मग्न होई तिच्या खोलीत एक प्रकारचा अलौकिक प्रकाश भरून राहिलेला असे. एके रात्री बाहेर पिठासारखे स्वच्छ चांदणे पडले होते बाहेर [illegible] होतो तिच्या मैत्रिणी तिला म्हणाल्या, 'रबिया, बाहेर ये ना काय चांदण्याची मौज आहे पाहा ना [illegible] कोंडून घेतली आहेस ?' त्यावर रबिया म्हणाली, 'सख्यांनो, तुम्हीच आत येऊन पाहा ना [illegible] किती दिव्य चांदणे पसरून राहिले आहे ते '

आहे चंदनाच्या वासाने इतर वृक्षाना सुवास मिळावा अशी अपेक्षा आहे. 'परिसाचे अंगें सोनें झाला विळा' हे वचनही आपण पाहिले आहे. लोखंडाचा विळा वाकडा असला म्हणून काय झाले ? त्याला परिसाचा स्पर्श झाला म्हणजे झाले. 'लोखंडाचे न पाहे दोष । शिवोन परीस सोने करी ।' असे सामर्थ्य परिसाचे असल्याने आपण लोखंड होऊन राहाण्यातच समाधान साधुसंतांनी मानले आहे त्यांचा परिसाच्या सामर्थ्यावर विश्वास आहे लोखंडाचा हिणकसपणा अथवा वाईट स्वभाव असला तरी परीस भेटताच त्याचा अतर्बाह्य पालट होतो हे सागताना ज्ञानदेवांनी म्हटले आहे 'अगा वरी फोडावयाचि लागीं । लोहो मिळो कां परिसाचे आगीं । का जे मिळतियें प्रसगीं । सोनेंचि होईल' फोडण्यासाठी का होईना पण लोखंडाचा घाव परिसावर पडला तरी त्याचे सोनेंच होऊन जाते म्हणून तुकोबा पांडुरंगास या अभगात विनवीत आहेत की, 'मज ठेवा सरी लोखंडाचे'

३४२१ लावूनि कोलित । माझा करितील घात ॥ १ ॥
ऐसे बहुताचे सधीं । सांपडलो खोळेमधीं ॥ २ ॥
पाहातील उणें । तेथें देती अनुमोदनें ॥ ३ ॥
तुका म्हणे रिघे । पुढें नाहीं जाले धींगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोलित–मशाल विस्तव, सधीं–तावडीत खोळेमधी–कुरत्यात, रिघे–प्रवेश, धींगे–धूमगजर

अर्थ – पेटती मशाल अंगाला लावून हे लोक माझा घात करतील १ अशा प्रकारे पुष्कळाच्या तावडीत सापडून त्यांच्या कुरत्यात मी सापडलो २ हे लोक माझ्यामधील नेमके उणे पाहातील आणि त्यालाच अनुमोदन देतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा वेळी धूम गजर झाला नाही तोपर्यंत पुढे जावयास हवे, अथवा अशा परिस्थितीत पुढे प्रवेश होत नाही धूम गजर फारच झाला आहे ४

३४२२ ऐसी एका अटी । रीतीं सिणती करंटीं ॥ १ ॥
साच आपुल्या पुरतें । करून नेघेती का हितें ॥ २ ॥
का हीं वेचितील वाणी । निरर्थकचि कारणीं ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । काहीं समर्पूनि सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अटी–खटपट परिश्रम रीतीं–व्यर्थ उगाच, साच–खरोखर

अर्थ – हे लोक या प्रपचाच्या खटपटीत व्यर्थ खपतात ही करंटी माणसे व्यर्थच शिणतात १ खरोखर हे लोक आपले हित आपल्यापुरतेच साधून का घेत नाहीत ? २ हे लोक आपली वाणी निरर्थक अथवा व्यर्थ कामात का खर्च करतात ? ३ तुकाराम महाराज म्हणतात यानी देवास सर्वस्व समर्पण करून सेवानिष्ठ असावे हे बरे ४

३४२३ चालिले सोवती । काय मानिली[१] निश्चिती ॥ १ ॥
काय करिसी एकला । काळ सन्निध पातला ॥ २ ॥
काहीं सावध तो वरचा । करीं आपुला काढावा ॥ ३ ॥
चालिले अगळे । हळूच कान केश डोळे ॥ ४ ॥
वोसरले दात । दाढा गडवडल्या आंत ॥ ५ ॥
एकली तळमळ । जिव्हा भरते[२] ठायीं लोळे ॥ ६ ॥
तुका म्हणे यार्णी । तुम्ही माडिली घालणी ॥ ७ ॥

---
१ माडली, २ भलतच चाळे

शब्दार्थ व टीपा – बरवा–चागला, काढावा–मुक्तता, मोकळीक, सुटका, अगळें–आगळे, अधिकाधिक, घालणी–घात

अर्थ – अरे, तुझे सोबती हळूहळू एकामागून एक असे निघून चालले आहेत असे असता तू निश्चित कसा काय आहेस ? १ तू आता एकटा राहून काय करणार आहेस रे ? काळ तर तुझ्या अगदी जवळ येऊन ठेपला आहे २ काही थोडेफार सावध होऊन जेणेकरून तुझी मुक्तता होईल, असा एखादा चागला उपाय कर ना ३ तुझे कान, केस, डोळे हे एकामागून एक अशा प्रकाराने अधिकाधिक निकामी होत चालले आहेत ४ तुझ्या मुखातील दात नाहीसे होत असून आतील दाढाही आता गडबडून गेल्या आहेत त्याही जाण्याच्या पथात आहेत ५ एकटी तुझी जीभ मात्र वळवळ करून मलस्याच ठिकाणी वरळत राहिलेली आहे ६ तुकाराम महाराज म्हणतात, या इद्रियानी तुझा अशा प्रकारे घात माडलेला आहे ७

विवरण – जोपर्यंत सर्व इद्रिये शाबूत आहेत तोवरच श्रीहरीच्या प्राप्तीचे उपाय करावेत असा सर्व सताचा उपदेश आहे ऐन तारुण्यात सर्व प्रकारचे भोग बेतालपणे भोगावत, आणि मग म्हातारपणी देवपूजेस लागावे हा विचार सताना मान्य नाही जोपर्यन्त डोळे चागले आहेत तोपर्यंतच त्यानी प्रभूचे रूप मनात साठवून घ्यावे जोपर्यंत कान ठीक आहेत तोपर्यंत प्रभूचे गुणगान नीटपणे हृदयात साठवून ठेवावे ही सर्व पचकर्मेंद्रिये प्रभूच्या सेवेत लावावीत असा भावार्थ आहे परतु हा विचार काही ऐन तारुण्यात माणसास सुचत नाही, आवडत नाही सर्व वस्तूचा भोग, अतिरिक्त भोग घेण्यासाठीच आपण आहोत असे त्याला वाटते धुद, मत्त होऊन तो वागतो वेळीच त्याने सावध व्हावे म्हणून मग सत त्याला सन्मार्ग दाखवितात देहाचे वास्तविक ध्येय काय आहे हे समजावून सागतात प्रसगी हा देह व इद्रियाचे विषय याचे विकृत रूपही वर्णन करतात सतकृत देहनिंदा व विषयतिरस्कार याच्यामागची भूमिका ही अशी आहे माणसाने वेळ गेल्यावर मग सावध होऊन काय उपयोग ?

३४२४ नका मजपाशीं । वदों[१] प्रपचाचे विशीं ॥ १ ॥
आता नाइकावी कानीं । मज देवाविण वाणी ॥ २ ॥
येऊनिया रूपा । कोण पाहे पुण्यपापा ॥ ३ ॥
मागें आजिवरी । जालें माप नेलें चोरीं ॥ ४ ॥
साडियेलीं पानें । पुढें पिका अवलोकन ॥ ५ ॥
पडो नेदी तुका । आड गुपू काहीं चुका ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – विशीं–विषयी, गुपू–गुता

अर्थ – आता माझ्याशी प्रपचाविषयी कधी कुणी वादविवाद करू नये १ आता मी देवाशिवाय इतर कसलीही वाणी ऐकणार नाही २ माणसाच्या जन्माला येऊन आता पापपुण्याकडे कोण पाहाणार ? ३ आजपर्यंत मागचे जे पाप झाले ते सर्व माप भरून चोर घेऊन गेले ४ धान्य तयार झाल्यावरोबर गळणाऱ्या पानाकडे लक्ष न देता हाती पडणाऱ्या पिकाकडे पाहावे ५ तुकाराम महाराज म्हणतात, या पूर्वीच्या चुकाचा अथवा पापपुण्याचा गुता आता मी आपल्यापुढे येऊ देणार नाही ६

३४२५ जाले आता साटें । कासयाचें लहान मोटें ॥ १ ॥
एक एका पडिलों हातीं । जाली तेव्हांचि निश्चिती ॥ २ ॥
नाहीं फिरो येत मागें । जाले साक्षीचिया अगें ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । आता येथें कोठें हेवा ॥ ४ ॥

---

१ वदा

शब्दार्थ व टीपा :- साटे-साटेलोटे, देवाणघेवाण, हेवा-हाव.

अर्थ :- देवा, आम्ही आमचा जीव तुम्हांस समर्पण केला आणि तुम्ही स्वरूपाचे दान आम्हास दिले. आता अशी देवघेव झाल्यानंतर लहानमोठेपणा कुठून उरणार ? १ आता तुम्ही व आम्ही एकमेकांच्या हाती सापडलो आहोत. त्यामुळे आम्ही आता निश्चित बनलो आहोत २ हा सर्व प्रकार साधुसंतांच्या साक्षीने झाला असल्याने कुणासच आता मागे फिरता येणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता या ठिकाणी कुठली हाव कुणासही राहिलेली नाही ४

३४२६ माझें मज द्यावें । नाहीं करवीत नवें ॥ १ ॥
सहस्रनामाचे रूपडें । भक्त कैवारी चोखडें ॥ २ ॥
साक्षीविण बोले । तरी मज पाहिजे दंडिलें ॥ ३ ॥
तुका म्हणे माल[1] । माझा खरा तो[2] विठ्ठल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- चोखडें-चोख, चांगले, शोभिवंत.

अर्थ :- देवा, जे माझे आहे तेच तुम्ही मला द्यावे काही नवीन करून तुम्ही मला द्यावे अशी माझी इच्छा नाही १ हजार नामे धारण करणारे तुमचे मुख चांगले शोभिवंत असून भक्ताचा कैवार घेणारे आहे. २ देवा, माझे बोलणे पुराव्याखेरीज असेल तर तुम्ही मला शिक्षा करावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीविठ्ठल हाच माझा खराखुरा माल आहे ४

३४२७ करूं स्तुती तरि ते निंदा । तुम्ही जाणां हे गोविंदा ॥ १ ॥
आम्हां लडिवाळांचे बोल । करा कवतुकें नवल ॥ २ ॥
बोबडचा उत्तरीं । तुम्हा रंजवितो हरी ॥ ३ ॥
मागतो भातुकें । तुका म्हणे कवतुकें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- रंजवितों-करमणूक करतो, भातुकें-प्रेमाचा खाऊ

अर्थ :- देवा, तुमची स्तुती करायला आम्ही जातो तो तुमची निंदाच होत राहाते, गोविंदा,तुम्ही हे जाणीत आहात १ पण आम्ही लाडके असल्याने आमचे बोल तुम्ही कौतुकाने श्रवण करीत आहात. २ म्हणूनच श्रीहरी, बोबड्या बोलांनी मी तुमची करमणूक करीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून मी कौतुकाने प्रेमाचा खाऊ मागीत आहे ४

३४२८ न लाहिजे जपें न लाहिजे तपें । आम्हांसी हे सोपें गीतीं गातां ॥ १ ॥
न करितां ध्यान न करितां धारणा । तो नाचे कीर्तनामाजी हरि ॥ २ ॥
जयासी नाहीं रूप आणि आकार । तोचि कटी कर उभा विटे ॥ ३ ॥
अनंत ब्रह्मांडें जयाचिया पोटीं । तो आम्हां संपुष्टीं भक्तिभावे ॥ ४ ॥
तुका म्हणे वर्म जाणती लडिवाळें । जें होतीं निर्मळें अंतर्बाहीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – लाहिजे-मिळे

अर्थ – जे प्रभु कुणाला जपजाप्य करून मिळत नाही, तपश्चर्या करून मिळत नाही. ते आम्हांस त्याचे गुणगान गाताना फार सोपे झाले आहे. १ श्रीहरीचे रूप नाना प्रकारची ध्यानधारणा न करताही कुणाला साध्य होत नाही, परंतु भक्तांच्या कीर्तनात मात्र हा मोठ्या प्रेमाने नाचत असतो २ ज्याला रूप नाही की आकार

१ मोल, २ हा.

नाही तो हा श्रीहरी कमरेवर हात ठेवून विटेवर उभा राहिला आहे ३ ज्याच्या पोटात अनंत ब्रह्मांडे मावतात तो हा श्रीहरी आमच्यासाठी, भक्तिभावासाठी सपुष्टात देखील सामावला जातो ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे या श्रीहरीचे वर्म वा कुणी लडिवाळ व अंतर्बाह्य मनाने निर्मळ असतील त्यानाच समजते ५

विवरण – श्रीहरीच्या प्राप्तीचा फार सोपा मार्ग साधुसंतानी शोधून काढला आहे यज्ञयाग, तपादी साधने उपवासतापास, योगादी क्रिया, तीर्थयात्रा, ध्यानधारणा इत्यादीचे जटिल व अवघड कर्मकांड न करता केवळ नामस्मरण, नामसंकीर्तन, सत्संग याच्या साह्याने प्रभूस प्राप्त करून घ्या असा त्याचा उपदेश आहे आणि हा प्रभूही भक्ताच्या प्रेमास इतका उत्सुक आहे तो कधीही योग्याच्या समाधीत, याज्ञिकाच्या यज्ञात, तपस्व्याच्या तपात राहात नाही; तर त्याचे स्थान ज्या ठिकाणी कीर्तन चालले असते त्या ठिकाणी आहे या भक्तासाठी तो निराकाराचा साकार होतो, निर्गुणाचा सगुण होतो या प्रभूचे पाहा नवल कसे आहे ते ! एकनाथ महाराजांनी म्हटले आहे 'नवल वैकुंठींच नसे। तो कीर्तनीं नाचतसे' योग्याची समाधी धाय घेऊन बसता ? तुकाराम महाराज म्हणतात, 'समाधीचे सुख सांडा ओवाळूनी। ऐसा या कीर्तनीं ब्रह्मरस' याप्रमाणे नामसंकीर्तनातच प्रभूचे खरे प्रेम अनुभवायला मिळते यासाठी रानावनात जायला नको, शरीरकष्ट करायला नकोत तुकोबानीच म्हटले आहे, 'न लगती सायास जाणे वनान्तरा। सुखें येतो घरा नारायण' हा प्रभू आपल्या मनातील सारी रहस्ये आपल्या भक्तापुढेच खुली करतो ध्यानधारणा करणारे, जपतपादी साधने करणारे, यज्ञयाग करणारे याला कधी जवळचे आप्त वाटत नाहीत. याचे आप्त म्हणजे नामस्मरण करणारे भक्त. भक्तश्रेष्ठ अर्जुनालाच श्रीकृष्णानी आपल्या मनातील गुह्य का व कसे सांगितले ? ज्ञानदेवानी मोठे बहारदार वर्णन या प्रसंगाचे केले आहे, 'जें न सगेंचि पितया वसुदेवासी। जें न सगेंचि माते देवकीसी। जें न सगेंचि बळिभद्रासी। ते गुह्य अर्जुनेंशीं बोलत॥ देवी लक्ष्मी एवढी जवळिक। परी तेही न देखे या प्रमाचें सुख। आजि कृष्ण स्नेहाचे पिक। यातेंचि आथी॥ सनकादिकांचिया आशा। वाढीनल्या होतिया फार बहुवस। परी त्याही येणें मानें यशा। येतीचिना॥ या जगदीश्वराचे प्रेम। एथ दिसतसे निरपम। कैसें पार्थें येणें सर्वोत्तम। पुण्य केलें॥ हो का जयाचिया प्रीति। अमूर्त हा आता व्यक्ती॥ मज एकंकी याची स्थिति। आवडतु असे॥ एऱ्हवीं हा योगियां नाडळे। वेदार्थासी नकळे। जेथ ध्यानाचेही डोळे। पावतीना॥ तें हा निजस्वरूप। अनादि निष्कंप। परी कवणें माने सकृप। जाहला आहे॥

३४२९ आम्ही जालों बळिवंत। होऊनियां शरणागत॥ १॥
केला घरांत रिघावा। ठायीं पडियेला ठेवा॥ २॥
हातां चढले धन। नेणे[1] रचिले कारण॥ ३॥
तुका म्हणे मिठी। पायीं देउनि केली सुटी॥ ४॥

शब्दार्थ व टीपा :– रिघावा–प्रवेश, कारण–कार्य, सुटी–सुटका.

अर्थ :– आम्ही या श्रीहरीला शरण जाऊन बलवान झालो आहोत. १ आम्ही त्याच्या घरात प्रवेश करून त्याचा मुख्य ठेवाच स्वाधीन करून घेतला. २ ज्यामुळे आमच्या हातात परमार्थरूप धन येईल असे कार्य आम्ही केलेले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या श्रीहरीच्या पायाना मिठी घालून प्रापंचिक बंधनापासून आम्ही पूर्णपणे सुटका करून घेतली आहे ४

विवरण – सर्व अहंकार सोडून विनम्र भावाने प्रभूला शरण जाणे हा एक प्रभुप्राप्तीचा मार्ग भक्तिमार्गात प्रामुख्याने सांगितला आहे. प्रभू सर्वशक्तिमान आहे, कृपावत आहे, मातापिता आहे आपण त्याला नम्रत्वाने शरण जाऊन आत्मनिवेदन केले की आपले काम सोपे होते म्हणूनच सर्व साधुसंतानी या शरणागतीचे माहात्म्य वर्णन केले आहे 'शरण शरण नारायणा। मज अंगिकारा दीना' अशी प्रार्थना म्हणूनच तुकारामबुवा करतात. 'मावें आलों लोटांगणीं। पळे तुमचे चरणीं' अशी त्याची शरणवृत्ती आहे हा पांडुरंग शरण आलेल्यानाच जवळ करतो असे सांगताना एकनाथानी म्हटले आहे, 'शरणागता कृपाळू उदार पंढरिनाथा। जाणतसे खुणा अंतरींच्या'

[1] ऐसें.

भगवंताला अनन्यभावाने शरण जावे. त्याच्या कृपाप्रसादानेच आपणास शांती व शाश्वतपदाची प्राप्ती होईल अशी संतांची श्रद्धा आहे. गीतेच्या शेवटीही अर्जुनाला हीच सूचना श्रीकृष्णाने केलेली आहे. 'तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत । तत्प्रसादात्परां शांतिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम्' त्यालाच सर्वभावाने शरण जावे. त्याच्या प्रसादानेच तू अत्यंत श्रेष्ठ शांती व शाश्वत स्थान याची प्राप्ती करवून घेशील असा शवटी उपदेश आहे. वाचा, चित्त, अंग देऊन प्रभूस शरण जावे. म्हणजेच शाश्वत शांतीचा ठेवा प्राप्त होईल. 'निजात्मपर्वीचा रावो' होण्याचे भाग्य उदयास येईल.

प्रभूस शरण तरी कसे जायचे ? यासंबंधीही गीतेने मार्गदर्शन केले आहे. ईश्वराच्या ठिकाणी आपले मन ठेवायचे, भक्त बनायचे, त्याच्याच गुणगानात मग्न व्हायचे, सर्व कर्मे प्रभूला समर्पण करायची, कर्तृत्वभाव संपवायचा आणि नाना प्रकारच्या धर्मांना (मार्गांना) सोडून तू मलाच शरण यावेस असा गीतेचा निष्कर्ष आहे. शरण कसे जावे ? ज्ञानदेवांनी फार समर्पक रीतीने वर्णन करताना म्हटले आहे, 'जळीं पडिलिया लवणा । सर्वही जळ होय विचक्षणा । तुज मी अनन्यशरणा । होईन तैसा ।' असे नुसते भगवंताने सांगितलेच असे नाही, तर शरणागतास आपण किती जवळ करतो, तो आपल्याशी किती एकजीव होतो याचा जणु दाखलाच भगवंतांनी दिला. 'मग सावळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु । आलिंगिला स्वशरणू । भक्तराजु तो ॥ न पवता जयाते । काखेसूनि बुद्धीतें । बोलणे मागौतें वोसरले ॥ ऐसे जें काही एक । वोला बुद्धीसही अटक । ते द्यावया मिख । खेंवाचे केले ॥ हृदया हृदय येक जाले । ये हृदयीचे ते हृदयी घातले । द्वैत न मोडिता केले । आपणा ऐसे अर्जुना ' शरणागतीनंतरचा लाभ हा असा असतो. दिव्याने दिवा लावण्याचा हा एक प्रकार आहे

३४३० लागपाठ केला । आतां वांटा नित्य[1] त्याला ॥ १ ॥
करा जोडीचा हव्यास । आलें दुरील घरास ॥ २ ॥
फोडिलीं भांडारे । मोहोरलीं एकसरें ॥ ३ ॥
अवघियां पुरतें । तुका म्हणे घ्यावें हातें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लागपाठ–पाठलाग, जोडीचा–प्राप्तीचा, मोहोरलीं–प्रकट झाले, अवघियां–सर्वांना

अर्थ – आम्ही या श्रीहरीच्या प्राप्तीसाठी मोठाच पाठलाग केला. आता जो कुणी नित्याने याच्याकडे येईल त्याला त्याचा वाटा मिळेल. १ ही अमूल्य वस्तू आतापर्यंत फार दूर होती, ती आता घरास आली आहे, तर तिच्या प्राप्तीचा हव्यास धरावा २ आम्ही या ठिकाणी प्रभुप्रेमाचे भांडार फोडून रिकामे केले आहे त्यामुळे ते एकदम सर्वांनाच प्रकट झाले आहे, खुले झाले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे धन सर्वांनाच पुरण्यासारखे आहे, सर्वांनीच ते आपल्या हातांनी घ्यावे ४

३४३१ एकीं असे हेवा । एक अनावड जीवां ॥ १ ॥
देवें केल्या भिन्न जाती । उत्तम कनिष्ठ मध्यस्ती ॥ २ ॥
प्रीतिसाठीं भेद । कोणी पूज्य कोणी निंद्य ॥ ३ ॥
तुका म्हणे लळा । त्याचा जाणें हा कळवळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हेवा–हाव, सोस, अनावड–नावड, अप्रीती.

अर्थ :– काहींच्या मध्ये प्रभुप्रेमाविषयी मोठीच हाव असते, तर काही जीवांना त्याच्या विषयी नावडच असते. १ देवाने याप्रमाणे उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशा भिन्न भिन्न जाती केलेल्या आहेत. २ यामध्ये आपापल्या प्रीतीप्रमाणे, आवडीप्रमाणे कुणी पूज्य होतो, कुणी निंद्य बनतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या अंतःकरणात जसे प्रेम असेल तसा कळवळा तो जाणीत असतो. ४

१ नीट.

३४३२ स्वामीचे हें देणे । येथें पावलो दर्पणे ॥ १ ॥
करू आवडीनें वाद । तुमच्या सुखाचा संवाद ॥ २ ॥
कळावया वर्म । हा तो पायाचाचि धर्म ॥ ३ ॥
तुका म्हणे सिद्धी । हेचि पाववावी[1] बुद्धि ॥ ४ ॥

शब्दार्थ – व टीपा – दर्पणे-दर्शनामुळे

अर्थ – देवा, तुमच्या दर्शनामुळेच मला ही सर्व देणगी प्राप्त झालेली आहे १ आता तुमच्या बरोबर मोठ्या प्रीतीनें वादविवाद करू, तर कधी सुखाची चर्चा करू २ तुमच्या पायाच्या दर्शनामुळे हे वर्म आम्हास समजून आले ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची माझी ही बुद्धी तुम्ही सिद्धीस न्यावी ४

३४३३ रुसलो ससारा । आम्ही आणीक[2] व्यापारा ॥ १ ॥
म्हणऊनि केली साडी । देउनि पडिलो मुरकंडी ॥ २ ॥
परतेचि ना मागें । मोहो निष्ठुर जालो अगें ॥ ३ ॥
सापडला देव । तुका म्हणे गेला भेव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साडी-त्याग, भेव-भीती

अर्थ – आम्ही या लौकिक ससारावर रुसलो, याचा त्याग केला आणि इतर लौकिक व्यापारही आम्ही सोडून दिले १ म्हणून तर आम्ही सर्व प्रकारचा त्याग करून या प्रभूच्या पायाजवळ मुरकुंडी मारून पडलेले आहोत २ आता आम्ही लौकिक प्रपंचाच्या मोहाविषयी निष्ठुर झालेलो असल्यामुळे आम्ही काही मागे फिरणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव आम्हास सापडलेला असल्यामुळे आमची सर्व भीती नाहीशी झाली आहे ४

३४३४ हे तो वाटले आश्चर्य । तुम्हां[3] न धरवे धीर ॥ १ ॥
माझा फुटतसे प्राण । धावा धावा म्हणऊन ॥ २ ॥
काय नेणो दिशा । जाल्या तुम्हाविण ओशा ॥ ३ ॥
तुका म्हणे कागा । नाइकिजे पाडुरगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ओशा-ओस, रिकाम्या, शून्य, कागा-का हो

अर्थ – देवा, मी एवढ्या तळमळीने तुम्हाला हाका मारतो आणि तुम्ही मात्र धीर धरून स्वस्थपणे बसता याचे मला मोठे आश्चर्य वाटते १ तुमचा धावा करता करता, किंवा धावा धावा म्हणत असताना माझे प्राण फुटून जातात २ देवा, तुमच्याशिवाय सर्व दिशा शून्य झाल्या की काय, हे मला समजत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, पाडुरगा तुम्ही माझी ही करुणा का हो ऐकत नाही ? ४

३४३५ धांवा केला धावा । श्रम होऊ नेदी जीवा ॥ १ ॥
वर्षे अमृताच्या धारा । घेई वोसगा लेकरा ॥ २ ॥
उशीर तो आता । न करावा हेचि चिंता ॥ ३ ॥
तुका म्हणे त्वरें । वेग करीं विश्वभरे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नेदी-देऊ नका, वोसंगा-माडीवर, कडेवर

---

१ पावनी, २ आप आणि परा, ३ तुम्हा धरवला धीर

अर्थ – देवा या माझ्या जीवास तुम्ही मुळीच श्रम होऊ देऊ नका असा धावा मी काकुळतीस येऊन करीत आहे १ या लेकराला उचलून तुम्ही कडेवर घ्या व त्याच्यावर प्रेमामृताच्या धाराचा वर्षाव करा २ देवा, तुम्ही आता उशीर मात्र करू नये तुम्ही उशीर कराल याचीच एक चिंता माझ्या मनास आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अग विश्वंभरे आई, तू मोठ्या त्वरेने माझ्याकडे धावत ये ४

३४३६ जोडिले अंजुळ । असे दानउताविळ[1] ॥ १ ॥
पाहा वाहा[2] कृपादृष्टी । आणा अनुभवा गोष्टी ॥ २ ॥
तू धनी[3] मी सेवक । आइक्य तें एका एक ॥ ३ ॥
करितो विनती । तुका सन्मुख पुढती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंजुळ–हाताची ओंजळ, पुढती–पुन पुन

अर्थ – देवा, मी तुमच्या पुढे हाताची ओंजळ करून दान मागण्यासाठी उतावीळ होऊन उभा राहिलो आहे १ तुम्ही माझ्याकडे कृपादृष्टीने पाहा ना या गोष्टीचा अनुभव मला येऊ द्या ना २ तुम्ही माझे धनी व मी तुमचा सेवक असे हे ऐक्य देवा तुमच्यामाझ्यात असावे ३ तुकाराम महाराज म्हणतात अशी ही विनती मी तुम्हास पुढे उभे राहून पुन पुन करीत आहे ४

३४३७ काय तुज कैसे जाणवेल[4] देवा । आणावे अनुभवा कैशा परी ॥ १ ॥
सगुण निर्गुण थोर कीं लहान । न कळे अनुमान मज तुझा ॥ २ ॥
कोण तो निर्धार करू हा विचार । भवसिंधु पार तरावया ॥ ३ ॥
तुका म्हणे कैसे पाय आतुडती । न पडे श्रीपती वर्म ठावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परी–प्रकाराने, आतुडती–सापडतील

अर्थ – देवा, आम्ही तुला जाणावे तरी कसे आणि कोणत्या रूपाने ? कोणत्या प्रकाराने तुमचा अनुभव घ्यावा ? १ देवा, तुला सगुण मानावे की निर्गुण समजावे ? तुला थोर म्हणावे की लहान समजावे ? यासबंधी मला तुझ्याबद्दल काहीच अनुमान बांधता येत नाही २ हा भवसागर पार करण्यासाठी आम्ही कोणता निर्धार करावा हा विचार माझ्या समोर आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीपती, तुमचे पाय मला कसे सापडतील हो ? कारण ते स्वाधीन करण्याचे वर्म आम्हास माहीत नाही ४

३४३८ मी तव बैसलो धरुनिया ध्यास[5] । न करीं उदास पाडुरंगा ॥ १ ॥
नको आता मज दवडू श्रीहरी । मागाया भिकारी जालो दास ॥ २ ॥
भुकेलों कृपेच्या वचनाकारणें । आशा नारायणें पुरवावी ॥ ३ ॥
तुका म्हणे येऊनिया देई भेटी । कुरवाळुनी पोटीं धरीं मज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दवडू–परत पाठवू

अर्थ – पाडुरंगा, मी तर तुझ्या भेटीची मोठीच आशा धरून दारी बसलो आहे तरी मला तू याबाबतीत उदास करू नकोस १ श्रीहरी, मला आता तू भेट न देता परत पाठवू नकोस मी तुझे कृपादान मागण्यासाठी दास व भिकारी होऊन आलो आहे २ तुझ्या कृपेच्या वचनाचा मी भुकेलेलो आहे नारायणाने माझी ही एक आशा पुरवावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू मला येऊन भेट द्यावीस व कुरवाळून मला पोटाशी धरावेस ४

१ दाना उतावीळ, २ पाहा, ३ स्वामी, ४ जाणावा गा देवा, ५ आस

३४३९ आतां तुझें नाम गात असे गीतीं । म्हणोनी मानिती लोक मज ॥ १ ॥
अन्नवस्त्रचिंता नाहीं या पोटाची । वारिली देहाची थोर पीडा ॥ २ ॥
सज्जन संबंधी तुटली उपाधी । रोकडी या वंदीं सुटलोंसे ॥ ३ ॥
घ्यावा द्यावा कोणे करावा सायास । गेले[1] आशापाश वारोनिया ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज कळेल ते आतां । करा जी अनंता मायबापा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वारिली–दूर केली

अर्थ :– देवा, आता मी तुझे नाम गीतात गातो म्हणून हे लोक मला मान देतात १ मला अन्नवस्त्राची अथवा पोटाची चिंता वाटत नाही या देहासबधीचे दु खही दूर झाले आहे २ सज्जनाची व देहसबधीयाची उपाधी तुटून गेली आहे त्यामुळे या लौकिक बधनातून मी तावडतोब मोकळा झालो आहे ३ आता काही घ्यावे अथवा द्यावे असा सायास कोण करणार ? माझे सर्व आशापाश दूर झाले आहेत ४ तुकाराम महाराज म्हणतात, अनता, मायबापा, यानंतर आता तुम्हाला जसे समजेल तसे तुम्ही करा. ५

३४४० कामक्रोध माझे[2] लावियेले पाठीं । बहुत हिंपुटीं जालों देवा ॥ १ ॥
आवरिता तुझे तुज नावरती । थोर[3] वाटे चित्तीं आश्चर्य हे ॥ २ ॥
तुझिया विनोदें आम्हा प्राणसाटी । भयभीत पोटीं सदा दु खी ॥ ३ ॥
तुका म्हणे माझ्या कपाळाचा गुण । तुला हासे कोण समर्थासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हिंपुटी–कष्टी, दु खी, कपाळाचा–नशिबाचा

अर्थ :– देवा, तू कामक्रोधादी विकार माझ्या पाठीशी लावले आहेस यामुळे मी फार दु खीकष्टी होऊन गेलो आहे १ हे विकार तूच तुझे आवरायला गेलास तरी आवरले जात नाहीत याचे तर मला फार मोठे आश्चर्य वाटते २ देवा, तुमच्या या कौतुकाच्या विनोदामुळे आमचा मात्र जीव जाण्याचा प्रसग येतो यामुळे मी नेहमी भयभीत व दु खी झालो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व गुण माझ्याच नशिबाचा आहे तू तर मोठा समर्थ आहेस तुला कोण हसणार ? ४

३४४१ सन्मुखचि[4] तुम्ही सांगावी जी सेवा । ऐसें माझे देवा मनोरथ[5] ॥ १ ॥
नेघो आम्ही काहीं चित्तवित्त धरें । आपुल्या उदारें जीवावरी ॥ २ ॥
बोल परस्परें वाढवावे सुख । पाहावे श्रीमुख डोळेभरी ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य बोलतों वचन । करुनी चरण साक्ष तुझे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नेघों–घेणार नाही

अर्थ :– देवा, तुम्हीच आपल्या मुखाने काही सेवा करण्यासबधी आम्हास सागावे अशी माझ्या मनाची एक इच्छा आहे १ आम्ही आमच्या जीवावर उदार झालेलो असल्याने तुम्ही जर आम्हास घर, सपत्ती इत्यादी देणार असाल तर आम्ही ते काही घेणार नाही २ तुमचे श्रीमुख डोळे भरून पाहावे आणि आपण दोघांनी परस्पराशी गोड गोड भाषण करावे हीच माझी एकमेव इच्छा आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या पायांची साक्ष आहे, मी हे सर्व खरेखरे बोलत आहे ४

३४४२ मज अनाथाकारणे । करीं येणें केशवा ॥ १ ॥
जीव झुरे तुजसाटीं । वाट पोटीं पहातसे ॥ २ ॥

१ गेलो, २ सुने, ३ शून्य, ४ स्वमुखें, ५ मनोगत

चित्त रंगलें चरणीं । तुजवांचूनि न राहे ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपावंता । माझी चिंता असावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अनाथाकारणें–अनाथासाठी

अर्थ :– केशवा, मज अनाथासाठी तू लवकर धावत ये १ तुझ्यासाठी माझा जीव झुरत आहे म्हणून मी तीव्रतेनें तुझीच वाट पाहात आहे २ देवा, माझे चित्त तुझ्याच चरणावर रगले असून तुझ्याशिवाय ते स्थिरावत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपावता, माझी काही चिंता तुम्हास असावी ना. ४

३४४३ कासया वांचूनि जालों भूमी भार । तुझ्या पायीं थार नाहीं तरी ॥ १ ॥
जातां भले काय डोळियाचें काम । जंव पुरुषोत्तम न देखती ॥ २ ॥
काय मुख पेंव श्वापदाचें धांव । नित्य तुझें नांव नुच्चारितां ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां पांडुरंगाविण । न वांचतां क्षण जीव भला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– थार–आश्रय, ठाव, पेंव–धान्याचा साठा ठेवण्याचे ठिकाण, आगर, धाव–बीळ, गुहा.

अर्थ – देवा, तुझ्या पायाचा आश्रय जर मला मिळत नसेल तर मग मी व्यर्थ जगून या भूमीला भार का बरे झालो आहे ? १ सर्व पुरुषात उत्तम अशा तुझे जर दर्शन मला झाले नाही तर मग या डोळ्याचे तरी काय काम रे ? त्यापेक्षा ते गेलेले बरे. २ या मुखाने तुझे नाव जर नित्य उच्चारायचे नसेल तर ते धान्याचे पेवच म्हणावे लागेल अथवा वाघसिंहादी श्वापदाची गुहाच त्याला म्हणावे लागेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, पाडुरगा, आता तुमच्याशिवाय एक क्षण जरी जात असेल तर जीव न राहील तर बरे ४

३४४४ नको मज ताठा नको अभिमान । तुजवांचूनि क्षीण होतो जीव ॥ १ ॥
दुर्धर हे माया न होय सुटका । वैकुंठनायका सोडवीं मज ॥ २ ॥
तुका म्हणे तुझें जालिया दर्पण । मग निवारण होइल सर्व ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– दुर्धर–कठीण.

अर्थ – देवा, माझ्या ठिकाणी कसलाही गर्व अथवा अभिमान तू राहू देऊ नकास कारण तुझ्यावाचून माझा जीव क्षीण होऊन जातो रे १ वैकुठनायका, तुझी ही माया मोठी कठीण आहे. हिच्यातून सुटका होणे अवघड असल्याने तूच यातून मला सोडीव २ तुकाराम महाराज म्हणतात, तुझे एक वेळ दर्शन झाले म्हणजे माझे सर्व दु ख दूर होईल ३

३४४५ चाल घरा उभा राहें नारायणा । ठेवूं दे चरणावरि माथा ॥ १ ॥
वेळोवेळा देईं क्षेमआलिंगन । वरी अवलोकन कृपादृष्टी ॥ २ ॥
प्रक्षाळूं दे पाय बैसे माजघरीं । चित्त स्थिर करीं पाडुरंगा ॥ ३ ॥
आहे त्या सचितें करवीन भोजन । काय न जेवून करिसी आतां ॥ ४ ॥
करुणाकरें नाहीं[1] कळों दिले धर्म । दुरी होतां भ्रम कोण[2] वारी ॥ ५ ॥
तुका म्हणे आता आवडीच्या सत्ता । बोलिलो अनंता करवीन तें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा .– चाल-चल, प्रक्षाळू-धुवू देत, वारी–दूर करतो.

अर्थ – नारायणा, चल, तू माझ्या घरी येऊन आता उभा राहा मला तुझ्या चरणावर माथा ठेवू दे १ तू मला वारंवार प्रीतीने आलिंगन दे, आणि कृपादृष्टीने माझ्याकडे अवलोकन कर २ तू माझ्या हृदयरुपी माज-

१ काही, २ तोचिवरी.

घरात बैस मला तुझे पाय धरू देत पांडुरंगा, तुझ्या पायाशी माझं चित्त स्थिर होऊ दे ३ जे काही माझ्या जवळ साठलेले आहे त्याचाच उपयोग करून मी तुला भोजन घालीन तू तरी आता न जेऊन करशील काय ? ४ या दयाळू देवानें आपल्या प्राप्तीचे वर्म कुणालाच समजू दिले नाही. देवा, अशा स्थितीत तुम्हीच दूर झालात तर मग माझा भ्रम कोण दूर करील हो ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, अनंता, मी आता प्रीतीच्या बोलानें तुमच्यावर सत्ता करीत आहे यासाठी मी जे बोलत आहे, त्याप्रमाणे मी तुमच्याकडून करवून घेईन ६

३४४६ देवाची ते खूण आला ज्याच्या घरा । त्याच्या पडे चिरा मनुष्यपणा[1] ॥ १ ॥
देवाची ते खूण करावें वाटोळें । आपणा वेगळें कोणी[2] नाहीं ॥ २ ॥
देवाची ते खूण गुंतो नेदी आशा । ममतेच्या पाशा शिवो नेदी ॥ ३ ॥
देवाची ते खूण गुंतो नेदी वाचा । लागो असत्याचा मळ नेदी ॥ ४ ॥
देवाची ते खूण तोडी मायाजाळ । आणि हें सकळ जग हरी ॥ ५ ॥
पहा देवें तेंचि बळकाविलें स्थळ । तुक्यापें सकळ चिन्हें त्याचीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पडे चिरा–बंद होतो, तुक्यापें–तुकारामात

अर्थ – देव ज्याच्या घरी आला त्याच्या जन्ममरणाचा फेरा बंद होतो, त्याचे मनुष्यपण संपते ही त्याची खूण आहे १ या देवाची खूण अशी की, तो आपणाशिवाय वेगळे असे कुणास ठेवीत नाही तो लोकाच्या लौकिक संसाराचे वाटोळे करतो २ या देवाची खूण अशी की, तो कशातच आशा गुंतू देत नाही आणि कुठल्याही ममत्वाच्या पाशात तो गुंतू देत नाही ३ देवाच्या प्राप्तीची खूण अशी की, यामुळे कुणाची वाचा इतरत्र कधी गुंतली जात नाही, त्याच्या वाणीला असत्याचा मळही कधी लागत नाही ४ या देवाची खूण अशी की, त्याची प्राप्ती झाली की तो हे सर्व मायाजाळ तोडून टाकतो त्यामुळे त्याला हे सर्व जगत श्रीहरीच्या रूपानी भासते ५ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाने माझ्या हृदयात स्थान बळकावले असून त्याची सर्व चिन्हे माझ्यात उमटलेली आहेत ६

३४४७ अनंताचे मुखीं होसील गाइला । अमुप विठ्ठला दास तुम्हा ॥ १ ॥
माझें कोठें आले होईल विचारा । तरींच अव्हेरा योग्य जालो ॥ २ ॥
सर्वकाळ तुम्ही असा जी संपन्न । चतुर नारायण शिरोमणि ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे कलियुगींचे जीव । तरी नये कींव बहुपापी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अमुप–असंख्य, पुष्कळ

अर्थ – विठ्ठला अनंत लोक तुमची स्वमुखाने कीर्ती गातात, आणि तुम्हाला दासही असंख्य आहेत १ अशा या गडबडीत माझी गरिबाची दाद कशी लागेल ? म्हणून मी अव्हेर करण्याजोगा झालेलो आहे २ नारायणा, सर्व चतुरात तुम्ही श्रेष्ठ आहात आणि सर्व गुणानी तुम्ही सर्व संपन्न असे आहात ३ तुकाराम महाराज म्हणतात, या कलियुगात माझ्यासारखे जीव फार आहेत म्हणून या पातकी जीवाची तुम्हाला कींव कधी येऊ नये ? ४

३४४८ न करावी चिंता । भय न धरावें सर्वथा ॥ १ ॥
दासा साहे नारायण । होय रक्षिता आपण ॥ २ ॥
न लगे परिहार । कांहीं योजावें उत्तर ॥ ३ ॥
न धरावी शंका । नये बोलों म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सर्वथा–निश्चयाने, निर्धाराने, साहे–साह्य, परिहार–समजूत

१ संसाराशी, २ राहों नदी

अर्थ :– लोकहो, तुम्ही आता कसलीही चिंता करू नका आणि निर्धाराने कसलेही भय मनात धरू नका १ कारण आपल्या दासाना नारायण नेहमीच साहच करीत असतो तो त्याचे रक्षण करीत असतो २ त्याला काही समजूत काढण्याच्या शब्दांची जरूरी नसते काही अनुकूल शब्दाच्या उत्तराचीही जरुरी नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही याविषयी कसलीही शंका मनात धरू नका, की काही बोलूही नका ४

३४४९ भांडवल माझें लटिक्याचे गांठीं । उदीम तो तुटी यावी हाचि ॥ १ ॥
कैसी[1] तुझी वाट पाहों कोणा तोडें । भोवतीं कि रे भांडे गर्भवास ॥ २ ॥
चहूं खाणीचिया रंगलोसे संगें[2] । सुष्ट दुष्ट अंगें धरूनिया ॥ ३ ॥
बहुतांचे बहु पालटलो सळे । बहु आला काळें रंग अंगा ॥ ४ ॥
उकलूनि नये[3] दावितां अंतर । घडिचा पदर सारूनियां ॥ ५ ॥
तुका म्हणे करीं गोवळें यासाटीं । आपल्या पालटीं संगें देवा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– गाठीं–जवळ, उदीम–व्यापार इ भांडे–वेशरम, निलाजरे, खाणीचिया–जन्माच्या, सळे–साळे, अभिमानाने, अतर–मन, अत.करण, गोंवळें–वस्त्राचा गोळा, पालटीं–बदल्यामध्ये.

अर्थ :– व्यापारात मोठी तूट यावी असेच भांडवल माझ्याजवळ जमा झाले आहे १ देवा हे निलाजरे गर्भवास माझ्या भोवती लागले आहेत मी तुझी वाट अशा परिस्थितीत कोणत्या तोडाने पाहू ? २ काही चागल्या, काही वाईट अशा प्रकारच्या पुष्कळच जन्मांच्या, रंगांच्या, अनुभवांच्या सगतीत मी रगून गेलो आहे ३ अनेकाच्या संगतीत निरनिराळ्या अभिमानामुळे मी बदलत आलो आहे आणि या योगें याच्या अगात अनेक दुर्गुणाचे काळे रग निर्माण झाले आहेत ४ घडीवर घडी असलेल्या या माझ्या अत करणाचा पदर दूर सारून तुला दाखविता येत नाही माझे अत करण उघड करून दाखविता येत नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून या शरीररूपी वस्त्राचा हा गोळा आहे तसाच स्वीकारावा, आणि त्याच्या बदल्यामध्ये मला देवा, तुमचा सग द्यावा ६

३४५० संतसंगतीं न करावा वास । एखादे गुणदोष अंगा येती ॥ १ ॥
मग तया दोषा नाहीं परिहार । होय अपहार सुकृताचा ॥ २ ॥
तुका म्हणे नमस्कारावे दुरून । अंतरीं धरून राहे रूप ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :— परिहार-उपाय, सुकृताचा-पुण्यकृत्याचा.

अर्थ :– सताच्या सगतीचा वास अति जवळून कधी करू नये कारण त्याचा एखादुसरा गुणदोष आपल्या अंगी येण्याचा संभव असतो १ मग त्या दोषाला काही उपाय उरत नाही. त्यामुळे आपल्या सर्व पुण्यकृत्याचा नाश होतो २ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून त्याना आपण दुरून नमस्कार करावा आणि त्याचे रूप मात्र आपल्या अत करणात धरून ठेवावे ४

३४५१ जें ज्याचे जेवण । तेंचि याचकासी दान ॥ १ ॥
आतां जाऊं[4] चोजवीत । जेथें वसतील संत ॥ २ ॥
होतीं धालीं पोटें । मागें उरलीं उच्छिष्टें ॥ ३ ॥
तुका म्हणे धांव । पुढें खुंटईल हांव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चोजवीत-शोधीत, धालीं–सतुष्ट आहेत

---

१ ऐसी, २ रगें, ३ तये, ४ चाड

अर्थ :– जसे ज्याचे जेवण असेल तेच दान याचकाला द्यावे. १ आता ज्या ठिकाणी संतांचे वास्तव्य आहे त्या ठिकाणी आपण त्यांना शोधीत जाऊ. २ श्रीहरीच्या नामामृताच्या पानाने त्यांचे पोट भरलेले असल्याने ते संतुष्ट आहेत. त्यांचे काही उच्छिष्ट असेल ते आपण घेऊ या. ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे सर्व आशा नष्ट होऊन पुढील जन्ममरणांच्या फेऱ्याही संपतील. ४

३४५२ धरावा तो बरा । ठाव वसतीचा थारा ॥ १ ॥
निजल्या जागविती । निज पुरवूनि देती ॥ २ ॥
एक वेवसाव । त्यांचा संग त्यांचा जीव ॥ ३ ॥
हितें केलें[1] हित । त्याही एक एकां चित्त ॥ ४ ॥
विषमाचें कांहीं । आड तया एक नाहीं ॥ ५ ॥
तुका म्हणे बरीं । घरा येतील त्यापरीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव–स्थान, थारा–आश्रय, निज–स्वरूप, विषमाचे–विपरीत भावाचे, द्वैतभावाचे.

अर्थ :– असे संत ज्या स्थानावर आहेत तेथील आश्रय करून राहाणे बरे. १ कारण हे संत जे कुणी आत्मविस्मृती होऊन झोपी गेले असतील त्यांना जागे करतात, आणि त्यांना स्वस्वरूपाची प्राप्ती करून देतात. २ हा जो त्यांचा व्यवहार आहे तो त्यांच्या संगतीने व जीवाभावाने आपलासा करावा ३ त्यांच्या हितानेच आपले हित साधणार आहे, फळणार आहे. याबद्दल एकमेकाचे चित्त एकमेकास साक्षी आहे. ४ त्यांच्या ठिकाणी विपरीत भावनेचे अथवा द्वैत भावाचे काही आड येणारे नाही. ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे संत ज्या प्रकारे घरी येतील तो प्रकार बरा. ६

३४५३ धोंड्यासवें आदळितां फुटे डोकें । तो तों त्याच्या दुःखें घामेजेना ॥ १ ॥
इंगळासी सन्निधान अतित्याई । क्षेम देतां काई सुख वाटे ॥ २ ॥
तुका म्हणे आम्हांसवें जो रुसला । त्याचा अबोला आकाशासीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– घामेजेना–दया येत नाही, क्षेम–आलिंगन, मिठी.

अर्थ :–दगडावर जो कुणी डोके फोडायला निघाला त्याचे डोके फुटणारच. यामुळे पण त्या दगडाच्या अंतःकरणास काही पाझर फुटणार नाही त्याला दया येणार नाही. १ एखाद्या आततायी पुरुषाने जर विस्तवाला मिठी मारली तर त्याला त्यापासून काय सुख लाभेल का कधी ? २ तुकाराम महाराज म्हणतात, त्याप्रमाणे जो कुणी आमच्यावर रुसला आहे त्याचा अबोला आभाळाबरोबर आहे असे समजावे. ३

३४५४ सरे आम्हांपाशीं एक शुद्धभाव । नाहीं तरी वाव उपचार ॥ १ ॥
कोण मानी वरी रसाळ बोलणें । नाहीं जाली मनें ओळखी तों ॥ २ ॥
तुका म्हणे आम्हां जाणीवेचें दुःख । न पाहों त्या मुख दुर्जनाचें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– सरे–पुरे, वाव–व्यर्थ.

अर्थ :– आपल्यापाशी शुद्धभाव असला की पुरे. त्याशिवाय इतर उपचार मात्र व्यर्थ आहेत. १ एकमेकांच्या मनांची जर ओळख पटली नाही तर वरवरचे रसाळ बोलणे कुणास मान्य होणार ? २ तुकाराम महाराज म्हणतात, अहंपणाच्या जाणिवेमुळे आम्हांस दुःख होते. आम्ही तर अशा दुष्ट लोकांचे तोंडही पाहात नाही. ३

[1] फळे.

३४५५ आतां तळमळ । केली पाहिजे सीतळ ॥ १ ॥
फरील तें पाहें देव । पायीं ठेवुनियां भाव ॥ २ ॥
तोचि अन्नदाता । नाहीं आणिकांची सत्ता ॥ ३ ॥
तुका म्हणे दासा । नुपेक्षील हा भरवसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सीतळ–शांत.

अर्थः – आता तुम्ही आपल्या मनात असलेली प्रपंचाविषयीची तळमळ शांत केली पाहिजे. १ देवाच्या पायांवर भाव ठेवून तो जे काय करील ते निमूटपणे पाहावे २ सर्व प्राणिमात्रांना अन्न देणारा तोच एक आहे याविषयी इतरांची सत्ता कधी चालत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी आपल्या दासांना कधी दूर करणार नाही याविषयी खात्री आहे. ४

३४५६ लांब धांवे पाय चोरी । भरोवरी जनाच्या ॥ १ ॥
आतां कैसें होय याचें । सिजतां काचें राहिलें ॥ २ ॥
खाय ओकी वेळोवेळां । कैसी कळा राहेल ॥ ३ ॥
तुका म्हणे भावहीन । त्याचा सीण पाचावा[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– भरोवरी–श्रम, सायास, काचें–कच्चे.

अर्थ :– जो कुणी लांब लांब धावण्याच्या गप्पा मारतो, पण स्वतःचे मात्र पाय चोरतो, म्हणजे स्वतः मात्र तसे वागत नाही तो इतर लोकांना त्रासदायकच समजावा १ कच्चेच अन्न याने खालेले असते आता याचे कसे होणार ? कोणतीही गोष्ट परिपक्वदशेस येईपर्यंत हा धीरच धरत नाही. २ त्यामुळे वरचेवर अर्धेकच्चे खावे व तेच ओकावे अशी याची अवस्था होत राहते. त्यामुळे त्याच्या मुखावर तेज कसे राहील ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे जे कुणी भावहीन आहेत त्यांच्या दर्शनाने क्षीणच होत राहतो. ४

३४५७ माझ्या इंद्रियांसी लागलें भांडण । म्हणतील कान रसना धाली ॥ १ ॥
करिती तळमळ हस्त पाद भाळ । नेत्रांसी दुकाळ पडिला थोर ॥ २ ॥
गुण गाय मुख आइकती कान । आमचें कारण तैसें नव्हे ॥ ३ ॥
दरुषणे फिटे सकळांचा[2] पांग । जेथें ज्याचा भाग[3] घेइल तें ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसें करीं नारायणा । माझी हो वासना ऐसी आहे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– रसना–जीभ, कारण–कार्य.

अर्थ :– श्रीहरीच्या अनुभवाविषयी माझ्या इंद्रियात एकसारखे भांडण लागले आहे. कान म्हणतात की या जिभेने सतत हरिनाम घेतल्याने ती संतुष्ट झाली आहे. १ माझे हात, पाय, कपाळ यांची तर श्रीहरीविषयी एकसारखी तळमळ सुरू आहे माझ्या डोळ्यांना तर श्रीहरीविषयी फार मोठा दुष्काळ पडलेला आहे २ माझे मुख श्रीहरीचे गुणगान करते, तर कान त्याचे गुणवर्णन ऐकतात, यामुळे आमच्याकडून मात्र अशा प्रकारचे कार्य होत नाही, अशी इतर इंद्रियांची तक्रार आहे ३ या श्रीहरीचे दर्शन झाले की, डोळ्यांचे पांग फिटतात. जे ज्याचा भाग असेल त्याप्रमाणे तो तो विषय अनुभवास येईल. ४ तुकाराम महाराज म्हणतात, असेच तुम्ही करा अशी माझी वासना आहे. ५

१ पाचावा, २ नेत्राचा तो, ३ भोग.

विवरण –श्रीहरीच्या कृपेचा आस्वाद घेण्यासाठी माझ्या इंद्रियात एक प्रकारचे भांडण लागले आहे अशी मोठी मजेदार कल्पना तुकारामबुवानी या अभंगात केलेली दिसते. जिव्हा, कान, डोळे, हातपाय इत्यादी कर्मेद्रियात श्रीहरीचा आस्वाद आधी कोण घेतो यासंबंधी स्पर्धाच लागलेली दिसते स्पर्धेची, भांडणाची ही कल्पना प्रथम ज्ञानदेवानी मांडलेली दिसते. मराठी भाषा किती रसाळ आहे हे सागताना ते म्हणतात, ' ऐका रसाळपणाचिया लोभा । कीं श्रवणींचि होति जिभा । बोले इंद्रिया लागे कळंभा । एकमेकां ॥ सहजे शब्दु तरी विषो श्रवणाचा । परि रसना म्हणे हा रसु आमुचा । घ्राणासि भावो जाय परिमळाचा । हा तोचि होईल ' ज्ञानेश्वर म्हणतात या रसाळपणाच्या लोभासाठी माझ्या इंद्रियात कळभा (कलह) निर्माण झाला आहे सहज विचार केला तर असे दिसून येईल की, शब्द हा कानाचा विषय आहे. पण जिव्हा म्हणते की हाही माझा रसविषय आहे नाकाला वाटते की या शब्दाच्या मुळे मला सुवास यावा. तर जो शब्दच अनुक्रमाने रस व सुवास होईल शब्दाच्या रसाळपणाचा स्वाद घेण्यासाठी लागलेला हा कलह ज्ञानदेवानी जो वर्णन केलेला आहे तो तुकोबानी श्रीहरीच्या रूपाच्या आस्वादाकडे लावला व आपण सर्वांगानी ईश्वरी आस्वादास कसे उत्सुक आहोत हे दर्शविले. आपल्या सर्व इंद्रियानी या श्रीहरीचाच सुखद असा आस्वाद घ्यावा हा हेतू बुवाच्या मनात आहे. ' घेई घेई वाचे । गोड नाम विठोबाचें ' या अभंगात बुवानी आपल्या इंद्रियाना या श्रीहरीच्या आस्वादाचे कसे वळण दिले आहे हे स्पष्ट होईल. 'कीर्तन ऐकवाया भुलले श्रवण । श्रीमुख लोचन देखावया ' याही अभंगात हाच एक भाव आहे.

३४५८ सिद्धीचा दास नव्हें श्रुतीचा अंकिला । होईन विठ्ठला सर्व[1] तुझा ॥ १ ॥
सर्वकाळ सुख आमच्या मानसीं । राहिलें जयासी नास नाहीं ॥ २ ॥
नेणें पुण्य पाप न पाहें लोचनीं । आणिका वांचूनि पांडुरंगा ॥ ३ ॥
न करीं आस मुक्तीचे सायास । भक्तिप्रेमरस सांडूनियां[2] ॥ ४ ॥
गर्भवासीं धाक[3] नाहीं येतां जातां । हृदयीं राहतां[4] नाम तुझें ॥ ५ ॥
तुका म्हणे जालों तुझाचि अंकिला । न भें मी विठ्ठला कळिकाळासी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– सिद्धीचा–आणिमा, महिमा, इत्यादी अष्टमहासिद्धी, अंकिला–स्वाधीन, आस–इच्छा, भें–भीत.

अर्थ :– देवा, अणिमा, महिमा इत्यादी अष्टमहासिद्धींचा मी दास नाही, अथवा श्रुतींच्याही स्वाधीन मी राहिलेलो नाही विठ्ठला, मी सर्वस्वी तुझाच दास आहे १ माझ्या मनात तुझ्याच रूपाचे सर्व सुख सतत निवास करून राहिले आहे त्याचा नाश कधीही होणार नाही २ या सुखाच्या नादाने मी पांडुरंगावाचून इतर काही पापपुण्य जाणीत नाही, अवलोकनही करीत नाही ३ भक्तिरसप्रेमाचा स्वाद घेण्याचे सोडून मी इतर कोणत्याही साधनाचा खटाटोप करणार नाही ४ तुझे नाम एकदा हृदयात स्थिर झालेले असल्यामुळे मला गर्भवास येण्याचे काहीसुद्धा भय वाटणार नाही. ५ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, मी तुझ्याच स्वाधीन झालो असल्यामुळे मला कळिकाळाचेही भय वाटत नाही ६

विवरण – श्रीहरीच्या प्रेमापुढे नाना सिद्धीचा, मोक्षस्थितीचा मोह थोर सताना कधीच पडत नाही त्याना गर्भवासाचे दु खही कधी तापदायक वाटत नाही पांडुरंगाच्या प्राप्तीनतर पापपुण्याचीही चिंता कधी ते करीत नाहीत एका प्रभुप्रेमावाचून दुसऱ्या कशाचाही लोभ सताना नसतो नाना प्रकारच्या सिद्धी किंवा चमत्कार यांनी लोक भुलतात, मोठेपणा प्राप्त होतो, परतु सताना या सिद्धीचा अडथळा वाटतो म्हणून तुकारामबुवा म्हणतात, मी काही सिद्धीचा दास नाही योगाच्या विविध प्रक्रियानुसार अजरामरसिद्धी, शरीराला पुष्टी देणारी गरिमासिद्धी आकाशगमनसिद्धी, सिद्धदर्शनसिद्धी, परकायाप्रवेशसिद्धी, दूरदर्शनसिद्धी, त्रिकालज्ञानसिद्धी, भूतजन्मस्मरणसिद्धी इत्यादी अनेक प्रकारच्या सिद्धी हस्तगत होतात. दूरच्या वस्तूचे दर्शन, आकाशातील सचार, पाण्यावरून चालण्याची

१ दास, २ वांचुनिया, ३ दु ख, ४ असता.

विक्रम, सर्वत्र सूक्ष्मत्वाने प्रवेश, इत्यादी चमत्कारामुळे योगी सिद्धाच्या भोवती नाना प्रकारचे लोक जमा होतात त्याचे माहात्म्य वाढवितात. परतु याचमुळे खऱ्या आत्मविचारास, प्रभुप्राप्तीस तो मुकण्याचा समव निर्माण होतो यासाठी या सर्व सिद्धीचा निषेध साधुसतानी केलेला आहे रिद्धी अथवा सिद्धी याच्या साह्याने प्राप्त झालेले ऐश्वर्य सताना मान्य नाही या सपत्तीचा लोभ त्याना नाही भक्तिमार्गात या नाना सिद्धीची बाधकताच वर्णन केलेली आहे नाथमहाराजानी या सिद्धीविषयी म्हटले आहे, 'मनसा वाचा कर्मणा जाण। विसरोनि देहाचे देहपण। मासेनि स्वरूपे अतिसपन्न। चैतन्यघन जो झाला॥ त्यापाशी या सिद्धी जाण। उभ्या असती हात जोडून। परी तो न पाहे थुकोन। निचाड जाण यावरी॥' नाना प्रकारच्या सिद्धी, त्याचे सामर्थ्य आणि भक्ताची त्याच्याविषयी निरिच्छा वर्णन केल्यानतर एकनाथ महाराज म्हणतात, 'मज पूर्णाची पूर्ण प्राप्ती। निकट येत येता हातीं। ते सर्वी सिद्धी नागविती। भोग सपत्ती उपचारें॥ जे मेणती माझें निजसुख। ऐसे जे का केवळ मूर्ख। त्यासिच सिद्धींचें कौतुक। अलौकिक भोगीलिप्सा॥ जैसे वेश्येचे हावभाव। तैसें सिद्धींचे वैभव।' अशा प्रकारे सिद्धी या खऱ्या आत्मसुखास हानिकारकच असतात, असा साधुसताच्या विवेचनाचा निष्कर्ष आहे 'ज्यासी प्राप्त माझें निजसुख। त्यासी सिद्धी तुच्छ प्राय देख' असा एक सिद्धात एकनाथानी माडलेला आहे सिद्धीची अपेक्षा जो करतो त्याकडे त्या ढुकूनही पाहात नाहीत उलट जो निरपेक्ष असतो त्यासच त्याचे वदन असते एकनाथानी म्हटले आहे, 'सिद्धींची अपेक्षा ज्याचे चित्तीं। सिद्धी त्याकडे न ढुकिती। निरपेक्षाचे पायींची माती। सिद्धी वदिती सर्वदा।'

३४५९ जन्मा येऊनि तया लाभ झाला। बिडवई भेटला पांडुरंगा॥ १॥
संसारदु.खें नासिलीं तेणे। उत्तम हे केणे नामघोष॥ २॥
धन्य ते संत सिद्ध महानुभाव। पंढरीचा ठाव टाकियेला॥ ३॥
प्रेमदाते तेच पतितपावन। धन्य दरुषण होय त्याला[1]॥ ४॥
पावटणिया पंथें जालिया सिद्धी। वोळगे समाधि सायुज्यता॥ ५॥
प्रेम अराणूक नाहीं भय धाक। मज तेणें सुखें काहीं चिंता॥ ६॥
ते दुर्लभ संसारासी। जडजीवउद्धारलोकासी॥ ७॥
तुका म्हणे त्यासी। धन्य भाग्य दरुषणें॥ ८॥

शब्दार्थ व टीपा .– बिडवई–श्रेष्ठ, हितकर्ता, केणे–माल, भाडवल, पावटणिया–पायरीप्रमाणे, वोळगे–प्राप्त होते, वळते, अराणूक–समाधान, तृप्ती

अर्थ – ज्याना जन्माला येऊन हा श्रेष्ठ असा हितकर्ता पाडुरग भेटला त्यानाच थोर प्रकारचा लाभ झाला असे म्हणता येईल १ त्यानीच हरिनामाचा श्रेष्ठ माल साठवून घोष केला व त्यामुळे ससारातील दु खे नाहीशी केली २ ज्यानी पढरीस आपला मुक्काम केलेला आहे ते सतपुरुष, सिद्ध महानुभाव धन्य होत ३ असे हे महात्मेच हरिप्रेम देणारे असून पतिताना पावन करणारे आहेत याचे ज्याना दर्शन होईल ते खरोखर धन्यच होत ४ असे साधुसत रस्त्याने चालले असताना नाना प्रकारच्या सिद्धी त्याच्या पायाखालची पायरी होतात. समाधीचे सुख व सायुज्यता मुक्ती या त्या ठिकाणी आपोआप वळतात ५ श्रीहरीच्या प्रेमामुळे ते तृप्त झालेले असून त्याना मग इतर कोणाचेही भय उरत नाही मला मग त्याच्या सुखामुळे इतर कसली चिंता कधी उरणार आहे का? ६ ससारात रमणाऱ्या जड जीवाच्या उद्धारासाठी झटणारे असे हे साधुसत या जगात दुर्लभच आहेत. ७ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या सत्पुरुषाचे दर्शन मोठ्या भाग्याने झाल्यामुळे मी धन्य आहे. ८

३४६० काय दिवस गेले अवघेचि वऱ्हाडें। तें आलें साकडें कयेमाजी॥ १॥
क्षण एक ठायीं मन स्थिर नाहीं। अराणूक कइं होईल पुढें॥ २॥
कयेचे[2] विरसे दोषा मूळ होय। तरण उपाय कैंचा माती॥ ३॥

१ त्याचें, २ कथेचा विसर दोषामुळें होय.

काय[1] तें साचवुनि उरले हें मागें । घटिका एक सर्गें[2] काय गेले ॥ ४ ॥
तेचि वाणी येथें करा उजळणी । काढावी मथूनि शब्दरत्नें ॥ ५ ॥
तुका म्हणे हेंचि बोलावया चाड । उभयता[3] नाड हित असे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – वव्हाडें–व्यवहारात, साकडें–संकट, अराणूक–समाधान, विश्रांती, मथूनि–घुसळून, वळून, चाड–इच्छा

अर्थ – सर्व दिवस काय प्रपंचामधील व्यवहारातच गेले की काय ? म्हणून त्याचे संकट या पर्यंमध्ये येऊन उभे राहिले ? १ माझे मन एक क्षणभर देखील स्थिर राहात नाही अशा स्थितीत त्याला पुढे विश्रांती तरी कशी मिळणार ? २ हरिकथेचा विरस हेच एक मोठ्या दोषाचे मूळ आहे असे एकदा झाल्यावर मग तरून जाण्याचा कसला मातीचा उपाय करतो ? ३ लौकिक साधनसंपत्तीचा आयुष्यभर संचय करून शेवटी मागे काय उरले आहे ? या संचयासाठी जो अमाप वेळ खर्च केला त्यातील एक घटका तरी बरोबर येणार आहे का ? ४ म्हणून तुम्ही श्रीहरीच्या नामाचीच परत उजळणी करावी, आणि मंथन करून त्याच्या कृपेची शब्दरत्ने वर काढावीत ५ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीचे नाम मुखात घेण्यात हित असल्यामुळे मला ते बोलण्याची फार इच्छा आहे ६

३४६१ शुद्धाशुद्ध निवडे कैसे । चर्म मास भिन्न नाहीं ॥ १ ॥
काहीं अधिक नाहीं उणें । कवण्या गुणें देवासी ॥ २ ॥
उदक भिन्न असे काई । वाहाळ बावी सरिता नई ॥ ३ ॥
सूर्य तेजें निवडी काय । रश्मी रसा सकळा खाय ॥ ४ ॥
वर्णा भिन्न दुधा नाहीं । सकळा गाई सारखें ॥ ५ ॥
करिता भिन्न नाहीं माती । मडक्या गति भिन्न नावे ॥ ६ ॥
वर्त्ते एकविध अग्नि । नाहीं मनीं शुद्धाशुद्ध ॥ ७ ॥
तुका म्हणे पात्र चाड । किंवा विषें अमृत गोड ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – चर्म–कातडे, चामडे, उदक–पाणी, वाहाळ–ओढा, ओहोळ, बावी–विहीर, सरिता–नदी, नई–नद, रश्मी–किरणे, चाड–जरूरी

अर्थ – देहाचे चामडे व त्यातील मास यात जर कुठेच भिन्नता दिसत नाही तर मग शुद्ध आणि अशुद्ध याची निवड तरी कशी करावी ? १ देवाच्या ठिकाणी एक कमी, दुसरे अधिक असे काही नाही श्रीहरीच्या ठिकाणी विषमभाव नाही २ ओढा, विहीर, नदी, नद इत्यादींतून पाणी वाहात असले तरी त्याच्यात त्यामुळे कधी फरक पडतो काय ? ३ सूर्याची किरणे नाना रसाचे पोषण करतात, म्हणून काय सूर्याच्या तेजामध्ये फरक पडतो की काय ? ४ नाना रंगाच्या गाई असल्या तरी त्यांच्या दुधाच्या रंगात फरक पडतो की काय ? ते पांढरे स्वच्छच असते ५ विविध प्रकारच्या मडक्यांना आकार निराळा व नावे निराळी असली तरी त्याची माती एकच प्रकारची असते ६ अग्नी हा एकरूपानेच सर्वत्र वर्तत असतो त्याच्या मनात कधी शुद्ध वा अशुद्ध हा भाव नसतो ७ तुकाराम महाराज म्हणतात, पात्र चांगलेवाईट असण्याची जरूरी आहे की त्यात विष अथवा अमृत आहे हे महत्त्वाचे आहे ? ८

विवरण – संतपरंपरेत नव्याने परिपुष्ट होत असलेला एक सामाजिक विचार या अभंगात तुकारामबुवांनी स्पष्ट केलेला आहे भारतीय हिंदू परंपरेत कालान्तराने स्पृश्यास्पृश्यतेचा पसारा फारच माजला गुणकर्मावरून ठरलेले वर्ग कालान्तराने जन्मावरून कायम झाले जन्मजात उच्चनीचतेच्या कल्पना दृढमूल झाल्या त्यामुळे समाजात विषमता निर्माण झाली समाजाचा एक फार मोठा वर्ग विविध सुखापासून वंचित झाला श्रेष्ठ वर्णाची हरएक बाबतीत अरेरावी सुरू झाली बीजभूत गुणाच्या विकासास संधीच मिळेनाशी झाली या सामाजिक कांडीविरुद्ध गौतमबुद्धाने प्रथम जोराचा प्रचार केला पुढे देशी भाषांतून साधुसंतांनी परमार्थाच्या क्षेत्रात तरी जन्मजात

१ मग, २ सांगे, ३ नाम घेता गाढ हित असे

जातीयता अथवा शुद्धाशुद्धतेचा विचार दूर करण्याचा प्रयत्न केला देवापाशी 'काहीं अधिक नाहीं उणे' असे तुकोबानी या अभंगात म्हटले आहे याचा उगम थेट भगवद्गीतेपाशी व तीवरील ज्ञानदेवकृत भाष्यापर्यंत जाऊन पोचलेला दिसतो भगवद्गीतेने 'मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्यु पापयोनय । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परागतिम्'– माझा आश्रय केल्यानंतर स्त्रिया, वैश्य व शूद्र किंवा अत्यजादी पापयोनीही परम गतीला पोचतात अशी ग्वाही दिली याचे स्पष्टीकरण करताना ज्ञानदेवानी म्हटले, 'म्हणोनि कुळ जाति वर्ण। हें आघवेंचि गा अकारण। एथ अर्जुना माझेपण। सार्थक एक॥ तैसे क्षेत्री वैश्य स्त्रिया। का शूद्र अत्यजादि इया। *जाती तवचि वेगळालिया। जव न पवती मातें॥'* एकत्वाच्या भावात मला मिळाल्यावर मग वेगळेपणा कुठून उरणार? हा ज्ञानदेवाचा भाव वरील अभंगातील 'उदक भिन्न असे काई?' 'अथवा 'वर्ते एकविध अग्नि' या तुकोबाच्या दृष्टान्ताचे मूळही ज्ञानदेवाच्या वरील भाष्यात सापडण्यासारखे आहे ते म्हणतात, 'जैसे तवचि वहाळ वोहळ। जव न पव तो गगाजळ। मग होऊनि ठाकती केवळ। गगाजळ॥ का खैर चंपक काष्ठें। हे विवचना तवचि घटे। जव न घापती एकवटे। अग्नीमाजी' पाण्यामध्ये मिठाचे कण पडले असता ते जसे त्याच्याशी विरून एकजीव होतात, त्याप्रमाणे एकदा तुमचे चित्तभाव मला येऊन मिळाले की 'मग जाती व्यक्ती पडे बिंदुलें'– जाती व व्यक्ती याच्या नावे शून्य पडते, अशी ज्ञानदेवाचीही साक्ष आहे

या बाबतीत साधुसंताचे विवेचन मोठे रोखठोक आहे परपरागत अशा चातुर्वर्ण्याची अथवा जातिभेदाची चौकट मोडण्यासाठी त्याचा अवतार नव्हता, पण भक्तीच्या, परमार्थाच्या क्षेत्रात जर एखाद्याची जात आड येऊ लागली तर त्यानी त्याच्या जातीचा विचार बाजूलाच ठेवलेला दिसतो कबीराने एक प्रश्न विचारलेला आहे, 'एक बिंदूसे विश्वराच्या हैं। को ब्रह्मन को शूद्रा?' एकाच बिंदूपासून जर या विश्वाची रचना आहे तर एक ब्राह्मण व एक शूद्र असा भेद कसा व केव्हापासून झाला? 'चर्म मास भिन्न नाहीं' तर मग 'शुद्धाशुद्ध निवडे कैसे?' असा प्रश्न तुकोबानी विचारलेला आहे ज्ञानदेवाच्या समकालीन चोखोबाने तर शुद्धाशुद्धत्वाचे अथवा विटाळाचे एक नवेच तत्त्वज्ञान उभे केले आहे त्याने म्हटले आहे, 'पचही भूताचा एकचि विटाळ। अवघाचि मेळ जगीं नादे। तेथें तो सोवळा वोंवळा तो कोण? । विटाळाचे कारण देह मूळ' विटाळ किंवा अस्पृश्यता ही वरवरची असेल, मूळ आत्मतत्त्व त्याच्या मताने शुद्धच आहे त्याने तर निर्णय दिलेला आहे 'सोवळयाचे ठाई सोवळा आहे। वोवळया ठाई वोवळा का न राहे?' जो मनाने अशुद्ध आहे तो खरा ओवळा, अस्पृश्य, पण मन ज्याचे प्रभुप्रेमाने भरून गेले आहे तो श्रीहरीचाच सवगडी झाला ऊस डागा (वेडावाकडा) असला तरी त्याचा रस, काही कडवट नसतो या त्याच्या दृष्टान्ताप्रमाणे माणसाचा 'भाव पाहावा, त्याची जन्मजात जात पाहू नये असाच बोध होतो साधुसंताच्या विचाराची ही एक नवी दिशा होती वर्णाश्रमधर्म व जातिबंधने याच्या कडक बदोबस्तातून समाजास परमार्थाच्या अथवा भक्तीच्या क्षेत्रात का होईना पण मुक्त केले ते साधुसंतानी शुद्धाशुद्धतेच्या विचाराचा व ब्राह्मण्याच्या गुणधर्मांचा परामर्श तुकोबाची शिष्या बहिणाबाई हिनेही फार चागल्या रीतीने घेतलेला आहे ब्राह्मणाची थोरवी मुक्तकठाने गाइल्यावर तिने 'ब्राह्मण कोणास म्हणावें निश्चित। पहावा हा अर्थ विवेकेंची' असे स्पष्टपणे म्हटले आहे आणि नतर जीव, देह जाती, वर्ण, कर्म, धर्म इत्यादीनी मनुष्य ब्राह्मण होतो की काय? तिने ब्राह्मणाची व्याख्या करताना म्हटले आहे 'ब्रह्म जाणे तोचि बोलिजे ब्राह्मण' आणि हा ब्राह्मण कसा असतो? तिनेच म्हटले आहे, 'सर्वभूतीं एक आत्मा देखियेला। शातीचा बोलिला मूर्तिमत॥ बहिणी म्हणे जैसे आकाश सर्वत्र। तैसा तो एकत्र जगामाजीं।'

भक्तीच्या, परमार्थाच्या क्षेत्रात ही जी समत्वाची भावना निर्माण होत होती, तिला नित्याच्या व्यवहारातही स्थान देण्याचा प्रयत्न एकनाथानी केला चोखोबाच्या चरित्रावर एकनाथानी जे अभग लिहिले आहेत त्यावरून त्याच्या शुद्धाशुद्धत्वाच्या कल्पना स्पष्ट होतील आणि हरिभक्तीने पुनीत झालेला भक्तही वेदवद्या महत्त्वाच्या पदास प्राप्त होतो हे ध्यानी येईल, या दृष्टीने सतानी, विशेषत एकनाथानी लिहिलेले जोहाराचे अभगही अभ्यासण्यासारखे आहेत शुद्धाशुद्धविवेकाचा मथितार्थ दर्शविणारा एक समर्पक अभग सवादाच्या रूपाने एकनाथानी लिहिलेला आहे, तो असा–

'का रे महारा बदमस्ता ? का हो ब्राह्मणबाबा भलतेच बोलता ?
तुमे बापाचे भय काय ? मायबाप तुमचे आमचे एकच हाय
एक ऐसे बोलू नका ! निर्गुणापासून अवघें झालीं
निर्गुण तुला काय ठावे ? आत्मस्वरूपीं शोधून पाहावे
आत्मस्वरूप आम्हां कळेना, नाहीं तरी सताशी शरण जा ना.
सताशी गेल्याने काय होते ? चौऱ्यायशीचा फेरा चुकतो !
हे ज्ञान तुला कुणापासून प्राप्त झाले ? एक जनार्दन प्रसादें कळूं आलें'

३४६२ न धरी प्रतिष्ठा कोणाची हो यम । म्हणतां कां रे राम लाजा झणी ।। १ ।।
सांपडे हातींचें सोडवील[1] काळा । तो कां वेळोवेळां नये वाचे ।। २ ।।
कोण लोक जो हा सुटला तो एक । गेले कुंभपाक रवरवांत ।। ३ ।।
तुका म्हणे हित तो म्हणा विठ्ठल । न म्हणे तो भोगील कळेल ते ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– कुंभपाक-एक प्रकारचा नरक, रवरवात-नरकात

अर्थ :– कुणी कितीही मोठा असला तरी यम हा कुणाची कधी परवा करीत नाही असे जर आहे तर मग तुम्ही रामनाम घेताना का उगीच लाजत असता ? १ काळाच्या तावडीत सापडलेल्या जीवास जो सोडवितो तो तुम्ही तुमच्या वाचेत वारंवार का आणीत नाही ? २ आपल्या स्वत च्या बळावर सुटला असा कोण आहे ? स्वत.स असे समजणारा कुंभपाक नावाच्या नरकात गेला म्हणून समजावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमचे हित व्हावे असे तुम्हास वाटत असेल तर विठ्ठल विठ्ठल असे म्हणा जो कुणी म्हणणार नाही त्याला नरक भोगावा लागेल तेव्हा समजेल. ४

३४६३ म्हणवितां हरी न म्हणे तयाला । दरवडा पडिला देहामाजी ।। १ ।।
आयुष्यधन त्याचें नेलें यमदूतीं । भुलविला निश्चितीं कामरंगें ।। २ ।।
नावडे ती कथा देउळासी जातां । प्रियधनसुता लक्ष तेथें ।। ३ ।।
कोण नेतो तयां घटिका दिवसा एका । कां रे म्हणे तुका नागवसी ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– कामरगे–विषयाच्या रगानी

अर्थ :– श्रीहरीचे नाम घ्यावे असे सांगितले असतानाही जो कुणी ते घेत नाही त्याच्या देहावर काम-क्रोधादी विकारानी दरोडा घातला असेच मानावे. १ या यमदूतानी त्याचें आयुष्यधन लुटून नेले असेच समजावे. कारण नाना प्रकारच्या विषयांच्या रगानी त्याला भुलविले आहे २ अशा माणसाना देवळात जाऊन हरिकथा ऐकण्याचे कधी आवडत नाही फारण त्याचे सर्व लक्ष बायकामुले, धनसपत्ती याच्याकडे असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू जर हरिकथेस गेलास तर तुझ्या आयुष्यातील एखादा दिवस अथवा एखादी घटका कुणी हिरावून नेईल की काय ? असे जर आहे तर मग उगाच कशासाठी फसला जातोस ? ४

३४६४ कथे बैसोनि सादरें । सुखचर्चा परस्परें ।
नवल काय तो उद्धरे । आणीक तरे सुगंधें ।। १ ।।
पुण्य घेई रे फुकाचें । पाप दुष्टवासनेचें ।
पेरिल्या बीजाचें । फळ घेईं शेवटीं ।। २ ।।

---

१ साडवील.

तु. गाथा–३..२८

कथा विरस पाडी आळसें । छळणा करूनि मोडी रस ।
बुडवी आपणासरिसें । विटाळसें नावेसी ॥ ३ ॥
सज्जन चंदनाचिये परी । दुर्जन देशत्यागें दुरी ।
राहो म्हणे हरि । विनंती करी तुका हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – फुकाचे–फुकटचे.

अर्थ – सादर चित्ताने जे श्रीहरीची कथा ऐकण्यासाठी बसतात ते श्रीहरीच्या प्रेमाची चर्चा परस्परात मोठ्या सुखाने करतात असे लोक तेथील पुण्याच्या सुगंधाने तरून जातील यात नवल काय ? १ लोकहो, अशा प्रकारचे हे फुकटचे पुण्य तुम्ही घ्या ना दुष्ट वासना मनात धरली तर पाप मात्र हातून घडते जसे आपण बीज पेरू त्याप्रमाणे आपल्या हाती फळ येईल २ जो कुणी आळस करून कथेचा विरस करतो, अथवा वक्त्याला छेडून कथेच्या रसाचा मोड करतो तो विटाळशी जशी नावेतील लोकाना स्वत सहित बुडविते त्याप्रमाणे आपणाबरोबरच इतरानाही भवसागरात बुडवितो ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे कुणी सज्जन आहेत त्याना चंदनाप्रमाणे जवळ करावे, आणि दुर्जनाचा त्याग करून देशोधडीस लावावे श्रीहरी, अशी ही विनंती मी करीत आहे ४

३४६५ कळो आले तुझें जिणे । देवा तू माझें पोषणें ॥ १ ॥
वाट पाहासी आठवाची । सत्ता सतत कईंची ॥ २ ॥
बोलाविता यावे रूपा । सदा निर्गुणींचि लपा ॥ ३ ॥
तुका म्हणे तूं परदेशी । येथें आम्हा अंगेजिसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पोषणें–सांभाळ करणारा अंगेजिसी–स्वीकारतोस

अर्थ – देवा, तू माझा सांभाळ करणारा आहेस तेच तुझे जिणे आहे, हे मला नीटपणे समजून आले आहे १ आम्ही तुझी सतत आठवण करावी, याची तू वाट पाहात आहेस तुला आमच्याशिवाय स्वतंत्र अशी सत्ता आहे कुठे ? २ तू तर नेहमी निर्गुण अशा रूपातच लपून बसलेला असतोस, आम्ही बोलावतो तेव्हा तुला नाम-रूपाला यावे लागते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे तू नामरूपाच्या पलीकडच्या प्रदेशातला आहेस, पण येथे आमच्यामुळे तू प्रकट होतोस व आमचा स्वीकार करतोस ४

३४६६ आता येथें लाजे नाहीं तुझें काम । जाय मज राम आठवू दे ॥ १ ॥
तुझे भिडे माझे बहु जाले घात । केलों या अंकित दुर्जनाचा ॥ २ ॥
माझें केले मज पारिखें माहेर । नटोनी[1] साचार चाळविले ॥ ३ ॥
सुखासाटीं एक वाहियेले खांदीं । तेणें बहु मांदी मेळविली ॥ ४ ॥
केला चौघाचार नेलों पांचांमधीं । नाहीं दिली शुद्धी घरू आशा ॥ ५ ॥
तुका म्हणे आता घेईन काटीवरी । धनी म्या कैवारी केला देव ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अंकित–स्वाधीन, साचार–खरोखर, मांदी–समुदाय, चौघाचार–पंचायत, काटीवरी घेईन–काठीने शासन करीन

अर्थ – लज्जे, आता तुझे या ठिकाणी काही काम नाही तू येथून निघून जा पाहू मला नीटपणे राम-नामाचे स्मरण करू दे १ आजपर्यंत तुझी भीड मी फार धरल्यामुळे माझ्यावर फार आघात झाले, माझे फार नुकसान झाले तुझ्यामुळे मी या दुर्जनाच्या स्वाधीन झालो. २ माझे माहेर म्हणजे या श्रीहरीचे स्थान, तेच तू मला

[1] भ्रष्ट तू

पारखे करून टाकलेस अशी तू खरोखर फार नष्ट आहेस ३ मला मोठे सुख होईल म्हणून मी तुला खांद्यावर घेऊन वागलो परंतु त्यामुळे अनेक दुर्विकाराचा मात्र समुदाय मी जमा केला ४ तू मला पचामध्ये नेऊन पचापित केलीस, पण श्रीहरीची आठवण करण्याची शुद्ध काही तू येऊ दिलीस नाहीस ५ तुकाराम महाराज म्हणतात, तुला मी आता हातात काठी घरून शासन करीन कारण माझा धनी हा देव माझा साह्यकारी झाला आहे ६

३४६७ आजिवरि होतो तुझे सत्ते खालीं । तोंवरी तो केली विटंबणा ॥ १ ॥
आतां तुज राहो नेदीं या देशात । ऐसा म्या समर्थ केला धणी ॥ २ ॥
सापें रिग केला कोठें बाळपणीं । होतीसी पापिणी काय जाणो ॥ ३ ॥
तुका म्हणे म्या हा वडविला वेव्हार । तुझेचि ढोपर सोलावया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धणी–धनी, स्वामी, रिग–प्रवेश, वेव्हार–व्यवहार, संबंध

अर्थ – लज्जे, मी आतापर्यंत तुझ्याच सत्तेखाली होतो तोपर्यंत तू माझी फार विटंबना केलीस १ आता मात्र मी तुला या माझ्या देशात राहू देणार नाही कारण मी अतिशय समर्थ अशा स्वामीच्या स्वाधीन झालो आहे २ सापाच्या पिलानें लहानपणीच जसा घरात शिरकाव केलेला असतो त्याप्रमाणे पापिणी लज्जे, तू माझ्यात स्थिरावू पाहातेस की काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुला काठीने चांगले शासन करण्यासाठीच मी या स्वामीशी आता संबंध जोडलेला आहे ४

३४६८ देवाच्या निरोपें पिटितों डांगोरा । लाजे नका थारा देऊं कोणी ॥ १ ॥
मोडिले या राडे सुपंथ मारग । चालविले जग यमपथें ॥ २ ॥
परिचारीं केली आपुलीच रूढी । पोटींची ते कुडी ठावी नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आणा राउळा धरून । फजित करून सोडूं मग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – थारा–आश्रय, परिचारीं–लोकव्यवहारात, कुडी–खोटी, वाईट, राउळा–देवळामध्ये

अर्थ – लोकहो, मी देवाच्या निरोपावरून अशी प्रसिद्धी करीत आहे की, या लाजेला कुणीही आश्रय देऊ नये १ कारण या राडेने चांगले मार्ग मोडून काढले आहेत जगातील लोकांना यमपुरीचाच मार्ग हिने चालविला आहे २ हिने लोकव्यवहारात आपलेच महत्त्व प्रस्थापित केले आहे हिच्या पोटात वाईटपणा आहे हे तुम्हाला समजून येत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, हिला नीट धरून देवळात घेऊन या हिची चांगली फजिती करून मग हिला सोडून देऊ ४

३४६९ का रे तुम्ही निर्मळ हरिगुण गाना । नाचत आनंदरूप वैकुंठासी जाना ॥ १ ॥
काय गणिकेच्या याती अधिकार मोटा । दोषी अजामेळ ऐसीं नेलीं वैकुंठा ॥ २ ॥
ऐसे नेणो मागें किती अनंत अपार । पंच महादोषी पातकां नाहीं पार ॥ ३ ॥
पुत्राचिया लोभें नष्ट म्हणे नारायण । कोण कर्तव्य तुका म्हणे त्याचे पुण्य ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाना–गात नाही, पंचमहादोष–पाच महा पातके, ब्रह्महत्या, भ्रूणहत्या, बालहत्या, गोहत्या, स्त्रीहत्या यासारखी, नष्ट–अजामेळ

अर्थ – अहो, तुम्ही श्रीहरीचे निर्मळ असे गुणगान का करीत नाही ? त्याचे नाम घेत घेत नाचत नाचत आनंदरूप होऊन वैकुंठास का जात नाही ? १ काय त्या गणिकेची जाती उच्च होती ? की तिचा अधिकार मोठा होता ? महादोषी अजामेळही वैकुंठाप्रत गेला २ अशा प्रकारचे पंचमहादोषी किती उद्धरून गेले, त्याचा व त्याच्या

घातकाचा काही अंत लागत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या अजामेळान तर पुत्राच्या लोभाने नारायणास हाक मारली पण त्या नष्टाचा उद्धार या श्रीहरीने केला त्याने असे काय पुण्य केले होते ? ४

३४७० बैसोनिया खाऊं जोडी । ओढाओढी चुकवूनि ॥ १ ॥
ऐसें केलें नारायणें । बरवें जिणें सुखाचें ॥ २ ॥
घरीच्या घरीं भाडवल । न लगे बोल वेचावे ॥ ३ ॥
तुका म्हणे आटाआटी । चुकली दाटी सकळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–प्राप्ती, ओढाओढी–ओढाताण, खटपट, बरवे–चागल, वेचावे–खर्चावे, आटाआटी–खटपट, प्रयत्न

अर्थ – आता मला ज्याची प्राप्ती झाली आहे तेच निवांतपणाने बसून सेवन करू उगाच जीवाची ओढाताण करायला नको १ अशा प्रकारचे सुखाचे व चागले जिणे या नारायणाने माझ्यासाठी केले आहे. २ आता हे सर्व भाडवल मला घरच्या घरीच प्राप्त झाले असून त्यासाठी मला काही खर्चावे लागलेले नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझी इतर सर्व प्रकारची खटपट सपली असून इतराची दाटी व वर्दळही सपून गेली आहे ४

३४७१ नाहीं श्यालो तरी पावलो या ठाया । तुम्हां आळवाया जवळिके ॥ १ ॥
सत्तावळे आता मागेन भोजन । केले ते चिंतन आजिवरी ॥ २ ॥
नवनीतासाटी खादला हा जीव । थोडयासाटीं कीव कोण करी ॥ ३ ॥
तुका म्हणे ताक न लगे हे घाटे । पाडुरगा खोटें चाळवण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खादला–खाल्ला, घाटे–खोटे असार, चाळवण–फसवणूक

अर्थ – देवा, मी कुणासही कधी श्यालो नाही, म्हणून तर तुमच्या जवळ लाडीगोडी करण्यासाठी येऊन पोचलो आहे १ मी आजपर्यंत तुमच्या पायाचे चिंतन केले असल्यामुळे त्या सत्तेच्या आधारावर तुमच्या कृपेचे भोजन मागत आहे २ लोण्यासारखे जे सारभूत तत्त्व आहे त्यासाठी मी तुमचा जीव खाल्ला, तुम्हाला मी फार त्रास दिला उगाच थोडयासाठी कोण कीवकाकुळतीस येणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला खोटे असे ताक नको कारण हे देणे म्हणजे नुसती फसवणूक आहे ४

३४७२ सारीन तें आता एकाचि भोजनें । वारीन मागणें वेळोवेळा ॥ १ ॥
सेवटींचा घास गोड करीं माते । अगे कृपावंते पाडुरगे ॥ २ ॥
वचूं नये आता काहींच प्रकार । धाकल्याचे थोर जाल्यावरी ॥ ३ ॥
तुका म्हणे आता बहु चाळवावे[1] । काहीं नेदीं ठावे उरो मागें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वारीन–दूर करीन, वचूं–फसवू, चाळवावे–झाला वाव, असा असावे

अर्थ – देवा, मला हवे असलेले तुमच्या कृपेचे एकच भोजन दिलेत की मग मी माझ्या इतर मागण्या दूर करीन १ अगे कृपावंत पांडुरगे, तू शेवटचा गोड घास मला भरीव २ मूल एकदा लहानाचे थोर झाल्यावर त्याला इतर कोणत्याही प्रकारांनी फसवू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझ्या पोटात पुष्कळच जागा खाली असल्याने मी त्यात काही रिकामे ठिकाण शिल्लक ठेवणार नाही ४

१ झाला वाव.

३४७३ पोट धालें मग न लगे परती[1] । जालिया निश्चिती खेळ गोड ॥ १ ॥
आपुलिया हातें देईं वो कवळ । विठ्ठल शीतळ जीवन वरी ॥ २ ॥
घराचा विसर होईल आनंद । नाचेन मी छंदें प्रेमाचिया ॥ ३ ॥
तुका म्हणे तोंच वरी करकर । मग हें उत्तर खंडईल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धालें–संतुष्ट झाले, कवळ–घास, करकर–कटकट, खंडईल–बंद होईल

अर्थ – एकदा पोटभर जेवल्यावर मन संतुष्ट झाले, परत पंगतीस बसावयास नको. सर्व चिंता दूर झाल्या नंतरच खेळ खेळणे बरे वाटते १ विठ्ठला, तू आपल्या हाताने मला गोड घास दे आणि मग तुझे शीतल असे नामरूपी पाणी पाज २ या आनंदामुळे मला आपल्या लौकिकातील घराचा विसर पडेल, आणि श्रीहरीच्या प्रेमाच्या छंदाने मी नाचत राहीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे जोपर्यंत तुम्ही करीत नाही तोपर्यंतच माझी ही कटकट आहे मग मात्र माझे असले बोलणे संपून जाईल ४

३४७४ बोलाविसी तरी । तुझ्या येईन उत्तरीं ॥ १ ॥
काहीं कोड कवतुकें । हातीं द्यावया भातुकें ॥ २ ॥
बोलविसी तैसें । करीन सेवन सरिसें ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । माझें चळण तुज सवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भातुकें–प्रेमाचा खाऊ, चळण–चलनवलन, क्रीडा

अर्थ – देवा, तू मला हाक मारलीस की मी त्याचक्षणी तुझ्याकडे धावत येईन १ तू कोडकौतुक करून मला काही प्रेमाचा खाऊ द्यावास २ तू मला जशा प्रकारची हाक मारशील तशाच प्रकारचा खाऊ मी सेवन करीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझे सर्व चलनवलन तुझ्यामुळे होत असते ४

३४७५ दिला जीवभाव । तेव्हां साडिला म्यां ठाव ॥ १ ॥
आतां वर्ते तुझी सत्ता । येथें सकळ अनंता ॥ २ ॥
माझीया मरणें । तुम्ही बैसविलें ठाणें ॥ ३ ॥
तुका म्हणे काहीं । मी हें माझें येथें नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साडिला–सोडला, टाकून दिला, ठाव–स्थान, ठाणें–ठिकाण, वर्ते–वागेन

अर्थ – देवा, देहभावाचा विसर पडून मी माझा जीवभाव तुला समर्पण करून त्याचे मूळ स्थानही नाहीसे केले आहे १ अनंता, आता या ठिकाणी सर्व तुझ्याच सत्तेने मी वागेन अथवा येथे सर्वत्र तुझीच सत्ता वावरत आहे २ माझी देहभावाची वृत्ती नाहीशी झाली, म्हणूनच माझ्या हृदयात स्थान घेतलेत ३ तुकाराम महाराज म्हणतात मी माझा देह यासबंधी काहीही उरलेले नाही ४

३४७६ एकाचिये वेठी । सांपडलों फुकासाटीं ॥ १ ॥
घेतो काम सत्ताबळें । माझें करूनि भेंडोळें ॥ २ ॥
धांवे मागें मागें । जाय तिकडेचि लागे ॥ ३ ॥
तुका म्हणे नेलें । माझें सर्वस्व विठ्ठलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेठी–जबरदस्तीच्या तडाख्यात भेंडोळें–गुंडाळे

---

[1] पंगती

अर्थ :– मी देवाच्या जबरदस्तीच्या तडाख्यात सापडलो आहे त्याने मला फुकटच वेठीस धरले आहे. १ माझ्या सर्वस्वाचे गुंडाळे करून हा माझ्याकडून सत्तेने कामे करवून घेत आहे २ मी जिकडे जाईन तिकडे हा माझ्या मागे धावत धावत येतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलाने माझे सर्वस्व हरण केले. ४

३४७७ वराडियाची आवडी पुरे । जया झुरे सांटीं तें ॥ १ ॥
तैसें जालें माझ्या मना । नुठी चरणावरूनि ॥ २ ॥
मागलिया पेणें पावे । विसांवे तें ठाकणीं ॥ ३ ॥
तुका म्हणे छाया भेटे । वरें वाटे तापे त्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वराडियाची–आशाळभूताची, नुठी–उठत नाही, पेणे–मुक्काम, ठाकणीं–स्थानावर.

अर्थ :– एखादा आशाळभूत मनुष्य ज्यासाठी झुरत असतो ते त्याला मिळाल्यावर त्याची आवड पूर्ण होते. त्याला फार आनंद होतो १ माझ्या मनाचा प्रकार तसाच झाला आहे. ते काही या श्रीहरीच्या चरणांवरून उठत नाही. २ एखादा वाटचाल करून फार दमल्यावर विश्रांतीसाठी मुक्काम करतो, ते स्थान त्याला सोडावेसे वाटत नाही. माझेही तसेच झाले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचे अंग उन्हामुळे तापून गेले आहे त्यालाच झाडाची सावली मिळाली तर फार बरे वाटते ४

३४७८ आतां द्यावें अभयदान । जीवन ये कृपेचें ॥ १ ॥
उभारोनि बाहो देवा । हात ठेवा मस्तकीं ॥ २ ॥
नाभी नाभी या उत्तरें । करुणाकरें सांतवीजे ॥ ३ ॥
तुका म्हणे केली आस । तो हा दिस फळाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– बाहो–बाहू, हात, नाभी–भिऊ नकोस, आस–इच्छा.

अर्थ :– देवा, तुम्ही आता माझ्यावर कृपा करून मला अभयदान द्यावे हेच एक माझे जीवन आहे १ देवा, तुम्ही आपला हात वर करा आणि तो माझ्या मस्तकावर ठेवा. २ 'तू भिऊ नकोस' अशा शब्दांनी करुणेचा सागर असणाऱ्या या देवाने माझे सांत्वन करावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी जी जी इच्छा केली होती ती आज या दिवशी फळाला आली आहे. ४

३४७९ बहुजन्में सोस केला । त्याचा जाला परिणाम ॥ १ ॥
विठ्ठलसे नाम कंठीं । आवडी पोटीं संचितें[1] ॥ २ ॥
येथुन तेथवरी आतां । न लगे चिंता करावी ॥ ३ ॥
तुका म्हणे धालें मन । हेंचि दान शकुनाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सोस–हाव, संचितें–साचली, साठून राहिली, अथवा प्रारब्धामुळे निर्माण झाली, धालें–संतुष्ट झाले.

अर्थः– मी अनेक जन्मात जी हाव धरली होती तिचा आज चांगल्या प्रकारचा परिणाम दिसून आला. १ या विठ्ठलाचे नाव माझ्या कंठात राहून त्याचे प्रेम हृदयात भरून राहिले आहे; अथवा प्रारब्धाच्या योगाने याचे प्रेम पोटात साठून राहिले आहे २ आता मागील जन्मापासून या व पुढच्या जन्मापर्यंत कसलीच चिंता मला उरलेली नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे माझे मन संतुष्ट झाले, हेच मोठे शकुनाचे दान म्हणावे लागेल ४

---

१ सचली.

३४८० उसंतिल्या कर्मवाटा । बहु मोटा आघात ॥ १ ॥
शीघ्र यावें शीघ्र यावें । हातीं न्यावें धरूनि ॥ २ ॥
भागलों या खटपटें । घटपटें करितां ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपावंता । माझी चिंता खंडावी[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उंसथिल्या–उल्लंघन केल्या, खंडावी–दूर करावी.

अर्थ :– देवा, प्रारब्धकर्माच्या वाटा मी उल्लंघन केल्या. पण त्यात माझा मोठा घात झाला, मला मोठे आघात सहन करावे लागले. १ यासाठी तुम्ही आता त्वरेने यावे व मला हाताने धरून बरोबर घेऊन जावे. २ मी आता घटपटादी व्यर्थ खटपट करण्यात पूर्णपणे दमून गेलो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपावंता, माझी सर्व चिंता तुम्ही दूर करावी. अथवा माझी चिंता करण्याचे तुम्ही सोडून देऊ नये. ४

३४८१ तुम्हांसी हें अवघें ठावें । किती द्यावें स्मरण ॥ १ ॥
कां वा तुम्हीं ऐसें नेणें । निष्ठुरपणें टाळित असां ॥ २ ॥
आळवितां मायबापा । नये कृपा अझूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे जगदीशा । काय असां निजेले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नेणें–जाणीत नाही.

अर्थ.– देवा, तुम्हांस हे सर्व माहीत आहे. आम्ही यासंबंधी तुम्हांस स्मरण तरी किती वेळा द्यावे हो ? १ तुम्ही आम्हांस निष्ठुरपणाने टाळीत असता, असे तुम्ही का वागता हे काही समजत नाही. २ मायबापा, आम्ही तुमची करुणा भाकीत असताना तुम्ही आमच्यावर अजून कृपा करीत का नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, जगदीशा, तुम्ही काय झोपी गेला आहात की काय ? ४

३४८२ नेलें सळेंबळें । चित्ताविताचें गांठोळें ॥ १ ॥
साह्य जालीं घरिच्या घरीं । होतां ठायींच कुठोरी ॥ २ ॥
मी पातलों या भावा । कपट तें नेणें देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे उघडें केलें । माझें माझ्या हातें नेलें ॥ ४ ॥

*शब्दार्थ व टीपा :– सळेंबळें–बळाच्या सामर्थ्याने.*

*अर्थ :– या देवाने स्वतःच्या बळाच्या सामर्थ्याने, माझ्या चित्तरूपी द्रव्याचे गाठोडे पळवून नेले. १ हृदयरूपी घरात लपून राहिलेला हा घरचाच चोर असून त्याला सर्व इंद्रिये मदत करू लागली. २ देवा, मी तुमच्यावर विश्वास ठेवून येथे आलो होतो. मला कपट करणे माहीत नाही, किंवा तुमच्या मनातील कपट मी जाणीत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जवळ असलेले माझ्या चित्तरूपी द्रव्याचे गाठोडे तुम्ही घेतलेत व मला मात्र उघडे करून ठेविलेत. ४*

३४८३ जाला हा डांगोरा । मुखीं लहानाचे थोरा ॥ १ ॥
नागविलों जनाचारीं । कोणी बैसों नेदी दारीं ॥ २ ॥
संचिताचा ठेवा । आतां आला तैसा घ्यावा ॥ ३ ॥
तुका म्हणे देवें । म्हणों केलें हें बरवें ॥ ४ ॥

---

[1] न सडावी.

शब्दार्थ व टीपा – डागोरा-गवगवा, प्रसिद्धी, बरवे-चागले

अर्थ – लहानथोराच्या मुखानी देवा, तुमच्या नावाचा पुढीलप्रमाणे सर्व लोकात गवगवा झाला १ तो असा की, तुम्ही लौकिकाच्या व्यवहारात मला नागविले, त्यामुळे मला कुणीसुद्धा दारात बसू देत नाहीत २ आता देवा, माझ्या प्रारब्धकर्माचा ठेवा जसा प्राप्त झाला तसाच तो घ्यावा हे बरे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवाने मला हे असे केले हे फार बरे केले ४

३४८४ किती चौघाचारे । येथें गोंविलीं वेव्हार ॥ १ ॥
असे बाधविले गळे । होऊ न सकती निराळे ॥ २ ॥
आपले आपण । केले का नाहीं जतन ॥ ३ ॥
तुका म्हणे खडदडें । येरझारीं लपती लडें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चौघाचारे-लौकिकाच्या पचाईतीत, खडदडें-बद न झाल्यामुळे, लडें-लड लोक, ठग, दाडगे

अर्थ – लौकिकाच्या पचाईतीमध्ये पडल्यामुळे कित्येक लोक व्यवहारात गुतून गेले आहेत १ त्याचे गळे अशा काही पाशात गुतले गेले आहेत की, ते काही त्यातून मुक्त होऊ शकत नाहीत २ त्यानी आपले रक्षण स्वत च का नाही केले ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, या लोकानी जन्ममृत्यूच्या खेपा बद न केल्यामुळे हे दाडगे लोक या येरझाऱ्यात सापडतात ४

३४८५ पाडुरगा ऐसा साडुनि वेव्हारा । आणिकाची करा आस[1] वाया ॥ १ ॥
बहुतासी दिला उद्धार उदारे । निवडीना खरें खोटें काहीं ॥ २ ॥
याचिया अकिता वैकुठ बदर । आणि वेव्हार चालतीना ॥ ३ ॥
तुका म्हणे माझे हातींचे वजन । यासी बोल कोण ठेवू सके ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आस-इच्छा, वजन-समतोलपणा

अर्थ – लोकहो, या पाडुरगासारखा व्यवहारी सावकार सोडून तुम्ही दुसऱ्यांची इच्छा व्यर्थपणे का करता हो ? १ या उदार अशा देवाने पुष्कळाचा उद्धार केलेला आहे तो काही खऱ्याखोट्याची निवड करीत नाही २ याच्या स्वाधीन जे कुणी असतात त्याना वैकुठरूपी बदराची प्राप्ती होते अशा सेवेच्या व वैकुठप्राप्तीच्या देवघेवी-शिवाय येथे दुसरा कसलाच व्यापार चालत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या व्यवहारातील समतोलपणा माझ्या हातामुळे राखला गेला याला बोल कोण लावू शकणार ? ४

३४८६ ठेवूनि इमान राहिलो चरणीं । म्हणउनि धणी कृपा करी ॥ १ ॥
आम्हासी भाडार करणें जतन । आले गेलें कोण उंच निंच ॥ २ ॥
करूनि साभाळीं राहिला निराळा । एक एक वेळा आज्ञा केली ॥ ३ ॥
तुका म्हणे योग्यायोग्य विनीत । देवा नाहीं चित्त येथें देणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धणी-धना, स्वामी, विनीत-नम्र झालेल

अर्थ – मी या श्रीहरीच्या चरणावर विश्वास ठेवून राहिलो आहे म्हणून हा स्वामी माझ्यावर कृपा करीत आहे १ त्याच्या रत्नभाडाराचे जतन मी करीत असतो, त्याच्याकडे कोण चागला येतो, वाईट येतो, याची दखल मला घ्यावी लागते २ एकवेळ त्याने आज्ञा केली व सर्व भाडार माझ्या स्वाधीन करून तो मात्र नामानिराळा राहिला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, कोण योग्य, कोण अयोग्य, कोण नम्र झालेले, हे मलाच पाहावे लागते देवाला या ठिकाणी चित्त देण्याचे कारण नाही ४

---

१ वास

३४८७ आतां नव्हे गोड कांहीं करितां संसार । आणीक संचार जाला माजी ॥ १ ॥
ब्रह्मरसें गेलें भरूनियां अंग । आधील तो रंग पालटला ॥ २ ॥
रसनेचिये रुची कंठीं नारायण । बैसोनियां मन निववीलें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां बैसलों ठाकणीं । इच्छेची ते धणी पुरईल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आधील–पहिला, पूर्वीचा, रसनेचिये–जिभेच्या, ठाकणीं–स्थानावर, ठिकाणावर, धणी–पूर्णता.

अर्थ :– आता माझ्या हृदयात पुढीलप्रमाणे संचार झालेला असल्यामुळे हा लौकिक संसार काही गोड वाटत नाही. १ माझे सर्व अंग ब्रह्मरसाने भरून गेले आहे. त्यामुळे या पूर्वीचा सर्व रंग पालटून गेला. २ माझ्या कंठामध्ये नारायणाची वस्ती झाली असल्यामुळे माझे मन शांत झाले आहे. माझ्या जिभेलासुद्धा त्याच्याच नामाची रुची लागलेली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता या एकाच ठिकाणी बसून राहिलेलो आहे. येथेच माझी सर्व इच्छा हा स्वामी पूर्ण करील. ४

३४८८ आतां काशासाटीं दुरी । अंतर उरी राखिली ॥ १ ॥
करीं लवकरी मुळ । लहानें तीळ मुळीचिया ॥ २ ॥
दोहीं ठायीं उदेगवाणें । दरुषणें निश्चिती ॥ ३ ॥
तुका म्हणे वेग व्हावा । ऐसी जीवा उत्कंठा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–तीळ–तिळाएवढे लहान असलेले, उदेगवाणें–उदासवाणे, वेग–त्वरा.

अर्थ :– देवा, आता तुमच्या व माझ्यामधील अंतर कशासाठी शिल्लक ठेविले आहे ? १ माझ्यात असलेले स्वस्वरूपाचे तिळाएवढे लहान मूळ तू लौकरच मोठे करावेस अथवा या लहान असलेल्या मूळ स्वरूपास लौकर आपणांकडे बोलावून घे. २ कारण मी संसार वा परमार्थ या दोनही ठिकाणी उदास झालो आहे. म्हणून तू दर्शन देऊन मला निश्चित कर. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही मला दर्शन देण्याविषयी त्वरा करावी, अशीच माझ्या जीवास एकसारखी उत्कंठा लागलेली आहे. ४

३४८९ पडिली हे रूढि जगा परिचार[1] । चालविती वेव्हार सत्य म्हूण ॥ १ ॥
मरणाची कां रे नाहीं आठवण । संचिताचा धन लोभ हेवा ॥ २ ॥
देहाचें भय तें काळाचें भातुकें । ग्रासूनि तें एकें ठेविलेंसे ॥ ३ ॥
तुका म्हणे कांहीं उघडा रे डोळे । जाणोनि अंधळे होऊं नका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परिचार–प्रचार, चालरीत, हेवा–हाव, भातुकें–खाद्य.

अर्थ :–भोवतीचे दृश्य जग हे खरेखुरे आहे अशा समजुतीने व्यवहार करण्याची चालरीत पडलेली आहे. १ मरणाची आठवण तू का रे धरीत नाहीस ? कारण जसे संचितकर्म तशा प्रकारची धनाची हाव धरावी लागेल. अथवा जसा धनाचा साठा असेल तशी त्याच्याविषयी हाव होईल. २ या देहाचे भय कशासाठी ? ते तर काळाचे खाद्य आहे. त्याचा ग्रास केलेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अरे, तुम्ही आपले डोळे उघडा ना. उगाच जाणून-बुजून आंधळे होऊ नका. ४

---

१ परिहार.

तु. गाथा–३..२९

३४९० हित नाहीं ठावे जननीजनका । दाविला लौकिकाचार तिहीं ॥ १ ॥
अधळ्याचे काठी लागले अधळें । घात एका वेळे पुढेंमागें ॥ २ ॥
न धरावी चाली करावा विचार । वरील आहार गळीं लावी ॥ ३ ॥
तुका म्हणे केला निवाडा रोकडा । राउत हा घोडा हातोहातीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तिहीं–त्यानी, गळीं–गळास लागलेला

अर्थ – आपल्या आईबापाना खऱ्याखुऱ्या हितासबधी काही माहिती नसते त्यांनी फक्त लौकिक दृष्टीनेच लोकाचार दाखविलेला असतो १ एखाद्या आधळ्या माणसाच्या काठीस धरून सर्वच आधळे निघाले तर तो आधळा खड्डयात पडून एखाद्या वेळेस घात झाला तर मग त्याच्यामागून काठी धरून येणाऱ्या आधळ्याची तीच गत होणार २ म्हणून जी लौकिकाची चालरीत असते तिला धरून कधीच राहू नये नाही तर गळावरील आमिषाच्या आहाराने जशी माशाची फसगत होते तशीच तुमची होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासबधीचा मी हा निवाडा, हा राऊत, हा घोडा याप्रमाणे हातोहात व प्रत्यक्ष केलेला आहे ४

३४९१ जेथें पाहे तेथें काडिती भूस । चिपाडें चोखूनि पाहाती रस ॥ १ ॥
काय सांगो देवा भुलले जीव । बहु याची येतसे कींव ॥ २ ॥
वेठीचे[1] मोटळें लटिकेंचि फुगे । पेणिया जाऊनि भिक्षा मागे ॥ ३ ॥
तुका म्हणे का उगेंचि खोल । जवळी दाखवी आपणा बोल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भूस–फोलकटे, भसकट, मोटळे–शरीराचे मोटकुळ, पेणिया–मुक्कामास

अर्थ – मी जेथे पाहातो तेथे लोक उगाच भुसकट काढीत आहेत व्यर्थ चिपाड चोखून रसनिष्पत्तीची इच्छा करीत आहेत १ देवा, काय सागू तुम्हास अशा प्रकारे हे लोक भुलून गेले आहेत त्याची मला मोठीच कीव येते आहे २ या शरीराच्या मोटकुळ्याची किंमत त्याला वेठीस धरावे एवढीच पण ते खोटेच गर्वाने फुगते परतु मुक्कामास आले की मग भिक्षा मागून खाण्याचा प्रसग येतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, उगाच शाब्दिक बडबड करून आपणास खोल अर्थ समजला आहे असे हे लोक दाखवतात ४

३४९२ जाणिवेच्या भारें चेपला उर । सदा बुरबुर सरेचि ना ॥ १ ॥
किती याच ऐकों कानीं । मारिले घाणीं नाळकरी ॥ २ ॥
मिठेंविण आळणी बोल । कोरडी फोल घसघस ॥ ३ ॥
तुका म्हणे डेंगा न कळे हित । किती फजित करूं तरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जाणिवेच्या–ज्ञानाच्या बुरबुर–पुटपुट, कटकट, घसघस–पिरपिर, किरकीर, डेंगा–ढोंगी लोकाना

अर्थ – ज्ञानाच्या अभिमानाने याचा ऊर चेपून गेलेला असल्याने हे लोक जी सतत कटकट करीत राहिले आहेत ती कधी सपतच नाही १ याचे बोल कानानी ऐकावे तरी किती ? गर्भावस्थेत नाळकरी असल्यापासूनच हे घाणीने माखलेले आहेत २ मिठाशिवाय जसे जेवण आळणी असते तसे याचे बोलणे नेहमी व्यर्थ आणि पिरपिर लावणारे असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, या ढोंगी लोकाना आपले हित कसे ते कळत नाही याची फजिती तरी मी किती करू ? ४

---

१ वेठीचे

३४९३ अनुतापयुक्त गेलिया अभिमान । विसरूं वचन मागिलांचा ॥ १ ॥
त्याचे पाय माझें लागोत कपाळीं । भोग उष्टावळी धन्यकाळ ॥ २ ॥
षड उर्मी जिहीं हाणितल्या लाता । शरण या संता आल्या वेगीं ॥ ३ ॥
तुका म्हणे जाती वोळे लवकरी । ठायींचि अंतरीं शुद्ध होती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–उर्मी–कामक्रोधादी विकार, वोळे–वळतात.

अर्थ :–मागील महात्म्याची वचने ऐकून जे वैराग्याने युक्त झाले आहेत, ज्यांचा अभिमान गेला आहे १ त्यांचे पाय माझ्या कपाळाला लागोत. त्यांच्या उष्ट्या खाण्याने जो भोग मला मिळेल तो काळच मी धन्य मानीन. २ ज्यांनी कामक्रोधादी सहा विकारांना लाथा मारून दूर केले आहे ते त्वरेने संतांनाच शरण आले आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यांचे अंत.करण मुळातच शुद्ध आहे ते त्वरित परमार्थाकडे वळतात. ४

३४९४ खोल ओले[1] पडे तें पीक उत्तम । उथळाचा श्रम वांयां जाय ॥ १ ॥
लटिक्याचे आम्ही नव्हों सांटेकरी । थीतें घाली भरी पदरीचे ॥ २ ॥
कोणा इहलोकीं पाहिजे पसारा । दंभ पोट भरायाचे चाडे ॥ ३ ॥
तुका म्हणे कसीं अंगी जें उतरे । तेंचि येथें सरे जातिशुद्ध ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–सांटेकरी–वाटेकरी, थीतें–मूर्खपणा, खोटेपणा, सरे–मान्य होते.

अर्थ :–जे पीक खोल शेतात ओलसर जागी पडते तेच उत्तम प्रकारचे येते. पण उगाच वरवर उथळपणें पेरतील त्याचे परिश्रम वाया जातील. १ जे कुणी खोटे आहेत त्यांचे आम्ही कधी भागीदार होणार नाही. कारण ते आपल्या पदरच्या खोट्याचीच नेहमी भर घालीत असतात. २ या लोकांत बाह्य वर्तनाचा पसारा हवा आहे कुणास ? कारण त्यामुळे दंभाने पोट भरण्याची इच्छा मात्र होत राहाते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अग्नीत सोने घातल्यामुळे जे चांगल्या कसाला उतरते तेच शुद्ध जातीचे म्हणून मान्य होते. ४

३४९५ गोमट्या बीजाचीं फळें हीं गोमटीं । बाहे[2] तेंचि पोटीं समतुक ॥ १ ॥
जातीच्या संतोषें चित्तासी विश्रांति । परतोनि मागुती फिरों नेणें ॥ २ ॥
खऱ्याचे पारखीं येत नाहीं तोटा । निवडे तो खोटा ढाळे दुरी ॥ ३ ॥
तुका म्हणे मज सत्याचि आवडी । करितां तांतडी येत नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–गोमट्या–चांगल्या, समतुक–समतोलपणे, ढाळे–दूर करतो.

अर्थ :–चांगल्या बीजाची फळे आतून व बाहेरून समतोलपणे सारखीच चांगली असतात. १ स्वतःच्या संतोषामुळे जे चित्त विश्रांतिसुख घेते ते परत मागे वळून चंचलत्वावर येत नाही. २ जे कुणी खऱ्याची परीक्षा करणारे आहेत त्यांना तोटा कधीच येत नाही. कारण त्यांच्या परीक्षेत जो खोटा ठरतो त्यास ते दूरच सारतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला सत्याविषयीच प्रीती आहे. म्हणून मला तातडीनें काही करता येत नाही. ४

३४९६ मन जालें भाट । कीर्ति मुखें घडघडाट । पडियेली वाट । येचि चाली स्वभावें ॥ १ ॥
बोलें देवाचे पवाडे । नित्य नवेचि रोकडे । ज्या परी आवडे । तैसा तैसा करूनि ॥ २ ॥
रोखीं रहावें समोर । पुढे मागें चाले भार । करावें उत्तर । सेवा रुजू करूनि ॥ ३ ॥
पूर[3] वर्पला देकारें । संतोषाच्या अभयें करें । अंगींच्या उत्तरें । तुकया स्वामी शृंगारी ॥ ४ ॥

१ ओली, २ बाह्य, ३ पुरवला देकारें.

शब्दार्थ व टीपा –पवाडे–कीर्ती, रोखी–प्रत्यक्ष सेवा करण्यासाठी देकारें–देणग्यानी

अर्थ –श्रीहरीची कीर्ती गाण्यासाठी माझे मन भाट झाले त्याचे गुणगान मी माझ्या मुखाने घडाघडा वर्णन करीत आहे अशा प्रकारची ही एक वाटच निर्माण झाल्यामुळे तीच सवय माझ्या इंद्रियानाही पडलेली आहे १ जशी माझी आवड आहे, तीस अनुसरून मी रोज नवीन अशी कीर्ती या देवाची गात आह २ या श्रीहरीची प्रत्यक्ष सेवा करण्यासाठी त्याच्या समोरच असावे इतरानी मागेपुढे राहिल्यास चालेल पण आपण मात्र त्याची सेवा करून आपण करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या भगवताच्या देणग्यानी पूर आलेला आहे याने सतोषाने आपला अभय कर माझ्या मस्तकावर ठेवला आह आपल्या कृपाळू अशा बोलानी या माझ्या स्वामीने मला शृगारलेले आहे ४

३४९७ दूरि तोचि होतो आपुले आशके । नव्हते ठाउके मूळभेद ॥ १ ॥
आता जेथें तेथें येईन[1] सागातें । लपाया पुरते उरो[2] नेदी ॥ २ ॥
मिथ्या मोहे मज लाविला उशीर । तरी हे अतर जाले होते ॥ ३ ॥
तुका म्हणे का रे दाखविसी भिन्न । लटिकाचि सीण लपडाई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –आशके–शकेमुळे मिथ्या–खोटया

अर्थ –आपल्याच स्वरूपाविषयी शका येत असल्यामुळे मी देवापासून दूर होतो मला देवाचा व माझा मूळ स्वरूपाचा अभेदत्वाचा प्रकार माहीत नव्हता १ पण आता मात्र देव जिकडे जिकडे जाईल तिकडे मी जात राहीन त्याला मी लपण्यासाठी ठिकाणच उरू देणार नाही २ लौकिकाच्या खोटया मोहामुळे मला देवाशी जाण्यास उशीर झाला म्हणून तर त्याच्यात व माझ्यात हे अतर पडले होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला तू अशा प्रकारे या प्रपचाचा खेळ भिन्न भिन्न का दाखवीत आहेस ? तू हा लपडावाचा शीण उगाच का करीत आहेस ? ४

३४९८ कळो नये तोचि चुकाविता बरे । मग पाठमोरें काय काज ॥ १ ॥
धरिलेती आता द्या जी माझा डाव । सापडता भाव ऐसा आहे ॥ २ ॥
होतासी अतरें झाकिलिया डोळीं । तो[3] मी हा न्याहाळीं धरूनी दृष्टी ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज रडीचीच[4] खोडी । अहाच बराडी तो मी नव्हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –काज–कारण, बराडी–अधाशी

अर्थ –जोपर्यंत खरे कळले नाही तोवरच चुकवाचुकव करणे बरे एकदा खरे कळल्यावर मग पाठीमागे फिरण्याचे काय कारण आह ? १ देवा, आता मात्र मी तुम्हास धरले असून तुम्ही माझा डाव द्यावा खरी परिस्थिती सापडल्यानतर असाच भाव आहे २ डोळे झाकल्याबरोबर तू दूर अतरावर होतास पण मी आता तुला नीट दृष्टीसमोर धरून न्याहाळीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुला रडी खाण्याची फारच खोड आहे रे. परतु मी मात्र असा उगाच दुष्काळातून आलेला अधाशी नाही ४

३४९९ करिसी[5] लाघवे । तू हें खेळसी आघवे ॥ १ ॥
केला अहकार आड । आम्हा जगासी हा नाड ॥ २ ॥
इत्यभूतें यावे । दावू लपो ही जाणावें ॥ ३ ॥
तुका म्हणे हो श्रीपती । आता चाळवाल किती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –मागे अभगक्रमाक ३१२६ पाहावा

१ होईन, २ राहा, ३ तोचि मी न्याहाळी, ४ रडीची, ५ दाविसा

३५०० विश्वास तो देव । म्हणुनि धरियेला भाव ॥ १ ॥
माझी बदवितो वाणी । ज्याणे धरिली धरणी ॥ २ ॥
जोडिलीं अक्षरें । नव्हती बुद्धीचीं उत्तरें ॥ ३ ॥
नाहीं केली आटी । काहीं मानदमासाटीं ॥ ४ ॥
कोणी भाग्यवत । तया कळेल उचित ॥ ५ ॥
तुका म्हणे झरा । आहे मुळींचाचि खरा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –धरणी–पृथ्वी

अर्थ –हा देव आहे अशा विश्वासानेच मी मनात भाव धारण केला आहे १ ज्याने ही पृथ्वी धारण केली आहे तोच माझ्याकडून हे शब्द बोलवीत आहे २ मी माझ्या बुद्धीच्या सामर्थ्याने काही ही अक्षराची जोडाजोड केलेली नाही ३ लोकात मानसन्मान मिळावा म्हणून काही मी ही खटपट केलेली नाही ४ मी हे केले आहे, ते उचित की अनुचित, ते जे कुणी भाग्यवत आहेत त्यानाच समजेल ५ तुकाराम महाराज म्हणतात, कारण माझ्या ठिकाणी हा कृपेचा झरा मूळचाच धन्या स्वरूपाचा आहे ६

३५०१ सुराणीचीं जालो लाडिकीं एकलीं । वडील धाकुलीं आम्ही देवा ॥ १ ॥
म्हणऊनि काहीं न घडे अव्हेर । गोमटें उत्तर भावुके ही ॥ २ ॥
काहीं एक नाहीं वचिले वेगळें । मुळींचिया मुळें स्थिराविलें ॥ ३ ॥
लेवविलीं अगीं आपुलीं भूपणे । अळकार नेणे सकळ ही ॥ ४ ॥
सारिता न सरे आमुप भाडार । धना अतपार नाहीं लेखा ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही आळवू आवडी । म्हणऊनी जोडी[1] दाखविली ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –सुराणीचीं–आवडीने, गोमटें–चागले, भावुके–प्रेमाचा खाऊ, आमुप–पुष्कळ, आवडी–प्रेमाने.

अर्थ –मोठ असोत, धाकटे असोत, आम्ही मोठ्या आवडीने या देवाची लाडकी लेकरे झालो आहोत १ म्हणून हा देव आमचा अव्हेर कधीच करीत नाही उलट चागले भाषण करून आम्हास प्रेमाने खाऊ देतो २ काही वेगळे करून हा देव आपणास फसवीत नाही जे मूळचे स्थान आहे तेच याच्यामुळे स्थिरावले जाते ३ या देवाने स्वतःच्या अलकारानी व भूपणानी आमचे अग नटविले सर्व प्रकारचे दागदागिने याने आम्हांस दिले आहेत ४ याने दिलेले धनाचे भाडार इतके पुष्कळ आहे की ते सपता सपत नाही याच्या धनास अतपार नाही असे समजा ५ तुकाराम महाराज म्हणतात, या देवास आम्ही मोठ्या प्रीतीने आळवू म्हणून तर याची प्राप्ती आम्हास झाली आहे, अथवा याची गोडी आम्हास लागलेली आहे ६

३५०२ एका वेळे केले रितें कलिवर । आत दिली थार पाडुरगा ॥ १ ॥
पाळण पोपण लागले ते सोई । देहाचे तें काई सर्वभावे ॥ २ ॥
माझिया मरणे जाली हे वसति । लागली ते ज्योती अविनाशा ॥ ३ ॥
जाला ऐसा एका घायें येथें नाहीं । तुका म्हणे[2] काहीं बोलो नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा कलिवर–शरीर, थार–आश्रय

अर्थ –एकाच वेळेस सर्व विकार नाहीसे करून मी माझे शरीर रिकामे केले व त्या ठिकाणी या पांडुरगास आश्रयाला जागा करून दिली १ याखरीज आणखी काही या देहसबधीचे पालनपोषण करण्याचे कारण मला दिसत नाही २ मी व माझेपणा याच्या मरणामुळे या श्रीहरीची वसती माझ्यात झाली आणि अविनाशी प्रकाशाचे रूप

१ गोडी, २ ऐसे

माझ्यात प्रकटले ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी एका घावानेंच देहात्मबुद्धीचा घात केला मी एकदेशी आहे असे कुणी मानू नये ४

३५०३ पावतो ताडन । तरी[1] हें मोकलितो जन ॥ १ ॥
मग मी आठवितो दुःखें । देवा सावकाश मुखें ॥ २ ॥
होतो अप्रतिष्ठा । हो[2] तो वरपडा कष्टा ॥ ३ ॥
तुका म्हणे मान । होता उत्तम खंडन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–मोकलितो–त्याग केला तर

अर्थ – या लोकानी जर माझा त्याग केला तर ती शिक्षा मला चांगलीच मिळेल १ मग मी या दुःखाने देवा, तुझे चिंतन मुखाने सावकाश करीत बसेन २ जर माझी अप्रतिष्ठा झाली तर एक प्रकारे कष्ट होतील तेही बरेच होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे लोकाकडून मानखंडना होईल तर उत्तमच आहे ४

विवरण – ईश्वराकडे मन वळण्याचा एक साधा व सोपा उपाय तुकारामबुवा या अभंगात सांगत आहेत ऐश्वर्य, धनसंपत्तीचा लाभ, वैभवाची प्राप्ती इत्यादीत गुंतून राहिल्यास हे सर्व देणाराचा आपणास विसर पडता आणि याउलट विपत्ती आली, अडचण आली, दुःखदशा प्राप्त झाली की आपण पुनः देवाचे स्मरण करतो यासाठी दुःख, मानखंडना, अपमान यानी दुःखीकष्टी न होता ईश्वराकडे चित्त लावावयास हा अनुकूल काल आहे असे समजावे दुःख, यातना, अपमान यानी मनाला वेदना होण्याखेरीज काहीच साधले जाणार नाही परंतु ही अशी परिस्थिती आली म्हणून ईश्वराच्या स्मरणाची तरी शक्यता निर्माण झाली असे मानल्यास शाश्वत सुखाकडे वाटचाल होणे सुलभ होईल याच कारणासाठी कुंतीने श्रीकृष्णापाशी विपत्ती अथवा दुःख याची मागणी केली तिने भगवान श्रीकृष्णास विनविले, 'विपदः सन्तु नः शश्वत्तत्रतत्र जगद्गुरो । भवतो दर्शनं यत्स्यादपुनर्भवदर्शनम्'– जगद्गुरो, श्रीकृष्णा, आम्हाला प्रत्येक ठिकाणी आपत्तीच येवोत, नेहमीच आमच्यावर संकटेच यावीत, कारण अशा वेळी आम्हास तुझे दर्शन घडून पुनर्जन्मादिकाची यातायात पडणार नाही उलट ' जन्मैश्वर्यश्रुतश्रीभिरेधमानमदः पुमान् । नैवार्हत्यभिधातुं वै त्वामकिंचनगोचरम् '– जो उत्तम कुळात व श्रीमंतीत जन्मास येऊन ज्ञान व संपत्ती याच्या मदाने धुंद झालेला व ऐश्वर्यात लोळणारा पुरुष आहे त्याला तुझे नामस्मरण करण्याची आठवणही होत नाही कारण तू श्रीमंत लोकाना भेटणारा नसून दरिद्री माणसानाच तुझी भेट होते याच तत्त्वास अनुसरून तुकाराम महाराज या अभंगात मानखंडना, अप्रतिष्ठा, दुःख याची याचना करीत आहेत

३५०४ धरावे तों[3] भय । अंतरोनि जातो पाय ॥ १ ॥
जाल्या तुटी देवासवें । काय वाचोनि करावें ॥ २ ॥
कोणासि पारिखें । लेखूं आपणासारिखें ॥ ३ ॥
तुका म्हणे असो । अथवा हें आता नसो[4] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –पारिखें–परकं, दुसरे.

अर्थ –या देवाचे पाय अंतरतील की काय, असे एकसारखे भय मनात असावे १ देवापासूनच जर वियोग झाला तर मग स्वयं जगून तरी काय करावे ? २ या एका देवावाचून इतर कुणाला स्वतःसारखे मानू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, इतर सर्व प्रकारानी भरलेले हे जग असो वा नसो मला त्याचे काही नाही ४

३५०५ आम्हांसी सांगातो । होती अराले ते हाती ॥ १ ॥
येती आइकता हाक । दोन मिळोन म्हणती एक ॥ २ ॥
आणिका उत्तरीं । नसे गोविली वैखरी ॥ ३ ॥
तुका म्हणे बोल । खूण पहाती विठ्ठल ॥ ४ ॥

१ जरी, २ काही ३ तें ४ नासो

शब्दार्थ व टीपा –अराले–ज्याची वृत्ती स्थिर झाली असे, गोविली–गुतून राहिली वेखरी–वाणी

अर्थ –ज्याची वृत्ती स्थिर झाली आहे तेच आमचे सोबती अथवा मित्र होतात १ मी हाक मारली की धावत येतात व 'तुम्ही आम्ही मिळून एक आहोत' असे ते म्हणतात २ याखेरीज इतर प्रकारच्या भाषणानी त्याची वाणी कधी गुतून गेलेली नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, हे सोबती माझे बोल कशा प्रकारचे आहेत मासवधीची खूण पाहातात ४

३५०६ आनदाचा थारा । सुखें मोहरला झरा ॥ १ ॥
ऐसी प्रभुची ज्या कळा । त्याच्या कोण पाहे वाळा[1] ॥ २ ॥
अकिता ऐसया । होइल पावविले ठाया ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे । दिले आमड प्रकाशें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – थारा–आश्रय, मोहरला–प्रकट झाला, अकिता–सेवकाना, स्वाधीन झालेल्याना, आमड–पुष्कळ

अर्थ –माझ्या ठिकाणी आनदाचा आश्रय झालेला असल्याने सुखाचा झराच जणू प्रकटलेला आहे १ ज्या प्रभूचे असे ऐश्वर्य आहे त्याच्या बळाचे मोजमाप कोण करणार आहे ? २ आमच्यासारख्या सेवकाना तो पाहिजे त्या ठिकाणी पोचवून देईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची देणगी आम्हास या देवाने पुष्कळच दिलेली आहे ४

३५०७ काहे लकडा घास कटावे । खोद हि जुमीन मठ बनावे ॥ १ ॥
देवलवासी तरवरछाया । घरघर माई खपरिबसमाया[2] ॥ २ ॥
का छाडियें भार फेरे सीर भागें । मायाको दु ख मिटलियें अगें ॥ ३ ॥
कहे तुका तुम सुनो हो सिद्धा । रामबिना और झुटा कछु धदा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –काहे–का म्हणून, लकडा–लाकूड, छाडियें–सोडलेला

अर्थ –लोकहो, उगाच गवत आणि झाडे कापून जमीन खोदून मठ वगैरे बाधण्याच्या भरीस का पडता ? १ त्यापेक्षा एखाद्या देवळाचा आणि तरवराचा आश्रय घ्यावा आणि घरोघरी ज्या आयाबाया आहेत त्याच्याकडून खापरीत मावेल एवढ्या धान्याची भिक्षा मागावी २ या ससाराचे दु ख एकदा फेकून देता, पुन्हा शिरावर घेता, असा प्रकार तुम्ही का करता ? हे सर्व मायेतून होणारे दु ख तुम्ही मिटवून का नाही टाकीत ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, सिद्धानो, एका रामनामाशिवाय बाकीचा सर्व व्यवहार खोटा आहे असे मी सागतो ते ऐका ४

३५०८ आणीक पाखाडें असती उदडें । तळमळिती पिंडे आपुलिया ॥ १ ॥
त्याचिया बोलाचा नाहीं विश्वास । घातलीसे कास तुझ्या नामीं ॥ २ ॥
दृढ एक चित्तें जालो या जीवासी । लाज सर्वविशीं तुम्हासी हे ॥ ३ ॥
पीडो नेदी पशु आपुले अकित । आहे जें उचित तैसे करा ॥ ४ ॥
तुका म्हणे किती भाकावी करुणा । कोप नारायणा येइल तुम्हा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –पिंडें–देहाच्या लोभाने, अकित–स्वाधीन झालेले

अर्थ –अनेक प्रकारचे तकवितर्क करणारे पुष्कळ आहेत ते आपल्या देहाच्या लोभाने तळमळ करीत असतात १ देवा, अशा लोकाच्या बोलण्यावर माझा विश्वास कधीच बसत नाही म्हणून मी तुझ्या नामाविषयी

१ वळा २ खपरवनाया

कास घालून सिद्ध झालो आहे २ मी माझ्या जीवानिशी व चित्तानिशी दृढ बनलो आहे आता माझी सर्व प्रकारची लाज तुम्हास आहे ३ तुमच्या स्वाधीन झालेले पशू जरी असले तरी तुम्ही त्याना पीडा देऊ नय जे काय उचित असेल ते तुम्ही करावे ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही तुमची करुणा तरी किती भाकावी हो ? याचाही राग तुम्हास येईल ५

३५०९ व्हावया भिकारी हे आम्हा कारण । अतरोनि जन जावे दुरी ॥ १ ॥
सवध तुटावा शब्दाचा ही स्पर्श । म्हणऊनि आस मोकलिली ॥ २ ॥
तुका म्हणे दु खें उबगला जीव । म्हणऊनी कीव भाकीं देवा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा -आस-आशा, मोकलिली-सोडली

अर्थ -लोकानी आमच्यापासून दूर व्हावे म्हणूनच आम्ही भिकारी झालो आहोत १ त्या लोकाचा सबध तुटावा, त्याच्या शब्दाचाही स्पर्श होऊ नये म्हणूनच मी त्याची आशा सोडली आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, त्याच्यासबधीच्या दु खाने माझा जीव फार त्रासून गेला आहे म्हणून देवा, मी तुमची करुणा भाकीत आहे ३

३५१० कोरडिया ऐशा[1] सारूनिया गोष्टी । करा उठाउठीं हित आधीं ॥ १ ॥
खोळबला राहे आपुला मारग । पहावी ते मग तुटी कोठें ॥ २ ॥
लौकिकाचा आड येईल पसारा । मग येरझारा दु ख देती ॥ ३ ॥
तुका म्हणे डाख लागे अळकारें । मग नव्हे खरें पुटाविण[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -डाख-डाग

अर्थ -जिव्हाळा ज्यात नाही अशा कोरड्या गोष्टी दूर सारून ज्यापासून आपले हित आहे अशाच गोष्टी लगबगीने अगोदर करा १ या कोरड्या गोष्टी केल्या तर आपला मार्ग खोळबून राहील मग जे नुकसान होईल ते कुठे पाहावे ? भरून काढावे ? २ लौकिक गोष्टींचा पसारा खऱ्या चालीच्या आड येईल आणि मग दु ख देणाऱ्या जन्ममृत्यूच्या खेपा सुरू होतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, सोन्याच्या दागिन्याला डाग दिल्यानतर त्यावर पुट दिल्याखेरीज ते खरे वाटणार नाहीत ४

३५११ ऐसे ठावे नाहीं मूढा । सोस काकुलती पुढा ॥ १ ॥
माझीं नका जाळूं भाडीं । पोटीं भय सोस तोंडीं ॥ २ ॥
पातलिया काळ । तेव्हा काय चाले बळ ॥ ३ ॥
सचित तें करी । नरका जाया मेल्यावरी ॥ ४ ॥
परउपकार । न घडावा हा विचार ॥ ५ ॥
तुका म्हणे लासी । आता भेटों नये ऐसी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा - लासी-राक्षसी वृत्तीचे लोक

अर्थ -आपली पुढे मोठी फजिती होईल हे काही या मूर्खास समजत नसल्यामुळे हा अनेक प्रापचिक गोष्टींसाठी जीव काकुळतीस आणीत असतो १ याच्या पोटात भीती व अन्नावर सोस असल्यामुळे कुणी स्वयपाकासाठी भाडी मागायला आले की हा म्हणतो, मिळणार नाहीत, माझी भाडी जळतील ' २ पण याला समजत नाही की, काळ एकदा आल्यावर आपले बळ कधी चालेल का ? ३ असे लोक अशा प्रकारचे कर्म करतात की, मेल्यावर त्याना नरकाचीच प्राप्ती होत असते ४ दुसऱ्यावर कधीही उपकार न घडावा याचाच विचार हे करीत असतात ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे राक्षसी वृत्तीचे लोक कधी भेटू नयेत ६

१ आशा २ पुट विण

३५१२ करूनी चिंतन खेळों भोवतालें । चित्त येथें आलें पायांपाशीं ॥ १ ॥
येथें नाहीं खोटा चालत परिहार । जाणसी अंतर पांडुरंगा ॥ २ ॥
सुखदुःखें तुज देऊनी सकळ । नाहीं ऐसा काळ केला आम्ही ॥ ३ ॥
तुका म्हणे जाला देहाचा विसर । नाहीं आतां पर आप दोन्ही ॥ ४ ॥

मागे क्रमांक ३३३२ च्या अभंगाप्रमाणे शब्दार्थ व अर्थ पाहावा

३५१३ काळाच सारिखीं वाहाती क्षेत्रें[1] । करितां दुसरें फळ नाहीं ॥ १ ॥
ऐसें करत्यानें ठेविलें करून । भरिलें भरून माप नेमें ॥ २ ॥
शीतउष्णकाळीं मेघ वरुषावे । वरुषतां वाव होय शीण ॥ ३ ॥
तुका म्हणे विष अमृताचे किडे । पालट न घडे जीणें तया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–क्षेत्रें–नक्षत्रे हा पाठ बरा आहे.

अर्थ :–ज्या काळात जी नक्षत्रे दिसतात तीच योग्य आहेत. याखेरीज दुसरे काही झाले तर मात्र इष्ट ते फळ मिळणार नाही. १ सृष्टीचा जो कर्ता आहे त्यानेच हे सृष्टिचक्र करून ठेविले आहे. जसा त्याचा नेम आहे तसे माप त्याने भरून ठेविले आहे. २ थंडीच्या व उन्हाळ्याच्या दिवसांत मेघाचा वर्षाव झाला तर ? तर त्याची वृष्टी व्यर्थ होऊन शीण मात्र वाढेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विषातील किडे अमृतात वा अमृतातील विषात टाकले तरी ते काही जगत नाहीत. ४

३५१४ बोलणें तें आम्ही बोलों उपयोगीं । पडिलें प्रसंगीं काळाऐसें[2] ॥ १ ॥
जयामध्यें देव आदि मध्यें अंतीं । खोल पाया भिंती न खचेसी[3] ॥ २ ॥
करणें तें आम्ही करूं एका वेळे । पुढिलिया बळें वाढी खुंटे ॥ ३ ॥
तुका म्हणे असों आज्ञेचीं धारकें । म्हणऊनि एकें घायें[4] सारूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–घायें–घावाने, बोलें–हा पाठ बरा आहे.

अर्थ :–प्रसंग पडला म्हणजे त्या त्या काळास उपयुक्त होईल असे बोलणे आम्ही करीत राहू. १ पाया खोल खणल्यावर भिंत जशी न खचणारी होते त्याप्रमाणे ज्या बोलण्यात प्रारंभापासून शेवटपर्यंत श्रीहरीचे नाम असते ते दृढ होते. २ ज्यामुळे पुढील बळाची वाढ खुंटेल असे कर्तव्यकर्म आम्ही एकदमच करीत राहू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही स्वामींची आज्ञा धारण करणारे आहोत, म्हणूनच नामाच्या एका घावाने अथवा बोलण्याने बाकी सर्व काही नाहीसे करू. ४

३५१५ तुझिया विनोदें आम्हांसी मरण । सोसियेला सीण बहु फेरे ॥ १ ॥
आतां आपणचि येसी तें करीन । नाम हें धरीन तुझें कंठीं ॥ २ ॥
वियोगेंचि आलों उसंतीत वनें । संकल्प हे मनें वाहोनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्म सांपडलें सोपें । गोवियेलों पापें पुण्यें होतों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–सीण–कष्ट, फेरे–जन्ममृत्यूच्या खेपा, उसंतीत–उल्लंघीत, ओलांडीत.

अर्थ :–देवा, तुमच्या सहज लीलांच्या विनोदाने आम्हांस मात्र मरणप्राय दुःख होते. अनेक जन्ममृत्यूंच खेपांचे दुःख खूपच सहन केले. १ आता मात्र मी तुझे नाम कंठात धारण करीन, आणि तू आपण होऊन

१ नक्षत्रें, २ काळें, ३ खचे ते, ४ बोलें.

माझ्याकडे येशील, असे करीन. २ देवा, तुझा वियोग झाला म्हणूनच मी नाना जन्मांची वनें ओलांडीत आलो, आणि अनेक प्रकारचे संकल्प मी माझ्या मनात वागविले ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आजपर्यंत पापपुण्यांच्या गुंत्यात सापडलो होतो, पण आज मात्र तुझे सोपे वर्म मला सापडले आहे. ४

३५१६ पाठीलागा काळ येतसे या लागें । मी माझें वाउगें मेंढीऐसें ॥ १ ॥
आता अगी लागो ऐसिया वेव्हारा । तूं माझा सोइरा पांडुरंगा ॥ २ ॥
वागविला मायां नसताचि भार । नव्हे तें साचार जाणील[1] तों ॥ ३ ॥
तुका म्हणे फेले जवळील दुरी । मृगजळ वरी आड आलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-लागें-लाभासाठी, साचार-खरे.

अर्थ :-माझा देह, माझा संसार, या मीपणाच्या व्यर्थ जाणिवेमुळे माझ्या पाठीमागे काळ मेंढीप्रमाणे लागला आहे १ पांडुरंगा तूच आता आमचा सोयरा आहेस म्हणून या अशा व्यवहाराला आग लागो २ त्या वस्तूचे जोपर्यंत मला दर्शनच झाले नव्हते तोपर्यंत मी हा मीपणाचा भार व्यर्थच डोक्यावर वागविला ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे मी मृगजळ समोर आले ते खरे मानून जे जवळ होते ते दूर करून टाकले होते ४

३५१७ आपुलिये टाकीं । करीन काहींतरी एकी ॥ १ ॥
करीन पायाशीं वोळखी । करिसी तें करीं सुखीं ॥ २ ॥
कायाक्लेशगंगाजळ । समर्पीन तुळसीदळ ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । कर जोडीन ते सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-टाकीं-आवडीने, कृतीने.

अर्थ -देवा, मी आपल्या आवडीने तुझी सेवा करून कर्तव्यकर्म एकदा करीन. १ यामुळे मला तुमच्या पायाची ओळख होईल मग तुला काय करायचे असेल ते सुखाने कर २ मी माझ्या देहाच्या कष्टाने गंगेचे पाणी व तुळशीपत्र तुला समर्पण करीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तुमच्यापुढे हात जोडून उभा आहे. हीच मी सेवा करीत आहे तुमची ४

३५१८ माझे तों स्वभाव मज अनावर । तुज ही देतां भार कांहीं नव्हे ॥ १ ॥
ऐसे कळों आले मज नारायणा । जागृती स्वपना ताळ नाहीं ॥ २ ॥
सपादितो तो हा अवघा बाहय रंग । तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्या नाहीं पाठी पोट । असतें[2] निघोट एकी जाती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :-संग-सोबत, अभ्यंतरीं-मनामध्ये, निघोट-दाट, पूर्णपणे

अर्थ - माझ्या अनेक गुणावगुणांमुळे देवा, माझा स्वभाव अनावर बनला आहे. मी माझा सर्व भार तुझ्यावर घातलेला असतानाही तो कमी होत नाही १ नारायणा, जागृती व स्वप्न यांत काही मेळ कधी बसत नाही असेच मला समजून आले आहे २ मी ज्याची सपादणी करीत आहे तो सारा बाह्यरंग आहे मनामध्ये मात्र देवा तुझी सोबत होत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे काही सत्य आहे त्याला पाठ व पोट नाही ते एकत्वाने परिपूर्ण भरलेले असते ४

१ देखिले ता, २ आहे तें.

१५१९ नव्हावा तो बरा मुळींच संबंध । विश्वासिकां[1] वध बोलिलासे ॥ १ ॥
आतां माझें हित काय तें विचारा । सरसवें दातारा पांडुरंगा ॥ २ ॥
नाहीं भाव परी म्हणवितों दास । नका देऊं यास उणें येऊं ॥ ३ ॥
तुका म्हणे कां हो उद्धरितां दीन । मानीतसां सीण मायबापा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–मुळींच–प्रथमच, विचारा–विचार करा.

अर्थ :–देवा, तुमचा व आमचा संबंध प्रथमच झाला नसता तर ते बरे झाले असते कारण विश्वास ठेवितो त्याचा वध करणे हे काय कुठे बोललेले ऐकले आहे ? १ दातारा, पांडुरंगा, आता माझे खरोखर हित कशात आहे त्यासंबंधी तुम्ही विचार करावा. २ माझ्या ठिकाणी म्हणावासा भाव नसला तरी मी स्वतःस तुमचा दास म्हणवीत आहे. *या माझ्या भावनेस कमीपणा येऊ देऊ नका.* ३ *तुकाराम महाराज म्हणतात, माझ्यासारख्या गरीबाचा* उद्धार करताना शीण का हो मानता ? ४

१२० काय तुमचिया सेवे न वेंचते गांठोळी । मोहें टाळाटाळी करीतसां ॥ १ ॥
चतुराच्या राया आहो पांडुरंगा । ऐसें तरी सांगा निवडूनि ॥ २ ॥
कोण तुम्हां सुख असे या कौतुकें । भोगितां अनेकें दुःखें आम्ही ॥ ३ ॥
तुका म्हणे काय जालासी निर्गुण । आम्हां येथें कोण सोडवील ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–गांठोळी–गाठोड.

अर्थ :–देवा, तुमच्या सेवेचे गाठोडे मी काय खर्च करीत नाही काय ? किंवा माझा उद्धार करताना तुमचें काय गाठोडे खर्च होते ? मग तुम्ही माझ्याविषयी अशी टाळाटाळी का करता ? १ पांडुरंगा, तुम्ही चतुरांचे राजे आहात. मी जे म्हणत आहे त्यासबंधी काहीतरी निवाडा करून सांगा ना २ आम्ही अनेक प्रकारची दुःखे भोगीत आहोत, यात तुम्हांस कसले कौतुक आणि कोणते सुख वाटते हो ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही निर्गुण होऊन बसलात की काय ? असे जर झाले तर मग आमचा उद्धार कोण करील ? या प्रपंचपाशातून आम्हांस कोण सोडवील ? ४

१२१ निष्ठुर यासाटीं करितों भाषण । आहेसी तूं सर्वजाण दाता ॥ १ ॥
ऐसें कोण दुःख आहे निवारिता । तो मी जाऊं आतां शरण त्यासी ॥ २ ॥
बैसलासी केणें[2] करूनि एक घरीं । नाहीं येथें उरी दुसऱ्याची ॥ ३ ॥
तुका म्हणे आलें अवघेंचि पायापें । आतां मायबापें नुपेक्षावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–केणें–जिन्नस, माल.

अर्थ :–देवा, तू सर्वत्र असल्यामुळेच मी असा निष्ठुर वचनांनी भाषण करीत आहे हे तू जाण १ तुझ्याशिवाय माझे हे दुःख निवारण करणारा असा दुसरा कोण आहे ? हे तू सांग. मी आता शरण तरी दुसऱ्या कुणाला जाऊ ? २ कृपेचा माल तू स्वतःच्याच घरी साठवून बसला आहेस. येथे दुसऱ्या कुणास काही देवघेव करण्यास जागाच उरलेला नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता सर्व काही तुमच्या पायांशी आले आहे. आता मायबापांनी माझी उपेक्षा करू नये. ४

१२२ पायांपाशीं चित्त । तेणें भेटी अखंडित ॥ १ ॥
असे खेळे भलते ठायीं । प्रेमसूत्रदोरी पायीं ॥ २ ॥

१ विश्वासी तो वद बोलिलासे, २ कोण करविया थोर.

केलेसे जतन । मुळीं काय तें वचन ।। ३ ।।
तुका म्हणे सर्वजाणा । ठायीं विचारावे मना ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा –विचारावे–विचार करावा

अर्थ –देवा, माझे मन तुमच्या पायावर अखडपणे आहे त्यामुळे तुझी भेट सतत होत राहिली आहे १ मी आता भलत्या ठिकाणी खेळत राहिलो तरी माझ्या प्रेमसूत्राची दोरी तुझ्या पायात गुंतलेली आहे २ आपण आपल्या भक्ताचा उद्धार करू हे तुमचे मूळचे वचन मी माझ्या मनात जतन करून ठेविले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व जाणणाऱ्या देवा, हा जो मूळचा ठराव आहे त्याचा विचार तुम्हीच आपल्या मनात करावा ४

३५२३ तुझे मजपाशीं मन । माझी येथें[1] भूक तान ।। १ ।।
जिव्हा रतें एके ठायीं । दुजें बोलायाचे काई ।। २ ।।
माझिया कवतुकें । उभा पहासी भातुके ।। ३ ।।
तुका म्हणे साचे । तेथें मागील कईचे ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा –रतें–रमते, भातुके–प्रेमाचा खाऊ, साचे–खरोखर

अर्थ –देवा तुझे मन माझ्यापाशी गुतले आहे यामुळे माझी तहानभूकही तुझ्याच येथे उमटते. १ माझी जीभ तुझ्या एका नामस्मरणात रमते, त्यामुळे दुसरे आणखी बोलायचे कारणच उरत नाही २ तू माझे कौतुक पाहण्यासाठी हातात प्रेमाचा खाऊ घेऊन उभा आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या ठिकाणी मागील कर्माचे खरे स्वरूप कसे उभे राहिले आहे ? ४

३५२४ तुम्हा आम्हा सरी । येथें[2] कईच्या या परी ।। १ ।।
स्वामिसेवा अळकार । नाहीं आवडियें थार ।। २ ।।
खुंटलिया वाचा । मग हा आनद कइचा ।। ३ ।।
तुका म्हणें कोडें । आम्ही नाचों तुज पुढें ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा –सरी–बरोबरी कईच्या–कशाच्या, कशासाठी, परी–प्रकार, थार–अवसर, कोडें–कौतुकानें.

अर्थ – देवा, तुम्ही व आम्ही एकत्व बरोबरीच्या नात्याने झालोत तर मग पुढे सांगितलेले प्रकार कशासाठी निर्माण होतील ? १ मग स्वामी–सेवक या नात्याचा अलकार काही टिकणार नाही एकमेकाच्या विषयीच्या प्रीतीलाही मग अवसर उरणार नाही २ एकरूपत्वामुळे जर वाणीच खुटून गेली तर मग भक्तिप्रेमाचा आनंद कसा भोगता येणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात पण स्वामी–सेवक हे नाते राहिले तर मात्र आम्ही कौतुकाने तुमच्यापुढे नाचू ४

३५२५ कैचें भाडवल खरा हातीं भाव । कळवळघानें माव दावीतसे ।। १ ।।
आता माझा अंत नको सर्वजाणा । पाहों नारायणा निवडूनि ।। २ ।।
सताचें उच्छिष्ट मागिलें पगती । करावे सगती लागे ऐसें ।। ३ ।।
तुका म्हणे आलों दावूनि विश्वास । सचित तें नास पावे ऐसें ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – माव–माया

अर्थ – खऱ्या व शुद्ध भावाचे भांडवल माझ्या हाती कसले आले आहे ? मी कळवळ्याने जे दाखवीत आहे ती सर्व माया आहे १ सर्वज्ञ नारायणा, तुम्ही माझा अत आता पाहू नका २ सतांचे जेवण झाल्यावर

१ तुज, २ आता

त्यांच्या मागच्या पंगतीस बसून मी उच्छिष्ट सेवन करीन. त्यांच्या संगतीत मी राहीन असे तुम्ही करावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या संचितकर्माचा नाश होईल असा विश्वास धरून मी आलो आहे. ४

३५२६ थोडे तुम्ही मागें होती उद्धरिले । मज ऐसे गेले वांयां जीव ॥ १ ॥
आतां याचा कांहीं न मनावा भार । कृपेचा सागर आहेसी तूं ॥ २ ॥
तुज आळवितां पापाची वसति । राहे अंगीं किती बळ त्याचें ॥ ३ ॥
तुका म्हणे उदकीं तारिले दगड । तैसा मी ही जड एक देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– न मनावा–न मानावा.

अर्थ :– देवा, माझ्यासारखे वाया गेलेले जड जीव तुम्ही मागे थोडे का उद्धरिले आहेत ? १ आता माझेही ओझे तुम्ही कधी फार मानू नये. कारण तू कृपेचा समुद्र आहेस. २ तुझी करुणा भाकली असताना पापाचा लेश जर उरला तर तुझ्यापुढे त्याचे बळ ते असे किती ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही तर पूर्वी पाण्यामध्ये दगडही तारले आहेत. मग देवा, माझ्यासारख्या एका जड जीवाचा उद्धार करण्याचे काम अवघड होईल काय ? ४

३५२७ आम्ही म्हणों कोणी नाहीं तुज आड । दिसतोसी भ्याड पांडुरंगा ॥ १ ॥
हागें माझ्या भोगें केलासी परता । विश्वंभरीं सत्ता नाहीं ऐसी ॥ २ ॥
आम्ही तुज असों देऊनि आधार । नाम वारंवार उच्चारितों ॥ ३ ॥
तुका म्हणे मज धरियेलें बळें[1] । पंचभूतीं एळें करूनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– एळें–वेटोळे.

अर्थ :–' आम्ही तुझा उद्धार करू ' असे जर तू म्हटलेस तर तुला आडविणारे कुणीही नाही. पण पांडुरंगा, तू फारच भित्रा दिसतोस. १ कारण माझ्या प्रारब्धभोगामुळे तू दूर झाला आहेस. विश्वास भरून राहाण्याची तुझी शक्तीही यामुळे कमी झाली आहे. २ पण आम्ही मात्र तुला आधार देऊन आहोत. तुझ्या नामाचा उच्चार आम्ही वारंवार करीत आहोत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या पंचमहाभूतांनी मला बळेच धरले असल्याने मी त्यांच्या वेटोळ्यात गुरफटून गेलो आहे. ४

३५२८ आहेतें सकळ प्रारब्धा हातीं । यावें काकुलती यासी आतां ॥ १ ॥
ऐसा माझ्या मनें सांगितला भाव । तोंवरीच देव दुजा नाहीं ॥ २ ॥
अवघियांची जेव्हां सारावी करकर । भावबळें थार धरूं येसी ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज ठेवावें पूजून । आणीक ते[2] गुण नाहीं येथें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– करकर–कटकट, थार–आश्रय.

अर्थ :– जे काही आहे ते सर्व प्रारब्धाच्या हातात आहे, म्हणून या श्रीहरीपुढे काकुळतीस यावे हे बरे. १ असाच एक विचार माझ्या मनाने सुचविला आहे. म्हणून हा देव आता वेगळा वाटत नाही. २ जेव्हा इतर सर्व कटकट दूर सारावी तेव्हाच याचा भावबळाने आश्रय घेता येतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझी मनोभावे पूजा करून राहावे, याशिवाय इतर उपायांची येथे जरुरी नाही. ४

३५२९ सेवट तो होतो तुझियानें गोड । म्हणऊनि चाड धरीतसों ॥ १ ॥
देऊं भोगाभोग कलिवराचा भार । साहों तुज थार त्याचमध्यें ॥ २ ॥

---

१ काळें, २ तो.

तुझ्या बळें कांहीं खटपट काम । वाढवावा श्रम न लगे तो ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही चेपलों या भारें । तुमचे तें खरें देवपण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— चाड-इच्छा, कलिवराचा-देहाचा, थार-आश्रय

अर्थ :— देवा, तुझ्यामुळेच शेवटी सर्व काही चांगले होते म्हणून तर मी तुझी इच्छा धरून आहे १ नाना भोग व अभोग देऊन आम्ही या शरीराचा भार सहन करू व त्यामध्येच तुला आश्रय देऊ २ देवा तुझ्या बळाच्या साह्याने आम्हांस काही खटाटोप करून उगाच श्रम वाढवावे लागत नाहीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या देहाच्या भोगाच्या भाराने चेपून गेलो आहोत तुमचे देवपण मात्र खरे आहे ४

३५३० ऐसाचि तो गोवा । न पाहिजे केला देवा ॥ १ ॥
बहु आली दुरिवरी । ओढत हे भरोवरी ॥ २ ॥
आम्हांसी न कळे । तुम्ही झाकूं नयें डोळे ॥ ३ ॥
तुका म्हणे सगें । असो एक एका अगें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— गोवा-गुतवणूक भरोवरी-खटाटोप.

अर्थ :— देवा, प्रपंचाची अशी गुतवणूक तुम्ही आमची करू नये १ आम्ही पुष्कळ काळापासून या प्रपंचाचा खटाटोप करीत आलो आहोत २ देवा, आम्हांला काही एक समजत नाही, पण तुम्ही तरी डोळे झाकून बसू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्हीआम्ही एकमेकांच्या संगतीने राहू ४

३५३१ मायलेकरांत भिन्न । नाहीं उत्तराचा सीण ॥ १ ॥
धाडीं धाडीं वो भातुकें । रंजविल्याचें कौतुकें ॥ २ ॥
करूनि नवल । याचे बोलिलो ते बोल ॥ ३ ॥
तुका म्हणे माते । पाडुरंगे कृपावते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— भातुके-प्रेमाचा खाऊ

अर्थ :— आई व लेकरू यांच्यात भिन्नत्वाचा भाव नसल्याने त्यांच्या एकमेकांतील बोलण्यामुळे कुणासच त्रास वाटत नाही १ देवा आम्ही तुला इतके रंजविले आहे, त्यासाठी कौतुकाने तू आम्हास प्रेमाचा खाऊ पाठीव मा २ मी जे बोल बोलत आहे त्याचे तुम्ही नवलपूर्ण असे कौतुक करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माते, पांडुरंगे, तू कृपावंत असल्यामुळे माझी विनंती ऐक ४

३५३२ आवडी कां ठेवूं । बैसोनिया सगें जेवूं ॥ १ ॥
मागें नको ठेवूं उरी । माझी आण तुजवरी ॥ २ ॥
देखिले प्रकार । त्याचे पाहेन साचार ॥ ३ ॥
तुका म्हणे बाळीं । केली चाहाडी सकळीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— आवडी-प्रीती, उरी-कमतरता, आण-शपथ, साचार-खरोखर.

अर्थ — देवा, तू आणि मी असे दोघेजण एका पंगतीस बसून जेवू, यासाठीच प्रीतीची जोपासना मनात आपण करू १ यासबंधात तू काही कमतरता ठेवू नकोस माझी तुला शपथ आहे. २ आई-मुलाच्या प्रेमातले जे जे प्रकार मी पाहिले ते सर्व खरे झालेले मी तुझ्यात पाहीन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू फसवितोस अशा प्रकारची चहाडी तुझ्या सर्व लेकरानी केलेली आहे ४

३५३३ नव्हेसी तूं लांसी । मायां आणिकां त्या ऐसी ॥ १ ॥
जे हे थांयां जाती घोल । होती निर्फळचि फोल ॥ २ ॥
नव्हेसी दुबळी । कांहीं नाहीं तें जवळी ॥ ३ ॥
तुका म्हणे खोटी । कांहीं नव्हेसी करंटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लांसी–राक्षसी वृत्तीची

अर्थ.– देवा, तू इतरासारखी राक्षसी वृत्तीची आई नाहीस १ त्यामुळे माझे हे घोवडे बोल कधीच फोल ठरून वाया जाणार नाहीत. २ जवळ देण्यास काहीच नाही अशा प्रकारची दुर्बळ आई तू नाहीस ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू काही खोटी आणि करंटी असो आई नाहीस. ४

३५३४ आम्हां बोल लावा । तुम्हां अनुचित हें देवा ॥ १ ॥
ऐसें सांगा का व्यालेती । काय नाहीं तुम्हां हातीं ॥ २ ॥
आतां धरा दुरी । वाया दवडाया थोरी ॥ ३ ॥
तुका म्हणे ठायीं । ऐसें विचारावे कांहीं[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – व्यालेती–जन्म दिलात, विचारावें–विचार करावा

अर्थ – देवा, आमच्यावर काही बोल लावावा हे तुम्हाला फारच अनुचित दिसते १ असे जर आहे तर मग तुम्ही माझ्यासारख्या बालकास जन्म तरी का दिलात ? तुमच्या हातात कोणती सत्ता नाही ? २ आता जर तुम्ही या बालकास दूर धराल तर मात्र तुम्ही तुमचे मोठेपण गमावून बसाल ३ तुकाराम महाराज म्हणतात, या सदर्भी तुम्ही आपल्या मनाशीच काही विचार करावा. ४

३५३५ मरोनियां गेली माया । मग तया कोण पुसे ॥ १ ॥
पोरटियांची दाद कोणा । ऐसा जाणा[2] प्रवाहो ॥ २ ॥
निढळास निढळ जोडा । होय फोडा कवतुका ॥ ३ ॥
तुका म्हणे देवाऐसी । आहो सरसीं आपण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – माया–आई, निढळास–चांगल्या नशिबाची, सरसी–सारखी

अर्थ – जर एखाद्या मुलाची आईच मरण पावली तर त्याला कोण विचारणार ? १ या पोरक्या मुलाची कोण दाद घेणार ? असाच हा प्रघात पडला असल्याचे जाणावे. २ चांगल्या नशिबाची आई व तसेच तिचे मूल असेल तर मात्र त्या जोडीचे कोडकौतुक होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपण सर्व बालके त्या देवाची असल्याने सारखीच आहोत ४

३५३६ संसाराची कोण गोडी । दिली जोडी करूनि ॥ १ ॥
निष्ठुर तूं बहु देवा । पुरे हेवा न म्हणवी ॥ २ ॥
पाहोनिया कर्म डोळां । निराळा तो वर्जीना ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज माझें । म्हणतां ओझें फुकट ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–लाभ, हेवा–हाव, वर्जीना–टाकत नाही

अर्थ – संसारातील गोष्टींची गोडी ती कसली ? म्हणूनच मी सर्व लाभ तुलाच अर्पण करून टाकले १ पण देवा, तू फारच निष्ठुर आहेस रे. तुझी हाव मोठी आहे कितीही दिले तरी पुरे झाले असे काही तू म्हणत नाहीस २

१ पायी, २ नवा

तू सर्व कर्में डोळ्यांनी पाहातोस, पण त्यांतून निराळे करून काही तू टाकीत नाहीस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुला मासे म्हणताना फुकट ओझे मात्र होते. ४

३५३७ नव्हतें तें कळों आलें । तरी बोलें अबोला ॥ १ ॥
तुज मज घातली तुटी । एके भेटीपासूनि ॥ २ ॥
आतां याची न धरीं चाड । कांहीं कोड कवतुकें ॥ ३ ॥
तुका म्हणे यावें जावें । एका भावें खंडलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– तरी–म्हणूनच, चाड–इच्छा.

अर्थ.– देवा, जो प्रकार नव्हता तो मला आता समजून आला आहे. म्हणून मी तुमच्याशी अबोला धारण केला आहे. १ एक भेट झाल्यापासूनच देवा, तुमची माझी भेट संपली आहे २ आता मी काही कोडकौतुकानेही या देवाची इच्छा मनात धरणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्याकडे येण्याजाण्याचा हा व्यवहार या एका भावनेनेच संपला आहे. ४

३५३८ आतां दोघांमध्यें काय । उरलें होय वाणीजेसें[1] ॥ १ ॥
निष्ठुर हें केलें[2] मन । समाधान न करूनि ॥ २ ॥
झुरावें तें तेथींच्या परी । घरिच्याघरीं अवघिया ॥ ३ ॥
तुका म्हणे देवपण । गुंडाळून असों दे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– वाणीजेसें–वर्णन करावे असे, परी–प्रकार.

अर्थः– देवा, तुमच्यात व आमच्यात आता वर्णन करावे असे काय उरले आहे हो? १ तू माझे समाधान न केल्यामुळे माझे मन मात्र निष्ठुर झाले आहे. २ घरच्याघरीच आम्ही झुरत राहावे असेच तुझ्या येथील सर्व प्रकार दिसतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे जर असेल तर तुझे देवपण तू गुंडाळून ठेव ना. ४ .

३५३९ मागितल्यास आस करा । उरी धरा कांहींबाहीं ॥ १ ॥
म्हणऊनि सारिली आस । होती यास[3] मूळ तें ॥ २ ॥
माझ्या मोहें तुज पान्हा । लोटे स्तना बोरस ॥ ३ ॥
तुका म्हणे आळवणें । माझ्या देणें उत्तर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः– आस–आशा, इच्छा, सारिली–टाकली, बोरस–प्रेमाचा पान्हा.

अर्थः– देवा, तुमच्याजवळ मागितल्यावर काही आशा मनात असते. मनात थोडीफार तरी इच्छा राहाते. अथवा, तुम्ही तिच्याविषयी थोडेफार अंतर ठेवता १ म्हणून मी तुमच्या संबंधीची आशाच मनातून काढून टाकली. कारण सर्व दुःखाचे मूळ तीच होती. २ खरे पाहाता माझ्या मोहामुळेच तुमच्या स्तनांना पान्हा फुटतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या माझ्या आळवियाला तुम्ही काही तरी उत्तर द्यावे. ४

३५४० आतां बरें घरिच्याघरीं । आपली उरी आपणापें ॥ १ ॥
धाइटवरें न पडे दृष्टी । मग कष्टी होइजेना ॥ २ ॥
बोलों जातां वाढे बोल । वांयां फोल खटखट ॥ ३ ॥
काकुलती यावें देवा । तों तों सेवा इच्छितो ॥ ४ ॥
हिशोबाचे खटसटे[4] । घडे तुटे घडेना[5] ॥ ५ ॥
तुका म्हणे कळों आलें । दुसरें भलें तों नव्हे ॥ ६ ॥

१ वाणिजेसें, २ कळे, ३ यास, ४ खटपटे, ५ घटेना.

शब्दार्थ व टीपा :– उरी–कमीजास्त.

अर्थ – आता घरच्या घरी राहाणे हेच बरे. जे काय कमीजास्त असेल ते आपले आपणापाशीच राहील १ दुसऱ्याचे काही बरेवाईट दृष्टीस पडणार नाही आणि मग मनही उगाच दुःखीकष्टी होणार नाही २ बाहेर उगाच बोलण्याने बोल वाढतो आणि मग सर्व खटपट विनाकारण वाया जाते. ३ या देवाला काकुळतीस यावे तर तोही जास्त जास्तच सेवेची इच्छा करतो ४ नुसती हिशेबाची खटपट करण्याने काहीही लाभ होणार नाही, काहीच नफानुकसान त्यामुळे होत नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, दुसरे जोपर्यंत चांगले नाहीत तोपर्यंत काही कार्य होणार नाही ही गोष्ट आम्हास समजली. ६

३५४१ आधीं सोज्वळ करावा मारग । चालतां ते मग गोवी नाही ॥ १ ॥
ऐसा चालोनिया आला शिष्टाचार । गोवीचा वेव्हार पापपुण्य ॥ २ ॥
पळणें तो पळा सांडुनि कांवळें । उपाधीच्या मुळें लाग पावे ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें शूर तो निवडे । पडिले बापुडे कालचक्रीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गोवी–गुंता, अडथळा, लाग–पाठलाग.

अर्थ:– ज्या मार्गाने तुम्हास जायचे आहे तो मार्ग आधी नीट स्वच्छ करून ठेवा मग त्या मार्गाने जाताना तुम्हास कसलाही अडथळा येणार नाही १ असाच शिष्टाचार पूर्वीपासूनच चालत आलेला आहे पापपुण्यात्मक कर्मांनीच या मार्गात अडथळा येत राहिला आहे. २ जर तुम्हास या मार्गाने पळायचे असेल तर पंचमहाभूताचे कावळे सोडून पळा, कारण या पंचमहाभूतात्मक देहामुळेच पापपुण्याचे भाग पाठलाग करीत येतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, या ठिकाणी जो खरा शूर आहे तोच सर्व अडथळ्यांतून दूर होईल आणि इतर बापडे मात्र या कालचक्राच्या हाती सापडतील ४

३५४२ उद्धत त्या जाती । द्रवें रगल्या उद्धती ॥ १ ॥
म्हणऊनि बहु फार । त्यासी असावे अंतर ॥ २ ॥
कैंचे पाठी पोट । गोड विषासी सेवट ॥ ३ ॥
तुका म्हणे सापा । न कळे कुरवाळिले बापा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उद्धत–उद्दट, गर्वाने माजलेल्या

अर्थ :– धनमदाने माजलेल्या जाती फारच उद्दट असतात. १ म्हणूनच शहाण्या माणसाने त्यांच्यापासून दूर राहावे २ विषाच्या ठिकाणी पाठ व पोट कसले आले आहे ? शेवटपर्यंत त्यास गोडी नसते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अरे, सर्पाला जरी प्रेमाने कुरवाळले तरी त्याला ते काही समजत नाही ४

३५४३ आम्हां कथा आवश्यक । येर संपादूं लौकिक ॥ १ ॥
जैसी तैसी भाय बरी । मानिल्या त्या माना[1] येरी ॥ २ ॥
व्यालीचा कळवळा । जीव बहुत कोवळा ॥ ३ ॥
कवतुके वावरे । तुका म्हणे या आधारे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– येर–इतर, दुसरी, येरी–इतर, व्याली[illegible]
क्रीडा करीत आहे

---

१ मानू,

अर्थ – श्रीहरीची कथा करणे हे आम्हांस अति आवश्यक कर्तव्य आहे त्याखेरीज इतर लौकिक गोष्टींची सवादणी बेतानेच करू १ बालकास त्याच्या स्वत ची आई जशी असेल तशीच चांगली असते इतराचा मान मात्र जितक्यास तितकाच असतो २ जन्म देणाऱ्या आईचाच लेकराविषयी जीव कळवळत राहातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या याच आश्रयाने मी कौतुकाने वावरत असतो ४

३५४४ पाळितो वचन । परि बहु भीते मन ॥ १ ॥
करिते पायाशीं सलगी । नये बैसों अगसर्गी ॥ २ ॥
जोडोनिया कर । उभें असावें समोर ॥ ३ ॥
तुका म्हणे संत । तुम्ही मी बहु पतित ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अगसर्गी–अगालगत बसणे, कर–हात

अर्थ – संतहो, मी तुमच्या वचनाचे पालन करीत आहे पण माझ्या मनास फारच भीती वाटत आहे १ तुमच्या अगालगत बसणे मला नको वाटते म्हणून मी पायाशी मात्र सलगी करीत आहे २ मी हात जोडून तुमच्या समोर उभे असावे हे बरे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही संतजन फार श्रेष्ठ आहात आणि मी मात्र पापी आहे ४

३५४५ जैसा तैसा आता । मज प्रमाण अनंता ॥ १ ॥
पाया पडणे न सडीं[1] । पोटीं तेच वर तोडीं ॥ २ ॥
एका भावें चाड । आहे[2] तैसें अतीं गोड ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हा । टळणेचि नाहीं नेमा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – प्रमाण–मान्य, न सडी–सोडणार नाही चाड–गरज

अर्थ – अनंता तू आता जसा असशील तसाच मला मान्य आहेस १ तुमच्या पायावर मस्तक ठेवण्याचे मी काही सोडणार नाही जे माझ्या हृदयात आहे तेच मुखातून बाहेर येईल २ मला एका शुद्ध भावाचीच गरज आहे तो जसा आहे तसा आरभापासून शेवटपर्यंत गोड आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा जो माझा नेम आहे तो कधी टळणारा नाही ४

३५४६ चुकलो या ऐशा वर्मा । तरी कर्मा सापडलो ॥ १ ॥
पाठी लागे करी नास । गर्भवास भोगवी ॥ २ ॥
माझें तुझें भिन्नभावें । गळा दावें मोहाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे पाठेळ केलो । नसत्या भ्यालों छंदासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – या ऐशा–वरील अभगात सांगितलेल्या, पाठेळ–ओझ्याचे जनावर

अर्थ – वरील अभगात सांगितलेल्या वर्माला मी चुकलो म्हणून तर कर्माच्या या पेचप्रसगात सापडलो आहे १ हे कर्म माझ्या पाठीमागे लागून नाश करणारे झाले असल्याने मला नाना प्रकारचे गर्भवास भोगावे लागतात २ देहादींचे भाव माझे व इतर तुझे अशा भिन्नत्वाच्या वृत्तीमुळे मोहाच्या दाव्याने माझा गळा चांगलाच बांधला गेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे या कर्मभोगाने मला ओझ्याचा बैल करून सोडले आहे मी या नसत्या छदास फारच भिऊन वागतो ४

१ सोडी, २ आदि

३५४७ देह प्रारब्धा शिरीं । असोन करी उद्वेग ॥ १ ॥
धांव घालीं नारायणा । माझ्या मना जागवीं ॥ २ ॥
ऐसी चुकोनियां वर्मे । पीडा भ्रमें पावलों ॥ ३ ॥
तुका म्हणे कैंचा भोग । नव्हे रोग अंगींचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- उद्वेग-चिंता, काळजी.

अर्थ :- हा देह प्रारब्धाच्या स्वाधीन असून त्यामुळे मनास एकसारखी काळजी वाटते. १ नारायणा, यासाठी माझ्या मनास नित्य जागृत ठेव. २ तुझ्या प्राप्तीचे वर्म अशा रीतीने चुकल्यामुळे मला फारच त्रास झाला. मी प्रपंचाच्या भ्रमात गुंतून राहिलो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अता हा अंगचा रोग भोग कसा होणार नाही ? ४

३५४८ अनंताच्या ऐकों[1] कीर्ती । ज्याच्या चित्तीं हरिनाम ।
उलंघूनि गेले सिंधु । हा भवबंधु तोडोनियां ॥ १ ॥
आतां हळुहळु तेचि वाहीं । चालों कांहीं अधिकारें ॥ २ ॥
खुंटूनियां गेले नावा । नाहीं हेवा[2] खोळंबला ।
न लगे मोल द्यावा रुका । भावें एका कारण ॥ ३ ॥
तुका म्हणे पाहतों वाट । उभा नीट पाउलीं ।
भीमातिरीं थडवा केला । उठा चला लवलाहें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वाहीं-मार्गाने, थडवा-अल्प जलाशय, लवलाहें-लौकर.

अर्थ :- ज्यांच्या चित्तात हरिनाम आहे, आणि ज्यांनी संसारबंधने तोडून हा भवसागर ओलांडला आहे, त्यांच्या अनेक प्रकारच्या कीर्ती मी ऐकिल्या आहेत. १ आता मी हळुहळू त्यांच्याच मार्गाने जसा अधिकार असेल तसा जात आहे. २ ते ज्या नावेतून पैलतीरास गेले ती नाव त्यांनी आमच्या करता ठेवलेली आहे. त्यांना या कामात काही अडचण आली नाही, की काही मोल द्यावे लागले नाही. एका शुद्ध भावामुळेच हे कार्य झाले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी सर्वांना तारण्यासाठी समपावलांनी चंद्रभागेच्या तीरावर उभा आहे त्याच्या कृपेने भवसागराचा लहानसा जलाशय बनला आहे. तो तुमची वाट पहात आहे.

३५४९ तरीच म्यां देवा । सांटीं करूनियां जीवा ॥ १ ॥
येथें बैसलों धरणें । दृढ कायावाचामनें ॥ २ ॥
आवरिल्या वृत्ति । मन घेउनियां हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे जरा । बाहेर येऊं नेदीं घरा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- सांटीं जीवा-जीवावर उदार होऊन.

अर्थ :- देवा, जीवावर उदार होऊन मी तुमच्यासाठी येथे उभा आहे. १ कायावाचामनेकरून धरणे धरून मी दृढ भावाने बसलो आहे. २ सर्व वृत्तींना आवरून धरून मी माझे मन स्वाधीन करून ठेविले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुला आता मी या घराच्या बाहेर जरादेखील येऊ देणार नाही. ४

३५५० हें[3] तों एक संतांठायीं । लाभ पायीं उत्तम ॥ १ ॥
म्हणवितां त्याचे दास । पुढें आस उरेना ॥ २ ॥

१ ऐकोनि, २ यावा, ३ होतो.

३५५३ भजन या नासिलें हेंडि । दंभा लंडा आवडी ॥ १ ॥
जेवीत ना आइता पाक । नासी ताक घुसळूनि ॥ २ ॥
एकाएकीं इच्छी पाठ । नेणे चाट कां जेवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे मुलाम्यावें । बंधन साचे सेवटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हेंडि–विकावयास नेलेला गुरांचा कळप, लंडा–दांभिक, नास्तिक, पाक–स्वयपाक, चाट–चावट, साचे–खरोखर

अर्थ :– विकावयास नेल्याले पशूप्रमाणे असणाऱ्या या दांभिकांनी भजनाचा नाश केला १ तयार झालेल्या आयत्या स्वयपाकाचे जेवण न करता हे लोक ताक मात्र घुसळून विघडवतात. २ एकाएकी पाटावर जाऊन न जेवणाची इच्छा करणारा चावटच म्हणावयास हवा ३ तुकाराम महाराज म्हणतात, मुलाम्याचे नाणें खरोखरच शेवटी कधीतरी बंधनात टाकील. ४

३५५४ जैसा निर्मळ गंगाओघ । तैसा भाग वोगरीं ॥ १ ॥
प्रेम वाढे ग्रासोग्रासीं । ब्रह्मरसीं भोजन ॥ २ ॥
तृप्तीवरि आवडी उरे । ऐसे बरे प्रकार ॥ ३ ॥
तुका म्हणे पाक मन । नारायण तें भोगी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोगरीं–वाढ, पाक–शुद्ध, पवित्र.

अर्थ :– गंगेच्या ओघाप्रमाणे निर्मळ असणारे भोजन मला वाढ १ या ब्रह्मरसाच्या भोजनात प्रत्येक घासाबरोबर प्रेम वाढत असते २ तृप्ती झाल्यावरही भोजनाविषयी आवड राहणें हे उत्तम होय ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचे मन शुद्ध आहे त्याचा उपभोग नारायण घेत असतो ४

३५५५ सुख सुखा विरजण जालें । तें मथलें नवनीत ॥ १ ॥
हालें डोले हरुषें काया । निवती बाह्या नयन ॥ २ ॥
प्रबल तो नारायण । गुणें गुण वाढला ॥ ३ ॥
तुका म्हणे भरली सीग । वरी मग वोसडे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मथलें–घुसळले, हरुषें–हर्षानें, काया–शरीर, बाह्या–बाहू, हात

अर्थ :– सुखाला सुखाचेच विरजण घातल्याने त्याचे दही झाले. ते नीट घुसळले तेव्हा हे सारभूत असे नवनीत निघाले १ याच्या सेवनाने शरीर हर्षाने हालू लागते, डोलू लागते. डोळे व बाहू तृप्त होतात २ अशा प्रसंगी अंतर्यामीचा नारायण प्रबळ होतो आणि गुणाने गुण वाढीस लागतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या सुखाची एकदा शीग भरली म्हणजे ते मग सहजच बाहेर येत राहते ४

३५५६ कां रे न भजसी हरी । तुज[१] कोण अंगीकारी ॥ १ ॥
होइल यमपुरी । यमदंड यातना ॥ २ ॥
कोण जाली लगबग । काय करिसि तेथें मग ॥ ३ ॥
कां रे भरला ताठा । करिती वोज नेता वाटा ॥ ४ ॥
तोडा पडिली खिळणी । जिव्हा पिटिती वोढूनि ॥ ५ ॥
कां रे पडिली जनलाज । कोण सोडवील तुज ॥ ६ ॥
लाज धरीं म्हणे तुका । नको वायां जाऊं फुका ॥ ७ ॥

१ तरी.

शब्दार्थ व टीपा :– अंगीकारी–स्वीकार करणार, बोज–नीटपणे.

अर्थ :– अरे, तू श्रीहरीचे भजन का करीत नाहीस ? अखेरच्या घटकेस तुझा स्वीकार कोण कर आहे ? १ शेवटी यमपुरीस जाशील तेव्हा तेथील शिक्षेच्या फार यातना तुला होतील. २ आता तुला येथे को त्वरा आहे ? मग तेथे यमपुरीस गेल्यावर काय करशील ? ३ उगाच तू गर्व तरी कशासाठी करतोस ? यमदूत तुला नीटपणे आपल्या वाटेने नेतील ४ आता येथे श्रीहरीचे नाम घेताना तुझ्या तोंडास खोळ बसली पण यमलोकात गेल्यावर तुला मारहाण करून तुझी जीभ ओढून काढतील. ५ श्रीहरीचे नाम घेताना तुला लज्जा वाटते. पण शेवटच्या प्रसंगी तुला कोण सोडवील ? ६ तुकाराम महाराज म्हणतात, याविषयी तू तरी लाज धर ना उगाच फुकट वाया जाऊ नकोस. ७

३५५७ देवों कपाट । की कोणें काळें राखों वाट ।। १ ।।
काय येईल तें शिरीं । आज्ञा धरूनियां करीं ।। २ ।।
करूं कळे तैसी मात । किंवा राखाया एकांत ।। ३ ।।
तुका म्हणे जागों । किंवा कोणा नेदुं वागों ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – कपाट–दारे बंद करून.

अर्थ :– देवा, इंद्रियविकाराची दारे बंद करून मी कोठवर तुझी वाट पाहू ? १ आता तू जी काही करशील ती मी शिरसावंद्य मानीन. २ मला जसे समजेल तसे मी करीन अथवा एकान्तात स्वस्थ राहीन तुकाराम महाराज म्हणतात, मी या ठिकाणी नीट जागा तरी राहीन अथवा कोणालाही येण्याजाण्याची वाट करीन ४

३५५८ क्षरला सागर गंगा ओघीं मिळे । आपणचि खेळें आपणाशीं ।। १ ।।
मधील तें वाव अवघी उपाधि । तुम्हां आम्हांमधीं तेचि परी ।। २ ।।
घट मठ झाले आकाशाचे पोटीं । वचनेंचि तुटी तेथेंचि तें ।। ३ ।।
तुका म्हणे बीजें बीज दाखविलें । फल[1] पुष्प आलें गेलें वांयां ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– क्षरला–रूपांतरीत झाला, पाझरला, वाव–व्यर्थ, घट मठ–निरनिराळे आकार.

अर्थ :– समुद्राच्या पाण्याचे सूर्याच्या तापाने वाफेत रूपांतर झाले आणि त्या मेघाच्या वर्षावाने ओघाच्या रूपाने गंगेस मिळेल गंगा समुद्रास मिळते आणि त्याच पाण्याची वाफ पुनः होते अशा रीतीने हा समु स्वतःशी खेळत असतो १ अशा प्रकारे गंगेस मिळणारा ओघ व समुद्र एकच असून मध्यंतरीची अवस्था मात्र उपाधीप्रमाणे आहे त्याचप्रमाणे देवा, तुमचा व आमचा प्रकार आहे. २ आकाशाच्या पोटी घटमठादी आ निर्माण झाले तरी शब्द तेथेच निर्माण होतो आणि मावळतोही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, बीजापा अखेरीस बीजच निर्माण होते. मध्यंतरी पान, फूल आदी जे प्रकार होतात ते वायाच गेलेले असतात. ४

विवरण :– आत्मा व परमात्मा, जीव व शिव, आपण व परमेश्वर यांचे नाते कसे असते याविषयीचे सु वर्णन या अभंगात तुकारामबुवांनी समर्पक दृष्टान्त देऊन केलेले आहे. समुद्राची आपणाशीच म्हणजे स्वतः अखंड क्रीडा चालू असते. त्याच्या पाण्याची वाफ होते. तिचे ढग बनतात, त्यातून पाऊस पडतो, जलाचा गंगेस मिळतो, गंगा समुद्रास जाऊन मिळते, समुद्राचे पाणी तापून पुनः त्याची वाफ होते. या चक्रातील मधल्या उपाधी व्यर्थ असून समुद्र आणि त्यापासून निर्माण झालेला ओघ हे एकच होत. आकाश घटात दिसो, मठात दि

१ पत्र.

ते स्वरूपाने एकच आहे वृक्षास पानेफुले आली तरी बीजापासून बीज मिळते हीच गोष्ट खरी त्याप्रमाणे देवा, तुझ्यापासून आम्ही, हा भावार्थ येथे आहे

सृष्टीच्या अथवा जगताच्या एकदर निर्मितीचा प्रकार हा असाच आहे वर वर भिन्न वाटणाऱ्या वस्तुत अथवा भूतमात्रात एकच अविभक्त व अव्यक्त असे तत्त्व असते किंवा एकाच मूलभूत तत्त्वापासून, अव्यक्तापासून, भिन्न भिन्न असे अनेक व्यक्त पदार्थ निर्माण झाले असे जरी असले तरी व्यक्ताचे व अव्यक्ताचे अतूट असे नाते असत अव्यक्तच व्यक्ताच्या अवस्थेला आलेले असतो भारतीय तत्त्वज्ञानाच्या परपरेत हे अतूट असे नाते विविध प्रकारानी वर्णन केलेले आहे हे सर्व व्यक्त जग मुळी उत्पन्नच झाले नाही असे अजातवाद मानतो जे आहे ते सर्व ब्रह्मच आहे असे सर्वब्रह्मवाद मानतो. हे सर्व जग म्हणजे माया आहे असे मायावाद मानतो आणि हे सर्व जग म्हणजे एक भ्रम आहे असे विवर्तवाद मानतो असे नाना वाद आपापल्या मताच्या प्रतिष्ठापनेसाठी घटाकाश, मठाकाश, समुद्राचे जल व त्यावरील लहरी, सुवर्ण व त्याचे अलकार, बीज व त्यापासून झालेला विस्तार इत्यादी शाब्दिक कसरत करीत असतात तरी सर्व मताचा निष्कर्ष भागवतधर्मीयाना असा वाटतो की, एकच आत्मतत्त्व आपल्याच आवडीसाठी नाना व्यक्त रूपानी विलसले आहे, व्यक्तास आलेले आहे. एकाच ब्रह्मतत्त्वाचा हा अत्यत मनोरम आणि स्फुरणदायी असा आविष्कार आहे सागर जसा आपल्याशीच वाफ, ढग, पाऊस, ओघ, गगा इत्यादींच्या व्यक्त रूपानी खेळत असतो त्याचप्रमाणे हे परब्रह्मच एकाकी न करमल्यामुळे स्वतःच्या इच्छेने अनेक रूपानी व्यक्तास येऊन जगद्रूप झाले

योगवासिष्ठात म्हटले आहे, 'आत्मैव स्पदते विश्व वस्तुजातैरिवोदितम् । तरगकणकल्लोलैरनताम्बुधाविव । यदिद किंचिदाभोगि जगज्जाल प्रदृश्यते । तत्सर्वममल ब्रह्म भवत्येतद्व्यवस्थितम् '– समुद्राच्या ठिकाणी तरग, बिंदू, लाटा इत्यादी अनेक रूपानी जसे समुद्राचे जलच विलास पावत असते त्याप्रमाणे अनत वस्तूच्या रूपानी एक आत्मतत्त्वच विलसत असते हे जे काही विस्तीर्ण असे जगज्जाल दिसते ते सर्व निर्मल असे परब्रह्मच आहे 'बीजें बीज दाखविलें' या तुकाराममहाराजाच्या उक्तीचे रहस्य योगवासिष्ठातही स्पष्ट केलेले आढळते 'फलपुष्पलतापत्रशाखाविटपमूलवान् । वृक्षबीजे यथावृक्षस्तथेद ब्रह्मणि स्थितम् '– फल, पुष्प, लता, पत्र, शाखा, खोड आणि मुळे यानी युक्त असलेला वृक्ष जसा बीजामध्ये सूक्ष्म रूपाने असतो त्याप्रमाणे हे जग या ब्रह्मात सूक्ष्मपणाने असते. काही तरी आकार प्राप्त झाला की जशी सुवर्णाची सत्यता अनुभवास येते, फळाफुलानी नटलल्या वृक्षामुळे बीजाची अनुभूती येते, बिंदू, तरग, लाटा यानी पाणी अनुभवास येते, त्याप्रमाणे एकच अव्यक्त ब्रह्मतत्त्व विस्तारून त्याचे विविध रूपानी जगात रूपान्तर होते परतु मूळात व्यक्त व अव्यक्त याचे अतूट असे नाते असते ज्ञानदेवानी या अतूट नात्याचे वर्णन मोठ्या बहारीने करताना म्हटले आहे, 'माझेया विस्तारलेपणा नावें । हें जगचि नोहे आघवें । जैसे दूध मुराले स्वभावें । तरि तेंचि दहीं ॥ का बीजचि जाहले तरु । अथवा भागारचि अलकारु । तैसा मज एकाचा विस्तारु । तें हे जग ॥ हें अव्यक्तपणे थिजले । तेचि मग विश्वाकारें वोथिजलें । तैसें अमूर्तमूर्ति मिया विस्तारलें । त्रैलोक्य जाणे.'

३५५९ एक आता तुम्ही करा । मज दातारा सत्तेने ॥ १ ॥
विश्वास तो पायावरी । ठेवुनि हरी राहिलो ॥ २ ॥
जाणतचि दुजें नाहीं । आणिक काहीं प्रकार ॥ ३ ॥
तुका म्हणे शरण आलो । काय बोलो विनविती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुजें–दुसरे

अर्थ :– दातारा, तुम्ही आता एकच गोष्ट करा मला आपल्या सत्तेने जवळ करा आपले म्हणा १ श्रीहरी, मी आपल्या पायावर विश्वास ठेवून राहिलो आहे २ मी तुमच्याशिवाय दुसरा कुठलाही प्रकार जाणीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुम्हास माझ्या या बोलांनी शरण आलो आहे ४

३५६० काय विनवावे[1] कोण तो निवाड । केले माझ्या कोड वचनाचे ॥ १ ॥
आहो कृपानिधी गुणाच्या निधाना । माझ्या अनुमाना नयेचि हें ॥ २ ॥
बहुत करुणा[2] केलेसे भाषण[3] । एक ही वचन नाहीं आले ॥ ३ ॥
माझी कांहीं सेवा होईल पावली । निश्चिती मानिली होती ऐसी ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी उरली ते आटी । अभय कर कटी न देखेंचि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड–कौतुक, निधान–साठा, आटी–खटपट, श्रम

अर्थ – देवा, मी तुम्हास आणखी काय विनवावे ? माझ्या कोणत्या विनतीचा निवाडा तुम्ही केला आहे ? माझ्या कोणत्या वचनाचे कौतुक तुम्ही केले आहे ? १ अहो कृपानिधी, गुणाच्या निधाना, माझ्या अनुभवास यातले काहीच आलेले नाही २ आजपर्यंत मी करुण वाणीने पुष्कळ भाषण केले, पण मला तुमच्याकडून एकही उत्तर मिळाले नाही ३ माझी थोडीफार सेवा तुम्हास निश्चितपणे मान्य होईल अशी माझ्या मनाची खात्री होती ४ तुकाराम महाराज म्हणतात, पण माझी ही सब खटपट व्यर्थ गेली कारण कटीवर हात ठेवणारी ही मूर्ती मी बघितलीच नाही ५

३५६१ लाजोनिया काळें राहिले लिखित । नेदिता ही चित्त समाधान ॥ १ ॥
कैसे सुख वाटे वचनाचे तुटी । प्रीतिविण भेटी रुचि नेदी ॥ २ ॥
एकाचिये भेटी एकाचा कोपर । मावेचा पदर कळों येतो ॥ ३ ॥
होत्या आपल्या त्या वेचूनिया शक्ती । पुढें जालो युक्तिकळाहीन ॥ ४ ॥
तुका म्हणे तुम्ही समर्थ जी देवा । दुर्बळाची सेवा कोठें पावे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – लिखित–लिहिलेले शब्द वेचूनिया–खर्च करून

अर्थ – देवा, तुझ्या भेटीविषयी जे जे शब्द लिहिले गेले त्याना यावेळी लाज येण्याचा प्रसंग प्राप्त झाला आहे कारण तुम्ही माझ्या चित्ताला फसलेच समाधान दिलेले नाही १ तुम्ही जर आमच्याशी बोलणेच बंद केले, तर कसले सुख वाटणार आहे ? एकमेकात प्रेमाचे शब्द होत असतील तरच भेटण्याची रुची वाटते नाहीतर त्या भेटीला काहीच रुची नसते २ एकाच्या भेटीच्या वेळी दुसऱ्याने मध्येच कोपर दिला तर त्या दोघात मायेचा पदर किती होता व समजून येतेच ३ आजपर्यंत ज्या ज्या शक्ती आम्हास होत्या त्या त्या आम्ही खर्च केल्या परंतु पुढे मात्र बुद्धी कुंठित झाल्यामुळे आम्ही कळाहीन बनलो ४ तुकाराम महाराज म्हणतात, अहो जी देवा, तुम्ही मोठे समर्थ आहात आम्हा दुर्बळाची सेवा तुम्हास कशी पावेल ? ५

३५६२ आशाबद्ध बहु असे निलाजिरें । होय म्हणे धीरे फळ टोंके ॥ १ ॥
कारणापें चित्त न पाहें अपमान । चित्त समाधान लाभासाटीं ॥ २ ॥
तुका म्हणे हातें लोटिले न कळे । झांकितसे डोळे पांडुरंगा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – टोंके–टोकत बसत, कारणापें–कार्यावर

अर्थ – जो कुणी आशाबद्ध असतो तो फारच निलाजरा होतो कुणी त्याला धीर दिला तरी तो होय म्हणून टोकत बसतो १ त्याचे लक्ष नेहमी आपल्या कार्याकडे असल्यामुळे तो कधी अपमान झालेला पाहात नाही कारण इच्छित लाभ झाला की त्याच्या चित्तास समाधान वाटते २ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, मी डोळे झाकून घेतलेले असल्यामुळे तुम्ही मला आपल्या हातांनी दूर लोटले तरी मला ते समजत नाही ३

१ निवडाव, २ करोनि, ३ भासेन

३५६३ साता पाचा तरीं वचनां सेवटीं । निरोप का भेटी एक तरी ॥ १ ॥
कां नेणे निष्ठुर केलें नारायणा । न देखें हें मना येतां कांहीं ॥ २ ॥
तुका म्हणे ऐसा न देखें निवाड । कडू किंवा गोड फळ पोटीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – निवाड-निर्णय.

अर्थ :– देवा, मी आतापर्यंत पाचसात वेळा तरी माझी वचने तुमच्यासाठी खर्च केली, तेव्हा तू एकदा तरी भेट द्यावयाची होतीस, अथवा निरोप पाठवायचा होतास १ नारायणा, तुम्ही माझ्याविषयी मन एवढे निष्ठुर का केले हे काही समजत नाही माझे हे बोलणे तुमच्या मनास पटत नाही असे दिसते २ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या मनात काही बरे-वाईट फळ देण्याविषयी भावना आहे की नाही याचा निर्णय होत नाही. ३

३५६४ वांयां ऐसा जन्म गेला । हे विठ्ठला दुःख वाटे ॥ १ ॥
नाहीं सरता जालों पायीं । तुम्ही जई न पुसा ॥ २ ॥
का मी जीतों संवसारीं । अद्यापवरी भूमिभार ॥ ३ ॥
तुका म्हणे पंढरिनाथा । सबळ व्यथा भवरोग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सरता–मान्य, जीतों–जिवत राहिलो.

अर्थ – विठ्ठला, माझा सारा जन्म अशाच रीतीने वाया गेला याचे फार दु:ख वाटते मला १ तुम्ही माझी काहीच विचारपूस करीत नाही. म्हणून मी तुम्हास मान्य झालो नाही २ मग मी या भूमीला भार होऊन जगात कशासाठी धीर धरून राहू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीनाथा, अशा प्रकारे या भवरोगाचे फार मोठे दु:ख माझ्या मागे लागले आहे. ४

३५६५ कासया हो माझा राखिला लौकिक । निवाड कां एक केला नाहीं ॥ १ ॥
मग तळमळ न करितें मन । जालें तें कारण कळों येतें ॥ २ ॥
तुका म्हणे केला पाहिजे निवाड । वैद्यासी ते भीड मरण रोग्या ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – निवाड–निकाल, कारण–काम

अर्थ :– देवा, तुम्ही माझा लौकिक तरी कशासाठी राखला ? कोणताही एक निकाल का नाही केला ? १ माझे काम झाले आहे असे समजून आले असते तर माझ्या मनाची तळमळ झाली नसती २ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही एकदा कोणता तरी एक निकाल करायला हवा होता नाही तर रोग्याची भीड वैद्याने धरली तर रोग्याला मरण येणारच ३

३५६६ ऐसे कोण पाप बळी । जें जवळी येऊं नेदी ॥ १ ॥
तुम्हां तंव होइल ठावें । नेदावें का कळों हें ॥ २ ॥
कोण जाला अंतराय । कां ते पाय अंतरले ॥ ३ ॥
तुका म्हणे निमिरयाचा । आला सुचा अनुभव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– अंतराय–अंतर, सुचा–अल्प

अर्थ :– देवा, तुमच्या जवळही मला येऊ देत नाही असे बलवान पाप तरी माझ्या हातून असे कोणते झाले आहे ? १ तुम्हाला तर हे सर्व माहीत असणार. मग मलाच ते समजू नये असे का ? २ तुमच्या-

मास्यात हे असे अंतर का पडले ? तुमचे पाय मला का दुरावले ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, कोणत्या चुकीचे निमित्त होऊन हा असा अल्प अनुभव आला ते सांगा ४

३५६७ ब्रह्मज्ञानाची भरोवरी । पुढिला सांगे आपण न करी ॥ १ ॥
थू थू त्याच्या तोंडावरी । व्यर्थ सिणवी वैखरी ॥ २ ॥
कथा करी वरिवरी । प्रेम नसेचि अंतरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे कवित्व करी । मान[1] वस्तु हे आदरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भरोवरी–श्रम, सायास, वैखरी–वाणी

अर्थ – हा मनुष्य ब्रह्मज्ञानाच्या पोकळ गोष्टी मुखाने सांगण्याचे श्रम करतो पण हे सर्व समोरच्या लोकांसाठी सांगतो स्वत त्याप्रमाणे आचरण करीत नाही १ अशा या माणसाच्या तोंडावर थुंकावे त्याची वाणी या कामात व्यर्थ शिणत राहाते २ हा वरीहरीची वरवर कथा करतो, पण याच्या मनात प्रभूविषयी खरोखरी प्रेम नसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा परमार्थपर कवित्व करतो, पण याच्या मनात सन्मान, लोभ इत्यादींविषयी आदर असतो ४

३५६८ कधीं कृपा करिसी नेणे । मज दीनाचे धावणें ॥ १ ॥
भेटी लागीं पंढरीनाथा । जीवीं लागली तळमळ व्यथा ॥ २ ॥
सिणले माझें मन । वाट पाहता लोचन ॥ ३ ॥
तुका म्हणे लागली भूक । तुझें पहावया श्रीमुख ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धावणे–रक्षण

अर्थ – देवा, तू माझ्यावर कधी कृपा करशील हे काही समजत नाही मज दीनाचे रक्षण तरी केव्हा करणार ? १ पंढरीनाथा तुझ्या भेटीसाठी माझ्या मनाची तळमळ होत असून तीच व्यथा त्याला जडली आहे २ देवा तुझी वाट पाहाता पाहाता माझे डोळे शिणून गेले रे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझे श्रीमुख पाहण्यासाठीच मला भूक लागली आहे ४

३५६९ उच्चारूं यासाटीं । आम्ही नाम तुझें कंठीं ॥ १ ॥
येसी धावत धावत । माऊलिये कृपावंते ॥ २ ॥
पाय चित्तीं धरूं । क्रीडा भलते ठायीं करूं ॥ ३ ॥
तुका म्हणे माझे गंगे । प्रेमभरित पांडुरंगे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – यासाटीं–तुझी भेट व्हावी म्हणून

अर्थ – देवा, तुझी भेट व्हावी यासाठीच आम्ही तुझे नाम कंठाने उच्चारू १ कृपावंत असलेली माऊले, तू धावत धावतच आमच्याकडे ये २ तुझे पाय आम्ही आमच्या चित्तात धारण करू आणि मग वाटेल त्या ठिकाणी क्रीडा करीत राहू ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगे तू परिपूर्ण अशी गंगाच आहेस ४

३५७० दगडाच्या देवा बगाड नवस । याईल कयेस जाऊ नेदी ॥ १ ॥
वेचो धनरासी बांधलें स्मशान । दारीं वृंदावन द्वाड मानी ॥ २ ॥
चोरें नागविला न करी त्याची खंती । परी द्विजा हातीं नेदी रुका ॥ ३ ॥

१ मान लोभ हे अंतरी

फरी पाहुणेर व्याहयाजावयासी । आल्या अतीतासी पाठमोरा ॥ ४ ॥
तुका म्हणे जळो धिग त्याचें जिणें । भार वाही सीण वर्म नेणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- बगाड-पाठीला गळ टोचून टांगून घेण्याचा नवस इ० वेची-खर्च करतो, खंती-चिंता, द्विजा-ब्राह्मणाच्या, रुका-पैसा, दिडकी, पाहुणेर-पाहुणचार, अतीतासी-अतिथीस.

अर्थ :- हा मनुष्य स्वतःच्या पाठीला गळ टोचून घेण्याचा नवस दगडाच्या देवास करीत असतो, पण घरी मात्र बायकोला श्रीहरीच्या कथेला जाऊ देत नाही १ जवळचे धन खर्च करून हा स्मशानात आपल्या वाडवडिलांची समाधी बांधतो. पण दारात तुळशीवृंदावन असणे मात्र याला द्वाडपणाचे वाटते. २ याचे धन चोरांनी लुटून जर याला नागविला तर कधीच चिंता वाटत नाही पण हा ब्राह्मणाच्या हातावर कधी एक दिडकीही ठेवीत नाही ३ हा मनुष्य आपल्या व्याह्यांना आणि जावयांना चांगला पाहुणचार करतो, पण त्याच वेळी जर कुणी अतिथी दारात आला तर मात्र पाठमोरा होऊन राहातो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाचा व्यर्थ भार पृथ्वीला होत असतो, त्याने वर्म न जाणल्यामुळे त्याला उगाच शीण मात्र होतो अशा माणसाच्या जिण्याला आग लागो. त्याचा धिक्कार असो ४

३५७१ करूनि विनवणी । माथा ठेवितों चरणीं ॥ १ ॥
होतें तेंचि असों द्यावें । रूप सौम्यचि बरवें ॥ २ ॥
भया भेणें तुमचा ठाव । तुमच्या कोपें कोठें जावें ॥ ३ ॥
तुका पायां लागे । दान समुदाय मागे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- बरवे-चांगले, ठाव-आश्रय, समुदाय-वैष्णवांचा मेळा

अर्थ :- देवा, मी तुम्हास पुढीलप्रमाणे विनंती करून तुमच्या पायावर मस्तक ठेवीत आहे १ तुमचे हे जे सौम्य रूप आहे तेच मला फार चांगले वाटते. देवा, तेच माझ्यासमोर असू द्या. २ तुमच्या उग्र रूपाच्या भीतीने आम्ही कोणत्या स्थानाचा उपयोग करावा ? तुमचाच राग झाला तर आम्ही जावे तरी कुठे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, ज्यामुळे मला वैष्णवांचा मेळा मिळेल असे दान तुम्ही द्यावे यासाठी मी तुमच्या पाया पडत आहे. ४

विवरण :- या एका महत्त्वाच्या अभंगात तुकारामबुवांनी आपल्या विश्वव्यापी व विस्तारलेल्या मनाचा व्यापार वर्णन करून करून त्याची सगुणाची ओढ स्पष्ट केली आहे सतत प्रभुस्मरण, भजन, सत्संगती, वैराग्य इत्यादींच्यामुळे तुकोबांना आत्मसाक्षात्कार झाला. बीजभूत असलेल्या द्रव्याची प्रचंड वृक्षात कशी परिणती झाली हे त्यांच्या ध्यानात आले अणुरेणूहून लहान असलेले तुकोबा आकाशाएवढे झाले निराकार, निर्गुण रूपातही प्रभू सर्व जगतात कसा भरून राहिला हे त्यांच्या ध्यानात आले सर्व विश्वात भरून राहिलेल्या, अवाढव्य, अक्राळ-विक्राळ व भयानक दिसणाऱ्या रूपाची ओढ मनास वाटली तरी लहानसे, सगुण, सुंदर व सौम्य रूपच आपणास मानवते असा या ठिकाणी अभिप्राय आहे ' रूप सौम्यचि बरवें ' या वचनास गीतेचा आधार आहे हजारो हातपाय, हजारो मुखे, हजारो नेत्र इत्यादींनी व्यापलेले भगवंताचे विराट रूप पाहून अर्जुन गांगरून गेला आणि त्याने या भयानक विश्वरूपापेक्षा सौम्य व सगुण रूपाची प्रार्थना केली. विश्वरूपाच्या भयंकर रूपाने गांगरलेला अर्जुन परमेश्वराच्या सौम्य रूपाने सावध झाला. त्याने तसे भगवंताला सांगितलेही तो म्हणाला, 'दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन । इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ' जनार्दना, तुमचे हे सौम्य व मनुष्यदेहधारी रूप पाहून आता मन जाग्यावर येऊन मी पूर्वीप्रमाणे सावध झालो आहे. सर्व जगात परमेश्वर विविध रूपांनी भरलेला आहे हे ज्ञान तर खरेच, पण प्रेमभोगासाठी सगुण रूपाची जरूरी अधिक असते. वैष्णवांच्या मेळाव्यात या सगुण प्रेमास अधिकच भरती येत राहते.

भगवद्गीतेच्या अकराव्या अध्यायात जी गती अर्जुनाची झाली आहे तीच येथे बुवाच्या मनाची झालेली दिसते भगवताच्या विश्वरूपाला अनेक तोंडे, अनेक डोळे, त्यात अद्भुत देखावे; एक हजार सूर्याच्या प्रभेप्रमाणे त्याचे तेज होते. या अनंत स्वरूपातील भगवतास पाहून अर्जुनाचे चित्त भयभीत झाले. या रूपाला अनंत बाहू, चंद्र, सूर्य हे याचे डोळे, पेटलेला अग्नी हे याचे तोंड. या उग्र रूपामुळे त्रैलोक्याचीही गाळण उडावी. अनेक तोंडाचे, अनेक डोळ्याचे, अनेक हाताचे, अनेक मांड्याचे, अनेक पायाचे, अनेक उदराचे व अनेक दाढाचे विशाळ रूप पाहून अर्जुनाच्या मनात एक प्रकारचा धाक निर्माण झाला. त्याचा धीर सुटला. त्याच्या मनाची शांती ढळली त्याने याच भयभीत अवस्थेत या अवाढव्य व विशाळ रूपास नमस्कार केला. त्याचे स्तवन केले आणि किरीट व गदा धारण करणारे, हातात चक्र घेतलेले चतुर्भुज रूप आपणास दिसावे असा आग्रह धरला. ' हे विश्वरूपाचे सोहळे। भोगीतनि निवाले जी डोळे। आतां होतातिं आधले। कृष्णमूर्तीलागीं॥ तें साकार कृष्णरूपडें। वांचूनि पाहो नावडे। तें न देखतां थोडें। मानिताती हे' आणि भगवतानेही आपल्या भक्ताची ही प्रार्थना ऐकून पुन: पूर्वीचे चतुर्भुज असे सौम्य रूप धारण केले. ज्ञानेश्वरांनी या प्रसंगाचे वर्णन मोठ्या बहारदार पद्धतीने करून म्हटले आहे, 'तैसें शिष्याचेही प्रीती जाहले। कृष्णत्व होतें तें विश्वरूप केलें। तें मना नयेचि मग आणिलें। कृष्णपण मागुतें॥ मग विश्व व्यापूनि भोवतें। जें दिव्य योगतेज प्रगटले होतें। तेंचि सामावलें मागुतें। कृष्णरूपीं तयें॥' आपल्या प्रिय भक्तासाठीं भगवताने 'धरिलें धाकुटपण मागुतें' या सौम्य रूपाचाच लोभ प्रेमासाठी साधुसंतांना नेहमीच असतो.

३५७२ प्रेम नये सांगतां बोलतां दावितां। अनुभव चित्ता चित्त जाणे॥ १॥
कासवीचें बाळ वाढे कृपादृष्टी। दुधा नाहीं भेटी अंगसंगें॥ २॥
पोटामध्यें कोणें सांगितलें सर्पा। उपजत लपा म्हणऊनि॥ ३॥
बोलों नेणे परी जाणे गोड क्षार। अंतरीं विचार त्यासी ठावा॥ ४॥
तुका म्हणे बरें विचारावें मनीं। आणिक भल्यांनीं पुसों नये॥ ५॥

शब्दार्थ व टीपा :– अंगसंगें–शरीराची घमट, सोबत, विचारावें–विचार करावा

अर्थ :– श्रीहरीचे प्रेम सांगता येत नाही, की बोलून दाखविता येत नाही. त्याचा आविर्भावही करता येत नाही ते ज्याचे त्यालाच चित्तात अनुभवावे लागते. १ कासवीचे बाळ तिच्या दृष्टीवरच वाढत असते. पिलांशी तिचा अंगसंग घडून स्तनपानाची जरूरी नसते. २ सर्पाची पिले जन्मल्याबरोबरच लपून राहतात. त्यांना तशी शिकवण ती आईच्या पोटात असतानाच कुणी दिली होती काय ? ३ एखादा मनुष्य बोलू शकत नसला तरी गोड कोणते, खारट कोणते हे मात्र तो मनात जाणून असतो. कारण ती रुची त्याला माहीत असते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, प्रभूच्या प्रेमाचा हा असा प्रकार आहे यासंबंधी तुम्ही मनात नीट विचार करावा. जे कुणी शहाणे आहेत त्यांनी आणखी काही विचारू नये ५

विवरण :– ईश्वराच्या प्रेमाची अनुभूती किती अकथनीय असते याचे वर्णन तुकाराम महाराजांनी या अभंगात केले आहे. खरे, शुद्ध व सात्त्विक प्रेम कधी बोलून दाखविता येत नाही. जे वाचाळता करते, बडबडत राहते ते खरे प्रेम नव्हेच प्रेमाचा अनुभव ज्याच्या त्याच्या चित्तास यावा लागतो. या श्रेष्ठ प्रकारच्या प्रेमाचे वर्णन आपल्या भक्तिसूत्रात करताना महर्षी नारद म्हणतात, 'अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम्। मूकास्वादनवत्'– या प्रेमाचे स्वरूप अनिर्वचनीय म्हणजे वाणीने बोलून न दाखविता येण्यासारखे आहे. ' मुक्यानें गूळ खावला। गोडी नये सांगायता' असे त्याचे वर्णन रामदासांनी केले आहे. निःशब्दता हेच प्रेमाचे खरे वर्णन होय ' मौन गा तुमें राहिनाम', 'स्तुति काहीं न बोलणें' असेच या प्रेमाचे स्वरूप होय या प्रेमाची एकदाच अनुभूती झाली की मग दुसरे काही सुचत नाही, दुसऱ्याचे भान राहत नाही आपल्या नादात तल्लीनता येते ' तें सुख काय सांगों याचें बोलतां नये' प्रेमाच्या रंगातच जे भोगायचे असते. सर्वस्वाचा विसर पडल्यानंतर वर्णन कुणी कशाचे करायचे ? समर्थांनी या अनिर्वचनीय प्रेमाचा खुलासा करताना म्हटले आहे, ' पदार्थज्ञान जेव्हां सरे। द्रष्टा द्रष्टेपणे नुरे॥ ते समई उतरे। पुंज मौनपणाचा। जेथें मुरालें मौपण। तेचि अनुभवाची खूण। अनिर्वाच्य समाधान। या कारणें बोलिजे' या अनिर्वाच्य प्रेमाचा आस्वाद मूकपणानेच घ्यायचा असतो.

३५७३ आतां मी पतित ऐसा साच भावें । कळों अनुभवें आलें देवा ॥ १ ॥
काय करावें तें रोकडेंचि करीं । राहिली हे उरी नाहीं दोघां ॥ २ ॥
येर येरा दृष्टी द्यावया उत्तरा । यासी काय करा गोही आतां ॥ ३ ॥
तुका म्हणे मेलों सांगतसांगतां । तेंचि आलें आतां कळों तुम्हां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– साच–खरोखर, रोकडेंचि–प्रत्यक्षच, गोही–साक्षीची जबानी.

अर्थ :– देवा, आता मी खरोखरच पतित आहे असा अनुभव मला माझाच कळून आला आहे. १ म्हणून आता तुझ्यामाझ्यांत काहीच शिल्लक राहिलेले नाही. आता यानंतर तुला काय करायचे असेल ते प्रत्यक्ष कर. २ एकमेकांच्या समोर स्पष्टपणे उत्तरे देण्यासाठीच उभे आहोत. आता येथे साक्षीची जरूरी काय आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे सांगता सांगता माझा प्राण चालला आहे. आणि हे तुम्हांलाही कळून चुकले आहे. ४

३५७४ काय तुज मागें नाहीं जाणवलें । माझें नाहीं केलें हित कांहीं ॥ १ ॥
डोळे झांकुनियां होसी अबोलणा । तेव्हां नारायणा आतां कैसा ॥ २ ॥
न कळे उचित न संगतां[1] स्पष्ट । ऐसा क्रियानष्ट काय जाणे ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा घात तुम्हां ठावा । तरि कां आधीं देवा वारूं नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वारूं नये–दूर करू नये ? निवारण करू नये ?

अर्थ :– तुम्ही देवा, आतापर्यंत अनेकांचा उद्धार केलात, हे मी मागेच अनेकदा तुम्हांस जाणवून दिले होते, नाही का ? असे असूनही तुम्ही मात्र माझे हित काहीच केले नाही १ नारायणा, तुम्ही डोळे झाकून घेता व न बोलणारे होता. पूर्वी तुम्ही कसे होता आणि आता पाहा कसे आहात. २ जे उचित आहे ते स्पष्ट सांगितल्याशिवाय तुला समजणार नाही. असा तू क्रियानष्ट आहेस की काय हे मी जाणीत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझा होणारा घात जर तुम्हांला माहीत होता तर मग त्याचे आधीच निवारण तुम्ही का करू नये ? ४

३५७५ नये ऐसें बोलों कठिण उत्तरें । सलगी लेंकुरें केली पुढें ॥ १ ॥
अपराध कीजे घडला तो क्षमा । सिकवा उत्तमा आमुचिया ॥ २ ॥
धरूं धावें आगी पोळेल तें नेणें । ओढिलिया होणें माते बाळा ॥ ३ ॥
तुका म्हणे भार[2] ज्याचा जार त्यासी । प्रवीण येविशीं असा तुम्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कीजे–करावा, जार–गर्भवेष्टन.

अर्थ :– देवा, मजसारख्या लहान मुलाने तुमच्यापुढे अशी सलगी केली, म्हणून मला असे निष्ठुर शब्दांनी बोलू नका. १ जो काही अपराध माझ्याकडून झाला असेल त्याबद्दल क्षमा करावी. सर्वोत्तमा देवा, आम्हांस जे उचित आहे ते शिकवा. २ लहान मूल आगीने हात भाजेल हे न जाणता त्याला धरू पाहाते. अशा प्रसंगी आईच त्याला त्यापासून दूर ओढते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याने जन्माला घातले आहे त्याच्याच मस्तकावर त्याचा भार घालण्याविषयी तुम्ही प्रवीण आहात. ४

३५७६ लडिवाळ म्हणोनी निष्ठुर न बोला । परी सांभाळिला लागे घात ॥ १ ॥
बहु वागवीत आणिलें दुरूनि । दासांची[3] पोसनी बहु आहे ॥ २ ॥
नाहीं लागों दिला आघाताचा वारा । निष्ठुर उत्तरा कोमेजतों ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही कृपावंत हरि । शांतवा उत्तरीं अमृताच्या ॥ ४ ॥

१ सांगता, २ फार, ३ दिसाची पोसणीं बहु आहो.

शब्दार्थ व टीपा – पोसनी–पोषण

अर्थ – देवा, आम्ही तुमचे लडिवाळ असल्याने तुम्ही आमच्याशी निष्ठुरपणाने बोलू नका तुम्हाला आमचा घातापासून साभाळ करावा लागेल १ तुमचाआमचा हा संबंध फार दिवसापासून चालत आलेला आहे. या दासाचे पोषणही तुम्ही फार केले आहे. २ देवा, तुम्ही मला कुठल्याही आघाताचा वारा लागू दिला नाही. म्हणून मी या निष्ठुर अशा उत्तरानी कोमेजून जातो ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो श्रीहरी, तुम्ही फारच कृपावंत आहात म्हणून अमृतासारख्या मधुर शब्दानी माझे सांत्वन करा ४

३५७७ आत्मस्थिति मज नको हा विचार । देई निरंतर चरणसेवा ॥ १ ॥
जन्मोजन्मीं तुझा दास पुरुषोत्तमा । हेचि गोडी माझ्या[1] देईं जीवा[2] ॥ २ ॥
काय सायुज्यता मुक्ति[3] हेचि गोड । देव भक्त कोड तेथें नाहीं ॥ ३ ॥
काय तें निर्गुण पाहो कैशा परी । वर्णू तुझी हरी कीर्ती कैसी ॥ ४ ॥
गोड चरणसेवा देवभक्तपणे । मज देवा झणे दुराविसी ॥ ५ ॥
जाणिवेपासूनि सोडवीं माझ्या जीवा । देई चरणसेवा निरंतर ॥ ६ ॥
तुका म्हणे गोडा गोड न लगे प्रीति । सेवेविण चित्तीं सार नाहीं ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड–कौतुक, झणें–त्वरित, एकाएकी.

अर्थ – देवा, आत्मस्थितीचा विचारही मला नको तुझ्या चरणाची निरंतर सेवा मात्र माझ्या हातून व्हावी १ पुरुषोत्तमा जन्मोजन्मी तुझा दास मी व्हावे यातील गोडीच तू मला सतत दे २ देवा, सायुज्य तेची मुक्ती आम्हाला काय करायची ? कारण तेथे सतत गोड असणारे देवभक्ताचे कौतुक उरत नाही ३ देवा, तुमचे ते निर्गुण रूप मी पाहू तरी कसे ? श्रीहरी, तुझ्या निगुण स्वरूपाची कीर्ती वर्णन तरी कशी करू ? ४ देवा, तू देव व आम्ही भक्त या नात्यामुळे तुमची चरणसेवा गोड वाटते अशा अवस्थेत तुम्ही त्वरित मला दूर कराल की काय ? ५ देवा, ज्ञानाच्या अहंकारापासून माझ्या जीवाची सोडवणूक करा व निरंतर तुमच्या चरणाची सेवा मला द्या ६ तुकाराम महाराज म्हणतात, जे स्वभावतःच गोड आहे त्याला गोडाची काय चव ? त्याचे सेवन करणारा दुसरा कोणी तरी हवा त्याप्रमाणे तुमच्या सेवेशिवाय मला कशातही सार वाटत नाही ७

विवरण – आत्मस्थितीची प्राप्ती झाली, सायुज्यता मुक्ती मिळाली की मग सर्वच सपणार ही भीती थोर संताच्या मनात नेहमीच उभी असते बहुतेक सर्व थोर महात्मे व ऋषिमुनी स्वर्गाची, वैकुंठपदाची, मोक्षाची इच्छा मनात धरतात परंतु संताना मुक्ततेची स्थिती नको असते कारण या मुक्तीत मग प्रेमभोग कुठला ? कुणी कुणाचे स्तवन करायचे ? कुणाचे रूप पाहून आनंद मानायचा ? कुणाच्या लीलाचे कुणी वर्णन करायचे ? आणि लटकेपणाने भांडायचे तरी कुणाशी ? आत्मस्थिती प्राप्त झाल्यावर मुक्ती मिळविण्यापेक्षा हा देव व आपण भक्त असे अद्वैता-वरील द्वैतच फार थोर वाटत असताना देवाची चरणसेवा त्याना मोठी वाटते मीच परब्रह्म आहे या अहंकारी ज्ञानात भक्तिसुखाचे कौतुक उरणार नाही गोड गुळाला स्वतःची चव काय समजणार ? त्याला सेवन करणारा कुणी दुसरा हवा याच भूमिकेवरून प्रेमभोगासाठी संत आत्मस्थितीची अवस्था दूर सारून देवभक्तपणात द्वैत पत्करतात आणि भक्तीच्या या सुखासाठी अनेक प्रकारचे गर्भवास भोगण्यासही संत तयार असतात 'चाड धरीन ब्रह्मज्ञानीं । तरी मज व्यर्थ व्यालो जननी' असे नामदेवानी या ब्रह्मज्ञानाविषयी म्हटले आहे 'मुक्तिपद मी या अभिलाषीं न चित्तीं । झणी असतेती पाय तुझे' अशी त्याची वृत्ती आहे आणि या देवाने चटकन मुक्त केलं तर ? नामदेव कळवळून म्हणतात, 'मग मी काय करू वैकुंठनायका । ऐसा प्रेमसुखा कोठें पाहू ?' मुक्ती मिळाल्यावर मग सतसंग तरी कुठला ? अशी एक धास्ती त्याच्या मनात सतत आहे ईश्वराच्या भजनप्रेमातच सर्व प्रकारच्या मुक्ती येतात अशी

१ आम्हां, २ देवा, ३ मुक्तीची हे चाड

संताची साक्ष आहे. एकनाथानी म्हटले आहे, 'एका जनार्दनीं मुक्ति । भजन केलिया दासी होती' हीच धारणा तुकोबाच्या मनाची आहे. 'कासयासी व्हावें जितांचि मुक्त । सांडूनियां थोर प्रेमसुख ?' म्हणून त्यानी प्रश्न केला आहे. त्यांची देवास विनंती अशी आहे की, 'देवा, ऐकें हे विनंती । मज नको रे हे मुक्ती ॥ ....या वैष्णवांचे घरीं । प्रेमसुख इच्छा करी' तुकाराम महाराज देवाला निक्षून सांगतात की, 'मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ॥ मज भक्तीची आवडी । नाहीं अंतरीं ती गोडी' वैष्णवांच्या मेळाव्यात, भक्तिरसात तल्लीन होऊन नाचणे हेच संतांना सर्वश्रेष्ठ प्रकारचे सुख वाटते. ईश्वराचे, प्रभूचे प्रभुत्व अनुभवण्यास भक्ताची भूमिका हवी. साखरेची गोडी साखरेस कशी येणार ? प्रभूचे प्रियत्व अनुभवण्यास लडिवाळ भक्तच हवा.

३५७८ चालें दंडवत घालीं नारायणा । आपुल्या कल्याणा लागूनियां ॥ १ ॥
बैसविला पदीं पुत्र राज्य करी । पिता वाहे शिरीं आज्ञा त्याची ॥ २ ॥
तुका म्हणे आहे ठायींचाचि मान । आतां अनुमान कासया तो ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– चालें–चला

अर्थ :– नारायणा, चला; तुम्ही आपल्या कल्याणासाठीच दंडवत घाला १ कारण राज्यपदावर बसलेल्या पुत्राची आज्ञा त्याचा पिता मानत असतो. २ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या त्याच्या स्थानाचा म्हणून काही मान असतो. तो ज्याचा त्यास देण्यासाठी अनमान कसला असावा ? ३

३५७९ समर्थाचें बाळ पांघरे वाकळ । हसती सकळ लोक कोणा ॥ १ ॥
समर्थासी लाज आपुल्या नांवाची । शरण आल्याची लागे चिंता ॥ २ ॥
जरी तुज कांहीं होईल उचित । तरी हा पतित तारीं तुका ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– होईल–करावेसे वाटेल.

अर्थ :– समर्थ पित्याचे बालक जर फाटकी वाकळ पांघरून असेल तर सर्व लोक कुणास हसतील बरे ? १ यासाठी जे कुणी समर्थ आहेत त्यांना आपल्या नावाची लाज असावी. जे कुणी त्यांना शरण आले आहेत त्यांची त्याला चिंता वाहावी लागेल. २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, जर तुला काही उचित असे करायचे असेल तर या पतित तुकारामाचा तुम्ही उद्धार करावा. ३

विवरण – परमेश्वराशी प्रेमकलह करताना थोर संत एक मुद्दा वारवार उपस्थित करतात. ईश्वर आपला पिता, आपली माता, आपण त्याचे लेकरू. तेव्हा आपली चिंता आपण का करावी ? जो समर्थ पिता आहे तो आपल्या लेकराची योग्य ती काळजी करीलच. समर्थाच्या मुलाने फाटकी वाकळ पांघरली तर मग अप्रतिष्ठा कुणाची होणार ? सर्व लोक कुणाला हसणार ? तेव्हा आपल्या समर्थपणाची लाज आपण स्वत च राखली पाहिजे. तुकोबानी प्रेमकलहाची ही भूमिका वारवार घेतलेली आहे दुसऱ्या एका अभंगात ते म्हणतात, 'समर्थाचें बाळ केविलवाणें दिसे । तरी कोणा हांसे जन देवा ?' समर्थाचे बालक उदास व केविलवाणे दिसले तर लोक समर्थालाच हसतील. याची काळजी या बालकाला दिसते. बालक जर अवगुणी, पतित, खोडकर असेल तर अधिकच काळजी पित्याला घ्यावी लागते. आपल्या समर्थपणाची लाज राखण्यासाठी का होईना, पण पुत्राचा सांभाळ करावा लागतो. आणखी एका अभंगात असाच भाव प्रकट करताना तुकोबानी म्हटले आहे, 'कामधेनूचें वासरू । खाया न मिळे काय करूं ?' वासरू कुणाचे ? तर कामधेनूचे. आणि पोट भरण्यासाठी गावभर भटकले तरी उपाशी राहाते. यात कुणाच्या नावास बट्टा लागणार ? 'बैसुनी कल्पद्रुमातळीं । पोटासाठीं तळमळी' कल्पवृक्षाच्या तळाशी बसून भुकेसाठी तळमळ करणाऱ्या माणसास काय म्हणावे ? त्याला मग कल्पद्रुमाचा उपयोग तरी काय ?

३५८० न करीं रे मना कांहींच कल्पना । चिंतीं या चरणा विठोबाच्या ॥ १ ॥
येथें सुखाचिया अमुपचि रासी । पुढें कल्पनेसी ठाव नाहीं ॥ २ ॥
सुखाचे ओतिले साजिरे श्रीमुख । शोक मोह दुःख पाहातां नाहीं[१] ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें होईल विसावा । तुटतील हावा[२] पुढिलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अमुपचि–खूप, पुष्कळ ठाव–अवसर

अर्थ – मना, तू इतर कोणतीही कल्पना न करता या विठोबाच्याच पायाचे चिंतन कर १ या ठिकाणी सुखाच्या पुष्कळ राशी असून इतर काही कल्पना उत्पन्न होण्यास येथे अवसरच नाही २ या श्रीहरीचे मुख हे केवळ सुखाचेच ओतलेले असल्यामुळे अतिशय शोभिवंत असे झाले आहे याच्या दर्शनाने मनाच्या शोक, मोह दुःख या सर्व भावना दूर होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, या ठिकाणी मनास विश्रांती मिळेल आणि पुढे होणाऱ्या सर्व हावा थांबतील ४

३५८१ काय करूं मज नागविलें आळसें । बहुत या सोसें पीडा केली ॥ १ ॥
हिरोनिया नेला मुखींचा उच्चार । पडिलें अंतर जवळीच ॥ २ ॥
द्वैताचिया कैसा सापडलों हातीं । बहुत करती ओढाओढी ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां आपुलिया सवें । न्यावें मज देवें[३] सोडवूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सवें–बरोबर

अर्थ – काय करावे हो ? या आळसाने मला लुटले आहे आणि प्रपंचाच्या सोसाने मला फारच पीडा केली आहे १ माझ्या मुखात असलेले श्रीहरीचे नाम यामुळे नाहीसे झाले आहे जवळ असलेल्या श्रीहरीशी म्हणून अंतर पडत चालले आहे २ कसा कुणास माहीत, मी जीव शिव या द्वैतभावनेच्या हातात सापडलो आहे त्यामुळे माझ्या मनाची फारच ओढाताण होत राहिली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला या भेदभावाच्या चक्रातून देवा तू सोडव आणि आपल्याबरोबर घेऊन जा ४

३५८२ नाहीं देवाचा विश्वास । करी संतांचा उपहास ॥ १ ॥
त्याचे तोंडीं पडे माती । हीन शूकराची जाती ॥ २ ॥
घोकुनी अक्षर । वाद छळणा करीत फिरे ॥ ३ ॥
म्हणे देवासी पाषाण । तुका म्हणे भावहीन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उपहास–थट्टा, शूकराची–डुकराची

अर्थ – या माणसाचा देवावर विश्वास नाही नेहमी संतांची थट्टाच हा करीत असतो १ अशा माणसाच्या तोंडात अखेर मातीच पडेल याची जात हीन अशा डुकराचीच असते २ हा उगाच भारंभार ग्रंथांचे पाठांतर करून दुसऱ्याशी कलह करीत वणवण फिरत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा भावहीन मनुष्य देवाला पाषाणच म्हणत असतो ४

३५८३ हेंचि सर्वसुख जपावा विठ्ठल । न दवडावा पळ क्षण वांयां ॥ १ ॥
हेंचि एक सर्वसाधनांचें मूळ । आतुडे गोपाळ येणें पंथें ॥ २ ॥
न लगती कांहीं तपाचिया रासी । करणें वाराणसी नाना[४] तीर्थें ॥ ३ ॥

---

१ नासे, २ धांवा, ३ देवा, ४ सव

कल्पना हे तिळ देहीं अभिमान । नये नारायण जवळी त्याच्या ॥ ४ ॥
तुका म्हणे नामें देव नेदी भेटी । म्हणे त्याचे होंटीं कुष्ट होय ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आतुडे–स्वाधीन होतो, तिळ–तिळभर

अर्थ – सतत विठ्ठलाचे नामस्मरण करावे, यातच सर्व सुख आहे त्याच्यापासून एक क्षण सुद्धा वाया घालवू नये १ सर्व साधनाचे नामस्मरण हेच एक मूळ आहे याच मार्गाने भगवान गोपालकृष्ण भक्ताच्या स्वाधीन होतो २ याशिवाय दुसऱ्या कोणत्याही तपाच्या राशी करण्याची जरुरी नसते आणि काशी इत्यादी तीर्थस्थानाच्या यात्राही करण्याची आवश्यकता नाही ३ देहाविषयी अभिमान व कल्पना यात एक तिळमरच अतर असल्याने नारायण त्याच्याजवळ कधीच जात नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, या भगवताच्या नामस्मरणाने देव भेटत नाही, असे जे कुणी म्हणतील त्याच्या ओठाना कोड फुटेल ५

विवरण – कलियुगात ईश्वरप्राप्तीचे सवात सोपे साधन म्हणून सतांनी प्रभूच्या नामस्मरणाचा सतत गौरव केला आह यज्ञयाग, जपतपादी खडतर साधने, कष्टदायक तीर्थयात्रा कर्मकाडाच अवडबर, नाना व्रते आणि कैवल्ये, नवससायास इत्यादी अनेक मार्गाना सोडून लोकानी मनापासून या नामस्मरणाच्या मार्गास लागावे सर्व साधनापेक्षा कमी कष्टाचा आणि खात्रीचा असा हा सगुणोपासनेचा व नामसकीर्तनाचा मार्ग आहे अशी सताची एकमेव निष्ठा आहे या नामस्मरणाच्या सरळ, सोप्या व बिनघोर मार्गाचा गौरव अनेक सतानी मनापासून केला आहे या नामस्मरणापुढे इतर सर्व साधने व्यर्थ होत असेच सतानी मानले आहे 'अष्टागयोगें न शिणिजे । यमनेम निरोधन कीजे रमा ॥ वाचा गीत गाईजे ।' असे ज्ञानदेवानी एका अभगात म्हटले आह 'नाम पवित्र आणि परिकर । कल्पतरुहुनी उदार' असे त्याचे म्हणणे आह 'नामापरता मत्र नाहीं त्रिभुवनीं' अशी नामदेवाची साक्ष आहे 'सकळ साधनाचे सार । रामकृष्ण हा उच्चार' असे त्यानी सागितले आहे तीर्थ जपराशी जप हृषीकेशी । नाम अहर्निशी रामराम । तीर्थाचें पैं तीर्थ नाम हें समर्थ । होईल कृतार्थ रामनामें' अशा शब्दात नामदेवानी नाम साधनाचा गौरव केला आह 'सकळ साधनाचें सार । मुखीं नामाचा उच्चार' अशी एकनाथाचीही साक्ष आहे 'सर्वामाजीं सार नाम विठोबाचें', सव साधनाचे घर जें का' असे त्यानी म्हटल आहे कलियुगाच्या या धकाधकीत आपल्या वाट्यास आलेले कर्तव्यकर्म करीत असताना सतत प्रभूच चिंतन करणे हेच एकमेव साधन सर्व साधुसतानी सागितले आह उगाच शरीरास कष्ट देणारी हटयोगादी साधने कशासाठी करावीत ? एकनाथानी म्हटले आहे, 'अष्टाग साधन न करी वाउगें । धूम्रपान वेगें कासया करसी ? । मनीं हरी धरीं मनीं हरी धरीं। वाउगा तू फेरीं पडू नको' प्रभूचे नामस्मरण हा एक अति सोपा व खात्रीचा मार्ग असल्याचे तुकोबानीही म्हटले आहे, 'नाम-सकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मातरीचीं । नलगे सायास जाणें वनातरा । सुखें येतो घरा नारायण' उगाच शरीरकष्ट कशासाठी करायचे ? कर्मकाड कशासाठी वाढवायचे ? 'सध्या कर्म ध्यान जपतप अनुष्ठान । अवघें घडे नाम उच्चारिता' इतर भानगडीत पडून मनास व शरीरास उगाच क्लेश देण्यापेक्षा खात्रीच्या व साध्या अशा या नामसकीर्तनाच्या मार्गाने जाव असा त्याचा उपदेश आहे

३५८४ माझे विषयीं तुज पडतो विसर । नको धरू दूर पांडुरंगा ॥ १ ॥
तुला म्हणवितो हेचि लाज तुला । आता क्षणी मला विसरेसी ॥ २ ॥
तुका म्हणे तुझी माझी नाहीं उरी । आता केली खरी देवराया ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – क्षणी–त्वरित, एकाएकी, उरी–भेद बाकी, मर्यादा, भीड

अर्थ – पाडुरगा, माझ्या विषयी तुला विसर पडतो पण तू आता मला दूर धरू नकोस १ देवा मी मला तुझा दास म्हणवितो याची लाज तुला असावी ना तेव्हा मला तू एकाएकी कसा विसरशील ? २ तुकाराम महाराज म्हणतात देवराया खरोखरच तू आता तुझ्यात व माझ्यात काहीच भीडमर्यादा ठेविली नाहीस ३

३५८५ अभक्ताचे गांवीं साधु म्हणजे काय । व्याघ्रवाडां गाय सांपडली ॥ १ ॥
कसायाचे आळी मांडिले प्रमाण । वस्वणाची आण तया काई ॥ २ ॥
केळी आणि बोरी वसती सेजारी । संवाद कोणे परी घडे येथें ॥ ३ ॥
तुका म्हणे खीर केली कान्हेळ्याची । शुद्ध गोडी कैंची वसे तेथें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वस्वणाची-बैलाची.

अर्थ :- अभक्ताच्या गावी साधुसंताची योग्यता काय असणार ? वाघाच्या वरीत गाय सापडल्यावर जशी तिची अवस्था होते तशीच त्याची होणार. १ कसायाच्या आळीत बैलाची शपथ घेतली तर तिचा काय उपयोग ? ती काय प्रमाण मानायची ? २ केळी व बोरी यांची झाडे एकमेकाजवळ राहातात, परंतु उभयतात कधी एक-मेकाचा गुण घेण्याविषयी संवाद घडतो काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, कडू कारळ्याची कुणी कधी खीर जरी केली तरी तिच्यात शुद्ध गोडी कशी येणार ? ४

३५८६ भागल्यांचा तूं विसांवा । करी[1] नांवा निंबलोण ॥ १ ॥
परमानंदा पुरुषोत्तमा । हरीं या श्रमापासूनि ॥ २ ॥
अनाथाचा अंगीकार । करितां भार न मनिसी ॥ ३ ॥
तुका म्हणे इच्छा पुरे । ऐसे धुरे गे विठ्ठले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- अंगीकार-स्वीकार, न मनिसी-मानीत नाहीस, धुरे-श्रेष्ठ

अर्थ :- देवा, जे कुणी दमलेभागले आहेत त्यांचा तू विसावा आहेस. यासाठी मी तुझ्यावरून निंबलोण उतरून टाकतो १ परमानंदा, पुरुषोत्तमा, अनेक श्रमापासून मला मुक्त कर. २ जे कुणी अनाथ आहेत त्यांचा स्वीकार करताना स्वतःस भार झाला आहे असे तू मानीत नाहीस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमची जी जी इच्छा आहे ती ती पूर्ण करणारी तू विठ्ठलमाऊली आहेस. ४

३५८७ घालूनियां कास । बळें आलो मागायास ॥ १ ॥
प्रेमें देई पाठवूनि । पांडुरंगा सेवाऋणी ॥ २ ॥
होईं रे शाहाणा । कळो नेदावें या जना ॥ ३ ॥
तुका म्हणे पायीं । जडलो मग उरलें काई ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- नेदावें-देऊ नये.

अर्थ :- मी चांगली बळकट कास घालून तुझे कृपादान मागावयास आलो आहे. १ पांडुरंगा, आम्ही तुझी सेवा करून जे ऋण तुझ्यावर करून ठेविले आहे त्याच्या बदली तू आम्हास प्रेम पाठवून दे. २ तू शाहाणा हो, हे लोकांना कळू देऊ नकोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता तुझ्या पायाशी नम्र झालो असताना मग आणखी उरले तरी काय आहे ? ४

३५८८ भेटीलागीं पंढरिनाथा । जीवीं लागली तळमळ व्यथा ॥ १ ॥
कै कृपा करिसी नेणे । मज दीनाचे धांवणें ॥ २ ॥
सीणलें माझें मन । वाट पाहातां लोचन ॥ ३ ॥
तुका म्हणे भूक । तुझें पाहावया मुख[2] ॥ ४ ॥

१ करीन, २ श्रीमुख

शब्दार्थ व टीपा – कें–केव्हा, नेणे–जाणत नाही, समजत नाही, धावणें–रक्षण

अर्थ – पंढरीनाथा, तुझ्या भेटीसाठी माझ्या जीवास तळमळ लागून राहिली आहे १ तू माझ्यावर कधी कृपा करणार आहेस हे काही समजत नाही मज गरिबाचे रक्षण कधी करणार हे कळत नाही २ देवा, तुझी वाट पाहाता पाहाता माझे मन थकून गेले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझे श्रीमुख पाहावे एवढीच भूक मला आहे ४

३५८९ साडियेली काया । वरीं ओवाळूनी पाया ॥ १ ॥
शरण शरण नारायणा । मज अंगीकारा दीना ॥ २ ॥
आलो लोटांगणीं । रुळें तुमचे चरणीं ॥ ३ ॥
तुका म्हणे कई । डोई[1] ठेवीन हे पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साडियेली–ओवाळून टाकली, काया–शरीर, देह, अंगीकारा–स्वीकारा, कई–कधी

अर्थ – देवा, मी माझा देह तुमच्या पायावरून ओवाळून टाकला आहे १ नारायणा, मी तुम्हाला शरण आलो आहे मज दीनाचा स्वीकार तुम्ही करावा २ मी तुमच्या चरणावर लोटांगण घालून आलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या पायावर मी डोके कधी ठेवीन असे मला झाले आहे ४

३५९० तुझे दारींचा कुतरा । नको मोकलूं दातारा ॥ १ ॥
धरणे घेतले घरात[2] । नको धरून उठवू हात ॥ २ ॥
घेतली मुरकुडी[3] । थोर जालो मी लंडी ॥ ३ ॥
तुका म्हणे जगजीवना । ब्रिदें पाहे नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोकलू–डावलू, सोडू, मुरकुडी–लोळण, लंड–नाठाळ

अर्थ – देवा, मी तुझ्या दारात कुतरा होऊन पडलो आहे दातारा, तू मला दूर डावलू नकोस १ मी तुझ्या दाराशी धरणे धरले आहे मला हात धरून तू यासाठी उठवू नकोस २ मी मोठा बलदंड व नाठाळ असलो तरी तुझ्या दाराशी लोळण घेतली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, जगाचे जीवन असणाऱ्या नारायणा, तुम्ही स्वत चे जे ब्रीद आहे ते नीट पाहावे ४

३५९१ पडिलो बाहेरि आपल्या कर्तव्यें । संसाराचा जीवें वीट आला ॥ १ ॥
एकामध्यें एक नाहीं मिळों येत । ताक नवनीत निवडलिया ॥ २ ॥
दोन्ही जालीं नावें एकाच्या मथनें । भूस सार गुणें वेगळालीं ॥ ३ ॥
तुका म्हणे कोठें वसे मुक्ताफळ । सिंपल्याचे स्थळ खडलिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मुक्ताफळ–मोती, खडलिया–मोडल्यावर, फोडल्यावर

अर्थ – मला या लौकिक संसाराचा वीट आल्यामुळे मी आपल्या कर्तव्याची जाणीव होऊन प्रपंचाच्या बाहेर आलो. १ ताक व लोणी याची एकदा एकमेकापासून निवड केल्यानंतर ते कधी एकमेकात मिसळून जात नाहीत २ एका दह्याच्याच मथनामुळे ताक व लोणी ही दोन नावे झाली पण एकात सारभूत तत्त्व असते व एकात नुसते भूस असते त्यामुळे ती वेगळी दिसतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, मोती घडण्याचे स्थळ जे शिंपला तेच फुटल्यानंतर मोत्याची निर्मिती कशी होणार ? ४

१ शिर ठवियेले पायावर, २ दारात, ३ मुरकुडा जाला शिरमणी लंड

३५९२ पाहातां हें बरवें जालें । कळों आलें यावरी ॥ १ ॥
मागिलांचा जाला झाडा । त्या निवाडास्तव ॥ २ ॥
विसांवलें अंग दिसे । सरिसे बुद्धि अनुभव ॥ ३ ॥
तुका म्हणे बरें जालें । देवे[1] नेलें गवसूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– बरवें–चांगले, झाडा–हिशेब, गवसून–शोधून

अर्थ – नीट विचार करून पाहाता असे दिसते की, जें झाले ते चांगलेच झाले हे आता समजून आले आहे. १ मागच्या सर्व कर्मांचा हिशेब पूर्ण झाला असून त्यासंबंधी निर्णयही झालेला आहे. २ श्रीहरीच्या संगतीने माझे अंग विसावलेले असून त्याप्रमाणे अनुभवही माझ्या मनास आला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला शोधून देवाने आपल्या बरोबर घेतले हे बरेच झाले ४

३५९३ चक्रफेरीं गळीं गळा । होता गोवियेला माळा ॥ १ ॥
फुटोनियां गेला कुंभ । जालों निष्काम स्वयंभ ॥ २ ॥
धरितचि नाहीं थारा । वेठी[2] भ्रमण खोकरा ॥ ३ ॥
तुका म्हणे कौतुक कोडें । आगी काय जाणे मढें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निष्काम–वासनारहित, निरागी, खोकरा–फुटक्या मडक्यास

अर्थ :– काळचक्राच्या फेऱ्यात असलेल्या रहाटगाडग्याच्या गळ्यात माझा गळा गुंतला होता १ त्यांतील एखादा कुंभ फुटला की तो निकामी होतो. त्याप्रमाणे मी त्यांतून मोकळा होऊन निष्काम व स्वयंभू बनलो आहे. २ त्या फुटक्या गाडग्यास मग कुणी वेठीला धरून फिरवीत नाही त्याप्रमाणे काळचक्रातील माझे स्थान नष्ट झाले ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रेताला आगीचे जसे कोडकौतुक वाटत नाही तसे काळचक्राचे दुःख मला नाही ४

३५९४ श्रमपरिहारा । मूळ हे जाले दातारा ॥ १ ॥
देह निवेदूनि पायीं । जालो रिकामा[3] उतराई ॥ २ ॥
आपली ते सत्ता । येथें असों नेदीं आतां ॥ ३ ॥
राहिला निराळा । तुका कटकटे[4] वेगळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निवेदूनि–समर्पण करून.

अर्थ :– दातारा, सर्व परिश्रमाचा नाश करण्यास मी कारण झालो आहे १ मी माझा देह तुमच्या पायी समर्पण करून उतराई झालो आहे त्यामुळे सर्व कर्मांतून मी मुक्त झालो आहे. २ मी आता या ठिकाणी आपल्याच सत्तेने वर्तन करीत नाही सर्व काही तुमचीच सत्ता आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अनेक प्रकारच्या कटकटीपासून मी वेगळाच होऊन राहिलो आहे. ४

३५९५ पाठवाल तेथें गर्जेन पवाडे । कार्यी[5] देहाकडे नावलोकीं ॥ १ ॥
म्हणउनि मागें कठीचा सोरस । पावनील नास विघ्नें पुढें ॥ २ ॥
कृपेच्या कटाक्षें न[6] मे कळिकाळा । येतां येत बळाशक्तीपुढें ॥ ३ ॥
तुका म्हणे गुढी आणीन पायांचे । जगा होईल सोपें नाम तुझें ॥ ४ ॥

१ दिले, २ टेवी, ३ निष्काम, ४ खटपटे, ५ काहीं, ६ निमें.

शब्दार्थ व टीपा :– पवाडे–कीर्ती, नावलोकीं–पाहणार नाही, रोरस–प्रसादाची गोडी, गोड प्रसाद, न भें-भिणार नाही, पायापें–पायाजवळ.

अर्थ :– देवा, ज्या ठिकाणी मला पाठवाल त्या ठिकाणी मी तुमच्या गुणांची कीर्ती गाईन या कामासाठी मी माझ्या देहाकडे सुद्धा पाहाणार नाही. १ यासाठीच मी तुझ्या मुखातील गोड प्रसाद मागत आहे. त्यामुळे माझी पुढील सर्व विघ्ने दूर होतील. २ देवा, एकदा तुम्ही कृपेचा कटाक्ष माझ्यावर टाकला की मग मी बळाने पुढे येणाऱ्या कळिकाळासही भिणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे विजयाची गुढी मी तुमच्या पायापाशी आणून जगाला तुमचे नाम उच्चारण्यास सोपे होईल असे करीन ४

३५९६ उपजल्या काळें शुभ कां शकुन । आतां आवरोन राहिलेती ॥ १ ॥
नाहीं मागितली वचनाची जोडी । निष्काम रोकडी[1] वरिवरि ॥ २ ॥
सत्याविण काय उगीच लाबणी । कारियाची वाणी येर भूस ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसी कोणा चाळवणी । न विचारा मनीं पांडुरगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उपजल्या–निर्माण झाला, रोकडी–प्रत्यक्ष, येर–इतर सर्व, चाळवणी–फसवणूक, न विचारा–विचार करीत नाही

अर्थ ·– देवा, ज्या वेळेस तुमच्या विषयी माझ्या मनात शुद्ध भाव उत्पन्न झाला तेव्हाच शुभ शकुन झाला असताना आता तुम्ही असे लपून का राहिले आहात ? १ माझ्या मुखातून निघणाऱ्या शब्दांपासून काही प्राप्ती व्हावी असे मी मागितले नाही आणि वरवरची रोकडी निष्कामताही मागितलेली नाही. २ सत्य स्थिती जर नसेल तर मग उगाच लाबण काय कामाची ? ज्यामुळे काम होत असेल ती वाणी सफल मानावी, इतर सर्व भुसकटा-प्रमाणेच आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, अशा प्रकारची फसवाफसवी कुणाच्या बाबतीत करावी यासंबंधी तुम्ही काही विचार करीत नाही ४

३५९७ नव्हें मी आहाच आशेचें बांधलें । जें हें टोंकविलें नारायणा ॥ १ ॥
अंतर तों तुम्हां बरें कळों येतें । वेव्हार उचितें चाळवीजे ॥ २ ॥
मनें कल्पीलें आवरितां पाप । संकल्पीं विकल्प याचि नांवें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां न सोसे जळजळ । सिजल्यावरी जाळ कढ खोटा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आहाच–व्यर्थ, उगाच, अंतर–मन, चाळवीजे–फसवीत आहात.

अर्थ :– आशाबद्ध झालेला असा मी व्यर्थ बनलेला भक्त नव्हे. मग नारायणा, तुम्ही मला उगाच टोकावत का बसविले आहे ? १ माझ्या मनात काय आहे हे तुम्हास नीटपणे समजते मग उचित अशा व्यवहारात तुम्ही मला का फसविता ? २ मनात ज्या विषयी कल्पना येते तीच गोष्ट जर आवरली तर ते पाप आहे. कारण यासच संकल्पाच्या ठिकाणी विकल्प असे नाव आहे तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची जळजळ मनात ठेवणे आम्हास सोसत नाही कारण एकदा अन्न शिजल्यावर मग जाळ लावणे व्यर्थच आहे. ४

३५९८ ताकें कृपण तो जेवूं काय घाली । आहाच ते चालीवरुनि[2] कळे ॥ १ ॥
काय तुम्हां येचे घातले सांकडें । माझें आलें कोडें आजिवरि ॥ २ ॥
सेवेविण आम्ही न लिपों हे काया । जाला देवराया निर्धार हा ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझीं राखावया ब्रीदें । येणें अनुवादें कारियासी[3] ॥ ४ ॥

१ कोरडी, २ बोलीवरुनि, ३ गर्जतसो

शब्दार्थ व टीपा – आहाच-व्यर्थ, उगाच, साकडें–संकट, काया-शरीर

अर्थ – जो ताक द्यायला कृपण आहे तो जेवायला काय देणार हो ? त्याच्या व्यर्थ होणाऱ्या चालीवरूनच सर्व काही समजते १ देवा मी तुम्हाला आतापर्यंत कोणते साकडे घातले हो ? माझ्याकरता तुमचे काय खर्च झाले ? माझ्याबद्दल असे काय कोडे तुम्हाला पडले हो ? २ तुमच्या सेवेशिवाय आमच्या शरीराला दुसरे काही माहीतच नाही देवराया हाच एक माझ्या मनाचा निर्धार झाला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमची ब्रीदे सांभाळली जाण्याचे कार्य व्हावे म्हणून मी हे बोलत आहे ४

३५९९ वृत्तीवरि आम्हा येणें कशासाटीं । एवढी हे आटी सोसावया ॥ १ ॥
जाणतसा परी नेणते जी देवा । भ्रमचि बरवा राखावा तो ॥ २ ॥
मोडूनि क्षरलो अभेदाची मूस । तुम्हां का आळस वोडवला ॥ ३ ॥
तुका म्हणे होई लवकरि उदार । लावणीचे फार काम नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आटी–प्रयत्न, खटपट, बरवा–चांगला क्षरलों–मोकळा झालो

अर्थ –देवा, आम्ही वृत्तीवर तरी कशासाठी आलो आहोत ? एवढी खटपट तरी आम्ही कशासाठी केली आहे ? १ देवा, तुम्ही हे सर्व जाणत असताना नेणतेपणाने का वागता हो ? हाच भ्रम तुम्ही नीटपणे राखावा २ पूर्वी मी अभेदत्वात होतो पण ती मूस मोडून मी आता मुक्त झालो आहे. असे असताना तुम्ही आळसावलेले का आहात ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही या कामी लौकर उदार व्हावे. उगाच लांबण लावण्याचे काय कारण आहे ? ४

३६०० सुलभ कीर्तनें दिलें ठसावूनि । करिता धरणी उरी कोण ॥ १ ॥
आता न टळावें केलिया नेमासी । उदाराचा होसी हीन काय ॥ २ ॥
एका नेमें कोठे दुसरा पालट । पादर[1] तो धीट म्हणती त्यासी ॥ ३ ॥
तुका म्हणे किती बोलसील उणे । एकाच वचनें खड करीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उरी–उणीव, कमतरता, पादरधीट–बढाईखोर, खड–निकाल

अर्थ – कीर्तनाचा मार्ग हा सोपा व सुलभ आहे असे मी सर्वांना पटवून दिले आहे अशा प्रकारचे हरिकीर्तन करीत असताना या पृथ्वीवर काय उणीव होणार आहे ? १ देवा, आता हा माझा नेम कधीच टळू नये. तू उदार आहेस तो कधी हीन होशील काय ? २ एकदा एक नेम केल्यावर त्यामध्ये कधी बदल होतो काय ? असे जर झाले तर त्याला पादरधिटा असे लोक म्हणतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू किती उणेंवुणे बोलतोस रे ? एकाच शब्दाने कायमचा निकाल कर ना ४

३६०१ जेथें माझी दृष्टि राहिली बैसोन । तेथेंचि हे मन गुडाळतें ॥ १ ॥
टाळावी ते पीडा आपुल्यापासून । दिठावलें अन्न ओकवितें ॥ २ ॥
तुम्हासी का कोडें कोणें ही विशीचे । नवलाव याचे वाटतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे वेगीं उमारा जी कर । कीर्त[2] मुखें थोर गर्जईन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोडें–संकट, नवलाव–नवल आश्चर्य

अर्थ – ज्या स्थानावर माझी दृष्टी बसून राहिली आहे त्याच ठिकाणी माझेमन घोटाळत राहिले आहे १ ते स्थान मला देऊन आपल्यापासून ही पीडा टाळून टाका ना कारण दृष्ट लागलेले अन्न जर सेवन केले तर ते

१ पादिर, २ कीर्ती

ओकून पडते २ देवा, तुम्हांला सकट तरी कोणत्या विषयाचे पडले आहे ? याचेच मला फार आश्चर्य वाटते ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही मला अभयदान देण्यासाठी आपला हात वर करा ना म्हणजे मी तुमची कीर्ती माझ्या मुखाने गर्जून साऱ्या लोकाना सांगेन ४

३६०२ इच्छेपाशीं आलो फिरोनि मागुता । स्वामीसेवकता आवडीचे[1] ॥ १ ॥
द्यावे लवकरी मागितले दान । मुळींचें जतन करूनि असे ॥ २ ॥
उपाय हे करीं एकाचि वचना । दावूनिया खुणा ठाया येतो ॥ ३ ॥
तुका म्हणे गांठी किती तुजपाशीं । जगाच्या सोडिसी चिंतनानें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाया–ठिकाणी

अर्थ – स्वामीसेवकपणाच्या आवडीच्या इच्छेमुळे मी प्रपचास मागे टाकून देवा, येथे आलो आहे १ मी मागे जे कृपादान मागितले आहे ते मला तुम्ही लौकर द्यावे कारण मूळचा जो आश्वासनाचा ठराव आहे तो मी सांभाळून आहे २ तुमच्या आश्वासनाच्या एकाच वचनासाठी मी हे उपाय करीत असतो आणि यापूर्वीच्या साऱ्या खुणा दाखवून या स्थानाशी येत राहातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, नामचिंतनामुळे तुम्ही सर्व जगाच्या मनातील गाठ सोडविता आणि स्वत च्या मनात मात्र किती तरी गाठी ठेवीत असता ४

३६०३ कोठें आता आम्ही वेचावी हे वाणी । कोण मना आणी जाणोनिया ॥ १ ॥
न करावी साडी आता टाळाटाळी । देइन ये कळी होइल माजी ॥ २ ॥
घरोघरीं जाल्या ज्ञानाचिया गोष्टी । सत्यासवे गांठी न पडावी ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हा भाकिता करुणा । भलतांचि शाहाणा शोध काढी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेंचावी–खर्च करावी, कळी–तंटा फजीती

अर्थ – आता आम्ही आमची वाणी कोणत्या ठिकाणी खर्च करावी ? आमच्या अंत करणातील ही गोष्ट जाणून कोण मनावर घेणार आहे ? १ देवा आता तुम्ही अशी टाळाटाळ करून माझी हेळसांड करू नका कारण यामुळे आमची फार फजिती होत राहिली आहे २ अलीकड ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी घरोघर झाल्या असल्या तरी त्यामुळे खऱ्या वस्तूची काही प्राप्ती होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा आम्ही तुमची करुणा भाकीत असताना एखादा भलताच शहाणा काहीतरीच शोध काढतो ४

३६०४ डगमगी मन[2] निराशेच्या गुणे । हें तो नारायणें सातवीजे ॥ १ ॥
धीरें तू गंभीर जीवन जगाचें । जळो विभागाचे आत्रीतत्या[3] ॥ २ ॥
भेईल जीव हें देखोनि कठिण । केला जातो सीण तो तो वाया ॥ ३ ॥
तुका म्हणे आवश्यक हें वचन । पाळावेंचि दान[4] समयो आहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –आत्रीतत्या–आततायी

अर्थ – देवा तुम्ही आमच्या मनात कृपेविषयी निराशा उत्पन्न केली तर ते डगमगून जाईल तेव्हा नारायणाने माझे मन शांत करावे १ तू सव जगाचे जीवन असून तुझ्यात गांभीर्याचे धैर्य आहे असे असताना जर कुणी आततायीपणा करील तर त्याला आग लागो २ देवा, तुमचा हा कठोरपणा पाहून एखादा जीव भिऊन जाईल ना कारण जो जो शीण केला जातो तो तो यामुळ वायाच जातो असे दिसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमचे पूर्वीचे वचन तुम्ही नीटपण सांभाळले पाहिजे कारण कृपादान देण्याचा समय हाच एक आहे ४

१ आवडीची, २ मान ३ आहाच ते ४ वान

३६०५ आम्ही पाहा कैसीं एकतत्त्व जालों । रासणे लागलों वासनेसी ॥ १ ॥
तुम्हाविण काहीं नावडावें जीवा । केला तोचि देवा केला[1] पण ॥ २ ॥
वर्म नेणों परि वृत्ती भंगों नेदूं । वंदिलेंचि वंदूं आवडीनें ॥ ३ ॥
तुका म्हणे कळे नामाचें जीवन । वारता ही भिन्न नेणों आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पण–निश्चय वारता–वार्ता

अर्थ – देवा, आम्ही पाहा कसे एकत्वाशी समरस झालो आहोत यासाठी वासनेपासून आम्ही आमचे रक्षण करून घेतले आहे १ तुमच्या शिवाय आता माझ्या जीवास काहीच आवडत नाही याविषयी मी आता दृढ निश्चयच केलेला आहे २ देवा, आम्ही तुझे वर्म जाणीत नाही पण आम्ही आमच्या वृत्तीचाही भंग होऊ देत नाही जे आम्ही प्रीतीने वंदनीय मानले आहे त्यालाच वंदन करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या नामामुळेच आमचे जीवन सार्थ आहे हे समजते. म्हणून त्याशिवाय इतर वार्ताच कधी आम्ही जाणीत नाही ४

३६०६ आपण तों असा । समर्थ जी हृषीकेशा ॥ १ ॥
करा करा वुझावणी । काय विलंब वचनीं ॥ २ ॥
हेंगे[2] ऐसें म्हणा । उठूनि लागेन चरणा ॥ ३ ॥
घेऊनिया सुखें । नाचेल तुका कवतुकें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वुझावणी–समजूत, हेंगे–हे घे.

अर्थ – हृषीकेशा, आपण तर फारच श्रेष्ठ व समर्थ आहात १ म्हणून तुम्ही माझी समजूत करा ना उगाच याविषयी उशीर का करता हो ? २ 'हे घे' असे एकदा तुम्ही म्हणा ना म्हणजे मी मोठ्या आनंदाने तुमच्या चरणाशी लागेन ३ तुकाराम महाराज म्हणतात तुमच्या कृपेचे दान घेऊन त्या सुखाने मी कौतुकाने तुमच्यापुढे नाचेन ४

३६०७ ध्याल ऐसें दिसे । तुमचें साचपण इच्छे ॥ १ ॥
म्हणऊनि न भंगे निर्धार । केले लोचनें सादर ॥ २ ॥
मुखाचीच वास । पुरला पाहे अवकाश ॥ ३ ॥
तुका म्हणे कळे । काय लाभ कोणें वेळे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साचपण–खरे, वास–वाट

अर्थ – देवा, माझ्या इच्छेस जे येत आहे तेच खरे तुम्ही द्याल असे मला दिसते आहे १ म्हणून माझ्या निश्चयाचा भंग कधीच होत नाही. तुमच्याकडे मी आदराने डोळे लावून बसलो आहे २ तुमच्या मुखाकडे सदा लावून मी वाट पाहात बसलो आहे आणि आता कृपादानास किती अवकाश आहे हेच मी पाहातो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्याकडून कोणत्या वेळेस कोणता लाभ होईल हे काय समजून येते ? ४

३६०८ तुम्ही तों सदैव । अधीरपणें माझी हाव ॥ १ ॥
जळो आशेचें तें जिणें । टोकतसों दीनपणें ॥ २ ॥
येथूनि सोडवा । आतां अनुभवेंसीं देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे जालें । एक मग हें निमालें ॥ ४ ॥

१ दृढ, २ हें घ

शब्दार्थ व टीपा - निमालें-नाहीसे होईल

अर्थ – देवा तुम्ही तर सुदैवी आहात पण माझी हाव मात्र अधीरपणाने वाढत आहे १ अशा या आशाबद्ध जिण्याला आग लागो दीनवाणे होऊन एखाद्या वस्तूकडे दोखत बसणे नको २ देवा, माझ्या अनुभवास आता तुमची कृपा आणा व मला या आशाबद्ध जिण्यातून सोडवा ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमचे व आमचे मन एकदा एक झाले की मग हे दीनवाणे जिणे नाहीसे होईल ४

३६०९ कैसे भले देवा अनुभवा का नये । उसीर तो काय तुम्हापाशीं¹ ॥ १ ॥
आहे तें मागतो दिसतें जवळी । केल्यामध्यें कळि कोण साध्य ॥ २ ॥
नाहीं खाडीत मी सेवेची मर्यादा । लाविला तो धंदा नित्य करीं ॥ ३ ॥
तुका म्हणे हात आवरिला गुंती । माझे तव चित्तीं नाहीं दुजें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कळी-तंटा, भांडण, दुजें-दुसरे

अर्थ – देवा, तुमची कृपा जर माझ्या अनुभवास काहीच येत नाही तर मग तुम्हांला भले तरी कसे म्हणावे हो ? तुमच्या जवळ या बाबतीत उशीर का ? १ तुमच्याजवळ जे दिसते आहे ते मी मागतो आहे ते न देता उगाच भांडण निर्माण करण्यापासून तुम्हाला काय मिळते हो ? २ देवा मी तुमच्या सेवेची मर्यादा सोडीत नाही जो तुम्ही मला उद्योग लावून दिला आहे तो मी सतत करीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपादान देण्याच्या गुंत्यातून तुम्ही आपला हात आवरून धरला आहे पण माझ्या मनात मात्र याच्यावाचून दुसरा विचार नाही ४

३६१० हुदकी पिसवी हलवी दाढी । मणी² वोढी निंदेचे ॥ १ ॥
त्याचे फळ पाकीं यमाचे दंड । घर केले कुंड कुंभपाक ॥ २ ॥
क्रोध पोटीं माग आणिला अंतरा । भुंकोनि कुतरा जप करी ॥ ३ ॥
तुका म्हणे स्नान केले मळमूत्रें । जेवविलीं पितरें अमंगळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हुदकी-मान हालवून हिसका देऊन, पाकीं-शवटी, कुंभपाक-एक प्रकारचा नर्क, अंतरा-मनात

अर्थ – हा एक मनुष्य हातात गोमुखीची पिशवी घेऊन नामजपाच्या रूपानें मानेस हिसकेही देतो, दाढी हालवितो, पण मनातून दुसऱ्याच्या निंदेचे मणीच एकामागून एक असे ओढीत असतो १ अशा माणसाला शेवटी कुंभपाक नावाच्या नरकाचेच घर मिळणार यमराजाच्या दंडाची शिक्षाच त्याला मिळणार २ यानें क्रोधरूपी मागास आपल्या मनात थारा दिलेला असतो, आणि कुत्र्यासारखा जगावर एकसारखा भुंकत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाच्या पूर्वजांनी मलमूत्रात स्नान केलेले असते त्यांनी नरकाचेच अमंगळ असे भोजन केलेले असते ४

३६११ अगा³ भरला ताठा । नये वळणी जैसा खुंटा ॥ १ ॥
कैसे न कळे त्या डेंगा । हित आवळले अंगा ॥ २ ॥
जीव जाते वेळे । भरे⁴ लकडा ताठी डोळे ॥ ३ ॥
मुसळाचे धनु । तुका म्हणे नव्हे अनु ॥ ४ ॥

१ आम्हापाशी, २ मणी मनी, ३ अगी, ४ भरल्या कडे.

शब्दार्थ व टीपा :- डेंगा-गाढवाला, लफडा-निखड, नेट, अनु-अणुमात्रही.

अर्थ – या माणसाच्या अंगी गर्व भरलेला असल्यामुळे तो जात्याच्या खुंट्याप्रमाणे कधीच वळला जात नाही. १ मरण अंगावर येऊन आदळत असताही या गाढवाला ते कसे समजत नाही ? २ याचा जीव जायच्या वेळी डोळे ताठ करून हा मलतीकडेच नेट लावून असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मुसळाचे धनुष्य करायचे म्हटले तर ते मुळीसुद्धा, अणुमात्रही वाकणार नाही; तसे या माणसाचे आहे. ४

३६१२ करूनि कडविड । जमा घडिली लगड ॥ १ ॥
आतां होतें तेंचि जालें । नाम ठायींचें[1] चांगलें ॥ २ ॥
उतरलें डाई । उत्तम ते सुलाख ठाई ॥ ३ ॥
हिंडवितां देश । तुका म्हणे नाहीं नाश ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कडविड-किडूकमिडूक, डाई-अग्नीत डाग दिल्याने, सुलाख-चांदीसोन्याची शुद्धता पाहाणे.

अर्थ :-काही किडुकमिडूक होते ते एकत्र करून मोडले व त्यापासून सोन्याची एक लगड तयार केली १ यामुळे सुवर्णाच्या नाना अलंकारांची नावे जाऊन जे मुळात सोने होते तेच टिकून राहिले. २ अग्नीत डाग दिल्याने सुवर्णाची शुद्धता पाहून झाली. त्यामुळे कसाला उतरून ते उत्तमच ठरले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या सुवर्णाला अनेक देशांतून नेले तरी त्याचा नाश होणार नाही, त्याची किंमत कमी होणार नाही. ४

३६१३ पढीयंतें मागा पांडुरंगापाशीं । मज दुर्बळासी काय पीडा ॥ १ ॥
याच साटीं दुराविला संवसार । वाढे हे अपार माया तृष्णा ॥ २ ॥
कांहीं करितां कोठे नव्हे समाधान । विचारितां पुण्य तेंचि पाप ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां निश्चळचि भलें । तुज आठविलें पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- पढीयंतें-आवडते ते, विचारितां- विचार करता

अर्थ :- लोकहो, तुम्हांला जे काय आवडते ते या पांडुरंगापाशी मागा ना. यासाठी मला दुर्बळाला का बिनाकारण त्रास देता ? १ तुमच्या लोभाची माया व तृष्णा अपारपणे वाढेल या धास्तीनेच मी सर्व संसाराचा त्याग केला आहे. २ कुठेही, काहीही केले तरी मनाचे समाधान होत नाही. ज्या ज्या पुण्याचा विचार करावा ते ते पापच घडत राहाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, आता निश्चल मनाने तुला आठवले तरच ठीक आहे. ४

३६१४ नव्हे मी शाहाणा । तरी म्हणा नारायणा ॥ १ ॥
तुम्हां बोलवाया कांहीं । येंच भरलोसे वाहीं ॥ २ ॥
आणावेति रूपा । कोपलेती तरी कोपा ॥ ३ ॥
कळोनि आवडी । तुका म्हणे जाते घडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वाहीं-भरीस, घडी-घटका.

अर्थ :-नारायणा, मी काही शहाणा नाही. पण तुम्हाला तसे म्हणायचे असेल तर म्हणा. १ तुमच्या-बरोबर काही तरी बोलावे म्हणूनच मी या भरीस पडलो आहे. २ अशा प्रकारे बोलूनच तुम्हांला अरूपाच्या अवस्थे-मधून या रूपाला आणले आहे. मग तुम्ही आमच्यावर रागवाल तर खुशाल रागवा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आमची आवड तुम्हाला समजत असूनही घटकेने घटका मात्र व्यर्थ जात आहे. ४

[1] पहिलें.

३६१५ आम्ही भाविके हे काय जाणो खोडी । आइकोनि प्रौढी विनविले ॥ १ ॥
नाहीं ऐसे येथें जालेती असता । वाढविली चिंता अधिक सोसे ॥ २ ॥
न कळेचि आधीं करिता विचार । न धरिता धीर आहाचता[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे आता वचनें वचन । वाढले तीक्षण बुद्धि जाली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा — आहाचता–व्यथ

अर्थ – देवा, ही असली तुमची खोड आम्ही भाविक काय जाणणार ? केवळ तुमची प्रौढी ऐकून आम्ही ही विनती करीत आहोत १ या ठिकाणी तुम्ही असून नसल्यासारखे झाले आहात आमच्या मनातील हाव अधिक वाढलेली असल्यामुळे चिंता मात्र लागलेली आहे २ तुम्हास आधी विचार करून हे कळले नाही काय ? आम्ही धीर न धरल्यामुळे व्यथ वाईटपणा मात्र आमच्याकडे येतो ३ तुकाराम महाराज म्हणतात आता बोलण्याने बोलणे वाढते आणि त्या योगे आमची बुद्धी मात्र तीव्र होते ४

३६१६ कोठें देवा बोलो । तुम्हा भीड घालू गेलो ॥ १ ॥
करावया सत्वहाणी । भाडवलाची टाचणी ॥ २ ॥
दुर्बळा मागता । त्याच्या प्रवर्तला घाता ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं । मज कळले ऐसे काहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – टाचणी–तूट, तोटा

अर्थ – देवा तुमच्याशी बोलून, तुम्हाला भीड घालण्यासाठी मी कुठून प्रवृत्त झालो असे झाले आहे १ तुमच्या जवळील कृपेच्या भाडवलास तूट आली म्हणून तुमच्या सत्वाची हानी करण्यास मी आलो आहे २ एखादे दुबळे मनुष्य पाहिले की तुम्ही त्याचा घात करायला पाहाता ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या जवळ आता काहीही नाही हे मला समजून आले आहे ४

३६१७ काय त्या दिवस उचिताचा आला । मागील जो केला श्रम होता ॥ १ ॥
ठवियेला[2] पूर्ण करूनि संकेत । तयापाशीं चित्त लागले से ॥ २ ॥
जाणसी गे माते लेकराचे लाड । नये पडो आड निष्ठुरता ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हीं करावे वचन । तुम्हासी जतन करणे ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – संकेत–निश्चय

अर्थ – देवा, आम्ही मागे जे परिश्रम केले होते त्याच्या उचित अशा फलिताचा लाभ मला झाला असा दिवस मी पाहिला १ जो संकेत मी मनाशी करून ठविला होता त्याच्या भोवतीच माझे चित्त जडून राहिले आहे २ माते विठाबाई लेकराचे लाड करण्याचे तू चांगलेच जाणतेस त्यामध्ये आता निष्ठुरता येऊ देऊ नकोस ३ तुकाराम महाराज म्हणतात आम्ही जे जे वचन बोलावे त्या त्याप्रमाणे तुम्ही आमचे रक्षण करावे ४

३६१८ पडिला प्रसंग का मी ऐसा नेणे । संकल्प ते मनें जिरवले ॥ १ ॥
चेष्टाविले तरी सांगावे कारण । भक्तो ते[3] उजवण करावया ॥ २ ॥
लावूनिया दृष्टि घेतली सामोरी । बैसले जिव्हारीं डसोन ते ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवा लाविला तो चाळा । करावे गोपाळा शीघ्र दान ॥ ४ ॥

१ अधीरता, २ ठेवियला खूण करूनि, ३ तें जीवन करावया

शब्दार्थ व टीपा .-उजवण-साफल्य, समाधान

अर्थ – देवा, जो प्रसंग आला आहे तो काय मी जाणीत नाही ? म्हणून तर मी माझ्या मनाचे सर्व संकल्प नाहीसे केले १ तुम्ही उगाच माझ्या जीवनास का वरे चेष्टावले आहे ? या जीवनाची भवती हीच समाधानाची अवस्था तुम्ही करावी २ मी माझी दृष्टी या श्रीहरीसमोर एकसारखी लावलेली आहे त्यामुळे त्याचेच नाम माझ्या जिभेस चिकटून राहिले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझ्या जीवास तुमचा छंद लागेल असे कृपेचे दान तुम्ही त्वरेने मला द्या ना ४

३६१९ मागील विसर होईल सकळ । केली तळमळ दुःखाची ते ॥ १ ॥
दोहींचे अहिक्य घालीं गडसर्दी । स्थिरावेल बुद्धि पायापाशीं ॥ २ ॥
अहाच या केली देहपरिचारें । तुमचें तें खरें वाटो नये ॥ ३ ॥
तुका म्हणे व्हावे लवकरी उदार । मी आहें सादर प्रतिग्रहासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अहिक्य–ऐक्य, गडसर्दी–सोईस्कर जागेत, अहाच–उगाच, व्यर्थ, प्रतिग्रहासी–स्वीकारण्यासाठी

अर्थ – देवा, पूर्वीच्या दुःखाची तळमळ दूर होऊन आता मागील सर्व दुःखाचा विसर पडेल १ जीव व शिव, आत्मा व परमात्मा यांचे ऐक्य तू सोइस्कर अशा जागेत ठेवून दे. कारण माझी बुद्धी आता त्या ठिकाणी स्थिरावणार आहे २ मी या देहाची सेवा फार केल्यामुळे व्यर्थच होत आहे देवा, तुमचाही खरेपणा मला वाटत नव्हता ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा तुम्ही आता लौकर उदार व्हा तुमच्या कृपेचे दान स्वीकारण्यासाठी मी आदराने उत्सुक झालो आहे ४

३६२० वाढवावा पुढें आणीक प्रकार । एकचि तें फार रुचि नेदी ॥ १ ॥
निच[1] नवे लेणे देह हा पवाडा । पालट रोकडा बरावरी ॥ २ ॥
दिसे शोभिवंत सेवेनें सेवक । स्वामीची ते लोकत्रयीं कीर्ति ॥ ३ ॥
तुका म्हणे आजी पाववा संतोष । करूनि कीर्तिघोष नाचईन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निच–नित्य नेहमी, पवाडा–हौस.

अर्थ – देवा. असेच प्रकार आणखी पुढे वाढवावेत. कारण एकाच प्रकारचे सेवन काही चांगली रुची देत नाही १ रोज नित्य नवे अलंकार घालावेत ही देहाची हौस असते वरचेवर पालट करून शृंगार केलेला त्याला आवडतो २ देवा तुमची सेवा केल्यानेच सेवक हे शोभून दिसतात आणि त्यामुळे स्वामीची कीर्ती त्रैलोक्यात गाजून राहाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आज तुम्ही मला संतोष द्यावा म्हणजे मी मनोभावे नृत्य करून तुमच्या नामाचा कीर्तिघोष करीन ४

३६२१ क्षोभ आणि कृपा मातेची समान । विभाग जतन करूनि ठेवी ॥ १ ॥
क्षणभंगुर ते उपजली चिंता । खरी असडता आवडीची ॥ २ ॥
सिक्षू जाणे ते गोमाटियासाटीं । लोभें नाहीं तुटी निश्चयेंसी ॥ ३ ॥
अवघेंचि मिथ्या समया आरतें । देता तो उचितें काळ जाणे ॥ ४ ॥
न करी वेव्हार नेदी गाजू कोणा । मेंडसाची तान्हें हाऊ आला ॥ ५ ॥
तुका म्हणे करी जिवाची जतन । दचकूनि मन जवळी आणी ॥ ६ ॥

[1] नीच

शब्दार्थ व टीपा :– क्षोम–राग, आवडीची–प्रेमाची, आरतें–टाळते, गोमटियासाठीं–चांगले व्हावे म्हणून, हाऊ–वाऊ

अर्थ :– मातेचा मुलाविषयी राग व लोभ हे दोनही सारखेच असतात याचा वाटा ती योग्य त्या प्रमाणात जतन करून ठेवते १ क्षणभर पोर ऐकेनासे झाले की तिच्या मनात त्याच्याविषयी चिंता निर्माण होते तरी तिच्या प्रेमाची अलडता खरीच असते ती कधीही भग पावत नाही. २ मुलाचे चांगले व्हावे म्हणून ही शिकवत असते. कितीही लोभ त्याच्याविषयी असला तरी याविषयाच्या निश्चयापासून ती कधी ढळत नाही ३ जे समय अयोग्य वाटतात, मिथ्या वाटतात, ते ती टाळते आणि उचित काळ येताच ती तो जाणते ४ अशी ही माता इतर कुठला व्यवहार करून दुसऱ्यास कधी गाजत नाही, की मुलास कुणी गाजलेले तिला खपत नाही मूल हट्ट करू लागले तर ती 'हा पाहा वाऊ आला' म्हणून भीती दाखविते ५ तुकाराम महाराज म्हणतात, ती आपल्या मुलाचे जतन जीवेभावे करते आणि ते जर कुठे दूर गेले तर ती दचकते व त्याला पुन आपल्याजवळ आणते ६

३६२२ संसाराचे धांवे वेठी । आवडी पोटीं केवढी ॥ १ ॥
हागो जाता दगड साची । अतरीं ही संकल्प ॥ २ ॥
लाज तेवढी नारायणीं । वाकडी वाणी पोरापें ॥ ३ ॥
तुका म्हणे बेशरमा । श्रमावरी[1] पडिभरू ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेठी–त्वरेने, सांची–साठविता, पोरापें–पोरासाठी, पडिभरू–अधिकपणा, अधिकाधिक.

अर्थ :– या माणसास ससाराची धाव मोठ्या त्वरेने असते याविषयी ही आवड त्याच्या पोटात उपजतच असते. १ हागायला बसला तरी ससारास उपयोगी पडतील म्हणून हा दगड साठवितो. त्या विषयी नाना प्रकारचे सकल्प मनाशी करतो २ नारायणाचे नाव घेताना मात्र याला भारी लाज वाटते परतु पोराना हाक मारताना मात्र कौतुकाने तोंड वाकडे करून बोलावतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या बेशरम माणसाचा सारा भार अधिकाधिक अशा परिश्रमावरच असतो ४

३६२३ मी त्यासी अनन्य तीं कोणा असती । ऐसे तव चित्तीं विचारावे ॥ १ ॥
आहे तो विचार आपणयापाशीं । कळा बिंबाऐसीं प्रतिबिंबीं ॥ २ ॥
शुभ शकून तो शुभ लाभें फळे । पुढील ते कळे अनुभवे ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा असेल आठव । तैसा माझा भाव तुझ्या पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारावे–विचार करावा, कळा–तेज.

अर्थ :– मी जर त्याच्या ठिकाणी एवढा अनन्य आहे तर मग ते कुणाविषयी असतील ? यासबधी चित्तात काही विचार करावा १ बिंबाचे तेज जसे प्रतिबिंबात असते त्याप्रमाणे जो काही सर्व विचार आहे तो आपला आपणापाशीच असतो २ शुभ शकुन हा शुभकाळीच फलद्रूप होत असतो आणि पुढे जे काय आहे ते अनुभवानेच समजून यायचे असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझा जसा भाव देवा, तुझ्यापाशी असेल त्याचप्रमाणे तुझाही माझ्या ठिकाणी असणार ४

३६२४ बहु कृपावते माझीं मायबापें । मी माझ्या संकल्पें अंतरलों[2] ॥ १ ॥
सचिताने नाहीं चुको दिली वाट । लाविले अदृष्ट मजसवे ॥ २ ॥
आतां मी रुसतो न कळता वर्म । परी ठावे धर्म सर्व देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे उभा राहिला न बैसे । आमची माय असे उद्वेग त्या ॥ ४ ॥

१ वरा श्रमा, २ अवतरलो

शब्दार्थ व टीपा – माय–माया उद्वेग–उद्याग

*अर्थ* – माझे आईबाप हे फारच कृपावंत आहेत पण माझ्या विविध संकल्पामुळे त्यांच्यात व माझ्यात अंतर पडले १ परंतु माझ्या प्रारब्धकर्मानेे माझी वाट कधीच चुकू दिली नाही ते अदृष्ट असले तरी माझ्या बरोबर एकसारखे आहे २ हे वर्म न समजल्यामुळें मी देवावर विनाकारण रुसतो माझ्या मनाचे हे सारे धर्म हा देव जाणतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव आमचा उद्धार करण्यासाठी उभाच आहे तो कधी खाली बसतच नाही आमची माया त्याला असल्यामुळे आमचा उद्धार करण्याचा त्याचा एक उद्योगच आहे ४

३६२५ कैसीं दिसो बरीं । आम्ही आळविता हरि ॥ १ ॥
नाहीं सोग अळंकार । दास जाला सवसार ॥ २ ॥
दु ख आम्हा नाहीं चिंता । हरिचे दास म्हणविता ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । ऐसीं जालो करिता सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सवसार–लौकिक ससार

*अर्थ* – श्रीहरी, आम्ही तुला आळवीत असताना किती बरे दिसत आहोत १ नाना प्रकारचे अलकार अंगावर घालून सोंग सपादन करण्याची जरूरीच नाही सबंध लौकिक ससार आमचा दास बनला आहे २ या श्रीहरीचे दास म्हणवून घेत असताना आम्हाला कसलेच दु ख नाही की कसली चिंता नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, तुमची सेवा करता करता आम्ही आता या अवस्थेला आलो आहोत ४

३६२६ आता साडूं तरी हातीं ना पदरीं । सर्वां सहोदरीं मोकळिलो ॥ १ ॥
जनाचारामध्यें उडाला पातेरा । जालो निलाजिरा म्हणऊनि ॥ २ ॥
कोणाचिया दारा जावेनासे जाले । म्याच विटंबिले आपणासी ॥ ३ ॥
कोण जाल माझे बुद्धीसी सचार । नाहीं कोठें थार ऐसे जाले ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज भक्त जाले फार । म्हणोनिया थार नाहीं येथें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – साडू–सोडावे, सहोदरीं–बधूनी, मोकळिलो–सोडून दिले, पातेरा–पत, वोज, थार–आश्रय

*अर्थ* – आताच या श्रीहरीस सोडावे तर हातात व पदरात काहीच पडणार नाही आणि इकडे ससारातील बधूनी व इष्टमित्रानीही मला सोडून दिले आहे १ लोकात असलेली माझी पतही नाहीशी झाली आहे कारण मी अगदीच निलाजरा बनलो आहे २ आता कुणाच्याही दारात जाऊ नये असे झाले आहे, कारण यापायी माझी विटबना मीच एप केली आहे ३ माझ्या बुद्धीच्या ठिकाणी हा पाहा कसा सचार झाला आहे, त्यामुळे मला कुठेच आश्रय नाही असे झाले आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात देवा, तुला पुष्कळच भक्त झाले असल्यामुळे मला तुझ्या पायाशी आश्रय मिळत नाही. ५

३६२७ जेथें जातो तेथें पडतो मतोळा । न देखिजे डोळा लाभ काहीं ॥ १ ॥
कपाळीची रेखा असती उत्तम । तरि का हा श्रम पावतो मी ॥ २ ॥
नव्हेंचि तुम्हास माझा अगीकार । योता सवसार अतरला ॥ ३ ॥
भोग तय जाला ऐरा भोगावया तो । माझ्वल नेतो आयुष्य काळ ॥ ४ ॥
कोठें तुझी कीर्ती आइकिली देवा । मुकलों का जीवा तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मतोळा–घोटाळा, नुकसानी, थोता–व्यर्थ

अर्थ :– जेथे जावे तेथे घोटाळाच होत आहे नुकसानी येत आहे. डोळ्याना काही लाभ झालेलाच दिसत नाही १ माझे नशीब जर चांगले असते तर मग असे हे श्रम तरी का झाले असते मला ? २ देवा माझा अंगीकार तर तुम्ही करीत नाहीच, आणि इकडे संसारही व्यर्थ अंतरून गेला ३ भोग तेवढा भोगायला खरा झाला त्यामुळे आयुष्याचे भांडवल काळ हिरावून नेत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, तू कृपाळू आहेस अशी तुझी कीर्ती कुठे ऐकली कुणास माहीत ? ती जर खरी असती तर मी माझ्या जीवास असे का बरे मुकलो असतो ? ५

३६२८ कां जी आम्हां होते दोषाचें दर्शन । तुज समर्पून देहभाव ॥ १ ॥
पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरसील सत्ता सकळ ही ॥ २ ॥
कां जी आम्हांवरि आणिकाची सत्ता । तुम्हांसी असतां जवळिके ॥ ३ ॥
तुका म्हणे पायीं केलें निवेदन । उचित तें दान करीं सत्ता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आणिकाची–इतराची.

अर्थ :– देवा, तुला मी माझा सर्व देहभाव समर्पण केला असतानासुद्धा आम्हाला हे असे दोषाचे दर्शन का बरे होत आहे ? १ अहो पांडुरंगा, तुम्ही कृपाळू व दयावंत आहात सर्व सत्ता तुम्हीच धारण केलेली आहे २ देवा, तुम्ही अशा प्रकारे आमच्याजवळ असतानाही आमच्यावर इतराची सत्ता काय म्हणून आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे निवेदन मी तुमच्या पायाशी केले आहे तुम्ही आपल्या सत्तेने जे उचित असेल ते दान द्यावे ४

३६२९ निंदावें हें जग । ऐसा भागा आला भाग ॥ १ ॥
होतें तैसें आलें फळ । गेले निवडूनि सकळ ॥ २ ॥
दुसऱ्याच्या मता । मिळेनासें जालें चित्ता ॥ ३ ॥
तुका जाला साडा । विटंबिती पोरें राडा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भागा–वाटयास, भाग–वाटा, साडा–उनाड, नीच, टाकाऊ

अर्थ :– या जगाची निंदाच करावी असा वाटा माझ्या वाट्यास आला आहे १ जे जसे फळ होते ते तसे आमच्या वाट्यास आले आहे त्याशिवाय इतर सर्वांची निवड झाली आहे २ दुसऱ्याच्या मतास आमच्या चित्ताचे मत न मिळणारे झाले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा मी सर्वत्र टाकाऊ झालो असल्याने सर्व राडा–पोरे माझी एकसारखी विटंबना करतात ४

३६३० माझे माथां तुझा हात । तुझे पायीं माझें चित्त ॥ १ ॥
ऐसी पडियेली गांठी । शरीरसंबंधाची मिठी ॥ २ ॥
येरयेरांपाशीं । सांपडोन गेलों ऐसीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सेवा । माझी कृपा तुझी देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गांठी–गाठ, भेट येरयेरांपाशीं–एकमेकाशी

अर्थ – देवा, माझ्या मस्तकावर तुम्ही हात ठेवला आहे आणि माझे चित्त तुमच्या पायावर पडून राहिले आहे १ याप्रमाणे उभयताची गाठ भेट झाली असून दोघाचा शरीरसंबंधच जडून गेला आहे २ अशा प्रकारे आपण एकमेकाच्या मिठीत सापडून गेलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तुमची सेवा करावी व तुम्ही माझ्यावर कृपा करावी असे उभयताचे कर्तव्य आहे. ४

विवरण :– तुकोबाच्या अनेक अभंगात परमेश्वराच्या भेटीचा साक्षात्कार झाल्याचे उल्लेख येतात. श्रीहरीशी तुकोबा किती जवळून भेटतात याचे उत्तम उदाहरण म्हणजे हा अभंग होय समारताप, वैराग्य, नामसंकीर्तनाचे साधन, संताची संगत, चित्तशुद्धी इत्यादी मार्गांनी प्रवास करताना तुकोबाना 'नित्य नवा दीस जागृतीचा' वाटे. या जागृतीमुळे त्याना श्रीहरीची सतत ओढ राही श्रीविठ्ठलाने आपणास भेटावे, त्याने आपणावर कृपा करावी, त्याने आपला उद्धार करावा, त्याने आपणास जवळ करावे, दर्शन द्यावे म्हणून तुकोबानी आर्त वाणीने पांडुरंगास अनेकदा आळविले आहे कधी ते त्याच्यावर प्रेमाने रुसले आहेत, कधी त्याच्याशी भांडले आहेत, कधी त्यानी त्याचे उणे काढले आहे कधी क्षमा मागितली आहे. पांडुरंगाच्या भेटीसाठी बुवाच्या मनाची आर्तता, तळमळ, तगमग याचे साक्षात दर्शन त्याच्या विविध अभंगातून अनेकदा झाले आहे आणि या तळमळीच्या, तीव्रतेच्या आवेगानंतर मध्येच कधी त्याच्या जीवितात पांडुरंगाच्या कृपेच्या सोन्याची तार झळकून जाते. त्याना विठ्ठलाचे दर्शन होते, डोळे भरून ते त्याला पाहातात, हृदयात साठवून घेतात त्याच्याशी हितगुज करतात. त्याच्याशी त्याचा अंगसंग जडतो. तृप्त होईपर्यन्त उभयताचे आलिंगन घडते. त्याच्या मस्तकावर विठ्ठलाचा हात येतो आणि विठ्ठलाच्या पायावर त्याचे मस्तक लवते, शरीरसंबंधाची मिठी पडते अशा प्रकारचा अनुभव तुकोबाना अनेकदा आलेला दिसतो. 'आलिंगन कंठाकंठी । पडे मिठी सर्वांगें' अशी अवस्था झाल्यानंतर 'नारायणा संभोगी' या स्थितीपर्यंत ते येतात आणखीही काही तपशील देताना ते म्हणतात, 'वचनासी वचन मिळे । रिघती डोळे डोळियात' असा शरीरनिष्ठ अनुभव आल्यानंतर होणाऱ्या आनंदाचे वा सौख्याचे काय वर्णन करावे ? 'रूपीं जडले लोचन । पायीं स्थिरावलें मन । देहभाव हरपला । तुज पाहता विठ्ठला' अनुभूतीत देहाच्या सुखदुःखाचीही शुद्ध उरत नाही 'होतां दृष्टादृष्टी । ताप गेला उठाउठी ॥' हा लाभ अवर्णनीय नव्हे काय ?

३६३१ सत्य त्यागाचि समान । नलगे वेचावें वचन ॥ १ ॥
नारायणा ऐसे दास । येरयेरांचीच आस ॥ २ ॥
मळ नाहीं चित्ता । तेथें देवाचीच सत्ता ॥ ३ ॥
तुका म्हणे जाण । तेंच भल्याचें वचन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आस–आशा.

अर्थ .– खरेपणाची वागणूक ही त्यागाप्रमाणेच असते. त्यासाठी दुसरे वचन खर्च करण्याची जरूरी नसते. १ एकदा नारायणासारख्याचे दास झाल्यावर एकमेकांविषयी आशा निर्माण होते २ ज्याचे चित्त निर्मळ असते त्याच्याच ठिकाणी देवाची सत्ता असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे वचन पूर्वी अनेक भल्या लोकानी सांगितले आहे असे तू जाण. ४

३६३२ माझिये बुद्धीचा खुंटला उपाय । करिसील काय पाहेन तें ॥ १ ॥
सूत्रधारी तूं हें सकळचाळिता । कासया अनंता भार वाहों ॥ २ ॥
वाहिले संकल्प न पवती सिद्धी । येऊ देहबुद्धीवरि नयें ॥ ३ ॥
तुका म्हणे दुःखी करिती तरंग । चिंतूं पांडुरंग आवरून ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उपाव–उपाय, कासया–काय म्हणून.

अर्थ .– देवा, तुझ्या प्राप्तीसंबंधी माझ्या बुद्धीचे आता सर्व उपाय खुटून गेले आहेत आता तूच काय करशील त्याची वाट मी पाहात आहे. १ अनंता, सर्व जगास चालना देणारा असा तूच सूत्रधार असताना मी माझ्या शिरावर हा भार कशासाठी वाहू ? २ जे काही संकल्प मनाशी करावेत ते काही सिद्धीस जात नाहीत. यासाठी देहबुद्धीवर न यावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात माझ्या चित्तात दुःखाचे अनेक विचारतरंग आहेत, ते सर्व आवरून पांडुरंगाचे चिंतन करू. ४

३६३३ देखिले तें धरिन[1] मनें । समाधानें राहेन ॥ १ ॥
भाव माझी साटवण । जगजीवन कळावया ॥ २ ॥
बोळवीन एकसरें । उत्तरें या करुणेच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे नयो रूपा । काय बापा करीसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साटवण–साठवण करण्याचे पात्र, एकसरें–एकसारखे

अर्थ – देवाचे जे रूप पाहिले आहे तेच मी माझ्या मनात धरून ठेवीन आणि मोठ्या समाधानाने राहीन १ जगाचे जीवन असणारा हा श्रीहरी समजून येण्यासाठी साठवण्यासाठी माझ्या भक्तिभावाचे मी पात्र करीन २ मी त्याला एकसारखे करुणेच्या स्वराने आळवीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, बापा, या माझ्या करण्याने तू रूपाला व आकाराला न येशील तर काय करशील ? ४

३६३४ वाया जाय ऐसा । आता उगवावा फासा ॥ १ ॥
माझें परिसावें गाऱ्हाणें । सुखदु खाचीं वचनें ॥ २ ॥
हाचि आम्हा ठाव । पायीं[2] निरोपाया भाव ॥ ३ ॥
तुका म्हणे जार । तुझा तुज देवा भार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उगवावा–सोडवावा परिसावें–ऐकावे, ठाव–स्थान ठिकाण जार–गर्भवेष्टन

अर्थ – देवा, मी सर्व बाजनी वाया जात आहे असा जो फासा आहे तो तुम्ही सोडवावा १ सुखदु खा सबंधीचे माझे गाऱ्हाणे तुम्ही नीट ऐकावे २ आमच्या मनातील भाव आम्ही आपल्या पायी निवेदन करावा एवढेच एक आम्हास स्थान आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देहास तूच जन्म दिलेला असल्यामुळे त्याचा भार तुझ्यावरच आहे ४

३६३५ खादलेंच खावें वाटे । भेटलें भेटे आवडी ॥ १ ॥
वीट नाहीं पांडुरंगीं । वाढ अंगीं आर्त तें ॥ २ ॥
इंद्रियांची[3] हाव पुरे । परि हे उरे चिंतन ॥ ३ ॥
तुका म्हणे पोट भरे । परि ते उरे भूक पुढें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –खादलेंच–खाल्लेलच, आर्त–तीव्र इच्छा

अर्थ – खाल्लेलेच पदार्थ पुन पुन खावेसे वाटतात आणि आवडीच्या माणसास पुन पुन भेटावेसे वाटते १ पांडुरंगाच्या ठिकाणी कधीच वीट येत नाही म्हणून त्याच्याच दर्शनाची तीव्र इच्छा मनात सतत वाढते २ त्याच्याविषयीची इंद्रियांची हाव पूर्ण होते आणि त्याच्या प्रीतीचेच चिंतन मनात उरते ३ तुकाराम महाराज म्हणतात याच्यापुढे पोट भरले तरी त्याच्या विषयीची भूकही मनात उरलेली राहाते ४

३६३६ सत्य आठवितां देव । जातो भेंव पळोनि ॥ १ ॥
न लगे कांहीं करणें चिंता । धरी सत्ता सर्व तो ॥ २ ॥
भावें भाव राहे पायीं । देव तें सन्निध ॥ ३ ॥
तुका म्हणे कृष्णनामें । शीतळ प्रेम सर्वांसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भेंव–भीती,

१ धरी, २ काही, ३ हृदयीची

अर्थ :– खरोखर देवाची आठवण केली तर सर्व प्रकारची भीती नाहीशी होते. १ मग कसलीही चिंता करावी लागत नाही. कारण सर्वत्र त्याचीच सत्ता वावरत असते. २ एकनिष्ठपणे ज्याचा भाव देवाच्या पायांशी असतो त्याच्या ठिकाणीच देव राहात असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीकृष्णाचे नाम एकदा उच्चारले की सर्वांना त्याचे शीतळ प्रेम लाभते. ४

३६३७ ब्रीद ज्याचें जगदानी । तोचि मनीं स्मरावा ॥ १ ॥
सम पाय कर कटी । उभा तटीं भींवरेच्या ॥ २ ॥
पाहिलिया वेध लावी । बैसे जीवीं जडोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे भक्तिकाजा । धांवे लाजा लवलाहें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जगदानी–जगास दान देणे, लवलाहें–लौकर, सत्वर

अर्थ :– जगास दान देणे हेच ज्याचे जीवन आहे, ब्रीद आहे त्याचे स्मरण चित्तात करावे. १ असा हा श्रीहरी भिवरेच्या तीरावर सम चरणे ठेवून व कटीवर हात धरून उभा राहिलेला आहे. २ याला पाहिले असता याचा वेध अंतःकरणास लागतो, जीवाच्या ठिकाणी जडून राहातो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या भक्ताचे काम साधण्यासाठी हा श्रीहरी लाजेने सत्वर धावत येतो. ४

३६३८ माझिया मनाची[1] बैसली आवडी । अवसान घडी एकी नेघे ॥ १ ॥
पाय चित्तीं रूप डोळांच राहिलें[2] । चिंतनें गोविलें मुख सदा ॥ २ ॥
अवघियांचा जाला विसर हा मागें । वेध हा श्रीरंगें लावियेला ॥ ३ ॥
तुका म्हणे कानीं आइकली मात । तोचि जाला घात जीवपणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अवसान–विसावा, घडी–क्षण, नेघे–घेत नाही, गोविले–गुतविले, मात–हकीगत, गोष्ट

अर्थ :– माझ्या मनाची आवड या श्रीहरीच्या रूपावर जडून राहिली आहे. त्याच्यावाचून एक क्षणभरही त्याला कधी विसावा लाभत नाही. १ त्याचे पाय माझ्या चित्तात व रूप डोळ्यांत भरून राहिले आहे. माझ्या मुखात त्याच्याच नामाचे चिंतन सतत गुंतून राहिले आहे. २ या श्रीरंगाने माझ्या मनास हा असा वेध लावलेला असल्याने मागच्या सर्व दुःखांचा विसर पडलेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्या नावाची हकीगत मी ज्यावेळी कानांनी ऐकली तेव्हाच माझ्या जीवाचा जीवपणा नाहीसा झाला. ४

३६३९ याची कोठें लागली चट । बहु तट जालेंसे ॥ १ ॥
देवपिसीं देवपिसीं । मजऐसीं जग म्हणे ॥ २ ॥
एकांताचें बाहेर आलें । लपविलें झांकेना ॥ ३ ॥
तुका म्हणे याचे भेटी । जाली तुटी आपल्यांसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तट–तट, बोभाटा.

अर्थ :– याला देवाची चटक कुठून लागली ? असा माझा बोभाटा या लोकात फारच झालेला आहे १ हा मोठा देव वेडा आहे असे जग म्हणू लागले. २ हा देव मला एकांतात भेटला होता, पण तो आता प्रकट होऊन बाहेर आला आहे. तो लपविता लपला जाणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यावेळी या श्रीहरीची भेट झाली तेव्हाच आपलेपणाचा भाव नाहीसा झाला. ४

१ मनाशी, २ बैसले.

३६४० दीन आणि दुर्बळासी । सुखरासी हरिकथा ॥ १ ॥
तारू भवसागरींचें । उचनीच अधिकार ॥ २ ॥
चरित्र तें उच्चारावें । केलें देवें गोकुळीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आवडी धरीं । कृपा करी म्हणऊनी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तारू–नाव

अर्थ – जे कुणी दीन व दुर्बळ आहेत त्याना हरिकथा म्हणजे सुखाची रासच होय १ श्रीहरीचे नाम ही ससारसागर तरून जाण्याची नावच जणू आहे यावर बसून जाण्याचा तरण्याचा अधिकार उच्च, नीच सर्वांना सारखाच आहे २ या श्रीकृष्णाने गोकुळात ज्या क्रीडा करून चरित्र निर्माण केले त्याचेच गुणगान नेहमी करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्यासबधीची आवड आपल्या मनात निर्माण झाली की तो श्रीहरी आपल्यावर कृपा करतो ४

३६४१ सतोषे माउली आरुषा वचनीं । वोरसोनि स्तनीं लावी बाळा ॥ १ ॥
तैसे प्रेमळाचे[1] अवघेंचि गोड । पुरवितो कोड पाडुरग ॥ २ ॥
सेवा करी साहे निष्ठुर उत्तरें । त्याचे वाहे बरें तेच मनी ॥ ३ ॥
तुका म्हणे इच्छावसे खेळ खेळे । चिता ते सकळ काहीं नेणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आरुषा–बोबडचा वोरसोनि–हृपभरित स्नहभरीत होऊन, कोड–इच्छा, साहे–सहन करत, इच्छावसे–इच्छेप्रमाणे

अर्थ – आपल्या मुलाच्या बोबडचा वचनानी आई सतुष्ट होते स्नेहभरीत होऊन ती त्याला जवळ घेऊन स्तनपान देते १ याप्रमाणे प्रेमळ माणसाचे सर्वच गोड असल्याने हा पाडुरग त्याच्या सर्व इच्छा पूर्ण करतो २ बालकाचे कठोर भाषण ऐकूनही त्याची आई त्याची सेवाच करते त्याला सर्वतोपरी साहच करते त्याच्याविषयी सर्व प्रकारचे बरे चिंतन मनात करीत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे बालक आपल्या इच्छेप्रमाणे खेळ खेळत असते त्याला कोणत्याही प्रकारची चिंता करावी लागत नाही ४

३६४२ विनवीजे ऐसे काहीं । उरले नाहीं यावरि ॥ १ ॥
आता असो पढरीनाथा । पायीं माथा तुमचिये ॥ २ ॥
मागें सारियेली युक्ती । काहीं होती जवळी ते ॥ ३ ॥
निराशेची न करी आस । तुका दास माघारी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आस–इच्छा, आशा

अर्थ – देवा आता काही इतक्यानतर तुला विनती करावी असे काही नाही १ पढरीनाथा, आता माझे मस्तक तुमच्या पायावर नम्र झालेले असावे २ तुमची प्राप्ती व्हावी म्हणून माझ्याजवळ ज्या काही युक्त्या होत्या त्या मी पूर्वीच दूर केल्या आहेत, त्याचा उपयोग केला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, जेथे माझी निराशा झालेली आहे त्याची मी कधी आशा पुन धरीत नाही, असा मी तुमचा दास झालो आहे ४

३६४३ आता येथें जाली जीवासवेसाटी । होतें तैसे पोटीं फळ आले ॥ १ ॥
आता धरिले ते न सोडीं चरण । सापडले धन निजठेवा ॥ २ ॥

१ परिमळाचे

आता हा अळस असो परता दुरी । नेदावी ते उरी उरो काहीं ॥ ३ ॥
आता याचा मज न व्हावा विसर । भरोनी अंतर राहो रूप ॥ ४ ॥
आता लोकलाज नयो येथें आड । बहु जाले गोड ब्रह्मरस ॥ ५ ॥
तुका म्हणे आता जन्म हा सफळ । अंतरीं गोपाळ स्थिरावला ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – नेदावी–देऊ नये, उरी–शिल्लक, अंतर–मन, अंतःकरण

अर्थ – देवा, आता मी या ठिकाणी माझा जीव समर्पण केला आहे म्हणूनच मला इष्ट अशा फळाची प्राप्ती झाली आहे १ आता मी तुमचे पाय धरले आहेत ते कधी सोडणार नाही कारण माझ्या निजधनाची ठेव तीच एक आहे २ आता माझ्या मनातील आळस दूर व्हावा, त्याची थोडीही शिलकीची अवस्था उरू देणार नाही ३ आता माझ्या अंतःकरणात तुझेच रूप भरून राहावे त्याचा विसर मला कधीही पडू नये ४ अतिशय गोड अशा ब्रह्मरसाची प्राप्ती मला झालेली असल्यामुळे येथे लोकलाज आड येऊ नये ५ तुकाराम महाराज म्हणतात माझ्या अंतःकरणात आता या गोपाळाने निवास केला असल्यामुळे माझा हा जन्म सफल झाला आहे ६

३६४४ अनंता[1] जीवाचीं तोडिलीं बंधनें । मज हि येणें काळें कृपा कीजे ॥ १ ॥
अनंत पवाडे तुझे विश्वंभरा । भक्तकरुणाकरा नारायणा ॥ २ ॥
अंतरींचें कळो देई गुह्य गुज । अंतरीं तें बीज राखईन[2] ॥ ३ ॥
समदृष्टी तुझीं पाहेन पाउलें । धरीन सचलें हृदयात ॥ ४ ॥
तेणें या चित्ताची राहेल तळमळ । होतील शीतळ सकळ गात्रें ॥ ५ ॥
तुका म्हणे शांति करील प्रवेश । मग नव्हे नाश अखंड तो ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतरींचें–मनातील सचलें–साठवून ठेवीन

अर्थ – देवा, तुम्ही अनंत जीवांची संसारबंधनें तोडलीत तशीच माझ्यावरही या वेळी कृपा करा ना १ विश्वास भरून राहणाऱ्या देवा भक्तावर कृपा करणाऱ्या नारायणा, अशा प्रकारची तुझी कीर्ती अनंत प्रकारची आहे २ देवा, तुझ्या मनातील गूढ मला समजू दे मग मी ते बीज माझ्याही मनात कायम राखीन ३ तुझी समचरणे मी डोळे भरून पाहीन आणि तीच मी माझ्यात साठवून ठेवीन ४ यामुळे माझ्या चित्ताची तळमळ दूर होईल आणि सर्व शरीर व इंद्रियें शीतल होऊन जातील ५ तुकाराम महाराज म्हणतात, मग माझ्या हृदयात शांततेचा प्रवेश होईल त्यामुळे अखंडत्वाचा नाश कधीच होणार नाही ६

३६४५ पराधीन माझें करूनिया जीणें । साडी काय गुणें केली देवा ॥ १ ॥
उदार हे कीर्ति असे जगामाजी । का तें ऐसें आजि पालटिलें ॥ २ ॥
आळवितो परी न पुरेचि रीग । उचित तो त्याग नाहीं तुम्हा ॥ ३ ॥
तुका म्हणे कां बा मुळींच व्यालासी । ऐसें कां नेणसी पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साडी–हेळसांड, रीग–शिरकाव, प्रवेश

अर्थ –देवा अशा प्रकारे माझे जिणे तुम्ही प्रारब्धाच्या स्वाधीन का हो केले? अशी माझी हेळसांड तुम्ही कोणत्या कारणासाठी केली? १ तुमच्या उदारपणाची कीर्ती सर्व जगामध्ये पसरून राहिली आहे मग ती अशी आज माझ्याच बाबतीत का पालटली आहे? २ देवा, मी तुमच्याजवळ करुणा भाकत असूनही माझा येथे

१ अनंत, २ राखेन मी

शिरकावच होत नाही. माझा अशा प्रकारे त्याग करणे हे तुम्हाला योग्य दिसत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे जर आहे तर मग मला मुळात जन्मच का हो दिलात? असे तुम्ही पूर्वी काय जाणीत नव्हता? ४

३६४६ नेणपणे नाहीं केला हा बोभाट । आता आलो वाट कळो खरी ॥ १ ॥
आता बहु शीघ्र यावे लवकरी । वाट पाहे हरी भेटी देई ॥ २ ॥
समर्थाच्या बाळा करुणेचे भाषण । तरी त्याची कोण नादणूक ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु बोलिले बडिवार । पडिले अंतर लौकिकीं ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –नेणपणे–अज्ञानाने, बडिवार–कीर्ती, लौकिक.

अर्थ –आजपर्यंत अज्ञानामुळे मी तुमची प्रसिद्धी केली नाही पण आता मात्र तुमचा खरा मार्ग मला समजून आला आहे १ श्रीहरी, आता तुम्ही माझ्याकडे त्वरेने धावत यावे. मी तुमची वाट पाहात असल्याने मला भेट द्यावी. २ समर्थ बापाच्या लेकराने करुण वाणीने भाषण करावे तर मग त्याची अशी नादणूक काय उपयोगाची? ३ तुकाराम महाराज म्हणतात, यापूर्वी तुमचा लौकिक पुष्कळानी वर्णन केला आहे पण आज लौकिकाच्या आचारात मात्र फरक पडला आहे ४

३६४७ जें जें केले ते ते साहे । कैसे पाहे भाविक ॥ १ ॥
ओवाळूनि माझी काया । सांडिली यावरूनि ॥ २ ॥
काय होय नव्हे करू । नेणे धरू सत्ता ते ॥ ३ ॥
तुका म्हणे कटीं कर । उभें धीर धरूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साहे–सहन केले, काया–शरीर

अर्थ –आम्ही जे जे काही केले ते ते सर्व या देवाने सहन केले आहे कसे हे मोठे भाविक दैवत आहे पाहा १ मी माझे शरीर याच्यावरून ओवाळून टाकले आहे २ याने केले तर काय होणार नाही? पण तो ही अशी सत्ता धारण करीत नाही इतकेच ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे माझे दैवत कमरेवर हात ठेवून धीर धरून उभे राहिले आहे ४

३६४८ नाहीं मज कृपा केली पांडुरंगें । संताचिया संगें पोट भरीं ॥ १ ॥
चतुराचे सभे पंडित कुशळ । मी काय दुर्बळ विष्णुदास ॥ २ ॥
तुका म्हणे नेणे करूं समाधान । धरिले चरण विठोबाचे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – संगें–संगतीने

अर्थ –या पांडुरंगाने माझ्यावर कृपा केली नाही पण संतांच्या संगतीने मी कसेतरी पोट भरीत आहे १ चतुर लोकांच्या सभेत सर्व पंडित कुशलतेने बोलतात, तेथे मी दुर्बळ विष्णुदास काय करणार? २ तुकाराम महाराज म्हणतात, कुणाचे समाधान करण्याचे मला समजत नाही म्हणून मी या विठोबाचेच चरण धरून राहिलो आहे ३

३६४९ तुम्ही माझा देवा करिजे अंगीकार । हा नाहीं विचार मजपाशीं ॥ १ ॥
आता दोहीं पक्षीं लागले लछन । देवभक्तपण लाजविले ॥ २ ॥
एकांतीं एकले न राहे[1] निश्चळ । न राहेच पळ मन ठायीं ॥ ३ ॥

१ बैसे

पायीं महत्वाची पडिली शृंखळा । बांधविला गळा स्नेहा हातीं ॥ ४ ॥
शरीर सोकले देखिलिया सुखा । कदान्न हे मुखा मान्य नाहीं ॥ ५ ॥
तुका म्हणे जाला अवगुणाचा थारा । वाढली हे निद्रा आळस बहु ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अंगीकार–स्वीकार, थारा–आश्रय

अर्थ.–देवा, तुम्ही माझा स्वीकार कराल हा विचार काही आता माझ्या मनात येत नाही. १ या तुमच्या वृत्तीने देव व भक्त या दोनही पक्षाना लांछन झाले आहे उभयताना लज्जास्पद स्थिती प्राप्त झाली आहे २ चचल असणारे मन हे एकान्तात कधीही निश्चल राहात नाही, एक क्षणभरही ते एका जागी स्थिर राहात नाही. ३ महपणाच्या महत्त्वाची बेडी पायात पडलेली असून इष्टमित्राच्या व नातेवाईकाच्या ममतेत गळा गुतून राहिलेला आहे ४ अनुभवास आलेल्या इंद्रियसुखास शरीर सोकावलेले आहे कदान्नाची रुची मुखाला कधीच मान्य होईनाशी झाली आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, अवगुणाना आश्रय दिलेला असल्यामुळे आळस व निद्रा याचीच वाढ फार झालेली आहे ६

३६५० बोलिलिया गुणीं नाहीं पाविजेन । देवा नाहीं होत हित तेथें ॥ १ ॥
कवतुक तुझें नवल[1] यावरि । घेसील ते शिरीं काय नव्हे ॥ २ ॥
नाहीं मिळो येत सचिताच्या[2] मता । पुराणीं पाहता अघटित ॥ ३ ॥
तुका म्हणे पायीं निरोपिला भाव । न्याल तैसा जाओ सिद्धी देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पाविजेत–प्राप्त होत

अर्थ –देवा, प्रतिपादन केलेल्या गुणांनी तू काही प्राप्त होत नाहीस असे दिसते. म्हणून आता येथे हित होणार नाही १ या बाबतीत तुझे सारेच नवलपूर्ण व कवतुकाचे आहे तू एकदा मनावर घेतल्यावर काय नाही होणार? २ संचित कर्मांच्या मतानेही काही साध्य होत नाही आणि पुराणे पाहू जाता त्यातही सारे काही अघटित वाटते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही सर्व हकीगत तुमच्या पायांशी निवेदन केली आहे. आता यावर तुम्ही जसे सिद्धीस न्याल तसे होत राहील ४

३६५१ हा तों नव्हता दीन । टाळायाचा ऐसा क्षण ॥ १ ॥
का जी नेणों राखा हात । कैसे देखावे रडत ॥ २ ॥
दावूनियां आस । दूर पळविता कास[3] ॥ ३ ॥
तुका म्हणे घांव । घेतां न पुरेचि हाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आस–आशा

अर्थ –देवा, या दीन जीवास टाळण्याची काही ही वेळ नाही. १ तुम्ही असे हात राखून बोलणे का करता हे समजत नाही आम्ही दीन रडत आहोत हे तुमच्याने पाहावते तरी कसे? २ प्रथम आशा दाखवून मग दूर का पळविता? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्याकडे धाव घेण्याविषयीची हाव कधी पूर्णच होत नाही. ४

३६५२ आर्तभूता द्यावे दान । खरें पुण्य त्या नावें ॥ १ ॥
होणार ते सुखें घडो । लाभ जोडो महाबुद्धि ॥ २ ॥
सत्य संकल्पाच साटीं । उजळा पोटीं रविबिंब ॥ ३ ॥
तुका म्हणे मनीं वाव । शुद्ध भाव राखावा ॥ ४ ॥

१ न कळे २ सताचिया, ३ कासास

शब्दार्थ व टीपाः– आर्तभूतां–अतिशय गरज आहे अशा लोकांना.

अर्थः– जे कुणी अतिशय गरजवंत आहे अशा लोकांना दान द्यावे. त्यातच खरे पुण्य आहे. १ यावर जे व्हायचे असेल ते सुखाने घडो. आत्मविषयक महाबुद्धीचा लाभ मग प्राप्त होवो. २ सत्यसंकल्पासाठी विवेकबुद्धीचे सूर्यबिंब हृदयाच्या आकाशात प्रकट व्हावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मनामध्ये शुद्ध भावाचे रक्षण करण्यासाठी भरपूर अवकाश असावा ४

३६५३ कवतुकवाणी बोलतसें लाडें । आरुष वांकडें करुनि मुख ॥ १ ॥
दुजेपणीं भाव नाहीं हे आशंका । जननीबाळकामध्यें भेद ॥ २ ॥
सलगी दुरूनि जवळी पाचारूं । धांवोनियां करूं अंगसंग ॥ ३ ॥
धरूनि पालव मागतों भातुकें । आवडीचें निकें प्रेमसुख ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज आमचीच गोडी । ऐसी हे आवडी कळों आली ॥ ५ ॥

शदार्थ व टीपा – आरुष-बोबडे, पाचारू–बोलाविते, पालव–पदर, भातुकें-प्रेमाचा खाऊ, निकें–खरे, चागले.

अर्थ'–बालक हे आपल्या आईशी कौतुकाने लाडे लाडे वाकडे तोंड करून बोबडया बोलांनी बोलत असते १ आई व तिचे बालक यांत वरवरचा भेद दिसत असला तरी त्यांच्यांत कोणत्याही प्रकारचा दुजाभाव उरत नाही. शंकेसही जागा राहात नाही. २ कधी बालक सलगी करून आपल्या जवळ आईस बोलाविते, तर कधी ते स्वतःच धावत जाऊन आईच्या अंगास लगट करते. ३ आईचा पदर धरून हे बालक तिला प्रेमाचा खाऊ मागते. अत्यंत आवडते व चांगले असे प्रेमसुख ते मागत असते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुला आमचीच गोडी वाटत असते आमच्या आवडीवरुनच हे आम्हास समजून आले आहे ५

३६५४ ऐकें पांडुरंगा वचन माझें एक । जालों मी सेवक दास तुझा ॥ १ ॥
कळे तैसा आतां करावा उद्धार । खुंटला विचार माझा पुढें ॥ २ ॥
दंभ मान माझा करूं पाहे घात । जालिया ही थीत कारणाचा ॥ ३ ॥
हीन बुद्धि माझी अधम हे याती । अहंकार चित्तीं वसो पाहे ॥ ४ ॥
तुका म्हणे मज विघडतां क्षण । न लगे जतन करीं देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपाः –थीत–वाया, व्यर्थ, कारणाचा–कार्याचा.

अर्थ :– पांडुरंगा, मी तुमची सेवा करणारा दास असल्याने माझे एक वचन तुम्ही ऐकावे. १ आता माझा उद्धार तुम्हास कळेल तसा करावा. त्याविषयी माझे सर्व उपाय खुंटून गेले आहेत. २ दंभ, मानापमानाचे विचार हे माझ्या मनाचा घात करू लागले आहेत. यामुळे झालेल्या कार्याचा व्यर्थ नाश होत आहे. ३ माझी जाती अधम व बुद्धी हीन आहे, व चित्तामध्ये अहंकार वसू पाहात आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला विघडायला एक क्षण देखील लागणार नाही. म्हणूनच तुम्ही माझे रक्षण करावे. ५

शब्दार्थ व टीपा :– जनाचारी–लोकव्यवहारात, दारा–बायको.

अर्थ :– देवा, ज्यामुळे माझे चित्त अखंडपणे तुझ्या चरणावर स्थिर होईल असे अविरत प्रेमसुख तू मला द्यावेस. १ ज्यामुळे मी लोकव्यवहारात वाया जाईन असा माझा देहभाव तू दीन करून सोड. २ देवा, द्रव्य, बायको, मानापमानाची आवड यांविषयी मला प्रीती नाही. प्रपंचातील कुणाविषयीही माझ्या मनात प्रीती नाही ३ माझ्या चित्तात फक्त तुझेच नाव असावे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तुझ्या पायांवर डोके ठेवून मी आता उतराई झालो आहे. ५

३६५६ काय सांगों आतां[1] संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥ १ ॥
काय द्यावें त्यांचें[2] व्हावें उतराई । ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥ २ ॥
सहज बोलणे हितउपदेश । करूनि सायास शिकविती ॥ ३ ॥
तुका म्हणे वत्स धेनुवेचा चित्ती । तैसे मज येती सांभाळीत ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सायास–कष्ट, प्रयत्न, धेनुवेच्या–गाईच्या.

अर्थ :– मी आता या संतांचे उपकार तरी तुम्हास किती म्हणून सांगावेत ? मला हे संत निरंतर जागृत ठेवीत असतात. १ त्यांच्या या उपकारातून उतराई होण्यासाठी द्यावे तरी काय आता ? त्यांच्या पायांवर जीव काढून ठेविला तरी थोडेच होईल. २ त्यांचे जे सहज असे बोलणे असते तेच हितकर अशा उपदेशाप्रमाणे राहाते. हे संत मोठेच कष्ट घेऊन शिकवीत असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, गाईच्या चित्तामध्ये ज्याप्रमाणे सतत वत्स असते, त्याप्रमाणे हे संत मला नेहमी सांभाळीत असतात. ४

विवरण – संतांचे उपकार आपणावर किती मोठे असतात याचे अतिशय सोप्या भाषेत तुकोबांनी येथे दर्शन घडविले आहे. हे साधुसंत सहज बोलण्याने सदुपदेश करून आत्मज्ञानाविषयी आपणास सतत जागृत ठेवीत असतात. या त्यांच्या उपकाराची फेड होणे शक्य नाही त्यांच्या पायावर जीव जरी ओवाळून टाकला तरी तो थोडाच होईल. आईपेक्षाही त्यांचे प्रेम तीव्र असते. ज्ञानदेवांनी अशा थोर संतांचे वर्णन करताना म्हटले आहे. 'या या संतांसी भेटतां । हरे संसाराची व्यथा । पुढत पुढती माथा । अखंडित ठेवीत.' या संतांचे देणे त्यांच्या मते 'कल्पतरूहूनि दुणें । परिसापरिस अगाधपणें । चिंतामणी ठेंगणा ' अशा प्रकारचे असते. या संतापेक्षा उदार असे त्रिभुवनातही कुणी दुसरे नाही. यांची थोरवी कोणती ? तर त्यांनी आपल्या भक्तांना ' कृपाकटाक्षें न्याहाळिलें । आपल्या पदीं बैसविलें ।' पूर्वपुण्याई मोठी म्हणूनच आपणास असे संत भेटतात हे ज्ञानदेवांनी स्पष्ट केले आहे. आईबाप, बंधू, सखे, यांच्यापेक्षाही संतांना भेटण्यात मोठेच सुख आहे. ' एक एका तीर्थाहूनि आगळें । ' असणाऱ्या या सत्पुरुषांत ' परब्रह्म सोंवळें ' निवास करून असते ' निर्धनासि धनलाभ झाला । जैसा अचेतनी प्राण प्रकटला ' तशी संतभेटीनें जीवाची स्थिती होत राहते. ' वत्स विघडलिया धेनु भेटली । जैसी कुरंगिणी पाडसा मिनली ' त्याप्रमाणे संतभेटीचा प्रेमानंद असतो. या संतांचा महिमा वर्णन करता ' सीणला हा ब्रह्मा बोलवेना ' असे नामदेवरायांनी म्हटले आहे. याच संतांपुढे आपल्या मनाचे सुखदुःख सांगावे. ' संतांच्या चरणां द्यावें आलिंगन ',' जीवें निंबलोण उतरावें ' असे नामदेवांनी म्हणून ' संतांच्या द्वारींचा द्वारपाळ ' या शब्दांनी जीवास उपदेश केला आहे

कधी कधी संतांना देवापेक्षाही महत्त्व मिळालेले दिसून येते जीवावर सहजासहजी उपकार करून त्यांचे संसारदुःख हलके करण्याचे कार्य संत करीत असतात. म्हणूनच एकनाथांनी म्हटले आहे, ' संत आधीं देव मग ' आधी संतांना शरण जा. ' देव निर्गुण । संत सगुण ' असल्यामुळे त्यांच्या मताने ' जें सुख संत सज्जनांचे पायीं । तें सुखनाहीं आणिके ठाईं ' संतसहवासामुळे वैकुंठही फिके वाटून जाते. ' नवल या सुखाची गोडी । हरिहर ब्रह्मा घालिती उडी ' या संतश्रेष्ठांच्या पायीच आपले सर्वस्व समर्पण करावे. ' संतां द्यावें आलिंगन । सांडुनियां थोरपण ' असा एकनाथांचा उपदेश आहे. तुकोबांनी तर संतांचे व त्यांच्या सहवासाचे मुक्तकंठाने अनेकदा गुणगान केले आहे संत भेटले की, ' वंदीन पाउलें लोळेन चरणीं ' अशी त्यांची स्थिती होऊन जाते. हे साधुसंत भेटले की त्यांना दिवाळी-

१ या. २ त्यासी.

दसऱ्याचा सण सुरू झाल्यासारखे वाटते ' संताच्या पादुका घेईन मोवे खादीं । हातीं टाळ दिंडी नाचेन पुढें ' तुकोबाच्या मनात एकच आशा, इच्छा आहे ' संत मारगीं चालती । त्यांची लागो मज माती ' अशी त्यांची मनीषा आहे हेच आपले जीवलग सोयरे असल्याचे त्यांनी वारवार मागितले आहे या संताच्या गावी प्रेमाचा सुकाळ असतो तळमळ आणि दु ख याचा लवलेशही असत नाही या संताना दूर करून देवपूजा कुणी करू पाहील तर तो अधर्म होईल असे बुवानी म्हटले आहे

३६५७ देव जाणता देव जाणता । आपलीच सत्ता एकाएकी ॥ १ ॥
देव चतुर देव चतुर । जाणोनि अंतर वर्ततसे ॥ २ ॥
देव निराळा देव निराळा । अलिप्त विटाळा तुका म्हणे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतर-मन, अंत करण

अर्थ – हा देव सर्व काही जाणणारा आहे त्याचीच सत्ता सर्वत्र आहे १ हा देव मोठा चतुर आहे तो सर्वांचे अंत करण जाणून वर्तन करीत असतो २ तुकाराम महाराज म्हणतात, देव हा सर्वांपेक्षा निराळा आहे तो कोणत्याही विटाळाने लिप्त होणार नाही ३

३६५८ आपण चाळक बुद्धीच्या संचारा । आम्हांसी वेव्हारा पात्र केलें ॥ १ ॥
काय जाले तरी नेघा तुम्ही भार । आणीक कोणा थोर म्हणों सांगा ॥ २ ॥
पंच भूतें तव चर्माचिया[1] मोटा । येथे खरा खोटा कोण भाव ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं बोलावया जागा । कां देवा वाउगा श्रम करूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नेघा-घेत नाही

अर्थ – देवा, तुम्ही सर्वांच्या बुद्धीत संचार करून चालना देता आणि आम्हाला मात्र व्यवहाराचे निमित्त करण्यास पात्र केले आहे १ तुम्ही काही आमचा भार घेत नाही तुम्हाला झाले आहे तरी काय ? तुमच्याशिवाय मी कुणाला थोर म्हणू ते तरी सांगा ना २ पंचमहाभूतात्मक या देहाची मोट, कातडी असून या ठिकाणी खरे अथवा खोटे हे कसले भाव आहेत ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्हाला बोलायला मला काही जागाच नाही मग मी उगाच व्यर्थ श्रम तरी का करू ? ४

३६५९ एका एक वर्मे लावूनिया अंगीं । ठेवितो प्रसंगीं सांभाळीन ॥ १ ॥
नेधावा[2] जी तुम्ही वाव बहु फार । धरूनि अंतर ठायाठाव ॥ २ ॥
वेव्हारे आले तें समानचि होतें । बळ[3] नाहीं येथें चालो येत ॥ ३ ॥
तुका म्हणे आता निवाडाच साटीं । सवसारें तुटी करूनि ठेलो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नेधावा-होत नाही वाव-व्यर्थ मिथ्या

अर्थ – एका श्रीहरीच्या अंगी सर्व काही लावून ठेवण्याचे एक वर्म मी या प्रसंगी सांभाळून ठेविले आहे १ देवा, आमच्याने व्यर्थ धावपळ आता फार होत नाही म्हणून हृदयातच निग्रह करून ठिकाणाच्या ठिकाणावर राहिलो आहे २ जे नीट व्यवहाराने प्राप्त होते तेच समान व उचित असते त्याविषयी काही कुणाचे बळ चालत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता सव गोष्टींचा निकाल करवून घेण्यासाठीच संसाराचा त्याग करून राहिलो आहे ४

१ कर्माच्या या २ धावा ३ वेळ नाही तेथे चालो येता

३६६० आता येथें खरें । नये फिरता माघारे ॥ १ ॥
होय तैसी हो आबाळी । देहनिमित्य या बळी ॥ २ ॥
तुम्हासवे गाठी । देवा जीवाचिये साटीं ॥ ३ ॥
तुका नव्हे[1] लंड । करूं चौघामध्यें खंड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लंड–अधम, हरामी, खंड–निवाडा, निकाल

*अर्थ – आता खरोखर या ठिकाणाहून आम्हास माघारे फिरता येणार नाही १ यासाठी आम्ही आमच्या* देहाचे बलिदान दिले आहे आता जी काय आबाळ व्हायची असेल ती होवो २ देवा, आम्ही आमचा जीव तुम्हाला समर्पण करून तुमच्याशी सौदा साधला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी काही कुणी अधम नाही, या संबंधीचा चारचौघात निर्णय करून घेऊ या ४

३६६१ का हो वाढविता देवा । मज घरीं समजावा । केवढा हो[2] गोवा । फार केले थोडयाचे ॥१॥
ठेविन पायावरी डोई । यासी तुमचे वेचे काई । जालो उतराई । जाणा एकएकाचे ॥ २ ॥
निवाड आपणियापाशीं । असोन का व्हावे अपेसी । होती गांठी तैसी । सोडूनिया ठेविली ॥३॥
तुका म्हणे गोड । होतें जालिया निवाड । दर्शने ही चाड । आवडीच[3] वाढेल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गोवा–गुता, वेचे–खच होते, चाड–इच्छा

अर्थ – अहो देवा, उगाच भांडण का वाढविता ? घरच्या घरीच माझी समजूत करा ना तुम्ही थोडक्याचे फार करून केवढा हा गुता करून ठेविला आहे १ मी तुमच्या पायावर जर डोके ठेविले तर त्यात तुमचे काही खर्च होणार आहे काय ? उलट यामुळे आपण एकमेकाचे उतराईच होऊ २ यासंबंधीचा निकाल करणे तुमच्या *आमच्या स्वाधीन असूनही आपण असे अपयशी का व्हावे ? मनात जी काय गाठ होती ती अशी तुमच्या समोर* उकलून ठेविली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपापसातील तंटयाचा निकाल झाल्याने सर्व काही चांगले होते मला तर तुमच्या फक्त दर्शनाचीच इच्छा आहे त्यायोगे तुमच्याविषयीची प्रीतीच वाढेल ४

३६६२ नव्हो सभाधीट । समोर बोलाया नीट । एकलीं एकट । दुजें नाहीं देखिलें ॥ १ ॥
आता अवघें तुम्ही जाणा । तुमचे माझें नारायणा । येईल करुणा । तेचि पहा तुम्हासी ॥२॥
ताळ नाहीं माझे बुद्धी । धरली न धरवे शुद्धी । आता बळ कधीं । कोण्या जन्में निवाड ॥३॥
*आता शेवटीचे । उत्तर तें हेंचि साचें । शरण आलें त्याचे । तुका म्हणे सांभाळा ॥ ४ ॥*

शब्दार्थ व टीपा – दुजें–दुसरे, निवाड–निकाल, साचें–खरे

अर्थ – देवा, तुमच्यासमोर बोलण्याइतका काही मी सभाधीट नाही म्हणून या एका ठिकाणी तुम्हास एकटेच पाहून दुसरे कुणी नाही असे पाहून मी बोलत आहे १ नारायणा आता तुम्हीच तुमचेमाझे सर्व कर्तव्य जाणावे यासाठी जेणेकरून तुम्हास माझी करुणा येईल असे तुम्ही पाहावे २ माझ्या बुद्धीस काही ताळतंत्र उरलेला नाही ती शुद्धीवरही येत नाही आता माझे बळ कधी चालेल ? आणि कोणत्या जन्मी तुमच्याकडून माझा निकाल होईल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात मी तुम्हाला शरण आलो आहे माझे रक्षण करणे हे एक तुमचे काम आहे असे माझे हे शेवटचे खरे सांगणे आहे ४

३६६३ ऐसा तव भोळा । तुमचा नसेल गोपाळा ॥ १ ॥
मागत्याची टाळाटाळी । झिज्या ओढोनि कपाळीं ॥ २ ॥

१ म्हण, २ हा, ३ अवघी

नसेल ना नवे । ऐसे धरियेले देवे ॥ ३ ॥
तुका म्हणे जाला । उशीर नाहीं तो विठ्ठला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोळा-रीत, पद्धत

अर्थ – पुढे दर्शविल्याप्रमाणें तर तुमची रीत नसेल ना गोपाळा ? १ जो कुणी मागायला येतो त्याची तुम्ही कपाळावर झिज्या ओढून टाळाटाळी करता २ देवानें अशा प्रकारची नवीनच रीत नाही ना धरली ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, तुमच्याकडून कृपा करण्याच्या बाबतीत न होणारा उशीर झाला आहे ४

३६६४ माझ्या कपाळाच्या गुणे । किंवा सरलेसे नेणे ॥ १ ॥
नये वचन बाहेरी । उभें तिष्ठतसे दारीं ॥ २ ॥
काय सांगायास वेचे । रींद आरंभीं ठायींचे ॥ ३ ॥
तुका म्हणे किती । भीड धरावी पुढती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नेणे-जाणत नाही, वेंचे-खर्च होते, रींद-रीत

अर्थ – देवा, माझ्या प्रारब्धाचा हा गुण आहे की तुमच्याच घरचे सर्व सपले आहे हे काही समजत नाही १ मी बाहेर कितीतरी वेळ तिष्ठत उभा राहिलो आहे पण तुमच्याकडून काहीच उत्तर बाहेर येत नाही २ प्रथमच रीत समजावून फुकटचे उत्तर देण्यासाठी तुमचे काय काय खर्च होते हो ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमची भीड तरी आता वरचेवर किती धरावी ? ४

३६६५ काहीं एक तरी असावा आधार । कासयाने धीर उपजावा ॥ १ ॥
म्हणविल्यासाटीं कैसे पडे रुजु । धणी नाहीं उजू सन्मुख तो ॥ २ ॥
वेचल्या दिसाचा कोणावरी लेखा । घालावा हा सुखासुखा आम्हीं ॥ ३ ॥
नाहीं मनोगत तोवरि हे देवा । तुका म्हणे सेवा नेघीजे तो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कासयाने-कशाने, उजू-सरळ, वेचल्या-गेलेल्या, लेखा-हिशेब, नेघीजे-घेणार नाही

अर्थ – देवा, तुमचा आम्हाला थोडातरी आधार असावा ना नाही तर आमच्या मनास कुठून धीर येणार हो ? १ किती जरी आम्ही म्हटले तरी धनी समोर सरळपणे उभा असल्याशिवाय आमचे म्हणणे सेवेस रुजू कसे होणार ? २ जे दिवस निघून गेले आहेत त्याचा हिशेब कोण करणार ? त्याचा भार आम्ही कुणाच्या मस्तकी सुखासुखी घालावा ? ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, जोपर्यंत तुमच्या मनात येत नाही तोपर्यंत तुम्ही कुणाचीच सेवा घेणार नाही ४

३६६६ मनाचिये साक्षी जाली सांगो मात । सकळ वृत्तांत आपला तो ॥ १ ॥
तुम्हा परामृश घेणे सत्ताबळें । धरिता निराळें कैसीं वाचों ॥ २ ॥
मी माझें सांडून धावया पसारा । आणीक दातारा काय काज ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही तुजविण एका । निढळ लौकिका माजी असो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मात-गोष्ट, हकीकत, परामृश-परामर्श, काज-कारण

अर्थ – मनाच्या साक्षित्वाची स्थिती प्राप्त झाली त्याची हकीगत सर्व प्रकारची सांगतो १ तुम्हीं आपल्या सत्तेच्या बळाने आमचा परामर्श घेता पण तुम्हीच जर आम्हास निराळे मानले तर आम्ही कसे वाचणार ?२ दातारा, मी व माझे असा हा सव लौकिक पसारा सोडून तुमच्याकडे धाव घेतली याचे तरी दुसरे कारण काय आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात आम्ही देवा, तुझ्याशिवाय लौकिकात प्रारब्धहीन म्हणून राहू ४

३६६७ घालूनि लोळणी पडिलो अगणीं । सिचा सिंचवणी तीर्थ वरि ॥ १ ॥
बोल्हावेल तनु होईल शीतळ । जाली हळहळ बहुतापें ॥ २ ॥
पावेन या ठाया कई जाले होतें । आलो अवचितें उष्टयावरि ॥ ३ ॥
तुका म्हणे कोणी जाणवा राउळीं । येइल जवळी पाडुरंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सिचा-शिपडा, बोल्हावेल-ओलसर होईल, राउळीं-मंदिरात

अर्थ – देवा तुमच्यापुढे लोळण घेऊन मी तुमच्या अगणात येऊन पडलो आहे माझ्या अगावर तीर्थ शिपडावे १ त्यामुळे माझा देह ओलसर झाल्यावर थड होईल यापूर्वी त्याला फार ताप झाल्यामुळे हळहळ झाली होती २ मी या स्थानावर कधी येईन असे मला झाले होते, पण अवचितपणे मी येथील उष्टे खाण्यासाठी आलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही सर्व हकीकत कुणीतरी मंदिरात जाऊन पाडुरगाला सागावी, म्हणजे तो माझ्याजवळ येईल ४

३६६८ तरीं भले वांया गेलो । जन्मा आलो मागुता ।
म्हणऊनि ठेलो दास । सावकास निर्भयें ॥ १ ॥
उणे पुरें काय माझें । त्याचें ओझें तुम्हासी ॥ २ ॥
सांभाळावे तें म्या काई । अवो आई विठ्ठले ।
भोगें[1] जया जाइन[2] स्थळा । तुज गोपाळा विसरेंना ॥ ३ ॥
आपले म्या एकसरे । करुनि बरें घेतले ।
तुका म्हणे नारायणा । आता जाणां आपुलें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठेलों-राहिलो, एकसरें-एकदम

अर्थ – यापूर्वीचा माझा जन्म वाया गेला हे फार चागले झाले कारण त्यामुळे मी पुन जन्मास आलो आणि सावकाशपणे व निर्भय चित्ताने श्रीहरीचा दास होऊन राहिलो १ माझे उणेपुरे असे ओझे तुम्हास काय आहे हो ? २ अगे आई, विठ्ठले, मी काय काय सांभाळावे ? ज्या ठिकाणी मी जाईन त्या ठिकाणी कर्मांचे भोग मी सांभाळेन परंतु गोपाळा, तुला मात्र कधी विसरणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी एकदम आपले चांगले करून घेतले आता नारायणा, तुम्ही आपले कर्तव्य जाणून काय करायचे आहे ते करा ४

३६६९ उरलें तें भवितमुख । डोळा मुख पाहावें । अतरींचे का हो नेणा । नारायणा माझिये ॥१॥
पुरवा तैसी केली आळी । बळी जगदानियां ॥ २ ॥
हातीं घेउनि चोरा भातें । दावा रितें बाळका । साजत हे थोरपण । नाहीं विण[3] वत्सळा ॥३॥
शाहणे तरीं लाड दावी । बाळ जेवीं मातेसी । तुका म्हणे पाडुरंगा । ऐसे पैं गा आहे हें ॥४॥

शब्दार्थ व टीपा – नेणां-जाणीत नाही, आळी-हट्ट, बळी-बलवान, जगदानियां-जगाला दान देणाऱ्या, भातें-खाऊ

अर्थ – नारायणा, या श्रीहरीचे मुख डोळ्यांनी पाहावे हीच एक आता आशा उरलेली आहे हे माझ्या मनातील तुम्ही जाणीत का नाही ? १ जगाला दान देणाऱ्या बलवान देवा, मी जसा हट्ट करीन तसा तो तुम्ही पुरवा २ तुम्ही हातात खाऊ घेऊन तो लपवून ठेवता आणि रिकामाच हात बालकाला दाखविता परंतु दीनवत्सला,

१ भाग्य, २ जाई ने, ३ दीनवत्सला

हा मोठेपणा आपणाला शोभून दिसत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, शहाणे मूल असले तरी ते लाडाने आपल्या आईस जेवावयास घालते देवा, असा हा प्रीतीचा एक प्रकार आहे ४

३६७० धरूनि हे आलो जीवीं । भेटी व्हावी विठोबासी ॥ १ ॥
सकल्प तो नाहीं दुजा । महाराजा विनवितों ॥ २ ॥
पायावरि ठेविन भाळ । येणे सकळ[1] पावलें[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे डोळेभरी । पाहिन हरी श्रीमुख ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुजा–दुसरा, भाळ–कपाळ, मस्तक

अर्थ – विठोबाची भेट व्हावी हीच इच्छा जीवाशी धरून मी आलो आहे १ देवा, महाराजा याशिवाय दुसरा कोणताच सकल्प माझ्या मनात नाही असे विनवून सागतो २ देवा, मी तुमच्या पायावर मस्तक ठेवितो त्यायोगे मला सर्व काही पावले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात श्रीहरी, तुझे श्रीमुख डोळ्यानी मी तृप्त होईपर्यंत पाहीन ४

३६७१ तुम्हा उद्धरणे फार । मज दुसरी नाहीं थार ॥ १ ॥
आता जैसे तैसे सोसा । काय करणे हृषीकेशा ॥ २ ॥
बरे न दिसेल ओळी । एका अन्न एका गाळी ॥ ३ ॥
लावितो आभार । तुका विसरलेती फार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – थार–आश्रय, ओळी–पगतीस, गाळी–वगळावे अथवा शिवी

अर्थ – देवा तुम्हाला तर पुष्कळाचा उद्धार करायचा आहे पण मला मात्र दुसरा कुठलाच आश्रय नाही १ आता हृषिकेशा, जसे आम्ही आहोत तसेच स्वीकारा त्यावाचून दुसरे काय करायचे ? २ एकाच पगतीस सर्वजण बसले असताना एकाला अन्न वाढायचे व दुसऱ्याला वगळायचे अथवा शिवी देऊन दूर करायचे हे काही बरे नाही दिसणार ३ तुकाराम महाराज म्हणतात तुम्ही तर माझ्यावर मोठा उपकार केला असे म्हणता, पण मला विसरला आहात ४

३६७२ न कळे जी भक्ती काय करू सेवा । सकोचोनि देवा राहिलोसे ॥ १ ॥
जोडोनिया कर राहिलो निवात । पायापाशीं चित्त ठेवूनिया ॥ २ ॥
दिशाभुली करीं स्थळीं प्रदक्षणा । भ्रमें नारायणा कष्टविले ॥ ३ ॥
तुका म्हणे जालो आज्ञेचा पाळक । जीवनासी एक ठाव केला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव–ठिकाण, स्थान

अर्थ – देवा, तुमची भक्ती कशी करावी हे काही मला समजत नाही तुमची सेवा तरी मी काय करू ? अशा प्रकारचा सकोच करून मी स्वस्थ राहिलो आहे १ हात जोडून मी स्तब्ध राहिलो आहे माझे चित्त तुमच्या पायापाशी आहे २ दिशाभूल झाल्यावर जसे आपल्याभोवतीच फिरावे लागते, त्याप्रमाणे नारायणा, मला या भ्रमाने कष्ट दिले आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, मी तुमची आज्ञा मानणारा एक झालो आहे असे करून मी जगण्याला एक स्थान करून ठेविले आहे ४

---

१ समूळ, २ पावलो

३६७३ एकविध वृत्ति न राहे अंतरीं । स्मरणींच हरी विस्मृति हे ॥ १ ॥
कैसा हा नवलाव वाटतो अनुभवें । मज माझ्या जीवें साक्षित्वेंसी ॥ २ ॥
न राहे निश्चळ जागवितां मन । किती क्षणेक्षण सावरावें ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु केले वेवसाव । तेणें रंगें जीव रंगलासे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– एकविध–एकाग्र, अंतरीं–अंत:करणात, नवलाव–नवल, वेवसाव–व्यवसाय, व्यवहार

अर्थ :– देवा, माझ्या अंत:करणातील वृत्ती एकाग्र होऊन राहात नाही. अशा स्थितीत तुमचे स्मरण हे विस्मरणच होय. १ या अनुभवाचे मला मोठे नवल वाटते. याविषयी माझ्या जीवाची साक्ष आहे. २ मी माझ्या मनाला विचाराने जागृत ठेवीत असलो तरी ते कधी स्थिर राहात नाही. त्याला क्षणोक्षणी आवरावे तरी किती ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आजपर्यंत मी पुष्कळच व्यवहार केले. त्यांनीच माझा जीव रंगून गेला आहे. ४

३६७४ *आतां सोडवणें न या नारायणा । तरि मी न वंचें जाणा काळा हातीं ॥ १ ॥*
ऐसें सांगोनियां जालों उतराई । आणीक तें काई माझे हातीं ॥ २ ॥
केलियाचें माप नये सेवटासी । करितील नासि अंतराय ॥ ३ ॥
तुका म्हणे भय वाटतसे जीवा । धांवणिया धांवा लवकरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वंचें–वाचणार, धांवणिया–रक्षण करण्यासाठी.

अर्थ – नारायणा, जर तुम्ही या प्रपंचातून मला सोडविले नाही तर मी आता या काळाच्या तडाख्यातून वाचणार नाही. १ अशा प्रकारे सांगून मी उतराई झालो आहे याशिवाय माझ्या हाती आणखी काय आहे ? २ मी जे आजपर्यंत प्रभूच्या प्रात्तीसाठी केले ते तडीस जात नाही असे वाटते. कारण त्याचा नाश होईल असे अनेक विचार निर्माण होतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून तर माझ्या जीवास भय वाटत आहे म्हणून माझे रक्षण करण्यासाठी लोकर धावत यावे. ४

३६७५ सत्या[१] माप वाढे । गबाळाची चाली खोडे ॥ १ ॥
उतरे तें कळे कसीं । विखरोन सर्वदेशीं ॥ २ ॥
घरामध्यें राजा । नव्हे हो वा पाटपूजा ॥ ३ ॥
तुका म्हणे साचें । रूप तें दर्पणाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गबाळाची–केरकचरा, सटरफटर, खोडे–संपते, पाटपूजा–राज्याभिषेक, साचें–खरें, दर्पणाचें–आरशातील.

अर्थ :– सत्याचे माप नेहमी वाढणारे असते आणि केरकचऱ्याप्रमाणे असणाऱ्या असत्याची चाल मात्र संपते, कुंठित होते. १ जे कसाला उतरते त्याचा प्रसार सर्वत्र देशभर होतो. २ घरामध्ये बसून मी राजा आहे असे म्हटल्याने कधी कुणी राजा होत नाही. त्यासाठी खरोखरीचा राज्याभिषेकच व्हावा लागतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आरशातील रूप हे काही खरे म्हणता येणार नाही. ४

३६७६ नाहीं खंड जाला । माझा तुमचा विठ्ठला ॥ १ ॥
कैसें कैसें हो दुश्चित । आहे चोघांपाशीं नीत ॥ २ ॥
मुळींचें लिहिलें । मज आतां सांपडलें ॥ ३ ॥
तुका म्हणे मज । न लगे बोलणें सहज ॥ ४ ॥

१ सत्य.

हा मोठेपणा आपणांला शोभून दिसत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, शहाणे मूल असले तरी ते लाडाने आपल्या आईस जेवावयास घालते. देवा, असा हा प्रीतीचा एक प्रकार आहे. ४

३६७० धरूनि हें आलों जीवीं । भेटी व्हावी विठोबासी ॥ १ ॥
संकल्प तो नाहीं दुजा । महाराजा विनवितों ॥ २ ॥
पायांवरि ठेविन भाळ । येणें सकळ[1] पावलें[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे डोळेभरी । पाहिन हरी श्रीमुख ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दुजा–दुसरा, भाळ–कपाळ, मस्तक.

अर्थ :– विठोबाची भेट व्हावी हीच इच्छा जीवाशी धरून मी आलो आहे. १ देवा, महाराजा, याशिवाय दुसरा कोणताच सकल्प माझ्या मनात नाही असे विनवून सांगतो. २ देवा, मी तुमच्या पायांवर मस्तक ठेवितो. त्यायोगें मला सर्व काही पावले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, तुझे श्रीमुख डोळ्यांनी मी तृप्त होईपर्यंत पाहीन. ४

३६७१ तुम्हां उद्धरणें फार । मज दुसरी नाहीं थार ॥ १ ॥
आतां जैसें तैसें सोसा । काय करणें हृषीकेशा ॥ २ ॥
बरें न दिसेल ओळी । एका अन्न एका गाळी ॥ ३ ॥
लावितो आभार । तुका विसरलेती फार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– थार–आश्रय, ओळी–पंगतीस, गाळी–वगळावे अथवा शिवी.

अर्थ :– देवा, तुम्हांला तर पुष्कळांचा उद्धार करायचा आहे पण मला मात्र दुसरा कुठलाच आश्रय नाही.१ आता हृषिकेशा, जसे आम्ही आहोत तसेच स्वीकारा. त्यावाचून दुसरे काय करायचे ? २ एकाच पंगतीस सर्वजण बसले असताना एकाला अन्न वाढायचे व दुसऱ्याला वगळायचे अथवा शिवी देऊन दूर करायचे हे काही बरे नाही दिसणार. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही तर माझ्यावर मोठा उपकार केला असे म्हणता, पण मला विसरला आहात. ४

३६७२ *न कळे जी भक्ती काय करूं सेवा । संकोचोनि देवा राहिलोंसें ॥ १ ॥*
जोडोनियां कर राहिलों निवांत । पायांपाशीं चित्त ठेवूनियां ॥ २ ॥
दिशाभुली करीं स्थळीं प्रदक्षणा । भ्रमें नारायणा कष्टविलें ॥ ३ ॥
तुका म्हणे जालों आज्ञेचा पाळक । जीवनासी एक ठाव केला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव–ठिकाण, स्थान.

अर्थ :– देवा, तुमची भक्ती कशी करावी हे काही मला समजत नाही. तुमची सेवा तरी मी काय करू ? अशा प्रकारचा संकोच करून मी स्वस्थ राहिलो आहे १ हात जोडून मी स्तब्ध राहिलो आहे. माझे चित्त तुमच्या पायांपाशी आहे २ दिशाभूल झाल्यावर जसे आपल्याभोवतीच फिरावे लागते, त्याप्रमाणे नारायणा, मला या भ्रमाने कष्ट दिले आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तुमची आज्ञा मानणारा एक झालो आहे. असे करून मी जगण्याला एक स्थान करून ठेविले आहे. ४

---

१ समूळ, २ पावलो.

अर्थ – एकान्तात राहून सहज कौतुकाने व विनोदाने स्वतःच्या मनाशीच जीवाने संवाद करण्याची क्रीडा आम्ही करू १ जो भाग पचनी पडला आहे तोच भाग वारंवार सेवन केल्याने रुचकर होतो त्याच आवडीची रुची वाढीस लागते. २ या एकान्तीचे सुख अंतःकरणात जडून राहिले असून आता लौकिक व्यवहाराचा वीट येत चालला आहे ३ इतर जगाप्रमाणे आमची बुद्धी आता राहणार नाही कारण आम्ही या गोविंदाच्या पायाशी लपट झालो आहोत ४ आता आणखी कुठलीही चिंता करण्याचे कारण उरलेले नाही श्रीहरीविषयी नित्य नवी आवड निर्माण होत आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे ही मनाची रीतच पडून गेली आहे त्यामुळे माझे मन पांडुरंगस्वरूपात विसावले आहे ६

३६८० उचिताचा काळ । साधावया युक्तिबळ । आपले सकळ । ते प्रसंगी पाहिजे ॥ १ ॥
नेम नाहीं लाभ हानि । अवचित घडती दोनी । विचारुनि मनीं । पाहिजे ते प्रयोजावे ॥२॥
जाळ जाळा काळें । करपों नेदावे आगळें । जेविता वेगळें । ज्याचे त्याचे तेथें शोभे ॥ ३ ॥
पाळी नागर पाभारीं । तन निवडूनि सोंकरी । तुका म्हणे धरी । सेज जमा सेवटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारुनि–विचार करून प्रयोजावे–योजना करावी, आगळें–आणखी, तन–गवत, सोंकरी–रक्षण करावे सेज–ओळ, रास

अर्थ – योग्य असा काळ येताच युक्तीच्या बळाने सर्व काही साधण्याचे या प्रसंगी केले पाहिजे १ कारण हानी अथवा लाभ कोणत्या प्रसंगीं होईल याचा काही नेम नाही अवचितपणे दोनही येतात म्हणून नीट विचार करून जे उचित आहे त्याची योजना करावी २ अन्न शिजण्यासाठी काही वेळ जाळ द्यावयास हवा पण आणखी जाळ लावून ते करपू मात्र देऊ नये, म्हणजे जेवण्याच्या प्रसंगी ज्याची त्याची शोभा उठून दिसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, जमीन नागरून नीट आधी पाळचा घालाव्यात, नंतर पाभारीने धान्याची पेरणी करावी, त्यानंतर धान्य उगवून आले की त्यातील गवत काढून पिकाचे रक्षण करावे आणि शेवटी नीट रासेने ते कापून, मळून त्याची साठवण करावी ४

३६८१ पडिलिया ताळा । मग अवघाचि निर्वाळा ।
तेथें कोणी बळा । नाहीं येत कोणासी ॥ १ ॥
जोडिले ते लागे हातीं । आपआपली निश्चिती ।
हर्ष आणि खती । तेथें दोनी नासली ॥ २ ॥
सहज सरलिया कारण । मग एकला आपण ।
दिसे तरी भिन्न । वचनाचा प्रसंग ॥ ३ ॥
करुनि झाडा पाडा । तुका वेगळा लिगाडा ।
निश्चितीच्या गोडा । गोष्टी म्हूण लागती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ताळा–मेळ, हिशेब, नासली–संपली, झाडा–हिशेब, लिगाड–रचाड, म्हूण–म्हणून

अर्थ – आत्मस्वरूपाच्या ज्ञानाचा मेळ बसल्यानंतर मग सर्वच बाबींचा निवाडा होतो या ठिकाणी कुणी कुणाच्या बळाचा वापर करीत नाही १ ज्याची प्राप्ती झाली आहे तेच आपल्या हाती येते आणि त्यामुळे आपापली चिंता दूर होते मग येथे हर्ष व दुःख या दोनही गोष्टी संपून जातात २ सहजच मग कारण संपल्यावर तो आत्मस्वरूपाच्या ठिकाणी एकटाच राहातो आणि बोलण्याचे काही प्रसंग आले तर तो इतरांहून भिन्न दिसतो ३

शब्दार्थ व टीपा :- खंड-विभाग, वाटणी, नीत-न्याय.

अर्थ :- विठ्ठला, तुमच्याआमच्यांत अजून वाटणी झालेली नाही. १ असे असून अशी उदासीनता तुम्ही का हो धरली आहे ? परंतु यासंबंधी चारचौघांत न्याय करता येण्यासारखा आहे. २ तुमच्याआमच्यार संबंधीचा मूळ लेख लिहिलेला आम्हांस सापडला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला साहजिकपणे बोलण्याची जरूरी नाही. ४

३६७७ हेचि वादकाची कळा । नाहीं येऊं येत बळा ॥ १ ॥
धीर करावा करावा । तरी तो आहे आम्हां देवा ॥ २ ॥
रिघावें पोटांत । पायां पडोन घ्यावा अंत ॥ ३ ॥
तुका म्हणे वरि । गोडा आणावा उत्तरीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपाः- वादकाची-वाद करणाराची, कळा-कला, कौशल्य, रिघावें-शिरावे, अंत-अतःकरण.

अर्थ :- खऱ्या वाद करणाराचे कौशल्य असे की, तो आपल्याशी वाद करणारास बलवान होऊ देत नाही. १ देवा, सर्वत्र जो धीर असायला पाहिजे तो आमच्याजवळ आहे. २ ज्याच्याशी वाद करायचा त्याच्या पोटात आपण शिरावे आणि त्याच्या पाया पडून त्याचे अंतःकरण समजावून घ्यावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या मधुर भाषणाने वाद करणारासही आपण संतुष्ट करावे. ४

३६७८ एक परि बहिर[1] बरें । परि तीं ढोरें ग्यानगडें ॥ १ ॥
कपाळास लागली अगी । अभागी कां जीतसे ॥ २ ॥
एके परि बरें वेडें । तार्किक कुडें जळो तें ॥ ३ ॥
तुका म्हणे खातडवासी । अमृतासी नोळखे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- ग्यानगडें-अल्पज्ञानी, गर्विष्ठ, जीतसे-जगला. कुडें-वाईट, खातडवासी-उकिरड्यात राहणारा.

अर्थ :- एका परीने बाहेर होणे बरे, किंवा बहिरगाकडे लक्ष देणे बरे. परंतु अल्प लाभाने गर्विष्ठ बनलेले ढोराप्रमाणेच असतात. १ ज्याच्या प्रारब्धाला आग लागली आहे तो जन्मास तरी कशास आला ? २ एका परीने वेडे असलेले बरे. पण नाना प्रकारचे तर्ककुतर्क करणारे वाईट लोक जळून जावोत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, उकिरड्यात लोळणाऱ्या जीवास अमृताची चव काय समजणार ? ४

३६७९ खेळों मनासवें जीवाच्या संवादें । कौतुक विनोदें निरंजनीं ॥ १ ॥
पडिलें तें रुचे वेळोवेळां । होतसे डोहळा आवडीस ॥ २ ॥
एकांताचें सुख जडलें[2] जिव्हारीं । वीट परिचारीं वरा आला ॥ ३ ॥
जगाऐसी बुद्धी नव्हे आतां कदा । लंपट गोविंदा जालों पायीं ॥ ४ ॥
आणीक ते चिंता न लगे करावी । नित्य नित्य नवी आवडी हे ॥ ५ ॥
तुका म्हणे घडा राहिला पडोन । पांडुरंगीं मन विसांवलें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपाः- निरजनीं-एकान्तात, डोहळा-रुची, परिचारीं-व्यवहाराचा, घडा-रीत, मार्ग.

१ बहिरें, २ पडले

अर्थ – एकान्तात राहून सहज कौतुकाने व विनोदाने स्वतःच्या मनाशीच जीवाने संवाद करण्याची क्रीडा आम्ही करू १ जो भाग पचनी पडला आहे तोच भाग वारंवार सेवन केल्याने रुचकर होतो त्याच आवडीची रुची वाढीस लागते. २ या एकान्तीचे सुख अंतःकरणात जडून राहिले असून आता लौकिक व्यवहाराचा वीट येत चालला आहे ३ इतर जगाप्रमाणे आमची बुद्धी आता राहणार नाही कारण आम्ही या गोविंदाच्या पायाशी लंपट झालो आहोत ४ आता आपली कुठलीही चिंता करण्याचे कारण उरलेले नाही श्रीहरीविषयी नित्य नवी आवड निर्माण होत आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे ही मनाची रीतच पडून गेली आहे त्यामुळे माझे मन पांडुरंगस्वरूपात विसावले आहे ६

३६८० उचिताचा काळ । साधावया युक्तिबळ । आपले सकळ । ते प्रसंगी पाहिजे ॥ १ ॥
नेम नाहीं लाभ हानि । अवचित घडती दोनी । विचारूनि मनीं । पाहिजे ते प्रयोजावे ॥२॥
जाळ जाळा काळें । करपो नेदावे आगळें । जेविता वेगळें । ज्याचें त्याचे तेथें शोभे ॥ ३ ॥
पाळी नांगर पाभारीं । तन निवडूनि सोंकरी । तुका म्हणे घरी । सेज जमा सेवटीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारूनि–विचार करून प्रयोजावे–योजना करावी आगळें–आगळा तन–गवत, सोंकरी–रक्षण करावे सेज–ओळ, रास

अर्थ – योग्य असा काळ येताच युक्तीच्या बळाने सर्व काही साधण्याचे या प्रसंगी केले पाहिजे १ कारण हानी अथवा लाभ कोणत्या प्रसंगीं होईल याचा काही नेम नाही अवचितपणे दोनही येतात म्हणून नीट विचार करून जे उचित आहे त्याची योजना करावी २ अन्न शिजण्यासाठी काही वेळ जाळ द्यावयास हवा पण आगळी जाळ लावून ते करपू मात्र देऊ नये, म्हणजे जेवण्याच्या प्रसंगी ज्याची त्याची शोभा उठून दिसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, जमीन नांगरून नीट आधी पाळया घालाव्यात, नंतर पाभारीने धान्याची पेरणी करावी, त्यानंतर धान्य उगवून आले की त्यातील गवत काढून पिकाचे रक्षण करावे आणि शेवटी नीट रांगेने ते कापून, मळून त्याची साठवण करावी ४

३६८१ पडिलिया ताळा । मग अवघाचि निर्वाळा ।
तेथें कोणी बळा । नाहीं येत कोणासी ॥ १ ॥
जोडिलें ते लागे हातीं । आपआपली निश्चिंती ।
हर्ष आणि खंती । तेथें दोनी नासली ॥ २ ॥
सहज सरलिया कारण । मग एकला आपण ।
दिसे तरी भिन्न । वचनाचा प्रसंग ॥ ३ ॥
करूनि झाडा पाडा । तुका वेगळा लिगाडा ।
निश्चितीच्या गोडा । गोष्टी म्हूण लागतो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ताळा–मेळ, हिशेब, नासली–संपली, झाडा–हिशब, लिगाड–रगाड, म्हूण–म्हणून

अर्थ – आत्मस्वरूपाच्या ज्ञानाचा मेळ बसल्यानंतर मग सर्वच बाबींचा निवाडा होतो या ठिकाणी कुणी कुणाच्या बळाचा वापर करीत नाही १ ज्याची प्राप्ती झाली आहे तेच आपल्या हाती येते आणि त्यामुळे आपापली चिंता दूर होते मग येथे हर्ष व दुःख या दोनही गोष्टी संपून जातात २ सहजच मग कारण संपल्यावर तो आत्मस्वरूपाच्या ठिकाणी एकटाच राहातो आणि बोलण्याचे काही प्रसंग आले तर तो इतरांहून भिन्न दिसतो ३

तुकाराम महाराज म्हणतात, सर्व कृत्याचा हिशेब पूर्ण करून मी या लचाडातून वेगळाच होऊन राहिलो आहे म्हणून तर निश्चितपणाच्या गोड गोष्टी अनुभवास येत आहेत ४

३६८२ जीविता[1] तो माझा पिता । उखता तो उखत्यांचा ॥ १ ॥
जनार्दनीं सरती कर्मे । बाधा भ्रमे अन्यत्र ॥ २ ॥
अपसव्य सव्यामधीं । ऐसी शुद्धी न धरिता ॥ ३ ॥
तुका म्हणे खांद्या पानें । सिंचतां भिन्न कोरडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- जीविता-जन्मास देतो तो, जो वितो तो, उखता-सगळा, सर्वांचा, सरती-मान्य, अन्यत्र-नाहीतर

अर्थ :- जो या विश्वास जन्म देतो तोच माझा पिता आहे. तोच सर्वांचाही पिता आहे. १ आपली सव कर्मे त्या जनार्दनाच्या ठिकाणी समर्पण करावीत म्हणजे ती मान्य होतात नाही तर निरनिराळ्या भ्रमाने बद्ध होतील. २ सव्यापसव्य असे भान न ठेवता भगवतास कर्मे समर्पण करावीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, झाडाच्या मूळास पाणी न घालता खांद्याना व पानाना पाणी घातले तर सर्व झाडच कोरडे होऊन जाईल. ४

३६८३ माउलीची चाली लेकराचे ओढी । तयालागीं काढी प्राणे प्रीती ॥ १ ॥
ऐसी बळिवत आवडी जी देवा । संतमहानुभावा विनविती ॥ २ ॥
मोहे मोहियेले सर्वकाळ चित्त । विसरु तो घेत नाहीं क्षणे ॥ ३ ॥
तुका म्हणे दिला प्रेमाचा वोरस । सांभाळिले दास आपुले तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - वोरस-पान्हा

अर्थ - लेकराच्या ओढीने आईची सर्व हालचाल होत असते. त्याच्यासाठी प्रीतीच्या पोटी तो प्राणसुद्धा खर्च करते १ अहो, महानुभावी सत, वरीलप्रमाणे तुमची प्रीत बलवान असल्याने मी तुम्हास विनवीत आहे २ बालकाच्या मोहाने तिचे चित्त सर्वकाळ ओढलेले असते त्याच्याशिवाय तिला एक क्षणभरही गमत नाही, एक क्षणही ती त्याला विसरु शकत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही मला प्रेमाचा पान्हा दिलात, आणि या आपल्या दासाचा साभाळ केलात ४

३६८४ केवढा तो अहंकार । माझा तुम्हा नव्हे दूर ॥ १ ॥
आता कोण पडे पायां । तुमच्या अहो पंढरिराया ॥ २ ॥
कां जी कृपेनें कृपण । वेचत असे ऐसे धन ॥ ३ ॥
तुका म्हणे देवे । दुजियाचे पोतें न्यावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - वेचत-खर्चत, दुजियाचे-भेदभावाचे, पोते-पिशवी, साठवण करण्याचे साधन

अर्थ - देवा, माझ्यात केवढा मोठा अहकार आहे तो काही तुमच्याने दूर होत नाही. १ अहो पंढरीराया, आता तुमच्या पाया कोण पडणार हो ? २ तुम्ही कृपा करण्याच्या बाबतीत एवढे कृपण का झालात ? त्यासाठी तुमचे काय खर्च होते हो ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्या ठिकाणी भेदभावाचे हे पोते आहे ते देवाने दूर करावे. ४

३६८५ अपराधी म्हणोनि येतो काकुलती । नाहीं तरी होती काय चाड ॥ १ ॥
येइल तारूं तरी तारा जी देवा । नाहीं तरी सेवा घ्या वो मार ॥ २ ॥

१ जेवितो

कासया मी आता वचू हें शरीर । आहें बारगीर जाईं जर्नें[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे मन करूनि मोकळें । आहे साळेंढाळें उदार मी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–जरुरी, तारू–तारणे, उद्धार, बारगीर–दुसऱ्याचे मागून आणलेले, साळेंढाळें–खुल्या दिलाने, मोकळ्या मनाने

अर्थ – देवा, मी फार अपराधी आहे म्हणून तर एवढा काकुळतीस आलो आहे नाही तर मला काय जरूरी होती ? १ देवा, तुम्हाला माझा उद्धार करायचा असेल तर करा नाही तर आमच्या सेवेचे ओझे तुमच्या शिरावर असू द्या ना २ मी आता या माझ्या शरीराचा त्याग कशासाठी करू ? ते दुसऱ्याचे मागून आणल्यामुळे ज्याचे त्याला द्यावेच लागणार ३ तुकाराम महाराज म्हणतात मी हे सारे मन मोकळे करून खुल्या दिल्याने उदारपणे बोलतो आहे ४

३६८६ माझे तो फुकाचे कायेचेंचि कष्ट । नव्हे क्रियानष्ट तुम्हाऐसा ॥ १ ॥
काहींच न वचीं आजिच्या प्रसंगीं । सकळा ही अंगीं करीन पूजा ॥ २ ॥
द्यावें काहीं तुम्ही हे तो नाहीं आस । असो या उदास देहभावें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी मावळली खती । समाधान चित्तीं सर्वकाळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कायेचें–देहाचे शरीराचे, आस–इच्छा, खती–चिंता

अर्थ – देवा, माझ्या देहाचे कष्ट तर फुकटचेच आहेत ते मी करीनच, पण तुमच्यासारखा मी कधी क्रियानष्ट होणार नाही १ मी आजच्या या प्रसंगाला कशाचीच वचना करणार नाही सर्व अंगानी मी तुमची पूजाच करीन २ तुम्ही मला काही द्यावे अशीही इच्छा मी धरणार नाही कारण मी देहभावाविषयी उदास झालो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी सर्व चिंता मावळली असून चित्तात सतत समाधान वसले आहे ४

३६८७ स्वामीचिया सत्ता । आधीं वर्म येतें हाता । पुढती विशेषता । लाभें लाभ आगळा ॥ १ ॥
फरीं कवतुकाचे बोल । परि जिव्हाळ्याची ओल । आवडे रसाळ । मायबापा लाडाचे ॥ २ ॥
मनें मेळविलें मना । नाहीं अभावीं शाहणा । अंतरींच्या खुणा । वरि दिल्या उमटोनि ॥ ३ ॥
नाहीं पराश्रमें काळा[2] । अवघ्या जागविल्या वेळा । देवासी निराळा । तुका क्षण न सोडी ॥४॥

शब्दार्थ व टीपा – आगळा–श्रेष्ठ, विशेष, पराश्रमें–परिश्रमाने

अर्थ – स्वामीच्या सत्तेने सर्व वर्म आधी हातात येते त्या लाभामुळे वरवरच्या लाभाची विशेष प्राप्ती होते १ मी मोठ्या कौतुकाने बोलत आहे पण त्यात जिव्हाळ्याचा ओलावा आहे रसाळपणा आहे म्हणून हे लाडाचे बोलणे मायबापांस आवडते २ मी काही अभाविक शहाणा नसून मी स्वामींच्या मनाशी मन मिळविलेले आहे त्यामुळे त्याच्या प्राप्तीच्या अंतरीच्या खुणा बाहेरही उमटल्या आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, मोठे परिश्रम करून मी काळाच्या सेवेत मन सतत जागृत ठेविले आहे, आणि एक क्षणभरही मी देवाच्या खेरीज राहात नाही ४

३६८८ एके ठायीं अन्नपाणी । ग्रासोग्रासीं चिंतनीं ॥ १ ॥
वेळोवेळा जागवितो । दुजें येईल म्हूण भीतो ॥ २ ॥
नाहीं गुंतत उपचारीं । मानदभाचे वेव्हारीं ॥ ३ ॥
तुका जालासे शाहाणा । आड लपे नारायणा ॥ ४ ॥

१ जेणें, २ कळा

सर्व विश्वास भरून राहिलेला हा देव आहे त्याच्याकडून सांभाळला जाणारा मी आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात पांडुरंगा, आपणच माझे पालनपोषण करीत आहात ४

३६९५ मज काहीं सीण न व्हावा यासाटीं । कृपा तुम्हा पोटीं उपजली ॥ १ ॥
होतें तैसें केलें आपलें उचित । शिकविलें हित बहु बरें ॥ २ ॥
आम्ही न मनावी कोणाची आशंका । तुम्हा भय लोकां आहे मनीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां संचिताचा ठेवा । बोडवला घ्यावा जैसा तैसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सीण–त्रास, श्रम, न मनावी–मानू नये

अर्थ – देवा मला कसल्याही प्रकारचा त्रास न व्हावा म्हणून तुमच्या पोटी कृपा निर्माण झाली आहे १ तुम्ही योग्य तेच करून मला फार चांगल्या प्रकारची शिकवण दिली २ आम्ही आता कुणाचीही शंका मानीत नाही पण तुमच्या मनात मात्र सर्व लोकांचे भय आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता ज्याला जसा आपल्या प्रारब्धाचा ठेवा प्राप्त झाला आहे त्याप्रमाणे त्याने त्याचा उपभोग घ्यावा ४

३६९६ कोणाचें चिंतन करूं ऐशा काळें । पायांचिया बळें कंठीतसें ॥ १ ॥
पाहातसें वाट येईं गा विठ्ठला । मज कां हा केला परदेश ॥ २ ॥
बहुतांचें सत्तें जालों कासावीस । जाय रात्रीं दिस वैरियाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे बैसे मनाचिये मुळीं । तरींच हीं जाळीं उगवती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जाळीं–प्रपंचाची जाळी, उगवती–सुटतील

अर्थ – देवा आता अशा वेळी कोणाचे चिंतन करू ? आपल्या पायाच्या बळाच्या आधारावर मी दिवस कंठीत आहे १ अगा विठ्ठला तू लौकर यावेस म्हणून मी फार वाट पाहात आहे रे मला या दूर देशात टाकून तू परदेशी का बनविले आहेस ? २ इतर इंद्रियविकाराच्या सत्तेने मी फार कासावीस झालो असून रात्र आणि दिवस हे वैऱ्याप्रमाणे जात आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू माझ्या मनाच्या मूळावरच बसून राहा तरच माझ्या प्रपंचाची ही जाळी सुटतील ४

३६९७ कां जी तुम्ही ऐसे नव्हा कृपावंत । निवे माझें चित्त ठायिंच्या ठायीं ॥ १ ॥
काहीं शम नये विषम अंतरा । शांतीचा तो बरा ऐसा योग ॥ २ ॥
दुःखी होतों पंचभूतांच्या विकारें । जडत्वें दातारें राखावीं तीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मोडा अहंकाराची मान । धरितों चरण म्हणऊनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नव्हा–होत नाही शम–सम अनुकूल विषम–प्रतिकूल, अंतरा–अंतःकरणात

अर्थ – देवा जागच्या जागीच माझे चित्त स्थिर व्हावे अशी कृपा तुम्ही माझ्यावर का करीत नाही हो ? १ अंतःकरणात काही समविषम भाव निर्माण न होता शांततेची प्राप्ती होईल असा योग आलेला बरा २ पंचमहाभूतांच्या विकाराने मी फारच दुःखीकष्टी बनलो आहे यापासून आलेल्या जडत्वाच्यापासून देवा दातारा, तुम्ही रक्षण करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या अहंकाराची मान मोडून टाका यासाठीच मी तुमचे पाय धरीत आहे ४

३६९८ मागत्याची कोठें घडते निरास । लेकरा उदास नाहीं होतें ॥ १ ॥
कासया मी होऊं उतावीळ जीवीं । जाणता गोसावी सर्व आहे ॥ २ ॥

जाला तरी वेळ कवतुकासाटीं । निर्दया तीं पोटीं उपजेना ॥ ३ ॥
तुका म्हणे त्यासी ठाउके उचित । होईल संकेत नेमियेला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निरास–निराशा

अर्थ – देवाजवळ कुणी काही मागायला गेला तर त्याची निराशा कधी होते काय ? आई आपल्या लेकरावर कधी उदास होत नाही १ माझ्या अंतःकरणातील सर्व भाव हा स्वामी जाणत असताना मी माझ्या जीवानिशी उतावीळ का बरे होऊ ? २ थोडाफार उशीर झाला तरी तो कौतुकापोटीच असावा स्वामीच्या पोटात निर्दयता कधीच उमटणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याला योग्य काय ते माहीत आहे जसे नेमले आहे, संचिताप्रमाणे आहे, तेच घडून येईल ४

३६९९ आरुपा वचनीं मातेची आवडी । म्हणऊनि तातडी घेती नाहीं ॥ १ ॥
काय होईल माझें मांडिलें कवतुक । आदराची भूक रडारोवीं ॥ २ ॥
लपोनिया करी चुकुर माउली । नाहीं होती केली निष्ठासाडी ॥ ३ ॥
तुका म्हणे करी पारखीं वचनें । भेवउनि तान्हे आळवावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आरुपा–बोबड्या, चुकुर–चुकवून, पारखीं–कठोर

अर्थ – बालकाच्या बोबड्या बोलाची आवड आईच्या मनात असते म्हणूनच ती त्याला घेण्यासाठी तातडीने धावत येत नाही १ बालकाने ओरडावे, रडावे अशी प्रीतीची भूक आईसही असते त्याप्रमाणेच देवा, तुम्ही मासे कौतुक मांडले आहे काय ? २ आई आपल्या बाळास चुकवून लपून बसते, पण त्याची हेळसांड मात्र ती कधीच करीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी आई कधी कधी कठोर वचनांनी बालकास भीती दाखविते बालक भ्याले की ती पुन्हा त्याला प्रेमाने आळवीत बसते ४

३७०० प्रीतीच्या भांडणा नाहीं शिरपाव । वचनाचेचि भाव निष्ठुरता ॥ १ ॥
जीणें तरि एका जीवें उभयता । पुत्राचिया पिता दुखवे दुःखें ॥ २ ॥
काय जाणो तुटों मायेचें लिगाड । विषय तें आड उरो नेणें ॥ ३ ॥
तुका म्हणे मज करुणा उत्तरें । करिता विश्वंभरें पाविजेल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – शिरपाव–मानापमान लिगाड–लचांड

अर्थ – प्रीतीच्या भांडणात मानापमानाची काहीच भावना नसते फक्त कठोर शब्दांचेच भाव वरवर दिसतात १ उभयता पितापुत्र एकच जीविताने जगतात म्हणून पुत्रास दुःख झाले की त्याचा पिता दुःखी होतो २ असे हे मायेचे लचांड कधी तुटते काय ? हे कसाने तुटेल कोण जाणे ! कोणत्याही प्रकारची विषमता आड येऊ नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी करुणेच्या वाणीने हाक मारीत असताना हा विश्वंभर मला पावेल ४

३७०१ नको घालूं झांसा । मना उपाधिबोळसा ॥ १ ॥
जे जे वाहावे संकल्प । पुण्य तरी तेचि पाप ॥ २ ॥
उपजतो भेव । होतो कासावीस जीव ॥ ३ ॥
तुका म्हणे पाहीं । होइल तें निवांत राहीं[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – झांसा–दहशत, धास्ती, बोळसा–फेऱ्याची, भेव–भीती

[1] माही

अर्थ :- मना, प्रपचामधील अनेक उपाधींच्या फेऱ्याची दहशत तू मला घालू नकोस १ जे जे पुण्याचे म्हणून सकल्प करावेत ते ते सर्व पापमयच होतात २ यामुळे पोटात मोठे भय उत्पन्न होऊन जीव कासावीस होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रभूच्या इच्छेनुसार जे जे काही होईल ते निवातपणे आम्ही पाहात राहू ४

३७०२ बीजीं फळाचा भरवसा। जतन सिंचनासरिसा। चाविलिया[1] आसा। काकुलती ते नाड ॥१॥
हा तो गडसदीचा ठाव। पिके पिकविला भाव। सकोचोनि जीव। दशा केली जतन ॥२॥
माती घाली धनावरी। राड रोटा वरीवरी। सुखाचे सेजारीं। दु ख भ्रमें भोगीतसे ॥३॥
तुका म्हणे दिशाभुली। जाल्या उफराटी चाली। निवाडाची बोली। अनुभवे साक्षीसी ॥४॥

शब्दार्थ व टीपा – आसा–आशा, गडसदीचा–अडचणीचे, ठाव–स्थान, राडरोटा–लग्नात मुलीच्या पोटा-पाण्याची केलेली व्यवस्था

अर्थ – चागल्या प्रकारे बीज पेरल्यावर, जलसिंचन करून त्याची चागली जपणूक केल्यावर रसाळ फळाचा भरवसा धरता येतो उलट उगाच आशा चाळविल्यास मात्र आडवणूक होईल. १ हे देहबुद्धीचे ठिकाण मोठ्या अडचणीचे असले तरी या ठिकाणी भाव धरून पीक पिकवावे लागते परतु जे सकोच करून राहातात ते मात्र आपली जीवदशा जतन करतात २ जवळ असलेली धनसपत्ती जमिनीत पुरून काही लोक तीवर माती पसरतात आणि राडारोटाप्रमाणे कशावर तरी पोट भरतात त्याचप्रमाणे हे लोक स्वरूपाच्या प्राप्तीचे सुख जवळ असूनही भ्रमाने विनाकारण दु ख भोगीत असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एखाद्या दिशाभूल झालेल्या माणसाची चाल उलट दिशेने होत असते माझे हे बोलणे याप्रमाणे वाटत असले तरी निर्वाणीचे व स्वानुभवाच्या साक्षीचे आहे ४

३७०३ काय उरली ते करूं विनवणी। वेचलो वचनीं पाडुरगा ॥ १ ॥
अव्हेरलों आता कैसे नामरूप। आदर निरोप तरि तो नाहीं ॥ २ ॥
माझा मायबाप ये गेलो सलगी। तो हे तुम्हा जगीं सोयरिका ॥ ३ ॥
तुका म्हणे आता जोडोनिया हात। करी दडवत ठायिचाठायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वेचलो–खर्च केला

अर्थ .- पाडुरगा, आजपर्यंत मी व्यर्थ बोलण्यातच काळ खर्च केला आता वाणीने आणखी कोणती विनती करायची उरली आहे ते मला सागा १ तुम्ही तर माझा अव्हेर केला आता मला कसले नामरूप आले आहे ? तुम्ही माझा आदर करीत नाही, की काही प्रेमाचा निरोपही पाठवीत नाही. २ तुम्ही माझे मायबाप असल्याने मी एवढ्या सलगीने बोलतो, पण तुम्ही मात्र सर्व जगाशी सोयरीक करून बसले आहात ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी दोनही हात जोडून ठिकठिकाणी तुम्हाला दडवत घालीत आहे ४

३७०४ आवडी धरूनि करूं गेलों लाड। भवितप्रेमकोड न पुरेचि ॥ १ ॥
म्हणऊनि जीव ठेला आसाओनि। खेद होतो मनीं बहु साल ॥ २ ॥
वेठीऐसे वाटे निर्फळ कारण। शीतळ होऊन खोडायलो ॥ ३ ॥
तुका म्हणे सरतें नव्हेचि पायांपें। बळ केले पापें नव्हेचि भेटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा '- कोड–इच्छा, ठेला–राहिला, आसावोनि–आशा धरून, कारण–कार्य, खोडायलों–लुळा झालो, सरतें–मान्य

[1] चाळविलिया आशा

अर्थ – देवा, तुमच्याविषयी मोठी आवड मनात ठेवून मी लाड करू गेलो, पण भक्तिप्रेमाची इच्छा मात्र तुमच्याकडून पूर्ण होत नाही १ यासाठी माझा जीव आशा धरून राहिलेला आहे यावद्दल पुष्कळ दिवसपर्यंत मनास खेद होत आहे २ एखाद्या वेठीस धरलेल्या मजुरासारखे माझे कार्य निष्फळ ठरत आहे त्यामुळे मी लुळा-पांगळा होऊन जागच्याजागी पडावलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी सेवा तुमच्या पायाशी मान्य होत नाही माझ्या पापाने जोर केल्यामुळेच देवा, तुमची भेट होत नाही ४

३७०५ प्रीतीचा तो कळवळा । जिव्हाळाचि वेगळा ॥ १ ॥
बहु नेदी रडो माता । दुश्चित होता धीर नव्हे ॥ २ ॥
वरी वरी तोंडापुरतें । मोहोरी तें कळतसे ॥ ३ ॥
जाणोनिया नेणता तुका । नव्हे लोकासारिखा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोहोरी–मुरली, पुंगी

अर्थ – प्रेमाच्या कळवळ्याचा जिव्हाळा काही वेगळाच असतो १ आई आपल्या मुलास कधी फार रडू देत नाही तिचे मूल दुःखी कष्टी झाले की तिला धीर निघत नाही २ वरवर तोंडापुरती गोड पुंगी कितीही वाजवली तरी ती फुकट हे समजून येते ३ हे सर्व जाणूनच मी हा नेणतेपणा स्वीकारलेला आहे मी काही इतर लोकासारखा नाही ४

३७०६ हा गे हाचि आता लाहो । माझा अहो विठ्ठला ॥ १ ॥
दडवत दडवत । वेगळी मात न बोले ॥ २ ॥
वेगळाल्या कोठे मागें[1] । लाग लागें लावावा ॥ ३ ॥
तुका म्हणे केल्या जमा । वृत्तितमा[2] भाजूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लाहो-छंद नाद, मात–शब्द गोष्ट

अर्थ – अहो विठ्ठला, माझा आता हाच एक छंद झाला आहे १ तुम्हाला 'दडवत' हेच शब्द मी बोलेन. याशिवाय इतर गोष्टी करणार नाही २ वेगवेगळ्या साधनाच्या मागे आता कुठे लागत बसू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तमोगुणाच्या वृत्ती जाळून टाकून मी सत्त्वगुणाच्या जमा केल्या आहेत ४

३७०७ तुम्हासी न कळे सांगा काय एक । कासया सकल्प वागवू[3] मी ॥ १ ॥
आहे तेथें सत्ता ठेविले स्थापूनि[4] । प्रमाणेंचि वाणी वदे आज्ञा ॥ २ ॥
कृपा जाली मग[5] न लगे अगसग । निजध्यासे रंग चढता राहे ॥ ३ ॥
तुका म्हणे मागें बोलिलो ते वाव । आता हाचि भाव दृढ जाला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कासया–काय म्हणून, कशासाठी, वाव–व्यर्थ, उगाच

अर्थ – देवा, तुम्हाला कोणती एक गोष्ट समजत नाही ते सांगा मग मी कशासाठी उगाच नानाप्रकारचे सकल्प मनात वागवू ? १ तुम्ही आपल्या सत्तेने माझ्या वाणीस जथे स्थापून ठेविले आहे त्याचप्रमाणे तुमची आज्ञा ती बोलत आहे २ देवा, एकदा तुमची कृपा झाल्यावर मग तुमची अगसगत नसली तरी चालेल कारण मग निजध्यासाचा रंग चढत जातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, यापूर्वी मी जे काय बोललो ते व्यर्थ आहे आता मात्र माझा हाच भाव दृढ झाला आहे ४

---

१ भोगें, २ वृत्तिक्षमा, ३ वाउगा, ४ व्यापुती, ५ मज

तु. गाथा ३ ३८

३७०८ आवडी न पुरे मायबापापासीं । घडों का येविसीं सकईल ॥ १ ॥
होईल नेमलें आपुलिया काळें । आलीयाचा बळें आग्रो उरे ॥ २ ॥
जाणविलें तेथें थोडें एकवेळा । सकळ ही कळा सर्वोत्तमीं ॥ ३ ॥
तुका म्हणे निवेदिलें गुहय गुज । आतां तुझी तुज सकळ चिंता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– सकईल–शकेल, आग्रो–आग्रह, कळा–कला, जाणीव, ज्ञान.

अर्थ :– आईबापांच्यापाशी मुलांची आवड पूर्ण होत नाही असे कधी घडू शकेल काय ? १ नेमलेल्या वेळेस जे होणार असेल ते होईलच; असे असूनही काही लोकांच्या बळाचा आग्रह उरतोच. २ सर्वोत्तम देवापाशी सर्व प्रकारचे ज्ञान असतेच. तेथे एकवेळ आम्ही आपली थोडीशी हकीगत सांगितली आहे एवढेच. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आमचे जे काही गुहय होते ते आम्ही तुमच्यापाशी निवेदन केले आहे. आता त्या संबंधी सर्व-काही चिंता तुझी तुलाच आहे. ४

३७०९ वोखटा तरी मी विटलों देहासी । पुरे आतां ऐसीं जोडी पुन्हां ॥ १ ॥
किती मरमर सोसावी पुढती । राहिलों संगती विठोबाचे ॥ २ ॥
आतां कोण याचा करील आदर । जावो कळिवर विटंबोनि ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां सांडी तेचि सांडीं । कोण फिरे लंडी यासी मागें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोखटा–खोटा, वाईट, मरमर–कष्ट, यातायात, कळिवर–देह, शरीर, सांडी–त्याग, लंडी–मित्रा.

अर्थ .– हा देह अतिशय वाईट असल्यामुळेच मला त्याचा वीट आला आहे. अशा या देहाची आता प्राप्ती पुरे झाली. १ या देहामुळे किती यातायात सोसावी ? यास कंटाळून तर मी विठोबाची संगत धरलेली आहे. २ आता या देहाचा आदर कोण करतो ? या देहाची विटंबनाच होवो ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देहाचा त्याग मी केला आहे तोच खरा असून आता यापासून कोणता मित्रा मागे फिरेल ? ४

३७१० हें ही ऐसें ते ही ऐसें[1] । उभय पिसे अविचार ॥ १ ॥
अभिमानाचे ठेलाठेलीं । मधीं जाली हिंपुष्टी ॥ २ ॥
धीरा शांती ठाव नुरे । हाचि उरे आवाळया ॥ ३ ॥
कौतुक हें पाहे तुका । कढतां लोकां अधणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पिसें–वेडे, ठेलाठेलीं–धक्काबुक्की, हिंपुष्टी–कष्टी, दु खी, ठाव–स्थान, नुरे–उरत नाही' आवाळया–दुबळा.

अर्थ – हे असेही आहे, आणि ते तसेही आहे, अशा उभय विचारांचे वेडे लोक अविचारीच होत. १ देहाच्या अभिमानाच्या धक्काबुक्कीत सर्व लोक दुःखीकष्टी झाले आहेत. २ धैर्य व शांती यासारख्या गुणांना राहण्यासाठी स्थानच उरले नाही आणि मग जीव हा असा दुबळा होऊन राहातो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व लोक विविध तापांच्या अधणात तापत असताना मी कौतुकाने पाहात आहे. ४

३७११ हित जाणे चित्त । कळों येतसे उचित ॥ १ ॥
परिहार ते संपादनी । सत्य कारण कारणीं ॥ २ ॥

---

१ तैसे.

वरदळ तें नुतरे कसीं । आगीमध्यें ते रसीं ॥ ३ ॥
तुका म्हणे करुनी खरे । ठेविता तें पुढें बरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परिहार–समर्थन, कारण–कार्य, कारणीं–कार्याने, कृत्याने, वरदळ–हलके, हीन, नुतरे–उतरत नाही

अर्थ :– चित्त हे नेहमी हित जाणते. कारण त्याला उचित गोष्ट कोणती ते समजत असते. १ बाह्य सोंगाची संपादणी करून त्याचे समर्थन करावे लागते. पण सत्य कार्य सत्याच्या कृत्यानेच समजून येते. २ अग्नीमध्ये हलका धातू तापत टाकला तरी तो कसास कधी उतरत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, चांगले खरे करून ठेवल्यास ते पुढे फार चांगल्या रीतीनें उपयोगी पडते ४

३७१२ देवें दिला देह भजना गोमटा । तो या जाला भांटा बाधिकेच्या ॥ १ ॥
ताठोनिया मान राहिली वरती । अहंकारा हातीं लवो नव्हे[1] ॥ २ ॥
दास म्हणावया न वळे[2] रसना । सइरवचना वासे गळा ॥ ३ ॥
तुका म्हणे कोठें ठेवावा विटाळ । स्नानें निर्मळ व्हावयासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :— गोमटा–चांगला, भाटा–भाट, स्तुतिपाठक, नव्हे–नाही, सइर–स्वैर, स्वच्छंदी, वासे–वासतो

अर्थ – देवाने हा मनुष्यदेह चांगला दिला तो भजन करण्यासाठी पण पाहावे तर हा ज्यामुळे बाधा येईल अशा प्रलोभनाचाच स्तुतिपाठक बनला आहे १ या नरदेहाची मान नेहमी अभिमानाने ताठच राहाते अहंकारामुळे ती कधी लवतच नाही. २ श्रीहरीस दास म्हणून आळवण्यासाठी याची जीभ कधी वळत नाही पण स्वैर वचनासाठी मात्र हा आपला गळा वासत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, स्नान करून निर्मळ होण्यासाठी हा विटाळ ठेवला तरी कुठे ? ४

३७१३ काय करूं पोरा लागली चट । धरी वाट देउळाची ॥ १ ॥
सांगितले नेघे कानीं । दुजें मनीं विठ्ठल ॥ २ ॥
काम घरीं न करी धंदा । येथें सदा दुश्चित ॥ ३ ॥
आमचे कुळीं नव्हतें ऐसे । हेंच पिसें निवडलें ॥ ४ ॥
लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखें ॥ ५ ॥
तुका म्हणे नरका जाणे । त्या वचनें दुष्टांचीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– नेघे–घेत नाही, दुजें–दुसरे, पिसे–वेडे.

अर्थ :– या पोराला आता करू तरी काय ? देवळाची वाट धरण्याची याला मोठीच चटक लागून राहिलेली आहे १ एका विठ्ठलाशिवाय हा कानीमनी दुसरे काहीच घेत नाही. २ हा कामधंदाही काही घरी करीत नाही. सतत दुश्चित्त होऊन बसतो ३ आमच्या कुळात तर कुणी असे निपजले नव्हते हेच एक वेडे कसे निवडून निघाले आहे कुणास माहीत ? ४ याला लौकिकाची लाज नसल्यामुळे माझे मलाच पारखे झाले आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या दुष्टाच्या बोलण्याने नरकास जावे लागेल. ६

१ नेदी, २ चले

३७१४ कारणापें असता दृष्टी । शंका पोटीं उपजेना ॥ १ ॥
शूर मिरवे रणागणीं । मरणींच संतोष ॥ २ ॥
पाहिजे तो कळवळा । मग बळा काय उणे ॥ ३ ॥
तुका म्हणे उदारपणे । काय उणें मनाचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उपजेना–निर्माण होत नाही

अर्थ – आपल्या कारणाकडे दृष्टी देऊन असले म्हणजे मनात शका निर्माण होत नाही १ शूर पुरुष रणभूमीवरच शोभतो आणि तेथेच मरण्यात त्याला सतोष वाटतो २ मनात कार्याविषयी खरी कळकळ असल्यावर मग सामर्थ्याची कमतरता काय आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मन जर खरोखर उदार झाले तर काय उणें पडणार आहे ? ४

३७१५ नव्हती हे उसणे बोल । आहाच फोल रंजवण ॥ १ ॥
अनुभव तो बराबरी[1] । नाहीं दुरी वेगळा ॥ २ ॥
पाहिजे ते आले रुची । काचाकुची काशाची ॥ ३ ॥
तुका म्हणे लाजे आड । त्याची चाड कोणासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आहाच–व्यर्थ, उगाच, काचाकुची–सकोच, सयम, चाड–इच्छा

अर्थ – लोकाचे मनरजन करणारे हे काही उगाच उसणे बोलत नाहीत १ सर्वापेक्षा वेगळा असणारा हा अनुभव काही वरवरचा नाही. २ जे पाहिजे तेच जर रुचीस आले असेल तर मग उगाच सकोच कशासाठी ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, जे लाजेने आड होते त्याची इच्छा कोण करणार ? ४

३७१६ जो जो घ्यावा सोस । माझे वारीं गर्भवास । लटिक्याचा दोष । अधिक अडे अगेसीं ॥ १ ॥
आता आहे तैसे असो । अनुताप अगीं वसो । येवढेचि नसो । माझें आणि परावे ॥ २ ॥
जागाजालेपणे । काय नासावे स्वप्न । शब्दाचिया शिणें । कष्ट मिथ्या मानावे ॥ ३ ॥
छाये माकड विटे । धावे कुपीं काय भेटे । तुका म्हणे फुटे । डोई गुडघे कोपर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वारीं–दूर करा, परावे–परक्याचे, कुपीं–विहिरीत

अर्थ – देवा तुमच्याविषयी जो जो सोस घ्यावा तो तो माझे गर्भवास दूर करा खोट्याच्या सगतीने अधिकच दोष अगाला येतात १ आता जशी आमची स्थिती आहे तशीच ती असावी व वृत्तीत नेहमी अनुताप असावा, आणि हे माझे, हे परक्याचे असा भाव माझ्या मनात निर्माण होऊ नये २ जागे झाल्यावर स्वप्न सपून जाते ना ? मग त्यातील वाईट, दु खदायक शब्दामुळे वृथा कष्ट मनास का व्हावेत ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, पाण्यात पडलेल्या स्वत च्या प्रतिबिबावर रागावून जर माकड त्याच्यावर विहिरीत उडी टाकील तर काय होईल ? तेथे त्याला काय भेटणार आहे ? त्याचे गुडघे आणि ढोपर मात्र फुटून जातील ४

३७१७ गुणाचाचि साटा । करू न वजो आणिका वाटा ॥ १ ॥
करिती छद नानापरी । भरोन सिणती आडभरी ॥ २ ॥
नेमली पगती । आम्हा संताची सगती ॥ ३ ॥
तुका म्हणे लीळा । येर कवतुक पाहे डोळा ॥ ४ ॥

१ बरोबरी

शब्दार्थ व टीपा :– न वजों–जाणार नाही, येर–इतर सर्व.

अर्थ :– आम्ही चांगल्या गुणाचाच साठा करू इतर कोणत्याही वाटांना मग आम्ही जाणार नाही १ अनेक लोक नाना प्रकारचे छंद करून आडरानात शिरतात व उगाचच श्रमून जातात. २ संतांच्या पंगतीस व संगतीस राहण्याचाच आमचा नियम झाला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, इतर सर्व कौतुक मी लीलेने डोळे भरून पाहात आहे. ४

३७१८ शिकल्या शब्दाचें उत्पादितों ज्ञान । दरपणींचें धन उपर वाया ।। १ ।।
अनुभव कइं होईन भोगिता । सांकडें ते आतां हेंचि आलें ।। २ ।।
गायें नाचे करीं शरीराचे धर्म । बीजकळावर्म तुमचें दान ।। ३ ।।
तुका म्हणे केला उशीर न साहे । द्याल तरी आहे सर्व सिद्ध ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– सांकडें–प्रकट.

अर्थ – जे शब्द मी वरवरचे म्हणून शिकलो आहे तेच ज्ञान मी प्रकट करीत आहे. आरशात प्रतिबिंबित झालेले धन फुकटच असते. १ खऱ्याखुऱ्या अनुभवाचा भोक्ता मी केव्हा बरे होईन ? याचेच मला आता संकट पडले आहे २ गाणे, नाचणे इत्यादी सर्व धर्म मी शरीराचे करीत आहे परंतु खऱ्या नामबीजाच्या वर्माचे दान करणे हे तुमचेच काम आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता जो उशीर होत आहे तो काही मला सहन होत नाही तुम्ही कृपादान द्याल तरीच सर्व काही सिद्ध होणार आहे ४

३७१९ सिकविला तैसा पढो जाणे पुसा । कैंची साच दशा तैसी अंगीं ।
स्वप्नींच्या सुखें नाहीं होत राजा । तैसा दिसे माझा अनुभव ।। १ ।।
कासया हा केला जिव्हे अळंकार । पायांसी अंतर दिसतसे ।। २ ।।
दर्पणींचे धन हातीं ना पदरीं । डोळा दिसे परी सत्याचियें ।
आस केली तरी लाळचि घोंटावी । ठकाठकी तेवीं दिसतसे ।। ३ ।।
कवित्वें रसाळ वदविली वाणी । साक्ष ही पुराणीं घडे ऐसी ।
तुका म्हणे गुरें राखोनि गोवारी । माझीं म्हणे परि लाभ नाहीं ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– पुसा–पक्षी, पोपट, साच–खरी, दर्पणींचे–आरशातील, ठकाठकी–फसवाफसवी.

अर्थ :– पोपटाला शिकवावे तसा तो पाठ करून बोलतो. पण त्याप्रमाणे त्या शब्दाचा खरा अनुभव आलेला असतो काय ? त्या शब्दाचा अर्थ त्याला समजतो काय ? १ स्वप्नात कुणी राजाच्या ऐश्वर्याचे सुख भोगले तर कधी जागेपणी त्याला तसा अनुभव येईल काय ? श्रीहरीच्या पायाशी अंतर पडत असताना वृथा जिव्हेस अथवा वाणीस कवित्वाचा अलंकार कशासाठी हवा ? २ आरशामधील धन हे डोळ्यांना खऱ्याप्रमाणे दिसते, पण ते कधीही हातात अथवा पदरात येते काय ? त्याची आशा करून कितीही लाळ घोटली तरी काय उपयोग ? त्याचप्रमाणे देवा, ही तुमची फसवाफसवी आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या वाणीने रसभरित अशी वर्णने केली, याप्रमाणे पुराणेही साक्ष देत आहेत. पण लोकांची गुरे राखणारा जरी ही गुरे माझीच म्हणत असला तरी त्या म्हणण्यापासून त्याला काही लाभ असतो काय ? ४

३७२० अनुभव तो नाहीं अमुचिया[1] दर्शनें । अइकिलें कानें वदे वाणी ।
जेविल्याचा कैसा अनुभव अंतरीं । म्हणतां मांडे पुरी काय होतें ।। १ ।।

१ तुमच्या.

शब्दार्थ व टीपा – साच–खरे, उपरोध–राग, संकोच, संकट

अर्थ – देवा तुम्ही आमचे जे भले करणार आहात ते खरे तरी करून दाखवावे आम्ही मागितले आहे त्याप्रमाणे तुम्ही कृपेचे दान आम्हास द्यावे १ जो संकल्प केला जातो त्यासबंधी विकल्प कुठे तरी बोलला जातो काय ? देवा, तुम्हाला पापपुण्य वगैरे सर्व काही समजत आहे २ देवा, तुमची शक्ती मोठी व उदार आहे अशी बीदावली भूमंडळावर सर्वत्र गर्जत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो रुक्मिणीवरा, माझे तुम्ही असे संकट तरी का मानता हो ? ४

३७२२ अहो पुरुषोत्तमा । तुम्हा काशाची उपमा ॥ १ ॥
सतत तो नाहीं बुद्धी । नाळविता नाही शुद्धि ॥ २ ॥
जागविले तरी । तुम्हा व्यक्तियेणे हरी ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । तुम्हा नित्य दिस नवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काशाची–कशाची

अर्थ – अहो पुरुषोत्तमा, तुम्हाला उपमा तरी कशाची द्यावी ? १ कारण सततची अशी बुद्धीची अनुकूलता मला नाही की तुम्हाला नीट आळविण्याइतपत बुद्धीत शुद्धीही नाही २ अहो श्रीहरी, तुम्हाला जागृत केले की, तुम्ही व्यक्त अवस्थेस येता ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्हाला नित्य नवा दिवस येत आहे ४

३७२३ मथने भोगे सार । ताके घडे उपकार ॥ १ ॥
बरवी सायासाची जोडी । अनुभवियां ठावी गोडी ॥ २ ॥
पाक आणि रुचि । जेथें तेथें ते कइंची ॥ ३ ॥
वाढितो पगती । तुका आवडी सगतीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मथनें–ताक घुसळल्याने, बरवी–चागली कइंची–कोणती

अर्थ – ताक घुसळल्याने लोण्याचा उपभोग स्वत साठी घेता येतो आणि ताक दुसऱ्यास दिल्याने उपकारही घडतो १ अशा प्रकारे श्रम करून लाभ घेणे हे बरे हा अनुभव घेणारासच खरी रुची समजते २ पाकसिद्धी केल्याशिवाय त्या ठिकाणची रुची कशी प्राप्त होईल ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, पगतीस बसलेल्याची जशी आवड असेल त्याप्रमाणे मी त्याना वाढत असतो ४

३७२४ चिंतनाची जोडी । हाचि लाभ घडोघडी ॥ १ ॥
तुम्ही वसूनि अतरीं । मज जागवा निर्धारीं ॥ २ ॥
जाय जेथ मन । आड घाला सुदर्शन ॥ ३ ॥
तुका म्हणे मोजें । नाचे हो ऐसे न लज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–प्राप्ती, अतरीं–अत करणात, मोजें–सतोषान

अर्थ – श्रीहरीच्या चिंतनाच्या प्राप्तीचा लाभ घडोघडी होत आहे १ देवा तुम्ही मला तुमच्या अत-करणात स्थान द्या व तुमच्या नामाविषयी निश्चयाने जागृत ठेवा २ ज्या ज्या ठिकाणी मन जाईल त्या त्या ठिकाणी सुदर्शन चक्र आड घालून तुम्ही ते स्थिर करा ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी अवस्था प्राप्त झाल्यावर मी सतोषाने लज्जा न धरता नृत्य करीन ४

३७२५ आवडीचो न पुरे धणी । प्रीत मनीं बैसली ॥ १ ॥
नित्य नवा कळवळा । मायबाळामध्यें तो ॥ २ ॥
सुख सुखा भेटो आले । होय वाल्हे पोटींचे ॥ ३ ॥
तुका म्हणे ब्रह्मानंदें । सतवृंदें चरणापें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – धणी-तृप्ती, वाल्हें-आवडते, जिवलग

अर्थ – माझ्या आवडीच्या इच्छेची तृप्ती होत नाही कारण जो प्रीती मनात स्थिरावलेली आहे ती फलद्रूप होत नाही १ मायलेकरामधील कळवळा नित्य नव्या प्रकारचा असतो २ त्याची भेट म्हणजे सुखच सुखाला भेटायला आल्याप्रमाणे असते इतके ते मूल तिला आवडते असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या ब्रह्मानदाने सताचे समुदाय या श्रीहरीच्या चरणाशी आलेले असतात ४

३७२६ जडलो तों आता पायीं । होऊं काई वेगळा ॥ १ ॥
तुम्हीं सतीं कृपा केली । गगे चाली ओघाची ॥ २ ॥
साभाळिलो[1] मायबापा । केलो तापावेगळा ॥ ३ ॥
धोरसे या जीव धाला । तुका ठेला मौन्यचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काईं-काय, धोरसे-स्नेहभरीत पान्हयामुळे, धाला-सतुष्ट झाला, मौन्य-मौन

अर्थ – मी तुमच्या पायाशी एकदा जडलो आहे तो काय आता वेगळा होऊ ? १ गगेची गती जशी तिच्या पवित्र ओघामधून आहे तशी तुम्ही सतानी मजवर कृपा केली आहे २ मायबापा, या त्रिविध तापातून तुम्ही मला साभाळिले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या कृपेच्या स्नेहभरित पान्हयामुळे माझा जीव सतुष्ट एवढा झाला की, त्याचे वर्णनही करता येणार नसल्याने मी मौन बनलो आहे ४

३७२७ काळावरी सत्ता । ऐसा करितो वारता ॥ १ ॥
तो मी हीणाहूनि साडें । देवा दुन्हें काळतोंडें ॥ २ ॥
मानूनी भर्वसा । होतो दास मी ऐसा ॥ ३ ॥
तुका म्हणे मान । गेलो वाढवू थोरपण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वारता-वार्ता, बोलणे, साडें-नीच

अर्थ – जशी काही माझी सत्ता काळावर आहे असे बोलणे मी करीत असतो १ पण मी वाईटाहूनही नीच अथवा वाईट आहे, कारण देव मला दुरावल्यामुळे मी काळतोंड्या बनलो आहे २ मी देवाचा दास असल्याने तो माझा स्वीकार करील असा विश्वास पोटी बाळगून मी होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे मी माझा थोरपणा या जगात वाढावा म्हणून मान वाढविण्याचा प्रयत्न केला, म्हणूनच श्रीहरीस दुरावलो ४

३७२८ समर्थाचे सेवे कोठें नाहीं घात । पाहो नये अत पाडुरगा ॥ १ ॥
आहे तैसी नीत विचारावी बरी । येऊनी भीतरी वास करा ॥ २ ॥
निढळ राखिले तरी भयाभीत । हर्षामर्ष चित्त पावतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे तरी कळेल निवाड । दर्शनाची चाड शुभकीर्ति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारावी-विचार करावा, भीतरीं-अत करणात, निढळ-कपाळ, नशीब, चाड-इच्छा-

[1] साभाळिलें

अर्थ – पांडुरंगा, समर्थाची सेवा केल्याने पुढे कधी घात होत नाही यासाठी तुम्ही माझा अंत पाहू नये. १ जशी तुमची नीती असेल तसा तुम्ही नीट विचार करावा व माझ्या अंत:करणात येऊन निवास करावा २ जर मला तुम्ही असेच फुटक्या नशीबाचे ठेविलेत तर मला अतिशय भीती वाटून मनात सुखदु:खाचा संघर्ष सुरू होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्या दर्शनाची इच्छा मला आहे, ती जर तुम्ही पूर्ण केली तर तुमच्या चांगल्या कीर्तीचा निवाडा आपोआपच होईल. ४

३७२९ बहु धीर केला । जाण न होसी विठ्ठला ॥ १ ॥
आतां धरीन पदरीं । करीन तुज मज सरी ॥ २ ॥
जालो जीवासी उदार । उभा राहिलो समोर ॥ ३ ॥
तुका विनवी[1] संतां । ऐसे सांगा पंढरिनाथा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जाण–जाणता, सरी–बरोबरी.

अर्थ – विठ्ठला, आतापर्यंत मी पुष्कळ धीर धरला, पण याची जाणीव तुला काहीही नाही १ आता मात्र मी तुला पदराने धरीन व तुझीमाझी बरोबरी करीन २ जीवावर उदार होऊन मी तुझ्या समोर येऊन उभा राहिलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, संतजनहो, अशा प्रकारची विनंती तुम्ही पंढरीनाथाशी करावी ४

३७३० नेदावी सलगी न करावा संग । करी चित्ता भंग वेळोवेळा ॥ १ ॥
सर्प शांतिरूप न म्हणावा भला । झोंबे खवळीला तात्काळ तो ॥ २ ॥
तुका म्हणे दुरी राखावा दुर्जन । करावें वचन न घडे तें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – नेदावी–देऊ नये

अर्थ :– दुर्जनाशी कधीही सलगी होऊ देऊ नये अथवा त्याची संगतही करू नये. कारण त्यामुळे एकसारखा चित्ताचा भंग होतो १ सर्प जरी शांत दिसला तरी तो भला मानू नये, कारण त्याला डिवचले की तो तावडतोब खवळून निघतो २ तुकाराम महाराज म्हणतात, दुर्जनाला नेहमी स्वत:पासून दूरच ठेवावे. त्याच्याशी कधी बोलण्याचा प्रसंग येईल असे करू नये. ३

३७३१ मज अभयदान देईं तूं दातारा । कृपेच्या सागरा मायबापा ॥ १ ॥
देहभाव तुझ्या ठेवियेला पायीं । आणीक मी कांहीं दुजें नेणे ॥ २ ॥
सेवाभक्तिहीन नेणता पतित । आता माझे हित तुझ्या पायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें सर्व ही साधन । नाम संकीर्तन विठोबाचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दुजें–दुसर, नेणे–जाणीत नाही

अर्थ :– कृपेच्या सागरा, मायबापा, दातारा, आता तू मला अभयदान दे. १ आम्ही आमचा देहभाव तुझ्या पायावर ठेविला आहे याशिवाय दुसरे काही आम्ही जाणत नाही. २ मी सेवाहीन, भक्तिहीन, नेणता व पतित असा आहे. आता माझे सर्व हित तुमच्याच चरणापाशी आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठोबाचे नामसंकीर्तन हेच माझे सर्व साधन आहे ४

३७३२ करावा वर्षाव । तृषाक्रांत जाला जीव ॥ १ ॥
पाहें आकाशाची वास । जाणता तूं जगनिवास[2] ॥ २ ॥

१ म्हणे, २ जगदीश

तु. गाथा ३ - ३९

संयोगें विस्तार । वाढी लागे तो अंकूर ॥ ३ ॥
तुका म्हणे फळें । चरणांबुजें तीं सकळें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वास-वाट

अर्थ :- देवा, माझा जीव तुझ्या कृपेच्या वर्षावासाठी तहानलेला आहे. म्हणून तू माझ्यावर कृपेचा व करावास. १ आकाशस्वरूपी असा जो तू त्याची मी वाट पाहात आहे. जगदीशा, तू सर्व काही जाणणारा आहे पाण्याच्या संयोगानेच वृक्षाचा अंकुर वाढीस लागून त्याचा विस्तार होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या चरणकमलाची प्राप्ती हेच याचे फल आहे ४

३७३३ करीं ऐसी धांवाधांवी । चित्त लावीं चरणावें ॥ १ ॥
मग तो माझा मायबाप । घेइल ताप हरुनी ॥ २ ॥
बहुतांच्या मतें गोवा । होऊ जीवा नेदावा ॥ ३ ॥
तुका म्हणे करुणाबोलें । धीर विठ्ठलें निघेना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- चरणावें-चरणावर, गोवा-गुंता

अर्थ :- तू अशा प्रकारची धावाधाव कर की, ज्यामुळे तुझें चित्त श्रीहरीच्या चरणी लागेल १ मग माझा मायबाप तुझ्या सर्व तापांचे निवारण करील. २ अनेकांच्या मतात सापडून तू गुंता होऊ देऊ नकोस, तू आपला जीव गुतु देऊ नकोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू एकदा या विठ्ठलाला करुण वाणीनें मारलीस की मग त्याला धीर निघत नाही. तो धावत येतोच. ४

३७३४ एकविध नारायण । तेथें विषमाचा सीण । पालटोचि भिन्न । नये अणुप्रमाण ॥ १ ॥
अवघें सारावें गाबाळ । चुकवूनिया कोल्हाळ । आनंदाचें स्थळ । एकाएकीं एकांत ॥
कायावाचामन । स्वरूपींच अनुसंधान । लक्ष भेदी बाण । येणें पाडें लवलाही ॥ ३ ॥
तुका म्हणे आळस निद्रा । येथें देउनिया[1] चिरा । देउनियां धीरा । मिठी जाणा जागृती ॥

शब्दार्थ व टीपा – सीण-त्रास, अणुप्रमाण-किंचितही, गाबाळ-इतर असार गोष्टी, केरकचरा, कोल्ह गोंगाट, पाडें-प्रमाणें, चिरा-दगड.

अर्थ – नारायणाची भक्ती एकनिष्ठेने करावी. या बाबतीत विषमतेची भावना त्रास देणारी अ म्हणून या एकविध भावनेविषयी थोडासुद्धा पालट होऊ देऊ नये. १ बाकी सर्व असार गोष्टी दूर कराव्यात. भोवतीचा गोंगाट टाळावा, आणि आनंदाचे स्थान असलेल्या या श्रीहरीविषयी एकान्त साधावा २ लक्ष्याचा करणारा बाण जसे अनुसंधान नीट ठेवितो त्याप्रमाणे कायावाचामनेंकरून श्रीहरीच्या स्वरूपाचे अनुसंधान सारखे ठेवावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आळस व निद्रा यांच्या ठिकाणी दगड ठेवून, त्यांना बंद करून म धीर द्यावा व जागृतीच्या अवस्थेत श्रीहरीस मिठी घालावी. ४

३७३५ हारपोनि गेली निशी । निद्रा कैसी न देखों ॥ १ ॥
नारायणीं वसलें घर । निरंतर आनंद ॥ २ ॥
अवघा रुधविला ठाव । नेला वाव मी माझें ॥ ३ ॥
तुका म्हणे एके ठायीं । असूं नाहीं क्षण भिन्न ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हारपोनि-नाहीशी, निशी-रात्र, रुधविला-व्यापलेला.

१ कर्डानया

अर्थ :– अज्ञानाची रात्र आता नाहीशी झाली आहे आता देहबुद्धीच्या अज्ञानाची निद्रा कशी ती येतच नाही १ आता नारायणाच्या ठिकाणी वस्ती झाल्यामुळे निरंतर आनंदच आहे. २ आता सर्व जागा त्याच्याच स्वरूपाने व्यापलेली आहे. त्यामुळे मी देह व माझ्या देहासंबंधी हा भावच नाहीसा झालेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता देव व मी एकाच ठिकाणचे एकरूप झालो आहोत एक क्षणभरही एकमेकापासून भिन्न असणार नाही. ४

३७३६ पाहा कैसेकैसे । देवें उद्धरिले अनयासें ॥ १ ॥
ऐका नवल्याची[1] ठेव । नेणतां भक्तिभाव ॥ २ ॥
कैलासासी नेला । भिल्ल पानेडी बैसला ॥ ३ ॥
पांखाच्या फडत्कारीं । उद्धरुनी नेली घारी ॥ ४ ॥
चोरें पिंडी दिला पाव । त्या पूजनें धाये देव ॥ ५ ॥
तुका म्हणे भोळा । स्वामी माझा हो कोवळा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– अनयासें–सायास, कष्ट न पडता, नवल्याची–नवलाईची, पानेडी–फांदी, डहाळी, पांखाच्या–पंखाच्या, पाव–पाय, धाये–संतुष्ट झाला

अर्थ :– या देवाने फारसे कष्ट न देता पहा जीवाचा कसकसा उद्धार केला तो १ जीव भक्तिभाव जाणीत नसले तरी त्याने त्याचा उद्धार केला ही नवलाची गोष्ट ऐका. २ कुणी एक भिल्ल झाडाच्या फांदीवर बसून चुकून बेलाची पाने खाली शिवाच्या पिंडीवर टाकीत होता पण शिवशंकराने तीच पूजा मानून त्याला कैलासास नेले ३ पंखाच्या फडत्कारामुळे घारीचाही उद्धार झाला ४ चोराने चुकून पिंडीवर पाय दिला पण या देवाने यामुळे आपली पूजा घडली असे मानले तो संतुष्ट झाला ५ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा माझा स्वामी फार भोळा असून अतिशय कोवळ्या अंतःकरणाचा आहे. ६

विवरण — ईश्वर, भक्तांस कसा भुलून जातो व आपल्या भक्तास कोणत्याही प्रकारचे कष्ट न देता तो त्याचा उद्धार कसा करतो यासंबंधी तुकोबांनी या अभंगात थोडी वेगळी अशी उदाहरणे दिलेली आहेत 'भोळा स्वामी माझा हो कोवळा ' या ओळीमधील भोळेपणा शिवशंकराचा अभिप्रेत असावा असे या अभंगातील उदाहरणावरून वाटते भागवत संप्रदायातील हरिहर यांचे ऐक्य समजावून घेतल्यास बुवांनी शिवाच्या भोळेपणाची उदाहरणे येथे दिली, त्याचे रहस्य समजून येण्यासारखे आहे. बेलाच्या वृक्षावर बसून मृगाची शिकार करणाऱ्या एका भिल्लाकडून शिवपूजन कसे घडले याची एक शिवरात्रीसंबंधीची मनोहर कथा शिवपुराणात आलेली आहे चोरीमारी व मृगया करणारा एक क्रूर स्वभावाचा भिल्ल गुरुद्रुह नावाचा होता. एके दिवशी भुकेने पीडित होऊन जलाशयाच्या आसपासच्या एका बेलाच्या झाडावर तो मृगयेची वाट पाहात रात्रभर बसून राहिला. पाणी पिण्यासाठी येणाऱ्या मृगीवर धनुष्यबाण रोखण्याच्या गडबडीत धक्क्यामुळे काही बिल्वपत्रे खाली असणाऱ्या शिवलिंगावर पडली या शिवपूजेने व्याधाचे पातक सपत आले. रात्रभर याच मार्गाने त्याच्याकडून शिवपूजन घडले शिवशंकर त्याला प्रसन्न झाले व त्यांनी त्याला कैलासपदाची प्राप्ती करून दिली एका घारीने आभाळात उडताना अजाणपणे भर दोन प्रहरच्या उन्हात खाली जमिनीवर असलेल्या शिवलिंगावर छाया धारण केली, त्यामुळे तिचाही उद्धार झाल्याची कथा सांगितली जाते

३७३७ अनुभव ऐसा । मज लागला सरिसा ॥ १ ॥
पाठी बैसली सेजारीं । नव्हे शांत कोणे परी ॥ २ ॥
कोठें न लगे जावें । काहीं घालावया ठावें ॥ ३ ॥
तुका म्हणे कोटि । दुःखाच्याच तये पोटीं ॥ ४ ॥

१ नवल्यायाची.

शब्दार्थ व टीपा – सरिसा-एकसारखा

अर्थ – पुढे सांगितल्याप्रमाणे अनुभव माझ्या बरोबर एकसारखा आहे १ हे नाना प्रकारचे विकार माझ्या पाठीशी व शेजारी बसले आहेत कोणत्याही उपायाने ते शांत होत नाहीत २ त्याच्यासाठी कुठेही जावे लागत नाही की त्याना बोलवावे लागत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याच्या पोटी अनेक प्रकारची दु खे आहेत ४

३७३८ पाठीवरी भार । जातो वाहूनिया खर ॥ १ ॥
सत नेतील त्या ठाया । माझी आधीन त्या[1] काया ॥ २ ॥
मोटचीफळ । अगीं उच्छिष्टाचे बळ ॥ ३ ॥
न सडीं मारग । येथें न चोरूनि अग ॥ ४ ॥
आपुलिया सत्ता । चालविती नाहीं चिंता ॥ ५ ॥
फळवळिला तुका । घराचार येथें नका ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – खर-गाढव, काया-शरीर मोटचीफळ-शरीराचे गाठोडे

अर्थ – पाठीवर ओझे घेऊन मी पुढीलप्रमाणे गाढवासारखा जात आहे १ ज्या ठिकाणी सत नेतील तेथे मी जाईन माझा देह त्याच्याच स्वाधीन केलेला आहे २ त्याच्या उच्छिष्टाच्या सेवनाने माझ्या अगी पुष्कळच बळ आलेले आहे ३ मी या ठिकाणी अग चोरणार नाही आणि हा माग पण सोडणार नाही ४ या सतानी आपल्या सत्तेने सर्व चालविले असल्याने मला काहीच चिंता नाही ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी फारच कळवळून सागत आहे की, मला येथे कुणी आता लोकाचार साग़ू नयेत ६

३७३९ मागें पुढें जालो लाटा । अवघा मोटा सरळ ॥ १ ॥
नाहीं कोठें रिते अग । नित्य रग नवाचि ॥ २ ॥
पोसिण्याचे पडिलो हातीं । वोझें[2] माती चुकली ॥ ३ ॥
जोगावलो पोटीं खर । पाठी भार वरि नाहीं ॥ ४ ॥
अवघिया मोकळ्या दिशा । नाहीं वोळसा कामाचा ॥ ५ ॥
सताचिये लोळें द्वारीं । पळती दुरी गोमाशा ॥ ६ ॥
काहीं न साहेसा जाला । तुका नेला समर्थ ॥ ७ ॥
पाहातो गे महाद्वारीं । वरि झुली वाकळा ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – लाटा-माठा, खर-गाढव

अर्थ – मागूनपुढून असा सर्व बाजूनी मी मोठा सरळ व बलवान झालो आहे १ आमच्यात कुठेही रिते अग राहिलेले नाही त्यामुळे नित्य नवा असा स्वानुभवाचा रग चढत आहे २ पालनपोषण करणाऱ्या सताच्या हाती मी पडलो असल्यामुळे माझ्या देहात्मबुद्धीचे ओझे सुटले ३ मज गाढवाचे या सताच्या कडून पोषण झाले असल्यामुळे माझ्या पाठीवर आता ससाराचे ओझे नाही ४ मला सर्व दिशा आता मोकळ्या आहेत त्यामुळे कामाच्या वळशात मी बाधलेलो नाही ५ सताच्या दारात मी लोळण घेत आहे त्यामुळे नाना विकाराच्या गोमाशा दूर पळतात. ६ या तुकोबाला समर्थ सतानी स्वीकारलेले असल्यामुळे मला कोणताही भार सहन होत नाहीसा झाला आहे ७ तुकाराम महाराज म्हणतात, प्रभूप्रेमाची झूल वा वाकळ या सतानी माझ्या अगावर घालून मला आपल्या महाद्वारात उभे केले आहे ते तुम्ही पाहा ८

१ त, २ मास

३७४० करणें न करणें वारलें जेथें । जातों[1] तेणें पंथें संतसंगें ॥ १ ॥
संतीं हें पहिलें लाविलें निशाण । ते खुणा पाहोन गर्जे नाम ॥ २ ॥
तुका म्हणे तुम्ही चला याचि वाटे । भरवशानें भेटे पांडुरंग ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- वारलें-संपलें.

अर्थ :- जेथे करणे व न करणे हे दोनही भाव संपतात तेथे मी या संतांच्या संगतीने जात आहे. १ या ठिकाणी प्रथमच संतांनी कीर्तीचे निशाण लावले आहे. ते पाहून मी हरिनामाची गर्जना करीत राहीन. २ तुकाराम महाराज म्हणतात, लोकहो, तुम्हीही याच मार्गाने चलावे. येथेच पांडुरंगाची भेट खात्रीने होईल. ३

३७४१ कइंचें कारण । तृष्णा वाढविते सीण ॥ १ ॥
काय करूनि ऐसा संग । सोसेंचि तूं पांडुरंग ॥ २ ॥
रूपीं नाहीं गोडी । हांवे हांवे उर फोडी ॥ ३ ॥
तुका न पडे भरी । ऐशा वरदळाचे योरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कइंचें-कोणते, सीण-श्रम.

अर्थ :- लौकिकाची तृष्णा ही श्रम वाढविणारी असल्याने तिला कोणत्या कारणाने जवळ करावी ? १ तिचा संग करून काय हित होणार ? तू पांडुरंगाचीच आवड धर. २ या श्रीहरीच्या रूपाची जर गोडी वाटली नाही तर संसाराची हाव वाढून ऊर फुटण्याचा प्रसंग येईल. ही हाव ऊरफोडी असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे वरवरच्या गोष्टींच्या भरीस पडू नये. ४

३७४२ धन्य तो ग्राम जेथें हरिदास । धन्य तोचि वास[2] भाग्य तया ॥ १ ॥
ब्रह्मज्ञान तेथें[3] असे घरोघरीं । धन्य त्या नरनारी चतुर्भुज ॥ २ ॥
नाहीं पाप रिघ काळाचें जीवन[4] । हरिनामकीर्तन घरोघरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तिहीं तारिलें सकळां । आपल्या कोटिकुळासहित जीवें[5] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- रिघ-शिरकाव.

अर्थ :- जेथे श्रीहरीचे दास निवास करतात ते स्थान धन्य होय. त्या स्थानावर ज्याचा निवास असतो तो धन्य झाला. १ या गावातील लोक चतुर्भुज होऊन ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगत असल्यामुळे ते सर्व नरनारी धन्य होत. २ घरोघरी श्रीहरीच्या नामाचे संकीर्तन होत असल्यामुळे त्या गावात पापाचा शिरकाव होत नाही. काळाचा त्या ठिकाणी प्रवेश होत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या हरिदासांनी आपल्या कोटिकुळांसहित सर्व लोकांचा उद्धार केला आहे. ४

३७४३ मारूं नये सर्प संतांचिये दृष्टी । होतील ते कष्टी व्यापकपणें ॥ १ ॥
एक सूत्र जीवशिवीं आइक्यता । रोम उपडितां अंग कांपे ॥ २ ॥
नाहीं साहों येत दुखाची ते जाती । परपीडा भूतीं[6] साम्य जालें ॥ ३ ॥
तुका म्हणे दिला नीतीचा संकेत । पुजा नांवें चित्त सुखी तेणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- रोम-केस.

अर्थ :- संतांच्या दृष्टीने पाहिले असता सर्पास देखील मारू नये. कारण व्यापकपणे ईश्वरतत्त्वच सर्वत्र भरून राहिलेले असल्याने त्यांना यामुळे दुःखच होते. १ आपल्या अंगावरचा केस उपटल्यावर जसे दुःख आपणास

१ जालों, २ वरा भक्तिभाग्य, ३ जेथें, ४ खडन, ५ वरा, ६ होती.

होते त्याप्रमाणे जीवशिवात एकच सूत्र असल्यामुळे, दोहोत ऐक्य असल्यामुळे दुसऱ्याच्या दुःखाने ते दु.खीच होतात.२ सर्व भूतमात्रांत त्यांना साम्यत्वाचा अनुभव आलेला असल्यामुळे परपीडेचे दुःख ते सहन करू शकत नाहीत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जीवांचा मत्सर सोडून चित्त सुखी करणे हीच खरी पूजा होय. हाच नीतीचा मुख्य संकेत आहे. ४

विवरण:– दुसऱ्या जीवास कोणत्याही प्रकारचे दुःख देऊ नये, कोणत्याही प्रकारची हिंसा हातून घडू नये हा एक सिद्धान्त संताच्या उपदेशातील महत्त्वाचा मानला जातो. सर्व चराचर सृष्टीत एकच परमेश्वराचा चैतन्य-धागा असल्यामुळे, एकच जीवनसूत्र असल्याने परपीडा पाहून संताचे अंतकरण कळवळून जाते. म्हणून जीव-सृष्टीला थोडाही धक्का आपणाकडून लागू नये याची काळजी संतमहात्मे नेहमी घेत असतात आपणाकडून हिंसात्मक आचरण घडून ईश्वरस्वरूपास पीडा न व्हावी म्हणून महात्मे कसे वागतात याचे मोठे बहारदार वर्णन श्रीज्ञानदेवानी आपल्या अहिंसेवरील निरूपणात केलेले आहे. ' अजातशत्रु तरुवरा। सर्वांगी देवविल्या शिरा ' पाहून ज्ञानदेवाचे कोवळे मन कंपित झालेले दिसते. सर्वच जीवसृष्टी प्रभूच्या नानाविध रूपानी नटलेली असल्याने साधुसंताची चाल कशी असते ? ज्ञानदेवानी म्हटले आहे, ' कां कमळावरी भ्रमर। पाय ठेविती हळुवार। कुचुंबैल केसर ह्यया शका ॥ तैसे परमाणु पांगुतले। जाणूनि जीव सानुले । कारुण्यामाजीं पाउलें। लपवूनि चाले ॥' साधुसंताच्या या समत्वाच्या दृष्टीत ' मारू नये सर्प संतांचिये दृष्टी'चे तत्त्वज्ञान असते.

सर्पाला सुद्धा मारू नये, कारण तेही प्रभूचेच रूप, या संतप्रणीत सिद्धान्ताला व्यवहाराची मुरड घालण्याल तुकोबा विसरलेले नाहीत. यासाठी त्याना ' देव्हाऱ्यावरी विंचू आला । देवपूजा नावडे त्याला ' या संदर्भातील अभग पाहावा. ' अधमासी तो अधम ' असाही व्यवहार ते सागून जातात

३७४४ भय होतें आम्हीपणें । पाठी येणें घातलें ॥ १ ॥
अवघा आपुलाचि देश । काळा लेश उरेचि ना ॥ २ ॥
समर्थाचें नाम घेतां । मग चिंता काशाची ॥ ३ ॥
तुका म्हणे नारायणें । जालें जिणें सुखाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काशाची–कशाची

अर्थ :– मीपणाची भावना जोपर्यंत होती तोपर्यंत मोठेच भय वाटत असे. पण आता ती बुद्धी नाहीशी करून श्रीहरीने पाठीशी घातले आहे. १ आता सर्व देश आपलाच असल्याचा अनुभव आला असून काळाचा लेश-भरही शिरकाव येथे होणार नाही. २ या समर्थ अशा प्रभूचे नाव घेतल्यानंतर चिंता कशाची आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, या नारायणाने कृपा करून आमचे हे असे जिणे सुखाचे केले आहे. ४

३७४५ विषम वाटे दुरवरी । चालूनि परती घरी[१] । मागील ते उरी । नाहीं उरली भयाची ॥१॥
मुख्य न व्हावा तो नाड । सेवटाचे हातीं गोड । सरलिया चाड । मग कैंचे उद्वेग ॥ २ ॥
होता पहिला अभ्यास। समयीं घालावया कास । तेव्हा लटिके दोष । योगें अनुतापाच्या ॥३॥
तुका म्हणे आहे । बुद्धी केलियानें साहे । जवळीच पाहें । देव वाट स्मरणाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाड–गरज, कैंचे–कसली, उद्वेग–काळजी, चिंता.

अर्थ :– लोकहो, तुम्ही विपरीत वाटेने चालत आहात म्हणून हा श्रीहरी तुम्हांपासून दूर जात आहे. यासाठी तुम्ही तेथून माघारी फिरा. म्हणजे मग ती मागच्या भयाची उरी राहाणार नाही. १ मुख्य विषमाचा नाश झाल्यास शेवटी चांगले कार्य हाती येईल. या विषम भावाचीच गरज नाहीशी झाली की मग काळजी तरी कसली आहे ? २ या विषयी तुमचा मूळचा जो अभ्यास होता तो नीट कास धरून बळकटपणे करावा. म्हणजे

१ घरी.

पश्चात्ताप झाल्यावर खोटे असलेले दोष नाहीसे होतील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही आपली बुद्धी साहच-कारी करून घेतल्यावर तो देव तुमच्याच जवळ आहे. हा देव आपल्या नामस्मरणाचीच वाट पाहात असतो. ४

३७४६ आतां कोठें धांवे मन । तुझे चरण देखिलिया ॥ १ ॥
भाग गेला सीण गेला । अवघा जाला आनंदु ॥ २ ॥
प्रेमरसें बैसली मिठी । आवडी लाठी मुखासी ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां जोगें । विठ्ठल घोगें खरें माप ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– भाग–थकवा, सीण–त्रास, लाठी–मोठी, घोगें–मोठे

अर्थ :– देवा, तुझे चरण मी पाहिले आहेत. आता माझे मन कोणत्या ठिकाणी धाव घेणार ? १ त्यामुळे माझ्या मनाचा सर्व थकवा आणि शीण नाहीसा झाला आहे. म्हणून आज मी मोठ्या आनंदात आहे. २ तुझ्या विषयीच्या प्रेमरसाची मिठी बसलेली असून त्याची मोठीच आवड माझ्या मुखास लागून राहिली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीविठ्ठल हे माप मोठे व खरे असून ते आमच्याजोगे आहे. ४

३७४७ विश्वीं विश्वंभर । बोले वेदांतींचा[1] सार ॥ १ ॥
जगीं जगदीश । शास्त्रें वदती सावकाश ॥ २ ॥
व्यापिलें हें नारायणें । ऐसीं गर्जती पुराणें ॥ ३ ॥
जनीं जनार्दन । संत बोलती वचन ॥ ४ ॥
सूर्याचिया परी । तुका लोकीं[2] क्रीडा करी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वदती–बोलतात, सांगतात

अर्थ :– सर्व विश्वात हा श्रीहरी व्यापून राहिल्यामुळे त्यास विश्वंभर म्हणतात हे सर्व वेदांतील मुख्य तत्त्व आहे १ जगाचा स्वामी जगदीश आहे असे सर्व शास्त्रे एकमताने सांगत आहेत २ सर्व विश्व हे या नारायणाने व्यापिले आहे अशी गर्जना पुराणांनी केली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सूर्य ज्याप्रमाणे सर्व जगात भ्रमण करून सर्वत्र प्रकाश देतो त्याप्रमाणे हा श्रीहरी सर्व लोकात क्रीडा करीत आहे अथवा हा तुका सर्व जगतात क्रीडा करीत आहे ४

विवरण :— हा एक तत्त्वदर्शी व अनुभूतिसंपन्न असा तुकोबाचा अभंग आहे शेवटच्या ओळीचा अर्थ *तुकाराम या लोकात सूर्याप्रमाणे क्रीडा करतो असाच घ्यावा लागतो. त्यामुळे तुकोबांचा यथार्थ आत्मविश्वासही येथे* चांगलाच प्रकट झाला आहे सर्व जगतात, चराचर विश्वात एकच वासुदेवतत्त्व भरून राहिलेले आहे सर्व विश्वाला भरून राहिलेला हा श्रीहरी विश्वंभर आहे सर्व जगताचा स्वामी म्हणून जगदीश आहे नारायण म्हणजे सर्व पाण्याच्या समूहाचे आधारस्थान, सर्व जगताचे अधारस्थान; या नारायणाने सर्व जगताला व्यापले आहे श्रीविष्णू सर्व जगताला व्यापून आहे. जे जे काही ते सर्व वासुदेवमय आहे. 'वासुदेवः सर्वमिति' अशी गीतेची निष्ठा आहे 'बीज मां सर्वभूतानां' असे अतूट नाते श्रीहरीचे व व्यक्त जगाचे आहे. एकतत्त्वाच्या या आविष्काराची अनुभूती तुकोबांनी घेतली होती. सर्व विश्वात जसा विश्वंभर भरून राहिलेला आहे, तसाच सूर्यही सर्व जगतावर अधिराज्य गाजवणारा आहे. सूर्य जसा निर्भयपणे सर्वत्र प्रवेश करून अंधार दूर करतो त्याप्रमाणे मी तुकाराम सर्व जगतास सामावून अज्ञानाचा अंधार दूर करतो. संशयाची जाळीजळमटे नष्ट करतो. सूर्याप्रमाणेच साऱ्या विश्वास धवळून टाकतो. अणुरेणूहूनही लहानसा असणारा तुकाराम आकाशाएवढा होतो. 'धवळले जगदाकार । अंधार तो निरसला' अशी बुवांची साक्ष आहे. '*आमुचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास' अशी त्यांच्या अनुभूतीची उक्ती आहे. या प्रभूच्याच* वास्तव्याने 'विश्व अवघें कोंदाटलें' असल्यामुळे 'जेथें देखें तेथें तुझींच पाउलें' अशी प्रचीती तुकारामबुवांना येत राहाते.

१ वेदांतीचे, २ जगी.

३७४८ निरोधतों[1] परि न मोडे विकार । बहु हीं दुस्तर विषयद्वारें ॥ १ ॥
राहातेति तुम्ही भरोनि अंतरीं । होतो तदाकारी निर्विषयचि ॥ २ ॥
कृपेचिया साक्षी असती जवळी । वचनें मोकळीं सरत नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे ताळा मेळवणीपाशीं । विनंती पायापाशीं हेचि करीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निरोधतों–दमन करतो, अंतरीं–अंतःकरणात

अर्थ :– देवा, मी सर्व इंद्रियांचे दमन करतो, परंतु त्यांचा विकार काही दूर होत नाही कारण नाना विषयांची ही द्वारे फारच कठीण आहेत. १ पण तुम्ही जर माझ्या अंतःकरणात वास्तव्य करून राहाल तर मी तुमच्याशी एकरूप होऊन निर्विषयी अशा अवस्थेला जाईन २ तुमच्या कृपेची साक्ष जवळ असताना त्याशिवाय मोकळी बोलणी उपयोगी पडणारी नाहीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, मूळच्या स्वरूपाविषयी ताळमेळ घ्यावा अशी मी तुमच्या पायाशी विनंती करीत आहे ४

विवरण –आपली इंद्रिये, त्यांचे विकार आणि त्यांच्या स्वाधीन झालेले चंचल मन यांच्यासंबंधी मोठे सूचक आणि अनुभवावर आधारलेले उद्‌गार तुकोबांच्या अभंगातून सापडतात या मनाचे व इंद्रियांचे दमन करणे अतिशय कठीण काम आहे जरी त्याना दडपले तरी ते पुन वर उसळी मारते ' चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद् दृढम् । तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ' मन हे निःसंशय चंचल असून निग्रह करण्यास अतिशय कठीण असे आहे परंतु सतत अभ्यासाने व वैराग्याने त्याचा निग्रह करता येतो असे भगवद्‌गीतेने सांगितले आहे हे मन इंद्रियांच्या आधीन झाले की फारच तापदायक होते ' जें बुद्धीतें सळी । निश्चयातें टाळी । धैर्येसी हातफळी । मिळवूनि जाय ॥ जें विवेकातें भुलवी । संतोषासी चाड लावी । बैसिजे तरी हिंडवी । दाही दिशा' असे या चंचल व तापदायक मनाचे यथायोग्य वर्णन ज्ञानदेवानी केलेले आहे ' जें निरोधलें घे उवावो । जया संयमुचि होय सावावो । तें मन आपुला स्वभावो । सांडील काई ? ' असा प्रश्नही त्यानी विचारलेला आहे श्रीहरीच्या प्राप्तीसाठी तुकोबांचा जो अंतर्बाह्य असा युद्धप्रसंग सतत चालू होता, त्यात या मनोनिग्रहाचा व इंद्रियमनाचा प्रयत्न लक्ष देऊन पाहाण्यासारखा आहे ' कामक्रोध आड पडले पर्वत । राहिला अनंत पलीकडे ' अशी हुरहूर त्यांच्या मनाला सततची होती ' इंद्रियांची आम्ही पाळिलों अंकितें । त्यांचे रगीं चित्र रंगलेंसे । एकाचेंही मज न घडे दमन । अवघी नेमून कैसीं राखो ' अशी त्यानी प्रामाणिकपणे तक्रार केली आहे आपण इंद्रियांच्या स्वाधीन होत चाललो आहोत याचे फार मोठे दुःख तुकोबाना झालेले दिसते ' ' इंद्रियांचीं दिनें । आम्हीं केलो नारायणें ' अशी कबुली त्यानी दिलेली आहे ' काय करूं आता या मना । न सडी विषयांची वासना ' अशी त्यांची तक्रार आहे ' भरलें विषयमोवडी । धालू पाहे उडी भवडोहीं ' अशा आपल्या मनास ताळ्यावर आणण्याच्या प्रयत्नात वुवा होते त्याना ताळ्यावर तरी कसे आणावयाचे ? ' अधिक कोंडिता चरफडी । भलतीकडे घाली उडी ' अशी त्यांची वृत्ती त्याना माहीत होती म्हणून एक उपाय त्यांच्या मनास सुचला श्रीहरीच आपल्या अंतःकरणात भरून राहिलला आहे अशी जाणीव झाली की मग आपण ' होतो तदाकारी निर्विषयचि ' असा अनुभव त्याना येत राहिला ' आपुलेंचि मन । करवी आपणा बंधन ' असे असले तरी श्रीहरी अंतःकरणात निवास करून आहे अशी खात्री झाल्यावर मात्र मन तदाकारच होत जाते सतसहवास, वैराग्यशील अनुताप आणि प्रभूची जवळीक यानी मन इंद्रियांच्या कोंडीतून बाहेर पडते आणि प्रभूशी एकरूप होत दुस्तर असणारे इंद्रियादिकांचे विषय मग विरघळून जातात सर्वत्र प्रभूचाच विलास दिसत राहतो, अनुभवास येतो

३७४९ अद्वयचि द्वय जालेचि कारण । धरिले नारायणें भक्तिसुख ॥ १ ॥
अपरोक्ष आकार जाला चतुर्भुज । एकतत्त्व बीज भिन्न नाहीं ॥ २ ॥
शून्य निरसूनि राहिले निर्मळ । ते दिसे केवळ विटेवरी ॥ ३ ॥

---
१ निरोधिता

**सुखें ध्यावें नाम वदना ही चाड । सरिता वापी आड एक पाणी ॥ ४ ॥**
**तुका म्हणे मीच आहे तेणे सुखें । भेद नाहीं मुखें नाम गातो ॥ ५ ॥**

शब्दार्थ व टीपा :- अपरोक्ष-डोळ्यादेखत, चाड-इच्छा, सरिता-नदी, वापी-विहीर.

अर्थ :- जो देव मूळात अद्वैती व निराकार आहे तोच द्वैतावर सगुण रूपात आलेला आहे. कारण नारायणानेच भक्तिसुखासाठी हे सगुण रूप धारण केले आहे. १ हा देव डोळ्यादेखत चतुर्भुज होऊन आकारास आला आहे. हा अनुभव सर्वांनाच आहे, असे असले तरी एकत्वाच्या बीजात भिन्नता आलेली नाही. २ सर्व शून्यत्वास निरास होऊन हे निर्मळ रूप विटेवर उभे राहिलेले दिसत आहे. ३ त्याचेच नाम मोठ्या सुखात मुखाने ध्यावे एवढीच इच्छा आहे. नदी, विहीर, आड याचे आकार व नामे वेगळाली असली तरी सर्वातील पाणी एकच आहे. त्याप्रमाणे हा देव नामरूपानी भिन्न दिसला तरी तत्त्वत: एकच आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, याचे नाम मुखाने गात असताना एकत्वाचा भेद होणार नाही. याच सुखाने मी परिपूर्ण आहे ५

विवरण :- या जगताचे आदिकारण जे परब्रह्म ते निराकार, निर्गुण व अव्यक्त असले तरी त्याला स्वत:ला एकाकी न करमल्यामुळे ते नाना रूपानी व आकारानी व्यक्त झाले. निर्गुणाचे सगुण झाले, निराकाराचे साकार झाले. या अवस्थान्तराने फार मोठा भेद पडला असे नाही उलट अद्वैताची, निराकाराची, अव्यक्ताची गोडी चाखण्याची सोय झाली अद्वैत ज्ञानाचा भोग सगुणामुळे फिटून प्रेमाची बहार निर्माण झाली. यासाठी सगुण-निर्गुण, साकार-निराकार, अव्यक्त-व्यक्त, अद्वैत-द्वैत असे भेद न मानता तत्त्वत दोन्ही एकच मानण्याचा निर्णय अनुभवान्तीं साधुसंतानी घेतलेला आहे या नारायणानेच स्वत:ला भक्तिसुख लुटता यावे म्हणून हे सगुण साकार रूप धारण केले आपल्या आवडत्या भक्तासाठी देव काय करतो ? या भक्तामुळे, या भक्ताच्या सगुण प्रीतीमुळेच त्याला फार मोठे सुख होते तो त्याच्यासाठी साकार होतो, अवतार धारण करतो. निराकार असलेला देव चतुर्भुज रूप धारण करीत असला तरी मूळच्या एकत्वात बिघाड होत नाही एकत्व, अद्वैत कायम ठेवूनच तो अनेकत्वाच्या, द्वैताच्या अवस्थेला आलेला असतो याही अवस्थेत त्याला प्रेमसुखाची गोडी वाटते. याच सुखासाठी तो उत्सुक असतो हा श्रीहरीच म्हणू लागतो, ' म्हणोनि मा नमस्कारू । तयातें आम्ही माथा मुकुट करूं । तयाची टाच धरूं । हृदयीं आम्ही ॥ तयाचिया गुणाचीं लेणीं । लेववू आपुलिया वाणीं । तयाची कीर्ति श्रवणीं । आम्ही लेऊं ॥ तो पहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसी मज डोळे । हातींचेनि लीला कमळें । पुजूं तयातें ॥ दोंवरी दोनी । भुजा आलों घेऊनि । आलिंगावयालागुनी । तयाचें आंग ॥ तया संगाचेनि सुरवाडें । मज विदेहा देह धरणें घडे । किंबहुना आवडे । निरुपमु ॥ ' भक्तांच्या सुखासाठी श्रीहरीस अशा रीतीने द्वैतावर यावे लागते

अद्वैत-द्वैत, निराकार-साकार, निर्गुण-सगुण हे शब्द वरवर अभेदत्वाने दिसत असले तरी संताच्या बोधात त्याच्यात भेद नाही. ' अद्वयचि द्वय झाले ' हीच अनुभूती सर्व संतानी व्यक्त केली आहे ' ज्या नाम अनंत न कळे सवेंत । वेदासाही हेत हारपला ॥ ते रूप सानुले यशोदे तान्हुले । भोगिती निमोले भक्तजन ' अशी या अनंताची, निराकाराची, साकार व सगुण कथा निवृत्तिनाथानी वर्णन केली आहे ' अरूप वागडे निर्गुण सवगडे । खेळे लाडेकोडें नंदाघरीं ' असे याचे कौतुक त्यानी गाइले आहे. त्याच्या मते ' जेथून उद्गार प्रसवे ॐकार । तोचि हा श्रीधरू गोकुळीं वसे ' निर्गुण-सगुण हा अशा प्रकारे एकच आहे ' नामी रूपीं गोडी ब्रह्मांडा एवढी । द्वैताची परवडी हारपली ' असे निवृत्तिनाथानी म्हटले आहे ' सगुणीं निर्गुण निर्गुणीं सगुण । दोन्ही भिन्नपण नसे मुळी ' अशी साक्ष ज्ञानदेवाची आहे त्यासाठी नेहमीप्रमाणे दृष्टांत देताना त्यानी म्हटले आहे, ' हेम अलंकार अलंकारीं हेम । मृन्मयेंची धाम धाम तेंचि ' त्यानीच एक सिद्धांत सांगितला आहे की, ' पिंडचि ब्रह्मांड ब्रह्मांडचि पिंड । ब्रह्मचि अखंड ब्रह्मरूप ' असे असल्याने ' काही भेद नाहीं किंचित् महत् ' याप्रमाणे साकारनिराकार, सगुणनिर्गुण यात संतानी भेद मानलेला नाही ' तुज सगुण म्हणू का निर्गुण रे । सगुण निर्गुण एक गोविंदु रे ' अशी त्याची अनुभूती आहे. ' निर्गुणा अंगीं सगुण वाणले । निर्गुण सगुण एकत्वा आले ' असे नामदेवरायानी म्हटले आहे. या निर्गुणास, निराकारास, अव्यक्तास ' लक्षूनिया योगी पाहती आभास । तें दिसे आम्हास दृष्टीपुढे ' असे तुकोबानी म्हटले आहे. ' तरुवर बीजा पोटीं । बीज तरुवर शेवटीं ' असे हे नाते आहे अव्यक्त व्यक्तास आले म्हणून, निर्गुण सगुण झाले

तु गाथा ३ - ४०

म्हणून, निराकार साकार झाले म्हणून दोहोंत काही भेद नाही. उलट दुसऱ्यास पहिल्याचा आस्वाद घेणे सुलभ झाले. पहिल्याची रुची दुसऱ्यामुळे चाखता आली. पहिल्याची जाणीव दुसऱ्यामुळे आली. अद्वयातील नित्य, निरामय असा जो आनंद योगी भोगतात ' ते हे चरण साजिरे विटेवरी । पाहा भीमातीरीं विठ्ठलरूप ' असे तुकोबानी म्हटले आहे; म्हणूनच त्यांनी सांगितले आहे की, आम्ही जरी आमच्या मुखाने या श्रीहरीचे नामरूपगुण गात असलो तरी बोधास असलेच अद्वैत भोगास द्वैत बनते. वस्तुतः दोहोंत भेद नाही.

३७५० उदार चक्रवर्ती । वैकुंठीचा भूपति ।
पुंडलिकाचिया प्रीती । विटेवरी राहिला ।। १ ।।
सर्वसिद्धीचा दातार । सवें आणिला परिवार ।
भक्ता अभयंकर[1] । घ्याघ्या ऐसें म्हणतसे ।। २ ।।
जेणें हें विश्व निर्मिलें । महर्षीदेवा संस्थापिलें ।
एकवीस स्वर्गातें धरिलें । सत्तामात्रें आपुलिया ।। ३ ।।
तुका म्हणे कृपावंत । इच्छिले पुरवी[2] अर्थ ।
रिद्धिसिद्धिमुक्ती देत । शेवटीं संग आपुला ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :- भूपति-राजा, अभयंकर-अभय देणारा हात, शेवटीं-शेवटी.

अर्थ :- हा वैकुंठीचा राजा चक्रवर्ती उदार असून पुंडलीकाच्या प्रीतीसाठी पंढरपूर येथे विटेवर येऊन उभा राहिला. १ सर्व प्रकारच्या सिद्धी प्राप्त करून देणाऱ्या या देवाने आपल्या बरोबर सर्व परिवार आणलेला आहे. भक्त लोकांना अभय देणारा याचा हात असून तो तो उभारून दान घ्या दान घ्या असे म्हणत आहे. २ त्याने हे सर्व जग निर्माण केले, देवांची व ऋषींची स्थापना केली व एकवीस स्वर्गांना आपल्या सत्तेने धारण केले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा देव कृपावंत असून भक्तांच्या इच्छा पूर्ण करणारा आहे. ज्यांना रिद्धी, सिद्धी, मुक्ती हव्यात त्या त्यांना देत असतो आणि शेवटी इच्छुकाना आपली संगतही देतो. ४

३७५१ सकलगुणें संपन्न । एक देवाचें लक्षण ।। १ ।।
वरफड[3] कोठें कांहीं । एक आहे एक नाहीं ।। २ ।।
षड्गुण ऐश्वर्य संपन्न । एक भगवंतीं जाण ।। ३ ।।
तुका म्हणे जेजें बोला । तेंतें साजे या विठ्ठला ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :- वरकड-इतरत्र, षड्गुण-यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य, हे सहा गुण. ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान, वैराग्य असेही सहा गुण ईश्वराचे मानले आहेत. सर्वज्ञता, तृप्ती, अनादिज्ञान, स्वातंत्र्य, शक्तिप्रकाशन व अनंतशक्तित्व हे सहा गुण श्रीकृष्णाचे आहेत.

अर्थ :- सकल गुणांनी संपन्न असे लक्षण फक्त या एका देवाचेच आहे. १ त्याच्या खेरीज इतरत्र कुठे काही एक आहे, एक नाही, असे प्रकार असतात. २ ऐश्वर्य, ज्ञान, श्री, वैराग्य इत्यादी सहा गुणांनी संपन्न असा एक भगवंतच आहे असे तुम्ही जाणा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या विठ्ठलाला जे जे ऐश्वर्याचे विशेषण लावाल ते ते शोभून दिसणारे आहे. ४

विवरण -देवाला सकलगुणसंपन्न म्हटले आहे ऐश्वर्य, ज्ञान, वैराग्य, श्री इत्यादी सहा गुणांनी तो परिपूर्ण आहे असे म्हटले असले तरी त्याचे गुण अनंत आहेत, त्याची रूपे व नामे अनेक आहेत. भक्तांनी आपल्या कल्पनेने अथवा अनुभूतीच्या साह्याने या देवाचे ऐश्वर्य नाना प्रकारांनी वर्णन केले आहे. ज्या ज्या गुणाचे वर्णन करावे ते ते या देवाला शोभून दिसते. श्रीहरी सगुण व साकार झाला की त्याचे गुणवैभवही नाना प्रकारे खुलून राहिले. शक्ती,

१ अभयकर, २ पुरविले मनोरथ, ३ कोठें काही कोठें काही.

सामर्थ्य, देखणेपणा, कृपालुत्व इत्यादी गुणांनी या देवाची शोभा अधिकच वाढत राहिली आपापल्या उपास्य देवाचे मोठे मनोहर रूप भक्त कल्पितात नाना शृंगार व अलंकार घालून या श्रीहरीस अधिकच नटवतात भगवंताचे ध्यान करण्यासाठी त्याचे सगुण रूपविशेष मनाशी रेखूनच भक्त आपलं चित्त त्याच्याशी निगडित करतो ध्रुवाने भगवंताचे कसे ध्यान करावे हे भागवतात विस्ताराने सांगितले आहे भगवंताच्या साऱ्या ऐश्वर्याची झळाळी तेथ प्रकट झाली आहे भगवंताचे मुख व नेत्र प्रसन्न आहेत त्याची नासिका, भृकुटी, गाल हे योग्य परिमाणाचे व सुंदर आहेत त्याचे सर्व अवयव रमणीय आहेत त्याचे ओठ, नेत्र, अधर हे रक्तवर्णाचे आहेत त्याच्या वक्षस्थलावर श्रीवत्साचे चिन्ह आहे त्याचे शरीर मेघाप्रमाणे काळसर आहे त्याच्या कंठात वनमाळ रुळत आहे शंख, चक्र, गदा, पद्म या चार आयुधांनी तो शोभत आहे त्याच्या मस्तकावर किरीट आहे कानात कुंडले आहेत बाहूंत बाहुभूषणे आणि हातात कटके (कडी) आहेत, गळ्यात कौस्तुभ मण्यांनी शोभलेली माळ आहे तो पीतांबरधारी आहे त्याच्या कमरेभोवती कमरपट्ट्याचे वेष्टण आहे, पायात सुवर्णाची नूपुरे आहेत अशा या भगवंताचे सकलगुणांनी संपन्न व ऐश्वर्यवान रूप भक्तांना ध्यानासाठी हवे असते याच सगुण व रमणीय रूपावर त्याचे मन जडते याच रूपाचा त्याच्या मनास वेध लागतो ' शंखचक्र गदा पद्मसहित हरी ' नामदेवांना प्रिय होतो ' वाळे वाकी गर्जे तोडर चरणीं । नाद झणझणे वाजतातीं ' या प्रकारच्या नादमधुर वर्धात भक्त गुंतून जातात ' पीतांबर कटींतटीं दिव्य चंदन उटी ' असेही रूप नामदेवासमोर उभे राहते ' रूप सावळें सुंदर । कानीं कुंडले मकराकार ॥ गळा माळ वैजयंती । पुढें गोपाळ नाचती ' अशा रूपावर जनाबाई मुग्ध झालेली आहे ' वैजयंती माळा किरीट कुंडले । परिधान केले पीत वस्त्र ' अशी मूर्ती चोखोबाच्या समोर उभी आहे तशाच सगुण व ऐश्वर्यसंपन्न रूपास ' पाहतां लोचन सुखावलें ' अशी तुकोबाची अवस्था झाली आहे ' रूपीं गुंतलें लोचन । पायीं स्थिरावलें मन ' अशी त्याच्या मनाची अवस्था का झाली ? कारण हा विठ्ठल म्हणजे ' राजस सुकुमार मदनाचा पुतळा । रविशशिकळा लोपलिया ' असे त्याचे सौंदर्य आहे त्याच्या कपाळावर कस्तुरीचा मळवट आहे अंगास सुवासिक चंदनाची उटी आहे ' मुकुट कुंडले श्रीमुख शोभले । सुखाचे ओतले सकळही ' अशी त्याच्या रूपाच्या सौंदर्याचा शोभा आहे त्याच्या मुकुटाची शोभा किती आहे ? तर तुकोबांनी म्हटले आहे, ' मुकुट माथा कोटि सूर्यांचा झळाळ ' अशा या सकल गुणांनी व ऐश्वर्याने शोभणाऱ्या श्रीहरीस पाहताच ' तहान हारपली भूक ' अशी भक्ताची अवस्था न झाली तरच नवल आहे

३७५२ वैकुंठींचें[1] सुख पंढरिये आलें । अवघें पुंडलिकें साटविलें ॥ १ ॥
ध्या रे ध्या रे माझे बाप । जिव्हा घेऊनि खरें माप । करा एक खेप । मग करणें न लगे ॥२॥
विषय गुंडोनी ठेवीं पसारा । मग धांव घ्या पंढरपुरा ॥ ३ ॥
जंव आहे आयुष्याचा लेश । तंव करीं पंढरीचा वास ॥ ४ ॥
आळस न करीं लाभाचा । तुका विनवी कुणबियाचा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – गुंडोनी–आटोपून, लेश–अंश

अर्थ – वैकुंठात असणारे हे सुख या पंढरपुरात आलेले असून ते पुंडलीकरायाने साठवून ठेविले आहे १ माझ्या मायबापांनो, तुम्ही आपल्या जिभेने याचे खरे माप करून तुमच्या हृदयात साठवून घ्या ना या पंढरपुरची एक जरी खेप केली तरी मग पुन पुन जन्म घेण्याचा प्रसंग येणार नाही २ सर्व लौकिक विषयाचा पसारा गुंडाळून ठेवा आणि पंढरपुराकडे धाव घ्या ३ जोपर्यंत आयुष्याचा थोडासा अंश शिल्लक आहे तोपर्यंतच पंढरपूर येथे त्वरेने धावत यावे तेथे वास्तव्य करावे ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही या लाभाविषयी आळस अगदी करू नका अशी विनंती मी कुणबी तुकाराम करीत आहे ५

१ सुख पंढरीयें आलें । पुंडलिकें साठविलें, २ नावडे.

३७५३ देवाचें चरित्र नाठवे[1] सर्वथा । विनोदार्थ कथा गोड वाटे ॥ १ ॥
हातावरि हात हातोनि आफळी । वाजवितां टाळी लाज वाटे ॥ २ ॥
तुका म्हणे थुंका त्याच्या तोंडावरि । जाती यमपुरी भोगावया ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – नाठवे–आठवत नाही, आफळी–जोराने आपटतो

अर्थ :– या माणसास देवाची चरित्रकथा कधी आठवत नाही. परतु कुणी गप्पागोष्टी विनोदासाठी केल्या तर त्या गोड वाटतात १ अशा गोष्टी ऐकून हा हातावर हात जोराने आपटतो किंवा दुसऱ्याच्या हातावर टाळी देतो, पण हरिभजनात मात्र टाळी वाजविताना याला लाज वाटते २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकाच्या तोंडावर थुकावे कारण अशी माणसे यमपुरीच भोगायला जात असतात. ३

३७५४ अद्वैतीं तो माझें नाहीं समाधान । गोड हे चरण सेवा तुझी ॥ १ ॥
करूनि उचित देई हेचि दान । आवडे कीर्तन नाम तुझें ॥ २ ॥
देवभक्तपण सुखाचा सोहळा । ठेवुनी निराळा दावी मज ॥ ३ ॥
तुका म्हणे आहे तुझें हें सकळ । कोणी[2] एके काळें देई मज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अद्वैती–देव व भक्त एकच आहेत अशा तत्त्वात

अर्थ :– देवा, अद्वैततत्त्वाच्या ठिकाणी माझे मन समाधान पावत नाही, त्यापेक्षा तुझ्या चरणाची सेवा मला अधिक गोड वाटते १ तुझे नामसकीर्तन मला आवडत असल्यामुळे तेच उचित असो देणगी तुम्ही मला द्यावी. २ तू देव व मी भक्त अशाच नात्यात जो प्रेमभक्तीचा सोहळा होतो तो तुम्ही देवा, मला तुमच्यापासून वेगळे ठेवून भोगावयास द्या ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे सर्व जगत तुझेच आहे तरीपण कुठल्या तरी एखाद्या वेळेस तू मला माझ्या इच्छेप्रमाणे वरीलप्रमाणे कृपादान द्यावेस. ४

विवरण– या एका अतिशय सोप्या व प्रसादपूर्ण अभगात तुकोबानी भक्तीचे मर्म स्पष्ट केले आहे आत्मस्थितीचा भाव, ब्रह्मरूपी विलीनत्व, अद्वैताची अनुभूती, नाना प्रकारच्या मुक्ती याची इच्छा सर्वांनाच असली तरी सताचे लक्ष याहून पलीकडे असते ब्रह्मपदप्राप्ती, आत्मस्थिती, मोक्ष, वैकुठपदाचा लाभ इत्यादी गोष्टीपेक्षा त्याना भगवताचे सगुण व साकारलेले नयनमनोहर रूप डोळ्यापुढे हवे असते. त्याच्याकडे डोळे भरून पाहावे, त्याच्या रूपाचे वर्णन करावे, त्याच्यावर कधी रुसावे, रागवावे, कधी त्याच्या लीला वर्णन कराव्यात, कधी आर्त वाणीने त्याच्या नावाचा पुकार करावा, कधी आपली दुःख करुण वाणीने त्याला सागावीत, तर कधी त्याच्या भेटीची, अगसगाची इच्छा धरावी, यातच भक्ताला फार मोठे सुख वाटते या सुखासाठी ते लालचावलेले असतात यातच त्याना श्रेष्ठ प्रकारचा आनद होतो म्हणूनच तुकाराम महाराज म्हणतात, 'अद्वैतीं तो माझें नाहीं समाधान' कारण या अद्वैताच्या प्राप्तीत कुणी कुणावर रुसाव, रागवावे ? कुणी कुणाच्या रूपाचे वर्णन करावे ? यातील सुखाचा सोहळा अनुभवास यायचा असेल तर 'मी भक्त तू देव' अशीच अवस्था असावयास हवी या अवस्थेत भगवताची सेवा करता येते म्हणून तुकोबा वारवार श्रीहरीस विनवितात, 'आत्मस्थिती मज नको हा विचार। देईं निरतर चरणसेवा' आत्मस्थितीच्या भावात सगुण भक्तीचे सुख नसल्याने सतानी त्या भावास अथवा अद्वैताच्या प्राप्तीस दूर सारले आहे सत हे याप्रमाणे जरी द्वैतावरील सगुण भक्तीत रगून गेले असले तरी त्याच्या अनुभूतास अद्वैताचाच, एकत्वाचाच आधार असतो हेही स्पष्टपणे ध्यानी घ्यावयास हवे ज्ञानासाठी, बोधासाठी अद्वैत, आत्मस्थिती, ब्रह्मरूपत्व आणि भोगासाठी सगुण रूप, आपण व देव वेगळे असा भाव ज्ञानोत्तर भक्तीची ही मौज केवळ सतश्रेष्ठातच चाखावयास मिळते

१ नावडे, २ कोणें

३७५५ हेंचि माझें तप हेंचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ॥ १ ॥
हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥ २ ॥
हाचि माझा धर्म हेंचि माझें कर्म । हेचि नित्यनेम नाम तुझें ॥ ३ ॥
हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ । हेंचि जपध्यान नाम तुझें ॥ ४ ॥
हेंचि माझें ज्ञान श्रवण मनन । हेंचि निजध्यासन नाम तुझें ॥ ५ ॥
हाचि कुळाचार हाचि कुळधर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥ ६ ॥
हा माझा आचार हा माझा विचार । हा माझा निर्धार नाम तुझें ॥ ७ ॥
तुका म्हणे दुजें साधायासि नाहीं । नामेंविण काहीं धनवित्त ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – सुकृत–पुण्य दुजें–दुसरे

अर्थ :– देवा, तुझे नामस्मरण करणे हेच माझे तप, दान व अनुष्ठान आहे १ तुझे नाम घेणे हीच माझी तीर्थयात्रा आहे, हेच माझे व्रत आहे, हेच माझे खरे पुण्य आहे २ तुझ्या नामस्मरणात तल्लीन होणे हाच माझा धर्म आहे हेच माझे कर्तव्यकर्म आहे आणि हाच माझा नित्य नेम आहे ३ तुझे नामस्मरण हाच माझा योग, यज्ञ, जप व ध्यान आहे ४ तुझे नामस्मरण हेच माझे ज्ञान, श्रवण मनन व निजध्यास आहे ५ तुझे नामस्मरण केले की माझा कुळाचार होतो कुळधर्मही माझा हाच असून नित्यनेमही हाच आहे ६ तुझे नामस्मरण हाच माझा आचार आणि विचार आहे असे मी निश्चयाने म्हणतो ७ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्या एका नामाशिवाय माझ्याजवळ दुसरे साधण्यासारखे कोणतेही धनवित्त नाही ८

विवरण – या कलियुगात इतर कोणत्याही साधनापेक्षा नामसंकीर्तनाचा मार्ग सोपा व खात्रीचा म्हणून भागवत संप्रदायातील सर्व संतानी त्याचा सतत पुरस्कार केलेला आढळतो सगुण उपासनेला अत्यावश्यक असलेले नामस्मरण इच्छित वस्तूची प्राप्ती करुन देणारे असते ही इच्छित वस्तू म्हणजे धनदौलत, लौकिक प्रतिष्ठा, स्वास्थ्य, मानसन्मान वगैरे नसून प्रभूची प्रीतीच होय यासाठी वारकरी पथाने प्रभूच्या नामस्मरणाला महत्त्व दिले आहे या एका अभगात तुकाराम महाराजानी केवळ नामस्मरणामुळे काय काय साधते याचे मोठे समर्पक वर्णन केले आहे माझे तप, दान, अनुष्ठान, तीर्थ, व्रत, धर्म, कर्म, नित्यनेम, योग, यज्ञ, जपध्यान, कुळाचार, कुळधर्म, इत्यादी सर्व काही मला नामानेच साध्य होते असे बुवा म्हणतात. याचा अर्थ असा की, या सर्व साधनाची प्रापचिक जीवास तशी आवश्यकता नाही उगाच देहाला कष्ट देणे, कष्ट करीत राहणे सताना पसत नसून नामस्मरणानेच चित्तशुद्धी होऊन प्रभूची जवळीक प्राप्त होईल अशी त्याना खात्री आहे.

म्हणून इतर सर्व साधनापेक्षा सोप्या अशा नामसकीर्तनाचा प्रचार तुकोबासारख्या सतानी अनेकदा केलेला आहे या नामस्मरणामुळे अनेक पातक्याचा उद्धार झाल्याचाही उल्लेख अनकदा येतो वरील अभगाचा मुख्य रोख इतर खडतर साधनापेक्षा नामस्मरणाचा मार्ग श्रेष्ठ कसा आहे यावर आहे इतर मार्गांनी जे कष्टाने साध्य होईल तेच नामस्मरणान, सहज प्रीतीने हाती येईल असा भावार्थ या अभगाचा आहे 'सकळ धर्मांचे कारण। नामस्मरण हरिकीर्तन' असे ज्ञानदेवानी म्हटले आहे 'मत्रांचा पै मत्र हरी हा उच्चार। न लगे तो विचार करणे काहीं' अशा शब्दात नामदेवानी नाममत्राची महती गाइली आहे 'नामपरता मत्र नाहीं त्रिभुवनीं' अशी त्याची ग्वाही आहे 'सकळ साधनाचे सार। रामकृष्ण हा उच्चार' असे त्यानी सागितले आहे 'व्रत तप दान हवन पूजन। न चले साधन नाम म्हणता' अशी त्याचीही साक्ष आहे 'तप तीर्थ दान हे सर्व कुवाड। नाम एक वाड केशवाचे' अशा शब्दात नामदेवानी इतर साधनाहून नाम श्रेष्ठ असल्याचे सागितले आहे 'एक नाम अवघें सार। यरकड अवघें तें असार' असे जनाबाईचे सागणे आहे 'योग याग तप व्रते आचरिता। नाम सोपें गाता सर्व जोडे' असे एकनाथानी म्हटले आहे 'साधिन साधता शिणताती मुनी। तो हरी कीर्तनीं नाचतसे' असे नाममाहात्म्य कीर्तनाच्या निमित्ताने त्यानी सागितले आहे तुकारामबुवानी तर दुसऱ्या एका अभगात 'समुद्रवलयांकित पृथ्वीचे दान। करिता

समान नये नामा ' म्हणून नामाचा गौरव केला आहे ' नामापरते साधन नाहीं पैं आणीक । भवसिंधु तारक हेंचि एक ' असे त्याचे एक वचन आहे आपले सर्वस्व नामस्मरणात सतांना दिसते

३७५६ कोणें[1] साक्षीविण । केलें उद्धारा भजन ॥ १ ॥
ऐसे सांगा जी दातारा । माझी भक्ति परंपरा ॥ २ ॥
कोणें नाहीं केली आळी । ब्रह्मज्ञानाहूनि वेगळी ॥ ३ ॥
कोणाचे तों[2] कोड । नाहीं पुरविला लाड ॥ ४ ॥
कोणाच्या उद्धारा । केला विलंब माघारा ॥ ५ ॥
तुका म्हणे भिन्न । काही बोले साक्षीविण ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – आळी–हट्ट, कोड–इच्छा

अर्थ – देवा, काही साक्ष पटल्यावाचून उद्धारासाठी कुणी तुमचे भजन केले आहे काय ? १ दातारा, या बाबतीत तुम्हीच सांगा माझी तर भक्तीची परंपरा आहे. २ यापूर्वी ब्रह्मज्ञानाशिवाय काही वेगळा हट्ट केला नाही की काय ? ३ यासबधी तुम्ही कौतुकाने कुणाचे लाड पुरविले नाही काय ? ४ यापूर्वी तुम्ही कधी कुणाच्या उद्धारास विलंब केला होता काय ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, काही साक्ष पटल्यावाचून मी काही अशा प्रकारचे बोलत नाही ६

३७५७ सुखरूप चाली । हळूहळू उसतिली ॥ १ ॥
बाळगोपाळाची वाट । सेव्यसेवकता नीट ॥ २ ॥
जरी झाला श्रम । तरी पडो नये भ्रम ॥ ३ ॥
तुका म्हणे दासां । देव सरिसासरिसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उसतली–आक्रमीत गेलो, सरिसासरिसा–तात्काळ

अर्थ – ही वाट आम्ही मोठ्या सुखाने आक्रमीत गेलो १ सेव्यसेवकपणाची ही वाट नीट असल्यामुळे बाळगोपाळानाही सुलभ आहे २ या मार्गाने थोडेफार जरी श्रम झाले तरी त्यामुळे कुणासही भ्रम पडत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव आपल्या दासाबरोबर तात्काळ येत असतो ४

३७५८ चुकली ते[3] वाट । पुढें सांपडवी नीट ॥ १ ॥
*म्हणउनी गर्भवास । नेणती ते[4] हरिचे दास ॥ २ ॥*
संचिताचा संग । काय जाणों पावे भंग ॥ ३ ॥
तुका म्हणे दृष्टी । उघडितो नव्हे कष्टी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नेणती–जाणीत नाहीत, भंग–नाश

अर्थ – जी वाट एकदा चुकली ती पुढे नीट सापडावी १ म्हणून श्रीहरीचे दास गर्भवासाचे दुःख जाणीत नाहीत २ त्याच्या संचित कर्माचा नाश झाला की काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याची ज्ञान दृष्टी उघडली आहे तो कधी जन्ममृत्यूच्या फेऱ्यामुळे कष्टी होत नाही ४

३७५९ कई तो दिवस देखेन मी डोळा । कल्याण मंगळामंगळाचें ॥ १ ॥
आयुष्याच्या शेवटीं पायासवें भेटी । कळिवरें तुटी जाल्या[5] त्वरे ॥ २ ॥
सरो हें संचित पदरींचा गोवा । उतावीळ देवा मन जालें ॥ ३ ॥

१ कोण, २ त्वा, ३ ती, ४ हे, ५ जाल्या तरे

पाउलापाउलीं करिता विचार । अनतविकार चित्ता अगीं ॥ ४ ॥
म्हणउनि भयाभीत होतो जीव । भाकितसे कींव अटाहासें ॥ ५ ॥
तुका म्हणे होइल आइकिले कानीं । तरि चक्रपाणी धाव घाला ॥ ६ ॥
दुःखाच्या उत्तरीं आळविले पाय । पाहणे तो[1] काय अजून अत[2] ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – कई–केव्हा, कळिवरें–देहानें, गोवा–गुंता

अर्थ – कल्याणदायक व मगलातील मगल असा दिवस केव्हा खरे डोळयांनी पाहीन ? १ आयुष्याच्या शेवटी देवाच्या पायाची भट होऊन देहाने जरी सपला तरी तो तरून जाईल २ आपल्या पदरी सचितकर्माचा जो गुंता आहे तो सपून जावा देवा, याविषयी माझे मन फारच उतावीळ झाले आहे ३ पावलोपावली जो जो विचार करावा तो तो चित्तात अनेक विकार असल्याचे ध्यानात येते ४ म्हणून माझा जीव भयभीत होतो मी मोठ्या अट्टाहासाने तुझी करुणा भाकीत आहे ५ मोठ्या दुःखाने मी तुमच्या पायांशी हाका मारीत आहे तरीही तू अजून माझा अत पाहतोस की काय ? ६ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू माझे हे करुणापूर्ण बोल कानानी ऐकले असशील तर चक्रपाणी, आता भेटीसाठी धावत ये ना ७

३७६० कळो येतें वर्म । तरि न पवतो श्रम ॥ १ ॥
तुम्हा शिरीं होता भार । आम्हा कैंचा सचार[3] ॥ २ ॥
होतें अभयदान । तरी स्थिर होतें मन ॥ ३ ॥
तुका म्हणे पाहे । ऐसी वाट उभा आहें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कैंचा– कसला, सचार–ससार असावे

अर्थ – खरोखर परमार्थाचे मर्म जर समजून येईल तर काही मला श्रम झाले नसते १ आमचा सर्व भार तुमच्या शिरावर असताना आम्हाला ससार कसला आला आहे ? २ तुम्ही एकदा अभयदान दिल्यावर मन स्थिर होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशासाठी मी तुझी वाट पाहात उभा आहे ४

३७६१ वारवार हाचि न पडावा विसर । वसावें अतर तुमच्या गुणीं ॥ १ ॥
इच्छेचा ये दाता तू एक समर्थ । अगा कृपावंता मायबापा ॥ २ ॥
लाभाचिये वोढी उतावळि[4] मन । त्यापरि चिंतन चरणाचे ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवीं जीवन ओलावा । पाडुरगे द्यावा शीघ्र आता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतर–अतःकरणात, वोढी–ओढीनें

अर्थ – देवा, वारवार तुमच्या गुणाचा विसर होऊ नये त्याचा निवास निरतर माझ्या अतःकरणात असावा १ अगा कृपावता, मायबापा, इच्छेप्रमाणे दान देणारा तू एक समर्थ दाता आहेस २ लाभाच्या ओढीने मन उतावळे बनले असून त्यासाठी तुमच्या चरणांचेच चिंतन ते करीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरगे, जीवाचे जीवन जो प्रेमाचा ओलावा तो तू आता त्वरित द्यावास ४

३७६२ आइका माझीं कवतुकउत्तरें । देउनी सादरें चित्त देवा ॥ १ ॥
बोरसे आवडी आलों पायापासीं । होय ते मनेसीं[5] सुख कीजे ॥ २ ॥
तुमचे न भगे सर्वोत्तमपण । करितां समाधान लेकराचे ॥ ३ ॥
तुका म्हणे जरी बोलतो बोबडें । तरी वाडे कोडें कवतुक ॥ ४ ॥

१ ते, २ आता, ३ ससार, ४ उताविळे, ५ मानसी

शब्दार्थ व टीपा :– बोरसें–प्रेमपान्हयाच्या, वाडेकोडें–अतिशय कौतुकाने.

अर्थ :– देवा, मी जे कौतुकाने बोलत आहे त्याकडे सावध चित्ताने तुम्ही लक्ष द्या व ऐका. १ प्रेमपान्ह्याची आवड असल्यामुळे मी आपल्या पायापाशी आलो आहे. माझ्या मनाला जेणेकरून सुख होईल असे तुम्ही करा. २ आमच्यासारख्या लेकराचे समाधान करताना तुमच्या सर्वोत्तमपणाचा भेद होऊ नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी जरी बोबडे बोलत असलो तरी तुम्ही अतिशय कौतुकाने ते माझे बोलणे ऐकावे. ४

३७६३ जन्मा आलियाचा लाभ । पद्मनाभदरुषणें ॥ १ ॥
पाठीलागा येतो काळ । तूं कृपाळ माउली ॥ २ ॥
कोण्या उपायें हें घडे । भव आंगडें सुटकेचें ॥ ३ ॥
बहु उसंतीत आलों । तया भ्यालों स्थळासी ॥ ४ ॥
तुका म्हणे तूं जननी । ये निर्वाणीं विठ्ठले ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– आंगडें–अगरखा, उसंतीत–आक्रमण करीत, निर्वाणीं–शेवटी.

अर्थ :– या पद्नाभाच्या दर्शनामुळेच जन्मास आल्याचा लाभ होतो १ देवा, हा काळ माझा पाठलाग करून येतो आहे. परंतु तू कृपाळू माऊली आहेस. २ देवा, संसाराचा हा अंगरखा कोणत्या उपायाने संपेल हो ? ३ संसाराचा मार्ग मी फार दिवस आक्रमण करीत आलो आहे पण या शेवटच्या स्थळाशी भयभीत होत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा वेळी देवा, तू माऊली आहेस विठ्ठले, तू या शेवटच्या प्रसंगी धावत ये. ५

३७६४ नाहीं गुणदोष लिपों देत अंगीं । झाडितां प्रसंगीं वरावरी ॥ १ ॥
निकटवासिया आळवितो[1] धांवा । तेथूनियां देवा सोडवूनी ॥ २ ॥
उमटे अतरीं ते करूं प्रगट । कळोनी बोभाट धांव घालीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तरि वांचलों या काळें । समर्थांचे बळें सुखी असो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वरावरी–वरचेवर, अतरीं–अंत करणात.

अर्थ – मी गुणदोष अंगी लावू देत नाही असे प्रसंग वरचेवर मी झाडून टाकीत असतो. १ जवळ वास करणाऱ्या देवा, मी आळवून तुमचा धावा करीत आहे. तू धावत ये व येथून माझी सुटका कर. २ आमच्या अंत करणात जे येत आहे ते प्रकट करू ते तुम्हांला समजेल. तुम्ही मग माझ्या रक्षणासाठी धावत या. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या समर्थाचे बालक असल्याने या काळाच्या मुखातून वाचलो असून सुखी आहोत. ४

३७६५ आतां येणें पडिपाडें । रस सेवूं हा निवाडें । मुंगी नेली गोडें । ठेविलिये अडचणी ॥ १ ॥
तैसें होय माझ्या जीवा । चरण न सोडीं केशवा । विषयवुद्धि हेवा । घोस पडो सकळ ॥ २ ॥
भुकेलिया श्वाना । गांठ पडे सवे अन्ना । भुंको[2] पाहे प्राणा । परि तोंडिंचो न सोडी ॥ ३ ॥
काय जिकियेलें मन । जीवित्व कामातुरा तृण । मागे विभिचारिण । भक्ती तुका ये जाती॥४॥

शब्दार्थ व टीपा :– पडिपाडें–युक्तीने, रीतीने, निवाडें–निवडून, हेवा–हाव

अर्थ :– अडचणीत ठेवलेली साखर गोडीमुळे मुंगी जशी नेत राहाते त्याप्रमाणे आता नीट निवडून परमार्थाचे सेवन कर. १ या मुंगीप्रमाणे माझे मन हावरे झाले आहे केशवा, तुमचे चरण मी सोडणार नाही. माझ्या विषयबुद्धीची हाव संपून जावी २ भुकेलेल्या कुत्र्याची व अन्नाची गाठ पडल्यावर त्याच्या तोंडाचे अन्न जरी कुणी हिसकावून घेऊ लागले तरी ते सोडीत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मनास काय जिंकले असते ? आपले जीवित तृणाप्रमाणे मानूनही कामातुर पुरुष व्यभिचारी स्त्रीचा संग मागत असतो. देवा, या तीव्रतेची भक्ती मी मागत आहे ४

१ आळवितां, २ भुंके.

३७६६ न पवीजे तया ठाया । आलों कायावलेशेसीं ॥ १ ॥
आतां माझें आणीं मना । नारायणा ओजेचे ॥ २ ॥
बहु रिणें पिडिलों फार । परिहार करावा ॥ ३ ॥
तुका म्हणे निर्बळशक्ति । काकुलती म्हुण येतों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- काया-शरीर, ओजेचे-नीट, सरळ, म्हुण-म्हणून.

अर्थ :- शरीराला क्लेश देऊन येथे आलो तरी त्या ठिकाणी प्रवेश मिळत नाही. १ नारायणा, आता काही तरी सरळ विचार तुम्ही तुमच्या मनात आणा ना २ मी पुष्कळ मोठ्या कर्जाने पीडित झालो आहे त्यातून तुम्ही माझी सुटका करावी. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी शक्तिविहीन असल्यामुळे फारच काकुळतीस येत आहे. ४

३७६७ बहु फिरलों ठायाठाव । कोठें भाव पुरेचि ना ॥ १ ॥
समाधान तो पावलो । उरलो बोलो यावरि ॥ २ ॥
घे गा देवा आशीर्वाद । आमुच्या नांद भाग्यानें ॥ ३ ॥
तुका म्हणे जेवूं आधीं । खटखट मधीं सारावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- खटखट-कटकट, सारावी-दूर करावी.

अर्थ :- मी आजपर्यंत पुष्कळ ठिकाणी हिंडलो. परंतु माझ्या मनातील भाव कुठेच पूर्ण होत नाही १ पण देवा, आता समाधान झाले म्हणून यापुढे केवळ बोलण्यासाठीच मी उरलो आहे २ देवा, तूच आता आमचा आशीर्वाद घे आणि आमच्याच भाग्याने तू नीट सुखाने नांद. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आधी आपण प्रीतीने जेवण करू. त्यासाठी मधील ही कटकट दूर करावी. ४

३७६८ कोण येथें रिता गेला । जो जो आला या ठाया ॥ १ ॥
तातडी ते काय आतां । ज्याची चिंता तयासी ॥ २ ॥
नांवासाटीं नेघें भार । न लगे फार वित्पत्ति ॥ ३ ॥
तुका म्हणे न लगे जावें । कोठें देवें सुचनें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- रिता-रिकामा, ठाया-स्थानाकडे, नेघे-घेत नाही, वित्पत्ति-व्युत्पत्ती, शब्दज्ञान, सुचनें-सुचेना असावे

अर्थ :- या स्थानाकडे जो जो आला तो काही रिकामा राहिला नाही १ या ठिकाणी उगाच तातडी करण्याचे काय काम आहे ? ज्याची त्यास सर्व चिंता आहेच की २ हा एका नामाशिवाय इतर कोणत्याही साधनाचा भार घेत नाही याच्या प्राप्तीसाठी फार शब्दज्ञानाचीही गरज लागत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाशिवाय कुठे जावेसे वाटत नाही की काही सुचत नाही. ४

३७६९ इंद्रियाचें पुरे कोड तेंचि गोड पुढती ही ॥ १ ॥
जावें म्हणती पंढरपुरा । हाचि बरा संसार ॥ २ ॥
बैसले तें मनामुळीं । सुख डोळीं देखिलें ॥ ३ ॥
तुका म्हणे देती कान । वाणावाण निवडूनी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड-इच्छा, वाणावाण-चागल्यावाईटाची

अर्थ :- इंद्रियाची इच्छा ज्यामुळे पूर्ण होते तेच पुढे गोड वाटू लागते १ पदरपुरात जावे असे म्हणतात, पण हा ससारच त्याना बरा वाटू लागतो २ जे मनाच्या मुळाशी बसले आहे तेच मुख त्यांनी डोळ्यानी पाहिले ३ तुकाराम महाराज म्हणतात, चागल्यावाईटाची निवड करून ते त्याकडे लक्ष देत असतात ४

३७७० आता देवा मोकळिले । तुम्ही भले दिसेना ॥ १ ॥
आता नाही जीवभाव । उरला ठाव वेगळा ॥ २ ॥
साभाळुन घ्यावे देवा । आपणासवा यावरि ॥ ३ ॥
तुका म्हणे नाग भाज । तरि ते लाज स्वामीसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .- मोकळिले-त्याग केलात, ठाव-आधार, स्थान, सवा-बरोबर, भाज-बायको

अर्थ – देवा, आता तुम्ही आमचा त्याग केलात हे काही चागले दिसत नाही तुम्हाला १ आता आमच्या जीवभावास दुसरा कुठलाही आधार उरलेला नाही २ देवा, आता यानतर तुम्ही तुमच्या बरोबर मला सांभाळून घ्यावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, बायको नागवी हिंडू लागली तर तिची लाज नवऱ्यासच आहे ४

३७७१ आशावद्ध आम्ही भाकितसो कीव । तत्पर हा जीव कार्यापाशीं ॥ १ ॥
प्रतिउत्तराची पाहातसे वाट । करूनि बोभाट महाद्वारी ॥ २ ॥
आपुल्या उचिते करुनिया ठेवीं । सबध गोसावी तोडोनिया ॥ ३ ॥
तुका म्हण एक जालिया निवाड । कोण वडबड करी मग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .- निवाड-निकाल.

अर्थ – देवा, आम्ही जीव आशेने बद्ध झालेले असून तुमी करुणा भाकीत आहोत स्वकार्य साधण्यासाठी आमचा जीव तत्पर बनलेला आहे. १ या महाद्वारापाशी उभे राहून मी गवगवा करीत आहे व तुमच्या उलट उत्तराची वाट पहात आहे २ गोसावी, स्वामी, लौकिकाचा सबध तोडून टाकून जे आपणास उचित वाटेल ते करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा यासबधीचा निकाल लागल्यावर मग कोण बडबड करीत बसेल? ४

३७७२ खद्योते फुलविले रविपुढे ढुंग । साक्षी तव जग उभयता ॥ १ ॥
आपल्या आपण नाहीं शोभा[1] येत । चार करी स्फीत दाखवूनि ॥ २ ॥
खाणार ताकाचे असे ते माजीरे । आपणेचि अधीर कळो येते ॥ ३ ॥
तुका म्हणे जळो मैदाची मवाळी । दावूनियां नळी कापी सुरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खद्योतें-काजव्याने, ढुग-ढुगण, चार-वेडे चाळे, स्फीत-प्रतिष्ठा, मोठेपणा, माजीरे-मस्त, माजलेला, मैद-कपटी, घातकी, मवाळी-मऊपणा, नळी-गळा

अर्थ .- काजव्याने सूर्यापुढे आपल्या ढुगणातील प्रकाश किती जरी फुलवून दाखविला तरी उभयताच्या प्रभावासबधी जग साक्षी असतेच १ आपल्या आपणच कोणतेही शोभायमान होत नाही पण कित्येकजण मोठेपणाच्या प्राप्तीसाठी वेडेपणाच्या गोष्टी करीत असतात २ ताकार ताकाचे सेवन करणारे मस्तवाल असतात त्याचा अधीरपणा त्याच्या वागण्यावरूनच समजून येतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, घातकी या कपटी माणसाच्या मऊपणात आग लागो कारण तो बकऱ्याला प्रेम दाखवून त्याचा गळा कापीत असतो ४

---

१ शोभे.

३७७३ नाहीं सरों येत कोरडचा उत्तरीं । जिव्हाळयाची वरी ओल ठायीं ॥ १ ॥
आपुलिया हिता मानिसी कारण । सत्या नारायण साह्य असो ॥ २ ॥
निर्वाणीं निवाड होतो आगीमुखें । तप्त लोह सुखें धरितां हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे नेम न टळतां बरें । खऱ्यासीचि खरे ऐसें नाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- निर्वाणीं-शेवटच्या प्रसंगी, लोह-लोखंड

अर्थ :- कोरडी बडबड करून काहीही साधणार नाही. काही तरी जिव्हाळयाची ओल त्या ठिकाणी असली पाहिजे. १ आपले हित कशात आहे याचा विचार करशील तर नारायण साहाय्यकारी होईल. कारण सत्याला त्याची मदत असते. २ शेवटच्या प्रसंगी तापलेले लोखंड हातात सुखाने धरल्यासच खरा निवाडा होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नित्यनेमास न टळलेले बरे. कारण खऱ्याला खरे असेच नाव शोभते ४

३७७४ आलों उल्लंघुनि दुःखाचे पर्वत । पायांपाशीं हित तुमच्या तरी ॥ १ ॥
न वेखेल लासा दुःखी होतें मन । कठिणें कठिण वाटतसे ॥ २ ॥
मच्छे सांडी परि वाटते निरास । न ये माझा दिस संकल्पाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हीं सदैव जी देवा । माझ्या हाचि जीवा एक ठाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- लासा-डागास, निरास-निराशा, सदैव-सुदैवी

अर्थ :- तुमच्या पायाजवळ माझे हित असल्यानेच मी अनेक प्रकारच्या दुःखाचे पर्वत उल्लंघून आलो आहे १ तुम्ही माझ्या मनाच्या डागास पाहात नाही, म्हणून मन फार दुःखी होत आहे प्रसंग अत्यंत कठीण वाटत आहे २ देवा, तुम्ही माझा त्याग जरी केला नसला तरी मला निराशा मात्र भारी वाटते कारण माझ्या संकल्पाप्रमाणे प्राप्तीचा दिवस येतच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही सुदैवी आहात म्हणूनच माझ्या जीवास तुमचेच एक आश्रयाचे स्थान झाले आहे ४

३७७५ किती सोसिती करंटीं । नेणो संसाराची आटी ।
सर्वकाळ पोटीं । चिंतेची हळहळ ॥ १ ॥
रिकामिया तोंडें राम । काय उच्चारितां श्रम ।
उफराटा भ्रम । गोवी विषय माजिरा ॥ २ ॥
कळतां न कळे । उघडे झाकियेले डोळे ।
मरले त्याचे चाळे । अंगी वारें मायेचें ॥ ३ ॥
तुका म्हणे जन । ऐसे नांवबुद्धिहीन ।
बहुरंगें भिन्न । एकीं एक निमाले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- आटी-श्रम, कष्ट, गोवी-गुतवितो, माजिरा-मस्त, मत्त, माजलेला, निमालें-मिळाले, जुळले

अर्थ - असे हे करंटे लोक संसारासाठी खटाटोप करून किती परिश्रम घेतील हे काही सांगवत नाही सदा सर्वकाळ त्यांच्या पोटात या संसाराविषयीच चिंता असते १ रिकाम्या तोंडाने राम राम उच्चारिल्यास काय फार श्रम होतात ? पण विषयाचा उरफाटा भ्रम पाहा कसा असतो तो तो मस्त झालेल्या विषयात जीवास गुंतवून

ठेवितो २ डोळे उघडे असून हे लोक डोळे झाकलेल्या आंधळ्याप्रमाणे वागतात कळत असून न कळल्यासारखे करतात. त्यांच्या अंगी मायेचे वारे भरलेले असल्यामुळे त्यांच्याकडून असे वेडे चाळे होत राहातात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे हे लोक नावबुद्धीहीन असतात त्यांच्यात अनेक रंग असल्याने वृत्ती भिन्न भिन्न होतात. म्हणून एकमेक एकमेकाशी जुळले जात नाहीत. ४

३७७६ मंगळाचा मंगळ सांटा । विट तोटा नेणे तें ॥ १ ॥
हे भरा सातें आले । भलें भलें म्हणवावें ॥ २ ॥
जनीं जनार्दन वसे । येथें दिसे तें शुद्ध ॥ ३ ॥
तुका म्हणे बहुतां मुखें । खरें सुखें ठेवावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सातें–बाजारात

अर्थ – मंगळाच्या ठिकाणी मंगळाचीच साठवण असल्याने त्याचा कधी आपणास वीट येत नाही की कधी त्याचा साठा संपतही नाही १ लोकहो, तुम्ही या संसाररूपी बाजारात आले आहात म्हणून या मंगळाची साठवण नीट भरून ठेवा आणि जगाकडून भले म्हणवून घ्या. २ सर्वत्र लोकात, जनात या जनार्दनाचे वास्तव्य आहे. याचा प्रत्यक्ष प्रत्यय येईल तेच शुद्ध अथवा मंगल समजावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासंबंधीचा निवाडा पुष्कळांच्या मुखानी झालेला असल्याने त्याचाच संग्रह सुखाने करावा ४

३७७७ नामाचा महिमा बोलिलो[1] उत्कर्षे । अंगा कांहीं रस[2] न येचि तो ॥ १ ॥
कैसें समाधान राहे पांडुरंगा । न लगेचि अंगा आणी कांहीं ॥ २ ॥
लाभाचिये अंगीं सोस कवतुकें । फिक्याचें तें फिकें वेवसाव ॥ ३ ॥
तुका म्हणे करा आपुला महिमा । नका जाऊं धर्मावरि माझ्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उत्कर्ष–पुष्कळ, विशेष

अर्थ :– नामाचे महत्त्व मी पुष्कळच वर्णन करतो. पण त्याविषयीचा अनुभव माझ्या अंगी काहीच येत नाही. १ पांडुरंगा, हे जर काहीच अंगी येत नाही तर मग माझ्या मनास समाधान तरी कसे वाटणार हो? २ व्यवहारात काही लाभ झाला तरच त्यामुळे त्याचे काही सोसकौतुक होते. उलटपक्षी फिकेपणाच्या व्यवहारास फिकेपणच मिळतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही माझ्या धर्माकडे पाहू नका. तुमचा महिमा जसा असेल तसा करा. ४

३७७८ हेचि वारंवार । पडताळुनी उत्तर ॥ १ ॥
करितो पायांसी विनंती । नुपेक्षावे कमळापती ॥ २ ॥
गंगोदकें गंगे । अर्घ्य द्यावें पांडुरंगे ॥ ३ ॥
जोडोनिया हात । करी तुका प्रणिपात ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नुपेक्षावें–उपेक्षा करू नये, प्रणिपात–नमस्कार

अर्थ – हीच माझी वचने मी वारंवार पडताळून पाहात आहे. १ अहो कमलापती, मी तुमच्या पायांशी विनंती करीत आहे की, माझी कधी उपेक्षा करू नये. २ पांडुरंगे, गंगेचेच पाणी घेऊन गंगेस अर्घ्य देतात त्याप्रमाणे तुम्ही वदवलेला वचने तुम्हालाच समर्पण असोत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, दोनही हात जोडून मी तुम्हांस नमस्कार करीत आहे. ४

१ बोलतो, २ रंग.

३७७९ अवचित या तुमच्या पायां । देवराया पावलों ॥ १ ॥
बरवें जालें देशाउर । आल्या दूर सारिखें ॥ २ ॥
राहोनियां जातों ठाया । आलियाची निशाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे चरणसेवा । जोडी हेवा लाधली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– बरवें-चांगले, देशाउर-देशांतर, भीक मागत अनेक देशांतून हिंडणे, ठाया-स्थानास निशाणी-खूण, हेवा-हाव.

अर्थ :– देवराया, मी तुमच्या पायांजवळ अवचितपणे येऊन पोचलो आहे. १ अनेक देशांत भिक्षा मागत हिंडून इतक्या दूर येऊन तुमच्यापाशी आलो हे फार चांगले झाले. २ आता मी माझे चित्त येथेच ठेवून मी माझ्या ठिकाणी जातो. मी येथे आल्याची खूण आता माझ्याजवळ आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या चरण-सेवेची हाव माझ्या मनात उत्पन्न झाली आहे ४

३७८० आतां पाविजेल घरा । या दातारा संगती ॥ १ ॥
पायावरि ठेवूं[1] माथा । सर्वथा हा नुपेक्षी ॥ २ ॥
येथून तेथवरि आतां । नाहीं सत्ता आणिकांची ॥ ३ ॥
तुका म्हणे चक्रपाणी । शिरोमणी बळियांचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नुपेक्षी-उपेक्षा करणार नाही.

अर्थ :– आता या दाताराच्या संगतीने मी माझ्या स्वस्वरूपाच्या घरास पोचेन. १ या देवाच्या पायांवर मस्तक ठेवल्यावर तो कधीच उपेक्षा करणार नाही. २ आता येथपासून तेथपर्यंत कुणा दुसऱ्यांची सत्ता नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा चक्रपाणी देव सर्व बलवानांचा शिरोमणी आहे. ४

३७८१ बरवें माझ्या केलें मनें । पंथें येणें निघालें ॥ १ ॥
अभयेंच जावें ठाया । देवराया प्रतापें ॥ २ ॥
साधनाचा न लगे पांग । अवघें सांग कीर्तनें ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्ता[2] थोरी । कोण करी खोळंबा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– बरवें-चांगले, पांग-इच्छा.

अर्थ :– या भक्तिमार्गाच्या पंथाने मी निघालो हे माझ्या मनाने फार चांगले केले. १ या देवरायाच्या प्रतापाने निर्भय असणाऱ्या स्थानाकडे जाता येईल. २ या कीर्तनभक्तीमुळे सर्व काही यथासांग होत असल्यामुळे इतर साधनांची काही इच्छाच होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाची सत्ता मोठी असल्यामुळे कृपेत कमतरता कोणती राहणार आहे ? ४

३७८२ मागें पुढें नाहीं । दुजें यावेगळें कांहीं ॥ १ ॥
नाहीं उरलें आणीक । केला झाडा सफळिक ॥ २ ॥
विश्वासावांचून । नांवें दुजियाचे शून्य ॥ ३ ॥
देवाविण कांहीं । तुका म्हणे उरी नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दुजें-दुसरे, झाडा-हिशेब, उरी-कमतरता, उणीव.

१ ठेवूनी, २ सत्ताधारी.

अर्थ – आता मागेपुढे हा एक देवच आहे त्याच्यावाचून दुसरे काहीच नाही १ सर्व इंद्रियवृत्तींचा हिशेब पूर्ण केला असल्यामुळे आता काहीच शिल्लक उरलेले नाही २ या देवावरच मी विश्वास ठेवला आहे त्याच्याशिवाय इतर ठिकाणी मी शून्यच ठेविले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या देवाशिवाय सांगण्यासारखे काहीच उरले नाही आता उणीव कोणतीच नाही ४

३७८३ वैराग्याचा अंगीं जालासे संचार । इच्छी वनांतर सेवावया ॥ १ ॥
कां जी याचें[1] करूं नये समाधान । वियोगानें मन सिणतसे[2] ॥ २ ॥
नयेचि न्यावया पंढरीचें मूळ । न देवेचि माळ कंठींची ही ॥ ३ ॥
तुका म्हणे जालें अप्रीतीचें जिणें । लाजिर हें वाणें सेवा करी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मूळ–आमंत्रण

अर्थ – देवा, माझ्या हृदयात वैराग्याचा संचार झाला आहे त्यामुळे वनात जाऊन एकांतवास सेवन करण्याची इच्छा मनात निर्माण झाली आहे १ देवा या विरक्त असणाऱ्या भक्ताचे तुम्ही समाधान का हो करीत नाही ? तुमच्या वियोगामुळे मनास फारच दुःख होत आहे २ पंढरपुरहून मला नेण्यासाठी आमंत्रण कसे काही येत नाही ? तुमच्या कंठातील माळ तुम्ही कशी पाठवून देत नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुमच्या प्रीतिशिवाय माझे हे जगणे सुरू आहे हे मोठे लाजिरवाणे असल्यामुळे मी तुमची सेवा करीत आहे ४

३७८४ आळिकरा कोठें साहातें कठिण । आपुला तें[3] प्राण देऊं पाहे ॥ १ ॥
सांभाळावें मायबापें कृपादृष्टी । पीडिता तों दृष्टी देखों नये ॥ २ ॥
अंतरलों मागें सवसारा हातीं । पायांवें सरतीं जालों नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हीं विचारा जी देवा । ठेवाल तें ठेवा कोणे परी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आळिकरा–हट्ट करणारास, सरतीं–मान्य, विचारा–विचार करा

अर्थ – हट्ट करणाऱ्या बालकास आईने दूर केले तर जे तिचे काठिण्य कधी सहन होईल का ? मग ते बालक आपला प्राण देऊ पाहाते १ मायबापांनी कृपादृष्टीने आमचा सांभाळ करावा आम्ही दुःखीकष्टी आहोत हे डोळ्यांनी सुद्धा पाहू नये २ तुमच्या प्राप्तीसाठी आम्ही मागेच संसार सोडून दिलेला आहे तरी तुमच्या पायांशी आम्ही मान्य झालो नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात देवा, आता यासंबंधी तुम्हीच विचार करा ना मला कोणत्या रीतीने ठेवायचे असेल तसे तुम्ही ठेवा ४

३७८५ स्वप्नींचे हे धन हातीं ना पदरीं । प्रत्यक्ष कां हरि होऊं नये ॥ १ ॥
आजुनि कां करा चाळवाचाळवी । सावकाशें द्यावी सत्य भेटी ॥ २ ॥
बोलोनिया फेडा जीवींची काजळी । पाहेन कोमळीं चरणांवुजें ॥ ३ ॥
तुका म्हणे माझ्या जीवींचिया जीवा । सारूनियां ठेवा पडदा आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाळवाचाळवी–फसवाफसवी काजळी–काळजी अमावे, चरणांवुजें–चरणकमळे

अर्थ – अहो श्रीहरी, स्वप्नात प्राप्त झालेले धन कधी हातात येत नाही की पदरात बांधता येत नाही यासाठी तुम्ही माझ्यासमोर प्रत्यक्ष प्रकट का होत नाही ? १ देवा अजूनही तुम्ही फसवाफसवी का हो करता ? थोड्या कालावधीनंतर मला सत्य स्वरूपाची भेट द्या ना २ माझ्याशी प्रत्यक्ष बोलून माझ्या जीवाची चिंता दूर

१ माझें, २ दुःखी होते, ३ तो

करा ना मग मी तुमचे चरणकमले डोळे भरून पाहीन ३ तुकाराम महाराज म्हणतात माझ्या जीवाच्या जीवा, तुम्ही आता तुमच्या-माझ्यातील पडदा दूर करून ठेवा ४

३७८६ येतील अंतरा शिष्टाचे अनुभव । तळमळी जीव तया सुखा ॥ १ ॥
आतां माझा जीव घेउनिया बळी । बैसवावे वोळी संताचिये ॥ २ ॥
विस्तारिली वाचा फळेंविण वेल । कोरडेचि बोल फोस वांझे ॥ ३ ॥
तुका म्हणे आलो निर्वाणाच वरी । राहो नेदीं उरी नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –अंतरा-चित्तात, अंतःकरणात, वोळी-पंगतीस, ओळीत, फोस-पोकळ, निर्वाण-आणी-बाणीची वेळ, उरी-उणीव, कमतरता

अर्थ – यापूर्वी जे कोणी श्रेष्ठ संतमहात्मे होऊन गेले त्याना जे आत्मसुखाचे अनुभव आले ते माझ्या चित्तात कधी अनुभवास येतील ? या सुखासाठी माझा जीव तळमळ करीत आहे १ देवा, आता माझ्या जीवाचे बलिदान तुम्ही घ्यावे आणि मला संताच्या पंगतीस बसवावे २ कण नसलेले जसे भूस पोकळ व व्यर्थ असते त्याप्रमाणेच माझ्या वाणीचा वेल विस्तारलेला असतो पण त्यास तुमच्या कृपेचे फळ कधीच येत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, मी आता आणीबाणीवर येऊन ठेपलो आहे आता तुम्ही कसलीही उणीव ठेवू नका ४

३७८७ म्हणउनि काय जीऊं भक्तपणे । जायाचीं भूषणें अळंकार ॥ १ ॥
आपुल्या कष्टाची करूनियां जोडी । मिरवीन उघडी इच्छावसे ॥ २ ॥
तुके तरि तुकीं खऱ्याचे उत्तम । मुलाम्याचा भ्रम कोठवरि ॥ ३ ॥
तुका म्हणे पुढें आणि मागें फास । पाये ऐसा नास न करीं देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा '–जीऊं-जगू, जायाचीं–परत करण्याची, जोडी–प्राप्ती, लाभ, तुकीं–तुलनेस नास–नाश

अर्थ – दुसऱ्याचे असल्यामुळे परत करण्याचे अलंकार अंगावर घालून भक्त म्हणून लोकात मिरवून मी जगू काय ? १ आपल्या श्रमाने प्राप्त झालेले अलंकार अंगावर घालून इच्छेप्रमाणे उघडउघड मिरवावे हे चांगले आहे २ जे खरे आहे त्याची तुलना खऱ्याबरोबरच होते आणि मुलामा केलेल्या खोट्या पदार्थाचा भ्रम कुठवर राहणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, ज्यामुळे मागील व पुढील कर्मांच्या फासात मी सापडून माझा नाश होणार नाही असे कर ४

३७८८ आपणचि व्हाल साहे । कसियाला हे धावणी ॥ १ ॥
भाकिली ते उरली कींव । आहे जीव जीवपणें ॥ २ ॥
आहाच कैचा बीजा मोड । प्रीति कोड वांचूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे दंडिन काया । याल तया धांवणिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –साहे-साहाय्यकारी, आहाच-उगाच, व्यर्थ, कोड-कौतुक, काया-शरीर

अर्थ – देवा, मी उगाच धावाधाव कशासाठी करू ? आपण मला साहाय्यकारी व्हालच १ मी आतापर्यंत तुमची कींव भाकली ती तशीच वाया गेली काय ? कारण मी जीवपणाने जीव धरून आहे २ तुम्ही जर प्रीतीने माझे कोडकौतुक करीत नाही तर मग या व्यर्थ बीजाला मोड येणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी माझ्या शरीरास शासन करून घेईन मग मात्र तुम्हांला धावून यावे लागेल ४

३७८९ निश्चितीनें होतो करूनियां सेवा । कां जी मन देवा उद्वेगिलें ॥ १ ॥
अनंत उठती चित्ताचे तरंग । करावा हा त्याग वाटतसे ॥ २ ॥
कोण तुम्हाविण मनाचा चाळक । दुजें सांगा एक नारायणा ॥ ३ ॥
तुका म्हणे माझा मांडिला विनोद । करऊं नेणें छंद कराल काइ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– दुजें–दुसरे

अर्थ – देवा, आजपर्यंत तुमची सेवा करून मी निश्चित होतो तरीही माझ्या मनात एवढा उद्वेग का बरे आला आहे ? १ चित्तात नाना प्रकारचे अनंत तरंग उठतात आणि तुमच्या या सेवेचाच त्याग करावासा वाटतो २ देवा तुमच्याशिवाय मनाचा चालक तरी दुसरा कोण आहे ? नारायणा, याविषयी तुम्हीच सांगा ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही माझी थट्टाच आरंभिली आहे तुम्ही काय काय छंद करीत राहाल है काही समजत नाही ४

३७९० आश्वासावे दास । तरी घडे तो विश्वास ॥ १ ॥
नाहीं चुकत चाकरी । फुटे लाडस्याचे थोरी ॥ २ ॥
स्वामीच्या उत्तरें । सुख वाटे अभयें करें ॥ ३ ॥
न मगें परि माते । तुका म्हणे निढळ वाटे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – लाडस्याचे–लाडपणाचे, माते–कामाचा मोबदला, निढळ–करटेपणा

अर्थ – आपल्या दासाना निर्भय होण्यासाठी आश्वासन द्यावे, तरच त्याच्या मनात धन्याबद्दलचा विश्वास निर्माण होतो १ लाड करण्याच्या प्रमाणात मोठी वाढ झाली की सेवक चाकरीविषयी चुकत नाही २ अभय करानी स्वामींनी आश्वासनाचे बोलणे केले म्हणजे सेवकास सुखच वाटते ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी काही तुम्हास माझ्या सेवेचे वेतन मागत नाही पण कृपा न झाल्यास करटेपणा मात्र वाटतो ४

३७९१ जेणे होय हित । तें तूं जाणसी उचित ॥ १ ॥
मज नको लावूं तैसे । वाया जायें ऐसे पिसे ॥ २ ॥
धरितोसी[1] सत्ता । होसी सकळ जाणता ॥ ३ ॥
चतुराच्या राया । अंगीकारावे[2] तुकया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पिसे–वेड

अर्थ – देवा, ज्यामुळे माझे हित होईल असे उचित करण्याचे तू नीट जाणतोसच १ यासाठी ज्याने करून मी वाया जाईन असे वेड तू मला लावू नकोस. २ तू सर्व सत्ता धारण करणारा असून सर्व जाणणाराही आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो चतुराच्या राजा, या तुकयाचा तुम्ही अंगीकार करावा ना ४

३७९२ राहे उभा वावावादीं । तरी फदीं सांपडे ॥ १ ॥
लव्हाळ्यासी कोठें बळ । फिरिल जळ आपुलें ॥ २ ॥
कठिणासी बळजोडा । नम्र पीडा देखेना ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्वरसीं । मिळे त्यासी गोत तें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –फदीं–वारस्थानात, गोत–आप्त

---

१ धरितो मी, २ जागी करावे,

अर्थ – कुणी एखादा वाद करण्यासाठी उभा राहील तर तो भलत्याच कारस्थानातही सापडेल १ लव्हाळे आपल्या नम्रत्वाने पाण्यात तरते त्याला पाण्याचे बळ काय करणार ? २ जो बलवान आहे त्यास जोडीदारही बलवानाचाच मिळतो आणि जो नम्र आहे त्याला पीडा होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व रसाच्या ठिकाणी जो मिळतो त्याला सर्व जग आप्ताप्रमाणे होते ४

३७९३ म्हणउनि जाली तुटी । नाहीं भेटी अहंकारें ।। १ ।।
दाखविले देवें वर्म । अवघा भ्रम नासला ।। २ ।।
हातें मुरगाळितां कान । नाहीं भिन्न वेदना ।। ३ ।।
तुका म्हणे एकातसुखें । अवघें गोतें गुंतलें ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा –गोतें-आप्तपणानें.

अर्थ – अहंकाराचा संबंध नसल्यामुळे सर्व प्रपंचाचा निरास झाला १ असे हे वर्म मला देवाने दाखविले म्हणून सगळा भ्रम दूर झाला २ आपल्याच हाताने आपण आपला कान मुरगळला तर काही वेगळ्या प्रकारच्या वेदना होत नाहीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, या एकान्तसुखातही सर्व जगत आप्तपणाने गुंतून राहिले आहे. ४

३७९४ न पडो आता हाडीं घाव । मध्यें कीव नासक[1] ।। १ ।।
करविली आतमहत्या । जीवा का त्या द्वद्वाच्या ।। २ ।।
आशापाशीं गुतला गळा । तेणें कळाहीन जालों ।। ३ ।।
तुका म्हणे लावूं मुळी । जीवकुळी थारेसी[2] ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– कींव–नम्रपणा, थारेसी–स्थानावर

अर्थ :– अभिमानाचा हा घाव आता माझ्या देहावर पडू नये कारण असा घाव आतील नम्रपणाचा नाश करणारा आहे १ जीवाशी द्वंद्व, वैर करून आत्महत्या करवीत आहे २ आशेच्या पाशात माझा जीव गुतलेला आहे त्यामुळे मी कळाहीन झालो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आपल्या जीवाची कुळी मूळच्या स्थानाशी लावू. ४

३७९५ सामावे कारण । नाहीं सोसत धरणें ।। १ ।।
लादी[3] योंके लाजिरवाणी । हीनकमाईची घाणी[4] ।। २ ।।
पुष्प जवळी नाका । दुर्गंधीच्या नावें थुका ।। ३ ।।
तुका म्हणे किती । उपदेशहीन जाती ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – कारण–कार्य, लादी–लाही असावे, संताप, योंके–शोक करता.

अर्थ :– स्वकार्य झाल्यानंतर श्रीहरीच्या स्वरूपात सामावले जाते त्याशिवाय ध्यर्य धरणे त्याला सोसतच नाही १ संतापणे अथवा शोक करणे ही लाजिरवाणी गोष्ट आहे हीन प्रकारच्या कमाईची ही घाण आहे २ सुगंधी फूल नाकाशी असावे आणि दुर्गंधीच्या नावाने थुकावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा वाईट जातीच्या माणसास उपदेश तरी किती करावा ? ४

१ नाशक, २ थोरेसी, ३ लाही, ४ घणी

३७९६ असाल ते तुम्ही असा । आम्ही सहसा निवडो ना ॥ १ ॥
अनुसरलो एका चित्तें । हातोहातें गोवसीत ॥ २ ॥
गुणदोष काशासाटीं । तुमचे पोटीं वागवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे दुजें आता । कोठें चित्ता आतळो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गिवसीत-शोधीत, दुजें-दुसरे, आतळो-स्पर्श करणार

अर्थ – लोकहो, तुम्ही जसे असाल तसे असा परंतु आम्ही मात्र सहसा निवडणार नाही कधी १ एकचित्ताने हातोहात शोधीत शोधीत आम्ही श्रीहरीच्या ठिकाणी अनुसरून राहिलो आहोत २ आता तुमचे गुणदोष मी कशासाठी माझ्या अंतःकरणात वागवू ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या देवावाचून माझ्या चित्तास दुसरे कोण स्पर्श करणार आहे ? ४

३७९७ सोवळा होऊं तों वोवळें जडलें । साडीमाडी बोलतोडीं बोजीं ॥ १ ॥
एकसरीं केली कळिवरें साटीं । आता नका तुटी पायासवें ॥ २ ॥
संकल्पीं विकल्प पापाचा सुकाळ । रज्जुसर्प मूळ मरणाचें ॥ ३ ॥
तुका म्हणे हे तूं ब्रह्मांड चाळिता । मी कां करूं चिंता पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बोजीं-दुसऱ्यानी, कळिवरें-देहाच्यासाठी

अर्थ – देवा, मी शुद्ध वा सोवळा व्हावे तर विषमतेचे ओवळे अंगी जडून राहिलेले आहे त्यामुळे मी ओवळे सोडले, सोवळे धरले हे दुसऱ्यानी बोललेले बोल बरबरचेच वाटतात १ यासाठी मी आपला जीव तुम्हास एकचित्ताने समर्पण केला आहे आता तुमच्या पायापासून वियोग होऊ नये २ दोरीच्या ठिकाणी सर्पाचा भास झाल्यावर मरणाचेच मूळ, म्हणजे कारण तयार होते, त्याप्रमाणे देवा, संकल्पाच्या ठिकाणी विकल्प निर्माण होऊन पापाचाच सुकाळ होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तू सर्व ब्रह्मांडास चालना देणारा आहेस मग मी उगाच चिंता तरी का करू ? ४

३७९८ आहे तैसा आता आहे ठायीं बरा । ठेविलो[1] दातारा उचितें त्या ॥ १ ॥
वचनाचा भार पडिलिया शिरीं । जालें मग भारी उतरेना ॥ २ ॥
अबोल्याची सवे लावुनिया मना । फाकों नेदीं गुणा ऐसें करूं ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हा गोवळ्याचा संग । राखतें[2] तें अंग जाणतसों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –ठायीं-स्थानावर, सवे-सवय, गोवळ्याचा– गोपाळाचा

अर्थ – दातारा, आता मी ज्या स्थानावर आहे त्याच ठिकाणी तुम्ही मला बऱ्यापैकी ठेविले आहे १ आमच्या वचनाचा भार तुमच्या शिरावर पडलेला आहे तो फार झाल्यावर मग उतरणार नाही २ न बोलण्याची सवय मनाला लावून मी श्रीहरीचे गुण हृदयातून बाहेर फाकू देणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात आम्हाला गोवळ्याची संगत आहे आम्ही तीच संगत राखून ठेवण्याचे जाणतो ४

३७९९ तूं माझा कोंवसा । परी न कळे या धसा ॥ १ ॥
कूट खाती मागें पुढें । जाती निरयगावा पुढें ॥ २ ॥
मज म्हणताती कवी । निषेधुनि पापी जीवीं ॥ ३ ॥
तुका म्हणे पांडुरंगा । आता कोण लेखी जगा ॥ ४ ॥

---
१ ठेविलें २ राखावं.

शब्दार्थ व टीपा -कोंवसा-आधार, आश्रयस्थान, धसा-मूर्खांना, अविचारी लोकांना, कूट-निंदा, नालस्ती, निरयगावा-नरकात

अर्थ - देवा, तूच माझे आश्रयस्थान आहेस पण या मूर्खांना हे काही समजत नाही १ ते माझी मागे-पुढे निंदा करतात, पण त्यायोगे ते अखेरीस नरकासच जातील २ पापी माणसाचा जसा निषेध करतात त्याप्रमाणे हे लोक कवी म्हणून माझा निषेध करतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, अशा या लोकांची कोण पर्वा करणार ? ४

३८०० दर्पणासी वुजे । नखटें[1] तोंड पळवी लाजें ॥ १ ॥
गुण ज्याचे जो अंतरीं । तोचि त्यासी पीडा करी ॥ २ ॥
चोरा रुचे निशी । देखोनिया विटे शशी ॥ ३ ॥
तुका म्हणे जन । देवा असे भाग्यहीन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - दर्पणासी-आरशास, नखटें-नकटे, अंतरगीं-चित्तात, निशी-रात्र, शशी-चंद्र

अर्थ - नकटे माणूस आरशास पाहून वुजते, व लाजेने तोंड वळवून लपविते १ त्याच्या चित्तात जो गुणदोष असतो तोच त्याला फार पीडा देतो २ चोराला रात्रच आवडते चंद्राच्या उदयाने त्याला त्रासच होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, असे हे लोक मोठे भाग्यहीन असतात ४

३८०१ म्हणउनि शरण जावें । सर्वभावें देवासी ॥ १ ॥
तो हा उतरील पार । भवदुस्तरनदीचा ॥ २ ॥
बहु आहे करुणावंत । अनंत हें नाम ज्या ॥ ३ ॥
तुका म्हणे साक्षी आलें । तरी केलें प्रगट ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - भवदुस्तर-तरून जाण्यास कठीण अशा संसाररूपी नदीचा

अर्थ - पुढील कारणासाठी सर्व भावाने देवास शरण जावे १ तरून जाण्यास कठीण अशा संसाररूपी नदीतून तोच आपणास पार करणार आहे २ हा श्रीहरी फार कृपावंत असून त्याला अनंत हे नाम आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे माझ्या अनुभवास आले म्हणून मी ते प्रकट केले ४

३८०२ ऐसीं वर्मे आम्हां असोनिया हातीं । कां होऊं नेणती दिशाभुली ॥ १ ॥
पोटाळुनी पाय कवळीन उभा । कृपे पद्मनाभा हालों नेदीं ॥ २ ॥
आपुले इच्छेसी घालीन संपुष्टीं । श्रीमुख तें दृष्टी न्याहाळीन ॥ ३ ॥
तुका म्हणे बहु साडियेलीं मतें । आपुल्या पुरतें धरूनी ठेलों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा -पोटाळून-कवळून, साडियेलीं-त्याग केला

अर्थ :-पुढे वाचविल्याप्रमाणे आमच्या हातात वर्म आलो असूनही दिशाभूल झाल्याप्रमाणे आम्ही नेणती का होऊ ? १ मी या देवाच्या पायाना कवळून मिठी घालून या पद्नाभास कृपेने उभे करून त्यास हालूही देणार नाही २ मी माझ्या इच्छेस अनुसरून त्याला संपुटात घालीन आणि त्याचे श्रीमुख दृष्टीने न्याहळीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी पुष्कळ मताचा त्याग केला असून ज्यात माझे कार्य होणार ते मात्र नीट धरून ठेविले आहे ४

१ नक्टें

३८०३ रत्नाच्या वोवणी कांचे ऐशा धरी । आव्हेरुनी दुरी अधिकारें ॥ १ ॥
जातिस्वभाव आला डोळ्यां आड । तया घडे नाड न कळतां ॥ २ ॥
कामधेनु देखे जैशा गाईम्हैसी । आणिकांतें ऐसी करोनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे काय बोलोनियां फार । ज्याचा वेव्हार तया साजे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :–नाड–फसवणूक, वेव्हार–व्यवहार, साजे–शोभतो.

अर्थ :–ओवलेली रत्ने काचेप्रमाणे मानून हा स्वतःच्या अधिकारामुळे त्यांचा सर्वस्वी त्याग करतो. १ अशा प्रकारे त्याचा जातिस्वभाव ज्याच्या दृष्टिआड आला त्याला रत्नाची परीक्षा खरी न झाल्यामुळे त्याची फसवणूकच झाली. २ खऱ्या कामधेनूस हा इतर गाईम्हशींप्रमाणे मानतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, फार बोलून काय फायदा होणार आहे ? ज्याचा व्यवहार त्यासच शोभतो. ४

३८०४ तरीच हीं केलीं । दानें वाईट चांगलीं ॥ १ ॥
एकें एका शोभवावें । केलें कवतुक देवें ॥ २ ॥
काय त्याची सत्ता । सूत्र आणीक चाळिता ॥ ३ ॥
तुका म्हणे धुरें । डोळे भरिले परि खरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाळिता–चालक.

अर्थ :– यासाठीच ही चांगलीवाईट दाने केली आहेत १ या देवाने हे कौतुक एकमेकाला शोभावे म्हणूनच केले आहे. २ या देवाची सत्ता केवढी आहे ? तर तो सर्व जगाचा सूत्रचालक आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण पाहतो कोण ? सर्वांचे डोळे तर खरोखर धुरानेच भरलेले आहेत. ४

३८०५ अंधळे तें सांगे सांगितल्या खुणा । अनुभव देखणा प्रगट त्या ॥ १ ॥
नांदणुक सांगे वडिलांचे बळ । कैसा तो दुर्बळ सुख पावे ॥ २ ॥
तुका म्हणे नांदों आपल्या प्रतापें । तयासी लोकांपें स्तुती सांगों ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– देखणा–देखणारा, पाहणारा

अर्थ :– आंधळा मनुष्य लोक जशा खुणा सांगतील त्याप्रमाणे सांगत असतो प्रकटपणे पाहाणाऱ्याचा अनुभव त्याला कसा येणार ? १ वडील माणसाच्या बळावर जो नांदणुकीचे वर्णन करतो त्या दुर्बलाला सुख कसे मिळणार ? २ तुकाराम महाराज म्हणतात, जो आपल्या स्वतःच्या प्रतापावर नांदतो त्याचीच स्तुती लोक गातात ३

३८०६ करी आणिकांचा अपमान । खळ छळवादी ब्राह्मण ।
तया देतां दान । नरका जाती उभयतां ॥ १ ॥
तैसें जालें दोघांजणां । मागतिया यजमाना ।
जाळियेलें वनां । आपणांसहित कांचणी ॥ २ ॥
घडितां दगडाची नाव । मोल क्लेश गेले वाव ।
तरता नाहीं ठाव । बुडवी तारूं तरतीया ॥ ३ ॥
चोरा दिधला सांटा । तेणें मारियेल्या वाटा ।
तुका म्हणे ताठा । हें तंव दोघे नाडती ॥ ४ ॥

शब्दार्थ टीपा- खळ-दुष्ट, वाव-व्यर्थ, साटा-साठलेले धन

अर्थ :- जो दुसऱ्याचा अपमान करतो, आणि ब्राह्मणाचा छळ करतो अशा दुष्टास कुणी दान दिले तर दान देणारा व घेणारा असे उभयता नरकासच जातील १ त्याचप्रमाणे दान मागणारा व देणारा यांची स्थिती झाली. वनामध्ये जोरात वारा सुटून झाडाच्या फांद्या एकमेकांस घासल्या जातात व त्यातून अग्नी निर्माण होतो आणि त्या वृक्षासहित सर्व वनच जळून जाते. २ दगडाची नाव घडविताना झालेले कष्ट वायाच जातात कारण तिच्यामुळे पाण्यावर तरणे तर होतच नाही उलट तरणारी नौका व तारणारा दोघेही पाण्यात बुडतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, साठलेले धन चोराजवळ सांभाळण्यासाठी दिले तर तो त्यामधील वाटा काढून घेतो. याप्रमाणे ज्याच्यात ताठा आहे तो व चोर दोघेही फसतील ४

३८०७ जळो ते जाणींव जळो तो शाहाणींव । राहो माझा भाव विठ्ठलपायीं ॥ १ ॥
जळो तो आचार जळो तो विचार । राहो मन स्थीर विठ्ठलपायीं ॥ २ ॥
जळो हा लौकिक जळो दंभमान । लागो जीवा[1] ध्यान विठ्ठलाचे ॥ ३ ॥
जळो हें शरीर जळो हा संबंध । राहो परमानंद माझ्या कंठीं ॥ ४ ॥
तुका म्हणे येथें अवघेंचि होय । धरीं मना सोय विठोबाची ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा - जाणीव-ज्ञान, शाहाणीव-शहाणपण

अर्थ - जळो ते ज्ञान आणि जळो ते शहाणपण या श्रीविठ्ठलाच्या चरणी माझा भाव दृढ व्हावा म्हणजे झाले. १ तो आचार जळो, तो विचारही जळो. माझे मन या विठ्ठलाच्या पायाशी स्थिर राहावे २ दंभ, मान, लौकिक सर्व जळून जावा व माझ्या जीवास ध्यान मात्र एका विठ्ठलाचे लागावे ३ हे माझे शरीर जळो व त्याचे संबंधित आप्तही जळोत, पण श्रीहरीच्या परमानंदाची माधुरी माझ्या कंठात सतत राहो ४ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे सर्व काही साध्य होईल यासाठी या विठ्ठलाच्या पायाचा आश्रय धरा. ५

३८०८ विश्वास धरूनि राहिलो निवांत । ठेवूनियां चित्त तुझे पायी ॥ १ ॥
तरावे बुडावे तुझिया वचने । निर्धार हा मनें केला माझ्या ॥ २ ॥
न कळे हे मज साच चाळविले । देसी ते उगले घेइन देवा ॥ ३ ॥
मागणे ते सरे ऐसे करीं देवा । नाहीं तरी सेवा सांगा पुढें ॥ ४ ॥
करावे कांहीं कीं वाहावे उगले । तुका म्हणे बोले पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा - चाळविले-फसवलेस, साच-खरे, उगले-निमूटपणे, न बोलता

अर्थ -देवा, मी तुझ्या पायाशी चित्त ठेवून, तुझ्यावर विश्वास ठेवून निवांत होऊन राहिलो आहे. १ देवा, तुझ्या वचनाच्या योगाने तरावे की बुडावे हे तुझे तू पाहा मी मात्र माघार न घेण्याविषयी माझ्या मनाचा निश्चय केला आहे. २ देवा, मला खरोखर फसविलेस हे समजत नाही जे देशील ते मी निमूटपणे घेईन ३ देवा, पांडुरंगा, मी काही करावे की न बोलता उगीच राहावे याविषयी तूच मला सांग ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्यापाशी काही मागणेच उरू नये अशी देणगी तू मला दे नाही तर तुझी सेवा आणखी पुढे करण्यासाठी मला सांग. ५

३८०९ कोणी एकाचिया पोरें केली आळी । ठावी नाहीं पोळी मागे देखी ॥ १ ॥
बुझाविलें हातीं देऊनी खापर । छंद करकर वारियेली ॥ २ ॥

[1] मना.

तैसें नको करूं मज कृपावंता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मायबापाचें उचित । करावें हें[1] हित बाळकाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आळी–हट्ट, बुझाविलें–समजूत काढली, करकर–कटकट, वारियेली–दूर केली.

अर्थ :– कुणा एकाच्या पोरानें पोळीसाठी हट्ट धरला पण ही पोळी कशी असते हे त्यानें ती पूर्वी कधी पाहिली नव्हती म्हणून त्याला माहीत नव्हती. १ त्याची कटकट व छंद दूर करण्यासाठी त्याच्या हातात खापर देऊन त्याची समजूत काढली. २ कृपावंता, तू मात्र माझ्याविषयी हा असा प्रकार कधी करू नकोस. तुझ्या हातात कोणती सत्ता नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मायबापांनी बालकाचे उचित असणारे हितच करावे. ४

३८१० देवाचिये पायीं देईं मना बुडी । नको धांवों वोढी इंद्रियांचे ॥ १ ॥
सर्व सुखें तेथें होतीं एकवेळे । न सरती काळें कल्पांतीं ही ॥ २ ॥
जाणें येणें खुंटे धांवे वेरझार । न लगे डोंगर उसंतावे ॥ ३ ॥
सांगणें तें तुज इतुलेंचि आतां । मानीं धन कांता विषतुल्य ॥ ४ ॥
तुका म्हणे तुझे होतीं उपकार । उतरों हा पार भवसिंधु ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– उसंतावे–उल्लंघन करावे.

अर्थ :– मना, तू या देवाच्या चरणांवर बुडी देऊन राहा उगाच नाना इंद्रियसुखांच्या ओढीने विषयांच्या मागे धावत जाऊ नकोस. १ यामुळे सर्व प्रकारची सुखे एकाच वेळी तुला प्राप्त होतील आणि ती कधी कल्पान्त झाला तरी नाहीशी होणार नाहीत. २ जन्म-मरणांच्या ये-जांची धाव खुंटेल आणि नाना कष्टप्रद साधनांचे डोंगर उल्लंघन करावे लागणार नाहीत. ३ मना, तुला आता इतकेच सांगायचे आहे की, बायको व धन यांना तू विषा-प्रमाणे मान. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मना, असे जर करशील तर तुझे माझ्यावर मोठे उपकार होतील व मी या भवसागरातून उत्तीर्ण होऊन जाईन. ५

३८११ आम्ही विठ्ठलाचे दास जालों आतां । न चले हे सत्ता आणिकांची ॥ १ ॥
नावरे[2] तयासी ऐसें नाहीं दुजें । करितां पंढरिराजें काय नव्हे ॥ २ ॥
कोठें तुज ठाव घ्यावयासी धांवा । मना तूं विसावा घेईं आतां ॥ ३ ॥
इंद्रियांची वोढी मोडिला व्यापार । ज्या अंगें संचार चाली[3] तुज ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही जिंकोनियां काळ । बैसलों निश्चळ होऊनियां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– आणिकांची–इतरांची, नावरे–आवरत नाही, दुजें–दुसरे, ठाव–आश्रयस्थान.

अर्थ :– आता आम्ही विठ्ठलाचे दास झालो आहोत. आमच्यावर इतरांची कुणाचीही सत्ता चालणार नाही. १ या देवास आवरता येणार नाही असे दुसरे काहीही नाही. या पंढरीरायाने करायचे म्हटले तर काय नाही होणार ? २ मना, तुला धाव घेण्यासाठी आता दुसरे आश्रयस्थान तरी कुठे आहे ? म्हणून तू आता या श्रीहरीजवळच विसावा घे. ३ इंद्रियांच्या ओढीने तू बाहेरच्या विविध विषयांचा व्यवहार करीत होतास, पण त्या इंद्रियांची धावच मोडून तिचा नाश केला आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही काळास जिंकून आता श्रीहरीच्या स्वरूपात निश्चल होऊन राहिलो आहे. ५

१ स्व, २ न वारे, ३ चाळी.

३८१२ सांगतो तरि तुम्ही भजा रे विठ्ठला । नाहीं तरि गेला जन्म वाया ॥ १ ॥
करिता भरोवरी दुरावसी दुरी । भवाचिये पुरीं वाहावसी ॥ २ ॥
काहीं न लगे एक भावचि कारण । तुका म्हणे आण विठ्ठलाची ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – भरोवरी–खटपट आण शपथ

अर्थ – लोकहो तुम्हास मी सांगतो की, तुम्ही या विठ्ठलास भजा नाहीतर तुमचा जन्म वायाच गेला असे समजा १ काही इतर खटपट कराल तर तुम्ही संसाराच्या नदीच्या पुराबरोबर वाहून जाल व या श्रीहरीस अंतराल २ तुकाराम महाराज म्हणतात या देवाच्या प्राप्तीसाठी एका भावाशिवाय दुसरे काहीही लागत नाही हे मी श्रीहरीची शपथ घेऊन सांगत आहे ३

३८१३ शब्दज्ञानी[1] येऊ नेदीं दृष्टीपुढें । छळवादी कुडे अभक्त ते ॥ १ ॥
जळो ते जाणीव जळो त्याचे दंभ । जळो त्याचे तोंड दुर्जनाचे ॥ २ ॥
तुका म्हणे येती दाटूनि छळाया । त्याच्या बोडू डोया न धरू भीड ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – कुडें–वाईट, दुष्ट, दाटूनि–मुद्दाम, डोया–डाकी

अर्थ – शब्दाचे कोरडे ज्ञान ज्याना आहे अशांना आम्ही आमच्या दृष्टीपुढेही येऊ देणार नाही असे हे अभक्त मोठे छळवादी व दुष्ट असतात १ त्याच्या ज्ञानास व त्याच्या दंभास आग लागो अशा दुर्जनांच्या तोंडास आग लागो २ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही माणसे आमचा छळ करण्यासाठी मुद्दाम येतात त्यांची चांगली हजामत करण्याविषयी आम्ही कधी भीडभाड धरणार नाही ३

३८१४ अन्यायासी राजा जरि न करी दंड । बहुच ते लंड पीडिती जना ॥ १ ॥
न करी निगा कुणबी न काढिता तण । कैंचे येती कण हातासी ते ॥ २ ॥
तुका म्हणे संता करू नये अनुचित[2] । पाप नाहीं नीत विचारिता ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – लंड–नास्तिक, बलदंड, विचारिता–विचार केल्यास

अर्थ – अन्याय करणाऱ्या माणसास राजाने जर दंड केला नाही तर बलदंड लोक लोकांना फारच पीडा देतील १ शेताची नीट निगा न राखता, तण दूर न करता त्याच्या हातास भरघोस धान्याचे कण कसे येणार ? २ तुकाराम महाराज म्हणतात, संतांनी दुसऱ्याला त्रास देण्याचे अनुचित काम करू नये पण नीतीचा नीट विचार केल्यास अनीतीने वागणाऱ्याना शासन करणे पाप नाही ३

३८१५ भले लोक नाहीं सांडीत ओळखी । हे तो झाली देखी दुसऱ्याची ॥ १ ॥
असो आता यासी काय चाले बळ । आपुले कपाळ वोडवले ॥ २ ॥
समर्थासी काय कोणे हे म्हणावे । आपुलिया जावे भोगावरि ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हा बोल नाहीं देवा । नाही केली सेवा मनोभावे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सांडीत–सांडीत, कपाळ–नशीब, दुर्दैव

अर्थ – चांगले लोक ओळख कधी विसरत नाहीत पण कधी दुसऱ्याचे पाहून त्याचा तसा प्रकार होतो १ असो आता याविषयी आमचे बळ काय चालणार ? आमचे दुर्दैवच ओढवले आहे २ समर्थास कुणी दोष लावावा ? आपल्याच प्रारब्धाला बोल लावावा हे बरे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तुम्हास दोष मुळीच देत नाही मीच तुमची सेवा मनोभावे केलेली नाही ४

१ शब्द ज्ञानी, २ अनृत

३८१६ मुके होता तुझ्या[1] पदरीचे जाते । काय[2] ते भोगिते मीमीपण ।। १ ।।
आपुलिये घरीं मंद होउनी बसे । श्वण कवणासी बोलो नका ।। २ ।।
तुका म्हणे तुम्हा सागतो मी खुण । देवासी ते ध्यान लावुनि बसा ।। ३ ।।

शब्दार्थ व टीपा – मंद–कपटी, घातकी मनुष्य

अर्थ – वेडया, मी मी म्हणून नेहमी घोकतोस त्यापेक्षा मुका होऊन राहिलास तर तुझ्या पदरचे काय जाईल रे ? १ आपल्या घरी निमूटपणे मंदासारखा होऊन बैस उगाच कुणाशी मीपणाचे भाषण करू नकोस २ तुकाराम महाराज म्हणतात, धागण्याची मी एक खूण तुम्हास सागतो देवाचे ध्यान धरून बसा म्हणजे झाले ३

३८१७ आषाढी निकट । आणी[3] कार्तिकीचा हाट ।। १ ।।
पुरे दोन्हीच बाजार । न लगे आणीक व्यापार ।। २ ।।
तेचि घ्यावे तेचि घ्यावे । कैवल्याच्या राशी भावे ।। ३ ।।
काही कोणा नेणें । विठो वाचूनि तुका म्हणे ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – हाट–बाजार

अर्थ – आषाढी एकादशीच्या नतर लागलीच कार्तिकी एकादशीचा बाजार भरत असतो १ हे दोन बाजारच पुरे आहेत आणखी इतर व्यापार करण्याची जरूरी नाही २ या बाजारात कैवल्याच्या राशीच्या राशी मिळतात त्याचीच देवघेव मनोभावे करावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, या बाजारात विठ्ठलावाचून इतरास कुणी कधी जाणीत नाहीत ४

३८१८ देऊनिया प्रेम मागितले चित्त । जाली फिटाफिट तुम्हा आम्हा ।। १ ।।
काशाने उदार तुम्हांसी म्हणावे । एक नेसी भावे एक देसी ।। २ ।।
देऊनिया थोडें नेसील हे फार । कुटिसी विचार अवघियाचा ।। ३ ।।
तुका म्हणे आम्हा भाडवल चित्त[4] । देउनी दुश्चित पाडियेले ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – कुटिसी–कुठित करतोस

अर्थ – देवा, तुम्ही आम्हाला तुमचे प्रेम दिलेत पण त्याच्याबदली आमचे चित्त मात्र मागून घेतलेत यामुळे आता तुमची आमची फिटफाट झाली १ आता तुम्हाला उदार तरी कशासाठी म्हणावे हो ? कारण एक भावार्थाने घेता व त्याच्या बदली तुम्ही दुसरे नेता २ थोडेसे प्रेम तुम्ही देता आणि त्याच्या बदली आमचे मोठे चित्त मात्र तुम्ही घेता त्यामुळे सब इद्रियाचा विचारच तू कुठित करतोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आमचे चित्त हेच आमचे मुख्य भाडवल आहे तेच आम्ही तुला दिले व त्यामुळे आम्ही दुश्चित राहिलो ४

३८१९ तातडीची धाव अगा आणि भाव । खोळवा तो वाव[5] निश्चयाचा[6] ।। १ ।।
म्हणउनि बरी विचाराची चाली । उरीचि[7] ते बोली कामा येते ।। २ ।।
कोरडें वैराग्य माजिरा वडिवार । उतरे तो शूर अगींचे तें ।। ३ ।।
तुका म्हणें बरी ज्ञन्याची ते चाली । साचवण्या खोली[8] कैसीयाची ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – वाव–व्यर्थ, माजिरा–माजलेला, वडिवार–बडेजाव मोठेपणा

१ काय, २ मूख, ३ आला ४ उचित, ५ मग, ६ निश्चितीचा, ७ उरली, ८ चाली

अर्थ – मोठी लगबग करून धाव घेतोस आणि चागुलपणाचा भाव आपणाकडे घेतोस. पण त्या ठिकाणी निश्चयाचा मात्र व्यर्थ खोळबा होतो १ म्हणून नीट विचार करून वागणूक ठेवावी हे बरे नुसत्या उरलेल्या परमार्थविषयक बोलण्याने काहीही उपयोग होणार नाही २ कोरडे वैराग्य व त्याचा मोठेपणा व्यर्थ मारविणारा आहे पण खऱ्या वैराग्याचे महत्त्व ज्याच्या अगी उतरते तोच खरा शूर समजावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, याचा ओघ ज्या ठिकाणी आहे त्या ठिकाणी पाणी साचविण्यासाठी खोली करण्याची काय जरूरी आहे ? ४

३८२० मी तो बहु सुखी आनदभरिला । आहें साधुसता मेळीं सदा ।। १ ।।
काहीं व्हावें ऐसें नाहीं माझ्या जीवा । आणीक केशवा तुजविण ।। २ ।।
न लगे वैकुंठ मोक्ष सायुज्यता । सुख वाटे घेता जन्म ऐसें ।। ३ ।।
मृत्युलोकीं कोण धरिल वासना । पावावया जनासवें दु ख ।। ४ ।।
तुका म्हणे तुझा दास ऐसें लोका । काहीं सकळिका कळों यावें ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा – सायुज्यता–ईश्वराशी तादात्म्य साधणारी चौथी मुक्ती, मोक्षाची एक अवस्था

अर्थ – साधुसताच्या मेळाव्यात मी राहिल्यामुळे आनदभरित व सुखी झालो आहे १ केशवा, तुझ्याशिवाय माझ्या जीवाला आणखी काही हवे असे नाही २ मला वैकुठ नको आणि सायुज्यतेची मुक्तीही नको या भक्तिसुखासाठी जन्म घेण्यातच मला मोठे सुख वाटते ३ नाहीतर या मृत्युलोकात जन्म घेऊन या लोकाबरोबर दु ख भोगण्याची वासना कोण धरणार आहे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुझा दास आहे असे या सर्व लोकाना कळून यावे ना ५

३८२१ घ्या रे लुटी प्रेम सुख । फेडा आजि धणी । चुकला तो मुकला । जाली येरझार हाणी ।।१।।
घाला घातला वैकुठीं । करूनिया जीवें साटीं । पुरविली पाठी । वैष्णवीं काळाची ।। २ ।।
अवघें आणिलें अबर । विठोसहित तेथें धुर । भेदूनि जिव्हार । नामबाणीं धरियेला ।। ३ ।।
सचित प्रारब्ध क्रियमाण । अवघीं जालीं गहन । केलीं पापपुण्यें । देशधडीं बापुडीं ।। ४ ।।
आनदें गर्जती निर्भर । घोष करिती निरतर । कापती असुर । वीर कवणा नागवती ।। ५ ।।
जें दुर्लभ ब्रह्मादिका । आजि सापडलें फुका । घ्या रे म्हणे तुका । सावचित्त होउनी ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपा – धणी–इच्छा हाणी–हानी अबर–आकाश, धुर–श्रेष्ठ, निर्भर–परिपूर्ण, नागवती–हाताला येत नाहीत, सावचित्त–सावध चित्त

अर्थ – लोकहो, तुम्ही या श्रीहरीचे प्रेमसुख लुटा आणि इच्छा पूर्ण करून घ्या नाहीतर या ठिकाणी जो चुकला तो स्वसुखाला मुकला आणि जन्ममरणाच्या फेऱ्यात सापडला ही त्याची मोठी हानीच झाली १ या वैष्णवानी आपला जीव मोबदला देऊन वैकुठाच्या ठिकाणी घाला घातला आणि त्यानी कळिकाळाचीही पाठ पुरविली २ सर्व आकाश व्यापणारा आणि सर्वश्रेष्ठ असणारा विठोबा येथे आणला हरिनामाच्या बाणाने त्याचे चित्त खेचून धरलेले आहे ३ या वैष्णव लोकानी सचित, प्रारब्ध व क्रियमाण याना पापपुण्यासकट देशोधडीस नेले, आणि ते सर्वाहून श्रेष्ठ बनले ४ आनदाने परिपूर्ण होऊन ते सतत श्रीहरीच्या नामाचा घोष करतात याना असुरसुद्धा भीतीने थरथर कापतात असे हे वैष्णववीर कुणाला हस्तगत होणार नाहीत ? ५ तुकाराम महाराज म्हणतात जे ब्रह्मादिक देवानाही दुर्लभ आहे ते आज फुकट हाती आले आहे म्हणून तुम्ही सावध चित्ताने हे लुटावे ६

३८२५ आता तरी मज सांगा साच भावे[1] । काय म्यां करावे ऐसे देवा ॥ १ ॥
चुकावया कर्म नव्हते कारण । केला होय सीण अवघाचि ॥ २ ॥
तुका म्हणे नको पाहू निरवाण । देईं कृपादान याचकासी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – साच-खरोखर, निरवाण-अंत

अर्थ – देवा, आता मी खरोखर काय करावे हे तुम्हीच मला सांगा १ तुमच्या प्राप्तीसाठी आवश्यक ते कर्म चुकवण्यास काही कारण नव्हते पण जे जे मी केले ते त्रास देणारेच झाले २ तुकाराम महाराज म्हणतात, मी याचक कृपेचे दान मागावयास आलो आहे तू माझा अंत पाहू नकोस ३

३८२६ बोल नाहीं तुझ्या दातृत्वपणासी । आम्ही[2] अविश्वासी सर्वभावे ॥ १ ॥
दंभे करी भक्ती सोंग दावी जना । अंतरीं भावना वेगळिया ॥ २ ॥
तुका म्हणे देवा तू काय करिसी । कर्मा दुस्तरासी आमुचिया ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – अंतरीं-चित्तात, अंत करणात

अर्थ – देवा, तुझ्या दातृत्वास काही बोल लावता येणार नाही आम्हीच सर्व भावाने अविश्वासू आहोत १ आम्ही भक्ती करतो ही दंभाने करतो, आणि लोकाना सोंग दाखवितो पण अंत करणात आमच्या भावना वेगळ्याच असतात २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू तरी काय करणार ? आमचेच कर्म मोठे दुस्तर आहे ३

३८२७ नामधारकासी नाहीं वर्णावर्ण । लोखंड प्रमाण नाना जात ॥ १ ॥
शस्त्र अथवा गोळे भलता प्रकार । परिसीं संस्कार सकळ ही हेम ॥ २ ॥
पर्जन्य वर्षता जीवना वाहावट । ते समसकट गंगे मिळे ॥ ३ ॥
सर्व तें हे जाय गंगाचि होऊन । तैसा वर्णावर्ण नाहीं नामीं ॥ ४ ॥
महापुरीं जैसे जातसे उदक । मध्यें तें तारक नाव जैसी ॥ ५ ॥
तये नावेसंगें ब्राह्मण तरती । केवीं ते बुडती अनामिक ॥ ६ ॥
नाना काष्ठजात पडता हुताशनीं । ते जात होउनी एकरूप ॥ ७ ॥
तेथें निवडेना घुरे कीं चंदन । तैसा वर्णावर्ण नामीं नाहीं ॥ ८ ॥
पूर्वानुवोळख तेंचि पैं मरण । जरि पावे जीवन नामामृत ॥ ९ ॥
नामामृतें जाले मुळीचे स्मरण । सहज साधन तुका म्हणे ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – वर्णावर्ण-वर्णातील भेद, परिसीं-परिसाशी, हेम-सुवर्ण, वाहावट-वाहतपणा, अनामिक-अस्पृश्य, हुताशनीं-अग्नीत, घुरे-एक दुर्गंधी वृक्ष

अर्थ – तुझे सतत नामस्मरण करणारे आहेत त्यांच्या बाबतीत वर्णावर्ण म्हणजे हा वर्ण श्रेष्ठ, तो कनिष्ठ असा भेद येत नाही यास उदाहरण नाना प्रकारच्या लोखंडाचे आहे १ या लोखंडाचे शस्त्र असो, अथवा गोळा असो, कोणताही प्रकार असो, त्याचा परिसाशी संबंध येताच त्याचे सुवर्णच होणार २ आकाशातून पाऊस पडताच त्याचे पाणी वाहाणारच, सर्व प्रकाराने वाहून ते समत्वाने एकदम गंगेसच मिळणार ३ सर्व प्रकारचे पाणी एक प्रकारे गंगामयच होऊन जाते त्याप्रमाणे नामस्मरण करणाऱ्यात वर्णावर्ण हा भेद उरत नाही. ४ हे सर्व पाणी शेवटी महापुरातच जाते यातून तारणारी जशी नाव असते, तशीच भाव भवसागरातून तारणारी म्हणजे प्रभूचे नाम होय ५ या नावेत बसल्यावर ब्राह्मण तरून जातात, आणि अस्पृश्य का बुडून मरतात ? ६ अग्नीत नाना प्रकारची लाकडे पडतात परंतु ती शेवटी एकरूप होऊनच जळून जातात ७ या ठिकाणी हा सुवासिक चंदन व हा दुर्गंधीयुक्त

१ भाव, २ आम्हा नष्टवीसि

वृक्ष असा भेद कधी होत नाही. त्याचप्रमाणे नामस्मरणाच्या मार्गात वर्णावर्ण भेद नाही. ८ पूर्वकर्माची ओळख झाली की मरणच उरो राहावे, परतु नामाच्या अमृताने त्यास पुनः जीवन प्राप्त होते. ९ तुकाराम महाराज म्हणतात, नामाच्या या अमृतामुळे मूळस्थानाचे स्मरण झाल्यामुळे सर्व दोष संपले. असे हे प्रभूच्या प्राप्तीचे सहज साधन आहे. १०

विवरण– नामस्मरणाचा सोपा व खात्रीचा मार्ग सर्व जातीना व वर्णांना खुला असल्याची ग्वाही देणारा तुकोबाचा हा अभग क्षेपक असल्याचे अनेक गाथाकराना वाटते परतु त्यातील आशय मात्र सुस्पष्ट व वारकरी अथवा भागवत सप्रदायास धरून आहे. नामस्मरणात रममाण होण्याचा अधिकार सर्व जातीना व वर्णांना आहे भक्तिमार्गात जातिभेद अथवा वर्णभेद याना स्थान नाही. यज्ञयाग, ग्रथश्रवण, पठण, कर्मकाड, पुरश्चरण, इत्यादी साधनापेक्षा नामस्मरण हे सर्वांनाच सुलभ आहे येथे ना जातीची आडकाठी, ना वर्णाचे माहात्म्य जे खरे विष्णुदास आहेत त्याना, श्रीहरीच्या भक्ताना जातीची अथवा वर्णाची बधने नाहीत. भक्तीच्या क्षेत्रातील हा क्रान्तिकारक विचार प्रथम भगवद्गीतेने रूढ केला व त्याचाच पुरस्कार पुढे ज्ञानदेववादी मराठी सतानी केला. भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायात ‘ स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राऽस्तेपि यान्ति परां गतिम् ’ माझा आश्रय केल्यानतर वैश्य, स्त्रिया व शूद्र अथवा अत्यजादी पापयोनीही परमगतीला पोचतील ही भगवताची ग्वाही फारच महत्त्वाची आहे.

श्रीकृष्णाच्या या ग्वाहीवरील श्रीज्ञानदेवाचे उत्कृष्ट भाष्य वरील अभगाला जुळेल असेच आहे. भगवताचे नामस्मरण करणाऱ्यास जसे जातीचे वा वर्णाचे बधन आड येत नाही, तसेच त्याचे पूर्वायुष्यातील अथवा पूर्वजन्मातील पापकर्महो आड येत नाही, असा भागवत सप्रदायाचा एक सिद्धान्त आहे. खऱ्याखुऱ्या पश्चात्तापाने व वैराग्याने पूर्वकर्मेही नष्ट होते. याला नेहमीचा परिसाचा, चंदनाचा, अग्नीचा, गगेचा दृष्टान्त सर्वत्र दिला जातो ‘ अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ’ अतिशय दुराचारी असला तरी तो जर अनन्य भक्त बनला तर तो साधूच समजला पाहिजे असे गीतेचे मत आहे. ‘ यालागीं दुष्कृती जर्‍ही जाहाला । तरि अनुतापतीर्थी न्हाला । न्हाऊनि मजआंतु आला । सर्वभावें ॥ ’ अशा अवस्थेत कुणाला हीन लेखावे ? कुणाला कमी प्रतीचे मानावे ? जे पापयोनीत जन्मले, जे दगडासारखे मूर्ख आहेत, पण ‘ माझ्या ठायीं दृढ सर्व भावें ’ असणाऱ्याना हीन लेखता येणार नाही. ज्याच्या वाणीत भगवताचे गुण आहेत, ज्याच्या दृष्टीत त्याचेच रूप आहे, ‘ जयाचें मन सकल्प । माझाचि वाहे ’ त्याना कमी कसे मानता येईल ? म्हणूनच ज्ञानदेवानी याविषयी निर्णय दिला आहे की, ‘ म्हणोनि कुळ जाति वर्ण । हें आघवेंचि गा अकारण । एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ॥ जैसे तंवचि वहाळ वोहळ । जव न पवती गंगाजळ । मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप ॥ कां खैर चंदन काष्ठें । हे विवंचना तंवचि घटे । जव न घापती एकवटें । अग्नीमाजीं ॥ तैसी क्षत्री वैश्य स्त्रिया । कां शूद्र अत्यजादि इया । जाति तंवचि वेगळालिया । जव न पवती मातें ॥ मग जाती व्यक्ती पडे बिंदुलें । जेव्हां भाव होती मज सोनलें । जैसे लवणकण घातलें । सागरमाजीं ’ ज्ञानदेवकृत या भाष्याचा व त्यातील दृष्टातासहित मताचा फार मोठा परिणाम तुकोबाच्या वरील अभगावर आहे हे स्पष्ट दिसते. लोहपरिसाचा तुकोबानी दिलेला दृष्टातही वरील ज्ञानदेवकृत भाष्यात आहे ‘ अगा वनीं फोडावयाचि लागीं । लोहो मिळो का परिसाचे आंगीं । कां जे मिळतिये प्रसगीं । सोनेंचि होईल ’ या सर्व दृष्टान्ताचा निर्णय ज्ञानदेवानी असा दिला आहे की, ‘ यापरी पापयोनीही अर्जुना । का वैश्य शूद्र अंगना । मातें भजता सदना । माझिया येती ’

३८२८ काय वांचोनियां जालों भूमिभार । तुझ्या पायीं थार नाहीं तरि ॥ १ ॥
जातां भलें काय डोळियांचें काम । जरि पुरुषोत्तम न देखती ॥ २ ॥
काय मुख बिळ श्वापदाचे धांम[१] । नित्य तुझें नाम नुच्चारितां ॥ ३ ॥
तुका म्हणे पै या पांडुरंगाविण । न वचेचि क्षण जीव भला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– थार–स्थान, आश्रय, धाम–घर, न वचे–जात नाही.

१ धाव.

अर्थ :– देवा, तुझ्या पायाशी जर मला आश्रय मिळाला नाही तर मग वाचून उपयोग तरी काय ? व्यर्थ भूमीला भारच व्हायचे १ हे माझे डोळे जर या पुरुषोत्तमाला पाहाणार नाहीत तर त्याचे काम तरी काय ? त्यापेक्षा ते गेलेले बरे की २ या माझ्या मुखाने नित्य तुझे नाम जर उच्चारले नाही तर मग त्याचा उपयोग काय ? ते खरे म्हणजे मग स्वापदाच्या वस्तीचे बीळच म्हणावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या पांडुरंगाशिवाय एक क्षणभरही जात नसेल तरच हा जीव वाचून भला आहे ४

३८२९ सोइऱ्यासी करी पाहुणेर बरा । धाडितो ठोंबरा संतांलागीं ॥ १ ॥
गाईसी देखोनी बदबदा मारी । घोड्याची चाकरी गोड वाटे ॥ २ ॥
पान फुल नेतो वेश्येसी उदड । ब्राह्मणासी खाड देऊं नेदी ॥ ३ ॥
पर्वकाळीं धर्म न करी नासरी[1] । वेची राजद्वारीं उदडचि[2] ॥ ४ ॥
कीर्त्तना जावया होतसे हीपुष्टी । खेळतो सोंकटीं रात्रदिवस ॥ ५ ॥
बाइलेच्या गोता आवडीनें पोसी । मातापितियासी दवडितो ॥ ६ ॥
तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – मागे पहिल्या खंडातील अभंग क्रमांक ६८३ पाहावा

३८३० का हो पांडुरंगा न करा धांवणे । तरि मज कोणें सोडवावे ॥ १ ॥
तुझा म्हणऊनि आणिकापें उभा । राहो हे तो शोभा नेदी आता ॥ २ ॥
काळें पुरविलो पाठी दुरवरी । पुढें पाया धीरी राहों नेदी ॥ ३ ॥
नको आणूं माझें संचित मनासी । पावन आहेसी पतिता तू ॥ ४ ॥
तुका म्हणे चाले आणिकांची सत्ता । तुज आठविता[3] नवल हे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – धावणें–रक्षण आणिकाची–इतराची

अर्थ – पांडुरंगा, तुम्ही जर धावून येऊन माझे रक्षण केले नाही तर माझे रक्षण तरी कोण हो करणार ? तुम्ही का येत नाही ? मला तुमच्याशिवाय कोण सोडवणार ? १ देवा, मी तुझा आहे, आणि आता इतरापाशी गेलो तर ते अगदी शोभणार नाही २ या काळाने माझी पाठ फार दूरवर पुरविली आहे तो मला माझ्या पायांवर क्षणभरही स्थिरपणे उभा राहू देत नाही ३ देवा, तू पतितांना पावन करणारा असल्याने माझे संचितकर्म मनात आणू नकोस ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुला आठवीत असता इतरांची सत्ता आमच्यावर चालावी हे मोठेच नवल आहे ५

३८३१ कावळ्याच्या गळां मुक्ताफळमाळा । तरी काय त्याला भूषण शोभे ॥ १ ॥
गजालागीं केला कस्तुरीचा लेप । तिचे तो स्वरूप काय जाणे ॥ २ ॥
बकापुढें सांगे[4] भावार्थवचन । वाउगाचि सीण होय त्यासी ॥ ३ ॥
तुका म्हणे तैसे अभाविक जन । त्यासी वांया सीण करूं नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गजालागीं–हत्तीसाठी, वाउगा–उगाच, व्यर्थ.

अर्थ – कावळ्याच्या गळ्यात जरी मोत्यांचे हार घातले तरी ते त्याला भूषण म्हणून शोभतील काय ? १ हत्तीसाठी कस्तुरीचा लेप जरी केला तरी तिचे स्वरूप तो काय जाणणार ? २ बगळ्यापुढे अहिंसाधर्माचे प्रवचन

१ कवडी, २ द्रव्यराशी, ३ आठविता, ४ सांग

करून काय उपयोग ? त्याचा काही उपयोग न होता बोलणारास मात्र व्यर्थ शीणच व्हायचा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याप्रमाणे भावरहित भक्तास कधीही उपदेश करू नये, उगाच व्यर्थ शीण करू नये. ४

३८३२ आतां धरितों पदरीं । तुज मज करीन सरी ॥ १ ॥
जालों जीवासी उदार । उभा ठाकलों समोर ॥ २ ॥
तुका विनवीतसे संतां । ऐसें सांगा पंढरिनाथा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा:– सरी–बरोबरी.

अर्थ :– देवा, आता मी तुझ्या पदरास धरून तुझी व माझी बरोबरी करीन. १ मी आता जीवावर उदार होऊन तुझ्यासमोर उभा राहिलो आहे. २ तुकाराम महाराज म्हणतात, संतहो, असा निरोप त्या पंढरीनाथाला सांगा. ३

३८३३ न कळसी ज्ञाना न कळसी ध्याना । न कळसी दर्शना धुंडाळितां ॥ १ ॥
न कळसी आगमा न कळसी निगमा । न बोलवे सीमा वेदां[1] पार ॥ २ ॥
तुका म्हणे तुझा नाहीं अंतपार । म्हणोनि विचार पडिला मज ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– दर्शना–शास्त्रांना, ही सहा मानण्यात आली आहेत. न्याय, वैशेषिक, वेदांत, बौद्धमत, सांख्य व पूर्वमीमांसा, ही किंवा, सौर, शक्ति, गाणपत्य, शैव, वैष्णव व स्कंद ही सहा दर्शने आगमा–शास्त्रास, निगमा–वेदास.

अर्थ :– देवा, तू ज्ञानमार्गाने समजत नाहीस, ध्यानमार्गाने समजत नाहीस, अनेक दर्शने जरी धुंडाळली तरी तू ध्यानी येत नाहीस १ तू सहा शास्त्रांना समजत नाहीस की वेदांना कळत नाहीस. ब्रह्मादिकानाही तुझे आकलन होत नाही. २ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या स्वरूपाचा काही अंतपार लागत नाही. म्हणून तुझ्या स्वरूपाचा मला विचारच पडलेला आहे. ३

३८३४ पायां लावुनियां दोरी । भृंग बांधिला लेंकुरीं ॥ १ ॥
तैसा पावसी बंधन । मग सोडवील कोण ॥ २ ॥
गळां बांधोनियां दोरी । वांनर हिंडवी घरोघरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे पाहे । रीस धांपा देत आहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– भृंग–भुंगा, रीस–अस्वल.

अर्थ –भुंग्याच्या पायाला दोरी लावून एखादे लहान मूल त्याला ओढीत असते. १ त्याप्रमाणे एखाद्या दिवशी तू बंधनात पडशील मग तुला कोण रे सोडवील ? २ वानरांच्या गळ्यात दोरी बांधून त्याला त्याचा मालक पोटासाठी घरोघरी हिंडवतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अस्वलही याचप्रमाणे भटकून धापा देत आहे. पाहा तुझीही अशीच अवस्था होईल. ४

३८३५ मायबापें सांभाळिती । लोभाकारणें पाळिती ॥ १ ॥
तैसा नव्हे देवराव । याचा कृपाळु स्वभाव ॥ २ ॥
मनासारिखें न होतां । बाळकासी मारी माता ॥ ३ ॥
तुका म्हणे सांगू किती । बाप लेंकासी मारिती ॥ ४ ॥

१ ब्रह्मादिका.

शब्दार्थ व टीपा – लोभाकारणें–पुढे आपणास सांभाळतील या लोभासाठी.

अर्थ :– मुलाचा सांभाळ आईबाप करतात, परंतु पुढे ही आपणास सांभाळतील अशा लोभासाठी ते पालन-पोषण करतात १ हा देवराव मात्र त्या प्रकारचा नाही याचा स्वभाव फारच कृपाळू आहे २ आपल्या मना-सारखे जर झाले नाही तर आई बालकास मारते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपली सांगू तरी किती ? बापही मुलास मारतात ४

३८३६ धन मेळवूनि कोटी । सवें नये रे लंगोटी ॥ १ ॥
पानें खाशील उदंड । अंतीं जासी सुकल्या तोंडें ॥ २ ॥
पलंग न्याहाल्या सुपती । शेवटीं गोवऱ्या सांगातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे राम । एक विसरतां श्रम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सवें-बरोबर, अंतीं-शेवटी, न्याहाल्या-गाद्या,गिर्द्या, सुपती-गादी

अर्थ – तू धनसंपत्ती कोट्यवधी मिळवशील, पण तुझ्याबरोबर एक लंगोटीही येणार नाही १ पानाचे विडे खाऊन रोज तू तोंड रंगवितोस पण शेवटी मेल्यानंतर सुकल्या तोंडानेच तू जाशील २ पलंगावर गाद्यागिर्द्या टाकून तुला झोपण्याची हौस आहे पण शेवटी गोवऱ्याच तुझ्याबरोबर येणार आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू एका श्रीरामास विसरशील तर तुला फारच परिश्रम होतील ४

३८३७ विनवितों चतुरा तुज विश्वंभरा । परियेसीं दातारा पांडुरंगा ॥ १ ॥
तुझे दास ऐसे जगीं वाखाणिले । आतां नव्हे भलें मोकलितां ॥ २ ॥
माझे गुणदोष कोण जाणे मात । पावनपतित नाम तुझें ॥ ३ ॥
लोभ मोह माया आम्हां बांधवितां । तरि हा अनंता बोल कोणा ॥ ४ ॥
तुका म्हणे मी तों पतितचि खरा । परि आलों दातारा शरण तुज ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – परियेसीं-ऐक, मोकलितां-सोडून देतांना

अर्थ – विश्वंभरा, चतुरा पांडुरंगा, दातारा मी तुम्हांस एक विनंती करीत आहे ती तुम्ही ऐकावी १ आम्ही तुझे दास आहोत अशी सर्व जगात वाखाणणी झाली आहे. तेव्हा आता तुम्ही आम्हास सोडून द्याल तर ते बरे नाही २ देवा, तुमचे नावच पतितपावन असे असताना माझ्या गुणदोषाची गोष्ट ऐकणार तरी कोण हो ? ३ लोभ मोह, माया इत्यादींचे बंधन आम्हांला असते हे खरे, पण अनंता, यासंबंधी कुणास दोष देता येईल ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, दातारा, मी तर खरोखरीच पतित आहे पण तुला शरण आलेलो असल्याने मला तार ५

३८३८ त्राहे त्राहे त्राहे सोडवीं अनंता । लागो दे ममता तुझे पायीं ॥ १ ॥
एकचि मागणें देईं तुझी गोडी । न लगे[1] आवडी आणिकाची ॥ २ ॥
तुझें नाम गुण वर्णीन पवाडे । आवडीच्या कोडें नाचों रंगीं ॥ ३ ॥
बापा विठ्ठलराया हेंचि देईं दान । जोडती चरण जेणें तुझे ॥ ४ ॥
आवडीसारिसें मागितलें जरी । तुका म्हणे करीं समाधान ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – त्राहे-रक्षण कर, आणिकाची-इतराची, कोडें-कौतुकाने

अर्थ – अनंता, तू माझे रक्षण कर. या संसारातून तू मला सोडीव तुझ्या पायाची ममता माझ्या मनात निर्माण होऊ दे १ देवा, तुझ्या सहवासाची गोडी तू द्यावीस हेच एक मागणे आहे. मला इतराचे कुणाचेही प्रेम न

१ लगो.

लामो २ मी तुझ्याच नामाची व गुणाची कीर्ती गात राहीन त्याच प्रेमात कौतुकाने नाचत राहीन ३ बापा विठ्ठलराया, जेणेकरून तुझे चरण मिळतील असेच तू कर हेच एक दान मला तू दे ४ तुकाराम महाराज म्हणतात मी माझ्या आवडीप्रमाणे तुला मागितले आहे, तरी तू ते देऊन माझे समाधान करावेस ५

३८३९ सुगरणीबाई थिता नास केला । गूळ तो घातला भाजीमध्यें ॥ १ ॥
क्षीरीमध्यें हिंग दुधामध्ये बोळ । थितेंचि वोगळ कैसें[1] केले ॥ २ ॥
दळण दळोनी भरू गेली पाळी । भरडोनि वोगळी नास केला ॥ ३ ॥
कापुराचे साते आणिला लसण । वागविता सीण दु ख होय ॥ ४ ॥
रत्नाचा जोहारी रत्नचि पारखी । येर देखोदेखीं हातीं घेती ॥ ५ ॥
तुका म्हणे जरी योग घडे निका । न घडता थुका तोंडावरी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – थिता–व्यय, क्षीरीमध्यें–खिरीमध्यें, बोळ–एक कडू पदार्थ, साते–बरोबर, जोहारी–रत्नाची पारख करणारा, येर–इतर, निका–चागला

अर्थ – अग सुगरण बाई, तयार असलेल्या स्वयपाकाचा भाजीमध्ये गूळ घालून व्यर्थ नाश केलास १ खिरीमध्ये हिंग आणि दुधामध्ये कडू बोळ घालून तू चागल्या सिद्ध पदार्थांचा नाश केलास २ दळण दळून झाल्यावर तू ते भरून दिलेस, पण ते जाडेभरडे दळून चागल्या धान्याचा नाश केलास ? ३ कापराच्या बरोबर तू बाजारातून लसूण आणलास, त्यामुळे शीण होऊन अखेर दु खच होणार ४ रत्नाची पारख करणा यासच रत्न ओळखू येईल इतर लोक वरवर पाहून हातात घेऊन फसतात ५ तुकाराम महाराज म्हणतात, जर चागला योग घडला तरच ते ठीक होते नाही तर नाश करणाराच्या तोंडावर थुकावे हे बरे ६

३८४० बाप माझा दिनानाथ । वाट भक्ताची पाहात ॥ १ ॥
कर ठेवुनिया कटीं । उभा चद्रभागे तटीं ॥ २ ॥
गळा वैजयतीमाळा । रूपें डोळस सावळा ॥ ३ ॥
तुका म्हणे भेटावया । सदा उभारिल्या बाहूचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तटीं–तीरावर, बाहूचा–हात

अर्थ – हा दीनानाथ माझा बाप असून हा आपल्या भक्ताची वाट पाहात आहे १ हात कमरेवर ठेवून हा चद्रभागेच्या तीरावर उभा आहे २ याच्या गळयात वैजयतीची माळ असून हा रूपाने सावळा व चागला डोळस आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या भक्ताना भेटण्यासाठी याने सतत आपले हात उभारलेले आहेत ४

३८४१ माझें जीवन तुझे पाय । कृपाळु तू माझी माय ॥ १ ॥
नेदीं दिसों किविलवाणें । पाडुरगा तुझें तान्हे ॥ २ ॥
जन्ममरण तुजसाठीं । आणीक नेणें दुजी गोष्टी ॥ ३ ॥
तुका म्हणे तुजविण । कोण हरिल माझा सीण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नेदीं–देऊ नकोस, दुजी–दुसरी, सीण–त्रास

अर्थ – देवा, तुझे पाय हेच माझे जीवन आहे तूच माझी कृपाळू अशी माता आहेस १ पांडुरगा, या तुझ्या तान्हयास केविलवाणे दिसू देऊ नकोस २ देवा, तुझ्यासाठीच माझे जन्ममरण असून मी तुझ्या शिवाय दुसरी कोणतीही गोष्ट जाणीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्याशिवाय माझा त्रास कोण रे दूर करील ? ४

[1] नाश केला

३८४२ कां रे पुंड्या[1] मातलासी । उभें केलें विठ्ठलासी ।। १ ।।
ऐसा कैसा रे तूं धीट । मागें भिरकाविली वीट ।। २ ।।
युगें जालीं अठ्ठावीस । अजुनी न म्हणसी बैस ।। ३ ।।
भाव देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ।। ४ ।।
तुका म्हणे पुंडलिका । तूंचि[2] बळिया एक निका ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा :– मातलासी–माजलास, निकट–तीव्र, निका–खरोखर

अर्थ :– पुंडलीका, तू एवढा कसा रे माजलास ? माझ्या या विठ्ठलास तू उभे केलेस की १ देव तुला भेटायला आला तेव्हा तू त्याच्याकडे एक वीट भिरकावून दिलीस आणि तीवर त्याला उभे केलेस. एवढा कसा रे तू धीट ? २ त्याला उभे करून अठ्ठावीस युगे झाली तरी तू त्याला 'बैस आता' असे म्हणत नाहीस ३ तुझा तीव्र भाव पाहून या देवाने आपले वैकुंठ सोडले ४ तुकाराम महाराज म्हणतात, पुंडलीकराया, तूच एक या देवाचा खरोखर बलवान असा भक्त आहेस ५

विवरण– तुकोबाचे आराध्य दैवत पंढरपुरचा विठ्ठलराय. यावर त्यांचे भारी प्रेम भक्ताच्या रक्षणासाठी हा विठ्ठल विटेवर तिष्ठत अठ्ठावीस युगापर्यंत उभा आहे ही एवढी तपस्या करताना त्याचे पाय नाही दुखणार ? अशी एक गोड शंका आल्याने कळवळून तुकाराम महाराज विठ्ठलाला उभे करणाऱ्या पुंडलीकासच दोष देतात आईबापाच्या सेवेत मग्न झालेल्या या पुंडलीकाने विठ्ठलास वीट फेकून तीवर उभे केले असा हा मस्तवाल पुंडलीक याने आपल्या देवास उभे केलेले पाहून बुवाना सात्त्विक संताप आलेला आहे आणि मग हळूहळू तो निवलाही त्याच्या ध्यानात येते की, या पुंडलीकाचा भाव फार मोठा म्हणूनच श्रीहरी वैकुंठ सोडून त्याच्याकडे आला शेवटी तुकोबा म्हणतात व कबूल करतात की, हा पुंडलीकच मोठा बलवान भक्त आहे कारण त्यानेच आपल्या सामर्थ्याने वैकुंठाहून या विठ्ठलाची येथे स्थापना केली या पुंडलीकाचा गौरव अनेक संतानी केलेला आहे 'पुंडलीकाचें निकट सेवें । कैसा धावे बराडी ' असे तुकोबानीच अन्यत्र म्हटले आहे ' पुंडलीकाचे भाग्य वर्णावया अमरीं । नाहीं चराचरीं ऐसा कोणी ' अशा शब्दात श्रीनिवृत्तिनाथानी त्याचा गौरव केला आहे ' पुंडलीकाचे भेटी आणि भिवरेचे तटीं । परब्रह्म उभें वाळुवटीं गे माये ' म्हणून नामदेवानी कौतुक केले आहे ' पुंडलीकें नवल केलें । गोपिगोपाळा आणिलें ' म्हणून जनाबाईनें त्याचे उपकार स्मरले आहेत ' पुंडलीकें पिकविलें । विश्वा पुरलें न्यावया ' म्हणून निळोबानी त्याचे महत्त्व वर्णन केले आहे ' पुंडलीकें सुख दाखविलें लोकां । विठ्ठलनाम नौका तारावया ' म्हणून चोखोबानी त्याची स्तुती केली आहे जनाबाईने आणखी एका ठिकाणी पुंडलीकाच्या कार्याचे मर्म वर्णन करताना म्हटले आहे, ' पुंडलीक भक्त बळी । विठो आणिला भूतळीं, ' पुंडलीक भक्तराज । तेणें साधियेलें काज । वैकुंठीचें निज । परब्रह्म आणिलें ', ' वैकुंठींचा देव आणिला भूतळा । धन्य तो आगळा पुंडलीक असा बोलीनी तुकोबानीही अनेक ठिकाणी त्याचा गौरव केला आहे एकनाथानी याचे माहात्म्य गाताना म्हटले आहे, ' पुंडलीकें उभा केला । भक्त भावाचा भुकेला । युगें झालीं अठ्ठावीस । उभा मर्यादा पाठीस ' अशा या पुंडलीकामुळेच प्रत्र जीवाना आपले हितगुज सांगण्याचा एक आधार या भूतलावर निर्माण झाला

३८४३ तुज पाहातां समोरी । दृष्टि न फिरे माघारी ।। १ ।।
माझें चित्त तुझ्या पायीं । मिठी पडली पंढरीराया ।। २ ।।
नव्हे सारिता[3] निराळें । लवण मेळवितां जळें ।। ३ ।।
तुका म्हणे बळी । जीव दिला पायांतळीं ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – सारिता–दूर केल्यावर, लवण–मीठ

१ प्रेमें, २ तूंचि भक्त बळिया निका, ३ सरिता

अर्थ – देवा, तुला समोर डोळ्यानी पाहिले की दृष्टी तेथून माघारी फिरत नाही १ पंढरीनाथा, माझ्या चित्ताने तुझ्या पायाना मिठी मारलेली आहे २ त्याला तू दूर सारल्यावर ते दूर होणार नाही पाण्यात मीठ मिसळल्यावर ते निराळे काढता येईल का ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आपला जीव तुमच्या पायांशी बळी दिलेला आहे ४

३८४४ उपदेश किती करावा खळासी । नावडे तयांसी बरें कांहीं ॥ १ ॥
शुद्ध कां वासना नव्हे चांडाळाची । होळी संचिताची केली तेणें ॥ २ ॥
नाहीं भाव मनीं नाइके वचन । आपला[1] आपण उणे[2] घेतो ॥ ३ ॥
तुका म्हणे त्यासी काय व्याली राड । करी[3] बडबड रिती दिसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खळासी–दुष्ट माणसास, नाइके–ऐकत नाही, रिती–रात्री, अथवा व्यर्थ, रिकामी, दिसे–दिवसभर

अर्थ – या दुष्ट माणसास उपदेश तरी किती करावा ? त्याला काही चागले आवडतच नाही १ या चाडाळास शुद्ध वासना का बरे होत नाही ? त्याने आपले सचितकर्म व्यर्थ जाळून टाकले २ त्याच्या मनात चागला भाव नसतो, कुणी वाईट सागितले तर तो कधी ऐकत नाही, तो आपला आपणच उणेपणा आणतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्या आईने, राडेने यास जन्म तरी का दिला ? कारण हा रात्रदिवस व्यर्थ बडबड करीत असताना दिसतो ४

३८४५ समर्थासी लाज आपुल्या नामाची । शरण आल्याची लागे चिंता ॥ १ ॥
न पाहे तयाचे गुणदोष अन्याय । सुख देऊनि साहे दु ख त्याचे ॥ २ ॥
मान भलेपण नाहीं फुकासाटीं । जयावरि[4] गाठी झीज साहे ॥ ३ ॥
तुका म्हणे हे तूं सर्व ही जाणसी । मज अधिरासी धीर नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– साहे–सहन करतो

अर्थ – समर्थाला आपल्या नावाच्या सामर्थ्याची लाज वाटत असल्याने तो शरण आलेल्याची चिंता सतत करीत असतो १ तो कधी त्याचे गुणदोष अथवा त्याने केलेले अन्याय पाहात नाही उलट त्याला सुख देऊन स्वत मात्र दु ख सहन करतो २ लोकात मानसन्मान व भलेपणा फुकट मिळत नाही त्यासाठी स्वत ला मोठीच झीज सोसावी लागते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू हे सर्व काही जाणीत आहेस पण मी अधीर असल्यामुळे मला दम धरवत नाही ४

३८४६ आनंदें कीर्तन करा करीं घोष । आवडीचा रस प्रेमसुख ॥ १ ॥
मज या आवडे वैष्णवाचा संग । तेथें नाहीं लाग कळिकाळा ॥ २ ॥
स्वल्प मंत्र[5] वाचे बैसलासे निका । राम कृष्ण सखा नारायण ॥ ३ ॥
विचारिता दुजें वाटे मज लाज । उपदेशें काज आणीक नाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे चित्त रंगलेसे ठायीं । माझें तुझ्या पायीं पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – लाग–प्रवेश, स्वल्प–सोपा, छोटा, निका–चागला, विचारिता–विचार करताना, काज–कारण

१ आपुल्या, २ नाडियेले, ३ करिते, बडबड रात्रदिवस, ४ जयवरी, ५ मात्र

अर्थ :– मी मोठ्या आनंदाने श्रीहरीच्या कथा–कीर्तनप्रसंगी नामस्मरणाचा घोष करीन आणि अत्यंत आवडीने प्रेमसुखाचा रस भोगीन. १ मला या वैष्णवाची संगत फार आवडते. कारण या ठिकाणी कळिकाळाला प्रवेश मिळत नाही. २ रामकृष्ण हा सोपा व लहान मंत्र आमच्या वाणीत चांगल्या रीतीने बसला आहे. हा नारायण आमचा सखाच आहे. ३ आता या शिवाय दुसऱ्याचा विचार करतानाही मला लाज वाटते, म्हणून या मंत्राशिवाय दुसऱ्या उपदेशाचेही कारण उरलेले नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, माझे चित्त तुमच्याच पायाशी रगून गेले आहे. ५

३८४७ ब्रह्मज्ञान जेथें आहे घरोघरीं । सर्व निरंतरीं चतुर्भुज ॥ १ ॥
पापा नाहीं रीग काळाचें खंडण । हरिनामकीर्तन परोपरीं ॥ २ ॥
तुका म्हणे हा चि भाव माझ्या चित्तीं । नाहीं आणिकां गती चाड मज ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– रीग–प्रवेश, चाड–इच्छा.

अर्थ :– ज्या ठिकाणी परब्रह्माचे ज्ञान झाले आहे त्या घराघरात सर्वत्र श्रीहरी चतुर्भुज होऊन वावरत असतात. १ या ठिकाणी पापाचा प्रवेशही होत नाही. काळाचे खंडण झालेले असते. कारण येथे नित्य हरिकीर्तन परोपरीने होत असते. २ तुकाराम महाराज म्हणतात, हाच एक भाव माझ्या चित्तात आहे. याच्याशिवाय इतराची मला जरूरीच नाही, इच्छाही नाही. ३

३८४८ मज नाहीं कोठें उरला दुर्जन । मायबापाविण ब्रह्मांडीं हीं[1] ॥ १ ॥
कासया जिकीर करणें येविशीं । भयाची मानसीं चिंता खंती ॥ २ ॥
विश्वंभराचिये लागलों सांभाळीं । संत नेती चाली आपुलिया ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें पाळण पोषण । करी नारायण सर्वस्वेंसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कासया–काय म्हणून.

अर्थ :– या ब्रह्मांडात मला माझ्या मायबाप श्रीहरीशिवाय दुसरे काहीच दिसत नसल्यामुळे मला कुठे दुर्जन दिसतच नाही १ मग मी याविषयी उगीच जिकीर का करावी? मनात भय, चिंता तरी का बाळगावी? २ माझा सांभाळ हा विश्वंभर करीत आहे, आणि संतजन मला आपल्याबरोबर आपल्या मार्गाने नेत आहेत. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा नारायण माझे पालनपोषण सर्वतोपरी करीत आहे. ४

३८४९ नाहीं हित ठावें जननीजनका । वाविले लौकिकाचार तींहीं ॥ १ ॥
अंधळ्याचे काठी लागले आंधळे । घात एकवेळे मार्गेपुढें ॥ २ ॥
न ठेवावीं चाली करावा विचार । वरील आहार गळी लावी ॥ ३ ॥
तुका म्हणे केला निवाडा रोकडा । राऊत हा घोडा हातोहातीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मागील अभंगक्रमांक ३४९० पाहावा,

३८५० आतां पहाशील काय माझा अंत । आलों शरणागत तुज देवा ॥ १ ॥
करीं अंगीकार राखें पायांपाशीं । क्षणीं दिसों देसी कोंविल्वाणें ॥ २ ॥
नाहीं आइकिली मागे ऐसी मात । जे त्वां शरणागत उपेक्षिले ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां धरीं अभिमान । आहेसी तूं दानशूर दाता ॥ ४ ॥

---
[1] हे.

शब्दार्थ व टीपा :– झणीं–नको, मात–गोष्ट, हकीकत

अर्थ :– देवा, आता माझा अंत पाहाशील काय रे ? मी तुला शरण आलो आहे. १ तू माझा स्वीकार करून आपल्या पायाशी राखावेस तू मला कधी केविलवाणे दिसू देऊ नकोस. २ जे तुला शरण आले त्यांची तू उपेक्षा केलीस, अशी हकीगत मी कधीच ऐकलेली नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू आता आपल्या भक्ताविषयी अभिमान धर. तू मोठा दानशूर दाता आहेस ४

३८५१ होईल तो भोग भोगीन आपुला । न घलीं विठ्ठला भार तुज ॥ १ ॥
तुम्हांपासाव हे इच्छितसें दान । अंतरींचें ध्यान मुखीं नाम ॥ २ ॥
नये काकुळती गर्भवासाताटीं । न धरीं हें पोट भय कांहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मज उदंड एवढें । न[1] वाचावे पुढें मायबापा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पासाव–पासून, उदंड–पुष्कळ.

अर्थ :– देवा, माझ्या वाटचाला जो भोग येईल तो मी भोगीन. त्याचा भार काही विठ्ठला, मी तुम्यावर घालणार नाही १ माझ्या चित्तामध्ये तुझे ध्यान असावे, आणि मुखामध्ये तुझे नाम राहावे, हेच दान मी तुमच्यापासून देवा, इच्छित आहे. २ वारवार गर्भवास होतात यासाठी काही मी काकुळतीस येत नाही. तू यासबंधी पोटात भय बाळगू नकोस अथवा मी याचे भय पोटात बाळगत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मला एवढे देशील तरी पुष्कळच आहे. मग पुढे मायबापा, आणखी जगण्याचीही इच्छा नाही ४

३८५२ माझा तों स्वभाव आहे अनावर । तुज देतां भार कांहीं[2] नव्हे ॥ १ ॥
ऐसे कळो आलें मज नारायणा । जागृती हि स्वप्ना ताळ नाही ॥ २ ॥
संपादिला तो हा अवघा बाह्य रंग । तुझा नाहीं संग अभ्यंतरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्या नाहीं पाठी[3] पोट । असोनि निघोट काय जाती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मागील अभंगक्र ३५१८ पाहावा

३८५३ काय तुझी ऐसी वेचते गांठोळी । माझी टाळाटाळ करीतसां ॥ १ ॥
चतुराच्या राया अहो पाडुरंगा । ऐसें तरि सांगा निवडूनि ॥ २ ॥
कोण तुम्हां सुख असे या कवतुके । भोगिता अनंत दुःखें आम्ही ॥ ३ ॥
तुका म्हणे काय जालासी निर्गुण । आम्हां येथें कोण सोडवील ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाठोळी–गाठोडे

अर्थ :– देवा, मला भेट दिलीस तरी तुझे असे काय रे गाठोडे खर्च होणार आहे ? मग माझी उगाच टाळाटाळी तुम्ही का करता ? १ चतुराच्या राया, अहो पाडुरगा, या सबधीचे काही तरी निर्णयाचे मला सागा ना २ आम्ही अनत प्रकारची दु खे भोगीत असताना तुम्हाला या सुखाचे कौतुक तरी कोणते वाटते हो ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू काय निर्गुणनिराकार होऊन बसलास की काय ? मग आम्हाला येथे संकटातून को सोडवील रे ? ४ ( हा अभंग बराचसा मागील अभगक्र ३५२० प्रमाणेच आहे )

३८५४ देवाची पूजा हें भूताचे पाळण । मत्सर तो सीण बहुतांचा ॥ १ ॥
रुसावे फुगावे आपुल्यावरि । उरला तो हरि सकळ हो ॥ २ ॥
तुका म्हणे संतपण यांचि नांवें । जरि होय जीव सकळांचा ॥ ३ ॥

१ नाचावे, २ काय, ३ पाट

शब्दार्थ व टीपा :– भूताचे–प्राणिमात्राचे.

अर्थ :– प्राणिमात्राचे नीटपणे पालनपोषण करणे हीच खरी देवाची पूजा होय. इतरांचा मत्सर करणे हा मोठाच शीण होय. १ जे काय रागवायचे, रुसायचे असेल ते स्वतःच्यावर; आणि उरलेला सर्व काही श्रीहरी आहे असे मानावे. २ तुकाराम महाराज म्हणतात, सगळ्याचा जीव सांभाळणारा जो होतो तोच सततच्या नावास शोभतो. ३

३८५५ नाहीं[1] जप तप जीवाची[2] आटणी । मनासी दाटणी नाहीं केली ॥ १ ॥
निजलिया ठायीं पोकारिला धांवा । सांकडें तें देवा निवारावें[3] ॥ २ ॥
नाहीं आणूनियां समर्पिले जळ । सेवा ते केवळ चिंतनाची ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही वेचिलीं उत्तरें । घेतलीं उदारें साच भावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दाटणी–जबरदस्तीने कोंडून घेणे, पोकारिला–पुकारला, केला, सांकडें–संकट, वेचिलीं–खर्च केली, साच–खरे.

अर्थ :– जपतपाची खटपट करून जीवाची आटणी मी करून घेतलेली नाही, आणि मनास जबरदस्तीने कोंडून घेण्याचे श्रमही केले नाहीत. १ मी निजल्या निजल्याही देवा, तुझा धावा तेथून केला. आता माझे संकट तुम्ही दूर करावे. २ देवा, तुला साधे पाणीसुद्धा आणून समर्पण केले नाही. केवळ तुझे चिंतन करूनच मी सेवा केलेली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही जे हे शब्द बोललो आहोत ते उदार होऊन खरे समजून तुम्ही घ्यावेत. ४

३८५६ देह तंव आहे प्रारब्धा अधीन । याचा मी कां सीण वाहूं भार ॥ १ ॥
सरो माझा काळ तुझिया चिंतनें । कायावाचामनें इच्छीतसें ॥ २ ॥
लाभ तो न दिसे याहूनि दुसरा । आणीक दातारा येणें जन्में ॥ ३ ॥
तुका म्हणे आलों सोसीत संकटें । मीं माझें वोखटें आहे देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सीण–त्रास, वोखटें–वाईट.

अर्थ :– हा देह तर प्रारब्धकर्मांच्या आधीन आहे. मी याचा त्रास या भार माझ्या डोक्यावर उगाच का वाहू ? १ देवा, तुझ्या चिंतनातच माझा काळ संपावा, हीच इच्छा मी कायावाचामने करीत आहे. २ दातारा, आता या जन्मात या शिवाय दुसरा लाभ काही मला दिसत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आजपर्यंत खूप संकटे सोसली. याचे कारण असे की, मी माझे ही भावना मोठी वाईट आहे. ४

३८५७ सकळ तुझे पायीं मानिला विश्वास । न करीं उदास आतां मज ॥ १ ॥
जीवीं[4] गातां गोड आइकतां कानीं । पाहातां लोचनीं मूर्ती तुझी ॥ २ ॥
मन स्थिर माझें जालेंसे निश्चळ । वारिलीं सकळ आशापाश ॥ ३ ॥
जन्मजराव्याधि निवारिलें दु ख । वोसंडलें सुख प्रेम धरी[5] ॥ ४ ॥
तुका म्हणे मज जाला हा निर्धार । आतां वांयां फार काय बोलों ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– जीवीं–जीभेने, वाणीने अशा अर्थाचा शब्द असावा, वारिलीं–दूर झाली, वोसंडलें–ओसंडून आले, धरी–धार.

१ नेणें, २ जीवासी, ३ तुझें मज, ४ वाचे, ५ धणी.

अर्थ – देवा, माझा सर्व विश्वास मी तुझ्या पायावर ठेविला आहे आता तू मला उदास करू नकोस १ तुझे नाम वाचेने गाण्यास फार गोड आहे, आणि कानाने ऐकण्यास सुद्धा मधुर आहे तुझी मूर्ती डोळ्यांनी पाहण्यास अतिशय चांगली आहे २ माझे मन यामुळे आता स्थिर व निश्चल झाले आहे त्यामुळे माझे सर्व आशापाश दूर झाले ३ जन्म म्हातारपण, व्याधी इत्यादींचे दुःख निवारण झाले असून श्रीहरीच्या प्रेमसुखाची धार उचंबळून ओसडून आलेली आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझा हा असा निश्चयच झालेला आहे मी आता फार व्यर्थ कशासाठी बोलू ? ५

३८५८ नये माझा तुम्हा होऊं शब्दस्पर्श । विप्रवृंदा तुम्हा ब्राह्मणांसी ॥ १ ॥
म्हणोनिया तुम्हा करितो विनंती । द्यावे शेष हातीं उरले तें ॥ २ ॥
वेदीं कर्म जैसे बोलिले विहित । करावी ते नीत विचारूनि ॥ ३ ॥
तुमचा स्वधर्म माझा अधिकार । भोजन उत्तर तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विप्रवृंदा–ब्राह्मणांचा समुदाय विचारूनि–विचार करून

अर्थ – माझ्या शब्दाचा देखील तुम्हाला स्पर्श होऊ नये कारण ब्राह्मणांनो, तुम्ही वेदमान्य आहात १ म्हणूनच मी तुम्हाला विनंती करीत आहे की जे काही शिल्लक उरलेले आहे ते मला तुम्ही द्यावे २ वेदामध्ये जे विहीत कर्म सांगितले असेल त्यासंबंधी नीट विचार करून ते तुम्ही करावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझा अधिकार तुमचे भोजन झाल्यानंतर उरलेले घ्यावयाचा आहे आणि तुमचा वेदप्रमाणे वागण्याचा आहे ४

३८५९ बहुत असती मागें सुखी केली । अनाथा माउली जिवांची तू ॥ १ ॥
माझिया संकटा न धरीं आळस । लावुनिया कास पार पावीं ॥ २ ॥
कृपावंता करा ज्याचा अंगीकार । तया संवसार नाहीं पुन्हा ॥ ३ ॥
विचारितां नाहीं दुजा बळिवंत । ऐसा सर्वगत व्यापी कोणी ॥ ४ ॥
म्हणउनि विकां मुळीं जीवभाव । देह केला वाव समाधिस्थ ॥ ५ ॥
तुका म्हणे नाहीं जाणत आणीक । तुजविण एक पांडुरंगा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारितां–विचार करून पाहता, दुजा–दुसरा वाव–व्यर्थ

अर्थ – देवा, तुम्ही पूर्वी अनेकांना सुखी केले आहेस कारण तू अनाथ जीवांची माऊलीच आहेस १ यासाठी माझे संकट दूर करण्याविषयी आळस करू नकोस आपल्या कासेला लावून मला या भवसागरातून पार कर. २ कृपावंता, तुम्हीं ज्याचा अंगीकार कराल त्याला पुन्हा संसारात पडावे लागत नाही ३ नीट विचार करून पाहिले तर तुझ्याप्रमाणे कुणीच बलवान नाही आणि तुझ्याप्रमाणे सर्व जगतास व्यापणारा तरी कोण आहे ? ४ यासाठी आम्ही आपला जीवभाव प्रथमच तुला समर्पण केला, आणि आमचा देह व्यर्थ मानून तो तुझ्यासाठी समाधिस्थ केला ५ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तुझ्याशिवाय मी आणखी काही एक जाणीत नाही ६

३८६० वैभवाचे धनी सकळ शरणागत । सत्यभावें चित्त अर्पिले ते ॥ १ ॥
नेदी उरों देव आपणावेगळें । भावाचिया[1] बळें ठायाठाव ॥ २ ॥
जाणोनि नेणती अगा आली दशा । मग होय इच्छा आपणेचि ॥ ३ ॥
तुका म्हणे बरें धाकट्याचें जिणें । माता स्तनपानें वाढविते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मागील अभंगक्रमांक ३२२७ पाहावा

१ भापणाचिये

३८६१ आम्हां देणें धरा सांगतों तें कानीं । चिंता पाय मनीं विठोबाचे ॥ १ ॥
तेणें माझें चित्त होय समाधान । विलास मिष्टान्न न लगे सोनें ॥ २ ॥
व्रत एकादशी दारीं वृंदावन । कंठीं ल्या रे लेणें तुळसीमाळा ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याचे घरींची उष्टावळी । मज ते दिवाळी दसरा सण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ल्या–घाला, लेणें–अलंकार.

अर्थ :– लोकहो, आम्हांला काही द्यायचेच असेल तर मी जे सांगतो ते नीट कानानी ऐका. ते असे की, या विठोबाच्या पायाचे चिंतन मनात सतत करा १ या देण्गीने माझ्या चित्ताचे समाधान होईल. याखेरीज मला विलास, मिष्टान्न अथवा सोने यांची जरूरी नाही. २ तुम्ही एकादशीचे व्रत करा दारात तुळसीवृंदावन घालून त्याची पूजा करा आणि तुळशीची माळ हेच एक भूषण तुम्ही गळ्यात धारण करा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे जे वागतात त्यांच्या घरच्या उष्ट्या अन्नाचा शेष जरी मला मिळाला तरी तो दिवस मला दसरा-दिवाळी-प्रमाणे आनंदाचा वाटेल. ४

३८६२ आतां मी अनन्य येथें[1] अधिकारी । होइन कोणे परी नेणें देवा ॥ १ ॥
पुराणींचा अर्थ ऐकतां मानस । होतो कासावीस जीव माझा ॥ २ ॥
इंद्रियांचे आम्ही पांगिलों अंकित । त्यांच्या संगें चित्त रंगलें तें ॥ ३ ॥
एकाचें ही जेथें न घडे दमन । अवघीं नेमून कैसीं राखों ॥ ४ ॥
तुका म्हणे जरी मोकलिसी आतां । तरी मी अनंता वांयां गेलों ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मागील प्रथम खंडातील अभंगक्र. ७०३ पाहावा

३८६३ आवडी धरोनी आलेती आकारा । केला हा पसारा याजसाटीं ॥ १ ॥
तें मी तुझें नाम गाईन आवडी । क्षण एक घडी विसंबेना ॥ २ ॥
वर्म जाणावें[2] हा मुख्यधर्मसार । अवघे प्रकार तयापासीं[3] ॥ ३ ॥
वेगळ्या विचारें वेगळाले भाव । धरायासी ठाव बहु नाहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे घालूं इच्छेचिये पोटीं । कवळुनी[4] धाकुटी मूर्ति जीवें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– घडी–क्षणभर.

अर्थ – देवा, तुम्हीच स्वत जीवाविषयी आवड मनात धरून आकारास आलात व हा सर्व पसारा त्याच्या साठीच वाढविलात. १ त्यासाठीच मी तुमचे नाव मोठ्या आवडीने गाईन. तुम्हास एक क्षणभर देखील विसरणार नाही. २ ज्याने त्याने वर्म जाणावे हेच मुख्य धर्माचे सार आहे त्याच्याच पोटात सर्व प्रकार येतात ३ वेगळ्या विचाराने वेगळा भाव धरण्याऐवजी एका नामाचाच आधार धरावा. असे आधार पुष्कळ नाहीत. ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही धाकटीची ही धाकटी मूर्ती हृदयाशी कवटाळून घेऊ, आणि आमच्या इच्छेच्या संपुष्टात साठवून ठेवू. ५

३८६४ मागलों मी आतां आपुल्या स्वभावें । कृपा करोनि देवें आइकावीजे ॥ १ ॥
देउनि आलिंगन प्रीतीच्या पडिभरें । अंगें ही दातारें निववावीं ॥ २ ॥
अमृताची दृष्टी घालूनियां वरी । शीतळ हा करीं जीव माझा ॥ ३ ॥

१ नव्हे, २ धरावे, ३ तयापोटीं, ४ कवटुळे

घेईं उचलूनि पुसे तानभूक । पुसीं माझें मुख पीतांबरें ॥ ४ ॥
बुझावोनि[1] माझी धरीं हनुवटी । ओवाळुनी दिठी करूनी साडीं ॥ ५ ॥
तुका म्हणे बापा आहो विश्वंभरा । आतां कृपा करा ऐसी कांहीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पडिभरें-अधिकपणे, बुझावोनि-समजूत करून, दिठी-दृष्टी, साडी-टाकावी

अर्थ :- देवा, मी आपल्या कर्माच्या कटकटीने शिणून गेलो आहे कृपा करून तू मला आता आश्वासन द्यावेस १ दातारा, आत्यंतिक प्रीतीने तू मला आलिंगन देऊन माझी तप्त झालेली अष्टांगे शीतल करावीत २ देवा, माझ्यावर कृपामृताच्या दृष्टीचा वर्षाव करून तापलेला माझा जीव शीतल कर ३ तू मला उचलून कडेवर घे, आणि माझ्या तहानभुकेची चौकशी कर, आणि आपल्या पीतांबराने माझे मुख पुसून काढ ४ मला देवा, मांडीवर घ्या, व माझी हनुवटी कौतुकाने धरून समजूत काढा, आणि लिंबलोण उतरून माझी दृष्ट काढून टाका ५ तुकाराम महाराज म्हणतात, अहो, विश्वंभरा, बापा, आता वर सांगितल्याप्रमाणे माझ्यावर काही तरी कृपा करा ना ६

विवरण– सगुण भक्तामधील लडिवाळपणाचा उत्कर्ष गाठणारा हा एक तुकोबाचा सर्वोत्तम अभंग आहे मायलेकरामधील यातील कौतुक सुवर्णाच्या शाईने लिहावे अशी त्याची योग्यता आहे सर्व जगाचा चालक परमात्मा हा आपली माउली आहे आपण त्याचे अज्ञानी लेकरू आहे लेकराने आपले काम करावे, आईने स्वत चे कर्तव्य करावे, अशा भूमिकेवरून तुकोबाच्या मुखातून जे शेकडो अभंग निघाले त्यातील हे एक चमकदार रत्न आहे या कृपाळू माऊलीने आपणाकडे पाहावे, तिची दृष्टी आपणाकडे वळावी, आपल्या नजरेपासून तिने बिलकूल दूर न व्हावे, तिचे सगुण रूप आपल्या डोळ्यात साठवावे, तिच्या पायावर आपले मस्तक ठेवावे, तिच्या सेवेत सतत आपण राहावे या माउलीने आपणास जवळ घ्यावे, आपले सुखदु ख विचारावे, आपली तहानभूक पुसावी, आपल्या अंगावरून हात फिरवावा, आपणास मांडीवर घ्यावे, आपले डोळे पुसावेत, समजूत करण्यासाठी आपली कौतुकाने हनुवटी धरावी, असे क्रमाक्रमाने लडिवाळ नाते तुकोबा वारवार देवाशी जोडतात, आणि प्रेमभोगात तल्लीन होतात हे सर्व प्रेमभोग साधताना, अनुभवताना कधी रूपवर्णन, कधी करुणापर स्थिती, कधी प्रेमकलह, कधी वत्सलता, कधी शरणागती, कधी मागणी, कधी आत्मनिवेदन, कधी निर्वाणीचे उत्तर, अशा विविध भूमिकावर बुवा आलेले दिसतात

‘ सुंदर तें ध्यान उभें विटेवरी ’ असलेल्या गोजिरवाण्या रूपाची किती म्हणून शोभा त्यांनी वर्णन करावी? ‘ तुळसीहार गळां कासे पीतांबर ’ असच ध्यान त्याच्या मनास निरतर आवडत असे त्याच्या श्रीहरीच्या कानात मकरकुंडले तळपतात कंठात कौस्तुभ मणी शोभून दिसतो, आणि या रूपाचे श्रीमुख मोठ्या आवडीने पाहण्यात त्यांना सर्व प्रकारचे सुख वाटते या श्रीहरीचा अगसग जडावा, आलिंगन घडावे, शरीरसंबंधाची मिठी पडावी, म्हणून तुकारामबुवा नाना प्रकारानी आपल्या आराध्य दैवताचे रूपवर्णन करताना दिसतात हे गोजिरे सगुण रूप पाहताच त्याचे डोळे सुखावून जातात ‘ आतां दृष्टीपुढें ऐसाचि तू राहें । जों मी तुज पाहें पांडुरंगा ’ म्हणून बुवा वारवार त्याला विनवितात ‘ लाचावले मन लागलीसे गोडी ’ अशी त्याच्या मनाची अवस्था झालेली असते ‘ सुखाचे ओतलें । दिसे श्रीमुख चांगलें अशी ज्याची स्थिती त्याच्याबद्दल मग ‘ मनें धरिला अभिळास । मिठी घातली पायांस ’ अशी बुवाची मन स्थिती होऊन जाते. प्रथम रूपाचा लोभ, दृष्टिभेटीची इच्छा, डोळेभरून पाहण्याची अतोनात हौस, पाया पडून कृतार्थ होण्याची वृत्ती. ‘ तुका म्हणे गोजिरिया । विठोबा पाया पडो द्या ’ अशी त्याची इच्छा आहे ‘तुझ्या ध्यानाची आवडी । अवलोकितों घडोघडी ’ असा त्याचा अनुभव आहे ‘रूपीं गुंतले लोचन । पायीं स्थिरावले मन ’ अशी अनुभूती त्याना येते विठ्ठलाला पाहाताच त्याचे देहभान हरपून जाते सुखदु ख, तहानभूक याचा विसर पडतो ‘माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडली पंढरीराया ’ अशा प्रकारचा अनुभव त्याना आनद देतो विठ्ठलाच्या या सगुण रूपाचा लोभ त्याच्या चित्ताला किती असे म्हणून सांगू ? त्याना हा विठ्ठल म्हणजे साक्षात मदनाचा पुतळा वाटे त्याच्या कपाळावर कस्तुरीचा मळवट असे अंगाला चंदनाची उटी असे गळ्यात वैजयंतीमाळ रुळत राही ‘ मुगुट कुंडलें श्रीमुख शोभलें । सुखाचें ओतलें सकळही ’ म्हणून त्यानी या रूपाचे वर्णन मुक्तकंठाने केले आहे ‘ साजिरें गोजिरें रूपमनोहर’ ध्यानासाठी फार आवडते असा

---
१ बैसोनिया

त्याचा अनुभव आहे याच्यावरून ' रविकळा कोटी सांडा ओंवाळूनी ' असे त्याना वाटते. देवाच्या माथ्यावरील मुकुटाचे तेज किती होते ? तुकोबा म्हणतात, ' मुकुट माथा कोटि सूर्यांचा झळाळ ' कोटि सूर्यांच्या प्रकाशाहून देवाच्या मुकुटाचे तेज आगळे आहे ' ओतीव श्रीमुख सुखाचे सकळ । वामांगीं वेल्हाळ रखुमादेवी ' अशी त्यांच्या मनाची धारणा आहे.

अशी ही सगुण, साजिरी, गोजिरी मूर्ती हृदयात विराजमान झाली की मग तुकारामबुवा तिच्याशी अधिक लडिवाळपणा करतात विठ्ठल ही आपली माऊली व आपण तिचे लाडके लेकरू, या नाजुक नात्याचा आविष्कार मग त्याच्या मुखातून होत राहतो आईशी मुलाने नाना प्रकारचे हट्ट करावेत, आणि आईने ते पुरवावेत, हे मग ओघाने येते आपला देव आपणाकडे पाहत नाही याचे भारी दुःख बुवाच्या मनास होते. ' कोठें गुतलासी योगियाचे ध्यानीं ', ' कोठें गुतलासी कोणाच्या धावया ', ' कोठें गुतलासी भक्तिप्रेम सुखें । न सुटती मुखें गोपिकांचीं ? ' अशा प्रकारचा आर्त पुकार मग सुरू होतो ' येई गा विठ्ठला येई गा विठ्ठला । प्राण हा फुटला आळविता ' असा जीव कासावीस करणारा टाहो सुरू होतो हा देव आपली आई, कृपाळू माऊली, ही अशी निष्ठुर व्हावी ? या शंकेने व्यथित होऊन मग माऊलीचे हृदय जागृत करण्यासाठी ' बाळ मातेपासी सांगे तहानभूक । उपायाचे दुःख काय जाणे ? ', ' कोण आम्हा पुसें सिणलें भागलें । तुजविण उगलें पांडुरंगा ? ', ' तू माऊलीहून मायाळ । चंद्राहूनी शीतळ । पाणियाहूनि पातळ । कल्लोळ प्रेमाचा ', ' नलगे मायेसी बाळ निरवावें । आपुल्या स्वभावें ओढें त्यासी ', ' बाळाचे जीवन माता जाणे भूक तहान ' अशा प्रकारचा युक्तिवाद सुरू होतो आपण मुलाने रडावे, हट्ट करावा, आणि या माऊलीने तो पुरवावा, असा आग्रह बुवाचा आहे कधी मग या प्रकारात सलगी अधिक वाढते प्रेमाने कलहाचाही प्रकार होतो, लटक्या रागाने देवास टाकून बोलावे, त्याचे वर्म काढावे, त्याच्यावर रुसावे, आणि परत त्याचा महिमा आठवून पायी स्थिर व्हावे, यातील अलौकिक सुख तुकोबाच्या अनुभवास आलेले होते ' पांडुरंगे पाहा वादलीसे रडी । परी नामशौंडी धरिली आम्ही ', ' आम्ही नरका जाता काय येईल तुझ्या हाता ? ', ' तुका म्हणे आला अंतरासी खड । तरि माझें तोंड खवळिलें ', ' आमचा तू ऋणी ठायींचाचि देवा । मागावया ठेवा आलों दारीं ' अशा विविध मुखावरून प्रेमाचा कलह सुरू होतो ' धरुनि पालव आसुडीन करें । मग काय बरें दिसे लोकीं ? ' म्हणून एखादी धमकीही दिली जाते ' कोण पर्वकाळ पाहासील तीथ । होतें माझें चित्त कासावीस ' म्हणून विचारणा होते कधी आमच्याच-मुळे तुला देवा, देवपण आले आहे याची जाणीव तुकोबा देवास करून देतात कधी समर्थाचे बाळ केविलवाणे दिसले तर कुणाचे नाव जाईल ? अशा प्रश्नाचा युक्तिवाद होतो कधी आपण या देवाशी उगाच भांडलो, या जाणिवेतून मग भांडावे तरी कोणाशी ? असा प्रश्न निर्माण होतो ' कवणाशीं भांडों कोण माझें साहें । कोण मज आहे तुजवीण ? ' म्हणून आपले अनन्यत्व याही बाबतीत ते प्रकट करतात ' नये ऐसे बोलों कठिण उत्तरें । सलगी लेकुरें केली पुढें । अपराध कोटी घडला तो क्षमा ' म्हणून विनंती मग सुरू होते

श्रीहरीशी निकटच, सततचे नाते जडविण्याचे, त्याच्याशी अतूट अनुसंधान बांधण्याचे हे असे नाना प्रकार बुवानी अनुभवले आहेत देवाची दृष्टिभेट, त्याचे सगुणदर्शन, त्याचा अंगसंग, त्याचे गुणकीर्तन यापुढे त्याना दुसरे काहीही नको ' गोड हे चरणसेवा तुझी ' हा त्याचा बाणा आहे ' देवभक्तपण सुखाचा सोहळा ' निरंतर व्हावा अशी त्याची इच्छा आहे पायापाशी पडून राहण्यात त्याना कमालीचे सुख वाटते ' सुख वसे तुझे पायीं । मज ठेवि तेचि ठायीं ' अशी त्याची मनकामना आहे ' तुज मागणे तें देवा । आम्हा तुझी चरणसेवा ' एवढीच त्याची इच्छा आहे यापुढे त्याना अद्वैताची अनुभूती नको, वैकुंठपद नको, ऋद्धीसिद्धी नकोत, स्वर्ग नकोत, ऐहिक मानसन्मान नको. ' समचरण दृष्टि विटेवरी साजिरी । तेथें माझी वृत्ति राहों ' एवढीच त्याच्या चित्ताची भूक आहे. दृष्टि-भरून भेट व्हावी, पायावर मस्तक ठेवावे, अशा मागणीतून मग हळूच एक पाऊल पुढे सरसावते, व बुवा देवास म्हणतात, ' एकान्तीचे सुख देईं मज देवा ', या एकान्तीच्या सुखात त्यानी देवाचा अंगसंग मागितला आहे सर्वांगानी देवास आलिंगन घडावे अशी त्याची मनोमय इच्छा आहे ' रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं । अष्टांगही गात्रीं प्रेम सुखें ' अशी त्याच्या मनाची मग अवस्था होऊ लागते मग ही माऊली कृपावंत होऊन बुवांना कुरवाळून आपल्या

स्तनाशी लावते मनाची कोवळी असलेली ही माय बुवाना माडीवर घेते यासाठी तर त्याचा अट्टाहास असतो स्वर्गसुख, मोक्षसुख बाजूस सारून त्याना हा अनुभोग गोड वाटतो, म्हणूनच ते या अवीट सुखासाठी माउलीला म्हणतात, ' माय, मी आता दमलो आहे, भागलो आहे मला प्रेमाने आलिंगन दे माझे तप्त अंग शीतल कर अमृताच्या दृष्टीचा वर्षाव करून माझा जीव शात कर मला उचलून कडेवर घे माझी तहानभूक निवारण कर माझे मुख आपल्या पीतांबराने पूस माझी हनुवटी कौतुकाने धर व माझी समजूत काढ ' या प्रेमसुखापुढे शेकडो मोक्षपदे ओवाळून टाकावीत

३८६५ न सरे लुटिता मागें बहुता जनीं । जुनाट हे खाणी उघडिली ॥ १ ॥
सिद्ध महामुनि साधक संपन्न । तिहीं हे जतन केले होतें ॥ २ ॥
पायाळाच्या गुणें पडिले ठाउके । जगा पुंडलिकें दाखविलें ॥ ३ ॥
तुका म्हणे तेथें होतो मी दुबळा । आले या कपाळा थोडें बहु ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तिहीं–त्यानी

अर्थ – या पंढरपुरात फार पूर्वीची एक जुनाट खाण सापडलेली आहे यापूर्वी ती पुष्कळ लोकानी लुटली तरी ती संपतच नाही १ अनेक महामुनी, सिद्ध पुरुष, संपन्न साधक इत्यादींनी या खाणीचे जतन केले होते २ श्री पुंडलीकास पायाळूपणाच्या गुणामुळे या खाणीचा तपास लागला आणि त्याने जगास या खाणीचा तपास लावून दिला ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्या ठिकाणी मी एक गरीब उभा होतो, म्हणून माझ्याही वाट्याला त्यामधील थोडेफार आले आहे ४

३८६६ भगवे तरी श्वान सहज वेष त्याचा । तेथें अनुभवाचा काय पंथ ॥ १ ॥
वाढवूनी जटा फिरे दाही दिशा । तरी जंबुवेषा सहज स्थिति ॥ २ ॥
कोरोनिया भूमी करिती मधीं वास । तरी उंदरास काय वाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे कासया करावें । देहासी दंडावें वाउगेंचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – श्वान–कुत्रे, जंबुवेष–कोल्हयाचा वेश, वाणी–कमतरता, वाउगेंचि–उगाचच

अर्थ – भगवे वस्त्र धारण करून काय होणार ? कुत्र्याचा वेश सहजच तसा असतो. पण त्यानुसार अनुभव कधी येतो काय ? १ जटाजुटा वाढवून दाही दिशाना हिंडून काय उपयोग ? कोल्हयाला सहजच असे रूप आलेले असते २ भूमीत भगदाडे पाडून गुहांतून वास करून काय साधणार ? अशा प्रकारे जमिनीत राहणाऱ्या उंदराची कमतरता काहीच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे देहाला दंड देण्याचे खरोखर काय कारण आहे ? ४

३८६७ धन्य दिवस आजि डोळियां लाधला । आनंद देखिला धणीवरी ॥ १ ॥
धन्य जालें मुख निवाली[1] रसना । नाम नारायणा घोष करूं ॥ २ ॥
धन्य हें मस्तक सर्वांग शोभलें । संतांचीं पाउलें लागतातीं ॥ ३ ॥
धन्य आजि पथें चालतो पाउलें । टाळिया शोभले धन्य कर ॥ ४ ॥
धन्य तुका म्हणे आम्हांसी फावलें । पावलों पाउलें विठोबाचीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – धणीवर–मनाची तृप्ती होईपर्यंत

१ रमली.

अर्थ – आजचा दिवस धन्य झाला, कारण मी विटेवरील मूर्तिमंत आनंद मनाची तृप्ती होईपर्यंत डोळ्यांनी पाहिला. १ नारायणनामाचा घोष करून माझी जीभ धन्य झाली त्यामुळे माझे मुखही धन्य झाले २ माझे हे मस्तक सर्वांगासहित संताच्या पावलावर ठेविल्यामुळे धन्य होऊन शोभू लागले ३ या पंढरपूरच्या मार्गाने माझी पावले चालत राहिल्याने ती धन्य झाली दोनही हातांनी टाळ्या वाजविता आल्या म्हणून तेही धन्य होऊन शोभायमान झाले ४ तुकाराम महाराज म्हणतात, या विठोबाच्या चरणाजवळ येऊन पोचलो, या नामामुळे आम्ही धन्य धन्य झालो आहोत ५

३८६८ बरवी हे वेळ सांपडली संधि । साह्य जाली बुद्धि संचितासी ॥ १ ॥
येणें पथें माझीं चालिलीं पाउलें । दरुषण जालें संतां पायीं ॥ २ ॥
त्रासिलें दरिद्रें दोषा जाला खंड । त्याचि काळें पिंड पुनीत जाला ॥ ३ ॥
तुका म्हणे जाला अवघा व्यापार । आली येरझार फळासी हे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बरवी–चांगली, पिंड–देह, शरीर, पुनीत–पवित्र

अर्थ – संचितकर्मास साह्य करणारी बुद्धी झाली, ही संधी फार चांगली सापडली आहे मला १ याच मार्गाने माझी पावले चालत राहिल्याने शेवटी संतांच्या पायांचे दर्शन मला झाले २ त्रास देणारे पूर्वीचे दारिद्र्य आणि दोष यांचा आता नाश झाला आणि त्याच काळापासून माझा हा देह पवित्र झाला ३ तुकाराम महाराज म्हणतात, जन्ममृत्यूच्या खेपांचे आज सार्थक झाले सर्व व्यापार सफल झाला ४

३८६९ आपणा लागे काम वाण्याघरीं गुळ । त्याचें याति कुळ काय कीजे ॥ १ ॥
उकरडचावरी वाढली तुळसी । टाकावी ते कैसी ठायागुणें[1] ॥ २ ॥
गाईचा जो भक्ष अमंगळ खाय । तीचें दुध काय सेवूं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे काय सलपटासी काज । फणसांतील बीज काढुनि घ्यावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सलपटासी–सालपटाशी

अर्थ :– वाण्याच्या दुकानात असलेल्या गुळाशी आपणास काम आहे मग त्याची जात पाहण्याचे काय कारण आहे ? १ तुळस जरी उकिरडयावर वाढली तरी ती त्या जागेवर वाढली म्हणून टाकून द्यावी काय ? २ विष्टादी पदार्थांचे अमंगळ खाणे गाईचे असते, म्हणून तिच्या दुधाचे सेवन आपण करीत नाही की काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, फणसाच्या बाहेरील सालपटाशी आपणास काय करायचे आहे ? त्याच्यामधील गोड गरेच तेवढे काढून घ्यावेत ४

३८७० जयासी नावडे वैष्णवांचा संग । जाणावा तो मांग जन्मांतरीं ॥ १ ॥
अपवित्र वाचा जातीचा अधम । आचरण धर्म नाहीं जया ॥ २ ॥
मंजुळवदनीं वचनागाची कांडी । शेवटीं विघडी जीवप्राणा ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याचा पिता नाहीं शुद्ध । तयासी गोविंद अंतरला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वचनागाची–एका अति विषारी वनस्पतीची.

अर्थ – ज्याला वैष्णवांची सोबत आवडत नाही तो पूर्वजन्मीचा मांग असावा १ ज्याचे आचरण धर्माप्रमाणे नाही, ज्याची वाणी अपवित्र आहे, तो जातीने अधम आहे असे समजावे २ वचनागाची कांडी मुखात

[1] ठाया गुण

घातल्याबरोबर गोड लागते, पण शेवटी माथ जीव घेणारी ठरते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचा चित्त चांगला नाही त्याला श्रीहरी कधीही भेटत नाही. ४

३८७१ वांझेनें दाविलें गऱ्हवार लक्षण । चिरगुटें घालून वाथयाला ॥ १ ॥
तेवीं शब्दज्ञानी[1] करिती चावटी । ज्ञान पोटासाटीं विकूनियां ॥ २ ॥
बोलाचिच कढी बोलाचाचि भात । जेवुनियां तृप्त कोण जाला ॥ ३ ॥
कागदीं लिहितां नामाची साकर । चाटितां मधुर गोडी नेदी ॥ ४ ॥
तुका म्हणे जळो जळो ते महंती । नाहीं लाज चित्तीं आठवण[2] ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .– वाथयाला–गर्भाशयाला, पोटाला, चावटी–वडवड.

अर्थ .– पोटावर नाना वस्त्रे बांधून ते वाढविले आणि वांझ स्त्रीने गर्भारपणाची लक्षणे दाखविली तरी काय उपयोग ? १ त्याचप्रमाणे कोरडे शब्दज्ञानी उगाच बडबड करून पोटासाठी ज्ञानाची विक्री करतात २ कढी व भात यांचे वर्णन नुसते शब्दांनीच केले तर त्यांच्या जेवणाने कोणाची तृप्ती होईल ? ३ कागदावर साखर हा शब्द फक्त लिहून व तो तोंडाने चाटून त्याची माधुरी कुणास कशी समजणार ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या कोरड्या शाब्दिक ज्ञानाला आग लागो. त्या महतीला आग लागो. या निलाजऱ्या माणसाच्या चित्तात कधी लाज नसते. ५

३८७२ तुझिया पाळणा ओढे माझें मन । गेलों विसरोन देहभाव ॥ १ ॥
लागला पालट फेडणें उसणें । येणेंचि प्रमाणें पांडुरंगा ॥ २ ॥
तुका म्हणे माझा जीव जैसा ओढे । तैसाचि तिकडे पाहिजेल ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– पाळणा–पालनपोषणासाठी.

अर्थ :– देवा, तुझ्या महतीच्या पालनपोषणाकडे माझे मन नित्य ओढ घेत असते. त्या नादात मी माझा देहभावही विसरून गेलो आहे. १ पांडुरंगा, याप्रमाणेच मी जे करीत आहेत त्याची उलट फेड करून तुम्ही माझे पालन करावे. २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा माझा जीव जसा तुमच्याकडे ओढला जात आहे, त्याचप्रमाणे तुझेही चित्त माझ्याकडे ओढले जावे. ३

३८७३ मी दास तयांचा जयां चाड नाहीं । सुखदुःख दोहीं विरहित ॥ १ ॥
राहिलासे उभा भीवरेच्या तीरीं । कट दोहीं करीं धरोनियां ॥ २ ॥
नवल काय तरी पाचारितां पावे । न स्मरत धांवे भक्तकाजा ॥ ३ ॥
सर्व भार माझा त्यासी आहे चिंता । तोचि माझा दाता स्वहिताचा ॥ ४ ॥
तुका म्हणे त्यासी गाईन मी गीतीं । आणीक तें चित्तीं न धरीं कांहीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मागील अभंगक्र. ३३७३ पाहा.

३८७४ जुझायाच्या गोष्टी ऐकतांचि सुख । करितां हें[3] दुःख थोर आहे ॥ १ ॥
तैसी हरिभक्ति सुळावरील पोळी । निवडे तो बळी विरळा शूर ॥ २ ॥
पिंड पोसिलियां विषयाचा पाइक । वैकुंठनायक कैचा तेथें ॥ ३ ॥
तुका म्हणे व्हावें देहासी उदार । रुकुमादेवीवर जोडावया ॥ ४ ॥

१ शब्द ज्ञानी, २ निसुगाला, ३ देहे दुःख.

शब्दार्थ व टीपा – जुंझायाच्या–युद्धाच्या, पिंड–शरीर

अर्थ – युद्धाच्या वार्ता कानाशी ऐकण्यासच रम्य वाटतात. पण युद्ध प्रत्यक्ष करणाऱ्यास फारच दुःख भोगावे लागते १ त्याप्रमाणे श्रीहरीची भक्ती ही सुळावरील पोळीप्रमाणे आहे असली भक्ती साध्य करणारा एखादाच शूर बलवान असतो. २ देहाचेच पोषण करणारा हा विषयाचाच दास होऊन राहतो त्याच्या ठिकाणी वैकुंठीचा गोविंद कसा राहाणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, जर तुम्हास रखुमाईच्या वराची म्हणजे विठ्ठलाची प्राप्ती करून घ्यायची असेल तर, आपल्या देहावर उदार व्हावे लागेल ४

३८७५ पाषाण प्रतिमा सोन्याच्या पादुका । हें हो[1] हातीं एका समर्थाचे ॥ १ ॥
अनामिका हातीं समर्थाचा शिक्का । न मानितां लोकां येइल फळों ॥ २ ॥
तुका म्हणे येथें दुराग्रह खोटा । आपुल्या अदृष्टा शरण जावें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – अनामिका–अंत्यजाच्या, अदृष्टा–प्रारब्धास

अर्थ – देवाची मूर्ती पाषाणाची असून तिच्या पादुका मात्र सुवर्णाच्या केल्या तरी सर्व सत्ता समर्थ देवाची असल्याने मूर्तीसच महत्त्व येते १ समर्थ राजाचा शिक्का अंत्यजाच्या हातात असला म्हणून काय झाले ? त्याला जर लोकांनी मान दिला नाही तर त्यांना शिक्षाच होईल २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा ठिकाणी दुराग्रह धरणे खोटे आहे आपण आपल्या प्रारब्धास शरण जावे हे बरे ३

३८७६ बहु या प्रपंचें भोगविल्या खाणी । टाकोनिया मनीं ठेविला सीण ॥ १ ॥
आतां पायांपाशीं लपवावें देवा । नको पाहू सेवा भक्ती माझी ॥ २ ॥
बहु भय वाटे एकाच्या बोभाटें । आली घायवटे फिरोनिया ॥ ३ ॥
तुका म्हणे सिगे भरू आलें माप । वियोग संताप जाला तुझा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सीण–त्रास, घायवाटे–घायाळ, जखमी

अर्थ – देवा, या प्रपंचाने मला अनेक जन्माच्या खाणींचे दुःख भोगायला लावले त्यामुळे माझ्या मनात फार शीण झाला आहे म्हणूनच मी तुमच्यापाशी आलो आहे १ म्हणून देवा, माझी सेवा व भक्ती न पाहता मला तुमच्या पायाचा आश्रय देऊन तेथे लपवावे २ अनेक जीव नाना प्रकारच्या योनींतून फिरून घायाळ झाल्याचा बोभाटा ऐकून मला फारच भय वाटू लागले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझ्या आयुष्याचे माप शिगेस भरून आले आहे परंतु तुझा वियोग झाल्यामुळे मन मात्र संतप्त बनले आहे ४

३८७७ धरूनिया मनीं बोलिलों संकल्प । होसी तरि बाप सिद्धी पाव[2] ॥ १ ॥
उत्कंठा हे आजी जाली माझे पोटीं । मोकळिली गोष्टी टाळाटाळ ॥ २ ॥
माझा मज असे ठाउका निर्धार । उपाधि उत्तर न साहे पें ॥ ३ ॥
तुका म्हणे जरि दिली आठवण । तरि अभिमान धरीं याचा[3] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोकळिली–त्यागलेल्या, मागच्या

अर्थ – देवा, तुझ्या प्राप्तीची इच्छा मनात धारण करून मी संकल्प बोललो आहे तू माझा पिता असल्यामुळे तो संकल्प सिद्धीस न्यावा १ आज माझ्या हृदयात तुझ्या भेटीविषयी फारच उत्कंठा निर्माण झालेली आहे. तर आता मागच्या गोष्टी तू टाळाव्यास २ तुम्हांला कोणत्याही उपाधीचे उत्तर सहन होत नाही पण माझा

१ हो, २ नेई, ३ माझा.

निर्धार मात्र मला ठाऊक आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची आठवण मी तुम्हास दिलेली आहे, तरी तुम्ही माझा अभिमान धरला पाहिजे ४

३८७८ आजिवरी होतों संसाराचे हातीं । आतां ऐसें चित्तीं उपजलें ॥ १ ॥
तुला शरणागत व्हावें नारायणा । अंगीकारा दिना आपुलिया ॥ २ ॥
विसरलों काम याजसाठी धंदा । सकळ गोविंदा माझें तुझें ॥ ३ ॥
तुका म्हणे विज्ञापना परिसावी । आवडी हे जीवीं जाली तैसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उपजले–आले, निर्माण झाले, विज्ञापना–विनती, परिसावी–ऐकावी

अर्थ – देवा, आजपर्यंत मी संसारातच गुंतून पडलेलो होतो परंतु आता मात्र माझ्या चित्तात असे आले आहे की, १ नारायणा, तुम्हास शरण येऊन राहावे म्हणून या दीनाचा अंगीकार करावा. २ गोविंदा यासाठी मी माझा सर्व कामधंदा विसरून गेलो आहे आता जे जे माझे आहे ते सर्व तुझेच आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या जीवाची जशी आवड होती, तशी मी तुम्हास विनंती केली आहे ती तुम्ही ऐकावी ४

३८७९ धन्यधन्य ज्यास पंढरीसी वास । धन्य ते जन्मास प्राणी आले ॥ १ ॥
चहु[१] खाणीमध्यें होत कोणी एक । त्रिगुण कीटक पक्षिराज ॥ २ ॥
उत्तम चांडाळ नर नारी बाळ । अवघेचि सकळ चतुर्भुज ॥ ३ ॥
अवघा विठ्ठल तेथें दुजा नाहीं । भरला अंतर्बाही सदोदीत ॥ ४ ॥
तुका म्हणे तेथें[२] होउनी राहेन । सांडोवा पाषाण पंढरीचा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– चहुखाणी– जारज, अंडज, स्वेदज, आणि उद्‌भिज या चार प्रमुख योनी, दुजा–दुसरा सांडोवा–वाया गेलेला, टाकून दिलेला.

अर्थ – या पंढरपुरात जे वास्तव्य करतात ते सर्व धन्य होत. हे प्राणी येथे जन्मास येऊन धन्य झाले आहेत १ जारज, अंडज, स्वेदज आणि उद्‌भिज या प्राण्यांच्या चार खाणींपैकी त्रिगुणात्मकी कीटक पक्षी हेही येथील वास्तव्यामुळे धन्य झाले आहेत २ येथील स्त्रिया, पुरुष, बालके उत्तम अथवा चांडाळ असोत, ते सर्वच चतुर्भुज प्रभूप्रमाणे आहेत ३ येथे सर्वत्र विठ्ठलाचेच रूप भरून राहिले आहे त्याच्याशिवाय दुसरे काहीच नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या पंढरीस मी टाकून दिलेल्या पाषाणाप्रमाणे होऊन राहीन ५

विवरण – पुंडलीक व विठुराय यांच्या वास्तव्यामुळे पंढरीचे माहात्म्य साधुसंतांना विशेष प्रकारचे वाटते त्यांचे सारे चित्त या पंढरीच्या वाटेस लागलेले असते, या पंढरीचा महिमा अनेक संतांनी मनापासून गाइला आहे या पंढरपूर क्षेत्रातील सर्व चराचर सृष्टी विठ्ठलाच्या निवासाने पुनीत होऊन गेली आहे यथील झाडे पवित्र, येथील पशुपक्षी पवित्र, येथील पाणी पवित्र, येथील नरनारी पवित्र, येथील मातीही पवित्र. कारण, या सर्वांना पंढरीनाथाची संगतसोबत आहे नामदेवरायांनी म्हटले आहे, 'राउळें तितुकें प्रमाण । तेथील तृण आणि पाषाण । तेहि देव जाणावे ॥' त्यांच्या मताने पंढरपूर ही कामधेनू असून 'प्रेमामृत दुभे सदा संतजना । बोसंडतो पान्हा नित्य नवा' अशी त्यांची श्रद्धा आहे अशी ज्या भूमीची महती, तिथे कुणातही दोष आढळणार नाहीत सर्वत्र श्रीहरीचाच साक्षात्कार झालेला दिसेल 'धन्य तेहि भूमी धन्य तरुवर । धन्य तें सरोवर तीर्थरूप ॥ धन्य त्या नरनारी मुखीं नाम ध्यान । आनंदें भुवनें गर्जतसे ॥ धन्य पशुपक्षी कीटक पाषाण । अवघा नारायण अवतरलासे' असेच वर्णन तुकोबांनी आणखी एका अभंगात केले आहे या पंढरीत मी पाषाण होऊन राहीन असे बुवा का म्हणतात त्याचे मम सहज ध्यानात येण्यासारखे आहे.

१ बहु, २ येथें

३८८० असंत लक्षण भूतांचा मत्सर । मनास निष्ठुर अतिवादी ॥ १ ॥
अंतरीचा रग उमटे बाहेरी । बोळखियापरी आपेंआप ॥ २ ॥
संत ते समय वोळखती वेळ । चतुष्ट[1] निर्मळ चित्त सदा ॥ ३ ॥
तुका म्हणे हित उचित अनुचित । मज लागे नित[2] आचरावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अंतरींचा–अंतःकरणातील, नित–नित्य.

अर्थ :– प्राणिमात्राचा द्वेष करणे, मन निष्ठुर असणे आणि सतत वादविवाद करणे ही संत नसलेल्याची लक्षणे आहेत. १ अंतःकरणात जो स्वभावरंग असेल तोच बाहेरच्या वर्तनात उमटतो. यामुळे आपोआप ओळख पटली जाते. २ जे योग्य वेळ ओळखतात, ज्यांचे चित्त सदोदित निर्मळ व संतुष्ट असते तेच संत असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हित काय आहे, उचित काय, अनुचित काय; यासंबंधी मला नित्य विचार करावा लागतो. ४

३८८१ आतां काय खावें कोणीकडे जावें । गावांत रहावें कोण्या बळें ॥ १ ॥
कोपला पाटील ये गावींच्या लोकां । आतां मज भिका कोण घाली ॥ २ ॥
आतां येणें चवी सांडिली म्हणती । निवाडा करिती दिवाणांत ॥ ३ ॥
भल्या लोकीं यासी सांगितली मात । केला माझा घात दुर्बळाचा ॥ ४ ॥
तुका म्हणे याचा संग नव्हे मला । शोधीत विठ्ठल जाऊं आतां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मागील अभंगक्रमांक ६७६ पाहावा.

३८८२ विठ्ठलावांचोनि ब्रह्म जें बोलती । वचन तें संतीं मानूं नये ॥ १ ॥
विठ्ठलावांचूनि जेजे उपासना । अवघाचि जाणा सभ्रमु[3] तो ॥ २ ॥
विठ्ठलावांचूनि सांगतील गोष्टी । वायां ते हिंपुटी होत जाणा ॥ ३ ॥
विठ्ठलावांचूनि जें कांहीं जाणती । तितुल्या[4] वित्पत्ति वाउगीया ॥ ४ ॥
तुका म्हणे एक विठ्ठलचि खरा । येर तो पसारा वाउगाचि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा –: हिंपुटी–कष्टी, वित्पत्ति–शाब्दिक ज्ञान, येर–इतर.

अर्थ :– या एका विठ्ठलावाचून ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी जे बोलतील त्यांचे बोलणे संतांनी कधीच खरे मानू नये. १ या विठ्ठलाशिवाय ज्या ज्या विविध उपासना त्या त्या सर्व संभ्रमाच्याच मानाव्यात. २ या विठ्ठलाशिवाय कुणी काही गोष्टी करतील तर त्यांना विनाकारण कष्ट मात्र होतील. ३ या विठ्ठलाविना जे काही जाणतील, त्यांची शाब्दिक विद्वत्ता व्यर्थच मानावी. ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा एक विठ्ठलच खरा आहे. याच्या-खेरीज इतर पसारा व्यर्थच होय. ५

विवरण :– भागवतधर्मी संतांना पंढरपुरच्या या विठ्ठलावाचून दुसरे काहीही नको आहे. आणि इतरांनीही दुसऱ्या कुणास मानू नये असा त्यांचा आग्रह आहे. सर्वांनी अनन्यभावे भक्ती करावी ती या विठ्ठलाचीच. याच्या-शिवाय ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी, नाना उपासना, शास्त्रांचा वडेजाव, विद्वत्ता वगैरेंना काहीही महत्त्व नाही. सर्वांचे सार एक श्रीविठ्ठलच आहे, असे संतांना वाटते. 'हरिवीणे व्यर्थ आचार समर्थ । हरि हेचि हित अरे जना ' असे निवृत्ति-नाथांनी म्हटले आहे. ' राम बरवा कृष्ण बरवा । सुंदर बरवा बाइयांनो ' म्हणून ज्ञानदेवांनी या देवाचे कौतुक केले आहे. ' आनु नेणें काहीं । विठ्ठल स्मरे देहभावीं ' अशी त्यांची या देवाबद्दलची अनन्य भक्ती आहे. मी वाराण-शीच्या यात्रेस गेलो. प्रयाग तीर्थास गेलो तरी मला पंढरपूरच्या विठ्ठलाची ओढ आहे असे ते म्हणतात. या सर्व

१ संतुष्ट, २ नित्य, ३ भ्रमचि, ४ तितुक्या.

साधुसंतांना या विठ्ठलाखेरीज दुसरे जीवनच नाही. नामदेवानी म्हटले आहे ' विठ्ठलासी पाहे विठ्ठलासी ध्याये। विठ्ठलासी गाये सर्वकाळ ' आणखी एका ठिकाणी ते म्हणतात; ' विठ्ठल सुखाचें जीवन । विठ्ठल प्रेमपान्हा ' ज्ञानदेवही या विठ्ठलाच्याच प्रेमात रमून जाऊन म्हणतात, ' मन हें धालें मन हें धालें । पूर्ण विठ्ठलचि झालें । अंतर्बाह्य रंगुनि गेलें विठ्ठलची. ....विठ्ठल जळीं स्थळीं भरला । रिता ठाव नाहीं उरला । आज म्या दृष्टीनें पाहिला विठ्ठलची । ' हीच विठ्ठलाशी अनन्यता तुकोबांच्याही अभंगात आलेली आहे. ' विठ्ठल आमुचा निजाचा । सज्जन सोयरा जीवाचा । असा त्याचा अनुभव आहे. ' विठ्ठल सुखा विठ्ठल दुःखा । तुकया मुखा विठ्ठल ' अशा तल्लीन अवस्थेत तुकारामबुवा रंगून गेलेले दिसतात.

३८८३ सर्व काळ डोळां वसो नारायण । नयो अभिमान आड मध्यें ॥ १ ॥
धाड पडो तुझ्या[1] थोरपणावरि । वाचे नरहरि उच्चारीना ॥ २ ॥
जळो अंतरींचें सर्व जाणपण । विवादवचन अहंतेचें ॥ ३ ॥
सकळां चरणीं गळित माझा जीव । तुका म्हणे भाव एकविध ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जाणपण–ज्ञान, जाणीव.

अर्थ :– माझ्या डोळ्यांत सदासर्वकाळ हा नारायणच वसून राहावा. यामध्ये अभिमानाची आडकाठी कुठेही येऊ नये. १ माझा सर्व थोरपणा नाहीसा व्हावा. मी वाणीने सतत नरहरीच्या नामाचा उच्चार करीन. २ अंतःकरणात निर्माण झालेली सर्व जाणीव जळून जावी, आणि अहंकाराचे वादविवादवचनही जळून जावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्वांच्या चरणांशी माझा जीव गलित होऊन राहिलेला आहे व एकविध भाव माझ्या ठिकाणी निर्माण झालेला आहे. ४

३८८४ मधुरा उत्तरासवें नाहीं चाड । अंतरंगीं वाड भाव[2] असो ॥ १ ॥
प्राणावेगळा न करी नारायण । मग नसो ज्ञान मूर्ख बरा ॥ २ ॥
जननिंदा होय तो बरा विचार । थोरवीचा भार कामा नये ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्तीं भाव निष्ठावंत । दया क्षमा शांत[3] सर्वां भूतीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाड–इच्छा, वाड–थोर, मोठे.

अर्थ :– मधुर शब्दांची काही मला इच्छा नाही. परंतु अंतःकरणात मात्र श्रीहरीविषयी थोर प्रेम निर्माण व्हावे. १ मी या नारायणास प्राणावेगळा करणार नाही. मग मला ज्ञान नसले व मी मूर्ख असलो तरी बरेच आहे. २ ज्या व्यवहारात लोक आपली निंदा करतील तोच बरा. उगाच मोठेपणाचे ओझे शिरावर वागविणे बरे नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या चित्तात एकनिष्ठ भाव असून मी सर्व भूतमात्रांच्या बाबतीत दया, क्षमा, शांती या वृत्ती धारण केल्या आहेत. ४

३८८५ झाडा[4] वरपोनि खाऊनियां पाला । आठवी विठ्ठला वेळोवेळां ॥ १ ॥
वल्कलें नेसुनि ठुंगा[5] गुंडाळुनी । सांडी जवळुनी देहमान[6] ॥ २ ॥
लोकमान वमनासमान मानणे । एकांतीं राहणें विठोसाठीं ॥ ३ ॥
सहसा करूं नये प्रपंचीं सौजन्य । सेवावें अरण्य एकांतवास ॥ ४ ॥
ऐसा हा निर्धार करी जो मनाचा । तुका म्हणे त्याचा पांग फिटे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठुंगा–ढुंगणास, वमनासमान–ओकाप्रमाणे, पांग–दारिद्र्य.

१ माझ्या, २ प्रेम, ३ शांती, ४ झाडें, ५ चिंधिया वेठुनि, ६ देहभाव.

अर्थ – रानावनात राहून झाडाचा पाला ओरबाडून खावा, आणि वेळोवेळी या विठ्ठलाचे चिंतन करावे. १ झाडांच्या सालींची वल्कले ढुंगणास गुंडाळावीत आणि देहाविषयीचा अभिमान सोडून द्यावा २ लोकाकडून मिळालेला मानसन्मान ओकाप्रमाणे मानावा आणि विठ्ठलाच्या प्राप्तीसाठी एकान्तवासाचे सेवन करावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचा निर्धार ज्याच्या मनाने केला आहे त्याच्या जीवितातील सर्व दारिद्र्य फिटून जाईल. ४

विवरण–परमार्थाच्या साधनासाठी, प्रभूच्या प्राप्तीसाठी संसाराविषयीची व लौकिकाविषयीची आसक्ती सोडून विरक्त कसे व्हावे याचे दिग्दर्शन तुकारामबुवांनी या अभंगात केले आहे विठ्ठलास आळवणे, त्याचे चिंतन व अनुसंधान असणे हे महत्त्वाचे तुम्ही काय खाता हे विशेष नाही वेळप्रसंग पडल्यास झाडाचा पालाही ओरबाडून खावा, वृक्षाची वल्कले नेसावीत, लोकाकडून येणाऱ्या मानसन्मानाकडे लक्ष देऊ नये एकान्तवासाचे सेवन करावे, प्रपंचाशी फार लोभ जडवू नये, इत्यादी परमार्थसाधनाच्या खुणा या अभंगात बुवांनी सांगितल्या आहेत भगवद्गीतेनेही अदंभित्वम्, अमानित्वम्, अहिंसा, शांती, आर्जव, इंद्रियविषयात वैराग्य, अनहंकार, अनासक्ती, 'विविक्त' म्हणजे एकान्तस्थानी राहणे, सामान्य लोकांचा समुदाय न आवडणे इत्यादी गुण सत्पुरुषाचे म्हणून सांगितले आहेत. तुकोबाच्या वरील अभंगातही याच सद्गुणांचा निर्देश आहे. या ज्ञानी पुरुषाच्या लक्षणावर भाष्य करताना श्रीज्ञानदेवांनी मोठीच बहार केली आहे परमार्थसाधनात गढून गेलेले सत्पुरुष कसे असतात? ' पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ती कानीं नायकावी...तेथ सरकाराची के गोठीं ..वाचस्पतिचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे । परि वेडिवेमाजीं दडे । महिमे भेणे ॥ चातुर्य लपवी । महत्त्व हारवी । पिसेपण मिरवी । आवडोनि ' अशा प्रकारे हा महात्मा मानसन्मानाविषयी आपण होऊन विरक्त असतो आणखी एका ठिकाणी भगवद्गीतेत अशा थोर महात्म्याचे वर्णन करताना म्हटले आहे, ' विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानस । ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रित ॥ अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् । विमुच्य निर्मम शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ' 'विविक्त' म्हणजे निवडक अथवा एकान्तस्थळी राहाणारा, मिताहारी, काया, वाचा, मन ताब्यात ठेवणारा, नित्य ध्यानयुक्त व विरक्त असणारा; अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध व परिग्रह सोडून शान्त व ममत्वरहित झालेला ब्रह्मभूत होण्यास समर्थ होतो अशाच माणसाचे वर्णन थोड्याफार फरकाने तुकोबांनी वरील अभंगात केले आहे हा मनुष्य, ' गजबजा सांडिलिया । वसवी वनस्थलिया । अंगाचि याचि मांदिया । एकलिया ' असा असतो म्हणजे यास वनस्थल वसत असते, आणि स्वतःचे अवयवच त्याचे सोबती असतात. अशा निर्धारानेच प्रपंचातील मन कमी होते तेथील आसक्ती संपते, आणि मनाची दृष्टी आपल्या मूलस्वरूपाकडे वळते.

३८८६ भक्तिभावें करी बैसोनि निश्चित । नको गोवूं चित्त प्रपंचासी ॥ १ ॥
एका दृढ करीं[1] पंढरीचा राव । मग तुज उपाव पुढिल सुचे ॥ २ ॥
नको करूं कांहीं देवतापूजन । जप तप ध्यान तें ही नको ॥ ३ ॥
मानिसील झणी आपलिक[2] कांहीं । येरझार पाहीं न चुके कदा ॥ ४ ॥
ऐसे जन्म किती पावलासी देहीं । अझूनि कां नाहीं कळली सोय ॥ ५ ॥
सोय धरीं आतां होय पां सावध । अनुभव आनंद आहे कैसा ॥ ६ ॥
सहज कैसें आहे तेथीचे ते गुज । अनुभवें निज पाहे तुकीं ॥ ७ ॥
तुका म्हणे आतां होईं तू सावध । तोडी भवबंध एका जन्में ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपाः– गोवूं–गुतवू, उपाव–उपाय, गुज–हितगुज, तुकीं–तुलून

अर्थ :– मनाने निश्चित होऊन तू भक्तिभावाने या श्रीहरीची उपासना कर. आपले चित्त तू प्रपंचात गुंतवू नकोस. १ या एका पंढरीच्या राजाबद्दलच मनात दृढ विश्वास धर त्यामुळे तुला पुढील उपाय सहज सुचतील. २ इतर देवतांचे पूजन करण्याच्या भानगडीत तू पडू नकोस जप, तप ध्यान इत्यादी परिश्रमातही तू राहू नकोस. ३

१ धरी, २ आपलीया.

जर कुणासही आपले संबंधीत मानशील तर जन्ममृत्यूंच्या फेऱ्यांतून तुझी सुटका कधीच होणार नाही हे तू नीट पाहा. ४ असे जन्म तू आजपर्यंत या देहाच्या रूपात कितीतरी घेतले आहेस. तरी अजून काही तुला स्वहिताची सोय समजलेली नाही. ५ तरी आता तू सावध होऊन या पांडुरंगाचा मार्ग धर, आणि त्याच्या संगतीच्या अनुभवाचा आनंद घे. ६ त्या ठिकाणचे सहज हितगुज कसे आहे त्याचा तू स्वतः अनुभव तुळून घे. ७ तुकाराम महाराज म्हणतात, आता तू नीट सावध हो. आणि या आपल्या एका जन्माच्या भवबंधनातून मुक्त हो. ८

३८८७ दोराच्या आधारें पर्वत चढला । पाउलासाटीं[1] केला अपघात ॥ १ ॥
अष्टोत्तरशें व्याधि ज्या वैद्यें दवडुनी । तो वैद्य मारुनि उत्तीर्ण जाला ॥ २ ॥
नव मास माया वाइलें उदरीं । ते माता चौवारीं नग्न केली ॥ ३ ॥
गायत्रीचें क्षीर पिळुनी घेउनी । उपवासी बांधोनी ताडन करी ॥ ४ ॥
तुका म्हणे दासां[2] निंदी त्याचें तोंड । पहातां नरककुंड पूर्वजांसी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– नव-नऊ, चौवारी–चव्हाटा, भर रस्त्यावर, क्षीर–दूध.

अर्थ – दोराचा आधार घेऊन कुणी एक मनुष्य पर्वतावर चढून गेला आणि नंतर त्याने आपले पायच कापून टाकले १ ज्या वैद्याने एकशेआठ व्याधी औषधे देऊन दूर केल्या, त्याच्या उपकारातून मुक्त होण्यासाठी कुणी एक त्याला मारूनच उत्तीर्ण झाला. २ ज्या आईने नऊ महिने उदरात वागवून जन्म दिला, तिलाच एकाने भर रस्त्यावर नग्न केले. ३ शक्य झाले तितक्या दिवस गाईचे दूध स्वत साठी पिळून घेतले, आणि नंतर मग तिला उपाशी ठेवून कुणी एक मारहाण करू लागला ४ तुकाराम महाराज म्हणतात, वरीलप्रमाणेच हरिदासांना अथवा गुरूला जो निंदतो, त्याचे तोंड पाहाणारा स्वत च्या पूर्वजांसहित नरकास जातो ५

३८८८ न कळे ब्रह्मज्ञान आचार विचार । लटिका वेव्हार करीतसे ॥ १ ॥
विश्वामित्री पोटीं तयाचा अवतार । नांव महाखर चांडाळाचें ॥ २ ॥
द्रव्यइच्छेसाटीं करीतसे कथा । काय त्या पापिष्ठा न मिळे खाया ॥ ३ ॥
पोट पोसावया तोंडें बडबडी । नाहीं धडफुडी एक गोष्टी ॥ ४ ॥
तुका म्हणे तया काय व्याली रांड । येउनियां भंड[3] जनामध्यें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेव्हार–व्यवहार, खर–गाढव, धडफुडी–निश्चयात्मक अशी, भंड–भाडखोर

अर्थ:– याला ब्रह्मज्ञान समजत नाही, की त्यासंबंधी याचा आचारविचारही नीट नाही, असे असून हा सर्वत्र व्यवहार मात्र खोटाच करतो. १ त्याचा जन्म विश्वामित्राने केलेल्या गाढवीच्या संगापोटी आहे असे समजावे; म्हणून तोही मोठा गाढव व चांडाळ आहे असे समजावे. २ द्रव्याच्या इच्छेने हा श्रीहरीची कथा करतो. याशिवाय या पापी माणसास खायला मिळत नाही काय ? ३ आपले पोट भरण्यासाठी हा तोंडाने बडबड करतो, त्याच्याजवळ निश्चयात्मक अशी एकही गोष्ट नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या भांडखोर माणसास या लोकात त्याच्या आईने, रांडेने जन्म तरी कशासाठी दिला ? ५

३८८९ नित्य उठोनियां खायाचीच चिंता । आपुल्या तूं हिता नाठवीसी ॥ १ ॥
जननीचे पोटीं उपजलासी जेव्हां । चिंता तुझी तेव्हां केली तेणें ॥ १ ॥
चातकां लागूनि मेघ नित्य वर्षे । तो तुज उदास करील केवीं ॥ ३ ॥

१ पाउलासी २ गुरुनिंदकाचे तोंड, ३ भाड.

पक्षी वनचरें आहेत भूमीवरि । तयांलागीं हरि उपेक्षीना ॥ ४ ॥
तुका म्हणे भाव धरून राहें चित्तीं । तरि तो श्रीपति उपेक्षीना ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा.– नाठवीसी–आठवत नाहीस.

अर्थ :– नित्य उठून रोज हा खाण्यासंबंधीच चिंता करीत असतो. परंतु स्वहित कशात आहे हे मात्र हा कधी पाहात नाही. १ ज्या वेळी तू आईच्या पोटी जन्मास आलास त्याच वेळी त्याने तुझी चिंता केलेली होती. २ चातक पक्ष्यासाठी जो मेघ नित्य वर्षाव करतो तो तुला कधी या बाबतीत निराश करील काय ? ३ या भूमीवर कितीतरी पक्षी आणि वनचर प्राणी आहेत. त्यांची उपेक्षा श्रीहरी कधीच करीत नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, तू श्रीहरीविषयी मनात भाव धरून राहा ना. तो तुझी कधीही उपेक्षा करणार नाही. ५

विवरण–ज्याने ही चराचर सृष्टी निर्माण केली तो श्रीहरी तिची सर्व प्रकारची चिंता वाहात असतो· त्यासंबंधी आपण काळजी करण्याचे कारण नाही. नित्य उठून खाण्याची, संसाराची, धनवित्ताची चिंता कशासाठी करायची ? त्यासाठी नाना प्रकारचे बरेवाईट प्रकार कशासाठी करायचे ? त्यापेक्षा स्वहितासाठी, शाश्वतच्या समाधानासाठी श्रीहरीवर विश्वास ठेवून त्याचेच चिंतन करणे उत्तम. असे अनन्यभावाने चिंतन करणाऱ्या आपल्या सेवकाना श्रीहरी कधीच दूर करीत नाही. उलट, त्यांची सर्व प्रकारची देखभाल तो स्वतः होऊन करतो. भगवद्गीतेत श्रीकृष्णाने स्वमुखाने सांगितले आहे की, ‘ अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ’ जे लोक एकनिष्ठेने माझी उपासना करतात त्यांचा योगक्षेम मी वाहातो असे प्रभूने सांगितले आहे.–अशा भक्ताची सर्व चिंता श्रीहरीच करीत असतो. ‘ आपुली तहान भूक नेणें । तान्हया निकें तें माउलीसीचि करणें । तैसे अनुसरले जे मज प्राणें । तयाचेनं काइसेनिहि न लजें मीं ? ’ लहान मुले स्वतःची तहानभूक जाणत नाहीत. त्याचे सर्व काही आईलाच करावे लागते. त्याप्रमाणे मी माझ्या भक्ताचे सर्व काही करावयास लाजत नाही. सर्वच संतांनी प्रभूच्या या वत्सलतेचे मनापासून वर्णन स्वानुभवाच्या आधाराने केलेले आहे. हा श्रीहरी कसा आहे ? ‘ ऐसा आवडीचा भुकाळु । श्रीविठ्ठल दीनवत्साळु । ’ म्हणून एकनाथांनी म्हटले आहे. हा श्रीहरी म्हणजे आपल्या भक्तासाठी दुभणारी एक गाय आहे. चौदा भुवनात चरणाऱ्या या गाईचा ‘पान्हा न समाये त्रिभुवनीं’ असे तुकोबांनी म्हटले आहे.

३८९० जेजे आळी केली तेते गेली वांयां । उरला पंढरिराया श्रम माझा ॥ १ ॥
काय समाधान केलें कोणे वेळे । कोणें माझे लळे पाळियेले ॥ २ ॥
अभ्यास[1] तो नाहीं स्वप्नीं ही दुश्चिता । प्रत्यक्ष बोलतां कैंचाचि तो ॥ ३ ॥
आतां पुढें लाज वाटे पांडुरंगा । भक्त ऐसें जगामाजी जालें ॥ ४ ॥
तुका म्हणे आतां नाहीं भरवसा । मोकलिसी ऐसा वाटतोसी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मागील अभंगक्रमांक ३३६३ पाहावा.

३८९१ पूर्वीहूनि बहु भक्त सांभाळिले । नाहीं अव्हेरिले दास कोणी ॥ १ ॥
जेजे शरण आले तेते आपंगिले । पवाडे विठ्ठले ऐसे तुझे ॥ २ ॥
मिरवे चरणीं ऐसीये गोष्टीचें । भक्तसांभाळाचें ब्रीद ऐसें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हांसाटीं येणें रूपा । माझ्या मायबापा पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आपंगिले–अंगीकार केला, स्वीकार केला, पवाडे–कीर्ती.

---

१ आभास.

अर्थ – देवा, तुम्ही यापूर्वी पुष्कळच भक्ताचा सांभाळ केला आहे कोणत्याही आपल्या दासाचा तुम्ही अव्हेर केलेला नाही १ विठ्ठला, जे जे तुला शरण आले, त्याचा तू स्वीकार केलास अशीच तुमची कीर्ती आहे २ आपल्या भक्ताचा सांभाळ करावा अशा प्रकारचे ब्रीदच देवा, तुम्ही आपल्या पायी बांधलेले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, मायबापा, तुम्ही आमच्यासाठी सगुण-साकार असे रूप धारण करता. ४

३८९२ दर्दुराचे पिलूं म्हणे रामराम । नाही उदक उष्ण होऊं दिले ॥ १ ॥
कढेमाजी बाळ करी तळमळ । गोविंद गोपाळ पावे वेगीं ॥ २ ॥
आज्ञा तये काळी केली पावकासी । क्षणी पिलीयासी तापवीसी ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझे ऐसे हे पवाडे । वर्णितां निवाडे सुख वाटे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुर्दराचें-बेडकाचे, पावकाशी–अग्नीला, निवाडे–निर्णय

अर्थ बेडकाचे पिल्लू दगडाच्या कपारीत उन्हाळ्याच्या वेळी स्वस्थपणे रामराम असे म्हणत बसते त्याला पाण्याची उष्णता तू लागू दिली नाही नाहीस १ भक्त प्रल्हादाला जेव्हा तापलेल्या तेलाच्या कढईत टाकले तेव्हा तो बाळ तळमळ करू लागला 'गोविंदा, गोपाळा, लौकर धाव व माझे रक्षण कर' असे म्हणू लागला २ त्यावेळी तूच अग्नीला आज्ञा केलीस की, या माझ्या बाळाला तापवू नकोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची तुझी कीर्ती रोज वर्णन करताना मोठेच सुख वाटते ४

३८९३ करुणा बहुत तुझिया अतरा । मज विश्वंभरा कळो आलें ॥ १ ॥
पक्षीयासी तुझें नाम जें ठेविले । तयें उद्धरिले गणिकेसी ॥ २ ॥
कुटिणी ते दोप बहु आचरली । नाम घेता आली करुणा तुज ॥ ३ ॥
हृदय कोमळ तुझें नारायणा । ऐसे बहुता जना तारियेले ॥ ४ ॥
तुका म्हणे सीमा नाहीं तुझे दये । कोमळ हृदय पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अतरा–चित्तामध्ये, कुटिण–जारिण.

अर्थ – देवा, तुझ्या चित्तामध्ये आपल्या भक्ताविषयी मोठीच दया आहे, असे विश्वंभरा, मला समजून आले आहे १ गणिका वेश्येने आपल्या आवडत्या पोपटास तुझे नाव ठेवून ती त्याला हाक मारू लागली या निमित्ताने तिने तुझे नाव घेतल्यावर तू तिचाही उद्धार केलास २ या जारिणीने पुष्कळ दोषाचे आचरण केले परंतु तिने तुझे नाव घेतल्याबरोबर तुला तिची मोठीच दया आली ३ नारायणा, तू अशा प्रकारे पुष्कळच लोकांना तारले आहेस तुझे हृदय फारच कोमल आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तुझ्या ठिकाणी असणाऱ्या दयेस सीमा नाही तू अतिशय कोमल हृदयाचा आहेस ५

३८९४ आजामीळ अंत मरणासी आला । तोवरि स्मरला नाहीं तुज ॥ १ ॥
प्राण जातेवेळे म्हणे नारायण । त्यासाटीं विमान पाठविले ॥ २ ॥
बहुत कृपाळु होसी जगन्नाथा । त्रैलोक्यसमर्था सोइरिया ॥ ३ ॥
तुका म्हणे भक्तकाज तूं कैवारी । तुज साही चारी वर्णिताती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भक्तकाज–भक्ताचे कार्य, साही–सहा शास्त्रे, चारी–चारही वेद.

अर्थ – अजामेळ नावाच्या माणसाने जन्मभर तुझे कधीच स्मरण केले नाही शेवटी त्याचे मरण जवळ आले १ अखेरीस प्राण जातेवेळी त्याने आपल्या मुलास 'नारायण' म्हणून हाक मारली, त्याबरोबर देवा, तू याला वैकुंठाहून विमान पाठविलेस २ जगन्नाथा, तू असा फारच कृपाळू आहेस त्रैलोक्यात तूच समर्थ असा

सर्वांचा आप्त आहेस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, भक्ताचे कार्य करण्याविषयी तू फारच तत्पर आहेस. म्हणूनच तुला भक्तकैवारी असे नाव असून तुझी स्तुती सहा शास्त्रे व चार वेद नेहमी करीत असतात ४

विवरण.— अजामेळाचा उल्लेख तुकोबांनी वारंवार केलेला आहे गणिकेचाही उल्लेख त्यांच्या अभंगांत वारंवार येतो. या पौराणिक कथासंदर्भाची दोन मर्मे ध्यानात ठेवण्यासारखी आहेत. पहिले रहस्य असे की, सारा जन्म पापकर्में करण्यात गेला तरी शेवटी खऱ्या पश्चात्तापाने हृदय पवित्र झाले तर त्याला श्रीहरीजवळ जाता येते. भागवतधर्माने अशा पापयोनीत कुढणाऱ्या पण पश्चात्तापदग्ध जीवाना प्रभुप्राप्तीचा अवसर ठेवलेला आहे ' अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मतव्य. सम्यग्व्यवसितो हि सः ' पूर्वी अतिशय दुराचारी असला तरी तो जर अनन्यभक्त होऊन माझी भक्ती करील तर तो साधूच मानला पाहिजे अशी भगवद्गीतेने ग्वाही दिलेली आहे यासंबंधीची चर्चा आपण यापूर्वी वारंवार केली आहे या संदर्भात आणखी एक मर्माची बाब अशी की, अंतकाळी जशी कुणास बुद्धी होईल त्याप्रमाणे त्याला गती मिळेल, अशीही एक श्रद्धा आहे अजामेळ काय किंवा गणिका काय; अखेरच्या क्षणात त्याना ज्याचे स्मरण मनापासून झाले त्याच स्वरूपास ते जाऊन मिळाले ' अंतीचिया मती । साचपण पुढिले गती 'हाही सिद्धान्त गीतेनेच स्पष्टपणे मांडला आहे. 'अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् । य प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशय. ' मरणाच्या वेळी जो केवळ माझेच स्मरण करून शरीराचा त्याग करतो तो माझ्याच स्वरूपी येतो यात संशय नाही. अशी गीतेने ग्वाही दिलेली आहे ' म्हणोनि यापरी मातें । अंतकाळीं जाणतसाते । जे मोकलती देहाते । ते मोचि होती ' या निर्णयानुसार अजामेळ अथवा गणिका याना आयुष्याच्या अखेरीस अथवा मरणसमयी श्रीहरीची स्मृती झाली म्हणून त्याना सद्गती मिळाली, असा भावार्थ.

३८९५ धर्म रक्षावया अवतार घेशी । आपुल्या पाळिसी भक्तजना ॥ १ ॥
अंबऋषीसाटीं जन्म सोसियेले । दुष्ट निर्दाळिले किती एक ॥ २ ॥
धन्य तुज कृपासिंधु म्हणतील । आपुला तूं बोल साच करीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज वर्णिती पुराणें । होय नारायण दयासिंधु ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निर्दाळिले–नाहीसे केले, साच–खरा.

अर्थ :– देवा, भक्ताचे रक्षण करून धर्म राखण्यासाठी तुम्ही अवतार घेत असता, आणि आपल्या भक्तांचे रक्षण करता. १ अंबऋषीसाठी तुम्ही दहा जन्म घेतले आणि आणि कित्येक दुष्टाना नाहीसे केले. २ तुला कृपेचा सागर म्हणतात. तू धन्य आहेस. 'आपण पतितपावन आहोत' असा आपला बोल तू खरा करून दाखीव. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायण हा दयेचा सागर असल्याचे वर्णन पुराणानी केले आहे ४

विवरण – श्रीहरी कशासाठी व कुणासाठी अवतार धारण करतो, सगुणरूपाने धावत येतो यासबधी भागवत धर्मीयानी फार समर्पक व निश्चयात्मक अशी चर्चा केली आहे. ईश्वराचा अवतार सज्जनाच्या रक्षणासाठी, दुर्जनाच्या नाशासाठी आणि धर्मरक्षणासाठी असतो हे गीतेचे निवेदन प्रसिद्ध आहे. ' जें धर्मजात आघवें । युगायुगी म्यां रक्षावें । ऐसे ओघु हा स्वभावें । आद्य असे ॥ म्हणोनि अजत्व परते ठेवीं । मी अव्यक्तपणही नाठवीं । जे वेळीं धर्मातें अभिभवी । अधर्मु हा ' ही भगवताची घोषणा आहे धर्माची ग्लानी व अधर्माची वृद्धी झाली की त्याला अवतार घ्यावा लागतो. सज्जनाच्या रक्षणासाठी, दुर्जनाच्या निर्दाळणासाठी आणि धर्मरक्षण करण्यासाठी भगवताला देहधारी व्हावे लागते ' ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें । मी साकार होऊनी अवतरे । मग अज्ञानाचे आधारें । गिळूनि घालीं ॥ अधर्माची अवधी तोडीं । दोषांची लिहिली फाडीं । सज्जनाकरवीं गुढी । सुखाची उभवीं ॥ दैत्यांचीं कुळें नाशीं । साधूंचा मानु गिवशीं । धर्मासीं नीतीशीं । शेज भरीं ॥ मी अविवेकाची काजळी । फेडूनि विवेकदीप उजळीं । तैं योगियां पाहे दिवाळी । निरंतर ' या ज्ञानदेवकृत वर्णनामध्ये भगवताच्या अवतारहेतूचे सुस्पष्ट असे चित्रण आहे.

३८९६ येउनी जाउनी पाहें तुजकडे । पडिल्या सांकडें नारायणा ॥ १ ॥
आणीक कोणाचा मज नाहीं आधार । तुजवरि भार जीवें भावें ॥ २ ॥

३९०१ लागो तुझी सोय ऐसे कोणी[1] करी । माझें विठाबाई जननिये ॥ १ ॥
पतितपावन म्हणविसी जरी । आवरण[2] करीं तरी माझें ॥ २ ॥
नाहीं तरी ब्रीद टाकीं सोडूनिया । न धरीसी माया जरी माझी ॥ ३ ॥
बोलिला तो बोल करावा साचार । तरि लोक बरे म्हणतील ॥ ४ ॥
करावा संसार लोक लाजे भेणे । वचनासी उणे येऊ नेदी ॥ ५ ॥
तुम्हा आम्हां तैसे नाहीं म्हणे तुका । होशील तूं सखा जीवलग ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –सोय–सवय, आवरण–अव्हेरून, साचार–खरे

अर्थ – विठाबाई, माझे आई, जेणेंकरून मला तुझी सवय लागेल असे तू काहीतरी कर. १ जर तू स्वतःला पतितपावन म्हणवून घेत असशील तर माझा अव्हेर करू नकोस २ तू जर मज पतिताची दया धारण करीत नसशील तर पतितपावन हे ब्रीद टाकून तरी दे ३ आपण पतितपावन आहोत असे जे बोल तू बोललास ते खरे करून दाखीव तरच तुला लोक चांगले म्हणतील ४ लोकलाजेच्या भयाने संसार करावा लागतो म्हणून तू आपल्या वचनात उणेपणा आणू देऊ नकोस ५ तुकाराम महाराज म्हणतात, तुमचाआमचा प्रकार तसा नाही तू माझा जिवलग सोयरा आहेस ६

३९०२ तूं आम्हां सोयरा सज्जन सांगाति । तुजलागीं प्रीति चालो सदा ॥ १ ॥
तूं माझा जिव्हाळा जीवाचा जिवलग । होसी अंतरंग अंतरींचा ॥ २ ॥
गण गोत मित्र तूं माझें जीवन । अनन्यशरण तुझ्या पायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्वगुणें तुझा दास । आवडे अभ्यास सदा तुझा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सांगाति–सोबती

अर्थ – देवा, तूच आमचा सोयरा, सज्जन व सोबती आहेस तुझी व माझी प्रीती सतत चालू राहावी १ माझ्या अंतःकरणातील जिवलग व जिव्हाळा तू आहेस तू माझ्या चित्तातील अंतरंगाचा होशील. २ माझे गण गोत, मित्र व जीवन तूच आहेस म्हणून मी तुझ्या पायांशी अनन्यभावाने शरण आलो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी सर्व गुणांनी तुझा दास झालो आहे, यामुळे सतत तुझाच अभ्यास करणे मला आवडते ४

३९०३ आवडेल तैसे तुज आळवीन । वाटे समाधान जीवा तैसें ॥ १ ॥
नाहीं येथें काहीं लौकिकाची चाड । तुजविण गोड देवराया ॥ २ ॥
पुरवीं मनोरथ अंतरींचे आर्त । धायेवरि गीत गाईं तुझें ॥ ३ ॥
तुका म्हणे लेकी आळवी माहेरा । गाऊं या संसारा तुज तैसें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाड–इच्छा, पर्वा, आर्त–तीव्र इच्छा, धायेवरी–तृप्ती होईपर्यंत

अर्थ :–देवा, मला जसे आवडेल आणि माझ्या जीवास जसे समाधान वाटेल तशा प्रकाराने मी तुला आळवीन १ देवराया, तुझ्यावाचून मला येथे इतर कुठल्याही लौकिक गोष्टीची इच्छा नाही मला केवळ तूच गोड आहे २ माझ्या अंतःकरणातील तीव्र इच्छा तू पूर्ण कर माझी इच्छा तृप्त होईपर्यंत मी तुझे गीत गाईन ३ तुकाराम महाराज म्हणतात, सासरी असलेली लेक ज्या तीव्रतेने माहेरची आळवणी करते, त्या तीव्रतेने मी या संसारात तुला गात राहीन ४

१ करी नाही, २ अव्हेरून

३९०४ माझें मुख नामीं रंगो सर्वकाळ । गोविंद गोपाळ रामकृष्ण ॥ १ ॥
अबद्ध चांगलें[1] गाऊं भलतेंसें । कळलें[2] हें जैसें मायबापा ॥ २ ॥
तुका म्हणे मज न लगे वांकडें । मी तुझें बोबडें बाळ तान्हें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– अबद्ध–वेडेवाकडे.

अर्थ :– गोविंद, गोपाळ, रामकृष्ण या नामांनी माझे मुख सर्वकाळ रंगून जावो. १ मायबापा, वेडेवाकडे अथवा चांगलेवाईट जसे कळेल तसे आम्ही तुझे गुणगान करू. २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी तुझे बालक बोबडे व तान्हे आहे. तरी त्यासाठी मला वाकडे दाखवू नकोस. ३

३९०५ यालागीं आवडी म्हणा राम कृष्ण । जोडा नारायण सर्वकाळ ॥ १ ॥
सोपें हें साधन लाभ येतो घरा । वाचेसी उच्चारा राम हरि ॥ २ ॥
न लगती कष्ट न लगे सायास । करावा अभ्यास विठ्ठलाचा ॥ ३ ॥
न लगे तप तीर्थ करणें महादान । केल्या एक मन जोडे हरि ॥ ४ ॥
तुका म्हणे कांहीं न वेचितां धन । जोडे नारायण नामासाटीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– सायास–प्रयत्न, वेचितां–खर्च करता.

अर्थ :– लोकहो, तुम्हांस सर्वकाळासाठी जर नारायणाची प्राप्ती करून घ्यायची असेल तर मोठ्या आवडीने रामकृष्ण या नामाचा उच्चार करा. १ वाणीने फक्त राम, हरी असे नाम उच्चारा. हे साधन फार सोपे असून यामुळे लाभ घरच्या घरी चालून येतो. २ विठ्ठलाच्या नामाचा अभ्यास दृढतेने करावा. यासाठी काही कष्ट लागत नाहीत, की प्रयत्न करावे लागत नाहीत. ३ तप, तीर्थयात्रा, महादान इत्यादी करण्याची काहीच जरूरी नाही. एकाग्र मनाने नामस्मरण केले की श्रीहरीची प्राप्ती होते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे काही एक द्रव्य खर्च न करता एका नामामुळेच नारायणाची प्राप्ती होते. ५

३९०६ झांकूनियां नेत्र काय जपतोसी । जो नाहीं मानसीं प्रेमभाव ॥ १ ॥
रामनाम[3] म्हणा उघड मंत्र जाणा । चुकती यातना गर्भवास ॥ २ ॥
मंत्र यंत्र संध्या करिसी जडीबुटी । तेणें भूतसृष्टी पावसील ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐक सुंदर मंत्र एक । भवसिंधुतारक रामनाम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– यंत्र–देवतेच्या पूजेला लागणारे गूढ कोष्टक, आकृती इ० जडीबुटी–औषधी, दैवी झाडपाला इ०

अर्थ :– तुझ्या मनात श्रीहरीविषयी थोडाही प्रेमभाव नाही. मग डोळे झाकून कसला रे जप करतोस ? १ त्यापेक्षा रामनामाचा उघडा, स्पष्ट मंत्र जाणून म्हणा ना. त्यामुळे तुझ्या गर्भवासाच्या यातना तरी चुकतील. २ काही इतर मंत्र, गूढ यंत्र, संध्येचे अवडंबर अथवा जडीबुटी इत्यादी करशील तर शेवटी भूतपिशाच्चांची सृष्टी तुला मिळेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, भवसिंधू तरून नेणारा रामनामाचा हा एक सुंदर मंत्र तू ऐक ना. ४

३९०७ पापिया चांडाळा हरिकथा नावडे । विषयालागीं[4] आवडे गाणें त्याला ॥ १ ॥
ब्राह्मणा दक्षणा देतां रडे रुका । विषयालागीं फुका लुटीतसे[5] ॥ २ ॥
धोतभरि लंगोटी नेदी अतीताला । खीरम्या[6] देतो शाला भोरप्यासी ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याच्या थुंका तोंडावरि । जातो यमपुरीं भोगावया ॥ ४ ॥

१ वाकुडे, २ बाळ वदे जैसें मायबापा, ३ रामकृष्ण म्हणा उघडा, ४ विषमी आवडे, ५ लुटी धन, ६ भोरप्यासी शाला वाटीतसे.

शब्दार्थ व टीपा :- रुका-पैसा, दिडकी, फुका-फुकट, नेदी-देत नाही, अतीताला-अतिथीला, धोरप्या-उंची वस्त्र.

अर्थ :- जे कुणी पापी व चांडाळ आहेत त्यांना श्रीहरीची कथा कधी आवडत नाही. पण विषयांची वाढ करणारी गाणे, नाच, तमाशे ही साधी साधने मात्र त्यांना पसंत पडतात. १ ब्राह्मणाला एक पैसा दक्षिणा देताना याला रडू येते. परंतु नाना विषयवृद्धीसाठी तो वाटेल तसा पैसा उधळीत असतो. २ कुणी अतिथी आला तर तो कधी त्याला वीतभर लंगोटीही देणार नाही. परंतु उथळ करमणूक करणाऱ्या बहुरूप्याला मात्र उंची वस्त्र आणि दाग इ० देईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाच्या तोंडावर थुंकावे. तो शेवटी यमपुरीच भोगायला जाईल. ४

३९०८ क्षुधार्थी अन्नें दुष्काळें पीडिलें । मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ॥ १ ॥
तैसें तुझें पायीं लांचावलें मन । झुरे माझा प्राण भेटावया ॥ २ ॥
मांजरें देखिला लोणियांचा गोळा । लावुनियां डोळा बैजलेंसें ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां झडी घालूं पाहें । पांडुरंगे माये तुझे पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - क्षुधार्थी-भुकेने पीडलेले, झडी-झडप

अर्थ :- दुष्काळात भुकेने पीडलेल्या एखाद्या माणसाने मिष्टान्न पाहिल्यावर जशी त्यावर झडप घालावी. १ त्याप्रमाणे देवा, माझे मन तुझ्या पायी लालचावले आहे माझा प्राण तुला भेटायला झुरत आहे. २ लोण्याचा गोळा पाहून मांजर जसे त्यावर डोळा लावून बसते त्याप्रमाणे माझी अवस्था झाली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगे, माऊले, त्याचप्रमाणे मी तुझ्या पायांवर झडप घालू पाहात आहे ४

३९०९ स्वामीसी संकट पडे जे गोष्टीचें । काय त्या प्रेमाचें सुख मज ॥ १ ॥
दुःखवीना चित्त तुझें नारायणा । कांहींच मागेना तुजपासी ॥ २ ॥
रिद्धि सिद्धि मोक्ष संपत्ति विलास । सोडियेली आस याची जीवें ॥ ३ ॥
तुका म्हणे एके वेळे देई भेटी । वोरसोनि पोटीं आलिंगावें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- आस-आशा, इच्छा, वोरसोनि-प्रेमभरित हृदयाने

अर्थ - देवा, स्वामीला ज्या गोष्टीचे संकट पडेल त्या गोष्टीपासून मिळणाऱ्या प्रेमाचे मला काय सुख ? १ नारायणा, ज्यामुळे तुझे चित्त दुखावेल असे मी तुझ्यापाशी काहीच मागणार नाही. २ रिद्धिसिद्धी, मोक्ष, संपत्ती, विलास इत्यादींची आशा आता माझ्या जीवाने सोडलेली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू एकदा मला भेट दे, आणि प्रेमभराने पोटाशी धरून आलिंगन दे. ४

३९१० देव तिहीं बळें धरिला सायासें । करूनियां नास उपाधीचा ॥ १ ॥
पर्वपक्षी[1] धातु धिःकारिलें जन । स्वयें जनार्दन तेचि जाले ॥ २ ॥
तुका म्हणे यासी न चले तांतडी । अनुभवें गोडी येईल फळीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- तिहीं-त्यांनी, सायासें-प्रयत्न करून, धातु-संपत्ती, धन.

अर्थ :-ज्यांनी उपाधींचा नाश केला त्यांनी देवास मोठ्या प्रयत्नाने मिळविले आहे. १ त्यांनी आरंभापासूनच धनसंपत्ती आणि लोक यांचा धि:कार केला. त्यामुळे ते स्वयमेवच जनार्दनरूप झाले आहेत. २ तुकाराम महाराज म्हणतात, या अशा कार्याला तातडी चालत नाही. या विषयाची गोडी अनुभवानेच समजून येईल. ३

१ पूर्वपक्ष.

३९११ भेटीवाचोनियां दुजें नाहीं चित्तीं । येणें काकुलती याजसाटीं ॥ १ ॥
भेटोनिया बोले आवडीचें गुज । आनंदाच्या भोजें जेवूं संगें ॥ २ ॥
मायलेकरासी नाहीं दुजी परि । जेंऊ बरोबरी बैसोनियां ॥ ३ ॥
तुका म्हणें ऐसें अंतरींचे आर्त । यावें जी त्वरित नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुजें–दुसरे, भोजें–संतोषाने, आवडीने, परी–प्रकार, आर्त–तीव्र इच्छा

अर्थ – देवा, तुमच्या भेटीशिवाय माझ्या चित्तात दुसरे काहीही नाही त्याचसाठी मी तुमच्यापुढे काकुळतीस येऊन करुणा भाकत आहे १ भेट घेऊन मोठ्या प्रीतीने काही हितगुज करू आणि आनंदाने आवडीचे भोजन एकमेकांच्या संगतीत करू २ मायलेकरांनी एकमेकाबरोबर एकत्र बसून जेवण करण्याखेरीज दुसरा प्रकारच भेटीचा संभवत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, माझ्या मनाची ही अशी तीव्र इच्छा आहे ती तू त्वरित पूर्ण करण्यासाठी यावेस ४

३९१२ आमिषाचे आसे गळ गिळी मासा । फुटोनिया घसा मरण पावे ॥ १ ॥
मरणाचे वेळे करी तळमळ । आठवी कृपाळ तये वेळीं ॥ २ ॥
अंतकाळीं ज्याच्या नाम आलें मुखा । तुका म्हणे सुखा पार नाहीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – मागील प्रथम खंडातील अभंगक्रमांक ६८८ पाहावा

३९१३ जायाचें शरीर जाईल क्षणात । का हो गोपिनाथ पावेचि ना ॥ १ ॥
तुम्ही संत सारे कृपेचे सागर । माझा निरोप फार सांगा देवा ॥ २ ॥
अनाथ अज्ञान कोणी नाहीं त्याला । पायापें विठ्ठला ठेवीं मज ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें करावें निर्वाण । मग तो रक्षण करिल माझें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पायापें–पायावर, निर्वाण–शेवट, अखेर

अर्थ – संतहो, शरीर हे शेवटी नाहीसे होणारच एका क्षणात ते जाईल तरी अजून हा गोपिकानाथ मला का बरे पावत नाही ? १ तुम्ही सर्व संत कृपेचे सागर आहात म्हणून माझा हा निरोप देवाला विस्तारून सांगा २ निरोप असा की, मी अनाथ आहे, अज्ञान आहे, मला कुणीही प्रेमाचे नाही मला विठ्ठलाच्या पायाशी ठेवावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे तुम्ही मला अखेर देवाच्या पायाशी न्या मग तो माझे रक्षण करील ४

३९१४ त्रासला हा जीव संसारींच्या सुखा । तुजविण सखा नाहीं कोणी ॥ १ ॥
ऐसें माझे मनीं वाटे नारायणा । घालावी चरणावरि मिठी ॥ २ ॥
कइ ते सुंदर देखोनि रूपडें । आवडीच्या कोडें आळंगीन ॥ ३ ॥
नाही पूर्व पुण्य मज पापरासी[1] । म्हणोनी पायासी अंतरलों ॥ ४ ॥
अलभ्य लाभ कैंचा संचितावेगळा । विनवी गोपाळ दास तुका ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कइ–केव्हा, कोडें–कौतुकाने

अर्थ – देवा, संसारातील या लौकिक सुखांनी माझा जीव भारी त्रासून गेला आहे त्याला तुझ्याशिवाय दुसरा सखा कुणीही नाही १ नारायणा, माझ्या मनास असे वाटते की, तुमच्या चरणावर मिठी घालावी २ तुमचे सुंदर रूप केव्हा पाहीन, मोठ्या आवडीने व कौतुकाने तुम्हास केव्हा आलिंगन देईन असे मला झाले आहे ३ मज

१ पामरासी

पातक्याला पूर्णपुण्याची जोड नाही. म्हणून तर मी तुमच्या पायापासून दूर झालो ४ तुकाराम महाराज म्हणतात, प्रारब्धाशिवाय अलभ्य लाभाची प्राप्ती गोपाळा, कशी होणार ? मी तुमचा दास पण त्यासाठीच विनंती करीत आहे. ५

३९१५ मोलाचें आयुष्य वेचुनियां जाय । पूर्वपुण्यें होय लाभ याचा ॥ १ ॥
अनंतजन्मीचे शेवट पाहता । नर देह हातां आला तुझ्या ॥ २ ॥
कराल ते जोडी येईल कार्यासी । ध्यावे विठ्ठलासी सुखालागी ॥ ३ ॥
सांचलिया धन होईल ठेवणें । तैसा नारायण जोडी करा ॥ ४ ॥
करा हरिभक्ति परलोकी ये कामा । सोडवील यमापासोनिया ॥ ५ ॥
तुका म्हणे करा आयुष्याचें मोल । नका वेचूं बोल नामेंविण ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेचुनिया–खर्चून, जोडी–प्राप्ती, लाभ, ध्यावे–ध्यान करावे.

अर्थ :– लोकहो, तुमचे मौल्यवान आयुष्य व्यर्थ वाया जात आहे. पूर्वपुण्याईने त्याचा लाभ तुम्हाला झालेला आहे. १ नीट पाहाता असे दिसते की, अनंत जन्मानंतर शेवटी हा नरदेह तुमच्या हाती आलेला आहे २ या ठिकाणी जो लाभ करून घ्याल तो कामास येईल यासाठी सुख मिळविण्याकरता विठ्ठलाचे ध्यान करावे ३ तुम्ही जसे धन साचवून ठेवता त्याप्रमाणे या नारायणाची प्राप्ती करून घ्या ४ तुम्ही श्रीहरीची भक्ती करा म्हणजे ती परलोकी तुमच्या उपयोगास येईल आणि यमाच्या हातूनही तुम्हास सोडवील ५ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही आपल्या आयुष्याची किंमत करून घ्या आणि यासाठी श्रीहरीच्या नामाशिवाय व्यर्थ बोलणे करू नका ६

३९१६ काय सुख आहे वाउगें बोलतां । ध्यातां पंढरिनाथा कष्ट नाहीं ॥ १ ॥
सर्वकाळ वाचे उच्चारितां हरि । तया सुखा सरि पाड नाहीं ॥ २ ॥
रामकृष्णरंगीं[1] रसना रंगली । अमृताची उकळी नाम तुझें ॥ ३ ॥
तुका म्हणे धन्य तयाचे वदन । जया नारायण ध्यानीं मनीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाउगें–व्यर्थ, सरि–बरोबरी, रसना–जीभ, वदन–मुख.

अर्थ – उगाच व्यर्थ भाषण करण्यात काय सुख आहे ? उलट पंढरीनाथाचे ध्यान करताना काहीच कष्ट होत नाहीत. १ सर्व काळ वाणीने श्रीहरीचा उच्चार केला तरी त्या अपार सुखाची बरोबरी होणार नाही २ देवा, रामकृष्ण नामाच्या प्रेमरगात जीभ रगून जावी तुझे नाम म्हणजे अमृताची उकळी आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या ध्यानात, मनात सतत नारायण आहे त्याचे मुख धन्य होय ४

३९१७ कीर्तनाच्या सुखें सुखी होय देव । पंढरीचा राव सगीं आहे ॥ १ ॥
भक्त जाय सदा हरि कीर्ति गात । त्यासवे[2] अनंत हिंडतसे ॥ २ ॥
त्रैलोक्य भ्रमण फिरत नारद । त्यासंगें गोविंद फिरतसे ॥ ३ ॥
नारद मंजुळ सुस्वरे गीत गाये । मार्गी चालताहे सगें हरि ॥ ४ ॥
तुका म्हणे त्याला गोडी कीर्तनाची । नाहीं आणिकाची प्रीति ऐसी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– राव–राणा, राजा, सगीं–सगतीत

अर्थ :– कीर्तनाच्या सुखाने देव सुखी होत असतो. पंढरपूरचा राणा पांडुरंग तर कीर्तनाच्या संगतीत आपल्या भक्तावरोबर असतो. १ श्रीहरीची कीर्ती गात गात भक्त जिकडे जातो त्याच्या मागोमाग हा अनंत हिंडत असतो. २

१ रंगी २ नित्यसेवें

नारद त्रैलोक्यात भ्रमण करीत असतात त्यांच्या बरोबर गोविंद फिरत राहातो ३ नारद मंजुळ स्वरानी श्रीहरीची कीर्ती गात गात हिंडतात आणि त्यांच्याबरोबर मार्गाने श्रीहरीही चालत असतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, या प्रभूला कीर्तनाची गोडी फार असते इतर कशाचीही प्रीती त्याला वाटत नाही ५

विवरण – कलियुगात कीर्तनभक्तीस फारच महत्त्व आलेले आहे श्रीहरीच्या गुणसंकीर्तनाने, नामघोषाने चित्त प्रसन्न होऊन त्यात प्रभुप्रीतीचा उदय होतो वाद्य, नृत्य, संगीत, टाळवीणाचे व मृदंगाचे झणत्कार इत्यादींच्या साथीने प्रभूच्या कीर्तनात प्रेमभक्तीचा उत्कर्ष होऊन त्याच स्थानावर व श्रवणातच प्रभूचा साक्षात्कार घडतो, म्हणून सर्वच साधुसंतानी या नामसंकीर्तनाचा गौरव केला असून साधकाला इतर मार्गापासून परावृत्त करून या सोप्या व सरळ मार्गाकडे वळविले आहे कीर्तनामुळे स्वतः श्रीहरीही संतुष्ट होतो 'कीर्तनाच्या सुखें सुखी होतो जीव' असे महाराष्ट्रातील पहिले कीर्तनाचार्य नामदेवराय यांनी म्हटले आहे या कीर्तनाचे मुख्य वैशिष्ट्य त्यांनी सांगितले ते असे की, 'काळवेळ नसे नामसंकीर्तनीं। उच्चनीच योनि हेंहि नसे' कीर्तनश्रवणाची मुभा कुणासही असल्यामुळे श्रीहरीसही त्याची अवीट गोडी आहे कारण तेथे त्याला त्याची सारी लेकरे एकचित्ताने तल्लीन झालेली दिसतात म्हणून तो वैकुंठाहूनही धावत येतो एकनाथांनी म्हटले आहे, 'कीर्तनाची आवडी देवा। वैकुंठा हुनि घाली धावा ।। नवल वैकुंठींच नसे। तो कीर्तनीं नाचतसे' कारण या कीर्तनप्रसंगी सर्व जातींचे, सर्व थरातील लोक एकत्र येऊ शकतात. याच्या श्रवणासाठी विद्वत्ता लागत नाही, की विशेष अधिकारही लागत नाही याच 'भोळ्या भोळ्यापाठी। धावे त्याच्या पाठोपाठी' असे एकनाथांनी म्हटले आहे 'कीर्तनाचे थोर सुख। यदुनायक राहे उभा', 'कीर्तनें तोषे अधोक्षज', 'कीर्तनाची आवडी मोठी। प्रेमें देव घाली मिठी' अशा भाषेत एकनाथांनी प्रभूचे कीर्तनप्रेम व्यक्त केले आहे

याच कीर्तनसुखास श्रीहरी कसा लालचावलेला आहे याचे वरील अभंगात वर्णन करून तुकाराम महाराजांनी कीर्तनभक्तीचे आद्य प्रवर्तक श्रीनारदमुनी यांचा उल्लेख केला आहे भगवान नारदांनी त्रिखंडात हिंडून आपल्या मंजुळ वाणीने आणि वीणेच्या साहाय्याने प्रथम कीर्तनभक्तीस सुरुवात केली या नारदऋषींना म्हणूनच सर्वजण वंदन करतात भागवतात म्हटले आहे, 'अहो देवर्षिर्धन्योऽयं यत्कीर्तिं शार्ङ्गधन्वनः । गायन्माद्यन्निदं तन्त्र्या रमयत्यातुरं जगत' अहो देवर्षी नारद परम धन्य होत कारण ते स्वतः आनंदित होऊन हातीं शार्ङ्गधर धनुष्य धारण करणाऱ्या परमेश्वराचे यश वीणेच्या साहाय्याने गाऊन दुःखी जगाला रमवतात देवाची चरित्रे गात गात भगवद्भक्तीचा प्रसार कीर्तनाच्या द्वारे करणे हेच नारदाच्या जीविताचे प्रमुख कार्य होय

३९१८ वाळेंविण माय क्षणभरि न राहे। न देखता होये कासाविस ॥ १ ॥
आणिक उदंड बुझाविती जरी। छंद त्या अंतरीं माउलीचा ॥ २ ॥
नावडती तया बोल आणिकांचे। देखोनिया नाचे माय दृष्टी ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी विठ्ठल माउली। आणिकांचे बोलीं चाड नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उदंड–पुष्कळ, चाड–इच्छा

अर्थ – आपल्या आईशिवाय बालक एक क्षणभरही रहात नाही तो जर नजरेस पडली नाही तर ते कासावीस होते १ त्याला समजावण्याचा प्रयत्न इतर लोक पुष्कळच करतात, तरी त्याच्या मनात आपल्या आईचाच छंद असतो २ इतरांचे बोल त्याला कधीच आवडत नाहीत, पण आई दृष्टीस पडली की ते नाचू लागते ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही माझी विठ्ठलमाऊली आहे हिच्याशिवाय इतरांचे बोल ऐकण्याची इच्छाच मला होत नाही ४

३९१९ हरिचिया भक्ता नाहीं भयचिंता। दुःखनिवारिता नारायण ॥ १ ॥
न लगे वाहणें संसारउद्वेग। जडों नेदी पाग देवराया ॥ २ ॥

असो द्यावा धीर सदा समाधान । अहो नारायण जवळच ॥ ३ ॥
तुका म्हणे सखा माझा पांडुरंग । व्यापियेले जग तेणे एके ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पाग–दारिद्र्य

अर्थ :– श्रीहरीच्या भक्तांना कोणत्याही प्रकारची भीती अथवा शंका नसते त्यांचे दुःख निवारण करणारा नारायण आहे १ हा देवराय त्यांना दारिद्र्याचा संसर्ग येऊ देत नाही त्यामुळे त्यांना संसारासंबंधी चिंता वाटण्याचे कारण नाही २ नेहमी धीर धरावा व चित्तात समाधान असावे नारायण आपल्या जवळच असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व जगास व्यापणारा हा पांडुरंग माझा सखा आहे ४

३९२० दसरा दिवाळी तोचि आम्हा सण । सखे संतजन[1] भेटतील ॥ १ ॥
आमुप जोडल्या सुखाचिया[2] राशी । पार या भाग्यासी न दिसे आतां ॥ २ ॥
धन्य दिवस आजि झाला सोनियाचा । पिकली हे वाचा रामनामें ॥ ३ ॥
तुका म्हणे काय होऊं उतराई । जीव ठेऊं पायीं संताचिये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आमुप-खूप, पुष्कळ, पार–सीमा, मर्यादा

अर्थ – ज्या दिवशी मला माझे संत सखेजन भेटतील तो दिवस दसरा दिवाळीसारख्या सणाचा वाटतो १ अशा प्रकारची भेट पुष्कळ सुखाच्या, पुण्याच्या राशी उभ्या केल्या की होत असते मग या भाग्याला सीमा उरत नाही २ आज हा दिवस मोठा धन्य झाला आहे सोन्याचाच दिवस जणु उजाडला आहे कारण संताच्या संगतीने वाणीतून रामनामाचे पीक भरघोसपणे पिकले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या संताचे उपकार कसे फेडू ? याचा उतराई कसा होऊ ? मी आपला जीव यांच्या पायावर ठेवला आहे ४

विवरण – साधुसंताची भेट झाली की तुकोबाना केवढा आनंद होतो हे या अभंगावरून दिसून येईल कोणत्याही लौकिकयशाची हाव मनात नसल्याने साधुसंताना पाहताच, ते घरी येताच त्यांना दिवाळी-दसरा सण आल्यासारखा आनंद होतो 'साधुसंत येती घरा । तोचि दिवाळी दसरा ' असे त्यांचे वचन आहे दिवाळी दसऱ्याच्या निमित्ताने, व्याही, आप्त, जावई इत्यादींच्या आगमनाने आनंद व्हायचा, पण संताना संतभेटीच्या आनंदात सणाचा सर्व गौरव लाभतो कारण या संताच्या भेटीत नामसंकीर्तनाचा, प्रेमभक्तीचा कल्लोळ निर्माण होऊन अलौकिक सुखाचा अनुभव येतो असा अद्वितीय अनुभव दसरा दिवाळीच्या मिष्टान्नात वा किंमतवान आभूषणात कुठून असणार ? म्हणून या संतश्रेष्ठांचे आगमन तुकोबासारख्या संतानाही दसरादिवाळीप्रमाणे वाटते एकनाथांनीही म्हटले आहे, 'धन्य दिवस जाहला। संत समुदाव भेटला । आज दिवाळी दसरा । संतपाय आले घरा ' तुकोबाना तर संतदर्शनाने, परमावधीचा आनंद होतो 'कोणा पुण्या फळ आले । आणि देखिलीं पाऊलें ' असे त्यांनी संतदर्शनानंतर म्हटले आहे ' भाग्याचा उदय । ते हे जोडी संतपाय ' असे त्यांनी म्हटले आहे ' धन्य आजि दिन । जालें संताचें दर्शन । जाली पापातापा तुटी । दैन्य गेले उठाउठी ' असा त्यांनी स्वानुभव मांडिलेला आहे आणखी एका ठिकाणी ते म्हणतात, 'धन्य आजि दिन संतदर्शनाचा । अनंत जन्माचा शीण गेला ' अनंत जन्माचा शीण घालविणारे संतदर्शन दसरा-दिवाळीचा आनंद देईल यात नवल काय ?

३९२१ खिस्तीचा उदीम[3] ब्राह्मण कलयुगीं । महारवाडीं मार्गी हिंडतसे ॥ १ ॥
वेधसाव करिता पर्वत मागासी । ते पै विटाळासी न मनिती[4] ॥ २ ॥
मार्गिणिशीं नित्य करितसे लेखा । तोंडावरि थुका पडतसे ॥ ३ ॥
आशा माया राडा नाव हें फाकर्दी । आठवीना कधीं नारायण ॥ ४ ॥
तुका म्हणे देह जाला पराधीन । पांडुरंगाविण गति नाहीं ॥ ५ ॥

---

१ हरिजन, २ पुण्याचिया, ३ उदीम उदिमांत हीण । करितो ब्राह्मण कलयुगीं, ४ मानिती

शब्दार्थ व टीपा :– खिस्तीचा–सावकारकीचा, उदीम–व्यापार इ० पर्वत–मांगाचे नाव, लेखा–व्यवहार.

अर्थ :– या कलियुगात ब्राह्मण लोक सावकारकीचा व व्यापाराचा धंदा करू लागले आहेत. त्यासाठी ते महारवाड्यात, मांगवाड्यातही हिंडतात. १ पर्वत्या नावाच्या मांगाबरोबर ते व्यवहार करतात; यात ते विटाळही मानीत नाहीत. २ नित्य ते मागिणीशी कागदोपत्री व्यवहार करतात, त्यावेळी त्यांच्या तोंडावर थुंकाही पडतो. ३ आशा, माया अशी मागिणी रांडाची नावे ते कागदावर लिहितात, पण त्याना नारायण मात्र कधी आठवत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात. अशा प्रकारे या ब्राह्मणांचे देह पराधीन झाले आहेत. त्याना आता पांडुरंगाविना कोणतीच गती नाही. ५

३९२२ अंगीं[1] ब्रह्मक्रिया खिस्तीचा व्यापार । हिंडे घरोघर[2] चांडाळाचे ॥ १ ॥
अंत्यजा खिचडी घेताती मागून । गाळियाप्रदान मायबहिणी ॥ २ ॥
उत्तमकुळीं जन्म क्रिया अमंगळ । बुडविलें कुळ उभयतां ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसी कलयुगाची चाली । स्वार्थे बुडविलीं आचरणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खिस्तीचा–सावकारकीचा, गाळिया–शिव्या.

अर्थ :– जन्माने ब्राह्मण असल्याने ब्रह्मक्रिया वगैरे कर्तव्यकर्म न करता ब्राह्मण लोक सावकारकीचा व व्यापाराचा उद्योग करण्यासाठी चांडाळांच्या घरीही हिंडू लागले आहेत. १ पोट भरण्यासाठी ते अंत्यजापासूनही खिचडी मागून घेतात व व्यवहाराच्या निमित्ताने आयाबहिणींना शिव्यागाळी देतात. २ त्याचा जन्म उत्तम कुळात झालेला असला तरी त्याची क्रिया मात्र अमंगळ असते. त्यामुळे त्यांनी आपल्या आईवडिलांची उभय कुळे बुडवलेली असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ही अशी कलियुगाची रीत आहे. स्वार्थामुळे त्याचे आचरणच बिघडलेले आहे. ४

विवरण–तुकोबाच्या काळी सामाजिक दैन्यावस्था कशी भयानक रीतीने झाली होती व तुकोबानी या संदर्भात कोणते महत्कार्य केले, यासंबंधीचे सामान्याने विवेचन दुसऱ्या खंडाच्या प्रास्ताविक निबंधात केलेले आहे वरील दोन अभंगात तुकारामबुवाचा रोख मुख्यत: ब्राह्मणवर्गासंबंधी आहे. तुकोबा स्वत शूद्र अथवा कुणबी आणि वृत्तीने वैश्य. पुढे वैराग्यधारणेमुळे व पूर्वसुकृतामुळे भगवताकडे चित्त वळून कवित्वाच्या मार्गाने ते आत्मज्ञान आबालवृद्ध जनतेसाठी प्रसवू लागले. त्याच्या कथाकीर्तनाना सर्व जातिजमातीचे लोक जमू लागले समकालीन ब्राह्मणानी या पाखंडी वर्तनाबद्दल पुष्कळच गवगवा केला. अब्राह्मणाना तुकोबानी वेदान्तवाणी अभंगातून प्रकट करावी हे सनातनी ब्राह्मणाना मानवले नाही. सहजच उभयताचे संबध थोडे नाजूकच बनले. तुकोबा आपल्या प्रखर वाणीने ढोंगाचा, दंभाचा, असत्याचा समाचार घेऊ लागले, तेव्हा त्यानी ब्राह्मणावरही आपले शब्दशस्त्र उगारले

परपरागत वर्णाश्रमधर्म व ब्राह्मणाचे माहात्म्य बुवाना किती मान्य होते, हा प्रश्न तूर्त बाजूला ठेवला तरी श्रीहरीच्या भक्तीमध्ये वर्णभेदास अथवा जातीभेदास थारा नसावा असे त्याना वाटे याच संदर्भात त्यानी खऱ्याखोट्या ब्राह्मणाची व त्याच्या आचारधर्मांचीही चर्चा केलेली आहे. ब्राह्मण हे सर्व वर्णात श्रेष्ठ ठरले ते त्याच्या ज्ञानोपासनेमुळे. परब्रह्माची अनुभूती ज्याना, ब्रह्म जाणून घेण्याची उत्सुकता ज्याना ते ब्राह्मण; त्यांनी आपला आचारधर्म पाळावा. आचरण शुद्ध ठेवावे. ज्ञानाची उपासना करावी परतु बुवांच्या काळी सर्व वर्णांच्या गुरुस्थानी असणारे ब्राह्मणच आपल्या स्थानापासून चळले. त्यानी आपले नित्यकर्म सोडले. हीन जातीना मार्ग दाखवून त्याना उन्नत करण्याचे सोडून ते स्वतःच हीन पायरीवर आले, आणि आचारभ्रष्ट होत राहिले. म्हणून तुकोबाना म्हणावे लागले, 'जातीचा ब्राह्मण न करिता संध्यास्नान । तो एक नावाचा ब्राह्मण । होय हीनाहूनी हीन ' उलट ज्याचे आचरण शुद्ध आहे, ज्याला रामकृष्णनामाची गोडी लागलेली आहे, त्यासंबंधी म्हणताना बुवा म्हणतात, 'ब्राह्मण तो याति

१ जगी, २ दारोदार.

अर्थ .– या ससारात नरदेहरूपाने वावरत असताना विठोबाचे पाय आठविणे हेच एक मोठे सुख आहे १ यामुळे सर्व ससार सुखाचा होईल आणि दु खाचा लवलेशही मग उरणार नाही २ जे कुणी याप्रमाणे विठ्ठलाचे नाम घेतील त्यांना हे सुख फार सुलभ आहे, असे खुद्द नारायणानेच आपल्या मुखाने सागितले आहे ३ कृपेचा सागर जो नारायण त्यानेच हा मार्ग सागितला आहे. तुम्हाला तो बरा का वाटत नाही ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, जे कुणी भोळे भाविक आहेत त्याना तारण्यासाठी या देवाने हा एक उपकारच करून ठेविला आहे ५

३९२९ चाले हे शरीर कोणाचिये सत्ते । कोण बोलविते हरीविण ॥ १ ॥
देखवी दाखवी[1] एक नारायण । तयाचें भजन चुकों नका ॥ २ ॥
मानसाची देव चालवी अहता । मीचि एक कर्ता म्हणोनिया[2] ॥ ३ ॥
वृक्षाचें ही पान हाले त्याची सत्ता । राहिली अहंता मग कोठें ॥ ४ ॥
तुका म्हणे विठो भरला सबाहीं । तया उणें काहीं चराचरीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अहता–अहकार, सबाहीं–अतर्बाह्यात

अर्थ – हे शरीर कुणाच्या सत्तेवर चालत आहे ? श्रीहरीशिवाय त्याला कोण बोलवीत आहे ? १ सर्वांना डोळयानी पाहविणारा व कानानी ऐकविणारा हा एक नारायणच आहे त्याचे भजन करण्यास तुम्ही कधी चुकू नका २ मनाचा अहकारही चालविणारा हाच देव आहे. म्हणून मीच एक कर्ता आहे असे अभिमानाने म्हणू नये ३ वृक्षाचे साधे पानही त्याच्याच सत्तेने हालत असते. असे असल्याने मग आपला अहकार तरी कुठे राहिला ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा विठोबा सर्व चराचर जगतात अतर्बाह्य भरून राहिलेला आहे त्याच्यावाचून कोणता पदार्थ राहिलेला दिसतो. ५

३९३० मायारूपें ऐसे मोहिलेंसे जन । भोगिती पतन नानाकर्मे ॥ १ ॥
काय याची[3] प्रीती करिता आदर । दुराविता दूर तेंचि भले ॥ २ ॥
नाना छंद अंगीं वसती विकार । छळियेले फार तपोनिधि ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे सिकवितो तुज । आतां धरी लाज मना पुढें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तपोनिधी–मोठे तप करणारे.

अर्थ – मायेच्या रूपाने सर्व लोक मोहित होऊन गेले आहेत. आणि नाना प्रकारची पापकर्मे करून पतनास जात आहेत १ अशा लोकाविषयी प्रीती या आदर दाखविणे योग्य काय ? त्याना दूर सारून आपणही दूर राहणेच चागले २ नाना प्रकारचे छद व विकार अगी वसत असल्यामुळे अनेक मोठ्या तपस्व्याचाही अतिशय छळ झालेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मना, अशा प्रकारे मी तुला शिकवीत आहे. आता तरी याविषयी लाज धरून वाग ४

३९३१ जेजे काहीं मज होईल वासना । तेते नारायणा व्हावे तुम्हीं ॥ १ ॥
काय भाव एक निवडूं निराळा । जाणसी तूं कळा अंतरींची ॥ २ ॥
तुजविण मज कोण आहे सखा । जें सांगों[4] आणिका जीवभाव ॥ ३ ॥
अवघें पिशुन जालें असे जन । आपपर कोण नाठवे हें ॥ ४ ॥
तुका म्हणे तूंचि जीवांचे जीवन । माझें समाधान तुझे हातीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .– अतरींची–अत करणाची, पिशुन–द्वाड, चहाडखोर

१ ऐकवी, २ म्हणो नये, ३ त्याची, ४ सांगा.

अर्थ :– नारायणा, आता मला जी जी वासना होत जाईल ती ती तुम्हीच व्हावे १ मी कोणता एक भाव निराळा असा निवडून काढू ? माझ्या अंतःकरणाच्या सर्व वृत्ती तू जाणणारा आहेस २ हृदयातील भावना ज्याला सांगाव्यात असा आणखी दुसरा सखा देवा, तुझ्यावाचून कोण आहे रे ? ३ सर्वच लोक द्वाड व चहाडखोर बनले आहेत यात आपले, दुसरे कोण हे ठरविता येत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, सर्वांच्या जीवाचे जीवन तूच आहेस त्यामुळे माझे समाधान तुझ्याच हाती आहे ५

३९३२ कैसी करूं आता सांग तुझी सेवा । शब्दज्ञाने देवा नाश केला ॥ १ ॥
आता तुझें वर्म न कळे अनंता । तुज न सगता[1] बुडूं[2] पाहें ॥ २ ॥
संध्या स्नान केली आचाराची नासी । काय तयापासीं म्हणती एक ॥ ३ ॥
बुडविली भक्ति म्हणती पाषाण । पिंडाचे पाळण स्थापुनियां ॥ ४ ॥
न करावी कथा म्हणती एकादशी । भजनाची नासी[3] मांडियेली ॥ ५ ॥
न जावे देउळा म्हणती देवघरीं । बुडविले या परी तुका म्हणे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पिंडाचे–देहाचे

अर्थ :– देवा, मी आता तुझी सेवा तरी कशी करू हे सांग कोरडे शब्दज्ञान सांगणाऱ्या वेदान्ती लोकांनी सारा नाश केला आहे १ अनंता, तू आता स्वतःच्या सेवेचे वर्म सांगितल्याशिवाय मला समजणार नाही आणि तू जर हे सांगणार नाहीस तर मग आमच्यावर संसारसागरात बुडण्याचा प्रसंग येईल २ स्नानसंध्यादी शुद्ध आचरणाचा या शब्दज्ञानी लोकांनी नाश केला स्नानसंध्या करण्यात काय आहे असे हे लोक विचारतात ३ या श्रीहरीस पाषाण म्हणून यांनी भक्ती बुडविली आणि देहाचे मात्र रक्षण केले ४ हे लोक असे म्हणतात की कुणी हरिकथा व एकादशी करू नये यांनी याच प्रकारे भजनाचाही नाश मांडला आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, 'हे शब्दज्ञानी म्हणतात, देव आपल्या घरी असल्यामुळे त्याच्या दर्शनासाठी देवळात जाण्याची जरूरी नाही.' याप्रमाणे यांनी भक्तिमार्ग बुडविला आहे ६

३९३३ नमोनमो तुज माझें हें कारण । काय जाले उणे करितां स्नान ॥ १ ॥
संतांचा मारग चालतों झाडूनि[4] । हो का लाभ हानि काहींतरि ॥ २ ॥
न करिसी तरि हेंचि कोडें मज । भक्ति गोड काज आणीक नाहीं ॥ ३ ॥
करीं सेवा कथा नाचेन रंगणीं । प्रेमसुखधणी पुरेल तों ॥ ४ ॥
महाद्वारीं सुख वैष्णवांचे मेळीं । वैकुंठ जवळी वसे तेथें ॥ ५ ॥
तुका म्हणे नाहीं मुक्तिसवें चाड । हेंचि जन्म गोड घेतां मज ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – कारण कार्य, कोडें–इच्छा, काज–कार्य, धणी–तृप्ती, चाड–इच्छा.

अर्थ – देवा, तुला नमन करणे हे माझे कार्य आहे स्नान केले असता उणेपणा कोणता येणार ? १ संतानी जो मार्ग घालून दिला आहे तोच मी झाडीत आहे, स्वच्छ करीत आहे त्यापासून लाभ होवो अथवा नुकसान होवो २ तू जर माझा स्वीकार केला नाहीस तर भक्तीच्या गोडीची एकच इच्छा मला आहे इतर कोणतेही कार्य माझ्या मनात नाही ३ देवा, मी तुझी सेवा करीन, तुझी गुणगाथा गाईन, तुझ्या पुढील रंगणात नाचेन व तुझे प्रेमसुख तृप्ती होईपर्यन्त घेईन ४ महाद्वारातील वैष्णवांच्या मेळाव्यात फार मोठे सुख आहे तेथे प्रत्यक्ष वैकुंठच येऊन स्थिरावलेले असते, जवळ असते ५ तुकाराम महाराज म्हणतात, मला मुक्तीची इच्छा मुळीच नाही तुझी सेवा करण्यासाठी वारंवार जन्म घेण्यातच मला गोडी वाटेल ६

१ सागता, २ बहु, ३ निशी, ४ साडूनि

३९३४ होऊनि संन्यासी भगवीं लुगडीं । वासना न सोडी विषयांची ॥ १ ॥
निंदिती कदान्न इच्छिती देवान्न । पाहाताती मान आदराचा ॥ २ ॥
तुका म्हणे ऐसें दांभिक भजन । तया जनार्दन भेटे केवीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– देवान्न–उत्तम अन्न, पक्वान्न.

अर्थ :– संन्यास घेऊन हे लोक भगवी वस्त्रे अंगावर घेतात, परंतु नाना विषयांची वासना त्यांच्या मनातून नष्ट झालेली नसते १ हे लोक कदान्नाची निंदा करून चांगल्या पक्वान्नाची मनातून इच्छा करतात. आणि आपला कुणी आदर वा मानसन्मान करतात की काय याची वाट पाहात असतात २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकांनी भजन जरी केले तरी ते दांभिकच असते त्यांना यामुळे जनार्दनाची भेट होणार तरी कशी ? ३

३९३५ लांबवूनि जटा नेसोनि कासोटा । अभिमान मोटा करिताती ॥ १ ॥
सर्वांगा करिती विभूतिलेपन । पाहाती मिष्टान्न भक्षावया ॥ २ ॥
तुका म्हणे त्यांचा नव्हे हा स्वधर्म । न कळतां वर्म मिथ्यावाद ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– मिथ्यावाद–खोटा वाद.

अर्थ – कित्येक गोसावी लांब लांब जटा वाढवतात आणि मोठ्या ऐटीने कासोटा घालून हिंडतात १ सर्वांगाला हे राख फासतात पण इच्छा मात्र पक्वान्न खाण्याची करतात २ तुकाराम महाराज म्हणतात, हा काही त्यांचा स्वधर्म नाही. पण त्यांना हे न समजल्यामुळे उगाच खोटा वाद करू लागतात ३

३९३६ कान फाडूनियां मुद्रा ते घालिती । नाथ म्हणविती जगामाजी ॥ १ ॥
घालोनियां फेरा मागती द्रव्यासी । परि शंकरासी नोळखती ॥ २ ॥
पोट भरावया शिकती उपाय । तुका म्हणे जाय नर्क लोका ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – नोळखती–ओळखत नाहीत

अर्थ :– हे कानफाटे लोक कान फाडून त्यात मुद्रा घालतात व आपण नाथपंथाचे आहोत असे ते जगात सांगतात. १ गावात हेलपाटे घालून हे लोकांकडून द्रव्य मागून घेतात, पण शंकराची ओळख यांना मुळीच नसते. २ तुकाराम महाराज म्हणतात, पोट भरण्याचे अनेक उपाय ते शिकतात, पण त्यायोगे शेवटी नरकासच जातात. ३

३९३७ कौडीकौडीसाटीं फोडिताती शिर । काढूनि रुधिर मलंग ते ॥ १ ॥
पांघरती चर्म लोहाची सांकळी । मारिती आरोळी धैर्यबळें ॥ २ ॥
तुका म्हणे त्यांचा नव्हेचि स्वधर्म । न कळेचि वर्म गोविंदाचें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – रुधिर–रक्त, मलंग–एक प्रकारचा फकीर, चर्म–कातडे

अर्थ :– हे मलंग कवडी कवडी मिळवण्यासाठी अनेक ठिकाणी डोके फोडून रक्त काढतात. १ अंगावर कातडे घेतात आणि गळयात लोखंडाची साखळी घालतात व मोठ्या धैर्याने आरोळी ठोकतात. २ तुकाराम महाराज म्हणतात, हा काही त्यांचा स्वधर्म नव्हे, परंतु त्यांना गोविंदाच्या प्राप्तीचे खरे मर्मच समजत नाही. ३

३९३८ दाढी डोई मुंडी मुंडूनियां सर्व । पावुरति बरवें वस्त्र काळें ॥ १ ॥
उफराटी काठी घेऊनियां हातीं । उपदेश देती सर्वत्रासी ॥ २ ॥
चाळवुनी राडा देउनियां भेप । तुका म्हणे त्यास यम दंडी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाळवुनी–फसवून, भेप–वेष.

अर्थ :– हे मानभाव लोक दाढी व डोके यांचे मुंडन करून अंगावर पांढरी वस्त्रे पांघरतात. १ हे लोक उलटी काठी हातात धरून सर्वांना उपदेश देत असतात २ तुकाराम महाराज म्हणतात, रांडापोरांना फसवून ते आपला वेष त्यांना देतात अशा लोकांना यम मोठाच दंड करील ३

३९३९ होउनी जंगम विभूती लाविती । शंख वाजविती घरोघरीं ॥ १ ॥
शिवाचें निर्माल्य तीर्था न सेविती । घंटा वाजविती पोटासाटीं ॥ २ ॥
तुका म्हणे त्यासी नाहीं शिवभक्ति । व्यापार करिती संसाराचा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – विभूति–राख

अर्थ – हे लोक जंगम होतात आणि सर्वांगाला राख फासतात व शंख वाजवीत घरोघरी हिंडतात १ हे कधी शिवाचे तीर्थ व निर्माल्य यांचे सेवन करीत नाहीत पण घरोघरी जाऊन पोटासाठी मात्र घंटा वाजवितात २ तुकाराम महाराज म्हणतात, यांना शिवभक्ती मुळीच माहीत नसते त्यांचा हा सर्व व्यापार संसारासाठी असतो ३

३९४० लावूनियां मुद्रा बांधोनियां कंठीं । हिंडे पोटासाटीं देशोदेशीं ॥ १ ॥
नेसोनि कोपीन शुभ्रवर्ण जाण । पहाती पक्वान्न क्षेत्रींचे तें ॥ २ ॥
तुका म्हणे ऐसे मावेचे मईंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोपीन–लंगोटी, मावेचे–मायेचे, मईद–ढोंगी, कपटी

अर्थ :– आणखी काही लोक मुद्रा लावून गळयात कंठी घालतात आणि देशोदेशी पोटासाठी हिंडत असतात १ पांढरी लंगोटी नेसून ते क्षेत्रातील पक्वान्नाची वाट पाहात असतात असे जाणावे २ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे मायेचे मंद ढोंगी व कपटी असतात, त्यांच्याजवळ गोविंद मुळीच नसतो ३

३९४१ ऐसे नाना भेप घेउनी हिंडती । पोटासाटीं घेती प्रतिग्रह ॥ १ ॥
परमार्थासी कोण त्यजी सवसार । सांगापां[1] साचार नांव त्याचें ॥ २ ॥
जन्मता संसार त्यजियेला शुकें । तोचि निष्कळंक तुका म्हणे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– भेप–वेष, प्रतिग्रह–दान, साचार–खरोखर

अर्थ – असे नाना प्रकारचे लोक नाना प्रकारचे वेष घेऊन हिंडत असतात; आणि पोटासाठी दान वगैरे घेत असतात १ खऱ्या परमार्थाच्या प्राप्तीसाठी संसार कुणी सोडलेला असतो ? जर कुणी सोडला असेल तर खरोखर त्याचे नाव मला सांगा ना २ तुकाराम महाराज म्हणतात, जन्मतः च शुकाने मात्र संसाराचा त्याग केला होता म्हणून तोच एक शुद्ध व कलंकरहित असा आहे ३

विवरण–संसाराच्या तापाने तापलेले तुकोबा वैराग्याकडे झुकले पूर्वपुण्याईच्या आधाराने त्यांना भगवद्भक्तीचा नाद लागला त्यांचे भजन व हरिचिंतन सुरू झाले कथाकीर्तनात व नामस्मरणात ते दंग होऊन गेले त्यांना सद्गुरूची कृपा लाभली पांडुरंगाचा साक्षात्कार झाला 'नित्य नवा दीस जागृतीचा' आल्याने एक नवीन ज्ञानदशेचा अनुभव त्यांना आला समाजापासून प्रथम फटकून निघालेले तुकोबा आता अधिकारप्राप्तीनंतर पुन समाजाकडे वळले 'तुका म्हणे आतां उरलों उपकारापुरता', 'आपण जेववुनि जेववी लोकां । संतर्पण करी तुका' अशी त्यांची भूमिका बनली स्वत च्या तृप्तीत त्यांचे समाधान नव्हते हे सुख सर्व समाजाला द्यावयाचे होते याच भूमिकेवरून त्यांनी समाजाच्या निरीक्षणास सुरुवात केली आणि त्यांना सारेच विपरीत दिसू लागले अनेकांचे संसार बायकामुले, पैसाअडका, धनदौलत आणि इंद्रियविषय यातच गुरफटून गेले होते त्यांना देवाची, धर्माची, परमार्थविचाराची शुद्ध नव्हती अहंकार, अरेरावी, दंभ, हिंसाचार, दांभिकता यांचा धुमाकूळ सुरू होता शुद्ध आत्मज्ञानाची कुणासच गरज नव्हती बाह्य कर्मकांडाला ऊत आला होता या सर्व परिस्थितीस जबाबदार म्हणून अनेक

१ सांग पां

ढोंगी साधुसताचे पीक अमाप आले होते. कुणी अगावर भगवी वस्त्रे चढवावीत, दाढीजटा वाढवाव्यात, मुद्रा लावाव्यात, भिक्षेकऱ्याचा वेष घ्यावा व धातुरमातुर करून गरीब, भोळयाभाबडया जनतेस नाडणारे हे गोसावी आणि भोदू साधुसत तुकोबाना जागजागी दिसत होते

या सर्वांवर बुवानी कडक टीकेचे प्रहार केले आहेत. दंभ, ढोंग, फसवेगिरी, अनाचार याचा तुकोबाना फार वीट येई. प्रसगी ते चिडतही काही अपशब्द वापरून ते त्याची टवाळी करीत. धर्म, ईश्वर, आत्मज्ञान याचा खरा व शुद्ध मार्ग सोडून लोक भलत्याच फदात सापडतात हे पाहून त्याचे अत.करण कळवळून जाई. त्याना हे बाह्य कर्मकाड, नवससायास, जारणमारण आणि पोट भरण्यासाठी चाललेला धदा मान्य नव्हता. असा धदा करणारे मानभावी होते, नाथपथी होते, लिंगायत होते, गोसावी होते, मुसलमानी मलग होते. बुवानी कुणाचीही भीडमाड न ठेवता प्रत्येकास फटकारले आहे. नाथपथीय लोक खरे म्हणजे शकराचे उपासक, योगमार्गात प्रवीण. मत्स्येंद्र-गोरखनाथापासूनची त्याची श्रेष्ठ परपरा. भागवत सप्रदायाचे सघटक ज्ञानदेव याच पथातील. पण पथाचे श्रेष्ठ प्रवर्तक बाजूला राहतात आणि लुंग्यासुंग्याची चलती होते. त्याना ना धड परमार्थ, ना धड प्रपंच माहीत असतो कानफाटे पथाचा प्रवर्तक धर्मनाथ हा श्रेष्ठही असेल, पण या पथाची पुढे फार अधोगती झाली. वासनानी बरबटलेले ढोंगी लोक सर्वच पथात शिरतात आणि मग लोकाची सर्व दृष्टींनी लूटमार सुरू होते शकराचार्यांपासून चालत आलेला संन्यासधर्म केवढा श्रेष्ठ ! पण त्यातही अगावर केवळ भगवे वस्त्र घालून धुमाकूळ घालणारे पुष्कळच निघाले. भगव्या वस्त्राने काय होणार ? तुकोबानी म्हटले आहे, कुत्र्याचाही रग भगवाच असतो की, दाढी-जटा वाढवून उपयोग काय? गुहेत राहून काय साधणार ? उदीर जमिनीच्या पोटात बीळ करूनच राहतात की, नुसत्या बाह्य वेषावर व कर्मकाडावर काही नाही. अत.करण शुद्ध पाहिजे. महानुभाव पथाचे सस्थापक श्रीचक्रधर याचा वैराग्यावर फार मोठा भर असे. आचारधर्माला त्यानी फारच महत्त्व दिले होते पण याही पथात पुढे सामान्य, स्वार्थी लोक शिरले आणि अनाचाराचा मार्ग वळावला कुठल्याही पथाची अधोगती ही अशीच होत असते. मग तुकोबासारखे कडक वृत्तीचे धर्मसुधारक मागील सतानी सागितलेला मार्ग स्वच्छ करण्यासाठी पुढे येतात, 'झाडूं संताचे मारग । आडरानीं भरलें जग ' अशी त्याची भूमिका असते. नाना कुतर्कांनी, वेडगळ समजुतीनी, दभांनी, ढोंगांनी जग आडरानात शिरलेले असते. त्याला सुधारण्याचे कार्य करायचे म्हणजे हे काटेकुटे दूर करायला हवेत. भोळ्याभाबड्या आयाबायाना व प्रपचात फसलेल्या पुरषाना भलत्या मार्गास नेणाऱ्या ढोंगी व मतलबी लोकाचा बदोबस्त तुकोबासारख्या लोकाना करावा लागतो. शब्दरूपी शस्त्राने लोकाना धाक दाखवावा लागतो. तुकोबाना आत्म-साक्षात्काराचे तेज प्राप्त झालेले असल्यामुळे त्याच्या या प्रखर टीकेचा प्रभाव पडल्याखेरीज कसा राहील?

३९४२ स्त्रिया पुत्र कळत्र हें तंव मायावंत । शेवटीचा अंत नाहीं कोणी ।। १ ।।
यमाचिये हातीं बांधोनियां देती । भूषणें ही घेती काढूनियां ।। २ ।।
ऐसिया चोरांचा कैसा हा विश्वास । धरिलो तुझी कास तुका[1] म्हणे ।। ३ ।।

शब्दार्थ व टीपा :– कळत्र–कुटुंब, कुटुंबीय

अर्थ :– स्त्रिया, पुत्र व इतर कुटुंबीय हे आपले कोणी नव्हेत. हे सर्व मायिक आहेत. शेवटी अंतसमयी कुणीही उपयोगी येणार नाही १ उलट हे लोक आपणास यमाच्या हातात बाधून देतात आणि अंगावरची वस्त्रे-भूषणे काढून घेतात. २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या चोरांचा कसा विश्वास धरावा ? म्हणून देवा, मी तुझी कास धरली आहे. ३

३९४३ न लगती मज शब्दब्रह्मज्ञान । तुझिया दर्शनावांचूनियां ।। १ ।।
म्हणऊनि तुझें करितों चिंतन । नावडे वचन आणिकाचें ।। २ ।।
काय ते महत्वीं करावी मान्यता । तुज न देखतां पांडुरंगा ।। ३ ।।
तुका म्हणे तुज विघल्यावांचूनि[2] । न राहे त्याहूनि होइन वेडा ।। ४ ।।

१ पाडुरगा, २ भेटल्या.

शब्दार्थ व टीपा :- नावडे-आवडत नाही.

अर्थ – देवा, तुझ्या दर्शनावाचून होणारे शाब्दिक ब्रह्मज्ञान नको आहे १ म्हणून मी तुझे चिंतन करीत आहे मला इतर कुणाचेही बोलणे ऐकू येत नाही. २ पांडुरंगा, तुझ्याकडे न पाहाता जगतामध्ये मानमान्यता व महत्त्व मिळत असेल तर त्याचा काय उपयोग ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुला भेटल्याखेरीज मी राहाणार नाही. नाही तर मी वेडाच होईन ४

३९४४ तुझा म्हणोनियां दिसतो गा दीन । हाचि अभिमान सरे तुझा ॥ १ ॥
अज्ञान बाळका कोपली जननी । तयासी निर्वाणीं कोण पावे ॥ २ ॥
तैसा विठो तुजविण परदेशी । नको या दु खार्ती गोऊं मज ॥ ३ ॥
तुका म्हणे मज सर्व तुझी आशा । अगा जगदीशा पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- सरें-सपतो, कोपली-रागावली, निर्वाणीं-सकटाच्या समयी, गोऊ-गुतवू.

अर्थ – देवा, मी तुझा असूनही उदास दिसत आहे यात तुझा अभिमान सपतो १ अज्ञान बालकावर त्याची आई रागावली तर या सकटाच्या प्रसगी त्याच्या मदतीस कोण धाऊन येणार ? २ विठोबा, त्याचप्रमाणे तुझ्याशिवाय मी परदेशी झालो आहे. मला या दु खात तू आता गुतवू नकोस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अगा जगदीशा, पाडुरगा, मला सर्व आशा तुझीच आहे ४

३९४५ जन्म मृत्यु फार जाले माझ्या जीवा । ऐक माझा धावा पांडुरंगा ॥ १ ॥
सिणलो बहुत करितां येरझारा । रखुमाईच्या वरा पावे वेगीं ॥ २ ॥
तुका म्हणे तू गा पतितपावन । घेईं माझा सींण जन्मांतर ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- सिणलों-कष्टी झालो, वरा-पती

अर्थ :- पाडुरगा, माझ्या जीवाने जन्ममृत्यूचे फेरे फार सोसले रे यासाठी तू माझा धावा ऐकून तरी घे. १ या येरझाऱ्या करताना मी फारच शिणून गेलो रखुमाईच्या पती, तू आता मला त्वरेने पाव २ तुकाराम महाराज म्हणतात, अरे पतिताला पावन करणाऱ्या देवा, अनेक जन्मात होणारे माझे दुःख तू निवारण कर. ३

३९४६ आतां माझ्या दु खा कोण हो सांगाती । रखुमाईचा पति पावेचि ना ॥ १ ॥
काय विधात्यानें घातलीसे रेखा । सुटका या दुःखा न होयचि ॥ २ ॥
तुका म्हणे माझी विसरूं नको चिंता । अगा पंढरिनाथा पाव वेगीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – सागाती-सोबती, विधात्यानें-ब्रह्मदेवाने, रेखा-लेख, अक्षरे, वेगी-त्वरेने, सत्वर

अर्थ :- हा रखुमाईचा पती श्रीविठ्ठल मला पावत नाही. आता माझ्या दु खाच्या प्रसगी मला कोण सोबती आहे ? १ या ब्रह्मदेवाने माझ्या कपाळावर असा काय लेख लिहिला आहे की माझी या दुःखातून सुटकाच होऊ नये. २ तुकाराम महाराज म्हणतात, माझी चिंता करण्याचे देवा, आता विसरू नका. अगा पढरीनाथा, तू मला सत्वर पाव. ३

३९४७ पंढरीसी जावे ऐसे माझे मनीं । विठाई जननी भेटे केव्हां ॥ १ ॥
न लगे त्याविण सुखाचा सोहळा । लागे मज ज्वाळा अग्निचिया ॥ २ ॥
तुका म्हणे त्याचे पाहिलिया पाय । मग दु ख जाय सर्व माझें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- न लागे-लागत नाही

अर्थ :- पंढरीस जावें असे माझ्या मनात फार आले आहे विठाई माऊली मला कधी भेटेल असेहोऊन गेले आहे १ तिच्या भेटीशिवाय मला सुखाच्या सोहळ्याची प्राप्ती होणार नाही. तिच्याशिवाय माझ्या सर्वांगास जणु अग्नीच्या ज्वाळा लागलेल्या आहेत २ तुकाराम महाराज म्हणतात, त्या देवाचे एकदा पाय पाहिल्याबरोबर माझे सर्व दुःख नाहीसे होईल. ३

३९४८ तन मन धन दिलें पंढरिराया । आतां सांगावया उरलें नाहीं ॥ १ ॥
अर्थचाड चिंता नाहीं मनीं आशा । तोडियेला फांसा उपाधीचा ॥ २ ॥
तुका म्हणे एक विठोबाचें नाम । आहे जवळी दाम नाहीं रुका ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- अर्थचाड-धनाची इच्छा, दाम-पैसा, रुका-दिडकी

अर्थ :- मी माझे तनमनधन पंढरीरायास देऊन टाकले आहे आता माझे असे सांगावयासही काही उरलेले नाही १ मला आता धनाविषयी चिंता नाही इतर कोणतीही आशा माझ्या मनात नाही मी सर्व उपाधींचा पाश तोडून टाकलेला आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्याजवळ फक्त या एका विठोबाचे नाम आहे त्याखेरीज एक दमडीसुद्धा जवळ नाही ३

३९४९ आलिया संसारा उठा वेग करा । शरण जा उदारा पांडुरंगा ॥ १ ॥
देह हे देवाचें[1] धन कुबेराचें । तेथें मनुष्याचें काय आहे ॥ २ ॥
देता देवविता नेता नेवविता । येथें याची सत्ता काय आहे ॥ ३ ॥
निमित्याचा धनी केला असे प्राणी[2] । माझेंमाझें म्हणोनि व्यर्थ गेला ॥ ४ ॥
तुका म्हणे कां रे नाशवंतासाटीं । देवासवें आटी पाडितोसी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा - वेग-त्वरा, लगबग, आटी-खटपट, श्रम

अर्थ :- संसारास लागलेले लोकहो, उठा, त्वरा करा आणि या उदार अशा पांडुरंगास शरण जा १ हा आपला देह, हे देवाचे देणे आहे. आणि धन कुबेराचे आहे अशा स्थितीत माणसाचे काय आहे ? २ देणारा व देववणारा, नेणारा व नेववणारा देवच असल्यामुळे या ठिकाणी मनुष्याची सत्ता काय आहे ? ३ मनुष्यप्राणी हा एक निमित्ताचा मालक केलेला आहे परंतु हे न समजून तो माझे माझे करून वायाच गेला आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, अरे या सर्व नाशवंतासाठी देव सोडून व्यर्थ श्रम का करतोस ? ५

३९५० माय वर्णी धाल्या धाये । गर्भ आतवणे न पाहे ॥ १ ॥
तैसे पूजितां वैष्णव । सुखें संतोषतो देव ॥ २ ॥
पुत्राच्या विजयें । पिता सुखातें जाये ॥ ३ ॥
तुका म्हणे अमृतसिद्धि । हरे क्षुधा आणि व्याधि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - धाल्या-स्तुती केली की, धाये-संतुष्ट होते, क्षुधा-भूक

अर्थ :- गर्भवती स्त्रीची स्तुती केली की पुरे, ती संतुष्ट होते स्तुतीसाठी गर्भस्थ जीवाला स्वतंत्र बोलवावे लागत नाही. १ त्याप्रमाणे वैष्णवाची पूजा केली असता देव सुखाने संतोष पावतो २ पुत्रास विजय मिळाला की पित्यासही सौख्य वाटते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अमृताच्या सेवनाने भूक आणि रोग यांचा नाश होतो ४

१ काळाचे, २ प्राणी

३९५१ तुझें[1] अंगभूत । आम्ही जाणतों समस्त ॥ १ ॥
येरा वाटतसे जना । गुढारसें नारायणा ॥ २ ॥
ठावा थारा मारा । घरचिया[2] संव चोरा ॥ ३ ॥
तुका म्हणे भेदा[3] । करुनि करितों संवादा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– येरा–इतराना, थारा मारा–ठावठिकाण, संव–सवय.

*अर्थ :– देवा, सर्व काही तुझे अंगभूतच आहे हे मी नीट जाणतो. १ नारायणा, इतर लोकांना मात्र हे* फारच गूढ वाटते. २ सतत घरची सवय असणाऱ्या चोराला घरातील सर्व ठावठिकाणा माहीत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व प्रकारच्या भेदांचा अभेद करून मी आत्मज्ञानविषयक संवाद करीत आहे. ४

३९५२ तुज दिला देह । आजूनि वागवितों भय ॥ १ ॥
ऐसा विश्वासघातकी । घडली कळतां हे चुकी ॥ २ ॥
बोलतों जें तोंडें । नाहीं अनुभवलें लंडें ॥ ३ ॥
दंड साहे केला । तुका म्हणे जी विठ्ठला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लंडें–दांडग्याने.

अर्थ :– देवा, मी तुला माझा देह समर्पण केला आहे. पण अजूनही यासंबंधी मी मनात भय बाळगून आहे. १ मी असा विश्वासघातकी असल्याची ही चूक मला कळत असून घडली आहे. २ तोंडाने जे बोलत आहे त्याचा मी दांडग्याने अनुभवही घेतलेला नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो विठ्ठला, यासाठी तुम्ही मला दंड केला पाहिजे. ४

३९५३ माते[4] लेकरांत भिन्न । नाहीं उत्तरांचा सीण ॥ १ ॥
धाडींधाडीं वो भातुकें । रंजविल्याचें कौतुकें ॥ २ ॥
करुनि नवल । याचे बोलिलों ते बोल ॥ ३ ॥
तुका म्हणे माते । पांडुरंगे कृपावंते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– भातुकें–प्रेमाचा खाऊ

अर्थ – आईजवळ लेकराने भिन्न प्रकारचे जरी उत्तर दिले तरी तिला त्याचा कधी शीण वाटत नाही. १ उलट लेकराने आईलाच आपल्या बोबड्या बोलांनी रंजविलेले असते यासाठी माते, तू प्रेमाचा खाऊ पाठीव. २ यासंबंधीच मी नवल करून बोललो आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, माते, पांडुरंगे, तू कृपावंत आहेस. ४

३९५४ जरि न भरे पोट । तरि सेवूं दरकूट ॥ १ ॥
परि न घलूं तुज भार । हाचि आमुचा निर्धार ॥ २ ॥
तुझें नाम अमोलिक[5] । नेणती हे ब्रह्मादिक ॥ ३ ॥
ऐसें नाम तुझें खरें । तुका म्हणे माझे पुरें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दरकूट–डोंगरदरी.

---

१ तुझी अंगभूतें, २ परचिया, ३ भेदाभेद । करुनि करितसे वाद ॥ ४ माल, ५ अलोलिक.

अर्थ – देवा, आमचे जर पोट भरले नाही तर आम्ही डोंगरदरीत शिरून कसे तरी दिवस काढू १ परंतु तुझ्यावर आता भार घालणार नाही हा आता आमचा निश्चय झाला आहे २ तुझे नाम हे अमोल असून त्याची किंमत ब्रह्मादिकानाही माहीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे तुझे नाम खरे असल्याचे पुणपणे समजून येते ४

३९५५ सर्वस्वाची साटी । तरिच देवासवे गाठी ॥ १ ॥
नाहीं तरी जया तैसा । भोग भोगवील इच्छा ॥ २ ॥
द्यावे ते चि घ्यावे । म्हणउनि जीवे जावे ॥ ३ ॥
तुका म्हणे उरी । मागें नुरविता बरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाठी–भेट, उरी–उणीव, कमतरता

अर्थ .– श्रीहरीला सर्वस्व अर्पण केले तरच देवाची भेट होणार आहे १ नाहीतर ज्याला जशी इच्छा तसा त्याला भोग भोगावा लागेल २ जसे आपण द्यावे तसेच आपणास मिळते म्हणून श्रीहरीला जीव समर्पण करावा ३ तुकाराम महाराज म्हणतात मागाहून काही उणीव न ठेवणे बरे ४

३९५६ सुख पंढरीसी आले । पुंडलिके साटविले ॥ १ ॥
आता धावा माझे बाप । जिव्हा घेउनिया माप ॥ २ ॥
करा एक खेप । मग न लगे हिंडावे ॥ ३ ॥
विषय[1] गुंडूनि पसारा । धाव घ्या रे पंढरपुरा ॥ ४ ॥
आयुष्य वेचे जव आहे । तोंचि धावोनिया जायें ॥ ५ ॥
आळस न करी या लाभाचा । तुका विनयी कुणबियाचा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मागील अभंगक्र ३७५२ पाहावा

३९५७ गाढव शृंगारिले कोडें । काहीं केल्या नव्हे घोडें ॥ १ ॥
त्याचे भुंकणे न राहे । स्वभावासी करील काये ॥ २ ॥
श्वान शिबिके बैसविले । भुकतां न राहे उगले ॥ ३ ॥
तुका म्हणे स्वभावकर्म । काहीं केल्या न सुटे धर्म ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोडें–कौतुकान, श्वान–कुत्रे, शिबिके–पालखीत, उगले–स्वस्थ

अर्थ – गाढवाला कौतुकाने कितीही शृंगारले तरी काही केल्या त्याचे घोडे होणार नाही १ त्याचे ओरडणे काही थांबत नाही मूळच्या स्वभावास कोण काय करणार ? २ कुत्र्यास सजवून पालखीत जरी बसवले तरी ते न भुकता स्वस्थ बसत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, स्वभावधर्म हा काही केल्या कुणास सुटत नाही ४

३९५८ सेकीं हे ना तेसे जाले । बोलणें तितके वाया गेले ॥ १ ॥
म्वयें[2] आपणचि रिता । रडे पुढिलाच्या हिता ॥ २ ॥
सुखसागरीं नेघे वस्ती । अगीं ज्ञानपणाची मस्ती ॥ ३ ॥
तुका म्हणे गाढव लेखा । जेथें भेटेल तेथें ठोका ॥ ४ ॥

---

१ विभव, २ सेकी

शब्दार्थ व टीपा :- सेकीं-शेवटी, रिता-रिकामा, अनुभवशून्य.

अर्थ :- शेवटी याचे बोलणे नाही असे झाले. याचे सर्व बोलणे वायाच गेले. १ याला स्वत लाघ काही अनुभव नाही आणि हा पुढील श्रोत्याच्या हितासाठी व्यर्थ रडत असतो. २ श्रीहरीच्या प्रेमसुखाच्या सागरात हा कधी वसतीस नसतो याच्या अंगी ज्ञानाच्या अहंकाराची मस्ती असते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा मनुष्य गाढव समजून जिथे दिसेल तिथे त्याला मार द्यावा. ४

३९५९ आवडे सकळां मिष्टान्न । रोग्या विषा त्यासमान ॥ १ ॥
दर्पण नावडे तया एका । ठाव नाहीं ज्याच्या नाका ॥ २ ॥
तुका म्हणे तैशा खळा । उपदेशाचा कांटाळा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- दर्पण-आरसा, ठाव-ठिकाण, खळा-दुष्टास.

अर्थ :- सर्व लोकांना गोड पक्वान्न आवडते. रोगी माणसास मात्र ते विषाप्रमाणे लागते. १ ज्याच्या नाकालाच ठावठिकाणा नसतो त्याला आरसा कधीच आवडत नाही. २ तुकाराम महाराज म्हणतात, त्याचप्रमाणे दुष्ट माणसास उपदेशाचा कटाळा असतो. ३

३९६० अखंड संत निंदी । ऐसी दुर्जनाची बुद्धि ॥ १ ॥
काय म्हणावें तयासी । तो केवळ पापराशि ॥ २ ॥
जो स्मरे रामराम[1] । तयासी म्हणावे रिकामें ॥ ३ ॥
जो तीर्थव्रत करी । तयासी म्हणावे भिकारी ॥ ४ ॥
तुका म्हणे विंचवाची[2] नांगी । तैसा दुर्जन सर्वांगीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा - अखड-सतत

अर्थ - संताची सतत निंदाच करावी अशी दुर्जनाची बुद्धी असते १ त्याला म्हणावे तरी काय ? तो केवळ पापाची रासच असतो २ जो रामनामाचे स्मरण करतो त्याला दुर्जन रिकामटेकडा म्हणतो. ३ जो तीर्थयात्रा करीत भटकतो त्याला तो भिकारी म्हणत असतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, विंचवाच्या नांगी-प्रमाणे दुर्जन सर्वांगाने विपरीतच असतो ५

३९६१ या रे नाचों अवघेजण[3] । भावे प्रेमें परिपूर्ण ॥ १ ॥
गाऊं पंढरीचा राणा । क्षेम देउनि संतजना ॥ २ ॥
सुख[4] साधु सुखासाठीं । नाम हरिनाम बोभाटीं ॥ ३ ॥
प्रेमा वांटितो उदार । देता नाहीं सानाथोर ॥ ४ ॥
पापें पळालीं बापुडीं । काळ झाला देशधडी ॥ ५ ॥
तुका म्हणे धन्य काळ । आजि प्रेमाचा सुकाळ ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- क्षेम-आलिंगन, बोभाटीं-गर्जनेने.

अर्थ :- या रे सारेजण आपण प्रेमाने व आनंदाने नृत्य करू या. १ या पंढरीच्या राण्यास मनोभावे गाऊ आणि संताना प्रेमाने आलिंगन देऊ २ हरिनामाची गर्जना केल्याने फुकासाठी सुख प्राप्त होते. ३ हा श्रीहरी मोठा उदार असून लहान थोर न पाहाता सर्वांना प्रेम वाटीत असतो. ४ याच्या योगाने बिचारी पातके पळून गेली

१ रामनामा । त्यासी म्हणतो रिकामा, २ विंचा नांगी, ३ आवघे जन । भाव आनंदें भरून ॥ ४ सुख फुका-साटी । साधे हरिनाम बोभाटी

आणि कळिकाळ देशोधडीस गेला. ५ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या प्रेमाचा सुकाळ झाल्यामुळे हा काळ धन्य झाला आहे. ६

३९६२ उपजलो[1] मनीं । हे तों स्वामीची करणी ॥ १ ॥
होइल प्रसादाचे[2] दान । तरि हे कवतुक पाहेन ॥ २ ॥
येइल अभय जरि । तरि हे आज्ञा वंदिन शिरीं ॥ ३ ॥
भक्तिप्रयोजना । प्रयोजावे बंदिजना ॥ ४ ॥
यश स्वामिचिये शिरी । दास्य करावे किंकरीं ॥ ५ ॥
तुका म्हणे आळीकरा । त्यासी योजावे उत्तरा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- प्रयोजावे-योजना करावी, किंकरीं-सेवकानी, आळीकरा-हट्ट करणाऱ्यास.

अर्थ - मनात जाणीव निर्माण झाली हे माझ्या स्वामीचे कृत्य आहे. १ हा स्वामी मला प्रसादाचे दान करील आणि मी ते कौतुकाने पाहीन. २ मला जर अभय मिळेल तर मी श्रीहरीची आज्ञा शिरसावंद्य करीन ३ आम्हा बंदिजनाच्या ठिकाणी या भक्तीच्या फळाची योजना करावी. ४ यश देण्याचे स्वामीच्या शिरावर आहे आम्ही सेवकानी मात्र त्याचे दास्य करावे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही हट्ट करणारी मुले आहोत आमच्यासाठी योग्य शब्दात तुम्ही उत्तर द्यावे ६

३९६३ माझें मन पाहे कसून । चित्त[3] न ढळे तुजपासून ॥ १ ॥
कापुनि[4] देइन शिर । पाहा कृपण कीं उदार ॥ २ ॥
मजवरि घालीं घण । परि मी न सोडीं चरण ॥ ३ ॥
तुका म्हणे अंतीं । तुजवाचूनि नाहीं गति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- घण-आघात, अंतीं-शेवटी

अर्थ - देवा, माझ्या मनाची परीक्षा तुम्ही कसून करा तुमच्यापासून माझे चित्त थोडेही ढळणार नाही १ वेळ पडल्यास मी माझे मान कापून देईन मग मी कृपण की उदार हे तुम्ही ठरवा २ माझ्यावर मोठमोठ्या हातोड्यांचे आघात जरी केले तरी मी तुमचे चरण सोडणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, शेवटी तुझ्यावाचून आम्हाला गती नाही रे. ४

३९६४ भूमीवरि कोण ऐसा । गांजूं शके हरिच्या दासा ॥ १ ॥
सुखें नाचा[5] हो कीर्तनीं । जयजयकारें गर्जा वाणी ॥ २ ॥
काळा सुटे पळ । जातो दुरितें सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्तीं । साच[6] माना हे निश्चिती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- दुरितें-पातके, साच-खरे

अर्थ :- श्रीहरीच्या दासाना त्रास होईल असा या भूमीवर कोण आहे ? १ यासाठी लोकहो, तुम्ही सुखाने हरिकीर्तनात नाचा आणि वाणीने त्याचा जयजयकार करा २ यामुळे काळ भीतीने पळत सुटतो आणि सर्व पातके नाहीशी होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे सर्व तुम्ही तुमच्या चित्तात खरे माना ४

३९६५ जातीचा ब्राह्मण । न करितां संध्यास्नान ॥ १ ॥
तो एक नांवाचा ब्राह्मण । होय हीनाहूनि हीन ॥ २ ॥

१ उनजले, २ प्रेमाचें, ३ परि चित्त, ४ तुज कापुनि, ५ नाचाव, ६ साचू मानाची हे निति.

सांडुनियां शाळिग्राम । नित्य वेश्येचा समागम ॥ ३ ॥
नेघे संतांचें जो तीर्थ । अखंड वेश्येचा[1] जो आर्थ ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसे पापी । पाहूं नका पुनरपि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– नेघे–घेत नाही, आर्थ–आर्त, इच्छा करणारा.

अर्थ :– जातीचा ब्राह्मण असून जो स्नान-संध्या कधीच करीत नाही, १ तो नुसता नावाचा ब्राह्मण असून हीनापेक्षाही हीन आहे असे समजावे. २ शाळिग्रामाची पूजा सोडून हा नित्य वेश्येशी समागम करीत असतो. ३ हा संताच्या पायाचे तीर्थ कधीच घेत नाही. पण वेश्येच्या सहवासाची इच्छा मात्र याला अखंडपणे असते ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या पापी लोकाचे तोंड पुनः कधी पाहू नका ५

३९६६ जाला[2] जीवासी उदार । त्यासी काय भीडभार ॥ १ ॥
करीन आडक्या घोगडें । उभें बाजारी उघडें[3] ॥ २ ॥
जोंजों धरिली भीड । तोंतों बहु केली चीड ॥ ३ ॥
तुका म्हणे मूळ । तुझें उच्चारीन कुळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– भीडभार–भीडेचे ओझे, आडक्या–पैशाच्या किंमतीचे.

अर्थ – देवा, जो आपल्या जीवावर उदार झाला आहे त्याला दुसऱ्याच्या भीडेचे ओझे कसले आहे ? १ मी सर त्याला भर बाजारात गाठून त्याला उघडे करून त्याचे घोगडे एका पैशाच्या किंमतीचे करून टाकीन २ जो जो मी भीड धरली तो तो लोक मला जास्तच चिडवतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी तुझ्या कुळाचा मुळासकट नामोच्चार करीन ४

३९६७ आम्हां[4] हेंचि काम । वाचे गाऊं तुझें नाम ॥ १ ॥
आयुष्य मोलाची हे घडी । धरूं पायांची आवडी ॥ २ ॥
अमृताची खाणी । याचे ठायीं वेचूं वाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे पांडुरंगा । माझ्या जिवाच्या[5] जिवलगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घडी–वेळ, वेचूं– खर्च करू.

अर्थ :– देवा, तुझे नाम वाचेने गाणे हेच आम्हास आता एक महत्त्वाचे काम झाले आहे १ आयुष्यातील अति मोलाची ही वेळ असल्याने तुझ्या पायाविषयी आवड मनात धारण करू. २ अमृताची खाणच असलेली आमची वाणी या श्रीहरीच्या नामसंकीर्तनात खर्च करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तू माझ्या जीवाचा जिवलग आहेस ४

३९६८ मिळे हरिदासांची दाटी । रोग न होय शेवटीं ॥ १ ॥
तेथें स्या काय करावें । माझें कोणें आइकावें ॥ २ ॥
कैसे तुज लाजवावें । भक्त म्हणोनियां भावें ॥ ३ ॥
नाचतां नये ताळीं । मज[6] वाजविता टाळी ॥ ४ ॥
क्षिति[7] मंडित भुषणे । शरीर माझें दैन्य वाणें ॥ ५ ॥
तुका म्हणे कमळापति । मज न द्यावे त्या हातीं ॥ ६ ॥

१ वेश्या जोडे अर्थ, २ जालो, ३ रोकडें, ४ आता आम्हा, ५ जीविच्या, ६ वाजविता नये टाळी, ७ मती माडिती भुषणें भूषणे

शब्दार्थ व टीपा – रीग–प्रवेश, ताळीं–तालात

अर्थ – देवा, तुझ्या भोवती या हरिदासाची दाटी झाली आहे. म्हणून अखेरीस माझा या ठिकाणी प्रवेश होत नाही १ आता या ठिकाणी मी करावे तरी काय ? येथे माझे कोण ऐकतोय ? २ मी तुझा भाववान भक्त आहे म्हणून तुला लाजवावे तरी कसे ? ३ मला भजनाच्या वेळेस नीट तालात नाचता येत नाही. हातानी नीट टाळीही वाजविता येत नाही ४ त्या हरिदासाचे अंग नाना प्रकारच्या भूषणानी मंडित आहे आणि माझे शरीर तर दैन्यवाणे आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, श्यमळापती, तुम्ही मला अशा लोकाच्या स्वाधीन करू नये ६

३९६९ जाणों नेणों काय । चित्तीं धरूं तुझे पाय ॥ १ ॥
आता हेचि वर्म[1] । गाऊं धरूनिया प्रेम ॥ २ ॥
काय सांडूं मांडूं । भावे हृदयींच कोंडूं ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । जन्मोजन्मीं मागें सेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सांडू–सोडून देऊ, मांडू–मंडन करू स्वीकारू

अर्थ – देवा, मी काय जाणावे ? मला काहीच उलगडा होत नाही, म्हणून मी तुझे पाय चित्तात धारण करीन १ तुझे पाय चित्तात धरणे आणि तुझ्या प्रेमाचे गायन करणे हेच एक वर्म आहे २ मी आता काय सोडून देऊ ? कशाचे करू ? मी भावार्थाने फक्त तुला हृदयात कोंडून ठेवीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मी जन्मोजन्मी तुझीच सेवा घडावी असे मागणे मागत आहे ४

३९७० जाळें घातलें सागरीं । बिंदु न राहे भीतरीं[2] ॥ १ ॥
तैसें पापियाचें मन । तया नावडे कीर्तन ॥ २ ॥
गाढव गंगेसी न्हाणिलें । जाउनि उकरडयावरि लोळे ॥ ३ ॥
प्रीती पोसिलें कावळें । जाउनि विष्ठेवरी लोळे ॥ ४ ॥
तुका म्हणे तैसी हरी । कीरव्या नावडे कस्तुरी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .– भीतरीं–आत, कावळें–कावळा, कीरव्या–डुक्कर

अर्थ .– समुद्रात जाळे टाकून पसरले तर त्यात पाण्याचा एक थेंबही ठरत नाही १ त्याप्रमाणे पापी माणसाचे मन असते त्याला हरिकीर्तन कधीच आवडत नाही २ गाढवाला गंगेत जरी आंघोळ घातली तरी ते उकिरड्यावर जाऊन लोळतेच ३ मोठी प्रीती लावून जरी कावळ्याचे पालनपोषण केले तरी तो विष्ठेवर जाऊन लोळतोच. ४ तुकाराम महाराज म्हणतात त्याचप्रमाणे श्रीहरी, डुकरासही कस्तुरी आवडत नाही तसेच पापी माणसास कीर्तन आवडत नाही ५

३९७१ तरलों म्हणुनि धरिला ताठा । त्यासी चाळ जाला फाटा ॥ १ ॥
वायांविण तुटे दोड । मान सुख इच्छी भांड ॥ २ ॥
ग्वाहीविण मात । स्थापी आपुली सतत[3] ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसीं किती । नरका गेलीं अधोगती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ताठा–गर्व, फाटा–विविध मार्ग, दोड–कच्चे फळ, भांड–भांडखोर, ग्वाहीविण–साक्षी-पुराव्याशिवाय, मात–वडबड

१ एक वर्म, २ अंतरी, ३ स्वतंत्र

अर्थ :– आम्ही संसारसागरात तरलो असे म्हणून जे गर्व धारण करतात त्यांची वाणी चळली असून तिला फाटे फुटले आहेत. १ कच्च्या फळाप्रमाणे ते व्यर्थ तुटून पडतात. या माडखोर लोकांना मानाची व सुखाची इच्छा फार असते. २ शास्त्रपरंपरेच्या साक्षीपुराव्याशिवाय हे लोक काही तरी बडबडतात आणि स्वतःचे मत कसे तरी स्थापन करतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे किती तरी लोक नरकाच्या अधोगतीस गेले आहेत. ४

३९७२ आतां येथें खरें । नये फिरतां माघारें ॥ १ ॥
होईल तैसो हो आबाळी । देह निमित्त या बळी ॥ २ ॥
तुम्हांसवें गांठीं । देहजिवाचिये सांटीं ॥ ३ ॥
तुका म्हणे लंड । करूं चौघांमध्यें भंड[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मागील अभंगक्र. ३६६० पाहावा

३९७३ कठिण नारळाचें अंग । बाहेरी भीतरीं तें चांग ॥ १ ॥
तैसा करी कां विचार । शुद्ध कारण अंतर ॥ २ ॥
वरि कांटे फणसफळा । माजि अंतरीं जिव्हाळा ॥ ३ ॥
ऊंस बाहेरी कठिण काळा । माजीं रसाचा जिव्हाळा ॥ ४ ॥
मिठें रुचविलें अन्न । नये[2] सतंत कारण ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– भीतरीं–आतल्या बाजूने, चांग–चांगले, अंतर–अंतःकरण.

अर्थ :– नारळाचे वरून अंग कठीण असते. पण आतल्या बाजूने गाभा चांगला गोड असतो. १ लोकहो, त्याप्रमाणे तुम्ही विचार करा. अंतःकरण शुद्ध असणे हे खरे कार्य आहे. २ फणसाच्या फळास वरून पुष्कळ काटे असतात, पण आतील गऱ्यात मात्र कमालीची गोडी असते. ३ ऊस बाहेरून कठीण व काळा असतो, परंतु आत मात्र गोड रस असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, मीठ घातल्याने अन्नास रुची येते. त्याशिवाय त्यास काही काम पडत नाही. ५

३९७४ सकळतीर्थांहूनि । पंढरीनाथ मुगुटमणी ॥ १ ॥
धन्यधन्य पंढरी । जे मोक्षाची अक्षय पुरी ॥ २ ॥
विश्रांतीचा ठाव । तो हा माझा पंढरीराव ॥ ३ ॥
तुका म्हणे सांगे[3] स्पष्ट । दुजी पंढरी वैकुंठ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा– अक्षय–कायमची, ठाव–स्थान.

अर्थ :– सर्व तीर्थापेक्षा श्रेष्ठ अशी ही पंढरी नगरी आहे. कारण येथे देवांचा मुकुटमणी श्रीपंढरीनाथ आहे १ ही पंढरी धन्य धन्य आहे. कारण ही मोक्ष देणारी अक्षयपुरी आहे. २ हा माझा पंढरीराय एकमेव विश्रांतीचे स्थान आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरपूर हे दुसरे वैकुंठ आहे हे मी स्पष्टपणे सांगत आहे. ४

३९७५ माते भरूनि हरिनामाचे । वीर गर्जती विठ्ठलाचे ॥ १ ॥
अनंतनामाचो[4] आरोळी । एक एकाहूनि बळी ॥ २ ॥
नाहीं आणिकांचा गुमान । ज्याचे अंकित त्यावांचून ॥ ३ ॥
रिद्धि सिद्धि ज्या कामारी । तुका म्हणे ज्याचे घरीं ॥ ४ ॥

१ पंड, २ तुका म्हणे नये, ३ सांगतो, ४ सहस्रनामाची.

शब्दार्थ व टीपा :– आणिकांचा–इतरांचा, गुमान–पर्वा, भीती, अंकित–सेवक, कामारी–दासी.

अर्थ :– आपले भाते हरिनामाच्या बाणांनी भरून विठ्ठलाचे हे वीर गर्जना करीत आहेत. १ एकापेक्षा एक बलवान असलेले हे वीर अनंताच्या नामाची आरोळी मारतात. २ ज्याचे हे सेवक आहेत त्याच्यावाचून इतरांची भीती यांना कधीच नसते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या घरी रिद्धीसिद्धी दासी म्हणून काम करतात त्याचे हे वीर आहेत. ४

३९७६ ज्याची जया आस । तयाजवळी त्या वास ॥ १ ॥
येर जवळी तें दुरी । धेनु वत्स सांडी घरीं ॥ २ ॥
गोडी प्रियापाशीं । सुख उपजे येरासी ॥ ३ ॥
तुका म्हणे बोल । घडे तयाठायीं मोल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– येर–इतर.

अर्थ :– ज्याला ज्याला इच्छा असते त्याच्या जवळ तो राहातो १ आणि ज्याची जरूरीच नाही तो जवळ असला तरी दूर असतो. मोठ्या झालेल्या वासरास गाय दूर सोडते, त्याप्रमाणे नको असलेला दूर राहातो. २ गोडी प्रिय व्यक्तीविषयी वाटते व त्याच्यामुळे दुसऱ्यास सुखच उत्पन्न होते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या ठिकाणी प्रेमाचे बोल उमटतात त्याच ठिकाणी किंमत येते. ४

३९७७ बाळ माते निष्ठुर होये । परि ते स्नेह करीत आहे ॥ १ ॥
तैसा तूं गा पुरुषोत्तमा । घडी न विसंबसि आम्हां ॥ २ ॥
नेणती भागली । कडे घेतां अंग घाली ॥ ३ ॥
भूक साहे तान्ह[1] । त्याचें राखे समाधान ॥ ४ ॥
त्याच्या दुःखें धाये । आपला जीव देऊं पाहे ॥ ५ ॥
नांवें घाली उडी । तुका म्हणे प्राण काढी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– धायें–हंबरडा फोडून रडते.

अर्थ :– बालक कधी आईवर रागावते. पण आई मात्र त्याच्यावर स्नेहच करीत असते. १ त्याप्रमाणे तू पुरुषोत्तमा, आम्हांस एक क्षणभरही विसवत नाहीस. २ आपले हे मूल नेणते आहे, दमले-भागले आहे, म्हणूनच ती त्याला कडेवर घेत असतानाच ते खाली अंग टाकून देते. ३ स्वतःची तहानभूक सहन करून ती आपल्या बालकाचे समाधान करते ४ त्याला दुःख झाल्यास ती हंबरडा फोडून रडते व त्याचे दुःख दूर करण्यास प्राणही देण्याची तयारी करते. ५ तुकाराम महाराज म्हणतात, मुलाने 'आई' म्हणून हाक मारली की ती प्राणपणाने त्याचे रक्षण करते. ६

३९७८ हे[2] तों टाळाटाळी । परि भोवता हा फळी ॥ १ ॥
बरें नव्हेल शेवटीं । भय असों द्यावें पोटीं ॥ २ ॥
मुरगाळिल कान । गोसमाळी सावधान ॥ ३ ॥
धन्य म्हणे आतां । येथें नुघवा माथां ॥ ४ ॥
अबोलणा तुका । ऐसें कांहीं लेखूं नका ॥ ५ ॥

१ ताहान, २ होते.

शब्दार्थ व टीपा :- गोसमाळी-कान उपटणे, नुधवा-वर न उचलावा.

अर्थ :- मरणाची आज नाही उद्या टाळाटाळ होईल. पण भोवती काळी आहे याची जाणीव असावी १ शेवटी आपले बरे होणार नाही यासंबंधी पोटात भय असावे. २ हा काळ एखाद्या विषयी कान मुरगाळून उपटेल, याविषयी सावधान असावे. ३ पण मी या श्रीहरीच्या पायांवर माथा ठेविला आहे तो तेथून वर न उचलावा असे वाटते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी न बोलणारा आहे. मला असे काही समजू नका ५

३९७९ किती लाजिरवाणा । मरे उपजोनि शहाणा ॥ १ ॥
एका घाईं न करीं तुटीं । न निघे देवासोई भेटी ॥ २ ॥
सोसूनि आबाळी । घायाळ तें ढुंग चोळी ॥ ३ ॥
सावध करी तुका । म्हणे निजला हो आइका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- उपजोनि-जन्मास येऊन, घाईं-घावाने.

अर्थ :- हा शहाणा मनुष्य पाहा, किती लाजिरवाणा आहे. जन्मास येऊन काही न साधताच मरून जातो.१ एका घावात लौकिक गोष्टींविषयी फटकून निघून देवाच्या भेटीस हा निघत नाही. २ प्रपंचातच राहून हा आबाळ सोसतो आणि अनेक आघात झाले की ढुंगण चोळीत बसतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, निजलेले लोकहो, तुम्ही नीटपणे ऐका. मी तुम्हांस सावध करीत आहे. ४

३९८० दाता लक्ष्मीचा पति । माझें मागणें तें किती ॥ १ ॥
जाणे तान्हेल्याची तान । पितां गंगा नव्हे न्यून ॥ २ ॥
कल्पतरु जाला देता । तेथें पोटाचा मागता ॥ ३ ॥
तुका म्हणे सतत[1] ध्यातां । परब्रह्मचि आलें हातां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- न्यून-कमी.

अर्थ :- हा लक्ष्मीचा पती श्रीहरी मोठा दाता आहे. पण माझे मागणे ते कितीसे आहे ? १ तो प्रभू तहान लागलेल्याची तहान जाणतो. गंगेचे पाणी कितीही प्याले तरी ती कमी होत नाही. २ हा श्रीहरी कल्पतरुप्रमाणे देता झाला आहे, पण मी तर त्याच्याजवळ पोटापुरते मागणारा आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याला मी नेहमी ध्यात असतो. यामुळे माझ्या हातात परब्रह्मच आले आहे. ४

३९८१ कुरवंडी करीन काया । वरोनि पायां गोजिरिया ॥ १ ॥
बैसलें तें रूप डोळां । मन चाळा लागलें ॥ २ ॥
परतें न सरवे दुरि । आवडी पुरी बैसली ॥ ३ ॥
तुका म्हणे विसावलों । येथें धालों धणीवरि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- कुरवंडी-ओवाळून, धणीवरी-तृप्त होईपर्यंत.

अर्थ :- देवा, तुमच्या गोजिऱ्या पायांवरून मी माझा देह ओवाळून टाकीन. १ तुमचे रूप माझ्या डोळ्यांत बसले आहे, त्याच्याच छंदात माझे मन गुरफटले आहे. २ या रूपावर जी माझी आवड एकदा बसली आहे, येथून दूर कुठे परतून जावे असे वाटत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या स्थानावर मी माझी इच्छा तृप्त होईपर्यंत विसावलो आहे. ४

१ सता.

३९८२ साधनाचे कष्ट मोटें । भय वाटे थोर हे ॥ १ ॥
मुखें गावे भावे गीत । सर्व हित बैसलिया ॥ २ ॥
दासा नव्हे कर्म दान । तन मन निश्चळ ॥ ३ ॥
तुका म्हणे आत्मनिष्ठा । भागे चेष्टा मनाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भागे–भोगे असावे

अर्थ – इतर साधनाचे कष्ट फार असतात त्याचे मला फार भय वाटते १ मुखाने भाव मनात धरुन श्रीहरीचे गीत गावे हेच एक साधन उत्तम त्यामुळे बसल्या ठिकाणी स्वहिताची प्राप्ती होते २ श्रीहरीच्या दासांना नाना प्रकारची कर्मे व दानधर्माची कामे करावी लागत नाहीत त्यानी तन मन एका ठिकाणी निश्चल केले म्हणजे पुरे ३ तुकाराम महाराज म्हणतात जे कुणी आत्मनिष्ठ आहेत त्याच्या सर्व चेष्टा मनात श्रीहरीचा भोग घेण्या संबधीच असतात ४

३९८३ घेता आणिकाचा जीव । तेव्हा कींव कराना ॥ १ ॥
आपले ते वरदळ नेदा । हे गोविंदा कृपणता ॥ २ ॥
सेवा तरी इच्छा सांग । चोरिले अंग साहेना ॥ ३ ॥
तुका म्हणे अरे धन्या । निसतान्या विठोबा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आणिकाचा–इतराचा, दुसऱ्याचा, वरदळ–वाहयात्कारी, निसतान्या–वाटोळे करणारा

अर्थ – देवा, तुम्ही जेव्हा दुसऱ्याचा जीव घेता तेव्हा काही त्यांची कीव करीत नाही १ देवा तुम्ही स्वत ला वाहयात्कारी काही धक्का लागू देत नाही गोविंदा, ही तुमची कृपणताच आहे २ आमच्याकडून तुम्ही चागली सेवा घेण्याची इच्छा करता पण आम्ही त्यात थोड अंग चोरले तर ते तुम्हाला सहन होत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, अरे धन्या, विठोबा, तू अशा प्रकारे सेवकाचे वाटोळे करणारा आहेस ४

३९८४ आम्हा केले गुणवंत । तें उचित राखावे ॥ १ ॥
तुम्हासी तो चाड नाहीं । आणिका कांहीं सुखदु खा ॥ २ ॥
दासाचे तें देखो नये । उणे काय होइल ते ॥ ३ ॥
तुका म्हणें विश्वंभरा । दृष्टि करा सामोरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–गरज, पर्वा

अर्थ – देवा आम्हाला तुम्ही चागले गुणवान केले आहे ते आता नीट उचितपणे राखावे १ इतरांच्या सुखदु खाची तुम्हाला तर काहीच पर्वा नाही २ पण तुम्ही दासाचे जे काय कमीजास्त होईल ते पाहाण्यात कमी पणा मानू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो विश्वंभरा, तुम्ही तुमची दृष्टी माझ्यासमोर करा ना ४

३९८५ अगत्य ज्या नरका जाणे । कीर्तनीं तो वीट मानी ॥ १ ॥
नावडेसा जाला बाप । आले पाप वस्तीसि ॥ २ ॥
नारायण नाहीं वाचे । ते यमाचे सदन ॥ ३ ॥
तुका म्हणे अभक्तासी । माता दासी जग झोडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाचें–वाणीत, जगझोडी–वटीक.

अर्थ – ज्याना नरकाला जाण्याचेच अगत्य आहे त्यानी श्रीहरीच्या कीर्तनाबद्दल मनामध्ये वीट मानावा १ हा श्रीहरी आपला बाप आहे, तोच ज्याला आवडेनासा झाला त्याच्या ठिकाणी पापाची वसती होते २ ज्याच्या मुखात नारायण कधीच येत नाही तो यमालाच आंदण मिळालेला असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या अभक्ताची माता सर्व जगताची दासी व बटीक बनलेली असते ४

३९८६ आम्ही हरिचे हरिचे । शूर कळिकाळा यमाचे ॥ १ ॥
नामघोष बाण साचे । भाले तुळसी मजुरेचे ॥ २ ॥
आम्ही हरिचे हरिचे दास । कलिकाळावरि घालू कास ॥ ३ ॥
आम्ही हरिचे हरिचे दूत । पुढें पळती यमदूत ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्हावरी । सुदर्शन घरटी करी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – साचे–खरे, घरटी–चकरा, घेऱ्या

अर्थ – आम्ही श्रीहरीचे शूर सैनिक आहोत कळिकाळ यमालाही आमचा धाक वाटतो १ नामघोष हेच आमचे बाण असून तुळशीच्या मंजिरींचे भाले आम्ही केले आहेत २ आम्ही श्रीहरीचे दास असून या कळिकाळावरही कास घालून चालून जाऊ ३ आम्ही श्रीहरीचे दूत असून आमच्या पुढून यमदूत पळून जातात ४ तुकाराम महाराज म्हणतात, आमच्याभोवती श्रीहरीचे सुदर्शनचक्र संरक्षणासाठी फेऱ्या मारीत असते ५

३९८७ देवाचिये पायीं वेचों सर्व शक्ती । होतील विपत्ति ज्याज्या काहीं ॥ १ ॥
नेघे माझी वाचा पुढें काहीं वाव । आणि दुजे भाव बोलायाचे ॥ २ ॥
मनाची वाटणी चित्ताचा विक्षेप । राहो हा अनुताप आहे तैसा ॥ ३ ॥
तुका म्हणे घेई विठ्ठलाचा छंद । आनंदाचा कंद विस्तारेल ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वेचों–खर्च होतो, नेघे–घेत नाही, वाव–व्यर्थ

अर्थ – माझ्याभोवती ज्या ज्या विपत्ती आहेत त्या दूर होण्यासाठी माझी सर्व शक्ती या देवाच्या पायाशी खर्च व्हावी १ याच्याशिवाय इतर दुसरे काही भाव बोलण्यासाठी माझी वाणी व्यर्थपणे चालत नाही २ मनाची वाटणी होऊन माझ्या चित्ताचा विक्षेप न होता निर्माण झालेला अनुताप आहे तसाच राहो ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या विठ्ठलाचा छंद घेईन त्यायोगे हा आनंदाचा कंद विस्तार पावेल ४

३९८८ पांडुरंगा आता ऐका हे विनंती । बहु माझे चित्तीं भय वाटे ॥ १ ॥
नाहीं आइकिले संताचिया मुखें । तें या मज लोकें भेंडसाविलें ॥ २ ॥
विष्णुदासां गति नाहीं तरावया । म्हणती गेले वाया कष्टत ही ॥ ३ ॥
धिक्कारिती मज करिता कीर्तन । काय सांगो सीण ते काळिचा ॥ ४ ॥
तुका म्हणे मज वाटतें उदास । काय करूं यास पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – सीण–कष्ट, त्रास

अर्थ – पांडुरंगा मला माझ्या चित्तात फार भय वाटते रे तू माझी एक विनंती ऐक १ या संतांच्या मुखांतून मी जे ऐकले नाही ते या लोकांनी मला ऐकवून भेंडसावले आहे २ हे लोक असे म्हणतात की, विष्णुदासांना संसारातून तरून जाण्यास काहीच गती नाही उगाच कष्ट करतात व वायाच जातात ते ३ मी कीर्तन

करीत असताना हे लोक माझा धिक्कार करतात. त्यावेळचे देवा, कष्ट किती होतात म्हणून सांगू ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, मला फार उदास वाटते, तर आता मी काय करू हे सांग ना. ५

३९८९ वेढा वेढा रे पंढरी । मोर्चे लावा भीमातिरीं ॥ १ ॥
चलाचला संत जन । करा देवासी भांडण ॥ २ ॥
लुटालुटा पंढरपुर । धरा रखुमाईचा वर ॥ ३ ॥
तुका म्हणे चला । घाव निशाणीं घातला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वर–पती, निशाणीं–मर्मस्थानी.

अर्थ :– या पंढरीस वेढा घाला हो. भीमातीरी असलेल्या या नगरीस मोर्चे लावा. १ संत लोकहो, चला, लौकर चला, या देवाशी आपण भांडण करू. २ पंढरपुरातील सर्व माल लुटा हो. आणि हा रखुमाईचा पती श्रीविठ्ठल नीट धरून ठेवा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, चला, आपण हा घाव अगदी मर्मस्थानीच घातला आहे.४

३९९० पहा ते पांडव अखंड वनवासी । परि त्या देवासी आठविती ॥ १ ॥
प्रल्हादासी पिता करितो जाचणी । परि तो स्मरे मनीं नारायण ॥ २ ॥
सुदामा ब्राह्मण दरिद्रें पीडिला । नाहीं विसरला पांडुरंगा ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझा न पडावा विसर । दुःखाचे डोंगर जाले तरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दरिद्रें–दारिद्रयाने.

अर्थ :– पांडवांना अखंडपणे वनवास भोगावा लागला तरी ते देवाची आठवण करीत असत हे पाहा. १ प्रल्हादाला त्याचा पिता फार जाच करीत होता, तरीसुद्धा तो मनातून नारायणाचे स्मरण करी. २ श्रीकृष्णाचा मित्र सुदामा ब्राह्मण दारिद्रयाने पीडलेला होता. पण तोही कधी पांडुरंगास विसरला नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, दुःखाचे डोंगर जरी माझ्यावर कोसळले तरी तुझा विसर होऊ नये. ४

३९९१ निजसेजेची अंतुरी । पादलिया कोण मारी ॥ १ ॥
तैसा[1] आम्हांसी उबगतां । तुका विनवितो संतां ॥ २ ॥
मूल मांडीवरी हागलें । तें बा कोणें रे त्यागिलें ॥३ ॥
दासी कामासी चुकली । तें बा कोणें रे विकली ॥ ४ ॥
पांडुरंगाचा तुका पापी । संतसाहें काळासि दापी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– अंतुरी–स्त्री, उबगतां–कटाळता, त्रासता, दापी–दटावतो.

अर्थ :– रोज सेजसोबत करणारी आपली स्त्री पादली तर तिला कोण मारणार ? १ त्याप्रमाणे मी तुकाराम तुम्हां संतांना विनवीत आहे तुम्ही आम्हांस का कंटाळता ? २ मूल पित्याच्या मांडीवर हागले म्हणून काय कुणी त्याचा त्याग करतात की काय ? ३ घरची दासी एखाद्या कामाविषयी चुकली तर लगेच तिला कुणी विकते की काय ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगाचा हा मी तुकाराम संतांसहित काळासही या प्रकारे दटावून विचारीत आहे. ५

३९९२ श्वानाचियापरी लोळें तुझ्या द्वारीं । भुंकों हरिहरि नाम तुझें ॥ १ ॥
भुंकों उठी बैसें न वजायें वेगळा । लुडबुडीं गोपाळा पायांपाशीं ॥ २ ॥
तुका म्हणे आम्हां धर्म आहे ठावें । मागेन तें द्यावें प्रेमसुख ॥ ३ ॥

१ तुम्ही.

शब्दार्थ व टीपा :- न वजावे-होणार नाही, जाणार नाही

अर्थ :- देवा, मी कुत्र्याप्रमाणे तुझ्या दारात लोळण घेईन आणि हरी हरी असे तुझ्या नावाने सतत भुंकत राहीन. १ मी इथेच राहून भुंकेन, ऊठबस करीन, पण येथून दूर मात्र होणार नाही. या गोपाळाच्याच पायाशी लुडबुड करीन. २ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीचे वर्म आम्हास माहीत आहे आम्हास जे प्रेमसुख आम्ही मागू ते द्यावे. ४

३९९३ सोइरे धाइरे दिल्याघेतल्याचे । अंत हे काळीचें नाहीं कोणी ॥ १ ॥
सख्या गोत्रबहिणी सुखाचे संगती । मोकलुनी देती अंतकाळीं ॥ २ ॥
आपुले शरीर आपणा पारिखें । परावीं होतील नवल काई ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां सोड याची आस । धरीं रे कास पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .- मोकुलुनी-सोडून, परावीं-परकी, आस-इच्छा

अर्थ ·- आपण आपल्या सोयऱ्याधायऱ्यांना जोपर्यंत काही देत आहोत तोपर्यंतच ते आपले आहेत. परतु मरणाच्या वेळी त्यापैकी कुणीही आपल्याजवळ राहाणार नाही १ सख्ख्या गोत्राच्या बहिणी केवळ सुखाच्या सोबती आहेत. अंतकाळ जवळ आला की त्या खुशाल काळाहाती आपणास सोडून जातात. २ आपले शरीरही आपणांस पारखे होते. मग इतर परकी माणसे दूर होतील यात नवल ते काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून तू आता याची इच्छा सोडून या पांडुरंगाची कास धरावीस ४

३९९४ जन्ममरणाची कायसी चिंता । तुझ्या शरणागतां पंढरीराया ॥ १ ॥
वदनीं तुझें नाम अमृतसंजीवनी । असतां चक्रपाणी भय कवण[1] ॥ २ ॥
हृदयीं तुझें रूप बिंबलें साकार । तेथें कोण पार संसाराचा ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझ्या चरणांची[2] पाखर । असतां कळिकाळ पायां तळीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- साकार-आकारासहित, पार-सीमा, किंमत.

अर्थ :- पंढरीराया, तुझे जे शरणागत आहेत त्यांना जन्ममरणाची चिंता ती कशासाठी असावी ? १ तुझ्या नामाच्या अमृताची संजीवनी मुखात असताना चक्रपाणी, आता भय कुणास वाटणार ? २ आमच्या हृदयात तुझे आकारसहित रूप एकदा बिंबल्यानंतर या संसाराची अशी मर्यादा ती कोणती ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्या चरणाची पाखर असताना कळिकाळाचेही भय आम्हास नाही. ते आमच्या पायतळीच राहतात. ४

३९९५ क्षमाशस्त्र जया नराचिया हातीं । दुष्ट तयाप्रति काय करी ॥ १ ॥
तृण नाहीं तेथें पडिला दावाग्नि । जाय तो विझोनि आपसया ॥ २ ॥
तुका म्हणे क्षमा सर्वांचे स्वहित । धरा अखंडित सुखरूप ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- दावाग्नि-वणवा

अर्थ :- क्षमारूपी शस्त्र ज्या माणसाच्या हातात आहे त्याला दुष्ट लोक काहीही करू शकणार नाहीत. १ ज्या ठिकाणी गवतच नाही तेथे मोठा वणवा लागला तरी काय उपयोग ? तो जेथल्या तेथे आपोआपच विझून जाईल. २ तुकाराम महाराज म्हणतात, क्षमा या गुणामुळे सर्वांचे हित साधले जाते. म्हणून तुम्ही नेहमी अखंडपणे सुखस्वरूप अशी ही क्षमाच मनात धारण करा ३

१ काय, २ नामाची.

विवरण –दुसऱ्याच्या अपराधांबद्दल सहनशील असणे, न रागावणे, अत करण उदार ठेवणे, क्षमाशील असणे, हा एक मोठा गुण सत्पुरुषाचा सागितला आहे सर्व प्रकारचे अपराध सहन करणारी पृथ्वी 'क्षमा' आहे गीतेच्या तेराव्या अध्यायात ज्ञानी माणसाची लक्षणे सागताना 'अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम' या ओळीतील क्षाति म्हणजे सर्वसहनशीलता, क्षमाच होय क्षमा हेही एक प्रभावी शस्त्र असल्यानें त्याची महती विशेष सागितली आहे हा क्षमाशील पुरुष कसा असतो ? खोल तळ्यात कमळाचे वेल जसे विपुल असतात, अथवा भाग्यवान पुरुषाच्या येथे जशी सपत्ती वाढत असते, त्याप्रमाणे भाग्यवताच्या चित्तात क्षमा वाढते, असे ज्ञानदेवानी म्हटले आहे क्षमाशील मनुष्य सर्व काही करतो आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक तापांचे समुदाय जरी त्याच्यावर कोसळले तरी तो कधी डगमगत नाही मानापमान, सुखदु खे, यशापयश साररयाच वृत्तीने तो सहन करतो उन्हाने तो तापत नाही, की थडीनें कापत नाही क्षमाशील महात्म्याचे वर्णन करताना ज्ञानदेवानी म्हटले आहे, ' नाना चराचरीं भूतीं । दाटणी नव्हे क्षितीं । तैसा नाना द्वद्वीं प्राप्ती । घामेजेना ॥ घेउनी जळाचे लोट । आलिया नदीनदाचे सघाट । करी वाड पोट । समुद्र जेवी ॥ तैसें जयाचिया ठायीं । न साहणें काहींचि नाहीं । आणि साहतु असे ऐसेंही । स्मरण नुरे ॥' अशा प्रकारचे वर्तन क्षमाशस्त्र धारण करणाऱ्याचे असते

३९९६ यातिगुणे रूपें काय ते वानर । तयाच्या विचारें वर्ते राम ॥ १ ॥
ब्रह्महत्याराशि पातकी अनेक । तो वद्य वाल्मीक तिहीं लोकीं ॥ २ ॥
तुका म्हणे नव्हे चोरीचा व्यापार । म्हणा[1] रघुवीर वेळोवेळा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – वर्ते–वागे, तिहीं–तीनही

अर्थ – रामचद्राभोवती जमलेले वानर जातीने, रूपाने गुणानी असे काय होते ? पण त्याच्या निष्ठेमुळे प्रभू रामही त्याच्या विचारानीच वागत असे १ ब्राह्मणांची हत्या करणाऱ्यास अनेक प्रकारची पातके लागत असतात परतु प्रभुस्मरणामुळे तो वाल्मीकीही तीनही जगतात धन्य व वद्य झाला २ तुकाराम महाराज म्हणतात, त्याचा वाटमारीचा व्यवहार काही शिल्लक राहिला नाही कारण त्याने वारवार रघुवीराचे नाम घेतले ३

३९९७ पाने जो खाईल बैसोनि कथेसी । घडेल तयासी गोहत्या ॥ १ ॥
तमाखू ओढूनि काढला जो धूर । बुडेल तें घर तेणें पापें ॥ २ ॥
कीर्तनीं बडबड करील जो कोणी । बेडूक होउनी येईल जन्मा ॥ ३ ॥
जयाचिये मनीं कथेचा कंटाळा । होती त्या चाडाळा बहु जाच ॥ ४ ॥
जाच होती पाठी उडती यमदड । त्याचे काळें तोड तुका म्हणें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – गोहत्या–गाईची हत्या

अर्थ .– श्रीहरीच्या कथेत बसून जो पानाचा विडा खाईल त्याला गाईच्या हत्येचे पाप लागेल १ कथेत बसून जो तबाखू ओढून धूर काढील त्याच्या पापाने त्याचे घर बुडून जाईल २ कथेत बसून जो इतर व्यर्थ बडबड करील तो पुढील जन्मी बेडूक होईल ३ ज्याच्या मनात कथेचा कटाळा आहे त्या चाडाळाला फारच जाच सहन करावे लागतील ४ तुकाराम महाराज म्हणतात, कथेतून उठून जाणाऱ्यास फारच जाच होईल त्याच्या पाठीवर यमाचे दड उठतील त्याचे तोंड काळे होऊन जाईल ५

३९९८ कामामध्यें काम । काहीं म्हणा रामराम । जाइल भवश्रम । सुख होईल दु खाचे ॥ १ ॥
कळो येईल अतकाळीं । प्राणप्रयाणाचे वेळीं । राहाती निराळीं । रांडापोरें सकळ ॥ २ ॥
जीता जीसी जैसा तैसा । पुढें आहे रे वोळसा । उगवूनि फांसा । काय करणें तें करीं ॥ ३ ॥
केलें होतें याचि जन्में । अवघें विठोबाच्या नामें । तुका म्हणे कर्मे । जाळोनिया तरसी ॥ ४ ॥

[1] नाम हेंचि सार विठोबाचे

शब्दार्थ व टीपा :– जीतां–जगत असता, जीसी–जगशील, बोळसा–भोवरा, उगवुनि–सोडवून.

अर्थ :– लोकहो, संसाराच्या अनेक कामांत तुम्ही व्यग्र आहात. पण त्याच कामात एक काम म्हणून काही थोडे रामनाम म्हणा ना. त्यामुळे तुमचे संसारातील श्रम नष्ट होतील. दुःखाचे सुख होऊन जाईल. १ नाही तर अखेरीस प्राण जाण्याच्या वेळी समजून येईल की, तुमची सर्व बायकामुले दूर राहिलेली आहेत. २ तुम्ही आज जसे जगत आहात तसेच जगत राहा. पण पुढे जन्ममृत्यूंचा फार मोठा भोवरा येणार आहे, म्हणून त्याच्या तडाख्यातून सोडवून घेण्यासाठी काही करायचे असेल तर ते आताच करा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो, जर काही करायचे असेल तर ते याच मनुष्यजन्मी होण्यासारखे आहे. विठोबाच्या नामचिंतनानें ते होईल. हे वर्म जाणून जे वागतील ते भवसागर तरून जातील. ४

३९९९ तुज मज ऐसी परी । जैसे तरंग सागरीं ॥ १ ॥
दोहींमाजी एक जाणा । विठ्ठल पंढरीचा राणा ॥ २ ॥
देव भक्त ऐसी बोली । जंव भ्रांति नाहीं गेली ॥ ३ ॥
तंतु पट जेवीं एक । तैसा विश्वेंसीं व्यापक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परी–प्रकार, पट–वस्त्र.

अर्थ :– ज्याप्रमाणे सागरावरील तरंग सागराशी एकरूप असतात त्याप्रमाणे देवा, तुझी व माझी एकसारखीच बरोबरी आहे. १ देव आणि भक्त हे दिसायला दोन असले तरी त्यांच्यांत पंढरीचा राणा विठ्ठल हा एकच आहे असे जाणून घ्या. २ जोपर्यंत मीपणाची, देहात्मभावाची भ्रांती गेलेली नाही तोपर्यंतच देव व भक्त अशी द्वैताची भावना बोलली जाते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, वस्त्र आणि वस्त्राचे धागे हे जसे एकच असतात त्याप्रमाणे हा श्रीहरी सर्व विश्वास व्यापून राहिलेला आहे. ४

४००० कोठें गुंतलासी योगीयांचे ध्यानीं । आनंदकीर्तनीं पंढरीच्या ॥ १ ॥
काय काज कोठें पडलीसे गुंती । कानीं न पडती बोल माझे ॥ २ ॥
काय शेषशयनीं सुखनिद्रा आली । सोय कां सांडिली तुम्ही देवा ॥ ३ ॥
तुका म्हणे कोठें गुंतलेती सांगा । किती[1] पांडुरंगा वाट पाहूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– काज–कार्य, गुंती–अडचण, अडवणूक, सोय–सय, आठवण, मार्ग अथवा आधार.

अर्थ :– देवा पांडुरंगा, तुम्ही कुठे योगी लोकांच्या ध्यानात गुंतून राहिला की काय ? पंढरपुरास कीर्तनाच्या आनंदात दंग होऊन गेले आहात ? १ की कुठल्या कार्याच्या निमित्ताने अडचण निर्माण झाली ? की माझे हे बोल तुमच्या कानांवरच येत नाहीत ? २ की देवा, शेषाच्या शय्येवर सुखाने निद्रा आली तुला ? देवा, तुम्ही माझी आठवण का हो सोडून दिली ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तुम्ही कुठे गुंतून आहात ते तरी सांगा ना हो. तुमची मी वाट तरी किती पाहू ? ४

४००१ माउलीसी सांगे कोण । प्रेम वाढवी ताहानें[2] ॥ १ ॥
अंतरींचा कळवळा । करीतसे प्रतिपाळा ॥ २ ॥
मायबापाची उपमा । तुज देऊं मेघश्यामा ॥ ३ ॥
ते ही साजेना पाहातां । जीवलगा पंढरिनाथा ॥ ४ ॥
माय पाळी संसारीं । परलोक राहे दुरी ॥ ५ ॥

---

१ येगा पांडुरंगा भेटी देई, २ तान्हें ।

तैसा नव्हेसी अनता । काळावरी तुझी सत्ता ॥ ६ ॥
तुका म्हणे नारायणा । तुम्हा बहुत करुणा ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – अतरींचा–अत करणाचा, प्रतिपाळा–साभाळ

अर्थ – मुलाविषयी लोभ वाढवावा, असे माऊलीस कोण सागते ? पण तिचे तान्हे मूलच प्रेम वाढवीत असते १ अत करणाच्या कळवळचाने आई त्याचा साभाळ करीत असते २ मेघश्यामा, तुला मायबापाची उपमा द्यावी तर ३ शीवलगा, पढरीनाथा, तीही नीट शोभणार नाही ४ कारण आई फक्त या लोकीच पालनपोषण करते परतु परलोकात तिचा उपयोग होत नाही ती दूरच राहते ५ अनता, तु त्याप्रमाणे नाहीस तुझी सत्ता काळावरही चालते ६ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, तुला आम्हाविषयी फारच करुणा आहे ७

४००२ कोड आवडीचे । पुरवीना बाळकाचे ॥ १ ॥
तेव्हा कैसी ते माउली । जाणा काशासाटीं व्याली ॥ २ ॥
वत्साचिये आसे । धेनु धावेना गोरसें[1] ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं[2] । बाळ टाकिले वानरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड–इच्छा, गोरसें–दूध देण्यासाठी, वोरसें–प्रेमभरित होऊन

अर्थ – आपल्या बालकाची इच्छा जर त्याची आई पूण करीत नाही तर १ तिला आई तरी कशासाठी म्हणायचे ? ती या मुलाला कशाला जन्म देती झाली ? २ वासराच्या आशेने दूध देण्यासाठी प्रेमभरीत होऊन गाय धावत नाही तर ती आई कसली ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, नेहमी पोटाशी वागविणारी वानरी त्याला घरी ठेवून आली तर ती आई कसली ? ४

४००३ भक्ताचीं साकडीं स्वयें सोसी देव । त्यापाशीं केशव सर्वकाळ ॥ १ ॥
जये ठायीं कीर्तन वैष्णव करितो । तेथें हा श्रीपति उभा असे ॥ २ ॥
तुका म्हणे देव सर्वाठायीं जाला । भरूनी उरला पाडुरग ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – साकडीं–सकटे

अर्थ – हा देव आपल्या भक्ताची सकटे स्वत सोशीत असतो हा केशव सतत त्याच्या जवळच असतो १ ज्या ठिकाणी वैष्णव लोक कीर्तन करतात तेथे हा श्रीपती सतत उभा राहतो २ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव सर्व ठिकाणी व्यापून राहिला आहे हा पाडुरग सर्वत्र भरून उरला आहे ३

४००४ तुझिया नामाचा विसर न पडावा । ध्यानीं तो राहावा पाडुरग ॥ १ ॥
सागितला मत्र श्रीरामनामाचा । सर्वकाळ वाचा हेचि बोले ॥ २ ॥
उफराटें नाम वाल्मीक बोलीला । तो ही वद्य केला नारायणे ॥ ३ ॥
तुका म्हणे मज तुझाचि भरवसा । धावुनिया कैसा येसी देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाचा–वाणी

अर्थ – देवा, तुझ्या नामाचा मला कधीही विसर पडू नये. हा पाडुरग नित्य ध्यानात राहावा १ मला या श्रीरामनामाचा मत्र सागितला आहे माझी वाणी सदा सर्वकाळ त्याचेच बोल गाईल २ वाल्मीकी ऋषी 'राम' हे नाम 'मरा' असे उफराटे बोलत राहिला तरी या नारायणाने त्याला वदनीय केले ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला तुझाच एक भरवसा आहे तु मजसाठी कसा धावून येशील ? ४

१ वोरस, २ घरि

४००५ अवघ्या पातकाची मी एक रासी । अवघा तू[1] होसी सर्वोत्तम ॥ १ ॥
जैसा तैसा लागे करणें अंगीकार । माझा सर्व भार चालविणें ॥ २ ॥
अवघेंचि मज गिळियेलें काळें । अवघींच बळें तुझे अंगीं ॥ ३ ॥
तुका म्हणे आता खुंटला उपाय । अवघेंचि पाय तुझे मज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अंगीकार–स्वीकार

अर्थ – देवा, मी तर साऱ्या पातकाची राशीच आहे पण तू मात्र सर्वपणे सर्वोत्तम आहेस १ आता मी जसा आहे तसा तू माझा स्वीकार केला पाहिजेस आणि माझा सर्व भार चालविला पाहिजेस २ काळाने मला सवस्वी गिळून टाकले आहे त्यातून सोडविण्याचे सामर्थ्य मात्र देवा, तुझ्या अंगी आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझे सर्व उपाय खुंटले असून मला सर्व आधार तुझ्याच पायाचा आहे ४

४००६ मूर्तिमंत देव नांदतो पंढरीं । येर ते दिगांतरीं प्रतिमारूप ॥ १ ॥
जाउनिया वना करावें कीर्तन । मानुनी पाषाण विठ्ठलरूप ॥ २ ॥
तुका म्हणे मुख्य पाहिजे हा भाव । भावापासीं देव शीघ्र उभा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – येर–इतर, दुसरे

अर्थ – मूर्तिमंत असणारा हा देव पंढरपुरास नांदतो इतर मात्र दिगांतराने प्रतिमारूपात आहेत १ पाषाणालाच विठ्ठल मानून वनामध्ये जाऊन खुशाल कीर्तन करावे २ तुकाराम महाराज म्हणतात, मुख्य म्हणजे आपल्या मनात भाव पाहिजे ज्याच्याजवळ नि सीम भाव आहे त्याच्यापाशी देव लगबगीने उभा असतो ३

४००७ धरिल्या देहाचें सार्थक करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ १ ॥
लावीन निशाण जावया वैकुंठा । माजवीन पेठा कीर्तनाच्या ॥ २ ॥
नामाचिया नौका करीन सहस्रवरि । नावाडा श्रीहरि पांडुरंग ॥ ३ ॥
भाविक हो येथें धरा रे आवांका । म्हणे दास तुका शुद्धयाति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवांका–अवसान, धैर्य

अर्थ – तीनही लोकांत आनंदाचे साम्राज्य पसरवून मी जो हा देह धारण केला आहे त्याचे सार्थक करीन १ वैकुंठ लोकात जाण्यासाठी मी निशाण लावीन आणि हरिकीर्तनाच्या पेठा सर्वत्र वसवीन २ नामाच्या हजारो नौका मी तयार करीन माझा नावाडी प्रत्यक्ष हा पांडुरंग आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, भाविक जनहो, येथे थोडा धीर धरा तुम्ही मी तुकादास शुद्ध जातीचा याप्रमाणे बोलत आहे ४

४००८ अनुसरे त्यासी फिरों नेदी मागें । राहे समागमें अंगसंगें ॥ १ ॥
अंगसंगें असे कर्मसाक्ष देव । जैसा ज्याचा भाव तैसा राहे ॥ २ ॥
फळपाकीं देव देतील प्राणीयें । तुका म्हणे नये सवें कांहीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – अनुसरे–अनन्य होतो, पाकीं–परिणामी

अर्थ – जो या प्रभूशी अनन्य होतो त्याला तो कधी आपल्यापासून दूर सरू देत नाही तो आपल्या भक्ताच्या समागमे अंगसंगाने सतत राहतो १ कर्मसाक्षित्वाने हा देव सर्वांच्या अंत करणात असतो परंतु ज्याचा

१ तूंचि

जसा भाव असेल तसे त्याला फळ मिळेल २ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व प्राण्याना देव कर्माप्रमाणे परिणामी फळे देईल त्याशिवाय बरोबर दुसरे काही येणार नाही ३

४००९ ससारीं असता हरिनाम घेसी । तरीच उद्धरसी पूर्वजेंसी ॥ १ ॥
अवघींच इंद्रियें न येतील कामा । जिव्हे रामनामा उच्चारीं वेगीं ॥ २ ॥
शरीरसपत्ति नव्हे रे आपुली । भ्रातीची साउली अवघी व्यर्थ ॥ ३ ॥
तुका म्हणे सार हरिनाम उच्चार । येन्हवी येरझार हरीविण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – येरझार-जन्ममृत्यूची येजा

अर्थ – ससारात असताना तू जर श्रीहरीचे नाम घेशील तर पूर्वजासकट तुझा उद्धार होईल १ शेवटी तुझी सर्व इद्रिये काही कामास येणार नाहीत म्हणून जिभेने रामनामाचा उच्चार वेगाने करीत जा २ शरीराची सपत्ती ही काही आपली स्वत ची नाही, ती सावली सर्व भ्रातीची असून व्यर्थ आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, सर्वांचे सार श्रीहरीच्या नामाचा उच्चार हेच आहे एरवी श्रीहरीशिवाय फुकट जन्ममृत्यूची ये-जा मात्र होईल ४

४०१० सावळें सुदर रूप मनोहर । राहो निरतर हृदयीं माझे ॥ १ ॥
आणीक[1] काही इच्छा आम्हा नाहीं चाड । तुझें नाम गोड पाडुरगे ॥ २ ॥
जन्मोजन्मीं ऐसे मागितले तुज । आम्हासी सहज द्यावे आता ॥ ३ ॥
तुका म्हणे तुज ऐसे दयाळ । धुडिता सकळ नाहीं आम्हा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–गरज

अर्थ – देवा, तुझे हे सावळे सुदर रूप मन हरण करणारे आहे तेच रूप माझ्या हृदयात निरतर राहावे १ याशिवाय माझ्या मनास दुसरी कसलीही इच्छा नाही वा कसलीही इतर गोष्टीची जरूरी नाही पाडुरगे तुझे नाम अतिशय गोड आहे २ आम्ही जन्मोजन्मी याचप्रमाणे तुला मागत आहोत ते आता सहजासहजी द्यावे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आमच्या विषयी तुझ्याइतके दयाळू सर्वत्र धुडूनही सापडणार नाहीत ४

४०११ हिरोनिया नेला मुखींचा उच्चार । पाडिले अतर जवळीच ॥ १ ॥
द्वैताचियें कैसा पाडियेलो हातीं । बहुत करिती ओढाओढी ॥ २ ॥
काय करू मज नागविले आळसे । बहुत या सोसे पीडा केली ॥ ३ ॥
तुका म्हणे आता आपुलिया सवा । करूनिया देवा राखें मज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – थोड्याफार फरकाने मागील क्रमाक ३५८१ चा अभग पाहावा

४०१२ भक्ताहूनि देवा आवडते[*] काइ । त्रिभुवनीं नाहीं आन दुजें ॥ १ ॥
नावडे वैकुठ क्षीराचा सागर । धरोनि अतर राहे दासा ॥ २ ॥
सर्वभावे त्याचे सर्वस्वे ही गोड । तुळसीदळ कोड करनी घ्यावे ॥ ३ ॥
सर्वस्वे त्याचा म्हणवी विकिला । वित्त द्यावे बोला सागितल्या ॥ ४ ॥
तुका म्हणे भक्तिसुखाचा बाधिला । आणीक विठ्ठला धर्म नाहीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – क्षीराचा–दुधाचा, कोड–कौतुक

१ आईक, आवडे तें

अर्थ :– या देवाला भक्तांइतके आवडते त्रैलोक्यात कुणीही दुसरे नाही १ त्याला वैकुंठ वा क्षीरसागरही आवडत नाही. तो आपल्या दासांच्या अंत:करणात वसती करून राहतो. २ भक्ताने अर्पण केलेले सर्वच त्याला गोड वाटते. त्याने नुसते तुळसीदल जरी अर्पण केले तरी तो कौतुकाने त्याचा स्वीकार करतो. ३ मी सर्वस्वी त्याच्या, भक्ताच्या स्वाधीन आहे असे तो नेहमी म्हणतो तो भक्त जे जे बोलतो त्याकडे तो लक्ष देतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा विठ्ठल भक्तीच्या सुताचा बांधलेला आहे तो आणखी काहीही जाणत नाही ५

४०१३ राम कृष्ण गोविंद नारायण हरी । केशवा मुरारी पांडुरंगा ॥ १ ॥
लक्ष्मीनिवासा पाहें दिनबंधु । तुझा लागो छंदु सदा मज ॥ २ ॥
तुझे नामीं प्रेम देईं अखंडित । नेणें तप व्रत दान कांहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें हेंचि गा मागणें । अखंड ही गाणें नाम तुझें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नेणें–जाणीत नाही.

अर्थ :– राम, कृष्ण, गोविंद, नारायण, श्रीहरी, केशवा, मुरारी, अहो पांडुरंगा, १ लक्ष्मीच्या निवासा, दीनबंधू, पाहा ना मला तुझा छंद सतत लागावा २ मी काही तप, व्रत, दान वगैरे जाणीत नाही तुझ्या नामाविषयी मात्र अखंड प्रेम माझ्या मनात राहू दे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अखंडपणे तुझ्या नामाचेच गाणे मी गावे हेच माझे तुझ्याजवळ मागणे आहे. ४

४०१४ हरी तुझें नाम गाईन अखंड । यावीण पाखंड नेणें कांहीं ॥ १ ॥
अंतरीं[1] विश्वास अखंड नामाचा । कायामनेंवाचा देईं हेंचि ॥ २ ॥
तुका म्हणे आतां देईं संतसंग । तुझे नामीं रंग भरो मना ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– पाखंड–नास्तिकपणा, अंतरीं–अंत:करणात

अर्थ :– श्रीहरी, तुझे नाम मी अखंडपणे गाईन. यासिवाय मी आता दुसरे पाखंडी विचार जाणणार नाही १ नामस्मरणाविषयी अंत:करणात अखंड विश्वास आहे मला कायावाचामनाने तू हेच द्यावेस २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता तू मला संतांची संगत द्यावीस तुझ्या नामाचा रंग माझ्या मनात भरेल असे कर ३

४०१५ गबाळाचे ग्रंथीं कां रे पडां सदा । मिथ्या भेदवादा वागवितां ॥ १ ॥
संसारगबाळीं पडसी निखळ । जालासी तूं खळ तेणें मना[2] ॥ २ ॥
साधनसंकटीं गुंतसी कासया । व्यर्थ गा अपायामाजी गुंतों ॥ ३ ॥
निर्मळ फुकाचें नाम गोविंदाचें । अनंतजन्माचे फेडी मळ ॥ ४ ॥
तुका म्हणे नको करूं कांहीं कष्ट । नाम वाचे स्पष्ट हरि बोले ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– गबाळाचे–टाकाऊ, मूर्ख, निखळ–सर्व

अर्थ :– अरे, या अशा टाकाऊ व मूर्ख लोकांच्या ग्रंथांच्या वाचनात नेहमी का पडता ? उगाच खोटे भेदभाव कशासाठी मनात वागविता ? १ संसाराच्या गबाळात तू सर्वार्थाने सापडतोस त्यामुळे मना, तू दुष्ट होत चालला आहेस २ उगाच नाना प्रकारच्या साधनांच्या संकटात कशासाठी गुंततोस ? व्यर्थ अपायांच्यांत का सापडतोस ? ३ निर्मळ असणारे हे गोविंदाचे नाम फुकटचे का नाही घेत ? या नामामुळे अनंत जन्मांची पापे नाहीशी होतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, अरे, तू इतर काही कष्ट करू नकोस आपल्या वाणीने स्पष्टपणे श्रीहरीचे नाम घेत जा. ५

---

१ आतां तरी, २ माने.

शब्दार्थ व टीपा :– सेटचा–शेटजी, चौधरी–गावातील अधिकारी, पांडेपण–गावाचा कारभार पाहणे, हेड–विक्रीकरिता नेलेले गुराचे कळप, रीघ–प्रवेश

अर्थ :– पुढील विषयासंबंधी दुसरा कसला फार विचार करावा लागणार नाही १ हा धड शेटजीही नाही आणि चौधरीही नाही पण गावाच्या कारभाराचा बोजा मात्र स्वत:च्या शिरावर वागवतो. २ पापाचा शोध घेण्यासाठी इतर धुडत जाण्याची जरूरी नाही हवे असल्यास वरील ठिकाणी जावेच ३ जेथे जकातीचा धंदा चालतो तेथे नेहमीच पापाची वस्ती असते ४ गाईम्हशींचे कळप हा मनुष्य विकायला नेतो, त्यांच्या दुधाची विक्री करतो हो महाद्वाड असतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या ठिकाणी पुण्याला प्रवेशही मिळत नाही हे पाहा ६

४०२३ तुझी माझी आहे जुनी सोयरीक । आधीं बंधु लेक[1] मग जाले ॥ १ ॥
वांटेकरी म्हूण न पुसती आतां । परि आहे सत्ता करीन ते ॥ २ ॥
लेंकीचें लेंकरूं नातु जाल्यावरि । मंगळा ही दुरि अंतरलों ॥ ३ ॥
वाइलेचा भाऊ पिसुना सोयरा । म्हणउनि करा विनोद हा ॥ ४ ॥
आकुळीं तीं करूं नये तेंचि केले । न बोलावें भलें तेचि आतां ॥ ५ ॥
न म्हणसी लेंकी माउसी बहिणी । आम्हां केलें धणी पापाचें त्या ॥ ६ ॥
बहु पांचांजणी केली विटंबना । नये दाऊं जना तोंड ऐसें ॥ ७ ॥
तुका म्हणे आधीं मूळ तेंचि धरूं । मागील तें करूं उरी आतां ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – पिसुन–द्वाड, दुष्ट, आकुळीं–न कळण्यासारखे

अर्थ :– देवा, तुझीमाझी फार जुनी व आधीची सोयरीक आहे बंधू, लेक इत्यादी मग नतर आले १ वाटेकरी म्हणून ते आता विचारीत नसले तरी अजूनही करीन तशी सत्ता माझ्या हातात आहे २ लेकीला लेकरू होऊन नातू झाल्यावर मी जास्तच प्रपचात गुरफटून गेलो आणि मंगलमय प्रभूस अंतरलो. ३ बायकोचा भाऊ हा मोठा द्वाड सोयरा असतो म्हणूनच त्याच्याविषयी विनोद केला जातो. ४ जे कळण्यासारखे नाही त्यासंबंधी काही नये तेच केले त्यासंबंधी आता न बोलावे हेच भले ५ लेकी, मावशा, बहिणी इत्यादी काही म्हणू नये. कारण त्यांनी आम्हाला पापाचे धनविले आहे ६ या पाचाजणींनी माझी फार विटंबना केली; त्यामुळे लोकांना तोंड दाखवू नये असे झाले आहे ७ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आधी मूलस्थान धरूनच मागील उणीव काही ठेवणार नाही. ८

४०२४ मागें बहुत जाले खेळ । आतां बळ वोसरलें ॥ १ ॥
हालों नये चालों आतां । घट रिता पोकळ ॥ २ ॥
माजल्याची दिसे घडी । पट ओढी न साहे ॥ ३ ॥
तुका म्हणे पाहतां घडी । जगा जोडी अंगारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रिता–रिकामा, अंगारा–राख

अर्थ :– प्रपचाचे, व्यवहाराचे मागे पुष्कळ खेळ झाले त्यामुळे आता पूर्वीचे बळ ओसरून गेले आहे. १ आता काही हालचाल करण्याचे कारण नाही देहादी लौकिकाचा घट आता रिकामा झाला असल्यामुळे तो पोकळच राहिला आहे. २ एखादे वस्त्र माजून निघाले तरी त्याची घडी दिसते, पण ते हातात घेऊन पाहाताच त्याची घडी विसकटून जाते. तसे माझे झाले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जळलेल्या वस्त्राची घडी पाहू जाता जगाच्या हातास राखच लागेल ४

[1] लोक.

४०२५ आळस आला अंगा । धाव घालीं पांडुरंगा ॥ १ ॥
सोसूं शरीराचे भाव । पडती अवगुणाचे घाव ॥ २ ॥
करावीं व्यसनें । दुरी येउनि नारायणें ॥ ३ ॥
जवळील दुरी । जालों देवा धरीं करीं ॥ ४ ॥
म्हणउनि देवा । वेळोवेळा करीं धावा ॥ ५ ॥
तुका म्हणे पांडुरंगा । दुरी धरूं नका अंगा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – व्यसनें–संकटे

अर्थ – पांडुरंगा आमच्या अंगात आळस भरला आहे म्हणून तू धावत ये १ या शरीराचे धर्म आता सोसू तरी कुठं ? कारण त्यावर अवगुणाचे घाव एकसारखे पडत आहेत २ नारायणा तुम्ही स्वत येऊन आमच्या वरील ही संकटे दूर करा ना ३ देवा मी तुमच्या जवळच असणारा पण आता दूर झाला आहे, म्हणून तू मला हाताशी धरावेस ४ म्हणून तर देवा, मी वरचेवर तुमचा धावा करीत आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तुम्ही स्वत च्या अंगापासून आम्हास दूर धरू नका ६

४०२६ भवविली महारें । त्याची व्याली असे पोरें ॥ १ ॥
करी संताचा मत्सर । कोपें उभारोनि कर ॥ २ ॥
बीज तैसे फळ । वरी आलें अमंगळ ॥ ३ ॥
तुका म्हणे ठावें । ऐसें जालें अनुभवें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कोपें–रागानें

अर्थ – महाराने उपभोगल्यामुळेच पुढील प्रकारची पोरे या स्त्रीस झाली आहेत १ ही मुले रागाने हात वर करून संताचा मत्सर करतात २ बीज वाईट असल्यामुळे फळही तसेच वाईट आले ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे मला अनुभवाने समजले आहे ४

४०२७ पापी तो नाठवी आपुल्या संचिता । ठेवी भगवंता वरी बोल ॥ १ ॥
भेईना करितां पापाचे डोंगर । दुर्जन पामर दुराचारी ॥ २ ॥
नाठवी तो खळ आपुली करणी । देवासी निंदोनि बोलतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याच्या तोंडा लागो काटी । नाहीं जगजेठी जया चित्तीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नाठवी–आठवत नाही, खळ–दुष्ट

अर्थ – हा पापी मनुष्य आपल्या संचितकर्मास आठवत नाही उलट भगवंतावर मात्र बोल ठेवतो १ डोंगराएवढे पाप करताना कधी हा भीत नाही असा हा दुर्जन पापे आचरणारा असतो २ हा दुष्ट आपली वाईट करणी कधी आठवत नाही देवाला मात्र निंदा करून बोलत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या चित्तात जगजेठी प्रभू नाही त्याच्या तोंडावर काठी पडो ४

४०२८ आधीं देह पाहतां वाव । कैंचा प्रारब्धासी ठाव ॥ १ ॥
कां रे रडतोसी माना । लागें विठ्ठलचरणा ॥ २ ॥
दुजेपण जालें वाव । त्रिभुवनासि नाहीं ठाव ॥ ३ ॥
तुका म्हणे खरें पाहें । विठ्ठल पाहोनिया राहें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वाव-व्यर्थ, माना-मना

अर्थ :- आधी देह पाहिला तर तो व्यर्थच आहे. तेथे प्रारब्धाला कुठून स्थान मिळणार ? १ मना, तू उगाच का रडतोस ? विठ्ठलचरणास तू स्पर्श कर ना २ दुर्जेपणाची भावना व्यर्थ आहे. तिला त्रिभुवनांतही स्थान नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नीट खरे काय आहे ते पाहून सर्वत्र भरलेला विठ्ठल पाहा. ४

४०२९ स्त्रिया धन बा[1] हे खोटें । नागवले मोठे मोठे ॥ १ ॥
म्हणोनि सांडा दोनी । सुख पावाल निदानीं ॥ २ ॥
सर्वदुःखासी कारण । हींच दोन्हीचीं[2] प्रमाण ॥ ३ ॥
आशा सर्वस्वे साडावी । तेणे निजपदवी पावावी ॥ ४ ॥
देह लोभें नाडला । घाला यमाचा पडला ॥ ५ ॥
तुका म्हणे निरापेक्षा । कांहीं न धरावी अपेक्षा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- नागवले-फसवले, निदानीं शेवटी

अर्थ :- अरे, स्त्रिया व धन हे सर्व खोटे आहे याच्यामुळे मोठ मोठे फसले गेले आहेत. १ म्हणून तुम्ही या दोहोंना सोडून द्यावे. त्यामुळेच शेवटी तुम्ही सुखी व्हाल. २ सर्व प्रकारच्या दुःखांना याच दोन गोष्टी कारण झाल्या आहेत. ३ आशा सर्वस्वी सोडून द्यावी, आणि निजपदाची पदवी प्राप्त करून घ्यावी ४ देह लोभाने नाडला जातो व त्यावर यमाचा घाला पडतो. ५ तुकाराम महाराज म्हणतात, आपण कोणतीही अपेक्षा न धरता निरपेक्ष होऊन राहावे. ६

४०३० जेंजें व्हावे संकल्पें । तेचि पुण्य होय पाप ॥ १ ॥
कारण तें मनापासीं । मेळविल्या मिळे रसीं ॥ २ ॥
सांडो मांडी हाली चाली । राहे तरि भली बोली ॥ ३ ॥
तुका म्हणे सार । नांव जीवनाचे सागर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .- रसीं-विषयात, जीवनाचे-पाण्याचे

अर्थ – जो जो सकल्प करावा तो तो पाप पुण्यच होते. १ कारण हे सर्व आपल्या मनामुळे होते. ते ज्या विषयात मिळवावे त्याच विषयात ते रमून जाते. २ नाना प्रकारच्या खटाटोपाची हालचाल जर बंद राहील तरच चागली गती आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, पाण्याचे नाव सागर आहे हेच एक सार आहे. ४

४०३१ ओले मातीचा भरवसा । कां रे धरिशी मानसा ॥ १ ॥
डोळे चिरीव चांगले । वृद्धपणीं सरसया जाले ॥ २ ॥
नाक सरळ चांगलें । येउन हनवटी लागले ॥ ३ ॥
तुका म्हणे आले नाही । तंव हरिला भज रे कांहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- ओले मातीचा-मर्त्य देहाचा, चिरीव-रेखीव

अर्थ :- ओल्या मातीच्या बनलेल्या या देहाचा भरवसा माणसा, तू का धरतोस रे ? १ आज तुझे हे डोळे मोठे चांगले रेखीव व देखणे दिसतात, पण म्हातारपणी त्याची सरकीसारखी अवस्था होते २ आज नाक चांगले सरळ आहे. पण उद्या ते हनुवटीस येऊन लागेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, या प्रमाणे ते आले नाही तोपर्यंत श्रीहरीला भजावेस. ४

१ बहु, २ दोन्हीच प्रमाण.

विवरण–पंचमहाभूताचा बनलेला हा देह कधीतरी पंचमहाभूतात विलीन होणार. तो पाहीं टिकणार नाही. हा देह सुंदर, रेखीव, देखणा असल्यामुळे व तो श्रीहरीच्या प्राप्तीसही उपयोगी पडणारा असल्यामुळे त्याचे महत्त्व विशेष गणले आहे. पण मूलभूत तत्त्वाकडे लक्ष न गेल्यामुळे पुष्कळांचे लक्ष केवळ या देहावरच खिळून राहते. नाना इंद्रियविकाराना हा देह आधारभूत असल्याने विषयसुखानाच प्राधान्य देऊन सर्वस्व मानणाऱ्या लोकाना या देहाचे कोडकौतुक मोठेच वाटते. देहात विराजणारा प्रभू न ओळखता हा देह कुणाच्या सत्तेवर चालतो हे ध्यानात न घेता लोक या नष्ट होणाऱ्या देहावरच भाळतात.त्याला नटवू लागतात. नाकडोळे, केस, कटी, हातपाय इत्यादी अवयवाच्या बाह्यवर्णनात लोक दंग होतात. याच देहाचा व त्याच्या सुंदरतेचा वेध त्याना लागतो त्यावरच ते भाळतात. आणि देहवासी आत्मारामाला विसरून हे लोक देहाचे कोडकौतुक करून त्याचे फाजील लाड करायला प्रवृत्त होतात. अशा माणसाचे चित्त थोड्याफार प्रमाणात तरी देहबुद्धीवरून देहनिवासी ईश्वराकडे वळविण्यासाठी साधुसंत देहाचे खरे स्वरूप वर्णन करण्यास प्रवृत्त होतात. देहाबद्दलचा त्याचा हा तिटकारा त्याच्या वाङ्मयात प्रकट झालेला दिसतो. वरील अभंगात तुकोबांनी आता सरळ व देखणे वाटणारे नाक आणि रेखीव असणारे डोळे उद्या त्याप्रमाणे राहणार नाहीत असे सांगितले आहे. देहाला वार्धक्यता जोवर आली नाही व शरीर जोवर पंगू झाले नाही तोपर्यंतच श्रीहरीची आठवण व्हावयास पाहिजे असा संतबोधाचा निष्कर्ष आहे पण देहवादी माणसास हे पटत नाही त्याला आपण अमर आहोत, आपले सौंदर्य अक्षय टिकणारे आहे, आपले सुखविलास अजरामर आहेत असे वाटून तो देहसौख्यासाठी वाटेल त्या गोष्टी करायला प्रवृत्त होतो. म्हणून रामदासासारख्या सतपुरुषास देहाचे वास्तविक रूप पुढीलप्रमाणे वर्णन करावेसे वाटते. समर्थ रामदास म्हणतात,

'पाहतां शरीराचें मूळ। या ऐसें नाहीं अमंगळ। रजस्वलेचा जो विटाळ। त्यामध्यें जन्म याशी॥ वरिवरि दिसे वैभवाचें। अंतरीं पोतडें नरकांचें। जैसें झाकणे चर्मकुंडाचें। उघडितांच नये॥ नरकांचें कोठार भरलें। आंत बाहेरी लिडीबिडिलें। मूत्रपोतडें जमले। दुर्गंधीचे॥ डोळां निघतीं चिपडें। नाकीं दाटतीं मेकडे। प्रात:काळीं घाणी पडे। मुखीं मळासारिखी॥ लाळ थुंका आणी मळ। पीत श्लेष्मा प्रबळ। तयास म्हणती मुखकमळ। चंद्रासारिखें॥' अशा या देहाचे कोण कौतुक मानतात! पण हा देह जोपर्यंत शक्तिमान आहे, सामर्थ्यवान आहे तोपर्यंत तो प्रभुचरणी लावावा हे मात्र कुणासच उमगत नाही. पुढे या देहाला वार्धक्य आहे, रोगादी विकार आहेत, मृत्यू आहे. हे न जाणता माणसे इंद्रियविकारातच बेभान होतात तेव्हा ज्ञानेश्वरासारखे संत त्याना पुढील भयानक स्थितीची आठवण करून देतात. ते म्हणतात, 'पद्मदळेसीं इसाळें। भांडताति जे हे डोळे। ते होती पडवळें। पिकलीं जैसीं॥ या ओवीने सुरू झालेले तेराव्या अध्यायातील विवेचन मोठे उद्बोधक व सावध करणारे आहे. कमळाच्या पाकळीशी स्पर्धा करणारे हे डोळे उद्या पिकलेल्या पडवळाप्रमाणे होतील भुवईचे पडदे झाडाच्या जुन्या सालीप्रमाणे लोंबतील. बाभळीच्या खोडास ज्याप्रमाणे सरडा गिरवडून टाकतो त्याप्रमाणे तोंड थुंकीच्या धाराने गिरवडून जाईल. नाकात शेंबडाचे दुर्गंधीयुक्त बुडबुडे येतील. जे मुख विड्याने रंगते व ज्यातून सुहास्य बाहेर येते त्यातून उद्या कफाचा लोंढा बाहेर येईल. आज पुष्ट असणारे हे शरीर उद्या म्हाताऱ्या माकडासारखे बेडौल होईल. देहाची ही अशी अवस्था पुढे होणार आहे अशी सावधगिरी पत्करूनच माणसाने आजच श्रीहरीस आठवावे.

४०३२ तुम्हां सांगतों कलयुगा फळ। पुढे होईल ब्रह्मगोळ॥ १॥
आम्हां म्हणतील कंटक। ऐसा पाडिती दंडक॥ २॥
स्त्रिया पूजुनि सरे देती। मलते स्त्रियेसि मलते जाती॥ ३॥
श्रेष्ठ वर्ण वेदविद्वांस। अंगीकारी मद्यमांस॥ ४॥
चारी वर्ण अठरा याती। कवळ करिती एक पंक्ती॥ ५॥
म्हणती अंबेचा क्रीडाकल्लोळ। शिवरूप प्राणी सकळ॥ ६॥
ऐसें होइल[1] शकुन देतों। अगोदर सांगुन जातों॥ ७॥
तुका सद्गुरुदास्य करी। सिद्धि पाणी वाहे घरीं॥ ८॥

१ होल.

शब्दार्थ व टीपा :– ब्रह्मगोळ–सबगोलकार, सरे–मोत्यांच्या माळा.

अर्थ :– तुम्हांला मी या कलियुगाचे फळ सांगतो. पुढे सारा सबगोलंकार होणार आहे १ आमच्या सारख्यांना कंटक म्हणण्याचा दंडक निर्माण होईल. २ स्त्रियांची पूजा करुन त्यांना मोत्यांच्या माळा लोक अर्पण करतील. वाटेल त्या स्त्रीबरोबर वाटेल ते पुरुष जातील ३ वेद जाणणारा श्रेष्ठ ब्राह्मणवर्ग मद्यमांसाचा स्वीकार करील ४ चार वर्ण-ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र आणि अन्य जातीमधील सर्व लोक एका पंगतीस बसून भोजन करतील ५ ते म्हणत राहतील की, हा सर्व श्रीअंबेचा क्रीडा कल्लोळ आहे आणि सर्व प्राणी शिवरूप आहेत ६ अशा प्रकारे सर्व घडून येईल. याप्रमाणे मी अगोदर शकुन सांगून जात आहे. ७ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रसंगी श्रीसद्गुरुनाथाचे दास्य कराल तर तुमच्या घरी रिद्धीसिद्धी पाणी भरतील ८

४०३३ त्या हरिदासांची भेटी घेतां । नर्का उभयतासी जातां[1] ॥ १ ॥
माते परीस थोरी कथा । भाड घेतां न लाजे ॥ २ ॥
देतां घेतां नरकवासी । उभयतांसी रवरव ॥ ३ ॥
तुका म्हणे नरकगांवा । जाती हांवा धरोनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– थोरी–थोर, भाड–वाईट मार्गाने मिळविलेले द्रव्य, रौरव–एक प्रकारचा नरक

अर्थ :– पुढील चरणात सांगितलेल्या हरिदासांची भेट घेतल्यास उभयतांना नर्कास जावे लागेल १ ज्या हरिकथेची थोरवी मातेप्रमाणे, तिला विकून पैसे घेताना यांना लाज वाटत नाही. २ असे द्रव्य देणारा व घेणारा दोघेही नरकास जाणारे आहेत उभयतांना रौरव नरकाची प्राप्ती होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे हे लोक हाव धरून नरकास जातात ४

४०३४ देव गावा ध्यावा ऐसें जालें । परदेशी नाहीं उगलें[2] ।
वडील आणि धाकुलें । नाहीं ऐसें जालें दुसरे तें ॥ १ ॥
नाहीं लागत मुळीहूनि । सुहृदजन आणि जननी ।
लागल्या[3] लागें त्यागें सांडूनि । लोभीये मांडणी संयोगाची ॥ २ ॥
शिव[4] बाटला[5] जीववशें । बहुत ओतत आले ठसें ।
हीन जालें भूषणाचें इच्छे । निवडती कैसे गुणागुण ॥ ३ ॥
आता हे हुताश[6] तों घरें । अवघे एकच मोहरें ।
पिटिलियाविण नव्हे खरें । निवडे वरें जातिशुद्ध ॥ ४ ॥
तुका उतायेळ याजसाटीं । आहे तें निवेदीन पोटीं ।
आवडी द्यावी जी येथें लाटी । तुझी जगजेठी कीर्ती वाखाणीन ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– उगले–शांत, लागें–लाभाने, हुताश–अग्नी, लाटी–मोठी लाठी.

अर्थ :– आता मी परदेशी नसून शांत चित्ताने या देवाचेच गुणगान व ध्यान करावे असे झाले आहे. वडीलपण अथवा धाकटेपण नाहीसे होऊन दुजेपणाचा भावही संपलेला आहे. १ एका मूळच्या नात्याशिवाय मला इतर नातेवाईक व आई वगैरेची जरुरी नाही. या नात्यांचा जर काही लाभ झाला तर मी त्यांचा त्याग करीन; आणि लोभाने भेटीची व्यवस्था करीन २ हा शिवरूप असलेला परमेश्वरच जीवदशेने विस्तारलेला आहे. त्यामुळेच ठसे सर्वत्र उमटलेले दिसतात नाना भूषणाच्या इच्छेने त्यानेच हीन रूप धारण केले असल्याने येथे गुणावगुणाची निवड कशी करावी ? ३ आता या मोहरास अग्नीत टाकल्यानेच ती कसोटीस उतरणार आहे. घाव घातल्याशिवाय याची

1 जाणे, 2 उगवले, 3 लावल्या, 4 जीव, 5 वाटला, 6 उनाड.

शुद्ध जातीची निवड खरी ठरणार नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी यासाठीच उतावीळ झालो आहे. जे माझ्या मनात आहे तेच मी निवेदन करीत आहे जगजेठी, तुझी कीर्ती मी वर्णन करीन एवढीच माझी एक मोठी आवड आहे; ती तुम्ही पूर्ण करावी. ५

४०३५ भोगीं जाला त्याग । गीती गातां पांडुरंग ।
इंद्रियांचा लाग । आम्हांवरूनि चुकला ॥ १ ॥
करूनि ठेविलों निश्चळ । भय नाहीं तळमळ[1] ।
घेतला सकळ । अवघा भार विठ्ठलें ॥ २ ॥
तळीं पक्षिणीचे परी । नखें चोंचीं चारा धरी ।
आणुनियां घरीं । मुखीं घाली बाळका ॥ ३ ॥
तुका म्हणे ये आवडी । आम्हीं पायीं दिली बुडी ।
आहे तेथें जोडी । जन्मांतरींचे ठेवणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लाग–संबंध, जोडी–प्राप्ती.

अर्थ :– या पांडुरंगाचे नाम गीतांतून गाताना भोगाच्या ठिकाणीच त्याग निर्माण झाला आणि इंद्रियांचा संबंध आमच्याशी होता तो सपला १ मी माझे मन निश्चल करून ठेविले आहे त्यामुळे मला भय अथवा तळमळ वाटत नाही कारण आमचा सर्व भार विठ्ठलाने घेतलेला आहे. २ ज्याप्रमाणे पक्षीण पृथ्वीवर झडप घालते आणि चोचीत अथवा नखात चारा धरते व घरी येऊन बालकाच्या मुखात घालते ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याप्रमाणे आम्ही मोठ्या आवडीने श्रीहरीच्या पायी बुडी दिलेली आहे त्या ठिकाणी जन्मजन्मान्तरीच्या ठेव्याची, साठ्याची प्राप्ती आम्हांस होत असते ४

४०३६ कुंकवाची ठेवाठेवी । बोडकादेवी काशाला ॥ १ ॥
दिवस गमा भरा पोट । कां[2] गे नट[3] नटावा ॥ २ ॥
दिमाख हा कोणां दावा । लटकीं जीवा घरफड ॥ ३ ॥
तुका म्हणे झोडगी हो । फुंदा कां हो कोरडीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– बोडकादेवी–विधवा स्त्री, गमा–कठावेत, झोंगडी–निलाजरी, फुंदा–नखरा, ऐट

अर्थ :– बोडकादेवी, तुला कुंकवाची उठाठेव कशासाठी हवी ग ? १ कसे तरी पोट भरून तू दिवस कठावेस हा नटाप्रमाणे नटवेपणा कशासाठी ग ? २ हा सर्व दिमाख कुणासाठी आहे ? कुणाला दाखवायचा आहे? उगाच जीवास लटकी घरफड कशासाठी लावून घेतेस ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, निलाजऱ्या बाई, उगाच कशासाठी हा नखरा करीत आहेस ? ४

४०३७ तुझे प्रेम माझ्या हृदयीं आवडी । चरण न सोडीं पाडुरंगा ॥ १ ॥
कासया सिणविसी थोरियाकरणें । काय तुझें उणे होईल देवा ॥ २ ॥
चातकाची चिंता हरली जळधरें । काय त्याचे सरे थोरपण ॥ ३ ॥
चंद्र चकोराचा पुरवी सोहळा । काय त्याची कळा न्यून होय ॥ ४ ॥
तुका म्हणे मज अनाथा सांभाळीं । हृदयकमळीं स्थिर राहें ॥ ५ ॥

१ मळमळ, २ कोणे, ३ नेटनेटावा

शब्दार्थ व टीपा :- जळधरें-मेघानी, कळा-तेज, न्यून-कमी

अर्थ :- देवा, तुझे प्रेम माझ्या हृदयात असावे हीच माझ्या मनाची आवड आहे पांडुरंगा, मी तुझे चरण सोडणार नाही १ तुझ्या मोठेपणासाठी तू आम्हास उगाच का कष्ट देत आहेस ? देवा, तू जर आमच्याकडे लक्ष दिलेस तर तुझे काय कमी होणार आहे ? २ चातकाची तहान मेघानी दूर केली म्हणन त्याचे थोरपण सपते की काय ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मज अनाथाचा सांभाळ तुम्ही करावा, व माझ्या हृदयकमली तुम्ही स्थिर व्हावे ४

४०३८ आम्ही आइते जेवणार । न लगे सोसावे डोंगर । सुखाची वेव्हार । तेणेंचि वाढलें ॥१॥
ठेवा जोडला मिरासी । ठाव जाला पायांपासी । नव्हे आणिकांसी । रीघ तेथें यावया[1] ॥२॥
बळी दिला जीवभाव । नेणे आणिकांचें नांव । धरिला एक[2] भाव । तो विश्वास फळला ॥३॥
तुका म्हणे जालो बळी । आम्ही निकट जवळी । बोलिलो ते पाळीं । वचन स्वामी आमचे॥४॥

शब्दार्थ व टीपा :- ठाव-स्थान, आश्रय.

अर्थ - कामाचे डोंगर न सोसता आम्ही आयते वाढलेलेच जेवणार आहोत या योगाने सुखाचा व्यवहार वाढला जाणार आहे १ या देवाच्या पायांशी आम्हांस आश्रयस्थान मिळाले असल्यामुळे आमचा वडिलार्जित ठेवाच आम्हास मिळाल्याप्रमाणे झाला आहे आता या ठिकाणी इतरांना यावयास प्रवेश नाही २ येथे आम्ही आपला जीवभाव बळी दिला असून आम्ही इतर कुणाचे नाव जाणीत नाही येथेच आम्ही एकभावाने विश्वास धारण केला तो फलद्रुप झाला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या देवाच्या जवळ राहून वास्तव्य केले असल्यामुळे आम्ही बलवान झालो आहोत आम्ही जे काही बोलतो त्याप्रमाणे हा स्वामी आमचे वचन पाळतो ४

४०३९ न लगावी दिठी । माझी तुझे मुखवटी ॥ १ ॥
आधीं पाउलें पाउलें । तें मी पाहेन तें भलें ॥ २ ॥
देईन हे काया । वरि सांडणें सांडाया ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । बहु आवडसी जीवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- दिठी-दृष्टी, मुखवटी-मुखाला, काया-शरीर

अर्थ :- देवा, तुझ्या श्रीमुखाला माझी दृष्ट लागू नये १ म्हणून मी तुझी पावलेच आधी पाहीन तेच चागले होईल २ मी तुला माझे हे शरीर वर भरीस भर म्हणून देईन ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू माझ्या जीवास फार आवडतोस रे. ४

४०४० कोण आमचीं योगतपें । करूं बापें जाणावीं ॥ १ ॥
गीत संतसंगें गाऊं । उभीं ठाऊं जागरणीं ॥ २ ॥
आमुचा तो नव्हे लाग । करूं त्याग जावया ॥ ३ ॥
तुका म्हणे इंद्रियांसी । येचि रसीं रगवूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- ठाऊं-ठाकू, राहू, लाग-शक्ती

अर्थ - योग व तपादी साधने करणे आमचा बाप तरी जाणेल काय ? १ संतांच्या संगतीने आम्ही श्रीहरीचे गीत गाऊ आणि त्याच्या जागरणात ठामपणे उभे राहू २ सर्व इंद्रियविषयांचा त्याग करावा तर तेवढी शक्ती आमच्यांत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या नामरूपाच्या रसातच आम्ही आमच्या इंद्रियांना रंगवू ४

१ जावया, २ एकविध.

४०४१ नाम तारक भवसिंधु । विठ्ठल तारक भवसिंधु ॥ १ ॥
नामधारक तया अरि मित्रु । समता त्यागुनियां क्रोधु ॥ २ ॥
नामधारक तया । कदापि न घडे विषयाचा बाधु ॥ ३ ॥
ज्या नामें तरले शुकादिक । नारद संत मुनिजन साधु ॥ ४ ॥
जाणूनियां जे नसरें । ते नेणति जैसा गज अंधु ॥ ५ ॥
सहज तुकया । नामचि जपतां स्वरुपीं वेधु ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– अरि–शत्रू, गज–हत्ती.

अर्थ :– श्रीहरीचे नाम हे भवसिंधू तरून नेणारे आहे हा विठ्ठल भवसिंधू तारणारा आहे १ जो श्रीहरीच्या नामाचा धारक आहे, त्याला शत्रू आणि मित्र सारखेच वाटतात त्यांनी क्रोधाचा त्याग केलेला असतो. २ जो नामधारक आहे, त्याला कधीच नाना विषयांची बाधा होणार नाही. ३ शुकादिक मुनी, नारदादी संत, अनेक मुनिजन आणि साधुपुरुष या नामानेच तरले आहेत. ४ हे जाणूनही कधीच संपत नाही ज्याप्रमाणे आंधळ्या माणसांना हत्ती नीटपणे समजत नाही त्याप्रमाणे हे ही गोष्ट जाणीत नाहीत ५ परंतु तुकाराम महाराज म्हणतात, मला मात्र सहजपणे नामाचा जप करतानाच स्वरूपाशी वेध जडल्याचा लाभ होतो ६

४०४२ आम्हां वैष्णवांचा कुळधर्म कुळींचा । विश्वास नामाचा एका भावें ॥ १ ॥
तरीच हरिचे दास[1] म्हणवितां श्लाघीजे । निर्वासना कीजे चित्त आधीं ॥ २ ॥
गाऊं नाचूं प्रेमें आनंदें कीर्तनीं । भुक्ति मुक्ति दोन्ही न मगों[2] तुज ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा ऐसी यांची सेवा । द्यावी जी केशवा जन्मोजन्मीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– श्लाघिजे–स्तुतीस योग्य होतात

अर्थ :– या श्रीहरीच्या नामावर एकनिष्ठपणे विश्वास ठेवावा. हाच आम्हा वैष्णवांच्या कुळाचा कुळधर्म आहे. १ चित्तातील सर्व वासना दूर केल्या तरच हे श्रीहरीचे दास स्तुतीस योग्य होतात. २ देवा, या श्रीहरीच्या कीर्तनात प्रेमाने नाचून गीत गाऊ आम्ही काही तुला मुक्ती अथवा भुक्ती यांपैकी काहीही मागणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा प्रकारचे लक्षण ज्याचे आहे अशा संतांची सेवा मला जन्मोजन्मी घडावी. ४

४०४३ पावलों हा देह कागतालिन्यायें[3] । न घडे उपायें घडों आलें ॥ १ ॥
आतां माझीं खंडीं देह देहांतरें । अभय दातारें देऊनियां ॥ २ ॥
अंधळ्याचे पाठीं धनाची चरवी । अघटित तेंवि घडों आलें ॥ ३ ॥
तुका म्हणे योग घडला बरवा । आतां कास देवा न सोडीं मी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कागतालिन्यायें–कावळा बसायला आणि फांदी मोडायला एकच गाठ पडावी या योगायोगाने, चरवी–भांडे, हंडा, बरवा–चांगला.

अर्थ :– कावळा बसायला आणि फांदी मोडायला एक गाठ पडावी त्याप्रमाणे योगायोगाने अवचितपणे मला हा नरदेह प्राप्त झाला आहे. १ आता दात्या देवाने मला अभय देऊन यापुढे माझी जन्मजन्मान्तरे दूर करून देहांचाही नाश करावा. २ एखाद्या आंधळ्याला अवचितपणे धनाचा हंडा सापडावा त्याप्रमाणे अघटितपणे

१ भक्त, २ मागों, ३ ०टालि न्यायें

हे घडून आले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा नरदेह मिळण्याचा योग मोठा चांगला आला आहे. आता देवा, तुझी कास काही मी सोडणार नाही. ४

४०४४ कळे परि न सुटे गांठी । जालें पोटीं कुपथ्य ॥ १ ॥
अहंकाराचें आंदणें जीव । राहे कींव केली ते ॥ २ ॥
हेंकडाची एकीच वोढी । ते ही खोडी सांगती ॥ ३ ॥
तुका म्हणे सांगों किती । कांहीं चित्तीं न राहे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आंदणें–वाहिलेले, दिलेले, हेंकड–हेकट, हट्टी

अर्थ :– स्वहिताविषयी सर्व काही कळते, पण प्रपंचविषयाची गाठ काही सुटत नाही. काही पोटात कुपथ्यही झाले आहे. १ जीव हा अहंकारालाच वाहिलेला आहे. त्याची कीव तरी किती करावी ? २ या हेकटाची हीच एकच ओढ आहे. हीच खोड त्याला लागलेली आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, चित्तात काहीच राहात नाही. या संबंधी सांगावे तरी किती ? ४

४०४५ सांडावी हे भीड अधमाचे चाळे । मद्यपी[1] बरळे भलत्या छंदें ॥ १ ॥
ऐसे तंव तुम्ही नाहीं जी दिसत । कां हें अनुचित वदलेत ॥ २ ॥
फांटा जाला[2] त्यासी नाहीं वोढा वारा । वेरसाचि खरा हाटो[3] गुण ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं ज्याच्या बापा ताळा । तो देखे विटाळा संतां अंगीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अधमाचे–दुष्ट माणसाचे, फांटा–भटकणे, वोढा वारा–मर्यादा, सीमा, वेरसा–दांडगा, विचारशून्य, ताळा–हिशेब

अर्थ :– भीडभाड सोडून द्यावी हे अधम माणसाचे चाळे होत. मद्यपी मनुष्य भलते चाळे करून बरळत असतो. १ लोकहो, असे तर तुम्ही काही दिसत नाही मग हे असे भलतेच अनुचित का हो बोललात ? २ जो भटकत राहिला आहे त्याला कसलीच मर्यादा उरत नाही आणि विचारशून्य दांडगा असतो त्याचा गुण दूर जातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, बापा, ज्याचा काही हिशेब लागत नाही त्याचा संतांच्या अंगी विटाळ होतो. किंवा ज्याच्या बापाचा पत्ता लागत नाही तो संतांच्या अंगी दोष पाहतो. ४

४०४६ आवडे हें रूप गोजिरें सगुण । पाहातां लोचन[4] सुखावले ॥ १ ॥
आतां दृष्टीपुढें ऐसाचि तूं राहीं । जों मी तुज पाहें पांडुरंगा[5] ॥ २ ॥
लांचावलें मन लागलीसे गोडी । तें जीवें न सोडीं ऐसें जालें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही केली जे लडिवाळी । पुरवावी आळी मायबापें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आळी–हट्ट.

अर्थ :– देवा, तुझे हे सगुण व साजिरेगोजिरे रूप मला आवडते. त्याला पाहाताच माझे डोळे सुखावले गेले आहेत. १ पांडुरंगा, आता मी जसे तुला पाहात आहे तसाच तू माझ्या दृष्टीपुढे उभा राहा. २ तुझ्या या रूपाचीच माझ्या मनास गोडी लागली असून त्यासाठीच ते लालचावले आहे. जीव गेला तरी ते त्याला सोडणार नाहीत, असे झाले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही लडिवाळांनी जो जो हट्ट केला तो तो तुम्ही मायबापांनी पूर्ण करावा. ४

१ मद्यपीर, २ आला, ३ हा हो, ४ हे मन, ५ वेळोवेळां.

४०४७ तिळ एक अर्ध राई । सीतबुंद[1] पावे काई । तया सुखा नाहीं । अंतपार पाहतां ॥ १ ॥
म्हणउनी करा लाहो । नका मागें पुढें पाहो । अवघ्यामध्यें आहों । अवघे सावचित्त तों ॥२॥
तीर्थें न येती तुळणी । आजिया सुखाची धणी । जे कासी गयेहुनी । जीं आगळीं असती ॥३॥
येथें धरी लाज । वर्णा अभिमान काज । नाडला सहज । तुका म्हणे तो येथें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सीताबुंद–बिंदुमात्र, लाहो–लाभ

अर्थ :– एखाद्या तिळाएवढे अथवा अर्ध्या राईएवढे बिंदुमात्र जरी सुख मिळाले तरी त्याच्या सुखाला अंतपार नाही असे समजावे १ म्हणून याच सुखाचा लाभ होईल असे करा याविषयी मागेपुढे पाहू नका. सर्व इंद्रिये सावध आहेत तोपर्यंतच या सुखाचा लाभ करून घ्या २ काशी, गया इत्यादी क्षेत्रासारखी जी मोठी व श्रेष्ठ अशी तीर्थक्षेत्रे आहेत त्यांच्या तुलनेसही आजच्या या सुखाची तृप्ती येणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या ठिकाणी जो कुणी लाज धरील अथवा वर्णाभिमान धारण करील तो फसला जाईल ४

४०४८ विठोबाचे नाम ज्याचे मुखीं नित्य । त्या देखिल्या पतित उद्धरती[2] ॥ १ ॥
विठ्ठलविठ्ठल भावे म्हणे वाचे । तरी तो काळाचे दांत ठेंसी[3] ॥ २ ॥
बहुत[4] तारिले सांगो किती आता । ऐसा कोणी दाता दुजा नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे म्यां ही ऐकोनियां कीर्ती । धरिला एकांतीं हृदयामाजी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठेंसी–ठेचील, पाडील, दुजा–दुसरा

अर्थ :– ज्याच्या मुखात नित्य विठोबाचे नाम आहे त्याला पाहाताच पातकी लोकांचा उद्धार होतो. १ मोठ्या भक्तिभावाने जो वाणीने विठ्ठल विठ्ठल असे म्हणतो तो काळाचे सुद्धा दात ठेचील. २ नामस्मरणामुळे या देवाने कितीजणांचा उद्धार केला म्हणून सांगू ? असा दाता दुसरा कुणी झालाच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाची अशी ही कीर्ती ऐकून मी त्याला हृदयाशी धरले आहे. ४

४०४९ भोळे भक्त भाव धरिती मानसीं । त्यासी हृषीकेशी जवळीच ॥ १ ॥
भाव नाहीं मनीं अभाविक सदा । त्याचिया मी खेदा काय सांगों ॥ २ ॥
गणिकेसारिकीं नामें उद्धरिलीं । सज्ञानें पडिलीं खटाटोपीं ॥ ३ ॥
तुका म्हणे काय शुद्ध माझी जाति । थोर केली ख्याती हरिनामें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सज्ञानें–अहंकारी ज्ञानी

अर्थ :– भोळे भक्त मनात भाव धरतात म्हणून हा हृषीकेशी त्यांच्याच जवळ असतो. १ आणि ज्यांच्या मनात मुळीच भाव नसतो असे जे अभाविक नेहमी असतात त्यांच्या दुःखासंबंधी मी काय सांगावे ? २ गणिके-सारखी पापी स्त्री केवळ याच्या नामामुळे उद्धरून गेली, आणि अहंकारी ज्ञानी माणसे मात्र नाना प्रकारच्या साध-नांच्या खटाटोपात अडकून पडली ३ तुकाराम महाराज म्हणतात, माझी जात तरी अशी काय शुद्ध होती ? पण या हरिनामामुळे थोर कीर्ती सर्वत्र पसरली. ४

४०५० आड पडे काडी । तरि ते बहुत[5] पाणी खोडी ॥ १ ॥
दुर्जनाचे संगती । बहुतांचे घात होती ॥ २ ॥
एक पडे मासी । तरी ते बहु अन्न नासी ॥ ३ ॥
तुका म्हणे रांड । ऐसी कां ते व्याली भांड ॥ ४ ॥

१ सीतबिंदु, उद्धरिलि, ३ ठेंचि, ४ बहुता, ५ बहु पाणी मोडी.

शब्दार्थ व टीपा :- खोडी-दोष, प्रतिबंध, भाड-भाडखोर

अर्थ :- पाण्यामध्ये काठी जरी आडवी टाकली तरी त्या पाण्यात प्रतिबंध निर्माण होऊन अनेक प्रकारचे दोष निर्माण होतात १ त्याचप्रमाणे दुर्जनाच्या संगतीत पुष्कळ प्रकारचे आघात होतात २ अन्नामध्ये एखादी जरी माशी पडली तरी ते सर्व अन्न नासून जाते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या भांडखोर व दुष्ट माणसास ही रांड व्यर्थ का व्याली ? ४

४०५१ पंढरीचें बा भूत मोटें । आल्या गेल्या झडपी वाटे¹ ॥ १ ॥
तेथें जाऊं नका कोणी । गेले नाहीं आले परतोनि ॥ २ ॥
तुका पंढरीसी गेला । पुन्हा जन्मा नाहीं आला ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- मोटें-मोठे

अर्थ :- या पंढरीस नांदणारे भूत फारच मोठे आहे. ते या वाटेने जे कुणी येतील-जातील त्यांना झपाटते १ या ठिकाणी कुणी जाऊ नका हो. कारण येथे जे कुणी गेले ते परतच फिरले नाहीत २ तुकाराम महाराज म्हणतात, मी जो एकदा या पंढरपुरास गेलो ते पुन म्हणून जन्मगावास आलोच नाही ३

४०५२ बरवे दुकानीं बैसावें । श्रवण मनन असावें ॥ १ ॥
सारअसाराची² पोती । ग्राहिक पाहोनि करा रितीं ॥ २ ॥
उगेचि फुगवूं नका गाल । पूर्ण सांठवावा माल ॥ ३ ॥
सत्य तराजू पैं धरा । नका कृत्रिम विकरा ॥ ४ ॥
तुका जाला वाणी । चुकवुनि चौऱ्यासीच्या खाणी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- बरवे-चागले, रितीं-रिकामी

अर्थ :- चांगले दुकानी बसावे आणि श्रीहरीचे अनुसधान श्रवणात व मननात कायमचे धरावे. १ नीट गिऱ्हाईक पाहून सार-असाराची पोती रिकामी करावीत. २ उगाच गाल न फुगवता मालाचा साठा पूर्णपणे करावा ३ सत्याचा तराजू नीटपणे धरा. आणि कृत्रिमपणे विक्री करू नका. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी वाणी असून चौऱ्याऐंशी लक्ष जन्माच्या खेपा चुकविल्या आहेत ४

विवरण - तुकोबा वृत्तीने म्हणजे व्यवसायाने वाणी होते त्यामुळे त्यांच्या अभगात स्वतःच्या व्यवसायातील अनेक शब्द येतात. माल, भाडवल, पेठ, व्यापार, बदरीचे तारू, हिशेब, व्यवहार इत्यादी शब्दाप्रमाणेच आपल्या व्यवसायाचे उल्लेखही त्यांनी केले आहेत 'याती शूद्र वैश्य केला व्यवसाय' या आत्मनिवेदनपर अभंगातही त्यांनी आपल्या वैश्य व्यवसायाची नोंद केलेली आहे देवाशी प्रेमकलह करतानाही आपली हिशेबी वृत्ती तुकोबा वारंवार प्रकट करतात 'जातीचे वाणी मी पोटीचे कुडें । नका मजपुढें ठकाठका' असे एका अभगात म्हटले आहे. अर्थात् तुकोबा जन्माने व वृत्तीने सावकारकी व वैश्य व्यवसाय करणारे असले तरी त्यांचे पुढे सारे चित्त श्रीहरीच्या नामस्मरणात रगून गेले. त्यांचा 'माल' निराळा झाला त्याचे 'ग्राहक' निराळे झाले. त्यांनी सत्याचा तराजू हाती धरला होता. 'कृत्रिम विकरा' करण्याच्या ते विरुद्ध होते म्हणून त्यांचे समकालीन रामेश्वर भट त्यांच्याविषयी म्हणतात, 'तैसा नव्हे तुका वाणी व्यवसायी' इतर व्यावसायिक वाण्यापेक्षा तुकोबा वेगळ्याच प्रकारचे वाणी होते

४०५३ काय करूं आतां या मना । न संडी विषयांची वासना ।
प्रार्थितां ही राहेना । आदरें पतना नेऊं पाहे ॥ १ ॥
आतां धांवें धांवें गा श्रीहरी । गेलों वांयां नाहीं तरी ।
न दिसे कोणी आवरी । आणीक दुजा तयासी ॥ २ ॥

१ नेटें, २ सारासाराची.

न राहे एके ठायीं एकी घडी । चित्त तडतडा तोडी ।
भरले विषयभोवडीं । घालूं पाहे उडी भवडोहीं ॥ ३ ॥
आशा तृष्णा कल्पना पापिणी । घात माडला माझा यांणीं ।
तुका म्हणे चक्रपाणी । काय अजोनि पाहातोसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सडी–सोडीत, दुजा–दुसरा

अर्थ .– देवा, माझ्या या मनास आता मी करू तरी काय ? ते काही विषयाची वासना सोडीत नाही. किती जरी याची प्रार्थना केली तरी ते मोठ्या आदराने मला अधोगतीस नेत आहे १ श्रीहरी, आता तू लौकर धावत ये. नाही तर आता मी वाया गेलो आहे माझ्या मनास आवरून धरेल असे आता दुसरे कुणीही दिसत नाही. २ माझे चित्त एका स्थानावर एक क्षणभर देखील राहात नाही ते तडातड मला तोडते आणि विषयाच्या भोवडीत सापडते व भवसागराच्या डोहात उडी घालू पाहते ३ तुकाराम महाराज म्हणतात, आशा, तृष्णा, कल्पना या पापिणींनी माझा नाश माडला आहे चक्रपाणी देवा, तू अजून वाट कशाची पाहात आहेस ? ४

विवरण — या अभगात तुकोबानी आपल्या अवखळ व अनावर मनाची गती कशी आहे याच मोठे प्राजल प्रकटन केले आहे मन हे अनावर आहे, विषयात गुतून राहाणार आहे, श्रीहरीच्या पायाशी कधी स्थिरावत नाही, प्रमाथी आहे याचा अनुभव सर्वत्रच येण्यासारखा आहे तुकोबाच्या मनात वैराग्य निर्माण झाल्यावर त्यांनी आपले चित्त प्रभूच्या चिंतनात, नामस्मरणात लावण्याचे प्रयत्न सुरू केले 'तुका म्हणे मना पाहिजे अंकुश' या उक्तीप्रमाणे त्यानी आपल्या मनाला सतत अकुश लावण्याचा प्रयत्न केला अंतर्बाह्य जगतात त्याना रात्रंदिवस युद्धाचा प्रसग करावा लागला तुकोबाच्या या मनोमथनाचा रेखीव आणि सुस्पष्ट असा आलेख त्यांच्या अभगातून दिसतो वैराग्याच्या पोटी आलेले आत्मनिवेदन आणि उद्धारासाठी लागलेली तळमळ यामुळे तुकोबाच्या अतर्मनात चाललेला हा सग्राम काहीसा उग्र वाटला तरी त्यातील अतिशयोक्ती वजा करता तो त्याच्या मन स्थितीचा निदर्शक आहे असेच म्हणावे लागेल

मानवी मन हे मूळातच भारी चचल 'अचपळ मन माझें नावरे आवरीता' म्हणून रामदासानाही कबुली धावी लागली होती 'चचल हि मन कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् । तस्याहं निग्रह मन्ये वायोरिव सुदुष्करम्'–मन हे फार चचल, दाडगे, बलिष्ठ व दृढ म्हणजे वळविण्यास भारी कठीण आहे वाऱ्याप्रमाणे म्हणजे वाऱ्याची मोट बाधावी त्याप्रमाणे त्याचा निग्रह करणे मला अतिशय दुष्कर वाटते असी अर्जुनाचीही कबुली आहे अशा या चचल मनास वळणीवर आणण्याचे उपाय गीतने सांगितले आहेत 'अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते' अभ्यासाने आणि वैराग्याने ते स्वाधीन ठेवता येते असाच अभ्यास तुकोबाचा चालू होता त्याचे अनेक धागेदोरे त्यांच्या आत्मिक प्रवासात प्रकट झालेले दिसून येतात 'आता सोडविणे धावा नारायणा । मज हे वासना अनावर म्हणून तुकोबानी तक्रार केलेली आहे कधी ते आपल्या मनास विनती करतात, 'अधीर माझ्या मना ऐके करी मात । तू का रे दुश्चित्त निरतर ॥' आपले मन ससाराच्या बाह्य पसाऱ्यात गुरफटून जाते याचीही खती बुवाच्या मनाला सतत आहे 'काम क्रोध आड पडले पर्वत । राहिला अनत पलीकडे ॥ नुलघावे मज न सापडे वाट । दुस्तर हा घाट वैरियाचा' म्हणून त्यानी स्वतःच्या व्यथित मनाची कथा निवेदन केली आहे 'इंद्रियाची आम्ही पागिरों अकितें । त्याचे रगीं चित्त रगलेसे' असी त्यानी आपल्या मनाची कठोर परीक्षा केली आहे 'एकाचेही मज न घडे दमन । अवघी नेमून कैसी राखों ?' असा त्यांच्यापुढे प्रश्न आहे 'इंद्रियाचीं दिने । आम्ही केला नारायणे' म्हणून त्यानी कबुली दिलेली आहे मनाला इंद्रियासहित कोडून दामटून ठेवाने तरी अडचण येते कारण या मनाचा स्वभाव असा की, 'अधिक कोडिता चरफडी । मलतीकडे घाली उडी ॥ काय करू या मना आतां । न विसरते पढरीनाथा ?' असा त्यांनी प्रश्न केला आहे या मनाची खोड पाहा कशी आहे ती, 'भजन नावडे श्रवण । धावे विषय अवलोकून । बहुत चचल चपळ । जातां येतां नलगे वेळ' अशा परिस्थितीत भगवद्चिंतन, वैराग्य, अनुताप, सतसगत, नामसकीर्तन यांच्या साह्याने तुकोबा आपल्या मनास वळण लावीत होते

४०५४ पाषाण परिस भूमि जांबूनद[1] । वंशाचा संबंध धातयाचा ॥ १ ॥
सोनियाची पुरी समुद्राचा वेढा । समुदाय गाढा[2] राक्षसांचा ॥ २ ॥
ऐसी सहस्र त्या सुंदरा कामिनी । माजी मुखरणी[3] मंदोदरी ॥ ३ ॥
पुत्रपौत्राचा लेखा कोण करी । मुख्य पुत्र हरी इंद्रा आणि ॥ ४ ॥
चौदा चौकडिया आयुष्यगणना । बंधुवर्ग जाणा कुंभकर्ण ॥ ५ ॥
तुका म्हणे ज्याचे देव बांदवडी । सागाते कवडी गेली नाहीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- जांबूनद-सोने, धातयाचा-ब्रह्मदेवाचा, मुखरणी-मुख्य, बांदवडी-बंदिवान

अर्थ :- रावणाच्या लंकेत सर्व दगड परीसच होते आणि भूमी सुवर्णाची होती त्याच्या वंशाचा संबंध प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचा होता. १ सर्व लंकानगरी सुवर्णाची असून त्याच्या भोवती समुद्राचा वेढा पडलेला होता तेथे राक्षसाचा मोठा समुदाय होता २ रावणाला स्वरूपवान अशा ऐंशी हजार स्त्रिया होत्या आणि त्यामध्ये मुख्य पट्टराणी मंदोदरी नावाची होती. ३ रावणास मुले, नातवंडे, पणतू यांचीही संख्या मोजता न येणारी होती त्याच्या मुख्य पुत्राने इंद्रासही जिंकले होते ४ एक चौकडी म्हणजे चार युगे, याप्रमाणे चौदा चौकड्यांचे आयुष्य रावणास लाभलेले होते त्याचा पाठीराखा बंधू कुंभकर्ण नावाचा होता ५ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या रावणाने सर्व देवाना बंदिवान केले होते त्याच्याबरोबर त्याची कवडीही गेली नाही ६

विवरण – कितीही मानसन्मान व संपत्ती यांची प्राप्ती झाली तरी प्रभूची स्मृती राहिली नाही तर शेवटी काय अवस्था होते याचे उदाहरण म्हणून नेहमी रावणाचे देण्यात येते सुवर्णाने मढविलेल्या लंकेचा राजा रावण शेवटी एक कवडीही बरोबर न घेता गेला अशी त्याची ख्याती तुकोबांनी या अभंगात दिली आहे त्याची अरेरावी, त्याचा दुष्टावा, त्याची तामसी वृत्ती, त्याची अहंकारी वासना याचा शेवट कसा झाला हे सर्वांना माहीत आहेच. रावण हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र असून पुलस्त्य ऋषीच्या विश्रवानामक पुत्राचा कैकसी नावाच्या पत्नीपासून झालेला हा मुलगा कुंभकर्ण, शूर्पणखा, बिभीषण ही याचीच भावंडे यात बिभीषण तेवढा सन्मार्गी होता गोकर्ण क्षेत्रात तपश्चर्या करून रावणाने ब्रह्मदेवास प्रसन्न करून घेतले रावणाने इंद्रादी देवाकडून अवध्यत्व, त्रिभुवनविजयित्व व सर्व प्रकारचे ऐश्वर्य असे वर मागितले 'मज घडावी विष्णुभक्ति । देवब्राह्मणाचे ठायीं आर्ती । नामस्मरण अहोरात्री । विसर चित्तीं न पडावा,' अशी मागणी फक्त बिभीषणाने केली याउलट रावणाने सर्व प्रकारचे ऐश्वर्य मागितले या ऐश्वर्याने तो मदोन्मत्त झाला त्याने देवाना बंदिखान्यात टाकले अनन्वित प्रकारचे जुलूम केले शेवटी रामाच्या हातून त्याचा शेवट झाला त्याच्या सर्व ऐश्वर्याचा नाश झाला त्याच्याबरोबर एक कवडीही गेली नाही तुकारामबुवांनी या घटनेचा उल्लेख आणखीही एका ठिकाणी केलला आह 'लंकेमाजी घरें किती तीं आइका,' या अभंगात त्यांनी शेवटी म्हटले आहे, 'तुका म्हणे ज्याची संपदा एवढी । सांगातें कवडी गेली नाहीं '

४०५५ पापाचीं संचितें देहासी दंडणा[4] । तुज नारायणा बोल नाहीं ॥ १ ॥
पेरी कडू जिरें मागे अमृतफळें । अर्का वृक्षा केळें कैसीं येती ॥ २ ॥
सुख अथवा दुःख भोग हा देहाचा । नास हा ज्ञानाचा न करावा ॥ ३ ॥
तुका म्हणे आता देवा कां रुसावे । मनासी पुसावे काय केले ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- अर्का-रुईचे झाड

अर्थ – केलेल्या पापाचे जसे संचित असेल त्याप्रमाणे देहास शासन होत राहाणार नारायणा, या बाबतीत तुझ्याकडे काही बोल नाही १ कडू जिरे पेरून त्याच्यापासून अमृतासारखी मधुर अशी आंब्याची फळे कशी

१ जांबूनद, २ रोकडा, ३ मुख्य राणी, ४ दंडण

येतील ? रुईच्या झाडास गोड केळी कशी येतील ? २ सुख अथवा दु.ख हा देहाचाच भोग आहे. या ज्ञानाचा नाश करू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता या संबंधी देवावर का रुसावे ? आपल्या मनाने काय केले याची आधी नीट चौकशी करावी हे बरे. ४

४०५६ लाभ पुढें करी । घात नारायण वारी ॥ १ ॥
ऐसी भक्ताची माउली । करी कृपेची साउली ॥ २ ॥
माय बाळकासी । जीव भाव वेची तैसी ॥ ३ ॥
तुका म्हणे नाड । नाहीं शरणागता आड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वारी–दूर करतो, नाड–अडचण, प्रतिबंध.

अर्थ :– हा नारायण आपल्या भक्तांच्या पुढे लाभ करून त्यांच्यावरील आघात दूर करीत असतो. १ अशी ही या भक्तांची माऊली आहे. ती आपल्या कृपेची सावली त्यांच्यावर करीत असते २ आई ज्या प्रमाणे आपला जीव खर्चून आपल्या बालकाचे रक्षण करीत असते त्याप्रमाणे हा श्रीहरी भक्तांचे रक्षण करतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाला जे शरण आले आहेत त्यांना कसलीही अडचण येत नाही. ४

४०५७ आपुलेंसें करुनी घ्यावें । आश्वासावें नाभीसें ॥ १ ॥
म्हणउनि धरिले पाय । आवो माय विठ्ठले ॥ २ ॥
कळलासे सीण चित्ता । शम आतां करावा ॥ ३ ॥
तुका म्हणे जीवीं वसें । मज नसें वेगळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नाभीसें–भिऊ नकोस असे, शम–शांत.

अर्थ :– देवा, तू आम्हांस आपलेसे करून घ्यावेस आणि ' भिऊ नकोस ' असे आश्वासन द्यावेस १ अगे, माय विठ्ठले, म्हणून मी तुझे पाय धरले आहेत. २ देवा, माझ्या चित्तास किती क्षीण होतो हे तुला समजले असेल आता तू माझे चित्त शांत करावेस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू माझ्यापेक्षा वेगळा नसल्यामुळे माझ्या जीवात निवास करून राहा ४

४०५८ तुजविण कांहीं । स्थिर राहे ऐसें नाहीं ॥ १ ॥
कळों आलें बहुता रीती । पांडुरंगा माझ्या चित्तीं ॥ २ ॥
मोकलिली आस । सर्वभावें जालों दास ॥ ३ ॥
तुका म्हणे तूंचि खरा । येर वाउगा पसारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मोकलिली–सोडली, आस–इच्छा, वाउगा–व्यर्थ.

अर्थ :– देवा, या जगतात तुझ्याशिवाय स्थिर असे काही नाही. १ पांडुरंगा, हे मला अनेक रीतींनी समजून आले २ मी आता आशा सोडून सर्व भावांनी तुझा दास झालो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तूच एक खरा आहेस. बाकी सर्व पसारा व्यर्थच आहे. ४

४०५९ खोंकरी आधण होय पाकसिद्धि । हें तों घडों कधीं शकेचि ना ॥ १ ॥
खापराचे अंगीं घासितां परिस । न पालटे कीस काढिलिया ॥ २ ॥
पालथे घागरी रिचवितां जळ । तुका म्हणे खळ तैसे कथे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– खोंकरीं–फुटक्या भांड्यात.

अर्थ :– एखाद्या फुटक्या भांड्यात आधण ठेवून कुणी स्वयंपाक करण्याचा प्रयत्न केला तर तो कधीही सिद्धीस जाणार नाही. १ खापराच्या अंगी परीस घासून काय होणार ? त्याचा कितीही कीस काढला तरी काही त्याच्या गुणात पालट होणार नाही. २ पालथ्या घागरीवर कितीही पाणी ओतून ते रिचविले तर त्याचा काय उपयोग ? तुकाराम महाराज म्हणतात, हे दुष्ट लोकही त्याप्रमाणेच होत. ३

४०६० नागलें देखोनि चांगलें बोले । आपुलें वेचूनि त्याजपुढें खुले ॥ १ ॥
अधमाचे ओंगळ गुण । उचित नेणें तो धर्म कोण ॥ २ ॥
आर्तभूता न घाली पाण्याचा चुळ । न मागे त्यासी घाली साखर गुळ ॥ ३ ॥
एकासी आड पडोनि हौंकरी । एकासी देखोनि लपवी भाकरी ॥ ४ ॥
एकासी धड न बोले वाचा । एकासी म्हणे मी तुझे बांदीचा ॥ ५ ॥
तुका म्हणे ते गाढवपशु[१] । लाभेंविण केला आयुष्यनाशु ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– नागलें–श्रीमंत, वेचूनि–खर्च करून, अधमाचे–दुष्ट माणसाचे, हौंकरी–होकार, बांदी–बटीक.

अर्थ :– एखादा श्रीमंत मनुष्य दिसला की त्याच्याशी लोक चांगले भाषण करतात. आपल्या पदरचे खर्चून त्याच्यापुढे खुलतात १ असे हे दुष्ट माणसाचे गुण ओंगळवाणे असतात तो उचित असे कर्तव्यकर्म जाणीतच नाही. मग धर्म तरी तो काय करणार ? २ जो तहानेने व्याकूळ झालेला आहे त्यास कधी पाणी घालीत नाहीत, पण जो काही कधीच मागत नाही त्याच्या मुखात मात्र साखर व गूळ यांचे पदार्थ घालतात. ३ एखाद्यास आडवे पडून मोठ्याने होकार देतात, तर एकास पाहून भाकरीही लपवितात ४ एका मुखाने धड बोलतही नाहीत, तर दुसऱ्या एकास म्हणतात की, मी तुझ्या बटकीचाही सेवक आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या गाढवपशूंनी कोणत्याही लाभाशिवाय आयुष्याचा नाश केला आहे. ६

४०६१ पिंडपोषकाच्या जळो ज्ञानगोष्टी । झणी दृष्टिभेट न हो त्याची ॥ १ ॥
नाहीं संतचिन्ह उमटलें अंगीं । उपदेशालागीं पात्र जाला ॥ २ ॥
पोहों नेणे[२] कासे लावितो आणिका । म्हणावें त्या मूर्खा काय आतां ॥ ३ ॥
सिणलें तें गेलें सिणलियापासीं । जाली त्या दोघांसी एक गति ॥ ४ ॥
तुका म्हणे अहो देवा दिनानाथा । दरुषण आतां नको त्याचें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पिंडपोषकाच्या–देहाचे पोषण करणाऱ्याच्या, झणी–नये.

अर्थ :– जे लोक केवळ आपल्याच देहाचे पोषण करतात त्यांच्या आत्मज्ञानविषयक गोष्टी जळून जावोत त्यांची दृष्टिभेटसुद्धा मला होऊ नये. १ यांच्या अंगात एकही संतचिन्ह उमटलेले नसतानाही दुसऱ्यांना उपदेश करण्यासाठी कसे पात्र होतात ? २ आपणांस स्वतःस पोहता येत नसतानाही इतरांना आपल्या कासेस लावले तर त्या मूर्खाला आता काय म्हणावे ? ३ एक श्रमलेला मनुष्य दुसऱ्या श्रमलेल्यापाशी गेला तर त्या दोघांचीही गती एकच होणार. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अहो दीनानाथा, आता अशा लोकांचे दर्शनही आम्हांला नको. ५

४०६२ संतचिन्हें लेऊनि अंगीं । भूषण मिरविती जगीं ॥ १ ॥
पडिले दुःखाचे सागरीं । वहावले ते भवपुरीं ॥ २ ॥

१ गाढवपशु, २ नये.

कामक्रोधलोभ चित्तीं । वरिवरि दाविती विरक्ती ॥ ३ ॥
आशापाशीं बांधोनि चित्त । म्हणती जालो आम्ही मुक्त ॥ ४ ॥
त्याचे लागले संगती । जाली त्यासी[1] तेचि गति ॥ ५ ॥
तुका म्हणे शब्दज्ञाने । जग नाडियेले तेणें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – भवपुरीं–संसाराच्या पुरात

अर्थ – हे लोक बाह्यात्कारी अशी सतचिन्हे अंगावर धारण करून या जगात भूषण मिरवतात १ यामुळे हे लोक भवसागराच्या पुरात पडून वाहात जातात २ यांच्या चित्तात काम, क्रोध लोभ इत्यादी विकार असून वरवर मात्र मुक्ती मिळाल्याचा देखावा करतात ३ अनेक विषयाच्या आशापाशात यांचे चित्त गुतलेले असूनही आम्ही मुक्त झालो असे हे उगाचच म्हणतात ४ अशा लोकांच्या संगतीस जे लागतात त्यांची तशीच गती होत राहाते ५ तुकाराम महाराज म्हणतात अशा प्रकारच्या लोकांनी कोरडे शब्दज्ञान सांगून जगास फसविले आहे ६

४०६३ दोष करूनि आम्ही पतित सिद्ध जालो । पावन मागो आलो ब्रीद तुझें ॥ १ ॥
आतां पतिता तारावे कीं ब्रीद हें सोडावे । यांत जें पुरवे तेंचि सांगा ॥ २ ॥
उद्धार तुमच्याने नव्हे हो[2] श्रीहरि । सोडा झडकरी ब्रीद आता ॥ ३ ॥
तें ब्रीद घेउनी हिंडो दारोवारीं । सांगू तुझी कीर्ती रे पांडुरंगा ॥ ४ ॥
देवें हारविले ब्रीद हें सोडिले । पतितें जिंकिले आम्हीं देवा ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्हीं उठलो दैन्यवरि । विचारा श्रीहरी तुम्ही आता ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – ब्रीद–प्रतिज्ञा बाणा विचारा–विचार करा

अर्थ – देवा, नाना प्रकारचे दोष आचरून आम्ही पतित झालो आता तुझे पतितपावन हे ब्रीद खरे करून दाखीव म्हणून सांगण्यासाठी आलो आहे १ आता तुम्ही मला पतिताला तारावे अथवा पतितपावन हे ब्रीद तरी सोडावे यांत तुम्हास जे काय परवडेल ते मला सांगा २ श्रीहरी तुमच्याने माझा उद्धार जर होणार नसेल तर तसे सांगा आणि मग पतितपावन हे ब्रीद तुम्ही सोडून द्यावे ३ मग ते तुमचे ब्रीद घेऊन मी दारोदारी हिंडेन आणि मग पांडुरंगा तुझी सारी कीर्ती सर्वत्र सांगेन ४ ती अशी की या देवाने हे ब्रीद हरवले असेच सोडून दिले आम्ही पतितांनीच या देवास जिंकले ५ तुकाराम महाराज म्हणतात आम्ही आमच्या दैन्यावर असे उठलोच आहोत श्रीहरी, तुम्ही मात्र याचा विचार करावा ६

४०६४ राम कृष्ण ऐसीं उच्चारिता[3] नामें । नाचेन मी प्रेमें संतांपुढें ॥ १ ॥
काय घडेल तें घडो ये सेवटीं । लाभ हाणी[4] तुटी देव जाणे ॥ २ ॥
चिंता मोह आशा ठेवुनि[5] निराळी । देईन हा बळी जीव पायीं ॥ ३ ॥
तुका म्हणे काहीं उरो नेदी उरी । सांडीन हे थोरी ओवाळोनी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हाणी–हानी, उरी–उणीव, कमतरता सांडीन–टाकून देईन

अर्थ – राम, कृष्ण अशा नावाचा उच्चार करून मी संतांच्या पुढे प्रेमाने नृत्य करीन १ यामुळे शेवटी लाभ अथवा हानी काय होणार असेल ते देव जाणे २ चिंता मोह, आशा इत्यादी विकारांना दूर ठेवीन आणि मी माझा जीव यांच्या पायी बळी देईन ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासंबंधी मी काही एक उणीव ठेवणार नाही मी आपला सारा थोरपणा या संतांवरून ओवाळून टाकीन ४

१ त्याची, २ तो ३ उच्चारीन, ४ आणि ५ ठेवीन

४०६५ देव धरी नाना सोंगें । नाम श्रेष्ठ पांडुरंग ॥ १ ॥
तो हा गवळियाचे घरीं । नाम सारितो मुरारि ॥ २ ॥
धन्य यशोदेचें प्रारब्ध । नाचे अंगणीं गोविंद ॥ ३ ॥
ऐशीं[1] भक्तांसाटीं देवें । नाना धरियेलीं नांवें ॥ ४ ॥
होय दासांचा जो दास । तुका म्हणे विठ्ठलास ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– सारितो–शोभवितो.

अर्थ :– देव नाना प्रकारची सोंगे धारण करतो. यात या पांडुरंगाचे नाम श्रेष्ठ आहे. १ हाच देव गवळ्यांच्या घरी मुरारी या नामाने शोभतो २ या यशोदेचे प्रारब्ध पाहा केवढे धन्य आहे. तिच्या अंगणात हा गोविंद प्रेमाने नाचतो. ३ अशा या भक्तांसाठी या देवाने नाना प्रकारची नामे धारण केली आहेत. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी या विठ्ठलाच्या दासांचा दास आहे. ५

४०६६ आइत्या भाग्या[2] धणी व्हावें । केणें घ्यावें न सरे तें ॥ १ ॥
केणें आलें पंढरपुरीं । उधाराचें लाभीक ॥ २ ॥
बाखराची करुनी रीती । भरा पोतीं लवलाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे संतांपाडें । करूं पुढें वाखती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– केणें–धन, उधाराचें–उधार असून अथवा उद्धार करणारे, लाभीक–लाभ घडवून देणारे, बाखराची–आतील माल, संतांपाडें–संतांप्रमाणे, वाखती–खोळ, पोते.

अर्थ :– हे जे आयते आलेले भाग्य आहे त्याचे तुम्ही मालक व्हावे व न संपणारे असे हे धन तुम्ही साठवून घ्यावे. १ असे हे धन पंढरपुरात आले आहे हे उधार असूनही लाभ घडवून देणारे आहे अथवा हे उद्धार करणारे असल्याने लाभाचे आहे. २ तुमच्या देहरूपी पोत्यात जो माल आधीच भरलेला आहे, तो ओतून टाकून पोते रिकामे करा, आणि या धनाने ते भरा ३ तुकाराम महाराज म्हणतात, या पूर्वीच्या संतांप्रमाणे तुम्ही आपले पोते या धनाने भरून घ्यावे. ४

४०६७ जन्मोजन्मीं दास । व्हावें हेंचि माझी आस ॥ १ ॥
पंढरीचा वारकरी । वारी चुकों नेदीं हरी ॥ २ ॥
संतसमागम । अंगीं स्थिरावलें प्रेम ॥ ३ ॥
स्नान चंद्रभागे । तुका म्हणे हेंचि मागें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आस–इच्छा, नेदीं–देऊ नकोस.

अर्थ :– देवा, जन्मोजन्मी तुझा दास व्हावे हीच एक माझी इच्छा आहे १ मी पंढरीचा वारकरी व्हावे. आणि श्रीहरी, माझी ही वारी कधीही चुकू नये. २ संतांच्या सहवासात श्रीहरीचे प्रेम स्थिरावेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नित्य चंद्रभागेचे स्नान व्हावे हेच माझे नित्याचे मागणे आहे ४

४०६८ कांगा कोणी न म्हणे पंढरीची आई । बोलाविते पाहीं चाल नेटें ॥ १ ॥
तेव्हां माझ्या मना होइल समाधान । जाइल सर्व शीण जन्मांतरींचा ॥ २ ॥
तुका म्हणे माझी होईल माउली । वोरसोनि घाली प्रेमपान्हा ॥ ३ ॥

१ ऐसा, २ भागाधीन व्हावें । कोण घ्यावें मस्तकीं.

शब्दार्थ व टीपा :- कांगा-का हो, नेटें-त्वरेने, घोरसोनि-प्रेमभरित होऊन.

अर्थ :- असे कुणी का म्हणत नाही ते मला सांगा ना हो; की चल, तुला ही पंढरपुरची आई बोलावीत आहे. तू त्वरेने निघ. १ असे जर कुणी म्हणेल तर माझ्या मनास फार मोठे समाधान होईल. आणि सर्व जन्मांचा शीण नाहीसा होईल. २ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी माझी माऊली आहे ती प्रेमभरित होऊन मला पान्हा पाजील. ३

४०६९ वेद अनंत बोलिला । अर्थ इतकाचि साधिला[1] ॥ १ ॥
विठोबासी शरण जावें । निजनिष्ठा नाम गावें ॥ २ ॥
सकळशास्त्रांचा विचार । अंतीं इतकाचि निर्धार ॥ ३ ॥
अठरापुराणीं सिद्धांत । तुका म्हणे हाचि हेत[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- अंतीं-शेवटी, निर्धार-निश्चय.

अर्थ :- या श्रीहरीविषयी वेदांनी अनंत प्रकारानी वर्णन केले आहे पण त्यांच्या शोधातून इतकाच अर्थ निघाला आहे की, १ या विठोबाला तुम्ही शरण जावे आणि निजनिष्ठेने त्याचे नाम घ्यावे २ सर्व शास्त्रांनी जो विचार केला आहे त्यांचाही शेवटी हाच निश्चय झाला आहे. ३ अठरा पुराणांनी शेवटी हाच एक सिद्धान्त सांगितला आहे. ४

विवरण :— चार वेद, सहा शास्त्रे, अठरा पुराणे यानी परमार्थविषयक व आत्मज्ञानविषयक जे विवेचन केले आहे त्याचे सार तुकोबानी अतिशय सक्षेपाने व समर्पक रीतीने काढले आहे. ते असे की, 'विठोबासी शरण जावें.' चार वेदाचा, विविध शास्त्राचा, पुराणाचा निष्कर्ष हा अतिशय सोपा असा आहे नाना मतमतान्तरे, वादविवाद, तर्ककठोर चर्चा, खडनमडन, पूर्वपक्षउत्तरपक्ष इत्यादींच्या शुष्क चर्चेतून काहीही निष्पन्न होणार नाही त्यापेक्षा आपले सर्वस्व अर्पण करून विठ्ठलास शरण जावे हे फार हिताचे तुकोबा हे वेदाचे, शास्त्राचे, पुराणाचे सार म्हणून सागतात. अर्थात त्याच्या या सर्व साहित्याशी परिचय असावा त्याच्या अभगात याविषयीचे नाना सदर्भ सतत येतात 'विश्वीं विश्वंभर । बोले वेदान्तींचा सार' असे त्याचे एक वचन आहे. तुकोबाना वेदाचा अभ्यास कसा करता आला ? 'घोकाया अक्षर मज नाहीं अधिकार' असे जरी तुकोबा म्हणत असले तरी त्याना वेदाचे ज्ञान पुरेपूर होते. वेद, उपनिषदे, शास्त्रे, पुराणे इत्यादीच्या बाबतीमधील बहुश्रुतता त्याच्या अभगातून प्रतीत होत असते. 'वेदविहित तुम्ही आइका हो कर्में', 'वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा । येरानीं वहावा भार माथा', 'बोले वेदान्तींचा सार' इत्यादी वचनातून बुवाचा वेदपरिचय व अधिकार स्पष्ट होत आहे. 'पाहिली पुराणे, धुंडोळिलीं दरषणे' असे एक त्याचे वचन आहे. 'पुराणींचा इतिहास । गोड रस सेविला', 'पुराणींचे अर्थ आणिता मनास । होय कासावीस जीव माझा' इत्यादी वचनावरून बुवाना पुराणाचीही माहिती होती असे दिसते गीताभागवतादी ग्रथाचा व ज्ञानेश्वरी-एकनाथी भागवत याचाही परिचय तुकोबाना होता. या सर्व परिचयाचे सार तुकोबानी काढले आहे ते 'विठोबासी शरण जावे' हे होय 'सावळें रूप त्यावे डोळां । सा चौ अठरांचा मेळा' असा त्याचा निर्णय आहे. 'सकळ शास्त्रांचें हें सार । हे वेदाचे गव्हार । पाहतां विचार । हाचि करिती पुराणें' कोणता विचार ? तर 'पंढरीचा राणा मनामाजीं स्मरावा.' कालमानास अनुसरून सर्वसामान्य लोकाना सारभूत असे हे साधन तुकोबानी प्रकट केले आहे.

४०७० मायेचा मारिला अंगीं नाहीं घाव । दुःखें तरी लव घडघडी ॥ १ ॥
न लभे हा काळ न सुटे हातींचा । न बोलवे वाचा खोडावली[3] ॥ २ ॥
न पवे धांवणें न[4] पवेचि लाग । न चलतो माग धरावया ॥ ३ ॥
भेणें तरि अंगा लावियेल्या राखा । परी[5] त्यासी वाखा करीतसे ॥ ४ ॥
तुका म्हणे नेदी हाका मारूं देवा । लोकापाठीं हेवा लागलासे ॥ ५ ॥

१ सोधिला, २ होत, ३ खेडावली, ४ न लपवेचि लाग, ५ तरी यासी.

शब्दार्थ व टीपा :- लव-थोडेही, धडधडी-पेटते आहे, माग-मार्ग, भेणे-भयाने, याला-फजिती, नेदी-देत नाही, हेव-हाव, सोस

अर्थ – सर्व लोक मायेकडून मारले गेले आहेत पण तिचा घाव अंगावर मात्र दिसत नाही. पण त्या दुःखाने शरीर मात्र धडधडून पेटते आहे थोडेही रिकामे दिसत नाही १ या मायेच्या हातून सुटका करून घेण्याचा काळ कधी लाभत नाही तिचे वर्णन करायला जावे तर वाणी वेडावली जाते. २ तिच्यापासून सोडविण्याचे कुणाच्या हातून होत नाही, की तिला धरायला जावे तर तिचा माग लागत नाही मार्ग सापडत नाही. ३ तिच्या भयाने लोक अंगाला राख फासून भ्रमण करतात, पण ती त्यांचीही फजितीच करते ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही माया देवासही नीट हालचाल करू देत नाही असा हा सोस तिने लोकांच्या पाठीमागे लावला आहे ५

४०७१ धिग तो दुर्जन नाहीं भूतदया । व्यर्थ तया माया प्रसवली ॥ १ ॥
कठीण हृदय तया चांडाळाचें । जो नेणे पराचें दुःख कांहीं ॥ २ ॥
आपुला हा प्राण तैसे सकळ लोक । न करी विवेक पशु जैसा ॥ ३ ॥
तुका म्हणे सुखें कापीतसे गळे । आपुलिया वेळे रडतसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- पराचे-दुसऱ्याचे.

अर्थ – ज्याला प्राणिमात्राविषयी दया नाही त्या दुर्जनाचा धिःकार असो त्याला त्याच्या आईने व्यर्थ जन्म दिला आहे. १ त्या चांडाळाचे हृदयही मोठे कठीण असते, तो दुसऱ्याचे दुःख कधीच जाणीत नाही २ आपला जसा प्राण आहे तसाच सर्व लोकांचा आहे, अशा प्रकारचा विवेक हा नरपशू कधी करीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा मनुष्य दुसऱ्याचा गळा सुखाने कापतो, पण स्वतःवर पाळी येताच रडू लागतो ४

४०७२ गरुडावरि बैसोनि येतो जगजेठी । त्याचे चरणी मिठी घालू चला ॥ १ ॥
सावळें रूपडें देखिले लोचनीं । शंख चक्र दोन्ही शोभताहे ॥ २ ॥
पीतांबर झळके हेचि त्याची खूण । वाकी रुणझुण करिताती ॥ ३ ॥
गरुडाचा चपेटा येत असे नेटें । कस्तुरीमळवट शोभताहे ॥ ४ ॥
पदक एकावळी शोभताहे कंठीं । तुका म्हणे मिठी घालू चला ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – चपेटा-तडाका, झपाटा, नेटें-त्वरेने

अर्थ – हा जगजेठी गरुडावर बसून येत आहे चला त्याच्या चरणावर मिठी घालू या १ त्याचे सावळे रूप डोळ्यांनी पाहिले त्याच्या दोन्ही हातात शंखचक्र शोभून दिसत आहेत २ त्याचा पीतांबर झळकू लागला हीच त्याची खूण आहे याच्या दंडातील वाक्या रुणझुण असा आवाज करीत आहेत ३ त्याच्या गरुडाचा झपाटा त्वरेने येत आहे त्याच्या कपाळावरील कस्तुरीचा मळवट शोभून दिसत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्याच्या गळ्यातील एकेरी हारातील पदक शोभून दिसत आहे चला, त्याच्या पायांना मिठी घालू या ५

४०७३ नाहीं पाक होत उफराटे चाली । बोलिली ते केली व्हावी नीत ॥ १ ॥
नाहीं मानू येत वाजटाचे बोल । कोरडेच फोल चवी नाहीं ॥ २ ॥
तरुवरा आधीं कोठे आहे फळ । चावटा बरळ म्हणा त्यासी ॥ ३ ॥
तुका म्हणे किती ठकली बापुडी । गव्हा आहे गोडी मांडे पुऱ्या ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पाक–स्वयपाक, नीत–नीती, वांजटाचे–क्रियेशिवाय व्यर्थ बडबड करणारा, मरळ–बडबड करणारा, ठकलीं–फसली.

अर्थ :– उरफाट्या रीतीने पाकसिद्धी होत नाही. यासाठी जी नीती सांगितली आहे त्याप्रमाणेच वागणे व्हावे. १ त्याचप्रमाणे क्रिया केल्याशिवाय व्यर्थ बडबड करणाऱ्याचे बोल खरे मानू नयेत त्याच्या कोरड्या बोलांना फसलोच चव नसते. २ झाडाचे बी लावण्याआधी कधी फळ मिळते काय ? असे मिळते असे जो म्हणेल तो चावट काहीतरीच व्यर्थ बडबड करीत असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे किती तरी लोक फसले आहेत. गव्हाची खरी गोडी त्यापासून मांडे, पुऱ्या इ० पदार्थ तयार करण्यातच आहे ४

४०७४ जाली हरिकथा रंग वोरसला । उचितासी आला पांडुरंग ।। १ ।।
वांटितो हें प्रेम उचिताचा दाता । घेई रे तूं आतां धणीवरि ।। २ ।।
प्रेम देऊनियां अवघीं सुखीं केलीं । जीं होतीं रंगलीं विटलीं तीं ।। ३ ।।
तुकें हें दुर्बळ देखियेलें संतीं । म्हणउनि पुढती आणियेलें ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– धणीवरि–तृप्ती होईपर्यंत.

अर्थ :– श्रीहरीची कथा पूर्ण झाली. आणि प्रेमरसाचा रंग ओसरला; या कथेत हा पांडुरंग उचित असेच देण्यास आला आहे. १ उचित असेच करणारा हा देव सर्वांना प्रेम वाटीत आहे. आता तू मनाची तृप्ती होई-पर्यंत हे प्रेम घे. २ जे या हरिकथेत विठ्ठलाच्या प्रेमात रंगलेले होते त्यांना सर्वांना प्रेम देऊन सुखी केले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या संतांनी मज दुर्बलाला पाहिले आणि पुढे आणले. ४

४०७५ संकल्पिला तुज सकळ[1] ही भाव । कोण एक ठाव उरला तेथें ।। १ ।।
इंद्रियव्यापार जेजें कांहीं कर्म । करितों[2] ते धर्म सकळ तुझे ।। २ ।।
माझे हित फार लागला विचार । तुज सर्व भार चालवणें ।। ३ ।।
जो कांहीं लौकिक करिसी तो तुझा । अपमान पूजा कांहीतरि ।। ४ ।।
तुका म्हणे मी तों राहिलों निश्चित[3] । तुज कळे हित तैसें करीं ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा :– ठाव–स्थान.

अर्थ :– देवा, मी जो जो भाव मनात संकल्पिला तो तो सर्व तुला अर्पण केला आहे. आता या ठिकाणी रिकामे असे काही उरलेले नाही. १ मी जे जे इंद्रियव्यापार करीत आहे, जी जी कर्मे आचरीत आहे, जे जे धर्म करीत आहे ते सर्व तुझेच आहेत. २ माझे हित कसे होईल याच विचारात मी फार आहे. देवा, यासंबंधी सर्व भार तुलाच चालवायचा आहे. ३ तू जो काही लौकिक वाढवशील, पूज्यता वाढवशील, अपमान करवशील ते सर्व काही तुझेच आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता या बाबतीत निश्चित राहिलो आहे. तुला जसे हित कळेल तसे तू करावेस. ५

४०७६ भय नाहीं भेव । अनुतापीं नव्हतां जीव ।। १ ।।
जेथें देवाची तळमळ । तेथें काशाचा विटाळ ।। २ ।।
उच्चारितां दोष । नाहीं उरों देत लेश ।। ३ ।।
तुका म्हणे चित्त । होय आवडी मिश्रित ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– भेव–भीती.

१ सकळ देहभाव, २ सुख दु.ख धर्म, ३ निश्चित.

अर्थ :- जीवास अनुताप न होता त्याचे भय नाहीसे झाले. १ जेथे देवाविषयी तळमळ आहे तेथे विटाळ कशाचा आला आहे ? २ दोषाचा उच्चार करताच त्याचा लवलेशही उरू देत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे चित्त श्रीहरीच्या आवडीने मिश्रित झाले आहे. ४

४०७७ ध्यानीं ध्यातां पंढरिराया । मनासहित पालटे काया ॥ १ ॥
तेथें बोला कैंची उरी । माझें मीपण जाला हरि ॥ २ ॥
चित्तचैतन्यीं पडतां मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टि ॥ ३ ॥
तुका ह्मणे सांगों काय । एकाएकीं हरिवृत्तिमय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- काया-शरीर, उरी-कमतरता, उणीव, अवसर.

अर्थ – या पंढरीरायाचे ध्यान करीत असताना मनासहित शरीराचा पालट होतो १ त्या ठिकाणी शब्द बोलण्यास तरी अवसर आहे कुठे ? माझे मीपणच हा श्रीहरी होऊन बसला आहे. २ चित्त व चैतन्य, मी भक्त व तो श्रीहरी यांची मिठी पडली म्हणजे सर्व सृष्टीच हरिरूप दिसू लागते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता सांगू तरी किती आणि काय ? एकाएकी सर्व वृत्ती श्रीहरिमय होऊन गेल्या आहेत. ४

४०७८ कोणा ही केंडावें[1] हा आम्हां अधर्म । जोजो पावे श्रम तोतो देव ॥ १ ॥
म्हणउनि चित्ता सिकविलें वोजे । आतां हेंचि दुजें न बोलावें ॥ २ ॥
ह्मालविलें[2] जरि परउपकारें । जिव्हें पाप खरें उपाधीचें ॥ ३ ॥
तुका म्हणे जीव प्रारब्धा आधीन । कोण वाहे सीण करुणा शोभे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- केंडावें-त्रास द्यावा, निंदावे, वोजें-रीतीने, काळजीने.

अर्थ :- कोणाला त्रास द्यावा अथवा निंदा करावी हा आम्हांस अधर्म वाटतो. या बाबतीत जो जो करावे तो तो देव श्रमच देतो. १ म्हणून चित्ताला नीट सरळ मार्गाने जाण्यास शिकवीत आहे. यासंबंधी आता दुसरे काही न बोलावे. २ दुसऱ्यावरील उपकाराने जरी बोलते केले तरी उपाधीचे पाप जिव्हेस खरोखर वाटत असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, जीव हा खरे म्हणजे प्रारब्धाच्या स्वाधीन आहे. त्याच्यासंबंधी कोण त्रास सोसणार ? तो नेहमीच करुणेने शोभत आहे. ४

४०७९ देव तिळीं आला । गोडें[3] गोड जीव धाला ॥ १ ॥
साधला हा पर्वकाळ । गेला अंतरींचा मळ ॥ २ ॥
पापपुण्य गेलें । एका स्नानेंचि खुंटलें[4] ॥ ३ ॥
तुका म्हणे वाणी । शुद्ध जनार्दनीं जनीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- तिळीं आला-अनुकूल झाला, स्वाधीन झाला, अतरींचा-अत करणाचा, खुंटले-नाहीसे झाले.

अर्थ :- आज देव अनुकूल झाला आहे. त्याच्या गोडीमुळे हा जीव गोडच गोड होऊन गेला आहे. तृप्त झाला आहे. १ अशा प्रकारचा हा पर्वकाळ साधल्यामुळे अंत करणाचा मळ नाहीसा झाला आहे. २ या ठिकाणी एक स्नान केल्यानेच पापपुण्य खुडून गेले आहे; नाहीसे झाले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता माझी वाणी शुद्ध होऊन या जनार्दनात वर्णीत आहे ४

स्वर्गसुखें[1] आम्हीं केलीं पावटणी । पापपुण्यें दोन्ही उलंडिलीं[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे घरीं आणिलें वैकुंठ । वसविली पेठ वैष्णवाची ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोळगती–प्राप्त होतात, पावटणी–पायरी.

अर्थ :– या पांडुरंगाच्या पायांपाशी आम्हांस काय उणे आहे ? याच्या मुळे आमच्या ठिकाणी रिद्धीसिद्धीही प्राप्त होतात. १ मग नाशवंत अशा सुखांकडे कोण पाहणार ? आम्ही अशा या तृष्णांनी हीनदीन झालेलो नाहीत. २ स्वर्गसुखांना आम्ही तुच्छ लेखून त्यांची पायरी केली आहे आणि पाप व पुण्य या दोहोंचे उल्लंघन केले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आमच्या घरी प्रत्यक्ष वैकुंठ आणून उभे केले आहे. या ठिकाणी वैष्णवांची पेठ वसविली आहे. ४

४०८१ माझें मागणें तें किती । दाता लक्ष्मीचा पति ॥ १ ॥
तान्हेल्यानें पीतां पाणी । तेणें[3] गंगा नव्हे उणी ॥ २ ॥
कल्पतरु जाला देता[4] । तेथें पोटाचा मागता ॥ ३ ॥
तुका म्हणे संतां[5] ध्यातां । परब्रह्म आलें हाता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– थोड्याफार फरकाने मागील अभंगक्र ३९८० पाहावा

४०८२ अर्भकाचे साटीं । पंतें हातीं धरिली पाटी ॥ १ ॥
तैसे संत जगीं । क्रिया करुनी दाविती अंगीं ॥ २ ॥
बालकाचे चाली । माता जाणुनि पाउल घाली ॥ ३ ॥
तुका म्हणे नाव । जनासाटीं उदकीं ठाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अर्भकाचे–लहान मुलाच्या, पंतें–गुरूजींनी.

अर्थ :– लहान मुलांसाठी गुरुजींनी हातात पाटी धरलेली असते १ त्याप्रमाणे हे संत या जगात क्रिया करून लोकांना सन्मार्ग दाखवितात २ बालकाच्या चालण्याप्रमाणे माता आपली पावले जपून टाकते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या लोकांना तरून नेण्यासाठीच पाण्यावर नौका आहे. ४

४०८३ जन्मोजन्मींची संगत । भेटी जाली अकस्मात ॥ १ ॥
*आतां सोडितां सुटेना । तंतु प्रीतीचा तुटेना ॥ २ ॥*
माझें चित्त तुझ्या पायां । मिठी पडिली पंढरिराया ॥ ३ ॥
तुका म्हणे अंतीं । तुझी माझी एक गति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तंतु–धागा.

अर्थ :– देवा, तुमची-आमची अनेक जन्मांची संगत असून आज आपली भेट अकस्मात झालेली आहे. १ आता एकमेकांना सोडता येणार नाही. प्रीतीचा धागा तुटेनासा झाला आहे २ पंढरीराया, माझे चित्त आता तुझ्या पायांशी जडले असून मी तुला मिठी मारलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझी व माझी शेवटी गती एकच आहे. ४

४०८४ सांग पांडुरंगा मज हा उपाव । जणें तुझे पाव आतुडति ॥ १ ॥
न कळे हा निर्धार[6] ब्रह्मादिकां पार । कायसा विचार माझा तेथें ॥ २ ॥
तुका म्हणे आतां धरुनियां धीर । राहूं कोठवर मायबापा ॥ ३ ॥

१ सर्व सुखें, २ उडविली, ३ तेव्हा, ४ दाता, ५ सतत, ६ पार.

४०८८ मोल[1] घेऊनियां कथा जरी करीं । तरी भंगो हरी देह माझा ॥ १ ॥
माझी कथा करा ऐसें म्हणे कोणा । तरी[2] झडो जाणा जिव्हा माझी ॥ २ ॥
साहृच तूं जालासी काय उणें तुपें । आणीक भूतांपें काय मागों ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व सिद्धि तुझे पायीं । तूं माझा गोसावी पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तुपें-तुझ्याजवळ

अर्थ :– द्रव्याचे मोल घेऊन जर मी कथा करीन तर माझा हा देह भगून जावो १ माझी कथा तुम्ही करावी असे जर मी कुणास म्हणेन तर माझी जीभ झडून जावी २ देवा, तू एकदा साहृय झाल्यावर तुझ्याजवळ काय उणे आहे ? मग इतर लोकाजवळ आणखी काय मागावे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, सर्व सिद्धी तुझ्या पायी आहेत पांडुरगा, तू माझा गोसावी, स्वामी आहेस ४

४०८९ जरि हा हो कृपा करिल नारायण । तरी हेंचि ज्ञान ब्रह्म होय ॥ १ ॥
कोठोनियां कांहीं न लगे आणावें । न लगे कोठें जावें तरावया ॥ २ ॥
जरी देव कांहीं धरिल पैं चित्तीं । तरि हेचि होती दिव्य चक्षु[3] ॥ ३ ॥
तुका म्हणे देव दावील आपणा । तरि जीवपणा ठाव नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न लगे-लागणार नाही, ठाव-स्थान, ठिकाण

शब्दार्थ व टीपा :– उपाव–उपाय, आतुडति–प्राप्त होतील.

अर्थ :– पांडुरंगा, आता तुझे पाय जेणेकरून प्राप्त होतील असा उपाय मला सांग बरे. १ यासंबंधीचा निश्चय ब्रह्मदेवासही करवत नाही, तेथे माझा विचार कसला आला आहे ? २ तुकाराम महाराज म्हणतात, मायबापा, आता मी कुठवर धीर धरून राहू रे ? ३

४०८५ काय फार जरी जालों मी शाहाणा । तरी नारायणा नातुडसी ॥ १ ॥
काय जालें जरी मानी मज जन । परि नातुडति चरण तुझे देवा ॥ २ ॥
काय जालें जरी जालों उदासीन । परि वर्म भिन्न तुझें देवा ॥ ३ ॥
काय जालें जरी केले म्यां सायास । म्हणवितों दास भक्त तुझा ॥ ४ ॥
तुका म्हणे तुज दाविल्यावांचून । तुझें वर्म कोण जाणे देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– नातुडसी–सापडत नाहीस, सायास–प्रयत्न.

अर्थ :– नारायणा, मी काय फार शहाणा झालो की काय ? तरी सुद्धा तू काही मला सापडत नाहीस १ हे लोक मला मानायला लागले म्हणून काय झाले ? तरी देवा तुझे चरण काही प्राप्त होत नाहीत २ मी देहावर उदासीन झालो म्हणून काय झाले ? देवा, तुझे वर्म याहून भिन्न आहे ३ मी आणखी काही प्रयत्न केले म्हणून काय झाले ? तरी मी स्वत:स तुझा दासच म्हणवीत आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुला दाखविल्याशिवाय तुझे वर्म तरी कोण जाणणार ? ५

४०८६ जातां पंढरीच्या मार्गे । काय वर्णू सुखा मग ॥ १ ॥
घडे लाभ लक्षकोटि । परब्रह्मीं होइल भेटी ॥ २ ॥
नाम गर्जत येती संत । त्यांच्या दर्शनें होईजे मुक्त ॥ ३ ॥
जो अलक्ष्य ब्रह्मादिकां । आला संनिध म्हणे तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अलक्ष्य–लक्षात न येणारे.

अर्थ :– पंढरीच्या मार्गाने जात असताना वाटेच्या सुखाचे काय वर्णन करावे ? १ या मार्गाने जाताना लक्ष कोटी लाभ घडतील आणि परब्रह्माशी भेट होईल २ नामाची गर्जना करीत या मार्गाने संत येतात. त्यांच्या दर्शनाने तुम्ही मुक्त व्हावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ब्रह्मादिकांच्याही लक्षात न येणारा हा श्रीहरी जवळ आला आहे. ४

४०८७ सारासार विचार करा उठाउठी । नाम धरा कंठीं विठोबाचें ॥ १ ॥
तयाच्या चिंतनें निरसलें संकट । तरलों दुर्घट भवसिंधु ॥ २ ॥
जन्मोनियां कुळीं वाचे स्मरे राम । धरी हाचि नेम अहिर्निशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे कोटी कुळें तीं पुनीत । भावें गातां गीत विठोबाचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उठाउठी–त्वरेने, निरसलें–दूर झाले, अहिर्निशीं–रात्रंदिवस, पुनीत–पवित्र.

अर्थ :– सारासार विचार करून मोठ्या त्वरेने या विठोबाचे नाम तुम्ही आपल्या कंठात धारण करा. १ त्याच्या चिंतनामुळे संसारातील संकट दूर झाले. आणि हा तरून जाण्यास कठीण असा भवसिंधू तरून गेलो आहे २ मानवकुळात जन्मास येऊन तुम्ही वाणीने रामनामाचे स्मरण करा. हाच नियम रात्रंदिवस धरून राहा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या विठोबाचे गीत मोठ्या भावनेने गात राहाल तरी कोटी कुळे पवित्र होऊन जातील. ४

४०८८ मोल[1] घेऊनियां कथा जरी करीं । तरी भंगो हरी देह माझा ॥ १ ॥
माझी कथा करा ऐसें म्हणें कोणा । तरी[2] झडो जाणा जिव्हा माझी ॥ २ ॥
साह्य तूं जालासी काय उणें तुपें । आणीक भूतांपें काय मागों ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व सिद्धि तुझे पायीं । तूं माझा गोसावी पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– तुपें–तुझ्याजवळ

अर्थ :– द्रव्याचे मोल घेऊन जर मी कथा करीन तर माझा हा देह भगून जावो १ माझी कथा तुम्ही करावी असे जर मी कुणास म्हणीन तर माझी जीभ झडून जावो २ देवा, तू एकदा साह्य झाल्यावर तुझ्याजवळ काय उणे आहे ? मग इतर लोकाजवळ आणखी काय मागावे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, सर्व सिद्धी तुझ्या पायी आहेत पांडुरंगा, तू माझा गोसावी, स्वामी आहेस ४

४०८९ जरि हा हो कृपा करिल नारायण । तरी हेंचि ज्ञान ब्रह्म होय ॥ १ ॥
कोठोनियां कांहीं न लगे आणावें । न लगे कोठें जावें तरावया ॥ २ ॥
जरी देव कांहीं धरिल पें चित्तीं । तरि हेचि होती दिव्य चक्षु[3] ॥ ३ ॥
तुका म्हणे देव दावील आपणा । तरि जीवपणा ठाव नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– न लगे–लागणार नाही, ठाव–स्थान, ठिकाण

अर्थ :– जर हा नारायण कृपा करील तर हे प्रापंचिक ज्ञानच ब्रह्म होईल १ इतर ठिकाणाहून काही आणावे लागणार नाही आणि तरून जाण्यासाठी कुठेही जायला नको २ जर हा देव आपणावर कृपा करण्याविषयी स्वतःच्या चित्तात घेईल तर जे आहेत तेच डोळे दिव्यचक्षू होतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, जर देव स्वतःचे रूप दाखवील तर मात्र जीवपणास स्थान राहणार नाही. ४

४०९० पांडुरंगा कृपाळुवा दयावंता । धरिसील सत्ता सकळ ही ॥ १ ॥
कां जी आम्हांवरी आणिकांची सत्ता । तुम्हासी[4] असतां जवळिक ॥ २ ॥
तुका म्हणे पायीं केले निवेदन । उचित हें दान करीं आतां ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– आणिकांची–इतरांची, दुसऱ्याची

अर्थ :– कृपाळू, दयावंता पांडुरंगा, या जगतात सर्वत्र तूच सत्ता धरून राहिला आहेस १ असे असताना, आम्ही तुमच्या नजीकचे असताना आम्हांवरच इतरांची सत्ता का हो ? २ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही देवा, हे तुमच्या पायी सर्व निवेदन केले आहे. जे काय योग्य असे कृपेचे दान तुला द्यायचे असेल ते द्यावेस ३

४०९१ रात्री दिवस आम्हा युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन ॥ १ ॥
जीवा ही आगोज पडती आघात । येऊनियां नित्य नित्य करी ॥ २ ॥
तुका म्हणे तुझ्या नामाचिया बळें । अवघीयांचें काळें केलें तोंड ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– आगोज–भयंकर

अर्थ :– रात्रंदिवस आमचा मन व जग यांच्याशी युद्धप्रसंग होत असतो १ जीवावर अनेक प्रकारचे भयंकर असे आघात निर्माण होतात त्यांचे निवारण वारंवार करावे लागते २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्या नामाच्या साहाय्याने सर्वांचे तोंड मी काळे करून टाकले आहे ३

१ द्रव्य, २ तरी नारायणा जिव्हा झडो, ३ वस्तु, ४ तू होणे

विवरण :– तुकाराममहाराजांना आत व बाहेर असा, मनाशी व जगाशी युद्धप्रसंग करावा लागत असे या-संबंधीचे विवरण मागे अनेकदा आले आहे. घरात व बाहेर लटपटी करून जे लोक इतरांना फसवीत होते त्यांचाही समाचार बुवांना घ्यावा लागे अशा रीतीने आधी आंतरमनाचा व नंतर बाह्यजगताचा अथवा प्रसंगी दोनही प्रकारचा संग्राम तुकोबांना करावा लागे 'वीर विठ्ठलाचे गाढे' असे तुकोबांनी स्वतःस म्हटले आहे

४०९२ होइन खडे गोटे । चरणरज साने मोठे । पंढरीचे वाटे । संतचरणीं लागेन ॥ १ ॥
आणीक काय दुजें । म्यां मागणें तुजपासीं । अविट तें सुख । भय नास नाहीं ज्यासी ॥ २ ॥
होइन मोचे वाहणा । पायीं सकळां संतजनां । मांजर सुकर सुणा । जवळी शेष घ्यावया ॥३॥
सांडोवा पायरी । वाहळ वावी गंगातिरी । होइन तयावरी । संतसज्जन चालती ॥ ४ ॥
लागें संतां पायीं । ऐसा ठेवीं भलते ठायीं । तुका म्हणे देईं । धाक नाहीं जन्माचा ॥५॥

शब्दार्थ व टीपा :– साने–लहान, दुजें–दुसरे, नास–नाश, मोचे–जोडे, सुकर–डुक्कर, सुणा–कुत्रे, सांडोवा–पाणी सांडण्याची, पायरी, वाहळ–ओढा, वावी–विहीर, भलते–कोणत्याही

अर्थ :– पंढरीच्या वाटेवर जेथे संतांचे चरण लागतील तेथे मी खडे, गोटे होईन, लहानमोठे चरणरज होईन. १ देवा, याखेरीज मी दुसरे काहीही तुझ्याजवळ मागत नाही या संतांच्यापाशीच मला अवीट असे सुख लाभते अशा सुखाला कधीच नाश नसतो, भयही उरत नाही २ या संतांच्या चरणतळीच्या मी वहाणा अथवा जोडे होईन किंवा मांजर, डुक्कर, अथवा कुत्रे होऊन त्यांच्या उच्छिष्टापैकी उरलेला भाग सेवन करीन ३ ज्या ठिकाणी संत चालतील त्या ठिकाणी मी पाणी सांडण्याची पायरी होईन किंवा ओढा, विहीर अथवा गंगेचा काठ होईन ४ तुकाराम महाराज म्हणतात, संतांचे चरण लागतील अशा कोणत्याही ठिकाणी तू मला ठेव मला एवढेच तू द्यावेस जन्ममरणाचा धाक मला नाही ५

४०९३ माझिया जीवाचा[1] मज निरधार । न करीं उत्तर जनासवें ॥ १ ॥
आपुलें कारण साधीं जो विचार । करावा हा धीर धरूनियां ॥ २ ॥
काय कराविया आणिका या युक्ति । काय नव्हे भक्ति विठोबाची ॥ ३ ॥
एक पुढें गेले वाट दावूनियां । मारग तो वांयां कोण सांडी ॥ ४ ॥
तुका म्हणे माझी विठोबासी चिंता । भेईना सर्वथा न घडे तें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– कारण–कार्य, मारग–मार्ग, सांडी–सोडणार, भेईना–भिणार नाही.

अर्थ :– मी माझा मनाशीच पुढीलप्रमाणे निर्धार केला आहे या संबंधी मी इतर लोकांबरोबर भाषण करणार नाही १ जेणेकरून आपले कार्य साधेल त्यासंबंधीचा विचार मी धीर धरून करणार आहे २ एक या विठोबाची भक्ती असल्यानंतर इतर आणखी साधनांची अथवा युक्त्यांची जरूरी काय ? ३ कित्येक सत्पुरुष पूर्वी वाट दाखवून पुढे गेले आहेत त्यांनी दाखविलेला मार्ग कसा सोडता येणार ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझी चिंता या विठोबास असल्यामुळे जे जे घडेल त्यासंबंधी मी कधीच भिणार नाही. ५

४०९४ कामधामी व्हावे जीतांचि मुक्त । सांडूनियां थीत प्रेमसुख ॥ १ ॥
वैष्णवांचा दास जाला नारायण । काय त्या मिळोन असे काम ॥ २ ॥
काय त्या गांठीचें पडलें सुटोन । उगलाचि वैसोन घीर धरीं ॥ ३ ॥
सुख आम्हांसाठीं केलें हें निर्माण । निर्देव तो कोण हाणे लाता ॥ ४ ॥
तुका म्हणे मज न लगे सायुज्यता । राहेन या संतां समागमें ॥ ५ ॥

१ मनाचा

शब्दार्थ व टीपा – थीत–व्यथ

अर्थ – चांगले जिवंत असतानाच आम्ही मुक्त कशासाठी व्हावे ? या श्रीहरीचे प्रेम व्यर्थपणे का सोडावे ? १ हा नारायण वैष्णवांचा दास झाला आहे त्याच्याशी मिळून जाण्याने मुक्त होण्याने आपले कार्य काय साधणार ? २ आम्ही त्याच्यापासून सुटून निघालो आहोत की काय ? आम्ही त्याचेच आहोत उगाच थोर प्रश्न आम्ही स्वस्थ बसून राहू ३ या देवाने आमच्यासाठी हे प्रेमसुख निर्माण केले त्यावर लाथा मारणारा असा कोण दुर्दैवी आहे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, मला सायुज्य मुक्ती नको मी या संतांच्या बरोबर सुखाने राहीन ५

४०९५ आवडे पंढरी भीमा पांडुरंग । चंद्रभागा लिंग पुंडलीक ॥ १ ॥
कामधेनु कल्पतरु चिंतामणी । आवडीची धणी पुरवीती ॥ २ ॥
तुका म्हणे जीवा थोर जाले सुख । नाठवे हे भूक तान कांहीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – धणी–तृप्ती नाठवे–आठवत नाही

अर्थ – आम्हाला ही पंढरी, ही भीमा नदी आणि हा पांडुरंग आवडतो येथील चंद्रभागा व तीमधील पुंडलीकाचे लिंग याही गोष्टी आवडतात १ कामधेनू, चिंतामणी, कल्पतरु यांच्याप्रमाणेच याही गोष्टी मनातील आवड तृप्त करतात २ तुकाराम महाराज म्हणतात माझ्या जीवाला फार मोठे सुख झाले आहे त्यामुळे मला तहान अथवा भूक यांची आठवणही रहात नाही ३

४०९६ लाडें भाकितो करुणा । तू रे उदाराचा राणा ॥ १ ॥
करिसी आमुचा सांभाळ । तू रे माउली स्नेहाळ ॥ २ ॥
नाहीं चिंता रे आम्हासी । तूचि भार चालविसी ॥ ३ ॥
आम्ही जालों उदासीन । तूचि करिसी जतन ॥ ४ ॥
आह्मा नाहीं जीवनास । तूचि पुरविसी घास[1] ॥ ५ ॥
तुका म्हणे मलते सवे । जाता मागें मागें धांवे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – जीवनास–जीवनाची आशा

अर्थ –देवा, तू उदाराचा राणा असल्यामुळे आम्ही तुझी लडिवाळपणे करुणा भाकीत आहोत १ तू आमची स्नेहाळ अशी माऊली असल्यामुळे आमचा सांभाळ करशील २ देवा तूच आमचा भार स्वतः वाहशील याविषयी आमच्या मनात चिंता नाही ३ आम्ही उदासीन झालो असलो तरी तू आमचा सांभाळ करणार आहेस ४ आम्हाला जीवनाची आशा नसली तरी तू आम्हाला रोजचा घास पुरवीत आहेस ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही भलत्याच्या बरोबर गेल्यास हा श्रीहरी संरक्षणार्थ आमच्या बरोबर येतो ६

४०९७ आम्हा हे सकळ । तुझ्या पायांचेचि बळ ॥ १ ॥
करूं अमृताचे पान । दुजें नेणो कांहीं आन ॥ २ ॥
जयाचा जो भोग । सुख दुःख पीडा रोग ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । तुझे पायीं माझा ठेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – दुज–दुसरे, आन–दुसरे

---

१ आस

अर्थ :– देवा, आम्हाला सर्व बळ तुझ्या पायाचेच आहे १ त्या चरणामृताचे सेवन आम्ही करु याशिवाय आम्ही दुसरे काहीही जाणीत नाही २ ज्याचा जसा भोग असेल त्याप्रमाणे तो दु ख, पीडा अथवा रोग यांनी व्यथित होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझा सर्व ठेवा तुमच्याच पायाशी आहे ४

४०९८ प्रपंच परमार्थ संपादोनि दोन्ही । एक ही निदानी न घडे त्यासी ॥ १ ॥
दोहीं पेंचावरी ठेवू जाता हात । शेवटीं अपघात शरीराचा ॥ २ ॥
तुका म्हणे तया दोहींकडे धका । शेवटीं तो नरकामाजी पडे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – निदानीं–अखेरीस, धका–धक्का

अर्थ :– मी प्रपच व परमार्थ दोनही एकाच वेळी सपादन करीन असे जो समजेल त्याला अखेरीस एकही धडपणे घडणार नाही १ दोनही पेचावर पाय ठेवणारा मनुष्य शेवटी आपटून त्याच्या शरीरास आघात मात्र होईल २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या माणसास दोन्हीकडून धक्का बसून तो शेवटी नरकात पडतो ३

विवरण – एका मोठ्या जटिल आणि वादग्रस्त प्रश्नाचा निर्णय तुकोबानी या महत्त्वाच्या अभगात घेतलेला दिसतो प्रपच व परमार्थ या दोनही गोष्टी एखाद्यास एकाच वेळी साधतील काय ? या प्रश्नाचे उत्तर दोन स्तरावर पाहावे लागेल जो थोर दर्जाचा साधक आहे, ज्याला श्रीहरीच्या प्रीतीचा प्रत्यक्ष अनुभव घ्यायचा आहे, परमार्थामधील अथवा आत्मविचारामधील सूक्ष्म तत्त्वाचा शोध घ्यायचा आहे त्याला अर्थातच प्रपचाकडे लक्ष देऊन भागणार नाही सत्याच्या शोधासाठी अज्ञाताच्या आकलनासाठी असीमाच्या, अव्यक्ताच्या, अनताच्या शोधात असताना प्रपचावर दृष्टी ठेवून भागणार नाही प्रपच म्हटला की लौकिक सुखदु खे, बरेवाईट प्रसग, व्यावहारिक अडचणी, आप्तेष्टाचे सबध, इद्रियाची सुखे यातच मनुष्य गुतून पडतो परमार्थातील सूक्ष्म तत्त्वाचा शोध व अनुभव घेण्यासाठी या थोर साधकाला दोनही पचावर पाय ठेवून भागणार नाही ससारात अनेक धक्के बसतात, ससार दु खमय आहे, नाशवत आहे यात दु खशोकाने मनात भ्राती निर्माण होते म्हणूनच समर्थ रामदासानीही निर्णय दिला आहे की 'जयासी परमार्थ व्हावा । तेणें प्रपञ्च त्यजावा, प्रपच एकाएकी सोडणे जमणार नाही हेही माहीत असल्याने त्यानी म्हटले आहे ' हळू हळू सोडवावी मिठी प्रपचाची ॥ ' ज्याला उच्च दर्जाचा परमार्थ साधावयाचा आहे त्याने ' उठोनि वाटेचि लागावे । दिगतप्रती ॥

साधुसतानी याप्रमाणे थोर साधकाच्या दृष्टीने प्रपचाचे मिथ्यत्व वर्णन करून त्याचा त्याग करायला सांगितलेला असला तरी या विचाराला आणखीही एक बाजू आहे आणि ती सर्वसाधारण प्रापचिकाला सोईची आहे त्याच्या हातून प्रपच सुटत नाही आणि भ्रान्तपणे तो नसत्या उठाठेवी करतो, कर्मकाडात व्यग्र होतो, देव धर्मीच्या नावावर भलत्याच गोष्टींत गुरफटून जातो त्याच्या अतरगात प्रपचाविषयी आसक्ती असत, पण वरून तो वैराग्याच्या गोष्टी बोलत असतो तेव्हा साधुसत त्याला प्रपचाचीच नीट ओळख करून घ्यायला सागतात व केवळ प्रपच न करता प्रपच करीत असतानाच कोणता सावधपणा राखावा यासबधी मार्गदर्शन करतात 'आधी प्रपच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ विवेका', ' प्रपच सोडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल । प्रपच परमार्थ चालवाल । तरी तुम्हीं विवेकी ॥ ' इत्यादी ओव्याचा वरील सदर्भात अर्थ पाहाणे अगत्याचे आहे ज्याला साधा प्रपच धड करता येत नाही तो परमार्थ काय करणार ? असाही सवाल समर्थानी केला आहे ' प्रपंच सांडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला । मग तया करंट्याला । परमार्थ कैचा ? ॥ परमार्थ सोडूनि प्रपच करिसी । तरी तू यमयातना भोगिसी' असे म्हणून प्रापचिकानी प्रपचही कसा करावा हेही त्यानी सांगितले आहे याच भूमिकेवरून तुकोबाही प्रापचिकाला उपदेश करतात, 'जोडोनियां धन उत्तम व्यवहारे । उदास विचारें वेंच करी,' 'वर्णाश्रम करिसी चोख । तरि तू पावसि उत्तम लोक ',' न लगे सांडावा आश्रम। उपजले कुळींचे धर्म । आणिक न करावे श्रम। पुरे एक नाम विठोबाचे ॥ '

प्रापंचिक व व्यावसायिक दृष्टीनी तुकोबाना मनस्ताप झाल्यानतर त्याच्या मनात वैराग्य निर्माण होऊन सत्संग व नामसंकीर्तन याच्या मार्गाने बुवा परमार्थ साधनेत मग्न झाले. या साधनेत मग्न असताना त्यानी आपल्या मनास सतत अकुश लावून 'निश्य नवा दीस जागृतीचा' मागण्यास प्रारभ केला. परंतु त्याचे अवखळ चित्त एकाग्र होईना पुनःपुनः ते प्रपचात, नाना विषयात गुरफटून जाऊ लागले या मनास सावरण्याचा, प्रयत्न तुकोबानी कसा केला हे त्याच्या अनेक अभंगात स्पष्ट झाले आहे. 'चित्त गुतले प्रपचे । जाले वेडें ममतेचे ।' 'पुत्रदाराधन होता मनीं धंदा । गोवियेलों सदा होतों कामें', 'स्त्रीपुत्रादिका राहिला आदर । विषयीं पिडभर अतिशय', 'मज हे वासना अनावर' इत्यादी वचनातून त्याच्या मनाची ओढाताण स्पष्ट आहे 'देव ना संसार । दोन्ही ठायीं नाहीं थार', 'काय करू आता या मना । न सडी विषयाची वासना', 'काय करूं या मना आता । का विसरतें पंढरिनाथा' असे आतरिक संघर्ष तुकोबाच्या जीवितात सतत प्रारंभी तरी दिसतात या अंतरंगातील युद्धाप्रमाणे त्याना बाहेरील विपरीत परिस्थितीशीही झगडावे लागत होते नाना प्रकारचे लोक नाना निमित्तानी त्याना त्रास देत, त्याना विरोध करीत यासाठी त्याना जगाशी वागताना मनस्ताप सहन करावा लागला आहे. आणि पुढे अधिकाराची प्राप्ती झाल्यावर तर शब्दशस्त्र हाती घेऊन लोकाचे विपरीत संसार दुरुस्त करण्यासाठी ते प्रवृत्त झाले. अनाचारी, स्वार्थी, केवळ प्रपंचाकडे लक्ष देणारे, वासनाबद्ध याना सावध करण्यासाठी तुकोबा कठोर प्रहार करण्यास प्रवृत्त झाले जे कुणी ढोगी व मतलबी साधुपुरुष सर्वसामान्य लोकाना फसवितात त्यानाही तुकोबानी कठोर शब्दात बोल दिला आहे या सदर्भाने तुकोबाचे संसार-परमार्थविषयक विचार समजावून घ्यावयास हवेत

४०९९ संसारा आलिया एक सुख आहे । आठवावे पाय विठोबाचे ॥ १ ॥
येणे होय सर्व संसार सुखाचा । न लगे दुःखाचा लेश कांहीं ॥ २ ॥
घेईल तयासी सोपें आहे सुख । बोलियेले मुखें नारायण ॥ ३ ॥
सांगितली सोय करुणासागरें । तुम्हां कां हो बरें न वाटतें ॥ ४ ॥
तुका म्हणे तेणें उपकार केला । भोळ्या भाविकाला तरावया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मागील अभगक्र. ३९२८ पाहावा

४१०० आह्मां भय धाक कोणाचा रे पाहें । काळ मशक काय मानव हे ॥ १ ॥
आह्मांसी ते काय चिंता या पोटाची । माउली आमुची पांडुरंग ॥ २ ॥
काय करावी हे कोणाची मान्यता । करितां अनंता कोण वारी ॥ ३ ॥
नाहीं शीण आह्मां जालें कवतुक । पुनीत हे लोक करावया ॥ ४ ॥
तुका म्हणे खातो आनंदाचे लाडू । नका चरफडूं घ्या रे तुह्मी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मशक–चिलट, पुनीत–पवित्र

अर्थ :– देवा, आम्हाला भय व धाक कुणाचा आहे ते पाहा बरे हा काळ व हा मानव आमच्या पुढे क्षुद्र मशकाप्रमाणे आहे १ आम्हाला आमच्या पोटाची चिंता कशासाठी असावी ? आमची माऊली चिंता करणारी पाडुरंग आहे २ इतर कुणाकडून होणारी मानमान्यता कशासाठी हवी ? या अनताची सेवा करायला लागले तर कोण निवारण करणार ? ३ आम्हाला कोणत्याही प्रकारचा शीण नाही या लोकाना पवित्र करणे हे आमचे कौतुकाचे काम आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही स्वानदाचे लाडू खात आहोत. यासाठी कुणी उगाच चरफडू नका. तुम्ही त्याचे सेवन करा ना ५

तु गाथा–३...५५

४१०१ तांबियाचें[1] नाणें न चले खऱ्या मोलें । जरी हिंडविलें देशोदेशीं ॥ १ ॥
करणीचें कांहीं न मने सज्जना । यावें लागे मना वृद्धांचिया ॥ २ ॥
हिरियासारिखा दिसे शिरगोळा[2] । पारखी ते डोळां न पाहाती ॥ ३ ॥
देऊनियां भिंग कामाविलें मोतीं । पारखिया हातीं घेतां नये ॥ ४ ॥
तुका म्हणे काय नटोनियां व्यर्थ । आपुलें हें चित्त आपणा ग्वाही ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– शिरगोळा–गारेचा दगड, पारखी–परीक्षा करणारे.

अर्थ :– तांब्याचे नाणे सोन्याचांदीच्या खऱ्या नाण्याप्रमाणे चालत नाही. अनेक देशांत जरी ते नेऊन दाखविले तरी त्याची किंमत वाढत नाही. १ कोणत्याही करणीचे दुःख सज्जनांच्या मनास होत नाही, कारण ती गोष्ट ज्ञानवृद्धांच्या मनात यावयास हवी. २ नदीतील गारगोटीचा दगड हिऱ्यासारखा दिसतो. पण त्याची पारख करणारे जे कुणी आहेत ते त्याच्याकडे नजरही टाकीत नाहीत. ३ काच देऊन जर त्याचे मोती बनविले तर त्याची परीक्षा करणारे ते हातातही धरणार नाहीत. ४ तुकाराम महाराज म्हणतात, उगाच नटून काय करायचे आहे ? खऱ्याखोट्याविषयी आपलेच चित्त आपणांस साक्षी असते. ५

४१०२ चित्ता मिळे त्याचा संग रुचिकर । क्षोभवितां[3] दूर तोंचि भलें ॥ १ ॥
ऐसी परंपरा आलीसे चालत । भलत्याची[4] नीत त्यागावरी ॥ २ ॥
हो कां पिता पुत्र बंधु कोणी तरि । विजाति[5] संग्रहीं धरूं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्य पाळावें वचन । अन्यथा आपण करूं नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विजाति–प्रतिकूल.

अर्थ :– ज्याचे चित्त आपणांस मिळाले आहे अशाची संगत करणे बरे. आणि ज्यापासून मनात क्षोभ निर्माण होतो त्याला दूर करणेच चांगले. १ अशीच परंपरा पूर्वीपासून चालत आली आहे. जे आपणांस नको असते त्याचा त्याग करण्याची पद्धत असते २ तो जरी पिता, बंधु, पुत्र यापैकी कुणीही जरी असला, पण तो आपणांस प्रतिकूल असेल तर त्याचा संबंध करू नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सत्य बोलाचे रक्षण करावे. त्याच्याविषयी वेगळे वर्तन कधी करू नये. ४

४१०३ आपुली कसोटी शुद्ध राखी कारण । आगीनें भूषण अधिक पुट[6] ॥ १ ॥
नाहीं कोणासवें बोलणें लागत । निश्चितीनें चित्तसमाधान ॥ २ ॥
लपविलें तें ही ढेंकरें उमटे । खोटियाचें खोटें उर फोडी ॥ ३ ॥
तुका म्हणे निंदा स्तुति दोन्ही वाव । आपुलाला भाव फळा[7] येतो ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाव–व्यर्थ

अर्थ :– आपली कसोटी चांगली शुद्ध राखावी. कारण सुवर्णाला पुट देऊन त्यास अग्नीत तापविले की अधिक शोभते. १ कुणाजवळ बोलण्याची जरूरी पडत नाही. निश्चितीनेच चित्तास समाधान मिळते. २ आरम आपले जेवण लपविण्याचा प्रयत्न केला तर ढेकर येऊन खरे काय ते प्रकट होते. खोट्यानेच खोटेपणाचा ऊर फोडला जातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, निंदा व स्तुती दोनही व्यर्थच आहेत. जसा आपला भाव असेल त्याप्रमाणे आपणांस फळ मिळेल ४

१ तांबगी हें नाणें, २ ब्रह्मगोळा, ३ क्षोभविने दुर तेचि, ४ भले त्या०, ५ द्जाति, ६ पुडा, ७ मळों.

४१०४ आणिकांच्या घातें मानितां संतोष । सुखदु:ख दोष अंगी[1] लागे ॥ १ ॥
ऐसें मनीं वाहूं नयेती[2] संकल्प । करूं नये पाप भांडवल ॥ २ ॥
क्लेशाची[3] हे चित्तीं राहाते कांचणी । अग्नीत टाकोनी ठाव जाळी ॥ ३ ॥
तुका म्हणे येणें[4] घडे पुण्यक्षय । होणार तें होय प्रारब्धेंचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कांचणी–काच.

अर्थ :– दुसऱ्यांच्या घातामुळे संतोष मानला असताना सुखदोष व दु:खच अंगी निर्माण होते. १ म्हणून अशा प्रकारचे संकल्प मनातच आणू नयेत. असे पापाचे भांडवल आपण साठवू नये २ अशा क्लेशाचो पापामुळे चित्तास काच लागतो. म्हणून या पापास अग्नीत जाळून टाकावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, राग येण्याने पुण्याचा क्षय होतो, आणि जे व्हायचे ते प्रारब्धाने होतच असते. ४

४१०५ अज्ञानाची भक्ति इच्छिती संपत्ती । तयाचिये मति[5] बोध कैचा ॥ १ ॥
अज्ञानाची पूजा कामिक भावना । तयाचिया ध्याना देव कैचा ॥ २ ॥
अज्ञानाचें कर्म फळीं ठेवी मन । निष्काम साधन तया कैचें ॥ ३ ॥
अज्ञानाचें ज्ञान विषयावरी ध्यान । ब्रह्म सनातन तया कैचें ॥ ४ ॥
तुका म्हणे जळो ऐसियांचें तोंड । अज्ञानाचें बंड वाढविती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– कामिक–इच्छा ठेवून.

अर्थ :– संपत्तीची इच्छा करणे हीच अज्ञानी माणसाची भक्ती होय. त्याच्या मनात श्रीहरीच्या विषयी बोध कसा प्रकट होणार ? १ मनात लौकिक इच्छा ठेवून अज्ञानी माणसे देवाची पूजा करतात त्यांच्या ध्यानात देव कसा येणार ? २ अज्ञानी माणसे फळावर लक्ष ठेवून कर्म करतात त्यांच्या हातून निष्काम साधना होणार कशी ? ३ लौकिक विषयावर ध्यान ठेवणे हेच अज्ञानी माणसाचे ध्यान असल्यामुळे त्यांना सनातन ब्रह्माची प्राप्ती कशी होणार ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसांचे तोंड जळून जावे. उगाच ते अज्ञानाचेच बंड वाढवितात. ५

४१०६ गुळें माखोनियां दगड ठेविला । वर दिसे भला लोकाचारी ॥ १ ॥
अंतरीं विषयाचें लागलें पै पिसें । बाहिरल्या वेषें भुलवी लोकां ॥ २ ॥
ऐसिया डांभिकां[6] कैची हरिसेवा । नेणेचि सद्भावा कोणे काळीं ॥ ३ ॥
तुका म्हणे येणें कैसा होय संत । विटाळलें चित्त कामक्रोधें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पिसें–वेड.

अर्थ :– वरच्या बाजूने गूळ माखून दगड जर उभा करून ठेविला तर लोकांच्या दृष्टीने तो गूळ आहे असाच भासतो. १ आत अंत:करणात नाना विषयाचे वेड लागले असून बाहेरून मात्र साधुपणाचा वेष मिरवून लोकांना हा फसवितो २ अशा दांभिकांना श्रीहरीची सेवा कसली आली आहे ? कोणत्याही काळी त्यांची सद्भावना जागृत नसते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याचे चित्त कामक्रोधादी भावनांनी विटाळलेले असते तो अशा मार्गाने संत कसा होणार ? ४

४१०७ आयुष्य वेचूनि कुटुंब पोसिलें । काय हित केलें सांग बापा ॥ १ ॥
फुकाचा चाकर जालासी कावाडी । नाहीं सुख घडी भोगावया ॥ २ ॥

१ आणि, २ नयेचि, ३ किल्मिषाची चित्ती राहता, ४ कोपें, ५ चित्ती, ६ दांभिका.

दुर्लभ मनुष्यजन्म[1] कष्टें पावलासी । दिला कुटुंबासी कामभोग ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें आयुष्य नासिलें । पाप तें सांचिलें पतनासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काबाडी–परिश्रम करणारा

अर्थ – बापा, सबंध आयुष्य खर्च करून तू कुटुंबाचे मात्र पोषण केलेस यात कोणते हित साधलेस ते तरी सांग १ फुकट परिश्रम करणारा प्रपंचाचा चाकर मात्र झालास त्यामुळे कोणतेही सुख तुला धडपणे भोगता आले नाही २ मोठे कष्ट करून तू हा दुर्लभ असा मनुष्यजन्म मिळविलास पण तू स्वतःच्या कुटुंबास फक्त काम भोग मात्र दिलेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे तू आपल्या आयुष्याचा नाश केलास आणि पतनास कारणीभूत होणारे पाप मात्र साठविलेस ४

४१०८ अनंत लक्षणें वाणिता अपार । संतांचे तें घर सांपडेना ॥ १ ॥
जयें घरीं संत राहती आपण । तें तुम्हां ठिकाण आतुडेना ॥ २ ॥
ठिकाण धरूनी पाहवे ते संत । उगाच अकांत करूं नये ॥ ३ ॥
संत होऊनियां संतांसी पाहावें । तरिच तरावें तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वाणिता–वर्णन करताना, आतुडेना–सापडेना

अर्थ – अनंत लक्षणे अपारपणे वर्णन करून जरी संतांच्या घराचा शोध केला तरी ते सापडणार नाही १ ज्याच्या घरी संत आपण होऊन राहातात तेही ठिकाण तुम्हास सापडत नाही २ नीट स्थान मनात धरून संतांना पाहावे उगाच आकांत मात्र करू नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, स्वतः संत होऊन संतास शोधाल तरच तुमचा तरणोपाय आहे ४

४१०९ संतांचा पढीयां कैशापरि लाहो । नामाचा आठवो कैसा राहे ॥ १ ॥
हेचि थोर चिंता लागली मनासी । निजतां निद्रेसी न लगे डोळा ॥ २ ॥
जेवितां जेवणीं न लगे गोड धड । वाटतें काबाड विषयसुख ॥ ३ ॥
ऐसिया संकटीं पाव कृपानिधी । लावीं संतपदीं प्रेमभावें ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही नेणों कांहीं हित । तुजविण अनाथ पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पढीयां–प्रेम, लाहो–मिळणार, आठवे–आठवण, काबाड–निःसार, कष्टदायक

अर्थ – संतांच्या बद्दलची प्रीती मनात कशी निर्माण होईल ? श्रीहरीच्या नामाची आठवण मनात कशी राहील ? १ हीच एक मोठी चिंता माझ्या मनास लागलेली आहे, त्यामुळे झोपेच्या वेळी डोळ्यास डोळा लागत नाही २ जेवण करताना एक घासही गोड लागत नाही आणि नाना प्रकारची विषयसुखे कष्टदायक वाटतात ३ कृपानिधी, अशा संकटात तू मला पाव आणि प्रेमभावाने संतांच्या चरणाशी ने ४ तुकाराम महाराज म्हणतात आम्ही आमचे हित काही जाणीत नाही पांडुरंगा, तुझ्याविना आम्ही सारे अनाथ आहोत ५

४११० पंढरीचा वास धन्य तेचि प्राणी । अमृताची वाणी दिव्य देह ॥ १ ॥
मूढ मतिहीन दुष्ट अविचारी । ते होती पंढरी दयारूप ॥ २ ॥
शांति क्षमा अंगीं विरक्ति सकळ । नैराश्य निर्मळ नारी नर ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं धर्मा अभिमान । अवघे जीवन्मुक्त लोक ॥ ४ ॥

---

१ देह

शब्दार्थ व टीपा – जीवन्मुक्त–जिवतपणीच मुक्ती मिळालेले

अर्थ – ज्याचे राहाणे पंढरीस आहे ते प्राणी धन्य होत त्याची वाणी अमृताची असून त्याचा देह दिव्य स्वरूपाचा आहे १ जे मूढ आहेत, मतिहीन आहेत, दुष्ट व दुराचारी आहेत ते या पंढरीत बयारूप होतात २ शांती, क्षमा, विरक्ती इत्यादी सर्व गुण येथील निर्मळ स्त्रीपुरुषाच्या अंगी निर्माण होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, येथील लोकाना वर्णाभिमान नसतो येथील सर्वच लोक जीवन्मुक्तच असतात ४

४१११ जेणें तुझी कास भावें धरियेली । त्याची नाहीं केली साडी देवा[1] ॥ १ ॥
काय माझा भोग आहे तो न कळे । सुखें तुम्ही डोळे झाका देवा ॥ २ ॥
राव रंक तुम्हा सारिकेचि जाणा । नाहीं थोर साना तुम्हापासीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हीं आपगिले भक्ता । माझिया संचिता कृपा नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साडी–त्याग, राव–श्रीमत, रंक–गरीब, आपगिले–साभाळले, संचिता–प्रारब्धात

अर्थ – देवा, ज्याने तुझी कास मोठ्या भक्तिभावाने धरली त्याचा त्याग तू कधीच केला नाहीस १ पण माझाच भोग काय आहे तो समजत नाही कारण तुम्ही माझ्याविषयी देवा, सुखाने डोळे झाकता २ कृपेच्या बाबतीत तुम्हाला श्रीमंत व गरीब सारखेच आहेत तुमच्यापाशी हा लहान, हा थोर असाही भेद नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुम्ही आपल्या भक्ताना साभाळले, पण माझ्या प्रारब्धात मात्र तुमची कृपा दिसत नाही ४

४११२ देखोचे तें ज्ञान करावें ते काई । अनुभव नाहीं आपणासी ॥ १ ॥
इंद्रियाचे गोडी ठकलीं बहुतें । सोडिता मागुतें आवरेना ॥ २ ॥
युक्तीचा आहार नीतीचा वेव्हार । वैराग्य तें सार तरावया ॥ ३ ॥
नाव[2] रेवाळिता घाला घाली वारा[3] । तैसा तो पसारा[4] अहंतेचा ॥ ४ ॥
तुका म्हणे बुद्धि आपुले अधीन । करी नारायण आतुडे तो ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – देखोचे–दुसऱ्याचे पाहून, ठकलीं–फसली, रेवाळिता–रेतीत अडकली असता, आतुडे–सापडतो, प्राप्त होतो

अर्थ – दुसऱ्याचे पाहून ज्याने ज्ञान मिळविले त्याच्या ज्ञानाचा उपयोग काय ? त्याचे करायचे तरी काय ? कारण त्याला तसा अनुभव नसतो १ या प्रकारचे शब्दज्ञानी लोक इंद्रियाच्या सुखलोभाने फसले आहेत त्याचा ते त्याग करू लागले तरी त्याची सुटका होत नाही २ म्हणून युक्तीने आहार करणे वैराग्य धारण करणे हेच तरून जाण्याचे एकमेव सार आहे ३ नाव जर रेतीत वा वाळूत अडकली तर वारा घात करील, अथवा नाव जर नीट सावरली नाही तर वारा घात करील त्याप्रमाणे शब्दज्ञानाच्या अहंतेचा पसारा आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, जो आपली बुद्धी स्वत च्या स्वाधीन ठेवील त्यालाच नारायण प्राप्त होतो ५

४११३ नर नारी बाळें अवघा नारायण । ऐसें माझें मन करीं देवा ॥ १ ॥
न यो काम क्रोध द्वेष निंदा द्वंद । अवघा गोविंद नि संदेह ॥ २ ॥
असावें म्या सदा विषयीं विरक्त । काया वाचाचित्त तुझे पायीं ॥ ३ ॥
करोनिया साह्य पुरवीं[5] मनोरथ । व्हावें कृपावंत तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काया–शरीर

अर्थ – देवा, सब स्त्रीपुरुष लहान मुले ही सर्व नारायणस्वरूपाची आहेत, अशा प्रकारचे माझे मन तू तयार कर १ माझ्या मनात काम, क्रोध, द्वेष, निंदा इत्यादी द्वंद्वे निर्माण न व्हावीत नि संदेहपणे एक गोविंदच

१ वाया, २ नाव नावलिता ३, वर ४ पसर, ५ वरवी

हृदयात वसावा. २ मी नेहमीच नाना विषयांसंबंधी विरक्त असावे. माझी काया, माझे चित्त, माझी वाचा सर्व काही तुझ्या पायी समर्पण व्हावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, कृपावंत व्हावे आणि मला साहाय्य करून माझे मनोरथ पूर्ण करावेत. ४

४११४ आपुल्या पोटासाटीं । करी लोकांचिया गोष्टी ॥ १ ॥
जेणें घातलें संसारीं । विसरला तोचि हरी ॥ २ ॥
पोटा घातलें[1] अन्न । न म्हणे पतितपावन ॥ ३ ॥
मी कोठील आणि कोण । हे न कळे ज्यालागून ॥ ४ ॥
तुका म्हणे नरस्तुति । करितो भाट त्रिजगतीं ॥ ५॥

शब्दार्थ व टीपा :– भाट–स्तुतिपाठक.

अर्थ :– हा मनुष्य आपल्या पोटासाठी लोकांच्या नाना प्रकारच्या गोष्टी करीत असतो. १ आणि ज्या श्रीहरीने स्वत:स संसारात घातले त्यालाच हा विसरून जातो. २ हा पोट भरण्यासाठी त्यात अन्न घालतो, पण त्यावेळी अन्नदात्या पतितपावनाची आठवण करीत नाही ३ मी कोण आहे ? कोठून आलो ? हे त्याला काहीच समजत नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा भाट तीनही जगतांत माणसाचीच स्तुती करीत असतो ५

४११५ स्वयें आपणचि रिता । रडे पुढिलांच्या हिता ॥ १ ॥
सेकीं हें ना तेंसें जालें । बोलणे तितुकें वांयां गेलें ॥ २ ॥
सुखसागरीं नेघे वस्ती । अंगीं ज्ञानपणाची मस्ती ॥ ३ ॥
तुका म्हणे गाढव लेखा । जेथें भेटेल[2] तेथें ठोका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रिता–रिकामा, ज्ञानशून्य.

अर्थ :– हा मनुष्य स्वत: ज्ञानशून्य असून समोर असलेल्या माणसांच्या हिताविषयी तळमळ वाटून रडतो. १ शेवटी हे नाही, तसे नाही असे होऊन सर्व बोलणे याचे वाया गेले. २ याला कधी सुखसागरात वस्ती करायला मिळत नाही. कारण याच्या अंगात ज्ञानपणाचा ताठा असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसास तुम्ही गाढव समजावे. जेथे हा भेटेल तेथे यास ठोकावे. ४

४११६ जगीं कीर्ति व्हावी । म्हणोनी जालासी गोसावी ॥ १ ॥
बहुत केलें पाठांतर । वर्म राहिलेंसे दूर ॥ २ ॥
चित्तीं नाहीं अनुताप । लटिकें भगवें स्वरूप ॥ ३ ॥
तुका म्हणे सिंदळीच्या । व्यर्थ श्रमविली वाचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अनुताप–विरक्ती, पश्चात्ताप.

अर्थ – जगामध्ये आपली कीर्ती व्हावी म्हणून तू गोसावी झालास. १ पुष्कळ पाठांतर केलेस, पण श्रीहरीच्या प्राप्तीचे वर्म दूरच राहिले. २ तुझ्या चित्तात इंद्रियविषयांविषयी अनुताप नसताना उगाच खोटेच भगवे वस्त्र धारण करतोस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, सिंदळीच्या, व्यर्थ तू आपली वाणी श्रमवलीस ४

४११७ प्रावतनाच्या योगें आळशावरी गंगा । स्नान काय जगा करूं नये ॥ १ ॥
उभी कामधेनु मांगाचे[3] अंगणीं । तिसी काय ब्राम्हणीं वंदूं नये ॥ २ ॥

१ घाली, २ देखाल, ३ मागिलें.

कोढियाचे हातें परिसे होय सोने । अपवित्र म्हणोन घेऊं नये ॥ ३ ॥
यातिहीन जाला गांवींचा मोकासी । त्याच्या वचनासी मानू नये ॥ ४ ॥
भावारूढ तुका मुद्रा विठोबाची । न मनी तयांचीं तोंडें काळीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मोकासी–गावाचा प्रमुख, न मनी–मानीत नाहीत.

अर्थ :– प्रारब्धाच्या योगाने जर आळशावर गंगा आली तर जगाने स्नानाचा लाभ घेऊ नये की काय ? १ गाच्या अगणात कामधेनू उभी आहे तिला ब्राह्मणानी वंदन करू नये की काय ? २ कोड हातास फुटले आहे शा माणसाच्या हातातील परीसाने जर लोखंडाचे सोने झाले तर ते अपवित्र म्हणून घेऊ नये की काय? ३ एखादा तिहीन मनुष्य गावचा प्रमुख झाला तर त्याच्या हुकुमास लोक मानीत नाहीत की काय ? ४ तुकाराम महाराज णतात, मी विठोबाची मुद्रा धारण करून भावारूढ झालो आहे या मुद्रेला जे कुणी मानणार नाहीत त्यांची तोंडे ळी होतील ५

१११८ बोलिलों उत्कर्षें । प्रेमरस दासत्वें[1] ॥१ ॥
साच करिता नारायण । जया शरण गेलों तो ॥ २ ॥
समर्थ तो आहे ऐसा । धरिली इच्छा पुरवी ॥ ३ ॥
तुका म्हणे लडिवाळाचें । द्यावें साचे करूनियां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– साच–खरे

अर्थ – प्रेमरसाचा उत्कर्ष करून मी दास्यत्वाच्या भूमिकेवरून बोलत आहे १ ज्या नारायणाला मी रण गेलो तो सर्व खरे करून दाखवितो २ मनात धरलेली इच्छा पूर्ण करणारा तो समर्थ आहे. ३ तुकाराम हाराज म्हणतात, देवा, या लडिवाळ भक्ताचे म्हणणे खरे करून दाखवावे ४

१११९ विचा केला ठोबा । म्हणोनि नांव तो विठोबा ॥ १ ॥
कां रे नेणां त्याचें नांव । काय वेदासि नाहीं ठाव ॥ २ ॥
शेष स्तुती प्रवर्तला । जिव्हा चिरूनि पलंग जाला ॥ ३ ॥
तुका म्हणे सत्ता । ज्याची काळाचिये माथा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचा–ज्ञानाचा, ठोबा–आकार, दाडके, ठाव–माहीत

अर्थ :– ज्ञानाचा विशेष आकार झाला म्हणून या देवास विठोबा हे नाव मिळाले १ हे त्याचे नाव तुम्ही का बरे जाणीत नाही ? ते वेदाला माहीत नाही काय ? २ शेष त्याची स्तुती करायला प्रवर्तला. पण स्तुती करता करता त्याची जिव्हा फाटून गेली आणि तो श्रीहरीचा पलग बनला श्रीहरी शेषशायी झाले ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीची सत्ता प्रत्यक्ष काळावरही आहे, त्याचे नाव तुम्ही का नाही घेत ? ४

विवरण :— तुकोबाचे आराध्य दैवत पढरीचा पाडुरग अथवा विठ्ठल, यासच विठोबा असेही नाव आहे. भगवान श्रीकृष्णाचे हे बालरूप. श्रीकृष्ण विष्णूचा अवतार म्हणून विष्णू-विठ्ठू-विठ्ठल–विठोबा अशी व्युत्पत्ती या देवाच्या नावाची सांगितली जाते. हा देव विठुराया, विठाई माऊली इत्यादी नावानी ओळखला जातो तुकोबानी आपल्या आवडीनुसार या एका महत्त्वाच्या अभगात ' विठोबा ' या शब्दाची व्युत्पत्ती दिलेली आहे विद् म्हणजे जाणणे, ज्ञान, या 'वि'चा ठोबा म्हणजे आकार, सावयव रूप म्हणजे विठोबा प्रत्यक्ष ज्ञानच जे साकार झालेले हे विठोबारूप तुकोबाची ही शब्दसाधना विचार करण्यासारखी आहे इतरही काही मार्गांनी या शब्दाची अथवा नामाची व्युत्पत्ति सांगितली जाते. विठ्ठल म्हणजे दूर एकीकडे रानावनातील रम्य जागा या ठिकाणी राहाणारा

१ दास्यत्वे

विठ्ठल देव म्हणजे हा विठ्ठल होय विष्णु या सस्कृत नामाचा अपभ्रंश विठु आणि त्याचा ममत्वदर्शक, प्रत्यय लागून झालेला विठ्ठल शब्द–अशीही परपरा सर्वमान्य होण्यासारखी आहे विटेवर स्थिर होणारा देव विठ्ठल अथवा विठोबा असाही एक सकेत आहे

४१२० भ्रतारअंगसंगें सुखाची वेवस्था । आधीं तो सांगतां नये कोणा ॥ १ ॥
तथापि सांगणे कुमारिकेपाशीं । ते काय मानसीं सुख मानी ॥ २ ॥
तैसा आत्मबोध आधीं बोलो नये । बोलासी तो काय सांपडेल ॥ ३ ॥
तथापि सागणे बहिर्मुखापाशीं । तो काय संतोपासी मूळ होय ॥ ४ ॥
तुका म्हणे संत सुखाचे विभागी । ब्रह्मानंद जगीं साधुरूपें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेवस्था–अवस्था

अर्थ :– पतीच्या अगसगाचे जे सुख आहे सुखाची जी अवस्था अनुभवास येते ती आधी कुणासच सागू नये १ तथापि ती जर कुमारिकेपाशी सागितली तर तिच्या मनात त्यापासून कोणते सुख निर्माण होणार ? २ त्याप्रमाणे आत्मबोधाचा अनुभव आधी कुणापाशी बोलू नये तो काय बोलून सागता येईल काय ? ३ तथापि तो जर बहिर्मुख माणसास सागितला तर त्याला त्यापासून काय सतोष होणार ? ४ तुकाराम महाराज म्हणतात सत हे आत्मसुखाचे वाटेकरी असतात त्याच्या रूपानी जगात ब्रह्मानंद अनुभवास येतो ५

४१२१ कलयुगामाजी थोर जाले बड । नष्ट लोक लंड जाले फार ॥ १ ॥
न धरिती सोय न पुसती कोणा । येतें जैसे मना तैसे चाले ॥ २ ॥
सज्जनाचा वारा टेको नेदी द्वारा । ऐसिया पामरा तारी कोण ॥ ३ ॥
विश्वास तयाचा बैसेना कोठें ही । स्तुति निंदा पाहीं जीवीं धरी ॥ ४ ॥
तुका म्हणे कैसे केले नारायणे । जाणावे हे कोणे तयाविण ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– लंड–नास्तिक

अर्थ – या कलियुगात नष्ट आणि नास्तिक लोक फारच झाल्यामुळे त्याचे एक मोठे बडच सर्वत्र पसरले आहे १ कुणी कुणाची सोय पाहाणार नाही, की कुणी कुणाला विचारणार नाही जसे ज्याच्या मनात येईल तसे तो वागत राहील २ कलियुगातील लोक आपल्या दारास सज्जनसगतीचा वाराही लागू देणार नाहीत अशा या पामराना कोण तारणार ? ३ त्याचा विश्वासही कधीच कुणावर बसत नाही निंदा या स्तुती ते आपल्या जीवाला लावून घेतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, या नारायणाने याना असे कसे केले ? त्याच्याशिवाय हे कोण जाणेल ? ५

४१२२ आपुली बुटबुट घ्यावी । माझी परताप द्यावी ॥ १ ॥
आपुला[1] मंत्र नव्हे बरा । माझा बईल चुकला मोरा ॥ २ ॥
तुका म्हणे ऐशा नरा । परिस न झोंबे खापरा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– बुटबुट–पुटपुट, गुरुमत्र, परताप–दक्षिणा, मोरा–करड्या रगाचा.

अर्थ :– माझाच गुरुमत्र घ्यावा व माझी दक्षिणा द्यावी १ माझा करड्या रगाचा बैल चुकला तो काही सापडत नाही म्हणून तुझा मत्र काही बरा नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारच्या लोकांना काय करायचे ? त्याना काहीच उमगणार नाही परीस खापराला झोंबून काय फायदा ? ३

४१२३ भावभक्तिवादे करावे कीर्तन । आशाबद्ध मन करूं नये ॥ १ ॥
अन्न पाणी धन द्रव्य नारायण । विठ्ठला वाचून बोलूं नये ॥ २ ॥

१ तुझा

सप्रेम करावें देवाचें कीर्तन । भय द्या सोडून शरीराचें ॥ ३ ॥
तरी मग जोडे विठ्ठलनिधान । केलिया कीर्तन सिद्धि पावे ॥ ४ ॥
देव जोडिलिया तया काय उणें । तुका म्हणे मन धीट करा ॥ ५ ॥

*शब्दार्थ व टीपा :– जोडे–प्राप्त होईल.*

अर्थ :– श्रीहरीचे कीर्तन भावभक्तीने करावे. कोणत्याही आशेने बांधलेले आपले मन ठेवू नये. १ अन्न, पाणी, द्रव्य, धन इत्यादी सर्व नारायणस्वरूपी समजावे. कथेमध्ये एका विठ्ठलाशिवाय काहीच बोलू नये. २ देवाचे कीर्तन मोठ्या प्रेमाने करावे. आणि आपल्या शरीराचे भय सोडून द्यावे. ३ असे केले तरच या विठ्ठलाचे निधान प्राप्त होईल. प्रेमभावाने कीर्तन केल्यासच श्रीहरीच्या प्राप्तीचा हेतू सिद्ध होईल. ४ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा देवाची प्राप्ती झाल्यावर मग काय कमी आहे ? याविषयी मनात नीट विचार करा तुम्ही. ५

विवरण :— सर्वसामान्य लोकानाही अतिशय सुलभ असे साधन या कलियुगात नामस्मरणाचे व कीर्तनाचे साधुसंतानी सांगितले. या कीर्तनाने देव सुखी होतो. या कीर्तनस्थानी देव वैकुंठाहून येऊन नृत्य करतो. कीर्तनातील प्रभुप्रेमाच्या वर्णनामुळे सर्व शरीर द्रवीभूत होते. असे या कीर्तनाचे माहात्म्य संतानी सांगितले असले तरी या चांगल्या साधनाचा गैरवापरही फार पूर्वीपासून होत असावा. कीर्तन करणारे हरिदास व ऐकणारे श्रोते यांच्याविषयी तुकोबासारख्या संतश्रेष्ठानी फारच तपशीलाने वर्णन केले आहे. कीर्तनकाराचे अधिकार जसे त्यांनी सांगितले तसे श्रोत्यानी कीर्तन कसे श्रवण करावे हेही दर्शविले आहे. कीर्तनकार व श्रोते यांच्या चित्तात संगीत, नृत्यवाद्य इत्यादींच्या साथीत फक्त प्रभुप्रेम प्रकट व्हावे. दुसरा लौकिकाचा कुठलाही विचार तेथे नसावा, असा त्यांचा कटाक्ष आहे. विनोद, टवाळी, निंदा इत्यादी विषयांना हरिकीर्तनात स्थान नाही. कीर्तनकाराने बिदागीची इच्छा धरू नये. लौकिक प्राप्तीवर नजर देऊन प्रभूचे गुणगान करू नये. ' टाळ वाद्य नृत्य गीत । अंतःकरण प्रेमभरित ' अशी भूमिका कथा करणाऱ्याची असावी. सात दिवसाचा उपाशी झाला तरी कीर्तनाचा रंग त्याने कधी सोडू नये. कथेकऱ्याने कथेसाठी द्रव्य मागू नये असे वारवार सांगितले आहे. ' कथा करोनिया द्रव्य घेती देती । तया अधोगति नरकवास ' असे ते म्हणतात. ' जेथें कीर्तन करावें । तेथें अन्न न सेवावें ' असा त्यांचा दंडक आहे; इतकेच नव्हे तर ' तट्टा वृषभासी दाणा । तृण मार्गों नये जाणा ' अशी त्यांनी जाणीव दिली आहे. सर्व प्रकारची लौकिक आशा सोडून केवळ प्रभुचिंतनात रमण्यानेच श्रीहरीचे खरे कीर्तन होते.

४१२४ चोरासीं चांदणें वेश्येसी सेजार । परिसेंसी खापर काय होय ॥ १ ॥
दुधाचे आधणीं वैरिले पाषाण । कदा काळीं जाण पाक नव्हे ॥ २ ॥
तुका म्हणे जरि पूर्वपुण्यें सिद्धि । तरिच राहे बुद्धि संतसंगीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– वैरिले–उकळले.

अर्थ :– चोराला चांदण्याचा काय उपयोग ? वेश्येला चांगला शेजार नकोच असतो. परिसाला खापर लागून काय होणार ? १ दूध खूप तापवून त्या आधणात दगड टाकून जर ते उकळले तर ते कधीही शिजणार नाहीत. २ तुकाराम महाराज म्हणतात, जर पूर्वपुण्याची जोड असेल तरच संतसंगाकडे बुद्धी राहील. ३

४१२५ रोगिया मिष्टान्न मर्कटा चंदन । कागासी लेपन कर्पूराचें ॥ १ ॥
निर्नासिका जैसा नावडे आरिसा । मूर्खालागीं तैसा शास्त्रबोध ॥ २ ॥
दास तुका म्हणे विठ्ठलउदारें । अज्ञानअंधारें दूरी केलें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– मर्कटा–माकडास, कागासी–कावळ्यास, कर्पूराचें–कापराचे, निर्नासिका–नाक कापलेले नसणाऱ्या माणसास.

अर्थ – रोगी माणसाला मिष्टान्न आवडत नाही माकडास चंदनाची काय गोडी ? कावळ्यास कापराचे लेपन केले तरी तो काळाच व दुर्गंधीच राहणार १ ज्याला नाक चांगले नाही त्याला आरसा आवडणार नाही त्याचप्रमाणे मूर्ख माणसास शास्त्रबोध कधीच आवडत नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, मी दास आहे पण उदार विठ्ठलाने माझ्या अज्ञानाचा अंधार दूर केला आहे ३

४१२६ मथनासाठीं धर्माधर्म । त्याचें वर्म नवनीत ॥ १ ॥
तेंचि तें घाटू नये । झालें जया नासूनि ॥ २ ॥
सांभाळावें वरावर । वर्म दूर न वजावें ॥ ३ ॥
तुका म्हणे धालें पोट । मग बोटचाटणी[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न वजावें–जाऊ नये, धालें–संतुष्ट झाले

अर्थ – धर्माधर्माची चर्चा करून एवढे मथन कशासाठी करायचे ? तर त्यातून सारभूत असे जे मत रूपी नवनीत ते मिळविण्यासाठी १ एकदा नवनीत हाती आल्यानंतर पुन तेच ते घुसळत बसू नये नाही तर मग हाती आले आहे तेही नाहीसे होते २ याप्रमाणे श्रीहरीच्या प्राप्तीचे वर्म बरोबर सांभाळावे त्याच्यापासून दूर जाऊ नये ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा पोट तृप्त झाल्यानंतर मग बोट चाटीत बसण्यात काय अर्थ आहे ? ४

४१२७ माझा घात पात अथवा हित फार । अवघा विचार तुझ्या हातीं ॥ १ ॥
ठेवुनि जीव भाव तुझ्या ठायीं चित्त । राहिलो निवांत पांडुरंगा ॥ २ ॥
चित्ताचा चाळक बुद्धिचा जनिता । काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे काय करिसी तें पाहीन । ठेविसी राहीन सुखें तेथें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जनिता–जन्म देणारा

अर्थ – देवा, माझा घातपात करणे, अथवा माझे मोठे हित करणे हे सर्व तुझ्याच हातात आहे १ मी माझे चित्त जीवभावासहित तुझ्याच पायी ठेवून पांडुरंगा, निवांत राहिलो आहे २ देवा, तू माझ्या चित्ताचा चालक असून माझ्या बुद्धीस जन्म देणाराही आहेस तुझ्या हातात कोणती सत्ता नाही ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू काय करतोस ते पाहीन अथवा जेथे ठेवशील तेथे सुखाने राहीन ४

४१२८ संतपाउलें साजिरीं । गंगा आली आम्हांवरी ॥ १ ॥
जेथें पडे रजधुळी । तेथें करावी अंघोळी ॥ २ ॥
स्वेतबंद वाराणसी । अवघीं तीर्थें तयापासीं ॥ ३ ॥
तुका म्हणे धन्य जालों । संतसागरीं मिळालों ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – साजिरीं–शोभिवंत, स्वेतबंद–सेतुबंध रामेश्वर

अर्थ – या संताची पावले शोभिवंत असून त्यांच्या रूपानें आम्हांवर ही गंगाच आली आहे १ त्यांच्या पायांची धूळ ज्या ठिकाणी पडेल त्या ठिकाणी आंघोळ करून पवित्र व्हावे २ रामेश्वर, काशी इत्यादी सब तीर्थे त्यांच्या पायाशी आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात मी या संतसागरास मिळून धन्य झालो आहे ४

४१२९ न घडे मायबापें बाळकाचा घात । आपणादेखत होऊं नेदी ॥ १ ॥
कां मी मनीं चिंता वाहू भय धाक । काय नव्हे एक करितां तुज ॥ २ ॥
वर्म जाणे त्याच्या हिताचे उपाय । तान भूक वाहे कडियें सादीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तूं गा कृपावंत भारी । ऐसें मज हरी कळों आलें ॥ ४ ॥

[1] बोटचाटणी

शब्दार्थ व टीपा – तान–तहान, कडिये–कडेवर

अर्थ :– आपल्या बालकाचा घात त्याच्या आईबापाकडून कधीच होत नसतो आणि इतर कुणी तो करू लागले तर तो आपणादेखत करू देत नाहीत १ त्यामुळे देवा, मी उगाच मनात कुणाची भीती, चिंता अथवा धाक कशासाठी बाळगू ? तू मनात आणलेस तर काय करणार नाहीस ? २ आपल्या बालकाचे हित जेणेकरून होईल तेच मर्म आईबाप जाणतात व बालकाची तहान-भूक जाणून त्याला कडेवर वागवतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, तू फार कृपावंत आहेस असे मला समजून आले आहे ४

४१३० करावे कीर्तन । मुखीं गावे हरिचे गुण ॥ १ ॥
मग कांहीं नव्हे बाधा । काम दुर्जनाच्या क्रोधा ॥ २ ॥
शांतिखड्ग हातीं । काळासी ते नागविती ॥ ३ ॥
तुका म्हणे दाता सखा । ऐसा अनंतासारिखा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नागविती–सापडत नाहीत

अर्थ :– श्रीहरीचे कीर्तन करून मुखाने त्याचेच गुणगान करावे. १ मग त्यायोगे कामक्रोध या दुर्जनांची काही बाधा होणार नाही २ शांतिरूपी खड्गाच्या हातात आहे ते प्रत्यक्ष काळालाही सापडत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या अनंतासारखा दाता आमचा सखा आहे, मित्र आहे ४

४१३१ तुझी कीर्ती सांगों तुजपुढें जरी । ब्रह्मांडीं ही हरी माईना ते ॥ १ ॥
मेरूची लेखणी सागराची शाई । कागद हा मही न पुरेचि ॥ २ ॥
अनंत अपार आपंगिले भक्त । माझेंचि संचित ओडवेना ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हा बोल नाहीं देवा । पामरें म्यां सेवा केली नाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मही–पृथ्वी, आपंगिले–साभाळिले

अर्थ :– हरी, तुझी कीर्ती तुझ्यापुढे सांगू लागलो तरी साऱ्या ब्रह्मांडातही मावणार नाही १ मेरूपर्वताची लेखणी करून सागराची शाई केली आणि सबंध पृथ्वी हा कागद घेतला तरी तुझ्या कीर्तीच्या गायनास पुरा पडणार नाही २ आतापर्यंत तुम्ही अनंत भक्तांचा सांभाळ केला माझेच प्रारब्ध अजून उजळत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, यासबंधी तुम्हाला बोल देता येत नाही मीच पामराने तुमची काही सेवा केली नाही असे म्हणावे लागते ४

विवरण – आराध्य दैवताचे गुणगान करण्यासाठी भक्त कशी अतिशयोक्ती करतात याचे एक उत्तम उदाहरण म्हणजे हा अभंग होय मेरूची लेखणी, सागराची शाई आणि पृथ्वीचा कागद या भव्य कल्पनेचे मूळ शिवाच्या स्तुतीसाठी प्रसिद्ध असणाऱ्या महिम्नस्तोत्रात आहे तुकोबाच्या पठनात, श्रवणात हे स्तोत्र असावे मूळचा संस्कृत श्लोक पुढीलप्रमाणे आहे, 'असितगिरिसमं स्यात् कज्जलं सिंधुपात्रे । सुरतरुवरशाखा लेखनी पत्रमुर्वी ॥ लिखति यदि गृहीत्वा शारदा सर्वकालं । तदपि तव गुणानामीश पारं न याति ' डोंगराएवढी शाई समुद्ररूपी दौतीत घालून देवदारची शाखा ही लेखणी केली, भूपृष्ठ हा कागद घेतला आणि प्रत्यक्ष शारदादेवी काळाच्या अंतापर्यंत लिहीत बसली तरी देवा, तुझ्या गुणाच्या शेवटास ती पोचू शकणार नाही ही मूळ कल्पना महिम्नस्तोत्रामधील तिचा योग्य तो सारांश काढून बुवा आपल्या उद्धाराची निकड दवाजवळ लावीत आहेत

४१३२ काय साधनाच्या कोटी । केल्या आटी होती[1] त्या ॥ १ ॥
देव कृपा करी जरी । होय उजरी स्वरूपीं ॥ २ ॥

---
१ होत्या

केले होते व्यर्थ[1] श्रम । उपरम न होता ॥ ३ ॥
तुका म्हणे कळो आले । सर्व जाले आपरूप ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आटी–परिश्रम, खटपट, उजरी–उदय, उत्कर्ष, प्रकाश, उपरम–वैराग्य, उपरती, आपरूप–आपलेच रूप

अर्थ – नाना प्रकारची कोट्यवधी साधने केली तरी ती खटपट व्यर्थच होत आहे १ या देवाने जर कृपा केली तरच त्याच्या स्वरूपाचा प्रकाश अतरी उमटेल २ मनात खरेखुरे वैराग्य उत्पन्न झाले नाही तर केलेले सर्व श्रम व्यर्थ होतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीच्या कृपेने कळून आले की, सर्व काही आपलेच रूप आहे ४

११३३ तुज काय करू मज एक सार । अमृतनागर[2] नाम तुझें ॥ १ ॥
काय येणे उणे आम्हा तयापोटीं । गोविता हे कठीं कामधेनु ॥ २ ॥
नोळखे तानुले माय ऐसी कोण । वोरसे देखून शोक त्याचा ॥ ३ ॥
जो नाहीं देखिला याचक नयनी । तो पावे घेउनि लज्जा दान ॥ ४ ॥
नामासाटीं प्राण साडियेला रणी । शूर ते भाडणीं न फिरती ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही गाता गीतीं भला । भेटूनी विठ्ठला काय चाड ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा –गोविता–साठविली, नोळख–ओळखत नाही वोरसे–प्रेमभरित होते, चाड–गरज, इच्छा

अर्थ – देवा तुला घेऊन मी काय करू रे ? तुझ्या नामामृताच्या सागराचे सार माझ्यापाशी आहे तेच उत्तम आहे १ आमच्या कठात ही नामरूपी कामधेनू साठविली असताना आम्हास तिच्यामुळे काय कमी आहे ? २ आपल्या तान्हुल्या मुलास ओळखणार नाही अशी कोण आई आहे ? त्याचा शोक पाहून ती प्रेमभरित होणारच ३ याचक डोळ्यानी पाहिला नाही तोच दान द्यावयास तयार असणारा दाता दान देताना कशासाठी लज्जित होईल?४ जो कुणी शूरवीर आहे तो रणागणावरील युद्धात माघारा न फिरता आपल्या नावासाठी प्राणत्याग करतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाचे गुणगान आम्ही नामस्मरण करून गावे हेच बरे त्याशिवाय या विठ्ठलाला भेटून काय उपयोग ? ६

११३४ कृपेचे सागर हेचि साधुजन । तिहीं कृपादान केले मज ॥ १ ॥
बोबडे वाणीचा केला अगीकार । तेणे माझा स्थिर केला जीव ॥ २ ॥
तेणें सुखें मन स्थिर जाले ठायीं । सती दिला पायीं ठाव मज ॥ ३ ॥
नाभी नाभी ऐसे बोलिले वचन । ते माझें कल्याण सर्वस्व ही ॥ ४ ॥
तुका म्हणे जालो आनदनिर्भर । नाम निरतर घोष करू ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – तिहीं–त्यानी अगीकार–स्वीकार, ठाव–स्थान, आश्रय नाभी–भिऊ नकोस, आनदनिर्भर–आनदाने परिपूर्ण

अर्थ – हे साधुसत कृपेचे सागरच आहेत त्यानी मला कृपेचे दान दिले आहे १ त्यानी माझ्या बोबड्या वाणीचा स्वीकार केलेला असल्याने माझा जीव त्रिविधतापातून स्थिर झालेला आहे २ त्या सुखामुळे माझे मन एकाग्र ध्यानावर स्थिरावले सतानी आपल्या पायाशी मला आश्रय दिला ३ 'भिऊ नकोस भिऊ नकोस' असे ते बोलल्यामुळे माझे सर्वस्वी कल्याण झाले ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी या आनदाने परिपूर्ण झालो आहे आता या श्रीहरीच्या नामाचा नित्य घोष करू ५

१ चिता, २ अमृतसागर

४१३५ भक्तीचे ते वर्म जयाचिये हातीं । तया घरीं शांति[1] क्षमा दया ॥ १ ॥
अष्ट महा सिद्धि वोळगती द्वारीं । न वजती[2] दुरी दवडितां ॥ २ ॥
तेथें दुष्ट गुण न मिळे निशेष । चैतन्याचा वास जयामाजी ॥ ३ ॥
संतुष्ट हे चित्त सदा सर्वकाळ । तुटली हळहळ त्रिगुणाची ॥ ४ ॥
तुका म्हणे येथें काय तो संदेह । आमचे गौरव आम्ही करूं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अष्टमहासिद्धी–अणिमा–शरीर सूक्ष्म होणे, महिमा–शरीर मोठे होणे, लघिमा–शरीर हलके होणे, प्राप्ती–इंद्रियाचा त्यांच्या देवताशी संबंध जुळणे, प्राकाश्य–दर्शनाचे सामर्थ्य, ईशिता–मायेची प्रेरणा, वशिता–आसक्त न होणे प्राकाम्य–इच्छेप्रमाणे अमर्याद सुख मिळणे, या आठ महासिद्धी, वोळगती–प्राप्त होतात, न वजती–जात नाहीत, निशेष–मुळीच, थोडाही, त्रिगुणाची–सत्व, रज, तम, या तीन गुणाची, संदेह–शंका

अर्थ – श्रीहरीच्या भक्तीचे वर्म ज्याच्या हातात आले आहे त्याच्या घरी शांती, क्षमा, दया याची वस्ती असते १ त्याच्या दारात अणिमा, महिमा इत्यादी अष्टमहासिद्धी प्राप्त होतात, त्याना दूर दडले तरी त्या दूर जात नाहीत २ त्याच्या ठिकाणी दुष्टपणाचा गुण थोडाही कधी मिळत नाही कारण त्याच्या हृदयात चैतन्यरूपी श्रीहरीने वास केलेला असतो ३ त्याचे चित्त सदासर्वकाळ संतुष्टच असते ४ तुकाराम महाराज म्हणतात, या बाबतीत आमचाच गौरव आम्ही करीत आहोत यात काय शंका आहे ? ५

४१३६ साच हा विठ्ठल साच हें करणें । संत जें वचनें बोलियेले ॥ १ ॥
साच तें स्वहित साच ते प्रचित । साच वेद नीत सांगतील[3] ॥ २ ॥
तुका म्हणे घेती साच साच भावें । लटिकें वर्म ठावें नाहीं त्यासी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–खरा

अर्थ – विठ्ठल हा खरा असून त्याचे सर्व करणे हेही खरेच आहे, असे संतानी सांगितले आहे १ वेदानी सांगितलेली नीत खरी असून त्याप्रमाणे वागल्यास आपले हित होईल हे खरे आहे कारण अशी प्रचीती खरोखरीच येते २ तुकाराम महाराज म्हणतात, खरे आहे ते खऱ्या भावानेच घेतात त्याना खोटे वर्मच माहीत नाही. ३

४१३७ संगें वाढे सीण न घडे भजन । त्रिविध हे जन बहु देवा ॥ १ ॥
याचि[4] मुळें आला संगाचा कांटाळा । दिसताती डोळा नानाछंद ॥ २ ॥
एकविध भाव राहावया ठाव । नेदी हा संदेह राहो चित्तीं ॥ ३ ॥
शब्दज्ञानी हित नेणती आपुलें । आणीक देखिलें नावडे त्या[5] ॥ ४ ॥
तुका म्हणे आता एकलेचि भले । बैसोनि उगले राहावें तें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव–स्थान, जागा, उगले–शांत, स्वस्थ

अर्थ – देवा, संगतीने शीण वाढतो आणि संगतीनेच भजनही घडते अशा प्रकारे हे लोक त्रिविध प्रकारचे आहेत १ यामुळे लोकाच्या संगतीचा आम्हास कंटाळा आला कारण त्याच्या ठिकाणी नाना प्रकारचे छंद डोळ्याना दिसतात २ संदेह जर चित्तामध्ये राहिला तर तो एकविधभावास राहण्यासाठी जागाही देत नाही ३ हे शब्दज्ञानी लोक आपले हित जाणीत नाहीत म्हणून त्याना पाहिलेले मला आवडत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आता आपण आपले स्वस्थ राहून एकटेच असावे हे चांगले ५

१ होति, २ वजाती, ३ सांगितली, ४ याचि दुखें या या जनाचा कटाळा, ५ ज्या

४१३८ तुझें वर्म आम्हा कळो आले सुखें । संताचिया मुखें पांडुरंगा ॥ १ ॥
अवघाचि नट वाउगा पसारा । चेईला तू[1] खरा तूचि एक ॥ २ ॥
म्हणउनि देहबुद्धि नासिवता । नातळे या चित्ता नेदावया ॥ ३ ॥
सोय हे लागली पुढिलाची वाट । पावले जे नीट तुजपाशीं ॥ ४ ॥
तुका म्हणे नाहीं कोणासवे काज । बोलायाचें मज अंतरींचें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – चेईला–प्रकटला, काज–कारण, अंतरींचे–अंतःकरणातील

अर्थ – पांडुरंगा, या संतांच्या मुखाने तुझे वर्म आम्हास समजून आले १ तुझ्याशिवाय इतर सर्व पसारा कितीही मोठा असला तरी तो मला माहीत नाही तूच एक प्रकट झाला आहेस म्हणून खरा आहेस २ म्हणून देवा, देहबुद्धी ही नाशवंत आहे या चित्तास ती दिसू शकत नाही की समजून येत नाही ३ जे नीटपणे तुला येऊन पावले आहेत त्यांच्यामुळे त्यांच्यानंतरच्या लोकांना वाट सापडून सोय झाली आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, मला माझ्या अंतःकरणातील बोलण्याचे कारण इतर कुणाशीच नाही ५

४१३९ पुण्यपापा ठाव नाहीं सुखदुःखा । हानिलाभशंका नासलिया ॥ १ ॥
जितां मरण आले आप पर गेले । मूळ छेदियेले संसाराचे ॥ २ ॥
अधिकार[2] जाती वर्णधर्मयाती । ठाव नाही सत्यअसत्याशी ॥ ३ ॥
जन वन भिन्न आचेत चळण । नाहीं दुजेपण ठाव यासी ॥ ४ ॥
तुका म्हणे देह वाईले विठ्ठली । तेव्हाच घडली सर्व पूजा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव–ठिकाण, स्थान आचेत–अचेतन चळण–सचेतन, वाईले–वाहिला

अर्थ – आता माझ्यात पापपुण्यास अथवा सुखदुःखास स्थान नाही असे झाले आहे आता माझ्यातील हानिलाभाविषयीची शंकाही नाहीशी झाली आहे १ मला जणू जिवंतपणीच मरण आले असून माझ्यातील आप-परभाव गेलेला आहे मी संसाराचे मूळच छेदून टाकले आहे २ आता माझ्या ठिकाणी सत्य-असत्याचा संबंध उरलेला नाही त्यामुळे वर्ण, धर्म जाती याविषयीचा अधिकारही संपलेला आहे ३ आता जन व वन, सचेतन व अचेतन अशा दुजेपणास स्थान माझ्या ठिकाणी राहिलेले नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही हा आमचा देह विठ्ठलाला वाहिला असल्यामुळे त्याच वेळी त्याची सर्व प्रकारची पूजा घडली ५

४१४० संकोचतो जीव महत्वाच्या भारे । दासत्वचि बरें बहु वाटे ॥ १ ॥
कळावी जी माझी आवडी हे संता । देणे तरि आता हेचि द्यावे ॥ २ ॥
तुमचे चरण पावविलो सेवा । म्हणउनि हेवा हाचि करीं ॥ ३ ॥
विनउनी तुका वंदितो चरण । लेखा रजरेण चरणींचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हेवा–हाव, लेखा–समजा, माना

अर्थ – माझ्याकडे मोठेपणा आल्यामुळे त्याच्या भाराने माझा जीव फारच संकोचतो आहे त्यामुळे देवा, तुमचे दास्यत्व करणे हेच मला बरे वाटते १ अशी ही माझी आवड तुम्हा संतांना समजावी तुम्ही मला काही देणार असाल तर हेच एक द्याव २ तुमच्या चरणाची सेवा केल्यामुळे मला ते प्राप्त झाले आहे म्हणून मी हीच हाव धरून आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारची विनंती करून मी तुमच्या चरणांना वंदन करीत आहे मला आपल्या चरणावरील धूलिकण समजावे ४

१ तो, २ अधिकार ज्याती कुळधर्म यात

४१४१ देव कैंचा तया दुरी । भाका बरी करुणा ॥ १ ॥
आळवित्या न लगे घर । माय जाणे रे मातुके ॥ २ ॥
नावे[1] तरी ज्याचा भार । पैल पार जवळी त्या ॥ ३ ॥
आता परदेशी तुका । जाला लोकावेगळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – घर–आश्रय, मातुके–प्रेमाचा खाऊ

अर्थ :– लोकहो, या देवाची चागली करुणा भाकल्यावर तो काही दूर राहाणार नाही १ जे याची आळवणी करतात त्याना इतर कुठलाही आश्रय शोधण्याचे कारण नाही कारण ही माऊली प्रेमाचा खाऊ देण्याचे जाणते. २ पैलतीरावर जाण्यासाठी ज्याने नामरूपी नावेवर भार टाकला आहे, त्याला पलीकडचा काठ जवळच आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता मी जगावेगळा झालो असल्याने परदेशी झालो आहे श्रेष्ठ प्रकारच्या प्रभूशी मी जवळीक केली आहे ४

४१४२ भक्ति ज्याची थोडी । पूर्ण विषयांची गोडी ॥ १ ॥
तो नरचि नव्हे पाहीं । खर जाणावा तो देहीं ॥ २ ॥
भजन पूजन ही नेणे । काय स्वरूपासी जाणे ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याला । भोवंडून बाहेर घाला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – खर–गाढव, भोवडून–हाकलून

अर्थ – जो श्रीहरीची भक्ती अति थोडकी करतो आणि विषयात मात्र पूर्ण गोडी घेतो, १ त्याला मनुष्य म्हणता येणार नाही त्याला गाढवच समजावे २ देवाचे भजनपूजनही तो जाणीत नसल्यामुळे तो त्याच्या स्वरूपास कसे काय जाणणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या माणसाला हाकलून बाहेर काढावे ४

४१४३ समुद्र हा पिता बंधु हा चंद्रमा । भगिनी ते रमा शंखाची या ॥ १ ॥
मेहुणा जयाचा द्वारकेचा हरि । शंख दारोदारीं भीक मागे ॥ २ ॥
दुष्ट[2] हें जाणावे आपुले स्वहित । तुका म्हणे मात ऐसी आहे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :–रमा–लक्ष्मी, मात–गोष्ट

अर्थ – समुद्र हा जनकाप्रमाणे असून त्याच्यापासूनच चद्र, लक्ष्मी व शख याची निर्मिती झाली लक्ष्मीचा भाऊ एक चद्र व दुसरा शख शखाची बहीण याप्रमाणे ही लक्ष्मी झाली १ परतु लक्ष्मी द्वारकेच्या श्रीकृष्णाची पत्नी झाल्यामुळे शखाचा मेहुणा राजा झाला आणि हा शख मात्र दारोदारी भीक मागत भटकत आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, ही अशी गोष्ट आहे, आपले हित कशात आहे हे जाणून घ्यावे ३

४१४४ भवाचिया सगें बहुच नाडिले । कळिकाळें पाडिले तोंडघसीं ॥ १ ॥
तया भवसगें गुतलासी वायां । धन पुत्र जाया मुलो नको ॥ २ ॥
जेजे घडी जाय तेते काळ खाय । प्राण्या तरणोपाय काय केला ॥ ३ ॥
तुका म्हणे करीं सर्व ही तू त्याग । अर्पी हें सर्वांग जगदीशीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जाया–स्त्री, पत्नी, घडी–वेळ

१ नावेवरी, २ दृष्ट.

अर्थ :–या प्रपंचाच्या संगतीने पुष्कळ लोक नाडले गेले आहेत, त्यांना कळिकाळाने तोंडघशी पाडले आहे. १ अशा या संसाराच्या सोबतीसाठी विनाकारण काय भुलतोस रे ? धन, पुत्र, पत्नी यांच्या प्रेमास भुलू नकोस. २ जो जो तुझा वेळ जात आहे तो तो हा काळ खात आहे. तू प्राणाच्या तरणोपायाचा काय उपाय केला आहेस ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू या सर्व लौकिक गोष्टींचा त्याग कर आणि आपले हे सर्वांग जगदीशाला अर्पण कर. ४

४१४५ रुचे सकळा मिष्टान्न । रोगया विखाच्या समान ॥ १ ॥
तरि कां तया एकासाटीं । कामें अवघीं करणें खोटीं ॥ २ ॥
दर्पण नावडे एका । ठाव नाहीं ज्याच्या नाका ॥ ३ ॥
तुका म्हणे खळा । उपदेशाचा कांटाळा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विखाच्या–विषाच्या, दर्पण–आरसा, खळा–दुष्टास.

अर्थ :– गोड पक्वान्न सर्वांनाच आवडते. परंतु ते रोगी माणसाला मात्र विषाच्याप्रमाणे वाटते. १ म्हणून काय त्या एकाच्यासाठी सर्व कामे खोटी करायची ? २ ज्याच्या नाकाचा पत्ता नाही त्याला आरसा कधी आवडत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे दुष्टाला उपदेशाचा नेहमीच कंटाळा असतो. ४

४१४६ जागा[1] घरटी फिरे तस्कराची दिवसाराती । नीदसुरें नाडिलीं असो ऐसीं मागें किती ॥ १ ॥
हाट करी सकळ जन । वस्तु करा रे जतन ॥ २ ॥
हुशार ठायीं । निजनिजेलिया पाहीं ॥ ३ ॥
सावचित्त असे खरा । लाभ घेउन जाये घरा ॥ ४ ॥
तराळ[2] बोंबे उतराई । राखा आपुलिया भाई ॥ ५ ॥
हरिच्या नामीं घालूं जागा । तुका म्हणे हुशार गा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा– घरटी–फेरी, तस्कराची–चोराची, नीदसुरे–अर्धवट झोपेत असल्याने, अज्ञानाने, हाट–बाजार, सावचित्त–सावध, दक्ष, तराळ–अत्यज जातीचा, रक्षण करणारा नोकर.

अर्थ :– लोकहो, तुम्ही जागे रहा रात्रंदिवस कामक्रोधरूपी चोरट्यांची फेरी सर्वत्र फिरत आहे. या अज्ञानी चोरट्यांनी यापूर्वी किती तरी लोकाना फसविले असेल किंवा अर्धवट झोपलेल्यांना या चोरांनी पूर्वी फार लुबाडलेले आहे. १ सर्व लोक बाजार करीत आहेत ज्याने त्याने आपापली वस्तू जतन करायी. स्वरूपाच्या प्राप्तीस जपून ठेवावे. २ जे निजलेले आहेत त्यानी आपल्याच ठिकाणी जागे राहावे, हुशार राहावे. ३ जो स्वहिताचा लाभ घेऊन आपल्या घरी जाईल तो खरा सावध म्हटला पाहिजे. ४ बंधूंनो, आपापली वस्तू नीट राखून ठेवा असे हा तराळ बोंबलून उत्तराई होतो आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीच्या नामस्मरणासाठी अशीच जागणासाठी हाक देऊ तुम्ही सर्वजण हुशार राहावे. सावध असावे. ६

४१४७ संतांनीं सरता केलों तेसेपरी । चंदनीं ते बोरी व्यापियेली ॥ १ ॥
गुण दोष याती न विचारितां कांहीं । ठाव दिला पायीं आपुलिया ॥ २ ॥
तुका म्हणे आलें समर्थाच्या मना । तरि होय राणा रंक त्याचा ॥ ३ ॥

---

१ जगा, २ तराळ राळ बोंबें

शब्दार्थ व टीपा :- सरता-मान्य, कृतार्थ, याती-जात, राणा-राजा, रंक-दरिद्री.

अर्थ :- चंदनाच्या झाडावर बरीच झाडे असल्यावर ज्याप्रमाणे त्या थोरींनाही चंदनाचा सुगंध येतो, त्याप्रमाणे मला या संतांनी कृतार्थ केले आहे. १ माझे गुणदोष वा माझी जात यासंबंधी काही विचार न करता या संतांनी मला आपल्या पायी स्थान दिले आहे. २ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा समर्थ थोहरींच्या मनात आले की जो दरिद्री आहे तो राजा बनून जातो. ३

४१४८ चित्तीं तुझे पाय डोळां रूपाचें ध्यान । अखंड मुखीं नाम वर्णावे गुण ॥ १ ॥
हेचि एक देवा तुम्हां मागणें दातारा । उचित तें करा माझा भाव जाणूनि ॥ २ ॥
खुंटली जाणींव माझें बोलणें आतां । करूं यावी तैसी करावी बाळकाची चिंता ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां नको देऊं अंतर । न कळे पुढें काय बोलों विचार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- खुंटली-संपली.

अर्थ :- देवा, माझ्या चित्तात तुझे पाय आहेत. माझ्या डोळ्यांना तुझ्याच रूपाचे ध्यान आहे आणि वाणीने मी अखंडपणे तुमच्याच नामाचे गुण वर्णन करीत आहे. १ देवा, माझे हेच एक मागणे तुमच्यापाशी आहे. दातारा, माझ्या मनातील भाव ओळखून जे उचित असेल ते करा. २ माझी आता जाणीव संपली, माझे बोलणेही संपले; आता जशी तुम्हांला या बालकाची काळजी करता येईल तशी करा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता देवा, तुमच्या पायांपासून मला दूर करू नका. यापेक्षा अधिक काय बोलावे हे मला काहीच समजत नाही. ४

४१४९ संतांच्या पादुका घेईन मोचे खांदीं । हातीं टाळ दिंडी नाचेन पुढें ॥ १ ॥
भजनविधी नेणें साधन उपाय । सकळ सिद्धि पाय हरिदासांचे ॥ २ ॥
ध्यानगति मति आसन समाधि । हरिनाम गोविंदीं प्रेमसुख ॥ ३ ॥
नेणता निर्लज्ज नेणें नामभेद । सुखें हा गोविंद गाऊं गीतीं ॥ ४ ॥
सर्व जोडी मज गोत आणि वित्त । तुका म्हणे संतमहंतपाय ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- मोचे-जोडे, नादभेद-गायनाचे प्रकार, गोत-आप्त, वित्त-संपत्ती.

अर्थ :- मी या संतांच्या पादुका या त्यांचे जोडे खांद्यावर घेईन व हातात टाळ घेऊन दिंडीपुढे नाचेन. १ याशिवाय भजनाचा विधी मी जाणीत नाही. इतर साधनाचे उपाय मला माहीत नाहीत. या हरिदासांच्या पायांशी सर्व प्रकारच्या सिद्धी आहेत. २ ध्यानाची गती, त्यातील स्थिर बुद्धी, आसन, समाधी हे सर्व प्रकार मला या गोविंदाचे नाम प्रेमसुखाने घेण्यामुळेच साधतात. ३ मी सर्व बाबतींत नेणता व निर्लज्ज आहे. मी गायनशास्त्रातील नाना प्रकारचे भेद जाणीत नाही. या गोविंदाचे गुणगान मात्र सुखाने गाण्यात गाईन. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या संतमहंतांच्या पायांशीच मला माझे सर्व आप्त व माझी सर्व संपत्ती यांचा लाभ होतो. ५

४१५० हरिजनीं[1] प्राण विकली हे काया । अंकिला मी तया घरीं जालों ॥ १ ॥
म्हणियें सत्वर करीन सांगतां । घेईन मी देतां शेष त्यांचें ॥ २ ॥
आस करूनियां राहेन अंगणीं । उच्छिष्टाची धणी घ्यावयासी ॥ ३ ॥
चालतां ते मार्गी चरणींचे रज । उडती सहज घेइन आतां ॥ ४ ॥
दुरि त्यांपासुनि न वजें दवडितां । तुका म्हणे लाता घेइन अंगीं ॥ ५ ॥

१ हरिजना.

शब्दार्थ व टीपा – काया-शरीर, अंकिला-आज्ञाधारक सेवक आस-आशा, इच्छा, धणी-तृप्ती, रज-कण, न वजे-जाणार नाही दवडिता-घालविल तरी

अर्थ – मी माझे प्राण व माझा देह या हरिजनांना, वैष्णवांना विकून मी त्यांच्या घरी त्यांचा आज्ञाधारक सेवक होऊन राहिलो आहे १ ते जे काम सांगतील ते मी त्वरित करीन आणि त्यांनी जे काय उरेल ते जरी दिले तरी मी सेवन करीन २ त्यांच्या उच्छिष्टाची इच्छा मनात धरून मी त्यांच्या अंगणात राहीन व मनाची तृप्ती होईपर्यंत उच्छिष्टाचे सेवन करीन ३ ते ज्या मार्गाने जातील तेथील धूलिकण, त्यांच्या चरणावरील रजकण उडतील ते मी माझ्या अंगावर धारण करीन ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्यांनी जरी मला घालवून दिले तरी मी त्यांच्यापासून दूर जाणार नाही त्यांनी लाथा जरी दिल्या तरी मी त्या सहन करीन ५

४१५१ पुण्य फळले बहुता दिवसा । भाग्यउदयाचा ठसा ।
जाला[1] सन्मुख तो कैसा । संतचरण पावलो ॥ १ ॥
आजि फिटले माझें कोडें । भवदु:खाचें साकडें ।
कोंदाटले पुढें । परब्रह्म सावळें ॥ २ ॥
आलिंगणे संताचिया । दिव्य जाली माझी काया ।
मस्तक हा पाया । वरी त्यांच्या ठेविता[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे धन्य झालो । सुखें संतांचिया धालो ।
लोटांगणीं आलो । पुढें भार देखोनी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – फळलें-उदयास आले, साकडें-संकट, काया-शरीर, धालों-संतुष्ट झालो, भार-समुदाय

अर्थ – आज माझे पुष्कळ दिवसांचे पुण्य उदयास आले आहे कारण मी सन्मुख होऊन संतचरणापाशी येऊन पोचलो माझ्या भाग्याचा उदयच झाला आहे १ आज माझे कोडे सुटले कारण भवदु:खाचे संकट संपून गेले आणि डोळ्यापुढे सावळे परब्रह्म कोंदाटून उभे राहिले आहे २ संतांच्या आलिंगनामुळे माझे शरीर दिव्य झाले असून मी त्यांच्या पायांवर मस्तक ठेविले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या संतभेटीच्यामुळे मी संतुष्ट झालो, धन्य झालो या वैष्णव संतांचा समुदाय पाहून मी त्यांच्यापुढे लोटांगण घातले ४

४१५२ ठाव देऊनिया राखें पायापाशीं । मी तों आहे रासी पातकाची ॥ १ ॥
पातकाची रासी म्हणता लागे वेळ । ऐके तो कृपाळ नारायण ॥ २ ॥
नारायणनामें अवघें सांग जाले । असंगचि केलें एकमय ॥ ३ ॥
एकमय जाले विठोबाच्या नामें । भेदाभेद कर्मे आणिक कांहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे चित्तीं चिंतिलें जें होतें । तें होय आपैतें नामें याच्या ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव-स्थान, सांग-पूर्ण असंग-अयोग्य, आपैतें-आपोआप

अर्थ – देवा, मी तर पातकाची रासच आहे तरी तुम्ही मला आपल्या पायापाशी स्थान देऊन मला राखावे १ पातकाची रास मी आहे हे म्हणताना वेळ लागतो परंतु हा कृपाळू नारायण ऐकल्यावरोबर उद्धार करतो २ या नारायणाच्या नावाने सर्व काही परिपूर्ण झाले माझ्यासारखा अयोग्य मनुष्य त्याने स्वत:शी एकरूप केला ३ याच्याशिवाय आणखी काही भेदाभेदाच्या कर्मांची जरूरी नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, जे चित्तात चिंतलेले असते ते याच्या नामामुळे आपोआप साध्य होते ५

---

१ जाला, २ ठेवितो

४१५३ आतां आम्हां भय नाहीं बा कोणाचें । बळ विठोबाचें जालें असे ॥ १ ॥
धीर दिला आम्हां येणें पांडुरंगें । न पांगों या पांगें संसाराच्या ॥ २ ॥
तुका म्हणे माझा कैवारी हा देव । नाहीं भय भेव त्याच्या संगें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– पांगें–दारिद्र्य, उणीव, भेव–भीती.

अर्थ :– आता आम्हांला कुणाचे भय नाही. कारण आम्हांस या विठोबाचे बळ प्राप्त झाले आहे १ या पांडुरंगाने आम्हांस धीर दिलेला आहे म्हणून संसाराच्या दारिद्र्यास भिऊन आता आम्ही पांगले जाणार नाही. २ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा देव माझा कैवार घेणारा आहे. त्याच्या संगतीत कुठलेही भय वा भीती नाही. ३

४१५४ भक्ति आम्ही केली सांडुनी उद्वेग । पावलों हें सांग सुख याचें ॥ १ ॥
सुख आम्हां जालें धरितां यांचा संग । पळाले उद्वेग सांडूनियां ॥ २ ॥
तुका म्हणे सुख बहु जालें जिवा । घडली या सेवा विठोबाची ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– उद्वेग–काळजी, चिंता. सांग–पूर्ण.

अर्थ :– सर्व प्रकारची चिंता सोडून आम्ही या श्रीहरीची भक्ती केली. म्हणून याचे परिपूर्ण सुख आम्हांस मिळाले. १ याची संगत धरताच आम्हांला कमालीचे सुख झाले आणि आमच्या मनातील नाना चिंता नाहीशा झाल्या. २ तुकाराम महाराज म्हणतात, या विठोबाची सेवा माझ्या हातून घडली म्हणून माझ्या जीवास फारच सुख झाले. ३

४१५४अ शास्त्रज्ञ हो ज्ञाते असती बहुत । परि नाहीं चित्त हाता आलें ॥ १ ॥
क्षणा एका साटीं न धरवे धीर । तेणें हा रघुवीर अंतरतो ॥ २ ॥
तोळाभर सोनें रतिभार राई । मेळविल्या पाहीं नास होतो ॥ ३ ॥
हरीचे अंकित असतो विरळागत । तयांसी अच्युत कृपा करी ॥ ४ ॥
तुका म्हणे काय धुडवण्या[1] गोष्टी । जंव नाहीं गाठी चित्त आलें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– शास्त्रज्ञ–अध्यात्मशास्त्र जाणणारे, राई–मोहरी, धुडवण्या–पोकळ, रिकाम्या, गांठी–स्वाधीन.

अर्थ :– अध्यात्मशास्त्र जाणणारे ज्ञाते पुष्कळच असतील परंतु त्याचे चित्त त्याच्या स्वाधीन झाले आहे असे नाही. १ एका क्षणाचाही धीर धरवत नसेल तर त्यामुळे या रघुवीरास अंतर पडते. २ तोळाभर सोन्यात एक रतिभार जरी मोहरी मिसळली तर सर्व काही नाश होऊन जाईल. ३ श्रीहरीच्या स्वाधीन सर्वस्वी झालेले क्वचितच असतात. त्यांच्यावर हा अच्युत कृपा करतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत आपले चित्त आपल्या स्वाधीन झाले नाही तोपर्यन्त या पोकळ गोष्टी काय कामाच्या ? ५

४१५५ इंद्रियांसी नेम नाहीं । मुखीं राम म्हणोनि काई ॥ १ ॥
जेवि मासीसंगें अन्न । सुख नेदी तें भोजन ॥ २ ॥
कीर्तन करावें । तैसें करुनी दावावें ॥ ३ ॥
हें तों अंगीं नाहीं चिन्हें । गाइलें वेश्येच्या ढव्यानें ॥ ४ ॥
तुका म्हणे रागा । संत शिवूं नेदिती अंगा ॥ ५ ॥

१ उडविण्या.

शब्दार्थ व टीपा :- नेदी-देत नाही, दव्यानें-साजिद्यानें, नेदिती-देत नाहीत.

अर्थ :- जे आपली इंद्रिये स्वाधीन ठेवीत नाहीत, त्यानी मुखाने रामनाम म्हटल्याने काय होणार भोजनाच्या वेळी अन्नाच्या घासाबरोबर माशी तोंडात गेल्यावर जसे जेवणापासून सुख होत नाही तसेच हे आहे १ जसे कीर्तनात उपदेश करावा तशा प्रकारे वागून दाखवावे ३ ही चिन्हे जर अंगात उमटली नाहीत तर त्याचे कीर्तनातील गाणे वेश्येच्या साजिद्याप्रमाणे समजावे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, संतलोक आपल्या अंगास रागाचा स्पर्श होऊ देत नाहीत. ५

४१५६ न लगे देवा तुझें आम्हांसी वैकुंठ । सायुज्याचा पट न लगे मज ॥ १ ॥
देईं तुझें नाम मज सर्वकाळीं । मागेन वनमाळी हेंचि तुज ॥ २ ॥
नारद तुंबर उद्धव प्रल्हाद । बळी रुक्मांगद नाम घ्याती ॥ ३ ॥
सिद्ध मुनिगण गंधर्व किन्नर । करिताती गजर रामनामें ॥ ४ ॥
तुका म्हणे हरी देईं तुझें नाम । अखंडित प्रेम हेंचि द्यावें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- पट-अधिकार.

अर्थ :- देवा, तुझे वैकुंठ आम्हांस मुळीच नको. सायुज्यमुक्तीचाही अधिकार नको, १ मला नेहमी तुझेच नाम दे. वनमाळी, हीच माझी एक मागणी तुझ्यापाशी आहे २ नारद, तुंबर, उद्धव, प्रल्हाद, बळी, रुक्मांगद यांनी तुझे नामच मागितले. ३ नाना प्रकारचे सिद्ध, ऋषी, मुनिगण, गंधर्व, किन्नर हे सर्व रामनामाचाच गजर करतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, तुमचे नामच मला द्या या विषयीचे अखंडित प्रेम मला हवे. ५

४१५७ पावलों प्रसाद इच्छा केली तैसी । जालें या चित्तासी समाधान ॥ १ ॥
मायबाप माझा उभा कृपादानी । विटे सम जोडूनि पादांवुजें ॥ २ ॥
सांभाळासी येऊं नेदीच उणीव । अधिकारगौरव राखे तैसें ॥ ३ ॥
तुका म्हणे सर्व अंतर्बाह्य आहे । जया तैसा राहे कवळूनी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- पादांवुजें-चरणकमले.

अर्थ :- मी जशी इच्छा केली होती तसा प्रसाद मला मिळाला यामुळे माझ्या चित्तास समाधान झाले. १ विटेवर आपली एकसारखी चरणकमले जोडून हा माझा मायबाप कृपा करण्यासाठी उभा आहे २ आपल्या भक्तांचा सांभाळ करण्यात हा कधी उणेपणा आणीत नाही उलट ज्याचा जसा भावाधिकार असेल तसा त्याचा गौरव हा करतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी सर्वांच्या अंतर्बाह्य स्वरूपात व्यापून आहे ज्याचा जसा भाव असेल त्या प्रमाणात तो आपल्या भक्ताला कवळून असतो. ४

४१५८ होतें तैसें पायीं केलें निवेदन । अंतरलों दिन[1] बहुत होतों ॥ १ ॥
संबोखुनी केलें समाधान चित्त । चोंगरूनि भातें प्रेमरस ॥ २ ॥
नामरत्नमणी करूनी भूषण । अळंकारमंडण माळा दिली ॥ ३ ॥
तुका म्हणे सुखें जालों[2] निरामय । नामीं नामसोय निमग्नता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- संबोखुनी-तृप्त करून, समजावून, चोंगरूनि-वाढून, भातें-खाऊ, निरामय-निरोगी.

अर्थ :- देवा, मी आपल्यापासून फार दिवस दुरावलो होतो पण आज मात्र होते तसे निवेदन मी तुमच्या पायांशी केले आहे. १ तुम्ही माती समजूत काढून माझ्या चित्ताचे समाधान केले मला प्रेमरसाचा खाऊ दिलात.

१ दीन, २ झाले.

नामरत्नमण्याची भूषणे करून अलंकारांत शोभेल अशी एक माळ दिलीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, या सुखामुळे मी निरोगी झालो असून तुझ्या नामात नामाच्या सोयीनें बुडून गेलो आहे ४

४१५९ स्थिरावली वृत्ति पांगुळला प्राण । अंतरींची खूण पावूनिया ॥ १ ॥
पुंजाळले नेत्र जाले अर्धोन्मीळित । कंठ सद्‌गदित रोमांच आले ॥ २ ॥
चित्त चाकाटले स्वरूपा माझारी । न निघे बाहेरी सुखावलो ॥ ३ ॥
सुनीळ प्रकाश[1] उदेजला दिन । अमृताचे पान जीवनकळा ॥ ४ ॥
शशिसूर्या जाली जीवे ओंवाळणी । आनंदा दाटणी आनंदाची ॥ ५ ॥
तुका म्हणे सुखें प्रेमासी डुलत । वीरालो[2] निश्चित निश्चितीनें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पांगुळला-लीन, नम्र झाला, पुंजाळले-प्रज्वलित झाले अर्धोन्मीळित–अर्धवट उघडलेले, रोमांच-कांटा चाकाटले—चकित झाले

अर्थ – अंतरंगाची खूण मला पावल्यामुळे माझ्या वृत्ती स्थिर झाल्या प्राण विनम्र झाला, १ माझे डोळे प्रज्वलित झाले, अर्धवट उघडलेले झाले कंठ सद्‌गदित होऊन अंगावर रोमांच आले २ तुझ्या स्वरूपात शिरकाव झाल्यामुळे माझे चित्त चकित होऊन गेले ते तेथूनच सुखावले असल्यामुळे बाहेरच निघत नाही ३ सुंदर निळसर अशा प्रकाशाचा दिवस उजाडलेला वाटतो जीवनकलेच्या अमृताचे पान केल्यामुळे हा अनुभव आला ४ शशि-सूर्यावरून जीवाची ओंवाळणी करून टाकली स्वानंदात आनंदाची दाटीदाटी होऊन गेली ५ तुकाराम महाराज म्हणतात, या सुखाने मी मोठ्या प्रेमाने डुलत आहे निश्चित मनाच्या अवस्थेत मी श्रीहरीच्या रूपात विरून गेलो आहे ६

विवरण — या एका अतिशय महत्वाच्या अभंगात तुकाराम महाराजांनी अद्वैताच्या अनुभूतीचे गोचर वर्णन करण्याचा प्रयत्न केलेला आहे ज्याचा त्यांनी सतत ध्यास घेतला, ज्याची प्रार्थना केली, ज्याची स्तुती केली, ज्याचे ध्यान केले, ज्याचे सदैव चिंतन केले, ज्याशी आर्ततेने करुणा भाकली, ज्याच्या समोर आत्मनिवेदन केले, ज्याला सर्वस्व समर्पण केले, ज्याचे नामसंकीर्तन केले त्याची त्यांना अलौकिक भेट झाली त्या भेटीचा आस्वाद कसा होता, तिचा रंग कसा होता, कोणते सुख तुकोबांना झाले ? त्या दिव्य साक्षात्काराचे थोडेफार वर्णन योगप्रक्रियाच्या भाषेतही तुकोबा कधी कधी करतात वृत्ती स्थिरावणे, प्राण पांगुळणे, नेत्र पुंजाळणे, डोळे अर्धोन्मीलित होणे, कंठ सद्‌गदित होणे, अंगावर रोमांच उठणे इत्यादी सर्व दृश्ये अनुभाव भगवद्‌भक्ताच्या ठिकाणी प्रकट होतात कंप, रोमांच, स्फुरण, प्रेमाश्रू, खेद, हास्य, प्रलास्य, गायन इत्यादी अष्टसात्विक भावांच वर्णन भक्तिशास्त्रात अनेकदा येते चित्त चाकाटणे, सुनील प्रकाशाचा दिवस उजाडणे, जीवनकला असणाऱ्या अमृताचे पान करणे, शशिसूर्यांना जीवानिशी ओंवाळणे आणि आनंदाची दाटणी आनंदात होणे इत्यादींचा भावार्थ समजण्यासाठी थोडीशी योग-प्रक्रियाची माहिती असणे अगत्याचे आहे भक्तिमार्ग व योगमार्ग वरून भिन्न असले तरी दोहोंचे साध्य एकच असल्यामुळे परिणामी अनुभव समानच असतात

चित्तवृत्तीचा निरोध करून त्याचा स्वत मध्येच लय करून द्रष्टा जेव्हा स्वस्वरूपाच्या अनुभवातच निमग्न होतो अशा स्थितीस योग असं नाव आहे योग म्हणजे जुळणी, जोडणी, मीलन पतंजलि मुनींनी योगाची यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधी अशी आठ अंगे सांगितली आहेत यापैकी प्रत्येकाचे सविस्तर विवेचन करण्यासारखे असले तरी आपण प्रस्तुत अभंगापुरताच यासंबधी विचार करणार आहोत 'चित्ताचा आत्म-स्वरूपी लय करून इंद्रियांचे लक्ष विषयापासून परतवून आत्मस्वरूपाकडे लावणे' याला प्रत्याहार असे म्हणतात. 'चित्ताला कोणत्याही स्थानी बांधून ठेवणे' याला धारणा म्हणतात आणि या धारणेचा एकसारखा अनुभव याला ध्यान म्हणतात धारणा आणि ध्यान यांच्या संबधात मनाचा लय होऊन त्या वेळेस दुसऱ्या कशाचाही अनुभव न होणे याला 'समाधी' असे नाव आहे ध्यान, धारणा व समाधी मिळून समाधिकला होते समाधिकला व वैराग्य

१ प्रकाशला, २ वीरलो

मिळून राजयोग होतो अभ्यासकलेला हठयोग म्हणतात ह म्हणजे सूर्य व ठ म्हणजे चद्र या दोन नाड्यातून वाहाणाऱ्या वायूचा प्राणायामात योग करावा लागतो म्हणून तो हठयोग

समाधीच्या अवस्थेपर्यंतच्या पायऱ्यावर निरनिराळया प्रक्रिया असून धारणेच्या अवस्थेत छायापुरुषसाधन आणि चद्रसूर्यविलोकन ही दोन साधने येतात 'शशिसूर्या जाली जीवें ओवाळणी' म्हणजे काय हे समजण्यासाठी य दोन साधनाच्या स्वरूपाची ओळख थोडक्यात व्हावयास हवी 'उठोनिया प्रात काळीं । शुचिर्भूत जावे अरण्याजवळी । अभ्यास करावा पूर्वाण्हकाळीं । करुनी रविबिंबाकडे पृष्ठभाग ।। तेव्हा पुढें पडे शरीर छाया । तया छायेच्या कठावे ठाया । दृष्टि सारखी लावूनिया । जपावे मनास अतरीं . येणे दिसेल छायापुरुष । शुभ्र स्फटिकवत देह दृश्य । परम उत्कृष्ट पुरुष । साक्षात् शकर जो ।। याचे दर्शनाअतीं । भूतभविष्य कळों लागे चित्तीं । ज्ञान होऊनि मुक्ति । सहजचि होय' असे हे सक्षेपाने दर्शन छायापुरुषसाधनाचे आहे याचप्रमाणे चद्राचीही आराधना सागितली आहे या साधनाची फलितेही सागण्यात येतात 'भुवनज्ञान सूर्ये सयमात्' सूर्यमडळात चित्त एकाग्र केले की सर्व भुवनाचे ज्ञान होते 'चद्रेताराव्यूहज्ञानम्' चद्राच्या ठिकाणी सयम केला की सर्व नक्षत्राचे ज्ञान होते.

या अभगात तुकोबानी 'अमृताचे पान जीवनकला' असे म्हटले आहे या अमृताचे वा जीवनकलेचेही योगशास्त्रात फारच महत्त्व आहे थोडक्यात असे सागता येईल की, आपल्या नाभीच्या खाली कुडलिनी' नावाची एक सर्पाकार शक्ती साडेतीन वेटोळी घालून बसलेली आहे योगसाधनेच्या नाना प्रक्रियाच्या वेळी ही कुडलिनी हळू हळू जागी होऊन सरळ बनते व ती षट्चक्राचा भेद करून मस्तकाभोवती वळसा घालून ब्रह्मरध्राच्या द्वारातून मेंदूच्या वरती असलेल्या सहस्रदलकमळात प्रवेश करते हे कमळ सुवर्णवत् आहे मनुष्यदेहातील हे परमेश्वराचे निवासस्थान मानतात या ठिकाणी उन्मनीचे लावण्य तुर्येचे लावण्य, आकाराचा घात, मोक्षाचा एकात, महाभूताचे तेज, योगद्रुमाचे फळ, आनदाचे चैतन्य असे अनादी, अगण्य परमतत्त्व आहे सतावी जीवनकला हीच असून हिलाच अमृताचा झरा अथवा कामधेनूचा पान्हा म्हणतात आत्म्याची प्रभा हीच असून येथूनच एक अमृतबिंदू सतत स्रवत असतो या सहस्रदलकमलातील अमृतपान हे साधकाचे अतिम कर्तव्य होय हेच त्याचे साध्य होय

'सुनीळ प्रकाश उदैजला दिन' म्हणून एक अनुभव तुकोबानी या अभगात सागितला आहे योगसाधनेत असा प्रकाश, अथवा ध्वनी, रगाचा अनुभव इत्यादीची प्रचीती साधकाना येत असते या प्रकाशाच्या अनुभवापोटी साधकाना ब्रह्मानद होतो 'अतरीचें बीज प्रकाशली ज्योती । मुळीची जे होती आच्छादिली ।। तेणे हा आनद आनदीं न समाये ।' म्हणून तुकोबानीच या प्रकाशाचे व तज्जन्य आनदाचे वर्णन केले आहे हा प्रकाश बहुधा निळसर असतो असे साधकाचे अनुभव आहेत ज्ञानेश्वरादी सतानी या नीलवर्णी प्रकाशाचा उल्लेख आपल्या अभगातून केलेला आहे 'पाहाता तेज नीळ झळकताहे' म्हणून तुकोबानीच वर्णन केले आहे याही अभगात त्यानी 'सुनीळ प्रकाश'चा उल्लेख केलेलाच आहे 'ज्योतीच्या प्रकाशें पाहीन तुझे पाय । या स्थूलामध्यें काय आहे भासें । सूक्ष्माच्या शेजारीं कारण तें असे । नीळबिंदु दिसे शामवर्ण' ज्ञानदेवानीही 'शून्याची योवरी सुनीळ प्रभा', 'नीळबिंदु नीट लखलखीत' अशा शब्दानी या सुनील प्रभेचा उल्लेख केलेला आहे प्रकाशाच्या या अनुभवात अपार आनद साठविलेला आहे. 'आनदाच्या डोहीं आनद तरग । आनदचि अग आनदाचे', 'आनदाचा धारा । सुखें मोहरला झरा', 'आनदें एकान्तीं प्रेमें वोसडत' अथवा 'आनदु रे आजी आनदु रे । सबाह्य अभ्यतरीं परमानदु रे'

या प्रकाशाचा, अमृताचा, आनदाचा अनुभव साधकाना आला की त्याच्या शरीरामध्येही अष्टसात्त्विक भाव प्रकट होतात डोळे विस्फारतात किंवा अर्धोन्मीलित होतात, कठ दाटून येतो, अगावर रोमाच उभे राहतात 'पुंजाळले नेत्र जाले अर्धोन्मिळित । कठ सद्‌गदित रोमाच आले' असा अनुभव येतो एकनाथानी या अवस्थेच मोठे सुरेख वर्णन आपल्या भागवतात केले आहे ते म्हणतात, 'चित्तचैतन्यां होता भेटी । हर्षे बाष्प दाटे कठीं । पुलकांकित रोमाच उठी । उन्मीलित दृष्टि पुजाळे ।। करिता अच्युतचिंतन । सप्रेमें गहिवरें मन । अट्टहासें करी रुदन । अनिवार स्फुरण ऊर्ध्वश्वासे ।। परस्परें निज सवादू । करितां जाला स्वरूपावबोधू । नेत्रीं जळ अगीं स्वेदू । प्राणनादू पागुळे ।।' आणखी एका ठिकाणीही त्यानी या शारीरिक अनुभावाचे असेच वर्णन केले आहे 'अगी रोमाच रवरवित । स्वेदबिंदु

डळमळित। चित्त चैतन्यें द्रवत। तेणें सद्‌गदित पै वाचा। हर्ष ओसंडतां पोटीं। अर्धोन्मीलित होय दृष्टी। जीवशिवां पडली मिठी। ध्यान त्रिपुटी मावळली' भक्तिमार्गी संतांनाही आपले स्वरूप अनुभवास आले की योगी लोकाना जे जे अनुभव येतात त्याचीच प्रचीती येत राहाते.

४१६० बौध्यअवतार[1] माझिया अदृष्टा। मौन्य मुखें[2] निष्ठा धरियेली॥ १॥
लोकांचिपेसाटीं शाम चतुर्भुज। संतांसवें गुज बोलतसां॥ २॥
आलें कलियुग माझिया संचिता। डोळां हाकलितां न पडेसी॥ ३॥
म्यांच तुझें काय केलें नारायणा। कां नये करुणा तुका म्हणे॥ ४॥

शब्दार्थ व टीपा :- अदृष्टा-न पाहिलेला.

अर्थ :- *भगवंताने धारण केलेला हा बौद्ध अवतार मी न पाहिलेला आहे. त्याने मौनातच सुखाने निष्ठा धारण केली आहे. १ पण माझ्या या शामवर्णीय देवाने लोकांच्यासाठी अवतार धारण केलेला असल्यामुळे तो संतांच्या बरोबर गुजगोष्टी करताना दिसतो २ माझ्या प्रारब्धकर्मामुळे हे कलियुग आले. डोळ्यांसमोरून हाकलून दिले तरी ते हालत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, मीच रे तुझे काय केले आहे ? तुला माझी करुणा का येत नाही ? ४*

४१६१ मुखीं विठ्ठलाचें नाम। मग कैंचा भवभ्रम॥ १॥
चालतां बोलतां खातां। जेवितां निद्रा करितां॥ २॥
सुखें असों संसारीं। मग जवळीच हरि॥ ३॥
मुक्तिवरील भक्ति जाण। अखंड मुखीं नारायण॥ ४॥
मग देवभक्त जाला। तुका तुकीं उतरला॥ ५॥

शब्दार्थ व टीपा :- भवभ्रम-संसाराविषयी भ्रम. तुकीं-तुलनेस.

अर्थ :- ज्यांच्या मुखात नेहमी विठोबाचे नाम आहे त्याला संसाराचा भ्रम कुठला आला आहे ? १ *चालताना, बोलताना, जेवण घेताना, झोप घेताना, तो सर्वकाळ त्याच्या नामाचाच उच्चार करीत आहे. २ तो सुखाने संसार करीत असला तरी देव त्याच्याजवळच असतो. ३ अखंडपणे श्रीहरीच्या नामाचा उच्चार करणे ही धारही मुक्तीपेक्षा श्रेष्ठ असणारी भक्ती आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे मी नामाच्या योगाने तुलनेस उतरलो असून भक्त होतो तो या देवरूपास येऊन पोचलो. ५*

४१६२ प्रेम जडलें तुझे पायीं। आणीक न सुचे मजला कांहीं॥ १॥
रात्रीदिवस तुझें ध्यान। तेंचि माझें अनुष्ठान॥ २॥
नामापरतें नेणें दुजें। ऐसें कळलें मजला निज॥ ३॥
तुका म्हणे अंतकाळीं। आम्हां सोडवीं तात्काळीं॥ ४॥

शब्दार्थ व टीपा :- नेणें-जाणीत नाही. दुजें-दुसरे.

अर्थ :- देवा, माझे प्रेम तुझ्याच पायांशी जडून राहिले आहे. याशिवाय मला दुसरे काहीही सुचत नाही. १ *रात्रंदिवस मी तुझेच ध्यान करीत असून माझे अनुष्ठानही तेच आहे. २ एका नामाशिवाय मी दुसरे काहीही जाणीत नाही. असे मला निजहित यामुळेच समजून आले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अंतकाळी आम्हांस तात्काळ सोडवावे. ४*

४१६३ तुझे पाय माझी काशी। कोण जाय माझें काशी॥ १॥
तुझें रूप तेंचि ध्यान। तेंचि माझें अनुष्ठान॥ २॥

१ बौध्य, २ सुख.

तुझे चरण तेचि गया । जाले गयावर्जन देहा ॥ ३ ॥
तुका म्हणे सकळ तीर्थे । तुझे पायीं वसती येथें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- गयावर्जन-गयेस केलेले श्राद्ध वगैरे

अर्थ :- देवा, तुझे पाय हीच माझी काशी आहे नाहीतर माझे कोण काशीस जाणार आहे ? २ तुझे रूप हेच माझे ध्यान असून तेच माझे अनुष्ठानही आहे २ देवा, तुझे पाय हीच माझी गया आहे तेथेच मी गया-वर्जनाचा विधी माझ्या देहासबधी करीन ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्या पायाच्या ठिकाणी सर्व तीर्थांचा निवास आहे ४

४१६४ क्षुधा तृषा कांहीं सर्वथा नावडे । पहावया धावे कोल्हाटासी ॥ १ ॥
कथेसी साक्षेपें पाचारिला जरी । म्हणे माझ्या घरी कोणी नाहीं ॥ २ ॥
बलात्कारे जरी आणला कथेसी । निद्रा घे लोडेंसी टेंकूनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे थुका त्याच्या तोंडावरी । जातो यमपुरी भोगावया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- क्षुधा-भूक, तृषा-तहान, कोल्हाटासी-कोल्हाटयाच्या खेळाकडे, पाचारिला-बोलावले

अर्थ - कोल्हाटयाचा खेळ सुरु झाला की हा तेथे धावत जातो तेथे त्याला भुकेची, तहानेची आठवण-सुद्धा मुळीच होत नाही १ त्याला जर मुद्दाम कुणी श्रीहरीच्या कथेस बोलावले तर म्हणतो, माझ्या घरी कुणी नाही कथेस कसा येऊ ? २ जर कुणी बलात्कारानेच त्याला कथेला आणलेच तर तो कथेत लोडाला टेकून झोप घेतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे लोक यमपुरी भोगायला जातात त्याच्या तोंडावर थुकावे ४

४१६५ श्रीराम सखा ऐसा धरीं भाव । भीवणाचा ठाव पुसीं मना ॥ १ ॥
शरण निरंतर म्हण तू गोविंदा । वाचे लावीं धंदा नारायण ॥ २ ॥
यापरि सोपान नाहीं रे साधन । वाहातसे आण तुझी मना ॥ ३ ॥
नको कांहीं करूं आळस अंतरीं । जपें निरंतरी रघुपती ॥ ४ ॥
तुका म्हणे मोठा लाभ नरदेही । देहींच विदेही होती नामें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा - ठाव-ठिकाण, स्थान, सोपान-सोपा, सुलभ, आण-शपथ, अंतरीं-चित्तामध्ये

अर्थ :- हा श्रीराम आपला सखा आहे असा भाव तू धारण कर भीवणाचा भाव मनात ठेवू नकोस, त्याला स्थानच देऊ नकोस १ मी गोविंदाला शरण आहे असे निरंतर तू म्हणत जा नारायण नारायण असे म्हणण्याचा धंदा तू तुझ्या वाणीला लाव २ यापेक्षा दुसरे सोपे व सुलभ असे साधन नाही रे मना, मी यासबधी तुझी शपथ वाहातो ३ तू चित्तामध्ये आळस न करता सतत या रघुपतीचा जप कर ४ तुकाराम महाराज म्हणतात, या नरदेहाचा असा एक मोठा लाभ आहे की, नामस्मरणाने याच देहाने विदेहीची अवस्था प्राप्त होते ५

४१६६ सर्वांपरी तुझे गुण गा[1] उत्तम । तुझेठायीं प्रेम राहो माझें ॥ १ ॥
माउलीपरिस आहेसी उदार । तरि का निष्ठुर मन केले ॥ २ ॥
गजेंद्राकारणे केले त्वां धावणे । तरि का निर्वाण पाहातोसी ॥ ३ ॥
प्रल्हादा संकटीं रक्षिले त्वा देवा । तरि का केशवा साडी केली ॥ ४ ॥
अन्यायी अजामेळ तो जाला पावन । ऐसे हें पुराण हाका मारी ॥ ५ ॥
तुका म्हणे माझे थोर अपराध । नाम करी छेद क्षणमात्रें ॥ ६ ॥

१ गाऊ

शब्दार्थ व टीपा :– निर्वाण–अखेरचा, अंत, सांडी–त्याग.

अर्थ :– श्रीहरी, सर्वापेक्षा तुझे गुण फारच उत्तम आहेत. तुझ्या ठिकाणी माझे प्रेम निरंतर राहावे. १ तू माऊलीप्रमाणे उदार आहेस. मग माझ्याविषयी एवढे मन निष्ठुर का रे केलेस ? २ गजेंद्राला नक्राच्या मिठीतून सोडविण्यासाठी धावत आलास, मग माझा असा शेवटपर्यन्त अंत का पाहातोस ? ३ प्रल्हादाचे तू संकटातून रक्षण केलेस मग माझाच असा त्याग केशवा, तू का रे केलास ? ४ महा अन्यायी अजामिळही तुझ्या कृपेने पावन झाला, अशी पुराणांनी साक्ष दिलेली आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, माझे अपराध फार घोर असले तरी तुझे नाम एका क्षणात त्याचा नाश करून टाकील. ६

४१६७ आतां वांटों नेदीं आपुलें हें मन । न सोडीं चरण विठोबाचे ॥ १ ॥
दुजियाचा संग लागों नेदीं वारा । आपुल्या शरीरावरूनियां ॥ २ ॥
यावें जावें आम्हीं देवाच सांगातें । मागूनी करीत हेंचि आलों ॥ ३ ॥
काय वांयां गेलों तो करूं उद्वेग । उभा पांडुरंग मागें पुढें ॥ ४ ॥
तुका म्हणे प्रेम मागतों आगळें । येथें भोगूं फळें वैकुंठींचीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– दुजियाचा–दुसऱ्याचा, आगळें– श्रेष्ठ.

अर्थ:– मी आता आपले मन विविध ठिकाणी वाटू देणार नाही. ते फक्त विठोबाच्या चरणीच लावीन. मी हे पाय सोडणार नाही १ मी आपल्या शरीरावरून दुसऱ्याच्या संगतीचा वारादेखील लागू देणार नाही. २ आम्ही या देवाच्याच बरोबर येणेजाणे करतो पूर्वीपासून हेच करीत आलो आहोत. ३ माझ्या मागेपुढे पांडुरंग उभा असताना मी वाया गेलो असे समजून का उगीच चिंता करावी ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी येथे श्रीहरीचे श्रेष्ठ प्रेम मागत आहे. येथेच आम्ही वैकुंठीची फळे भोगू. ५

४१६८ आतां आम्हां हेंचि काम । वाचें स्मरों[१] रामराम ॥ १ ॥
ऐसी मोलाची हे घडी । धरूं पायांची आवडी ॥ २ ॥
अमृताची खाणी । तये ठायीं वेचूं वाणी ॥ ३ ॥
तुका म्हणे पांडुरंगा । माझ्या जीवींच्या जिवलगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– घडी– वेळ.

अर्थ:– वाणीने नित्य रामराम असे स्मरण करण्याचेच एक काम आम्हांला आहे. १ या श्रीहरीच्या पायांची आवड धरण्याची ही अतिशय मोलाची वेळ आहे २ ही एक अमृताची खाण असून त्या ठिकाणीच आम्ही आमची वाणी खर्च करू ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तू माझ्या जीवाचा जीवलग आहेस. ४

४१६९ आतां जावें पंढरीसी । दंडवत विठोबासी ॥ १ ॥
जेथें चंद्रभागातिरीं । आम्ही नाचों पंढरपुरीं ॥ २ ॥
जेथें संतांची दाटणी । त्याचें घेऊं पायवणी ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही बळी । जीव दिधला पायां तळीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दाटणी–समुदाय, पायवणी–पायाचे तीर्थ.

---

१ स्मरा.

अर्थ – आता पंढरपुरला जाऊन या विठ्ठलाला साष्टांग दंडवत घालावा १ या पंढरपुराच्या चंद्रभागेच्या तीरावर आम्ही प्रेमाने नाचू २ तेथील संतांच्या समुदायाच्या पायाचे तीर्थ आम्ही घेऊ ३ तुकाराम महाराज म्हणतात, या संतांच्या चरणतळी आमचा जीव आम्ही बळी दिला आहे ४

४१७० आम्ही नरका जातां काय येईल तुझ्या हातां । ऐसा तू अनंता विचारीं पां ॥ १ ॥
तुज शरण आलियाचें काय हेंचि फळ । विचारा दयाळ कृपानिधी ॥ २ ॥
तुझें पावनपण न चले आम्हांसीं । ऐसे हृषीकेशी कळों आलें ॥ ३ ॥
आम्ही दुःख पावों जन्ममरण व्यथा । काय तुझ्या हातां येत असे ॥ ५ ॥
तुका म्हणे तुम्ही खादली हो रडी । आम्ही धरली सेंडी नाम तुझें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारीं–विचार कर विचारा–विचार करा

अर्थ – अनंता आम्ही नरकाला गेल्यावर तुझ्या हातांत काय रे येणार ? याचा तू एकदा विचार कर ना ! १ कृपानिधी, दयाळा तुला शरण आल्याचे हेच काय रे फळ ? नीट विचार करा ना २ हृषीकेशी, तुझी पावन करण्याची शक्ती आमच्यापाशी काहीच चालत नाही असे दिसून आले आहे ३ आम्ही जन्ममरणाचे दुःख भोगतो यामुळे तुझ्या हातात कोणता लाभ येतो रे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात देवा, तुम्हीच या बाबतीत रडी खाऊन लबाडी केलेली आहे परंतु तुमची नामरूपी शेंडी आमच्या हातात आहे हे तुम्ही ध्यानात ठेवा ५

४१७१ पांडुरंगे पाहा खादलीसे रडी । परि[1] नामसेंडी धरिली आम्ही ॥ १ ॥
आतां संतांनीं करावी पंचाईत । कोण हा फजितखोर येथें ॥ २ ॥
कोणाचा अन्याय येथें आहे स्वामी । गर्जतसों आम्ही पातकी ही ॥ ३ ॥
याचे पावनपण सोडवाचि तुम्ही । पतितपावन आम्ही आहों[2] खरें ॥ ४ ॥
आम्ही तव आहों अन्यायी सर्वथा । याची पावन कथा कैसी आहे ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही मेलो तरी जाणा । परि तुमच्या चरणा न सोडावें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – पंचाईत–निवाडा

अर्थ – संतहो या पांडुरंगाने रडी खाऊन लबाडी केली असली तरी याची नामरूपी शेंडी आम्ही हाती धरलेली आहे १ आता या ठिकाणी कोण फजितखोर आहे यासंबंधी तुम्ही संतांनीच निवाडा करावा २ स्वामी आता या ठिकाणी कुणाचा अन्याय आहे ? आम्ही पातकी आहोत हे जगजाहीरच आहे ३ पण या देवाचे पतित पावन तुम्ही सिद्ध करून दाखवा ना आम्ही कसे पावन करण्यासाठी पतित आहोत ४ आम्ही तर सर्वथा अन्यायी आहोत पण याची पावन करण्याची कथा कशी आहे ते सांगा ना ५ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही जरी मेलो तरी तुमचे चरण कधी सोडणार नाही ६

४१७२ घालूनिया मध्यावर्ती[3] । दाटुनि उपदेश देती ॥ १ ॥
ऐसे पोटभरे संत । तयां कैंचा भगवंत ॥ २ ॥
राडापोरातें गोविती । वर्मासन ते लाविती ॥ ३ ॥
जसे बोलती निरोपणीं । तैसी न करिती करणी ॥ ४ ॥
तुका म्हणे तया । तमोगुणियाची क्रिया ॥ ५ ॥

---

१ परिणाम, २ असा, ३ मध्यवर्ती

शब्दार्थ व टीपा :– दाटुनि–बळजबरीने, गोवितो–गुंतवतात.

अर्थ :– कुणाला तरी मध्यस्थीपणा करायला लावून हे भोंदू संत इतरांना बळजबरीने उपदेश देतात. १ अशा या पोटभरू संतांना भगवंत कसचा मिळणार ? २ रांडापोरांना ते आपल्या उपदेशात गुंतवतात आणि त्यांच्यापासून वर्षासनाची वेणगी लावून घेतात. ३ असे हे संत निरूपणात जसे बोलतात तशा प्रकारची क्रिया मात्र कधी करीत नाहीत. ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्यांचे सर्व आचरण तमोगुणात्मक असते. ५

४१७३ वैभव तें राज्य संपत्ती टाकावी । उदरार्थ मागावी माधोकरी ॥ १ ॥
आपुलें तें आधीं करावें स्वहित । ऐसी आहे नीत स्वधर्माची ॥ २ ॥
वर्ण कुळ जाति[1] याचा अभिमान । त्यजावा सन्मान लौकिकाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे राहे एकाकी निःशंक । देउनियां हाक कंठीं काळ ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उदरार्थ–पोट भरण्यासाठी, नीत–नीती.

अर्थ :– स्वहितासाठी वैभवाची राज्यसंपत्तीसुद्धा टाकून द्यावी. पोट भरण्यासाठी वाटल्यास माधुकरी मागावी. १ ज्याने त्याने आपले हित अगोदर साधावे अशीच स्वधर्माची नीती आहे. २ वर्ण, कुळ, जात यांचा अभिमान सोडून लौकिकाचा सन्मान टाळावा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू या श्रीहरीशी चित्त देऊन निःशंक होऊन एकाकी राहा. या श्रीहरीस हाक देऊन काळ घालीव. ४

४१७४ हातपाय मिळोनि मेळा । चला म्हणती पाहों डोळां ॥ १ ॥
देखणी नव्हे देखतो कैसे । सकळांचा देखणा डोळाचि असे ॥ २ ॥
डोळयाचा डोळा पाहों गेला । तुका म्हणे तो पाहों ठेला ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– देखणा–पाहाणारा, देखणारा.

अर्थ :– हातापायांचा समुदाय जमून म्हणू लागतो की, चला आपण डोळयांनी पाहू. १ पण त्याचे काम पाहाणे हे नाहीच. सर्वांच्यासाठी पाहाणारा डोळाच असतो. २ सर्व डोळयांचा डोळा, पाहाणारांचा पाहाणारा जो श्रीहरी तो पाहण्यासाठी गेल्यानंतर तुकाराम महाराज म्हणतात, पाहाणारा पाहातच राहिला. ३

४१७५ मुखें संती इंद्रियें जती । आणिक नेणे भाव भक्ती ॥ १ ॥
देवा हेचि दोन्ही पदें । येर गाइलीं विनोदें ॥ २ ॥
चित्ताचे आसन । तुका करितो कीर्तन ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– संती–संतासबंधी, जती–यती, सन्यासी.

अर्थ :– माझ्या मुखात संतांसंबंधी वचने असून इंद्रियविषयांच्या बाबतीत मी संन्यासी बनलो आहे. १ याच दोन गोष्टी देवा, मी सांभाळल्या आहेत. इतर काही गाइले तर ते विनोदाचे समजावे. २ तुकाराम महाराज म्हणतात, मी माझ्या चित्ताचे आसन घालून श्रीहरीचे कीर्तन करतो ३

४१७६ धांवोनियां आलों पहावया मुख । गेलें माझें दुःख जन्मांतरिचें ॥ १ ॥
ऐकिलें ही होतें तैसेंचि पाहिलें । मन स्थिरावलें तुझ्या पायीं ॥ २ ॥
तुका म्हणे माझी इच्छा पूर्ण जाली । कांहीं न राहिली वासना हे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– वासना–इच्छा.

१ याती.

अर्थ :- देवा, मी तुझे मुख पाहाण्यासाठी धावत आलो आणि जन्मजन्मांतरीचे दु.ख निघून गेले. १ जे मी तुझ्याविषयी ऐकले होते तेच आज मी प्रत्यक्ष पाहिले म्हणून तुझ्या पायी मन स्थिर झाले आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझी सर्व इच्छा पूर्ण झाली असून आता इतर कोणतीही वासना राहिलेली नाही. ३

४१७७ गावलोकिकांहीं लावियेलें पिसें । काय सांगों ऐसें तुजपासीं ॥ १ ॥
तोंड काळें केलें फिरविलें मज । नाहीं धरिली लाज पांडुरंगा ॥ २ ॥
काय तुजपासीं सांगों हें गाऱ्हाणें । मग काय जिणें तुझें माझें ॥ ३ ॥
कोणासाटीं आतां करावा संसार । केली वारावार आवणचि ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही मोडिला घरचार । धरियेला धीर तुझ्या पायीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पिसे–वेड, वारावार–सामात्री व्यवस्था, घरचार–घरातील व्यवहार, गृहस्थाश्रमी व्यवहार.

अर्थ :- गावातील लोकांनी मला एक प्रकारे वेडच लावले. तुझ्यापाशी याविषयी काय सांगावे? १ पांडुरंगा, माझे तोंड काळे करून मला फिरवले, यासबंधी त्यांनी लाज धरली नाही २ तुला यासंबंधी मी गाऱ्हाणे तरी काय सांगावे ? मग तुझेमाझे जिणे तरी काय होणार ? ३ आता आम्ही हा संसार तरी कुणासाठी करावा? मी आपली संसाराची सर्व व्यवस्था करून आवराआवर केली आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही आमचा गृहस्थाश्रमीचा आचार मोडून देवा, तुमच्यापायी धीर धरला आहे. ५

४१७८ जीवें जीव नेणे पापी सारिकाचि[1] । नळी दुजयाची कापूं बैसे ॥ १ ॥
आत्मा नारायण सर्वां घटीं आहे । पशुमध्यें काय कळों नये ॥ २ ॥
देखत हा जीव हुंबरे वरडत । निष्ठुराचे हात वाहाती कैसे ॥ ३ ॥
तुका म्हणे तया चांडाळासी नर्क । भोगिती अनेक महादु.खें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– नळी–नरडे, कंठ.

अर्थ –स्वतःच्या जीवाप्रमाणेच दुसऱ्याचा जीव आहे हे न ओळखणारा हा पाप्यासारखाच असून दुसऱ्याचे नरडे कापायला बसतो. १ नारायण हा आत्मारूपाने सर्व वस्तुमात्रात आहे, तो या पशूमध्येही आहे हे याला समजत नाही ? २ त्याच्यादेखत हा पशू ओरडतो, हंबरतो, तरीसुद्धा या निष्ठुराचे हात त्याला मारण्यासाठी कसे चालतात ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या चांडाळाला, नरकाचीच प्राप्ती होईल व तेथे तो अनेक महादुःखे भोगीत राहील ४

४१७९ मनीं भाव असे कांहीं । तेथें देव येती पाहीं ॥ १ ॥
पाहा जनाई सुंदरी । तेथें देव पाणी भरी ॥ २ ॥
शुद्ध पाहोनियां भाव । त्याचे हृदयीं वसे देव ॥ ३ ॥
तुका म्हणे विठोबासी । ठाव देईं चरणापासीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– जनाई–जनाबाई, ठाव–स्थान, आश्रय

अर्थ – जर मनात काही भक्तिभाव असेल तरच देव तेथे येतात हे तू पाहा. १ ही भक्तिमती जनाबाई पाहा ना तिच्या भक्तीमुळे प्रत्यक्ष देवही तिच्या घरी पाणी भरीत असे. २ एखाद्याचा शुद्ध भाव पाहून त्याच्या हृदयात देव वस्ती करतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विठोबा, मला तुझ्या चरणांशी स्थान द्यावेस. ४

[1] सारिखाचि.

४१८० भागल्याचे तारू शिणल्याची साउली[1] । भुकेलिया घाली प्रेमपान्हा ॥ १ ॥
ऐसी हे कृपाळू अनाथाची वेशी । सुखाचीच राशी पांडुरंग ॥ २ ॥
सकळां सन्मुख कृपेचिया दृष्टी । पाहे बहु भेटी उतावीळा ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें आतां उरला कंचा । अनंता जन्मींचा शीण भाग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – तारू–तारणारा नावाडी, वेशी–आधार

अर्थ – ही विठ्ठल माऊली म्हणजे जे दमले भागले आहेत त्यांना तारणारा नावाडी आहे जे शिणलेले आहेत त्यांची ही सावली आहे जे भुकेलेले आहेत त्यांच्या मुखात ही प्रेमाने पान्हा घालीत असते १ अशी ही कृपाळू माता अनाथांचा एक आधारच आहे ही पांडुरंगमाऊली सुखाची रासच उभी आहे २ सगळ्यांच्या सन्मुख होऊन कृपादृष्टीने पाहून फार उतावळा होऊन हा भक्तांच्या भेटीची वाटच पाहात आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता येथे शीणभाग उरणार तरी कसा ? यामुळे माझा अनंत जन्मांचा शीण नाहीसा झाला ४

४१८१ काय न्यून आहे सांगा । पांडुरंगा तुम्हांपें ॥ १ ॥
आमुची तों न पुरे इच्छा । पिता ऐसा मस्तकीं ॥ २ ॥
कैसी तुम्हां होय सांडी । करुणा तोंडीं उच्चारें ॥ ३ ॥
आश्चर्यचि करी तुका । हे नायका वैकुंठिचिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न्यून–कमतरता तुम्हांपें–तुमच्यापाशी, सांडी–त्याग

अर्थ – पांडुरंगा, तुमच्यापाशी कशाची कमतरता आहे ते सांगा ना हो १ तुमच्यासारखा पिता आम्हास लाभूनही आमची इच्छा मात्र कोणतीच पुरी होत नाही २ आम्ही तुमच्याजवळ करुणा भाकीत असताना तुम्ही आमचा त्याग तरी कसा करता ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, वैकुंठनायका, याबद्दल मला फारच आश्चर्य वाटत आहे ४

४१८२ चित्त गुंतले प्रपंचें । जाले वेडे ममतेचे ॥ १ ॥
आतां सोडवीं पांडुरंगा । आले निवारीं तें आगा ॥ २ ॥
गुंतलों चावटी । नामीं रूपीं जाली तुटी[2] ॥ ३ ॥
तुका म्हणे चाली । पुढें वाट खोळंबली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चावटी–बडबडेपणा

अर्थ – माझे चित्त या प्रपंचात गुंतून त्याच्या ममतेने वेडे बनले आहे १ पांडुरंगा, आता तू यातून सोडीव व जे माझ्या अंगाशी आले आहे त्याचे निवारण कर २ माझी ही जीभ वाह्यातपणाने बडबड करण्यातच गुंतल्यामुळे तुझ्या नामरूपाच्या स्मरणात अंतर पडले ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे तुझ्याकडील चालीची वाट खोळंबून राहिली ४

४१८३ किती एका दिवसीं । बुद्धि जाली होती ऐसी ॥ १ ॥
काहीं करावें स्वहित[3] । तों हे न घडे उचित ॥ २ ॥
अवलंबुनी भीक । लाज सांडिली लौकिक ॥ ३ ॥
तुका म्हणे दीन । जालों मनुष्यपणा हीन ॥ ४ ॥

१ माउली, २ भेटी, ३ खचित

शब्दार्थ व टीपा – किती–काही, साडिली–सोडली

अर्थ – काही एका दिवशी पुढीलप्रमाणे मला बुद्धी झाली होती १ काहीतरी स्वहित साधावे असे वाटले, पण यासबधी उचित असे काही घडले नाही २ मी लौकिकाची लाज सोडून भीकही मागितली ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे मी दीन होऊन मनुष्यपणाच्या बाबतीतही हीन बनलो आहे ४

४१८४ आता बरें जालें । सकाळींच कळों आलें ।। १ ।।
मज न ठेवीं इहलोकीं । आलों तेव्हां जालों चुकी ।। २ ।।
युगमहिमा ठावा । नव्हता ऐसा पुढें देवा ।। ३ ।।
तुका म्हणे ठेवीं । भोगासाटीं निरयगावीं ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – ठावा–माहीत

अर्थ – आता हे बरे झाले आज सकाळीच मला समजून आले १ मी जन्माला आलो हेच फार चुकले. आता मला या लोकात तू ठेवू नकोस २ अशा प्रकारचे युगमान पुढे येईल हे मला माहीत नव्हते ३ तुकाराम महाराज म्हणतात जे कुणी भोगी आहेत त्यांच्यासाठी तू नरकाचा गाव तयार ठेव ४

४१८५ परि आता माझी परिसावी विनती । रखुमाईच्या पती पांडुरंगा ।। १ ।।
चुकलिया बाळा न मारावे जीवे । हित तें करावे मायबापीं ।। २ ।।
तुका म्हणे तुझा म्हणताती मज । आता आहे लाज हेचि तुम्हा ।। ३ ।।

शब्दार्थ व टीपा – परिसावी–ऐकावी

अर्थ – रखुमाईच्या पती पांडुरंगा आता तरी माझी एक विनती ऐकावी १ मी एक चुकलेले बालक असून मला तुम्ही जीवानिशी मारू नये मायबापानी जे हितकारक आहे तेच करावे २ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुझाच आहे असे म्हटले जाते मग आता याची लाज देवा, तुलाच असावी ३

४१८६ पापाचिया मुळें । जाले सत्याचे वाटोळें ।। १ ।।
दोष जाले बळिवत । नाहीं ऐसी जाली नीत ।। २ ।।
मेघ पडो भीती । पिके साडियेली क्षिती ।। ३ ।।
तुका म्हणे काहीं । वेदा वीर्य शक्ति नाहीं ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – नीत–नीती, क्षिती–पृथ्वी

अर्थ – या कलियुगात पापाच्यामुळे सत्याचे वाटोळे झाले आहे १ अनेक दोष बलवान होऊन नीती अगदीच नाही अशी झाली आहे २ वर्षाव करायला मेघ भितात त्यामुळे पृथ्वीवरील पिके नाहीशी झाली आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, वेदपरंपरेत असलेली वीर्यशक्ती येथे दिसेनाशी झाली आहे ४

४१८७ ऐसा दुस्तर भवसागर । नेणों कैसा उतरूं पार ।। १ ।।
कामक्रोधादि सावजें थोर । दिसताती भयंकर ।। २ ।।
मायाममतेचे भोवरे । घेती भयानक फेरे ।। ३ ।।
वासनेच्या लहरी येती । उद्योगहेलकावे वसती ।। ४ ।।
तरावया एक युक्ति असे । तुका नामनावेमधीं बैसे ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा – दुस्तर-तरून जाण्यास कठीण

अर्थ :– हा संसारसमुद्र पुढीलप्रमाणे तरून जाण्यास अतिशय कठीण असा आहे. मी यातून कसा पैलतीराला जाऊ हे काही समजत नाही. १ यात कामक्रोधादी विकारांची सावजे फार असून ती फारच भयंकर दिसतात २ माया व ममता यांचे भोवरे भयानक गतीने फेरे घेताना दिसतात ३ नाना वासनांच्या लहरी उसळतात आणि त्यामुळे नाना उद्योगांना हेलकावे बसतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, या सागरातून तरून जाण्यासाठी एकच उपाय मला दिसतो नामरूपी नावेत बसून हा भवसागर तरून जाता येते ५

४१८८ देव जडला जाइना अंगा । यासी काय करूं सांगा ॥ १ ॥
बरकड देव येती जाती । हा देव जन्माचा सांगाती ॥ २ ॥
अंगीं भरले देवाचे वारें । देव जगचि दिसे सारें ॥ ३ ॥
भूत न बोले निरुतें । कांहीं केल्या न सुटे ते ॥ ४ ॥
जीव खादला दैवतें । माझा आणि[1] पंचभूते ॥ ५ ॥
तुका म्हणे वाडें कोडें । उभें पुंडलिकापुढें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– बरकड-किरकोळ, निरुतें-खरे, वाडेंकोडें-अत्यंत कौतुकाने

अर्थ :– हा देव काही माझ्या अंगी जडला जात नाही याला मी आता काय करू ते सांगा १ इतर किरकोळ देव पुष्कळ येतात व जातात, पण हा देव मात्र जन्माचा सोबती आहे २ या देवाचे वारे माझ्या अंगात भरून राहिले आहे सारे जगच त्यामुळे देवाने भरून गेलेले दिसत आहे ३ बरकड देवाचे भूत मात्र कधी खरे बोलत नाही पण ते काही केल्या सुटतही नाही ४ या पंचमहाभूतांनी व या क्षुद्र दैवतांनी माझा जीव खाल्ला आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात माझा हा देव मात्र कौतुकाने पंढरपुरास पुंडलिकापुढे उभा आहे. ६

४१८९ हरिदासाचिये घरीं । मज उपजवा जन्मांतरीं ॥ १ ॥
म्हणसी कांहीं मागा । हेंचि देगा पांडुरंगा ॥ २ ॥
संतां लोटांगणीं । जातां लाजो नको मनीं ॥ ३ ॥
तुका म्हणे अंगीं । शक्ती देईं नाचे[2] रंगीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उपजवा-जन्म द्या

अर्थ :– देवा, पुढला जन्म मला हरिदासाच्या घरी द्यावा १ पांडुरंगा, काही माग असे तू म्हणतोस, तर हेच दान मला तू दे २ संतांना लोटांगणे घालताना माझ्या मनात लाज न यावी ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या नामसंकीर्तनाच्या रंगात मला नाचण्याची शक्ती तू द्यावीस ४

४१९० लटिक्याचे आंवतणे जेविलिया साच । काय त्या विश्वास तोचि खरा ॥ १ ॥
कोल्हाटिणी लागे आकाशीं खेळत । ते काय पावत अमरपद ॥ २ ॥
जळ[3] मंडपयाचे घोडे राउत नाचती । ते काय तडवती युद्धालागीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तैसे मतवादीयाचे जिणे । दिसे लाजिरवाणे बोलताचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आवतणे-निमंत्रण, बोलावणे, साच-खरे, राउत-शिपाई तडवती-टिकाव धरतील

अर्थ – खोटे बोलणाऱ्या माणसाने जेवणासाठी बोलावणे केले तर ते खरे मानावे काय ? प्रत्यक्ष जेवल्यावाचून त्याचा विश्वास खरा कसा मानावा ? १ कोल्हाटणीच्या खेळात काठीवर उंच उड्या मारल्या जातात;

१ येणें, २ नाचो, ३ जड

तेव्हा ते काय खरोखरच अमरपद भोगतात की काय ? २ आकाशातील ढगाचे नाना आकाराचे घोडे व शिपाई दिसतात म्हणून ते काय खऱ्या युद्धात टिकाव धरतील ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे या मतवादी लोकाचे जिणे असते त्याच्या बोलण्यावरुन ते लाजिरवाणे दिसते. ४

४१९१ काय आम्हीं केले ऐसे । नुद्धरीजेसे सांगावे ॥ १ ॥
हरण कोल्हें वैकुंठवासी । कोण त्यासी अधिकार ॥ २ ॥
गजा नाड्या सरोवरी । नाहीं हरी विचारिले ॥ ३ ॥
तुका म्हणे गणिका नष्ट । माझे कष्ट त्याहूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नुद्धरीजेसे–उद्धार करीत नाही असे, नाड्या–मगराने, विचारिलें–विचार केला

अर्थ – देवा, आम्ही असे काय केले आहे की ज्यामुळे तू माझा उद्धार करीत नाहीस ? ते तरी मला सांगा ना १ हरणे, कोल्ही हीसुद्धा वैकुंठवासी झाली त्यांचा अधिकार तरी असा कोणता मोठा होता ? २ त्या हत्तीला, गजेंद्राला मगराने सरोवरात धरले, त्यावेळी तुम्ही त्याचा उद्धार करताना काही विचार केला नाही किंवा त्याच्या पापाविषयी विचारले नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा त्या नष्ट गणिकेचाही उद्धार तुम्ही केला माझा उद्धार करताना मात्र तुम्हाला अधिक कष्ट होतात काय ? ४

४१९२ भाग्यासाठी गुरु केला । नाहीं आम्हांसी फळला ॥ १ ॥
याचा मंत्र पडता कानीं । आमच्या पेवांत गेले पाणी ॥ २ ॥
गुरु केला घरवासी । आमच्या चुकल्या गाईम्हसी ॥ ३ ॥
स्वामी आपुली बुटबुट घ्यावी । आमुची प्रताप टाकुन द्यावी ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसे नष्ट । त्यासी दुणे होती कष्ट ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – फळला–पावला फलद्रूप झाला, बुटबुट–गुरुमंत्र, प्रताप–दक्षिणा, दुणे–दुप्पट

अर्थ – मी माझ्या लौकिक भाग्यासाठी गुरू केला पण तो काही आम्हाला फलद्रूप झाला नाही १ याचा मंत्र कानावर पडताच आमच्या पेवात पाणी शिरून सारे धान्य खराब झाले २ या गुरूला आम्ही घरीच आसरा दिला तेव्हा आमच्या गाई म्हशी चुकल्या ३ यासाठी गुरुमहाराज, आम्हाला दिलेला गुरुमंत्र तुम्ही आपला परत घ्यावा व आम्ही दिलेली दक्षिणा परत द्यावी ४ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे लौकिक हेतूसाठी गुरु करणारे नष्ट असून त्याना त्यामुळे दुप्पट कष्ट होतात ५

४१९३ गुणा आला विटेवरी । पीतांबरधारी सुंदर ॥ १ ॥
डोळे कान त्याच्या ठायीं । मन पायीं राहो हे ॥ २ ॥
निवारोनी जाय[1] माया । ऐसी छाया जयासी ॥ ३ ॥
तुका म्हणे समध्यान । हे[2] चरण सकुमार ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – समध्यान–सुरेख ध्यान, विषमभावरहित ध्यान

अर्थ – हा श्रीहरी सगुण होऊन विटेवर उभा राहिला हा पीतांबरधारी अतिशय सुंदर आहे १ आपले कान व डोळे याच्याच ठिकाणी लावावेत याच्याच पायाशी आपले मन गुंतून असावे २ याच्या कृपेची छाया अशी असते की तिच्यामुळे दासाची माया निवारली जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे सुंदर ध्यान असून त्याचे चरणही अतिशय सुकुमार आहेत ४

१ गेली, २ ते हे

४१९४ रंगीं रंगें नारायण[1] । उभा करितो कीर्तन[2] ॥ १ ॥
हातीं घेउनियां वीणा । कंठीं राहें नारायणा ॥ २ ॥
देखिलीसे मूर्ती । माझ्या हृदयाची विश्रांति ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । देईं कीर्तनाचा हेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – हेवा–हाव

अर्थ :– देवा, मी उत्साहाने तुझे कीर्तन करीत आहे नारायणा, तू या भक्तिप्रेमाच्या रंगात रंगून जा १ मी हातात वीणा घेऊन कीर्तन करीत आहे नारायणा तू माझ्या कंठात राहा. २ तुझी मूर्ती मी पाहिली आणि त्यामुळे माझ्या हृदयाला विश्रांती मिळाली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, अशा प्रकारच्या कीर्तनाची हाव मला तू दे ४

४१९५ तुझा भरवसा आम्हा । फार होता पुरुषोत्तमा ॥ १ ॥
भवसागरसंकटीं । तारिशील जगजेठी ॥ २ ॥
नाम आदित्याचे झाड । त्याचा न पडे उजड ॥ ३ ॥
सिलंगणीचे सोनें । त्यासी गाहाण ठेवी कोण ॥ ४ ॥
तुका म्हणे देवा । ब्रिद सोडूनिया ठेवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– आदित्याचे–सूर्याचे, सूर्यकमलाचे.

अर्थ :– पुरुषोत्तमा, तुझा भरवसा आम्हास फार होता रे १ तो असा की, जगजेठी, तू आम्हाला या संसार-सागरातून तारशील २ सूर्यफुलाच्या झाडाचे नाव नावालाच असते त्याचा काही उजेड पडत नाही ३ दसऱ्याच्या दिवशी सीमोल्लंघन करून आपट्याच्या पानाचे जे सोने आणले जाते ते काही कुणी गहाण ठेवीत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, पतितपावन हे बीद तुम्ही सोडून द्यावे ४

४१९६ जालों आतां दास । माझी पुरवीं हे आस ॥ १ ॥
पंढरीचा वारकरी । वारी चुको नेदीं हरी ॥ २ ॥
संतसमागम । अंगी भरोनिया प्रेम ॥ ३ ॥
चंद्रभागे स्नान । तुका म्हणे हेंचि दान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आस–इच्छा

अर्थ :– देवा, मी आता तुझा दास झालो आहे माझी तू पुढीलप्रमाणे एक इच्छा पूर्ण कर १ श्रीहरी, मला पंढरीचा वारकरी कर आणि माझी वारी एकदाही चुकू देऊ नकोस २ माझ्या अंगात तुझ्याविषयी प्रेम भरून असू दे. सतत संताची सोबत मला दे ३ तुकाराम महाराज म्हणतात, नित्य चंद्रभागेत स्नान घडावे असेच वरदान तू मला दे ४

४१९७ यासाटीं करितो निष्ठुर भाषण । आहेसी तू जाण सर्वदाता ॥ १ ॥
ऐसें दुःख कोण आहे निवारिता । तो मी जाऊं आतां शरण त्यासी ॥ २ ॥
बैसलासी केणें करूनि एक घरीं । नाहीं येथें उरी दुसऱ्याची ॥ ३ ॥
तुका म्हणे आलें अवघें पायापें । आतां मायबापें नुपेक्षावें ॥ ४ ॥

१ नारायणा, कीर्तना

शब्दार्थ व टीपा :– केणे–जिन्नस, माल, नुपेक्षावें–उपेक्षा करू नये.

अर्थ :– देवा, मी यासाठीच कधी कधी निष्ठुर भाषण करतो तू सर्वदाता असल्याने हे तू जाणतोस १ माझे हे दु ख निवारण करील असा दुसरा कोण आहे की मी त्याला शरण जाऊ ? २ तू एकाच्या घरी आपल्या कृपेचा माल देऊन बसलास अशामुळे दुसऱ्याला काहीच उरणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी सर्वभावाने तुमच्या पायापाशी आलो आहे आता मायबापानी माझी उपेक्षा करू नये ४

४१९८ पोरा लागलीसे चट । धरी वाट देवळाची ॥ १ ॥
सांगितले नेघे कानीं । दुजें मनी विठ्ठल ॥ २ ॥
काम घरीं न करी धदा । येथें सदा दुश्चित्त ॥ ३ ॥
आमुचे कुळीं नव्हते ऐसे । हेचि पिसे निवडले ॥ ४ ॥
लौकिकाची नाहीं लाज । माझें मज पारिखें ॥ ५ ॥
तुका म्हणे नरका जाणें । या या वचनें दुष्टाचे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा .–नेघे–घेत नाही, दुजे–दुसरा, पिसे–वेडे

अर्थ – या पोराला काय चटक लागली पाहा. हा एकसारखी श्रीहरीच्या देवळाचीच वाट धरतो १ काही दुसरे सांगितले तर कानानी ऐकत नाही याच्या मनात एक फक्त विठ्ठलच आहे २ या ठिकाणी सतत दुश्चित होऊन हा राहतो काही कामधदाही करीत नाही ३ आमच्या कुळात कुणी असे निर्माण झाले नव्हते हेच वेडे कसे निवडून निघाले ? ४ याला लौकिकाची काहीच लाज नसल्यामुळे माझे असून हे पोर मला पारखे झाले आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, या पोरासंबधी असे बोलणाऱ्या माणसास नरकासच जावे लागते ६

४१९९ देवा बोले आता बोला । त्वा का धरिला अबोला ॥ १ ॥
भेऊं नको देईं भेटी । तूं का पडिलासी सकटीं ॥ २ ॥
तुझ्या जीवींचे मी जाणें । म्हणसी मुक्ती आम्हा देणे ॥ ३ ॥
तुका म्हणे न लगे काहीं । चित्त राहो तुझे पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – त्वा–तुम्ही

अर्थ – देवा, आता तुम्ही काही तरी बोला ना तुम्ही असा अबोला का हो धरला आहे ? १ देवा, तू काही भिऊ नकोस मला भेट दे तू उगाच का सकटात पडला आहेस ? २ मी तुझ्या जीवाचे जाणतो आम्हाला मुक्ती द्यावी लागेल असे तू मनात म्हणतोस ३ तुकाराम महाराज म्हणतात, पण देवा, मला तुझे काहीही नको माझे चित्त फक्त तुझ्या पायी राहावे ४

४२०० यमधर्म आणिक ब्रह्मादिक देव । त्याचा पूर्ण भाव तुझे पायीं ॥ १ ॥
करिती स्मरण पार्वतीशकर । तेथें मी किंकर कोणीकडे ॥ २ ॥
सहस्रमुखेंसी घोष फणिवरावा । मज किंकराचा पाड काय ॥ ३ ॥
चंद्र सूर्य आणि सर्व तारागणे । करिती भ्रमण प्रदक्षिणा ॥ ४ ॥
तुका म्हणे त्यासी स्वरूप कळेना । तेथें मज दीना कोण पुसे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .– किंकर–सेवक, चाकर, फणिवरावा–शेषनागाचा

अर्थ – प्रत्यक्ष यमधर्म आणि ब्रह्मदेवादी देव याचाही पूर्ण भाव देवा तुझ्या पायांशी आहे १ पार्वती व शंकर तुझेच स्मरण करतात तेथे मी एक सामान्य सेवक कुणीकडे ? २ फणिवर शेषनाग आपल्या सहस्र जिभानी तुझा घोष करीत असताना माझ्यासारख्या सेवकाची काय किंमत असावी ? ३ चंद्रसूर्य व सर्व तारागण तुझ्या भोवती प्रदक्षिणा करीत असताना मी कोण ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, या सर्वांनाही देवा, तुझे स्वरूप समजेना; तेथे मज गरिबाला कोण विचारणार ? ५

४२०१ विठोबाचे पायीं जीव म्यां ठेविला । भक्तिभावें केला देव ऋणी ॥ १ ॥
देव माझा ऋणी आहे सहाकारी । परस्परें वारी भवभय ॥ २ ॥
भवभयडोहीं बुडो नेदी पाहीं । धरूनियां बाही तारी मज ॥ ३ ॥
तारियेले दास पडिल्या संकटीं । विष केले पोटीं अमृतमय ॥ ४ ॥
अमृतातें सेवीतसे नामरसा । तोडियेला फांसा बंधनाचा ॥ ५ ॥
बंधनाचा फांसा आम्हीं कांहीं नेणों । पाय तुझे जाणों पद्मनाभा ॥ ६ ॥
पद्मनाभा नाभिकमळीं ब्रह्मादिक । त्रैलोक्यनायक म्हणविसी ॥ ७ ॥
म्हणविसी देवा दासाचा अंकित । मनाचा संकेत पाहोनियां ॥ ८ ॥
पाहोनियां दृढ निश्चय तयाचा । तोचि दास साचा जवळीक ॥ ९ ॥
जवळीक जाली ब्रह्मीं सुखावले । मार्ग दाखविले मूढा जना ॥ १० ॥
मूढा जनामाजी दास तुझा मूढ । कास तुझी दृढ धरियेली ॥ ११ ॥
धरियेले तुझे पाय रे विठ्ठला । तुका सुखी जाला तुझ्या नामें ॥ १२ ॥

शब्दार्थ व टीपा :- सहाकारी-साहाय्य करणारा, वारी–दूर करतो, बाही–हातास, अंकित–सेवक, स्वाधीन असलेला, साचा–खरोखर

अर्थ – या विठोबाच्या पायी मी माझा जीव ठेवून दिला आहे माझ्या अशा भक्तिभावाने मी देवास ऋणी करून सोडले आहे १ हा देव माझा ऋणी असून मला साहाय्य करणारा आहे परस्परच हा माझे संसारभय दूर करतो. २ हा कधी मला भवसागरात बुडू देत नाही हाताला धरून हा मला वर काढून तारतो ३ प्रत्यक्ष विषही पोटात घेऊन त्याने अमृतमय केले व आपल्या दासाचे संकट दूर केले ४ या नामरसाच्या अमृताचे सेवन करून मी या बंधनाचा फासा तोडून टाकला आहे ५ पद्मनाभा, आम्ही तुझे पाय जाणून घेतल्यामुळे भवबंधनाचा फासा आम्हांस काही जाणवतच नाही ६ पद्मनाभा तुझ्या नाभिकमळावर ब्रह्मदेव असल्यामुळे तू साऱ्या त्रैलोक्याचा धनी झाला आहेस. ७ आपल्या भक्ताच्या मनाचा संकेत पाहून देवा, तू स्वतःला दासांचा सेवक आहेस असे म्हणवून घेतोस ८ हा त्याचा दृढ निश्चय पाहून तो दासही त्याच्या खरोखरीच निकटचा होतो ९ त्याना अशी जवळीक मिळाली व जे परब्रह्माच्या ठिकाणी सुखावले त्यानी या जगात मूर्ख लोकांना मार्ग दाखविला १० मी अशा मूर्ख लोकांतील एक मूर्ख असूनही तुझा दास आहे मी तुझी कास दृढ भावनेने धरली आहे ११ तुकाराम महाराज म्हणतात, विठ्ठला, मी तुझे पाय धरले असून तुझ्या नामस्मरणामुळे मी सुखी झालो आहे १२

४२०२ बहु क्लेशी जालो या हो नरदेहीं । कृपादृष्टी पाहीं पांडुरंगा ॥ १ ॥
पांडुरंगा सर्वदेवाचिया देवा । घ्यावी माझी सेवा दिनानाथा ॥ २ ॥
दिनानाथ ब्रिद त्रिभुवनीं तुझें । मायबापा ओझें उतरावें ॥ ३ ॥
उतरीं सत्वर पैलथडी नेईं । पूर्णसुख देईं पायांपाशीं ॥ ४ ॥

पायापाशीं मज ठेवीं निरंतर । आशा तुझी फार दिवस केली ॥ ५ ॥
केली आस तुझी वाट[1] मी पाहातो । निशिदिनीं ध्यातो नाम तुझें ॥ ६ ॥
नाम तुझें गोड स्वभक्ता आवडे । भक्तालागीं कडे खादा घेसी ॥ ७ ॥
घेसी खाद्यावरी खेळविसी लोभें । पाउल[2] ते शोभे विटेवरि ॥ ८ ॥
विटेवरि उभा देखिलासी डोळा । मनाचा सोहळा पुरविसी ॥ ९ ॥
पुरवीं सत्वर त्रैलोक्यस्वामिया । मिठी घाली पाया तुका भावे ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – आस-आशा, इच्छा

अर्थ – देवा, मी नरदेह प्राप्त करून फारच कष्टी झालो आहे पाडुरगा, कृपादृष्टीने तू माझ्याकडे पाहा १ पाडुरगा, तू सर्व देवांचा देव आहेस दीनानाथा, माझी ही सेवा तू घ्यावीस २ मायबापा, साऱ्या त्रिभुवनात दीनानाथ हे तुझे ब्रीद आहे या ब्रीदाचे ओझे मजवर कृपा करून तू उतरावेस ३ तू या भवसागरात उतर व मला त्वरित पलीकडच्या तीरावर ने आणि तुझ्या पायाशी असलेले पूर्ण सुख मला तू दे ४ मला तू निरतर आपल्या पायापाशी ठेव मी यासाठीच फार दिवस तुझी आशा केली आहे ५ मी तुझी इच्छा करून वाट पहात आहे रात्रदिवस तुझेच नाव मी गातो त्याचेच ध्यान करतो ६ देवा, तुझे गोड नाव तुझ्या भक्तांना आवडते या भक्ताना तू आपल्या कडेवर व खाद्यावर घेतोस. ७ तू त्यांना खाद्यावर घेऊन मोठ्या प्रेमाने खेळवतोस तुझी पाउले विटेवर फारच शोभिवत दिसतात ८ तुला विटेवर उभा राहिलेला पाहिला की डोळ्याना सुख वाटते तू माझ्या मनाचा हा सोहळा पुरवतोस ९ तुकाराम महाराज म्हणतात, त्रैलोक्याच्या स्वामी, मी तुझ्या पायाना मिठी घालून विनवीत आहे की, माझ्या मनाचा हा हेतु तू सत्वर पूर्ण करावास १०

४२०३ एक वेळ तरी जाईन माहेरा । बहुजन्म फेरा जाल्यावरी ॥ १ ॥
चित्ता हे बैसली अविट आवडी । पालट ती घडी नेघे एकी ॥ २ ॥
करावे ते करी कारणशरीर । अंतरीं त्या धीर जीवनाचा ॥ ३ ॥
तुका म्हणे तरि होईल विलब । परि माझा लाभ खरा जाला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – आवडी-प्रेम, घडी–वेळेस, कारण–कार्य, अतरीं–चित्तात कारणशरीर–अविद्या, अज्ञान

अर्थ – पुष्कळ जन्माचे फेरे घेतल्यानतर एकदा तरी मी माझ्या माहेरी जाईन १ माझ्या चित्तास हीच एक अवीट अशी प्रेमाची गोडी लागली आहे तिच्यात थोड्या वेळेसही काही पालट होत नाही २ हे शरीर काय कार्य करायचे असेल ते करील पण माझ्या चित्तामध्ये मात्र प्रभूस या जीवनात भेटण्याचा धीर आहे किंवा अविद्येने अथवा अज्ञानाने काय झाले ते झाले तरी मला अतरगात जीवनाचा धीर वाटत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात थोडा या बाबतीत विलब होईल हे खरे पण माझा लाभ मात्र खराखुरा होईल ४

४२०४ साग त्वा कोणासी तारिलें । सतावेगळें उद्धरिले ॥ १ ॥
सत शब्द उपदेशी । मग तू हो म्हणशी ॥ २ ॥
तुका म्हणे नाहीं तुझा उपकार । करू सताचा उच्चार ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – सतावेगळें–सताच्या शिवाय

अर्थ – देवा, तू स्वत होऊन कुणास तारलेस ते एकदा साग ना ! या सताच्या शब्दाखेरीज तू कुणाचाही उद्धार केला नाहीस १ सत शब्दानी उपदेश देतात आणि मग तू कृपेविषयी हो म्हणतोस २ तुकाराम महाराज म्हणतात या बाबतीत तुझा काही उपकार म्हणता येणार नाही यासाठी सतांचाच उच्चार करावा लागेल ३

१ वास २ पाउल तीं

४२०५ उमा रमा एकी[1] सरी । वाराणसी ते पंढरी ॥ १ ॥
दोघे सारिखे सारिखे । विश्वनाथ विठ्ठल सखे ॥ २ ॥
तेथें असे भागीरथी । येथें जाणा भीमरथी ॥ ३ ॥
वाराणशी त्रिशुलावरि । सुदर्शनावरि पंढरी ॥ ४ ॥
मनकर्णिका मनोहर । चंद्रभागा सरोवर ॥ ५ ॥
वाराणशी भैरवकाळ । पुंडलीक क्षेत्रपाळ ॥ ६ ॥
धुंडिराज दंडपाणी । उभा गरुड कर जोडुनी ॥ ७ ॥
गया तेचि गोपाळपुर । प्रयाग निरानरसिंपुर ॥ ८ ॥
तेथें असती गयावळ । येथें गाई आणि गोपाळ ॥ ९ ॥
शमीपत्रपिंड देती । येथें काला निजसुखप्राप्ति ॥ १० ॥
संतसज्जनीं केला काला । तुका प्रसाद लाधला ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा :– सरी–बरोबरी, भीमरथी-भीमानदी, धुंडिराज–गणपती, दंडपाणी-हातात दंड असलेला शिव, गयावळ-गयाक्षेत्रातील उपाध्याय

अर्थ :– महादेवाची पत्नी उमा आणि विष्णूंची पत्नी रमा यांची बरोबरी सारखीच आहे वाराणशी आणि पंढरी यांच्यात भेद नाही. १ विश्वनाथ व विठ्ठल हे दोघे एकसारखे असून एकमेकाचे सखे आहेत २ तेथे महादेवाच्या स्थानी भागीरथी आहे तर येथे विठ्ठलाजवळ भीमानदी आहे असे जाणा ३ वाराणशीच्या देवाने त्रिशूल धारण केले आहे तर पंढरीचा देव सुदर्शन चक्र धारण करीत असतो ४ काशीस मनोहर अशी मनकर्णिका आहे, तर येथे पंढरपुरास चंद्रभागा नदीचे सरोवर आहे. ५ वाराणशीस काळभैरव असतात तर येथे पंढरपुरास पुंडलीक महामुनी हा क्षेत्रपाळ आहे ६ तेथे दंडधारी धुंडीराज आहे तर येथे हात जोडून गरुड उभा असतो ७ गया व गोपाळपुर यांत भेद नाही. प्रयागास गंगायमुनेचा संगम तर नरसिंगपुरास भीमानीरा नद्याचा संगम आहे ८ गयेस तेथील उपाध्याय असतील तर येथे पंढरपुरास गाई व गोपाळ दृष्टीस पडतात ९ तेथे शमीपत्र व पिंड देतील तर येथे निजसुखाच्या प्राप्तीसाठी काल्याचा प्रसाद मिळेल १० तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे संतसज्जनांनी जो काला केला त्याचा प्रसाद मला मिळाला आहे.

विवरण :– या एका तत्त्वदर्शी अभंगात तुकाराम महाराजांनी शिव व विष्णू, उमा व रमा, वाराणशी व पंढरपूर यांचे ऐक्य फार सुंदरपणे व्यक्त केले आहे पंढरपुरच्या विठ्ठलाचे उपासक हे श्रीविष्णूचे, कृष्णाचे अनुयायी परंतु भागवतधर्मीयांची ऐक्याची भावना एवढी विशाल की, त्यांनी आपल्या परंपरेत शिवालाही सामावून घेतले आहे वारकरी पंथीयांना एकादशीप्रमाणेच सोमवारचा उपासही महत्त्वाचा वाटतो समन्वय साधण्यासाठी आपणाकडे पुराणातूनही शिव विष्णू अथवा हर-हरी यांचे ऐक्य मानले आहे एक दुसऱ्याची उपासना करतो अशी कल्पना आहे. समुद्रमंथनाच्या वेळी निघालेल्या हलाहल विषाच्या प्राशनामुळे झालेला कंठदाह रामनाम घेतल्यामुळे कमी झाला व शिवास शीतलाई वाटली अशी कथा आहे वैकुंठचतुर्दशीला शिव विष्णुपूजा करितात व महाशिवरात्रीला मध्यरात्री शिवाची पूजा विष्णु करतात अशी प्रसिद्धी आहे म्हणून या दोन देवात भेद नाही असा भेद मानणे हे पाप असल्याचे ' शिवलीलामृत 'काराने म्हटले आहे ' शिव थोर विष्णु लहान । हरि विशेष हर गौण । ऐसे म्हणति जे त्यांलागून । आणून नरकीं घालावे ' असे वचन आहे. ' य शिव स च वै विष्णुर्यो विष्णुः स च वै शिव ' असेही एक वचन एकात्मतेचे आहे. ' शिवस्य हृदय विष्णुर्विष्णोश्च हृदय शिव. ' याही वचनाचा असाच अभेदत्वाचा अर्थ आहे. तुकारामबुवानी आपल्या इतर काही अभंगातूनही या प्रकारच्या हरिहराच्या ऐक्याचा उल्लेख केलेला आहे ' हरिहरां भेद । नाहीं करूं नये वाद । एक एकाचे हृदयीं । गोडी साखरेचे ठायीं ' आणखी एका अभंगात तर त्यांनी शिव-विष्णू

१ एके

यांची अभिन्नता वर्णन करताना म्हटले आहे, ' दोघे सारिखे सारिखे । शिव आणि विष्णू सखे ॥ एक बैसे नंदीवरी। एक बैसे गरुडावरी ॥ एक ओढी व्याघ्रांबर । एका कासे पीतांबर ॥ एका गळां रुंडमाळा । एका वैजयंतीमाळा ॥ तुका म्हणे ऐक । भेद नाहीं दोघे एक ' बुवाच्यामते हर व हरी याच्यात फक्त एका वेलांटीचाच फरक आहे.

४२०६ फटचाचे बडबडे चवी ना सवाद । आपुलाचि वाद आपणासी ॥ १ ॥
कोणें या शब्दाचे मरावें घसणी[1] । अंतरें शाहाणी राहिजे हो ॥ २ ॥
गाढवाचा भुंक[2] आइकतां कानीं । काय कोडवाणी ऐसियेचें ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्यासी करावें वचन । त्याचे येती गुण अंगास ते ॥ ४॥

शब्दार्थ व टीपा :– फटचाचे–फटकळ माणसाच्या, सवाद–स्वाद, घसणीं–दाटीत, सवयीने, कोड–कौतुक, वचन–भाषण.

अर्थ :– फटकळ माणसाच्या बडबडण्यात कसलीच चव नसते, की त्याचा आस्वाद कधी घेता येत नाही. म्हणून आपला वाद आपणाशीच करावा. १ इतरांच्या शब्दाच्या दाटीवाटीत कुणी फुकट मरावे ? म्हणून अतरंगात शहाणपण धरून असावे २ गाढवाचे ओरडणे कानांनी जरी ऐकले तरी त्याचे काय कौतुक वाटते ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्याशी आपण भाषण करावे त्याचेच गुण आपल्या अंगात येतात ४

४२०७ दिवसा व्यापारचावटी । रात्री कुटुंबचिंता मोटी ॥ १ ॥
काय करूं या मनासी । नाठवे कां हृषीकेशी ॥ २ ॥
वेश्येपाशीं रात्रीं जागे । हरिकीर्त्तनीं निद्रा लागे ॥ ३ ॥
तुका म्हणे काय जालासी । वृथा संसारा आलासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नाठवे–आवडत नाही.

अर्थ :– हा मनुष्य पाहा कसा आहे तो दिवसभर व्यापाराच्या, व्यवहाराच्या गोष्टी करतो आणि रात्रभर याला कुटुंबाची मोठीच चिंता वाटते. १ आता याच्या मनास काय करावे ? हृषिकेशीला हा का आठवत नाही ? २ वेश्येजवळ हा रात्रभर जागतो, पण हरिकीर्तनात मात्र यास झोप लागते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू कशासाठी मनुष्यजन्मास आलास ? उगाच या संसारात का आलास ? ४

४२०८ अहो कृपावंता । होईं बुद्धीचा ये दाता ॥ १ ॥
जेणें पाविजे उद्धार । होय तुझे पायीं थार ॥ २ ॥
ववदी हे वाचा । भाव पांडुरंगीं साचा ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । माझें अंतर वसवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – थार–आश्रय, साचा–खरा, अंतर–चित्त

अर्थ :– अहो कृपावत देवा, तुम्ही सद्बुद्धीचे दान देणारे व्हा. १ यामुळे माझा उद्धार होईल आणि मला तुमच्या पायांचा आश्रय मिळेल २ या पांडुरगाच्या ठिकाणी खरा भाव आहे असे माझ्या वाणीकडून तू वदव ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझ्या चित्तात तुमची वस्ती असू द्या ना. ४

४२०९ निंदक तो परउपकारी । काय वर्णूं त्याची थोरी ।
जो रजकाहूनि भला परि । सर्व गुणें आगळा ॥ १ ॥

१ घाणी, २ भुंक.

नेघे मोल धुतो फुका । पाप वरच्यावरि देखा
करीतसे साधका । शुद्ध सरते तिहीं लोकीं ॥ २ ॥
मुखसंवदणी सांगाते । अवघें सांटविलें तेथें ।
जिव्हा साबण निरुतें । दोष काढी जन्माचे ॥ ३ ॥
तया ठाव यमपुरीं । वास करणें अघोरीं ।
त्यासी दंडण करी । तुका म्हणे न्हाणी ते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रजकाहूनि–परिटाहून, आगळा– श्रेष्ठ, नेघे–घेत नाही, सरते–मान्य, संवदणी–परिटाचे कपडे धुण्याचे पात्र, निरुतें–चागले.

अर्थ :– निंदक हा मोठा उपकार करणारा असतो. त्याची थोरवी काय वर्णन करावी ? तो कपडे धुणाऱ्या परिटापेक्षा सर्व गुणांत फार वेगळा असतो. १ काहीही मोल न घेता हा दुसऱ्याच्या चित्तातील पाप वरचेवर धुऊन काढतो. साधकांना शुद्ध करुन तीनही लोकांना मान्य करतो. २ याचे मुखरूपी कपडे धुण्याचे पात्र नेहमी बरोबर असून त्यात इतरांचे पातकी वर्तन साठविलेले असते. जिव्हारूपी चांगल्या साबणाने तो नेहमी त्यांचे अनेक जन्मांचे दोष काढून टाकतो. ३. तुकाराम महाराज म्हणतात, अशा या निंदकाचे स्थान यमलोकीच असते. तेथील अघोर अशा नरकात याला यमाचे दूत ताडण करीत असतात. ४

४२१० विद्या अल्प परी गर्वशिरोमणि । मजहूनी ज्ञानी कोण आहे ॥ १ ॥
अंगीं भरला ताठा कोणातें मानिना । साधूची छळणा स्वयें करी ॥ २ ॥
साधूचे देहाचा मानी जो विटाळ । त्रिलोकीं चांडाळ तोचि एक ॥ ३ ॥
संतांची जो निंदा करी मुखें जपे । खतेला सकळ पापें तोचि एक ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसे मावेचे मइंद । त्यापाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– खतेला–खचलेला, भरलेला, मावेचे–मायेचे, मइंद–मैंद, घातकी, कपटी मनुष्य.

अर्थ :– एखाद्याच्या अंगी थोडीच विद्या असली तरी तो गर्वशिरोमणी होतो आणि माझ्यापेक्षा दुसरा कोण श्रेष्ठ ज्ञानी आहे ? असे विचारतो. १ त्याच्या अंगी अभिमान भरलेला असल्याने तो कुणाचेच मानीत नाही. साधुसंतांचा छळ तो स्वत: करीत राहतो. २ साधूच्या देहाचा जो विटाळ मानतो तोच एक तीनही लोकांत चांडाळ असतो. ३ संतांची निंदा जो स्वमुखाने सतत करतो त्याचा देह पातकांनी भरलेला असतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे मायेचे कपटी आहेत. त्यांच्यापाशी गोविंद मुळीच नसतो. ५

४२११ प्रपंचाची पीडा सोसिती[1] अघोरी । जया क्षणभरी नाम नये ॥ १ ॥
नाम नाठविती आत्मया रामाचें । धिग जिणें त्याचें भवा मूळ ॥ २ ॥
मूळ तें पापाचें आचरण तयाचें । नाहीं राघवाचें स्मरण त्या ॥ ३ ॥
स्मरण भजन नावडे जयासी । आंदणीया दासी यमदूतां ॥ ४ ॥
चिंतन रामाचें न करी तो दोषी । एकांत तयासीं बोलों नये ॥ ५ ॥
नये त्याचा संग धरूं म्हणे तुका । धरितां पातका वांटेकरी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– नाठविती–आठवत नाही.

१ सोसी तो.

अर्थ – जो मनुष्य क्षणभरसुद्धा देवाचे नाव घेत नाही त्याला प्रपंचात भयानक अशी पीडा होत असते १ अंतरंगातील रामाचे नामही जे आठवत नाहीत त्याचे जिणे व्यर्थ होय त्याचा धिक्कार करावा त्याचे जगणे संसाराचे केवळ मूळच होय २ याचे आचरण म्हणजे पापाचे मूळच असून त्याला राघवाचे स्मरण नसते ४ ज्याला श्रीहरीचे स्मरण, भजन आवडत नाही तो यमदूताना दासदासी म्हणून आंदणच जातो जो रामनामाचे चिंतन करीत नाही तो मोठाच दोषी असतो त्याच्याशी एकान्तात मुळीच बोलू नये ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्याची संगत मुळीसुद्धा धरू नये धरल्यास पातकाचे वाटेकरी व्हावे लागेल ५

४२१२ अर्थेविण[1] पाठांतर कासया करावे । व्यर्थचि मरावे घोकूनिया ॥ १ ॥
घोकूनिया काय वेगीं अर्थ पाहे । अर्थरूप राहे होऊनिया ॥ २ ॥
तुका म्हणे ज्याला अर्थी आहे भेटी । नाहीं तरी गोष्टी बोलो नका ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – वेगीं–त्वरेने

अर्थ – अर्थ समजल्याशिवाय उगाच पाठांतर कशासाठी करावे ? व्यर्थ घोकून कशासाठी मरावे ? १ नुसते घोकून काय होणार ? त्वरेने त्याचा अर्थ पहा ना अर्थरूपच होऊन राहावे २ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याला अर्थ समजला आहे त्यानेच बोलावे इतरांनी काही बोलूच नये ३

४२१३ बसता चोरापाशीं तैसी होय बुद्धि । देखताचि चिंधी मन धावे ॥ १ ॥
व्यभिचाऱ्यापाशीं बैसता क्षणभरी । देखताचि नारी मन धावे ॥ २ ॥
प्रपंचाचा छंद टाकुनिया गोवा । धरावे केशवा हृदयांत ॥ ३ ॥
सांडुनिया देईं संसाराची बेडी । कीर्तनाची गोडी धरावी गा ॥ ४ ॥
तुका म्हणे तुला सांगतो मी एक । रुक्मिणीनायक मुखीं गावा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – गोवा–गुंता, गुंतवणूक

अर्थ – चोराच्या जवळ बसले की आपणासही तशीच बुद्धी होते एखादी फाटकी चिंधी जरी बघितली तरी ती घेण्यासाठी मन धावते १ व्यभिचारी माणसापाशी क्षणभर बसले की तशीच वासना होऊन स्त्री बघताच त्याचे मन चंचल होते २ म्हणून प्रपंचाचा गुंता व छंद सोडून द्यावा व हृदयात केशवाला धारण करावे ३ संसाराची ही बेडी सोडून द्यावी आणि मनात कीर्तनाची गोडी धरावी ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुला एक सांगतो असे की, रुक्मिणीचा जो पती श्रीविठ्ठल त्याचेच गुणगान करावे ५

४२१४ मस्तकीं सहावे टांकियासी जाण । तेव्हा देवपण भोगावे गा ॥ १ ॥
आपुलिये स्तुती निंदा अथवा मान । टाकावा थुकोन पैलीकडे ॥ २ ॥
सद्गुरुसेवन तेंचि अमृतपान । करुनी प्राशन बैसावे[2] गा ॥ ३ ॥
आपुल्या मस्तकीं पडोत डोंगर । सुखाचे माहेर टाकू नये ॥ ४ ॥
तुका म्हणे आता सांगू तुला किती । जिण्याची फजिती करू नये ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – जिण्याची–जगण्याची

अर्थ – मस्तकावर टाकीचे घाव सहन करावेत तेव्हाच देवपणाचा भोग प्राप्त होतो १ कुणी आपली स्तुती अथवा निंदा केली, कुणी मान अपमान केला तरी त्याला थुकून पलीकडे टाकून द्यावे २ सद्गुरूची सेवा हेच एक अमृतपान समजून त्याचे प्राशन करून स्वस्थ चित्ताने बसावे ३ आपल्या मस्तकी दुःखाचे डोंगर जरी कोसळले तरी सुखाचे माहेर असलेले हे स्थान सोडू नये ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुला आता सांगू तरी किती ? जगण्याची फजिती करून घेऊ नये ५

१ अर्थाविण, २ कराव

४२१५ स्वामिसेवा गोड । माते बाळकाचें कोड ॥ १ ॥
जेंजें मागावें भातुकें । तेंतें पुरवो कौतुकें ॥ २ ॥
खेळविलें कोडें । हर्षें बोले कीं बोबडें ॥ ३ ॥
तुका म्हणे लाड । तेथें पुरे माझें कोड ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोड–कौतुक, भातुकें–प्रेमाचा खाऊ, कोडें–कौतुकाने.

अर्थ :–आईला ज्याप्रमाणे बालकाचे कौतुक असते त्याप्रमाणे स्वामीला आमची सेवा गोड वाटते. १ ज्याप्रमाणे प्रेमाचा खाऊ मागावा त्याप्रमाणे तो कौतुकाने पुरविला जातो २ मूल हर्षाने बोलो की बोबडे बोलो, आई कौतुकाने त्याला खेळविते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे माझे लाड कौतुकाने पुरविले जातात. ४

४२१६ तुझें नाम पंढरिनाथा । भावेंविण नये हाता ॥ १ ॥
दाहां नयें विसां नये । पंनासां साटां नये ॥ २ ॥
शां नयें सहस्रा नये । लक्षकोडीलागीं नये ॥ ३ ॥
तुका म्हणे पंढरिनाथा । भावेंविण नये हाता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– शां–शंभर.

अर्थ :– देवा, पंढरीनाथा, एक भाव नसेल तर तुझे नाम कोणाच्याही हाती येणार नाही. १ दहाजण असोत की वीसजण असोत, पन्नास असोत की साठ असोत. २ शंभर वा सहस्रजणांनी तो मिळणार नाही. लक्ष कोटी जणांनाही तो प्राप्त होणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पंढरीनाथा, एका भावभक्तिशिवाय तू माझ्या हातांशी येणार नाहीस. ४

४२१७ संतांपायीं विन्मुख जाला । तो जरि संगति मागों आला ॥ १ ॥
तरि त्याहुनि दुरी जावें । सुखें एकांतीं बैसावें ॥ २ ॥
आत्मचर्चा नाहीं जेथें । अगी लावुनि द्यावी तेथें ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं । चित्ता समाधान कांहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विन्मुख–परत, मागे.

अर्थ :– जो संतांच्यापासून परत मागे आला आणि परत आपल्याबरोबर येऊन संगत मागू लागला. १ तरी आपण त्याच्यापासून दूर जावे. सुखाने एकान्तात बसावे. २ जेथे आत्मचर्चा चाललेली नसते तेथे आग लावून द्यावी. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याशिवाय मनास समाधान मिळणार नाही. ४

४२१८ हिरा ठेवितां काळें गाहाण । मोल न तुटे दुकाळीं जाण ॥ १ ॥
तैसे संतजन पाहीं । विनटले श्रीहरिपायीं ॥ २ ॥
तुका म्हणे तैसे भक्त । तयांसी जन हे निंदित ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– न तुटे–कमी होत नाही, विनटले–शोभले.

अर्थ :– काही काळ हिरा जरी गहाण ठेवला तरी दुष्काळात त्याचे मोल काही कमी होत नाही. १ त्याप्रमाणे हे संतजन श्रीहरीच्या पायी शोभून दिसतात. २ तुकाराम महाराज म्हणतात, त्याप्रमाणे हे भक्त असतात, पण लोक त्यांची निंदा करतात. ३

४२१९ परिसे गे सुनेबाई । नको वेचूं दूध दहीं ॥ १ ॥
आवा चालिली पंढरपुरा । वेसीपासुनि आली घरा ॥ २ ॥
ऐकें गोष्टी सावर बाळे । करीं जतन फुटके पाळें ॥ ३ ॥
माझे हातींचा कलवडू । मजवाचुनि नको फोडू ॥ ४ ॥
वळवटक्षिरीचे[1] लिपन । नको फोडूं मजवाचून ॥ ५ ॥
उखळ मुसळ जातें । माझें मन गुतले तेथें ॥ ६ ॥
भिक्षुक आल्या घरा । सांग गेली पंढरपुरा ॥ ७ ॥
भक्षीं परिमित आहार । नको फारसी वरो सारू ॥ ८ ॥
सून म्हणे बहुत निके । तुम्ही यात्रेसि जावें सुखें ॥ ९ ॥
सासूबाई स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा ॥ १० ॥
सुनमुखीचे वचन कानीं । ऐकोनि सासू विवंची मनीं ॥ ११ ॥
सवतीचे पाळे खोटे । म्या जावेसे इला वाटे ॥ १२ ॥
आता कासया यात्रे जाऊं । काय जाउनि तेथें पाहूं ॥ १३ ॥
मुले लेकरे घर दार । माझें येथेंचि पंढरपूर ॥ १४ ॥
तुका म्हणे ऐसें जन । गोवियेले मायेंकरून ॥ १५ ॥

शब्दार्थ व टीप – परिसे–ऐक, वेचू–खर्च करू, आवा -पोक्त बाई, कलवडू–मडक्याचे लिंपण, परिमित–मोजका, वरो -पुष्कळ अन्नसामुग्री निके- चागले, विवंची–विचार करू लागली

अर्थ – सूनबाई, नीट ऐक हो दही दूध फार खर्च करू नकोस १ अशी ताकीद देणारी एक प्रौढ बाई पंढरपुरास निघाली आहे पण ती वेशीपासूनच परत आली २ आणि म्हणू लागली, 'बाळे नीट लक्ष देऊन गोष्ट ऐक बरे माझे फुटके पाळे नीट जपून ठेव हो ३ माझ्या हातानी मडक्याना लिंपण दिले आहे ते माझ्याशिवाय फोडू नकोस ४ खिरीच्या वळवटाचे लिंपण तू माझ्याखेरीज फोडू नकोस बरे ५ हे माझे उखळ, हे मुसळ यांतच मन गुतून गेले आहे ६ कुणी भिक्षुक आला तर त्याला काही देऊ नकोस मी पंढरपुरला गेले आहे असे त्याला सांग ७ आणि तूही जेवण अगदीच मोजके घे उगाच अन्नसामग्री वाया घालवू नकोस' ८ यावर सूनबाई म्हणाली, 'सासूबाई, फार चागले सांगितले तुम्ही आता सुखाने यात्रेला जावे ९ सासुबाई, मागील प्रपंचाची सर्व आशा सोडून स्वहिताची जोड करा ना' १० सूनबाईच्या मुखातील हे वचन ऐकून सासूने मनात विचार केला की, ११ या सवतीचे चाळे खोटे दिसतात मी इथून जावे असे हिला वाटते १२ आता मी कशासाठी यात्रेस जाऊ? तिथे जाऊन पाहू तरी काय? १३ येथे माझी मुले लेकरे आहेत येथेच माझे घरदार असल्याने माझे पंढरपूरही इथेच आहे १४ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे लोक प्रपंचाच्या मायेत गुरफटून गेले आहेत १५

विवरण – भरपूर ससारसुख भोगले आणि मनाजोगता प्रपच झाला तरी माणसाचे चित्त प्रापंचिक गोष्टीत कसे गुरफटले जाते याचे उत्तम दर्शन तुकोबानी या एका विनोदी शब्दचित्रात घडविले आहे ससारग्रस्त एक प्रौढ बाई पंढरपुरला जायला निघाली असताना ती वेशीवरून परत येते आणि आपल्या सूनबाईस घराची काळजी घ्यायला सागते आणि ही काळजी कोणती? तर फुटके पाळे कलवडू, वळवटाचे लिंपण, उखळ, मुसळ-जाते इत्यादी क्षुल्लक वस्तूत तिचे मन गुतले आहे आपण पंढरपुरास गेल्यावर सुनेने मोजका आहार घ्यावा, भिक्षुकालाही काही वाढू नये, अशा प्रकारच्या सूचना ती देत आहे आपल्या सासूबाईंचे प्रपंचातील हे लक्ष पाहून सुनेनेही सासूची सर्व काळजी सोडण्याविषयी सुचविले 'सासूबाई, स्वहित जोडा । सर्व मागील आशा सोडा' अशा शब्दात सून

१ वळवट क्षाराचे

आपणांस शिकविते हे पाहून सासू बिथरून गेली ती इतकी की, तिला आपली सून सवतीप्रमाणे वाटली ' सवतीचे वाळे खोटे । म्या जावेसे इला वाटे ' असा तिचा ग्रह झाला, आणि तिचे पंढरपुरास जाणे थांबले जिथे आपली मुले-बाळे तिथेच आपले पंढरपूर असा तत्त्वविचार स्वत स अनुकूल होणारा तिने सांगून टाकला असे प्रपंचाच्या मायेत गुरफटणाऱ्या व सर्व काही संसार व प्रपंचच मानणा या बाईचे एक निमित्त करून तुकोबांनी समाजास चांगलाच इशारा दिला आहे पैसा, प्रतिष्ठा, सत्ता, इंद्रियविषय, लौकिक यशापयश इत्यादींच्या नादात माणसांना देव धर्म, अतिथी, सतजन यांची आठवणही होत नाही हे बुवांनी हेरले, आणि ही विस्मृती एकदा झाली की मग अनाचार, बेतालपणा आणि अरेरावी यांना प्रारंभ होतो आत्मसाक्षात्कार झाल्यानंतर बुवांनी कधी प्रत्यक्षपणे उपदेश करून, कधी उपरोधाने, कधी थट्टेने, कधी कठोर शब्दांनी, तर कधी वरीलप्रमाण विनोदी शब्दचित्रे रंगवून समाजास सावध केले आहे अशा प्रकारेच आपल्या प्रपंचात फाजीलपणे समरस झालेल्या पतीपत्नीचीही गमतीदार पण विचारप्रवर्तक शब्दचित्रे बुवांनी पुढील अभंग ४२४४ व ४२४५ मध्ये काढली आहेत

४२२० एक ते गाढव मनुष्याचे वेष । हालविली पुस पुढें दाढी ॥ १ ॥
निंदा हें भोजन जेवण तयासी । जोडी घरीं रासी पातकाच्या ॥ २ ॥
तुका म्हणे सुखें बैसोनियां खाती । कुंभपाकीं होती नर्कवासी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – पुस–शेपूट

अर्थ – पुढीलप्रमाणे वर्तन करणारा मनुष्य माणसाचा वेष करणारा असला तरी गाढवच असतो त्याची दाढी पुढून हालत असतेच १ दुसऱ्याची निंदा केली की त्याला भोजन केल्याचा आनंद होतो आणि यामुळे तो पातकाच्या राशी मिळवितो २ तुकाराम महाराज म्हणतात, अशी माणसे सुखाने बसून खातात व शेवटी कुंभपाक नावाच्या नरकाचे धनी होतात ३

४२२१ मागत्याची टाळाटाळी । जिव्हा बोढूनि कपाळीं ॥ १ ॥
ऐसा तव मोळा । तुमचा नसेल गोपाळा ॥ २ ॥
नसेल ना नवे । ऐसे धरियेले देवे ॥ ३ ॥
तुका म्हणे जाला[1] । उशीर नाहीं तो विठ्ठला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मोळा–रीत

अर्थ – जो पुन पुन मागतो त्याला टाळाटाळ करायची व ज्याला नको त्याला जिव्हा ओढून त्याच्या कपाळी मारायचे १ गोपाळा, अशी ही रीत तुमची नसेल २ देवाने हे असे काही नव्याने धारण केले नसेल ३ तुकाराम महाराज म्हणतात विठ्ठला, मजवर कृपा करण्यासाठी अजून काही फारसा उशीर झालेला नाही ४

४२२२ संसार करिती[2] मोठ्या महत्वानें । दिसे लोकां उणे न कळे त्यां ॥ १ ॥
पवित्रपण आपुले घरच्यासीच दिसे । बाहेर उदास निंदिताती ॥ २ ॥
आपणा कळेना आपले अवगुण । पुढिलाचे दोषगुण वाखाणिती ॥ ३ ॥
विषयाचे ध्यासे जग बाधियेले । म्हणोनी लागले जन्ममृत्यु ॥ ४ ॥
तुका म्हणे माझें संचितचि[3] असे । देवाजीचे पिसे सहजगुण ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पुढिलाचे–दुसऱ्याचे, पिसे–वेड

१ आला, २ करितो, ३ कपाळीचे ऐसे

अर्थ – लोक संसार मोठ्या महत्त्वाने करतात परंतु त्यांचा संसार लोकांना उणा दिसतो हे काही त्यांना समजत नाही. १ आपल्या घरचे आपणास सर्वच पवित्र दिसते पण बाहेरच्या लोकांना मात्र ते उदासवाणे दिसते २ आपला अवगुण आपणास समजत नाही परंतु दुसऱ्याचे गुणदोष मात्र ते वर्णन करतात ३ अशा नाना विषयांच्या ध्यासामुळे जग बांधले गेले असल्यामुळे त्यांच्यामागे जन्ममृत्यूचा फेरा लागला आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझे संचितच असे आहे की, मला सहजपणे या देवाचे वेड लागले आहे ५

४२२३ गव्हाराचे ज्ञान अवघा रजोगुण । सुखवासी होऊन विषय भोगी ॥ १ ॥
त्यासी जरी ज्ञानउपदेश केला । संगेंविण त्याला राहावेना ॥ २ ॥
तुका म्हणे संग उत्तम असावा । याविण उपावा काय सांगो ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – गव्हाराचे–अडाणी, गावढळ उपावा–उपाय

अर्थ – रजोगुण वाढविणारे ज्ञान अडाणी गावढळ माणसाचे असते तो सुखवासी होऊन विषयांचा भोग घेणारा असतो १ त्याला जरी ज्ञानाचा उपदेश केला तरी जुन्या रजोगुणाच्या संगाविना त्याला राहावत नाही २ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी संग उत्तम असावा याशिवाय दुसरा उपाय कोणता असणार ? ३

४२२४ भाग्यालागीं लांचावले । देवधर्म ते राहिले ॥ १ ॥
कथे जातां अळसे मन । प्रपंचाचे मोटें ज्ञान ॥ २ ॥
अखंडप्रीति जाया । नेणे भजनाच्या ठाया ॥ ३ ॥
कथाकीर्तन घनाचे । सर्वकाळ विषयी नाचे ॥ ४ ॥
तुका म्हणे पंढरिराया । ऐसे जन्मविले वाया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – जाया–बायको

अर्थ – हे लोक पाहा लौकिक भाग्यासाठी लालचावले आहेत या नादात त्यांचे देवधर्मही राहून जातात. १ देवाची कथा करताना मात्र यांचे मन आळसावते त्यांना प्रपंचाचे तेवढे ज्ञान मोठे असते ? २ प्रपंचावर अथवा बायकोवर अखंडपणे प्रेम करणाऱ्यांना भजनाचा मात्र ठावठिकाणा नसतो ३ कथाकीर्तन सुरू झाले तरी त्यात त्यांना सतत विषयांचेच चिंतन घडते ४ तुकाराम महाराज म्हणतात पंढरीराया, असे हे लोक जन्मास येऊन वायाच गेलेले असतात ५

४२२५ पतिव्रतेची कीर्ती वाखाणिता । सिंदळीच्या माथा तिडिक उठे ॥ १ ॥
आमुचे ते आहे सहज बोलणे । नाहीं विचारून केले कोणीं ॥ २ ॥
अंगीं उणे त्याच्या वंसे टाळक्यांत । तेणे ठिणग्या बहुत गाळीतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही काय करणे त्यासी । ढका खवदासी लागतसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – विचारून–विचार करून, ढका–धक्का, खवदासी–जखम, व्रत

अर्थ – पतिव्रता स्त्रीच्या कीर्तीची वाखाणणी सुरू झाली की शिंदळ स्त्रीच्या डोक्यात तिडीक उठू लागते १ आमचे आपले हे सहज बोलणे आहे कुणी काही विचार करून हे केले नाही २ जे ज्याच्या अंगात उणे असते तेच त्याच्या डोक्यात पक्के झालेले असते त्यामुळे तेच पुन पुन प्रकट होत राहाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसास आम्ही तरी काय करणार ? याचा धक्का जखमेस लागणारच ४

४२२६ आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाहीं ऐसा मनीं अनुभवावा ॥ १ ॥
आवडी आवडी कळिवराकळिवरी । वरिली अंतरी ताळी पडे ॥ २ ॥
अपूर्व दर्शन मातेपुत्रा भेटी । रडूं मागें तुटी हर्षयोगें ॥ ३ ॥
तुका म्हणे एकें कळतें दुसरें । बरियाचें बरें आहाचाचें आहाच ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कळिवराकळिवरी-शरीरासंबंधीची, आहाच–व्यर्थच.

अर्थ :– या जगतात देव आहे असे वाणीने वदण्याचा अनुभव माझ्याजवळ नाही. १ आम्हांस शरीरा-संबंधीच वरवर आवड असते. बाह्य शरीराचा व अंतरंगाचा काही ताळा जमत राहातो २ आईच्या व मुलाच्या भेटीचा प्रसंग मोठा अपूर्व दिसतो. त्यात तुटी पडली तर नंतर रडू येते किंवा पुत्राची भेट झाली असताना मातेस अपूर्व आनंद होतो पण त्याच्या वियोगाने तिला हर्षाऐवजी रडूही येते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे एकामुळे दुसरे कळते. बऱ्याने बरे उगाच वाटते. ४

४२२७ हेचि माझे चित्तीं । राहो भावप्रीति ।
विठ्ठल सुषुप्ती । जागृति स्वप्नासी ॥ १ ॥
आणिक नाहीं तुज मागणें । राज्यचाड संपत्ति धन ।
जिव्हे सुख तेणें । घेतां देहीं नाम तुझें ॥ २ ॥
तुझें रूप सर्वांठायीं । देखें ऐसें प्रेम देई ।
न[1] ठेवावा ठायीं । अनुभव चित्ताचा ॥ ३ ॥
जन्ममरणाचा बाध । समूळनि तुटे कंद ।
लागो हाचि छंद । हरि गोविंद वाचेसी ॥ ४ ॥
काय पालटे दरुषणें । अवघें कोंदाटे चैतन्य ।
जीवशिवा खंडण । होय तरे[2] चिंतितां ॥ ५ ॥
तुका म्हणे याचि भावें । आम्हीं धालों तुझ्या नावें ।
सुखें होत जन्में । भलते याती भलतेंसीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– चाड–इच्छा, काय–काया, शरीर, धालों–संतुष्ट झालो.

अर्थ :– विठ्ठला, अर्धवट झोपलेल्या अवस्थेत, जागृतीच्या अवस्थेत, स्वप्नाच्या अवस्थेत माझ्या मनात तुमच्याविषयीचे भावप्रेम राहावे. १ मला आणखी दुसरे काही मागणे नको. राज्य, धनसंपत्ती यांची इच्छा नाही. या देहाने तुझे नाम घेतले तर जिभेस सुख वाटेल २ देवा, तुझे रूप मी सर्वत्र पाहीन असा प्रकारचे प्रेम मला तू द्यावेस. माझ्या चित्ताच्या ठिकाणी हाच अनुभव यावा. ३ जन्ममरणाची बाधा न राहून याविषयीचा कंद समूळ तुटावा. श्रीहरी, गोविंद, हाच माझ्या वाणीस एकसारखा छंद लागावा. ४ देवा, तुझ्या दर्शनाने सबंध शरीर पालटून जाते. सर्वत्र चैतन्य कोंदाटून जाते. तुझे चिंतन केल्यावर जीवशिव या भेदाचे खंडण होऊन तरून जाता येते. ५ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझ्या नामाविषयी आम्ही हाच भाव धरला म्हणून संतुष्ट झालो. मग आम्ही कुठल्याही जातीत जन्मलो असलो तरी मोठ्या सुखाने धन्य होऊ ६

४२२८ मौन[3] कां धरिलें विश्वाच्या जीवना । उत्तर वचना देईं माझ्या ॥ १ ॥
तूं माझें संचित तूंचि पूर्वपुण्य । तूं माझें प्राचीन पांडुरंगा ॥ २ ॥

१ ठेवावा हा पाठी, २ ते रे, ३ मौन्य.

तूं माझें सत्कर्म तूं माझा स्वधर्म । तूंचि नित्यनेम नारायणा ॥ ३ ॥
कृपावचनाची वाट पाहातसें । करुणा वोरसें बोल कांहीं ॥ ४ ॥
तुका म्हणे प्रेमळाच्या प्रियोत्तमा । बोल सर्वोत्तमा मजसवें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– प्राचीन–प्रारब्ध, वोरसें–पान्हा फुटणे.

अर्थ :– विश्वाचे जीवन असणाऱ्या देवा, तू मौन का धरले आहेस ? माझ्या या प्रश्नाचे तू उत्तर दे ना. १ तूच माझे संचित असून पूर्वपुण्यही माझे तूच आहेस तूच माझे पांडुरंगा, प्रारब्धही आहेस. २ तू माझे सत्कर्म असून माझा स्वधर्मही तूच आहेस नारायणा, तूच माझा नित्यनेम आहेस. ३ देवा, मी तुमच्या कृपेच्या वचनांची वाट पाहात आहे. प्रेमाचा पान्हा फुटून करुणेच्या वचनानी काहीतरी माझ्याशी बोल. ४ तुकाराम महाराज म्हणतात, प्रेमळाच्या प्रियोत्तमा, सर्वोत्तमा, तू माझ्याशी बोल ना. ५

४२२९ काय करूं आतां धरूनियां भीड । निःशंक हें तोंड वाजविलें ॥ १ ॥
नव्हे जगीं कोणी मुकियाचा जाण । सार्थक लाजोनी नव्हे हित ॥ २ ॥
आलें तें उत्तर बोलें स्वामीसवें । धीट नीट जीवें होऊनियां ॥ ३ ॥
तुका म्हणे मना समर्थासीं गांठी । घालावी हे मांडी थापटूनि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– मुकियाचा–मुक्याची

अर्थ :– देवा, मी आता, तुझी भीड धरून करू तरी काय ? म्हणून मी निःशंकपणे माझे तोंड वाजवत आहे. १ मुक्याची बाजू जाणणारा या जगात कुणीही नाही म्हणून लाज धरून राहिल्याने हित व सार्थक होणार नाही. २ नीट धीटपणे जीव धरून मी जसे बोलता येते तसे स्वामीशी बोलतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मना, तुझी गाठ या समर्थ देवाशी असल्याने मांडीवर थाप मारून सज्ज असावे. ४

४२३० माझिया तो जीवें घेतला[1] हा सोस । पाहें तुझी वास भेटावया ॥ १ ॥
मातेविण बाळ न मनी[2] आणिका । सर्वकाळ धोका स्तनपाना ॥ २ ॥
वोसंगा निघाल्या वांचूनि न राहे । त्याचें आर्त माय पुरवीते ॥ ३ ॥
तुका म्हणे माते भक्तां तूं कृपाळ । गिळियेले जाळ वनांतरीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वास–वाट, न मनी–मानीत नाही, वोसंगा–मांडीवर, आर्त–इच्छा.

अर्थ :– देवा, तुझी वाट पाहून भेट घ्यावी असा माझ्या जीवाने ध्यास घेतलेला आहे. १ लहान मूल आपल्या आईशिवाय इतर कुणासही मानीत नाही. सर्वकाळ स्तनपानाचाच ध्यास असतो २ ते तिच्या मांडीवर जाऊन बसल्याखेरीज राहात नाही आणि त्याची इच्छा त्याची आईही पुरविते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, माते, तू आपल्या भक्तांविषयी कृपाळू आहेस. त्यांच्यासाठीच तू वनात लागलेला वणवा गिळून टाकलास. ४

४२३१ ते काय पवाडे नाहीं म्यां ऐकिले । गोपाळ रक्षिले वनांतरीं ॥ १ ॥
मावेचा वोणवा होऊनि राक्षस । लागला वनास चहूंकडे ॥ २ ॥
गगनासी ज्वाळा लागती तुंबळ । गोधनें गोपाळ वेडावलीं ॥ ३ ॥
तुका म्हणे तेथें पळावया वाट । नाहीं वा निपट ऐसें जालें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पवाडे–कीर्ती, मावेचा–मायेचा, निपट–सर्वस्वी, अगदी.

१ घेतलासे सोस, २ मानी.

अर्थ :- देवा, तुम्ही वनामध्ये गोपाळांचे रक्षण केल्याची कीर्ती काय आम्ही ऐकली नाही. १ तो मायेचा राक्षस वणवा होऊन चोहोकडून साऱ्या वनात लागला. २ त्याच्या ज्वाला भयानक होऊन गगनास भिडल्या. त्यामुळे गाई व गोपाळ वेढावून गेले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रसंगी तेथून जाण्यासही अगदी वाट उरली नाही असे झाले. ४

४२३२ धडकला अग्नि आहचा येती वरी । गोपाळ श्रीहरी विनविती ॥ १ ॥
भरे कृष्णा काय विचार करावा । आला रे वोणवा जळों[1] आतां ॥ २ ॥
भरे कृष्णा तुझें नाम बळिवंत । होय कृपावंत राख आतां ॥ ३ ॥
तुका म्हणे अरे कृष्णा नारायणा । गोपाळ करूणा भाकितिले[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- आह्चा-झळा, ज्वाळा.

अर्थ :- वणवा भडकल्यावर अग्नी धडकून त्याच्या ज्वाळा वरवर येऊ लागल्या व श्रीहरीला सर्व गोपाळ विनवू लागले. १ 'अरे कृष्णा, हा वणवा भोवतीहून जाळण्यासाठी येत आहे. आता यावेळी काय विचार करावा ? २ कृष्णा, अरे तुझे नाव बलवान आहे. तू कृपावंत होऊन आता आमचे रक्षण करावेस.' ३ तुकाराम महाराज म्हणतात, 'कृष्णा, नारायणा, तू कृपा कर' अशी करुणा गोपाळांनी भाकिली. ४

४२३३ अरे कृष्णा आम्ही तुझे निज गडी । नवनीत आवडी देत होतों ॥ १ ॥
अरे कृष्णा आतां राखें कैसें तरी । संकटाभीतरीं पडियेलों ॥ २ ॥
वरुषला इंद्र जेव्हां शिळाधारीं । गोवर्धन गिरी उचलिला ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझे पवाडे गोपाळ । वर्णिती सकळ नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- नवनीत-लोणी, शिळाधारीं-दगडाच्या, पावसाच्या वर्षावाने, गिरी-पर्वत, पवाडे-कीर्ती.

अर्थ:- अरे कृष्णा, आम्ही तर तुझेच प्रिय सवंगडी आहोत गोकुळात तुला आम्ही लोणी देत होतो. १ अरे कृष्णा, या संकटामध्ये आम्ही सापडलो आहोत. कसेही करून तू आता आमचे रक्षण कर. २ जेव्हा इंद्र रागावून मुसळधार पावसाचा वर्षाव करू लागला तेव्हा तूच गोवर्धन पर्वत वर उचलून आमचे रक्षण केलेस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, अशा प्रकारे सारे गोपाळ तुझी कीर्ती वर्णन करतात. ४

४२३४ अरे कृष्णा तुवां काळया[3] नाथिला । दाढे रगडिला रिठासुर ॥ १ ॥
अरे कृष्णा तुवां पूतना शोषिली । दुर्बुद्धि कळली अंतरींची ॥ २ ॥
गोपाळ करुणा ऐसी नानापरी । भाकिती श्रीहरी तुजपुढें ॥ ३ ॥
तुझें नाम कामधेनु करुणेची । तुका म्हणे त्यांची आली कृपा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- काळया-कालिया नाग, नाथिला-खोड मोडून काढली, रिठासुर-रीठ नावाचा असुर.

अर्थ :- अरे कृष्णा, तू पूर्वी कालिया नागाची खोड मोडून काढलीस रिठासुरास दाढेखाली रगडलेस. १ अरे कृष्णा, पूतनेच्या अंत:करणातील दुर्बुद्धी ओळखून तिला शोषून शासन केलेस. २ श्रीहरी, हे सर्व गोपाळ अशा रीतीने नाना प्रकारची करुणा तुझ्यापुढे भाकू लागले ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुझे नाम हे कामधेनू-प्रमाणे असून तिला करुणा लोकर येते तुलाही त्यांची कृपा चटकन आली. ४

१ जवळी, २ भाकतील, ३ कालिया.

४२३५ चहुकडूनिया येती ते कल्लोळ । सभोवते जाळ जवळि आले ॥ १ ॥
सकुमार मूर्ति श्रीकृष्ण धाकुटी । घोंगडी आणि काठी खांद्यावरि ॥ २ ॥
लहान लेकुरू होते तें सगुण । विक्राळ वदन पसरिले ॥ ३ ॥
चाभाड तें एक गगनीं लागले । एक ते ठेविले भूमीवरि ॥ ४ ॥
तये वेळे अवघे गोपाळ ही भ्याले । तुके ही लपाले भेऊनिया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – चाभाड–जबडा, तुके–तुकाराम

अर्थ – या वणव्याचे कल्लोळ चोहो बाजूनी येत राहिले भोवतीच्या ज्वाळा जवळ जवळ आल्या १ यावेळी श्रीकृष्णाची धाकटी सुकुमार मूर्ती शोभत होती त्याच्या खांद्यावर घोंगडी, काठी होती २ असे हे सगुण लेकरू लहान असले तरी त्याने आपले विक्राळ तोंड पसरले ३ त्याच्या मखाचा जबडा गगनाला जाऊन भिडला आणि दुसरा खालचा भूमीवर स्थिर झाला ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्यावेळी सारे गोपाळ भिऊन गेले मी तुकाही त्यावेळी भीतीने लपून राहिलो होतो ५

४२३६ श्रीमुख वोणवा गिळीत चालिले । भ्यासुर वासिले वदनांबुज ॥ १ ॥
विक्राळ त्या दाढा भ्यानें पाहावेना । धाउनी रसना ज्वाळ गिळी ॥ २ ॥
जिव्हा लांब धावे गोळा करी ज्वाळ । मोटें[1] मुखकमळ त्यांत घाली ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघा वोणवा गोळिला । आनंद जाहाला गोपाळांसी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – भ्यासुर–भेसुर वदनांबुज–मुखकमल रसना–जीभ

अर्थ – अशा प्रकारे श्रीहरीचे श्रीमुख वणवा गिळीत चालले, त्याने आपले अतिशय भेसुर असे मुखकमल पसरले १ त्याच्या त्या विक्राळ दाढा भीतीनें पाहावेनात त्याची जीभ बाहेर धाव घेऊन ज्वाळा गिळीत असे २ जीभ लांब लांब धावून ज्वाळा गोळा करून मुखकमळाच्या मोटेत टाकीत असे ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाण त्या श्रीहरीने सव वणवा गिळून टाकला तेव्हा साऱ्या गोपाळांना आनंद झाला ४

४२३७ गोपाळ प्रीतीनें कैसे विनविती । विक्राळ श्रीपती होऊं नको ॥ १ ॥
नको रे बा कृष्णा धरू ऐसे रूप । आम्हा चळकांप सुटलासे ॥ २
होईं बा धाकुटा शाम चतुर्भुज । बैसोनिया गुज सुखें बोलों ॥ ३ ॥
वोणव्याच्या रागें गिळशील आम्हा । तुका मेघशामा पायां लागे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चळकांप–थरकाप

अर्थ – 'श्रीपती तू असा आता विक्राळ होऊ नकोस असे मोठ्या प्रीतीने गोपाळ त्याला विनवू लागले १ अरे कृष्णा, असे भयानक रूप तू धारण करू नकोस ते पाहून आम्हास भीतीने थरकाप सुटला आहे २ अरे, तू धाकटा, चतुर्भुज असा हो तुझ्याशी जवळ बसून काही गुजगोष्टी बोलता येतील ३ तुकाराम महाराज म्हणतात, वणव्याच्या रागाने आम्हासही गिळशील असे गोपाळ म्हणू लागले मेघश्यामा, तुझ्या पायी हा तुकाराम लागत आहे ४

[1] मोट

४२३८ सांडियेले रूप विक्राळ भ्यासुर । झाले सकुमार कोडिसवाणे ॥ १ ॥
शाम चतुर्भुज मुकुट कुंडले । सुंदर दंडले नव बाळ ॥ २ ॥
गोपाळ म्हणती कैसेरे बा कृष्णा । रूप नारायणा धरियेले ॥ ३ ॥
कैसा वाढलासी विक्राळ जालासी । गटगटा ज्वाळासी गिळियेले ॥ ४ ॥
तुका म्हणे भावे पुसती गोपाळ । अनाथवत्सल म्हणोनिया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोडिसवाणें–गोजिरवाणे, दडले–शोभले

अर्थ :– श्रीहरीने आपले भेसूर व विक्राळ असे रूप सोडून दिले आणि तो सुकुमार व गोजिरपाणा दिसू लागला १ त्याचा रंग काळसर असून तो चतुर्भुज झाला त्याचा मुकुट व त्याची कुंडले शोभू लागली असे हे नवे बाळ सुंदरपणे शोभले २ मग गोपाळ त्याला म्हणू लागले, 'कृष्णा, अरे नारायणा, तू हे विशाल रूप कसे धरलेस ? ३ तू एवढा मोठा वाढून विक्राळ तरी कसा झालास रे ? आणि या भयानक ज्वालाना गटागटा गिळलेस तरी कसे ?' ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी अनाथवत्सल असल्यामळे या गोपाळानी त्याला मोठ्या भक्तिभावाने हे असे विचारले ५

४२३९ बा रे कृष्णा तुझें मुख कीं कोमळ । कैसे येवढे ज्वाळ ग्रासियेले[1] ॥ १ ॥
बा रे कृष्णा तुझी जिव्हा कीं कोवळी । होईल पोळली[2] नारायणा ॥ २ ॥
बैसे कृष्णा तुझें पाहूं मुखकमळ । असेल पोळले कोणे ठायीं ॥ ३ ॥
घोंगडिया खालीं घालूनिया तळीं । वरी वनमाळी बैसविती ॥ ४ ॥
तुका म्हणे भावे आकळिला देव । कृपासिंधुराव त्रैलोक्याचा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आकळिला–स्वाधीन केला

अर्थ – 'अरे कृष्णा, तुझे मुख अतिशयच कोमल आहे रे तू एवढ्या भयानक वणव्यास कसे ग्रासलेस ? १ अरे कृष्णा, तुझी जीभ फारच कोवळी आहे रे नारायणा, तो फार पोळली असेल २ कृष्णा तू बैस असा तुझे मला मुखकमळ पाहू दे कोणत्या जागी ते पोळले ते तरी पाहू ३ असे म्हणून गोपाळानी घोंगड्या खाली जमिनीवर टाकल्या व त्यावर वनमाळी कृष्णाला बसविले ४ तुकाराम महाराज म्हणतात, या प्रमाणे या गोपाळानी आपल्या भक्तिभावाने हा त्रैलोक्याचा कृपासिंधुराव स्वाधीन करून घेतला ५

४२४० एक म्हणती मुख वासीं नारायणा । पाहो दे वदना डोळेभरि ॥ १ ॥
वासुनिया मुख पहाती सकळ । अवघे गोपाळ व्योमाकार ॥ २ ॥
म्हणती गोपाळ बेटे हो हा देव । स्वरूपाचा ठाव न कळे याच्या ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघे विठोबाभोंवते । मिळाले नेणते लहानथोर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – व्योमाकार–आकाशाच्या आकाराप्रमाणे

अर्थ – काही गोपाळ म्हणाले, 'नारायणा, तू तोंड उघड पाहू आम्हाला तुझे तोंड एकदा डोळे भरून पाहू दे तरी ' १ मग ते सर्वजण कृष्णाचे तोंड उघडून पाहू लागले त्याचे तोंड आकाशाच्या आकाराप्रमाणे बनले होते २ सर्व गोपाळ म्हणू लागले, 'या देवाच्या स्वरूपाचा काही ठाव नीट लागत नाही' ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे विठ्ठलाभोवती सारे लहानथोर नेणतेजाणते मिळाले आहेत ४

१ गिळियेलें, २ पोवळी

४२४१ एक म्हणती कृष्णा वासिले त्वा मुख । तेव्हा थोर धाक पडिला आम्हा ॥ १ ॥
गिळो लागलासी अग्नीचे कल्लोळ । आम्ही चळचळा कापतसो ॥ २ ॥
ज्वाळाबरोबरि गिळशील आम्हा । ऐसे मेघशामा भय वाटे ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे भाग्याचे गोपाळ । फुटके कपाळ आमुचेचि ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कल्लोळ–ज्वाळा, कपाळ–नशीब

अर्थ – काही गोपाळ म्हणू लागले, 'कृष्णा वणवा गिळायला तू जेव्हा आपले तोंड उघडलेस तेव्हा आम्हाला फार मोठा धाक निर्माण झाला १ तू अग्नीच्या ज्वाला जेव्हा गिळू लागलास तेव्हा आम्ही चळचळा कापायला लागलो २ या ज्वाळाबरोबर तू आम्हासही गिळशील असे मेघश्यामा आम्हास भय वाटले' ३ तुकाराम महाराज म्हणतात हे असे भाग्याचे गोपाळ होते आमचे नशीब मात्र फुटके दिसते ४

४२४२ गोपाळाचे कैसे केले समाधान । देऊनि आलिंगन निवविले ॥ १ ॥
ज्वाळाबरोबरि तुम्हा का ग्रासीन । अवतार घेणे तुम्हासाटीं ॥ २ ॥
निर्गुण निर्भय मी सर्वांनिराळा । प्रकृतिवेगळा गुणातीत ॥ ३ ॥
चिन्मय चिद्रूप अवघें चिदाकार । तुका म्हणे पार नेणे ब्रह्मा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा –पार–सीमा अत

अर्थ – मग या श्रीहरीने गोपाळाचे समाधान करून त्याना आलिंगन दिले व त्यांची अगे निवविली १ त्याना तो म्हणाला ज्वाळाबरोबर मी तुम्हाला का ग्रासेन ? तुमच्यासाठी तर मी अवतार घेतो' २ मी खरे म्हणजे निर्गुण निर्भय सर्वाहून निराळा मी प्रकृतिवेगळा असून गुणातीत आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात तो म्हणाला,' मी चिन्मय, चिद्रूप व चिदाकार आहे याचा अत ब्रह्मदेवही जाणणार नाही ४

४२४३ ऐसा मी अपार पार नाहीं अत । परि कृपावत भाविकाचा ॥ १ ॥
दुर्जना चाडाळा करी निर्दाळण । करीं सरक्षण अकिताचे ॥ २ ॥
भक्त माझे सखे जिवलग सागाती । सर्वांग त्याप्रति वोडवीन ॥ ३ ॥
पीतांबरछाया करीन त्यावरी । सदा त्याचे घरीं दारीं उभा ॥ ४ ॥
माझे भक्त मज सदा जे रातले । त्याघरीं घेतले धरणे म्या ॥ ५ ॥
कोठें हें वचन ठेविले ये वेळे । तुका म्हणे डोळे झाकियेले ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अकिताचें–सेवकाचे, वोडवीन–प्राप्त करीन रातले–रमले

अर्थ – श्रीहरी म्हणाला 'असा मी अपार असून माझा गुणासही अत लागत नाही पण मी भाविकांना कृपावत असतो १ मी जे दुर्जन व चाडाळ आहेत त्यांचा नाश करून माझ्या सेवक भक्ताचे मी रक्षण करतो २ माझे भक्त माझे जिवलग सोबती असून मी त्याच्यासाठी सव अवयवानी प्रकट होईन ३ मी त्यांच्यावर माझ्या पीताबराची छाया धरीन त्याच्या घरी मी नेहमी तिष्ठत उभा राहीन ४ जे भक्त माझ्या गुणरूपांत रमून गले त्याच्याच घरी मी धरणे धरले आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, तुमचे हे वचन याच वेळी कोठे ठेविले हो ? तुम्ही आताच डोळे झाकून का घेतले हो ? ६

४२४४ भ्रतारेंसी[1] मार्या बोले गुज गोष्टी । मज ऐसी कष्टी नाहीं दुजी ॥ १ ॥
अखड तुमचे धद्यावरी मन । माझें तो हेळण करिती सर्व ॥ २ ॥

---

१ भ्रतारासी

जोडितसा तुम्ही खातो हेरेंचोरें[1] । माझीं तव पोरें हळहळीती ॥ ३ ॥
तुमची व्याली माझे डाई हो पेटली[2] । सदा दुष्ट बोली सोसवेना ॥ ४ ॥
दुष्टवृत्ति नदुली सदा द्वेष करी । नादों मी ससारीं कोण्या सुखें ॥ ५ ॥
मावा[3] दीर काहीं घड हा न बोले । नादो कोणा खाले कैसी आता ॥ ६ ॥
माझ्या अगसगें तुम्हासी विश्राति । मग घडगति नाहीं तुमची ॥ ७ ॥
ठाकतें ठमकतें जीव मुठी धरूनि । परि तुम्ही अजूनि न धरा लाज ॥ ८ ॥
वेगळे निघता ससार करीन । नाहीं तरी प्राण देते आता ॥ ९ ॥
तुका म्हणे जाला कामाचा अकित । सागे मनोगत तैसा वर्ते ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – भ्रतारेसी–नवऱ्याला, दुजी–दुसरी, हेळण–अवाळ, अवहेलना, व्याली–जन्म देणारी, नदुली–नणद

*अर्थ – कुणी एक भार्या आपल्या नवऱ्याला पुढीलप्रमाणे गुजगोष्ट सागत आहे ती म्हणते माझ्याइतकी* कष्टी दुसरी कुणीही नाही १ तुमचे सारे लक्ष आपल्या घरावर असते आणि माझी मात्र अवहेलना इथे सर्वत्र होत असते २ तुम्ही सव मिळवता, आणि खातात मात्र सर्व चोरे पोरे आणि माझी मुले मात्र सतत हळहळतात ३ तुम्हाला जन्म देणारी तुमची आई तर माझे डोकेच पिकवते तिचे नेहमीचे दुष्ट बोलणे आता मला सोसवेना ४ आणि दुष्ट वृत्तीची ही नणद तर माझा नेहमी द्वेषच करते मी आता या ससारात कोणत्या सुखाने नादू ? ५ हा दीर भावाशी धडपणे बोलतही नाही मी आता कोणाच्या हाताखाली नादू ? ६ माझ्या अगसगाने खरे म्हणजे तुम्हांला विश्राती मिळते पण माझीच धडगत नसल्यामुळे तुमचे तरी काय होणार ? ७ मी कसा तरी जीव मुठीत धरून इथे दिवस कठीत आहे पण तुम्हाला याची काही लाज धरवत नाही ८ मी आता तुम्ही वेगळे निघाल तरच ससार करीन नाहीतर प्राण देईन ९ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा नवरा कामाचा, वासनेचा अकित होऊन बायकोच्या मनोगताप्रमाणे वागू लागला १०

४२४५ कामाचा अकित कातेते प्रार्थित । तू का हो दुश्चित्त निरतर ॥ १ ॥
माझीं मायबापें बधु हो वहिण । तुज करी[4] सीण त्यागीन मी ॥ २ ॥
त्याचे जरि तोंड पाहेन मागुता । तरि मज हत्या घडो तुझी ॥ ३ ॥
सकाळ उठोन वेगळा निघेन । वाहातो तुझी आण निश्चयेंसी ॥ ४ ॥
वेगळें निघता घडीन दोरे चुडा । तू तव माझा जोडा जन्माचा कीं ॥ ५ ॥
ताईत साकळी गळाचि[5] दुलडी । बाजुबदजोडी हालसर ॥ ६ ॥
वेणीचे जे नग सर्व ही करीन । नको धरू सीण मनीं कांहीं ॥ ७ ॥
नेसावया साडी सेलारी चुनडी । अगींची काचोळी जाळिया फुले ॥ ८ ॥
तुका म्हणे केला राडेनें गाढव । मनासवे धाव घेतलीसे ॥ ९ ॥

शब्दार्थ व टीपा – सीण–कष्ट, त्रास आण–शपथ, दोरे–दोड, चुडा–बागडया, नग–दागिन, सेलारी–शेलारी, कांचोळी–चोळी, मनासवे–मन सागल त्याप्रमाण

अर्थ – विषयकामनेने अकित झालेला तो नवरा आपल्या बायकोला प्रार्थना करून म्हणू लागला, 'तू अशी निरतर दुःखीकष्टी का राहातेस ? १ माझे आईबाप बधू व बहीण हे तुला फार शीण देतात म्हणून मी त्याचा

१ चोरेपोरे, २ पडली, ३ जावा, ४ करिती, ५ गळयाची

त्याग करीन २ मी जर पुन. त्याचे तोंड पाहीन तर मला तुझी हत्या घडेल ३ उद्या सकाळी उठून मी वेगळे बिऱ्हाड करीन. याबद्दल मी तुझी निश्चयाने शपथ घेतो ४ एकदा वेगळे निघाल्यावर मी तुला बांगड्या, दोडे घडवीन. कारण तुझामाझा जोडा चांगला जन्माचाच शोभणारा आहे ५ मी तुला ताईत, सांखळी, गळ्यातील दुल्लड, बाजूबंदाची जोडी, हातसर इत्यादी सर्व दागिने करीन ६ वेणीत घालायचे सर्व दागिने मी करीन तू काही मनामध्ये असा त्रास करून घेऊ नकोस. ७ तुला नेसायला मी शेलारी साडी व चुनडी आणीन. तुला अंगात घालायला जाळीदार फुलाची चोळी आणीन' ८ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने चांगला असलेला हा मनुष्य या राडेने गाढव करून टाकला म्हणून तो तिच्या मनाप्रमाणे वागत आहे ९

४२४६ उजळिता उजळे दीपकाची वाती । स्वयभ ते ज्योति हिऱ्या अंगी ॥ १ ॥
एकीं महाकष्टें मेळविले धन । एकासी जतन दैवयोगें ॥ २ ॥
परिमळें केले चंदनाचे चिन्ह । निवडी ते भिन्न गाढव तो ॥ ३ ॥
*तुका म्हणे ज्या अंगीं हरिठसा[1] । तो तरे सहसा वद्य होय ॥ ४ ॥*

शब्दार्थ व टीपा :– स्वयभ-आपोआप

अर्थ :– दिव्याची वात प्रज्वलित केली असताना त्याची ज्योत प्रकट होते आणि हिऱ्याच्या अंगचे तेज स्वयंभू असते १ एकाने मोठे कष्ट करून पैसे मिळविलेले असतात, तर दुसऱ्यास, दैवयोगाने वडिलांनी जतन करून ठेवलेले मिळतात २ सुगंधावरून चंदनाची खूण पटते चंदनाहून निवडून काढील तो गाढवच म्हणावा लागेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या अंगी श्रीहरीच्या नामाचा ठसा उमटला आहे तो या संसारसागरातून तरला जाऊन सर्वांना वद्य होतो ४

४२४७ बारावर्षे बाळपण । तें ही वेचले अज्ञाने ॥ १ ॥
ऐसा[2] जन्म गेला वांया । न भजता पंढरिराया ॥ २ ॥
बाकी उरलीं[3] आठचाळीं । तीस वेचलीं कामासी ॥ ३ ॥
बाकी उरलीं आठावन्न । तीस वेचलीं ममतेने ॥ ४ ॥
बाकी उरलीं आठावीस । देहगेह विसरलास ॥ ५ ॥
तुका म्हणे ऐसा झाडा । संसार हा आहे थोडा ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – देहगेह–देहरूपी घर, झाडा–हिशेब

अर्थ :– बाळपणात जी बारा वर्षे गेली ती अज्ञानातच खर्च झाली १ अशा रीतीने पंढरिरायास न भजताच सारा जन्म वायाच गेला २ बाकी वयाची मग अठ्ठयाऐंशी वर्षे उरली. त्यातली तीस वर्षे कामसेवनात गेली ३ बाकी मग अठ्ठावन उरली त्यातली तीस प्रपंचाच्या ममतेत खर्च झाली ४ बाकी मग अठ्ठावीस उरली, तेव्हा देहरूपी घरास विसरून जावे लागते ५ तुकाराम महाराज म्हणतात, संसार थोडा दिसतो, पण त्याचा हिशेब हा असा आहे ६

विवरण — आपणास शंभर वर्षांचे आयुष्य आहे तेव्हा देवधर्म, तत्त्वज्ञान, आत्मज्ञान, परमार्थ वगैरे गोष्टी सावकाश करता येतील अशी माणसाची कल्पना असते, पण त्याचा हा भ्रम सत्पुरुषांनी व सुभाषितकारांनी दूर करण्याचा प्रयत्न केला आहे वरील एका अभंगात बुवांनी बाळपणात तरुणपणात, प्रौढपणात आपले आयुष्य कसे निघून जाते याचा हिशेब दिलेला आहे शंकराचार्यांच्या चर्पटपंजरीमध्येही असा एक विचार व्यक्त करताना त्यांनी

१ नामठसा, २ तैसा, ३ राहिली

म्हटले आहे 'बालस्तावत्क्रीडासक्तस्तरुणस्तावत्तरुणीरक्तः । वृद्धस्तावच्चिन्तामग्नः परे ब्रह्मणि तु कोऽपिन लग्नः' बालपणी खेळण्यात, तरुणपणी प्रेमरंगात, म्हातारपणी चिंतेत मनुष्य मग्न होतो. पण ब्रह्माच्या चिंतनाविषयी कुणासच आस्था नसते. भर्तृहरीने याच पद्धतीने आयुष्याचा हिशेब केलेला प्रसिद्ध आहे. त्याने म्हटले आहे, 'आयुर्वर्षशतं नृणां परिमितं रात्रौ तदर्धं गतं । तस्यार्धस्य परस्य चार्धमपरं बालत्ववृद्धत्वयोः ॥ शेषं व्याधि-वियोग-दुःखसहितं सेवादिभिर्नीयते । जीवे वारितरंगबुद्बुदसमे सौख्यं कुतः प्राणिनाम् ?' माणसाला आयुष्य शंभर वर्षांचे मानले तरी त्यातील अर्धे रात्रीत जायचे. उरलेल्या अर्ध्यामधील अर्धे बालपण, तरुणपण, वार्धक्य यात आणि उरलेले सेवा, रोग, वियोग, दुःख यांत जाणार. पाण्याच्या बुडबुड्याप्रमाणे असणाऱ्या या जीवनात माणसास सुख कोठून मिळणार ? म्हणून त्याने वेळीच सावध होऊन स्वहिताविषयी विचार करावयास हवा.

४२४८ सोवळा तो जाला । अंगीकार देवें केला ॥ १ ॥
येर करिती भोजन । पोट पोसाया दुर्जन ॥ २ ॥
चुकला हा भार । तयाचीच येरझार ॥ ३ ॥
तुका म्हणे दास । जाला तया नाहीं नास ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अंगीकार–स्वीकार, येर–इतर, नास–नाश.

अर्थ :– ज्याचा स्वीकार देवाने केला आहे तो सोवळा झाला असेच म्हटले पाहिजे. १ इतर दुर्जन मात्र पोट भरण्यासाठीच भोजन करतात. २ पण देवाने अंगीकार केल्यावर त्याच्यावरील जन्ममृत्यूंच्या येरझाऱ्यांचा भार नाहीसा होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो श्रीहरीचा दास झाला त्याचा नाश कधीही होत नाही. ४

४२४९ आजि शिवला मांग । माझें विटाळलें आंग ॥ १ ॥
यासी घेऊं प्रायश्चित्त । विठ्ठलविठ्ठल हृदयांत ॥ २ ॥
जाली क्रोधासी[1] भेटी । तोंडावाटे नर्क लोटी ॥ ३ ॥
अनुतापीं न्हाऊं । तुका म्हणे रवी पाहूं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अनुतापीं–पश्चात्तापाने, रवी–आत्मज्ञानाचा सूर्य.

अर्थ :– आज मला मांग शिवल्यामुळे माझे अंग विटाळून गेले आहे. १ यासाठी हृदयात विठ्ठल विठ्ठल असे नाम घेऊन प्रायश्चित्त घेऊ. २ अंतःकरणात एकदा क्रोध उफाळून आला की तोंडावाटे नरकाप्रमाणे शब्द बाहेर पडतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून आपण पश्चात्तापरूपी नदीत स्नान करून आत्मज्ञानरूपी सूर्याचे दर्शन घेऊ. ४

४२५० ठाव तुम्हांपाशीं । जाला आतां हृषीकेशी ॥ १ ॥
न लगे जागावें सतत । येथें स्वभावें हे नीत ॥ २ ॥
चोरट्यासी थारा । येथें कैंचा जी दातारा ॥ ३ ॥
तुका म्हणे मनें । आम्हां जालें समाधान ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव–स्थान, नीत–नीती, रीती.

अर्थ :– हृषीकेशी, तुमच्या पायांपाशीच आता आम्हास स्थान मिळाले आहे. १ आता या ठिकाणी सतत जागत बसण्याचे कारण नाही. अशीच रीत येथील आहे. २ दातारा, अशा या ठिकाणी चोरट्यांना थारा कसा मिळणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, आता आमच्या मनाचे समाधान झाले आहे ४

---

१ क्रोधियासी.

४२५१ पाळियेले लळे । माझे विठ्ठले कृपाळे ॥ १ ॥
बहुजन्माचे पोषणे । सरतें पायापाशीं तेणे ॥ २ ॥
सवे दिली लागो । भातें आवडीचे मागो ॥ ३ ॥
तुका म्हणे भिन्न । नाहीं दिसों दिले क्षण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सरते–मान्य, सवे–सवय, भातें–खाऊ

अर्थ :– या कृपाळू विठ्ठलाने माझे सर्व लळे पूर्ण केले १ याने अनेक जन्मात आमचे पोषण केले असल्याने आम्ही आता याच्या पायाशी मान्य झालो आहोत २ याच्या जवळ आवडीने खाऊ मागण्याची आम्हाला सवय लागलेली आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाने आम्हाला वेगळे असे क्षणभरही राहू, दिसू दिले नाही ४

४२५२ जो या गेला पंढरपुरा । आणीक यात्रा न मनी[1] तो ॥ १ ॥
सुलभ माय पंढरिराणा । पुरवी खुणा अंतरीच्या ॥ २ ॥
जन्मांतरिंच्या पुण्यरासी । वारी त्यासी पंढरी[2] ॥ ३ ॥
बाहेर येतां प्राण फुटे । रडें दाटे गहिवरें ॥ ४ ॥
दधिमंगळभोजन सारा । म्हणती करा मुरडींव ॥ ५ ॥
मागुता हा पाहों ठाव । पंढरिराव दर्शनें ॥ ६ ॥
तुका म्हणे भूवैकुंठ । वाळुवंट भींवरा ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – न मनी–मानीत नाही, मुरडींव–मुरडीचे कानवले, ठाव–स्थान

अर्थ :– जो या पंढरपूरच्या यात्रेस एकदा गेला आहे तो कधी इतर यात्रांना मानीत नाही १ पंढरीचा राणा हाच त्याला सुलभ अशी माय वाटते कारण मनातील सर्व इच्छा ती पूर्ण करते २ अनेक जन्माच्या पुण्यराशी ज्याच्या जवळ आहेत त्यासच पंढरीची वारी घडते ३ वारी झाल्यावर पंढरीतून बाहेर पडताना त्याचा प्राण फुटून जातो, त्याला गहिवरून येते, त्याला रडू येते ४ पंढरीहून निघताना दहीभाताचे मंगल भोजन करून मुरडीचे कानवले करा असे तो म्हणत असतो ५ कारण त्यामुळे त्याला पुन्हा मुरडून पंढरपूरचे हे स्थान पाहावयास मिळते पंढरीराजाचे दर्शन घडते ६ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने भीवरेच्या तीरावरील हे वाळवंट म्हणजे भूवैकुंठच आहे ७

४२५३ न मिळती एका एक । जये नगरीचे लोक ॥ १ ॥
भलीं तेथें राहू नये । क्षणें होईल न कळे काय ॥ २ ॥
न करितां अन्याय । बळें करिती अपाय ॥ ३ ॥
नाहीं पुराणाची प्रीति । ठायींठायीं पंचाइती ॥ ४ ॥
भल्या बुऱ्या मारी । होतां कोणी न निवारी[3] ॥ ५ ॥
अविचाऱ्या हातीं । देऊनि प्रजा नागविती ॥ ६ ॥
तुका म्हणे दरी । सुखें सेवावी ते बरी ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – दरी–पर्वताची डोंगरदरी

अर्थ :– ज्या नगरातील लोक एकमेकाच्या विचाराने राहात नाहीत, १ त्या नगरात भल्या माणसाने राहू नये. कारण क्षणात तेथे काय होईल हेही समजणार नाही २ कुणाकडून काही अन्याय झाला नसला तरी ते

१ मानी, २ पंढरीची, ३ विचारी

लोक त्याला बलाने शिक्षा करतात ३ त्या गावातील लोकाना कधी कथापुराणाची प्रीती नसते उलट नाना ठिकाणी नसत्या पचायती मात्र ते करीत असतात ४ चागल्यावाईट माणसाना कुणी मारू लागले तर त्यापासून निवारण कुणीच करीत नाहीत. ५ अविचारी लोकाच्या हातात प्रजेस दिल्याने प्रजा नागवली जाते ६ तुकाराम महाराज म्हणतात, अशा गावात राहण्यापेक्षा सुखाने एखाद्या डोंगरातील दरीचा आश्रय घ्यावा हे बरे ७

४२५४ शिकवणे नाक झाडी । पुढील जोडी कळेना ॥ १ ॥
निरयगांवी भोग देता । तेथें सत्ता आणिकांची ॥ २ ॥
अवगुणांचा सांटा करी । तेचि धरी जीवासी ॥ ३ ॥
तुका म्हणे जडबुद्धि । कर्मशुद्धी सांडवी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – जोडी–प्राप्ती, गती, निरयगावीं–नरकात.

अर्थ – कुणास जर एखादी चागली गोष्ट शिकविली तर तो तिकडे पाहून नाक उडवितो, नापसंती व्यक्त करतो यामुळे पुढे काय गती होणार हे यास समजत नाही १ यामुळे नरकात दुःख भोगावे लागून दुसऱ्याच्या सत्ते-खाली वागावे लागते २ ज्याने आयुष्यात अवगुणाचाच साठा करून ठेवला त्यानेच जीव कसातरी धरून ठेविला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याची बुद्धीच जड आहे ती त्याला शुद्ध कर्म करू देत नाही ४

४२५५ गोपीचंदन मुद्रा धरणे[1] । आम्हा लेणे वैष्णवा ॥ १ ॥
मिरवूं अळंकार लेणे । हीं भूषणे स्वामीचीं ॥ २ ॥
विकलो ते[2] सेवाजीवे । एक्या भावे एकविध ॥ ३ ॥
तुका म्हणे शूर जालो । बाहेर आलो संसारा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लेणें–अलकार

अर्थ :– गोपीचदनाच्या मुद्रा धारण करणे हेच आम्हा वैष्णवाना अलकार आहेत १ आमच्या स्वामीची हीच भूषणे असल्याने हेच अलकार आम्हीही धारण करू २ या श्रीहरीच्या सेवेसाठी एकविध धिसाने आम्ही आपला जीव विकलेला आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी या प्रकारे शूर होऊन लौकिक ससाराच्या बाहेर आलो आहे ४

४२५६ विषयाचे लोलिंगत । ते फजीत होतील ॥ १ ॥
न सरे येथें यातिकुळ । शुद्ध मूळबीज व्हावे ॥ २ ॥
शिखासूत्र सोग वरि । दुराचारी दड पावे ॥ ३ ॥
तुका म्हणे अभिमाना । नारायणा न सोसे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– लोलिंगत–आसक्त, न सरे–मान्य होत नाही, सूत्र–जानवे

अर्थ ·– जे इद्रियविषयात आसक्त होतील ते फजीत पावतील १ त्याचे उत्तम कुळ अथवा त्याची उत्तम जाती या गोष्टी येथे मान्य होत नाहीत भक्तीसाठी मूळ बीज मात्र शुद्ध व्हावे २ केवळ आपणास शेंडी आहे व गळयात जानवे आहे या वरवरच्या सोगासाठी कुणी ब्राह्मण दुराचार करील तर त्याला शिक्षा होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणाला कसलाही अभिमान सहन होत नाही ४

४२५७ वडिले दिले भूमिदान । तें जो मागे अभिळासून ॥ १ ॥
अग्रपूजेचा अधिकारी । श्रेष्ठ दड यमा घरीं ॥ २ ॥

१ धारणें, २ तो सेवे जीव । एका भावे

उभयकुल समवेत । नर्की प्रवेश अद्भुत ॥ ३ ॥
तप्तलोहें भेटी । तुका म्हणे कल्पकोटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अभिळासून–मनात इच्छा धरून.

अर्थ :– वडिलांनी जी भूमी एकदा दान म्हणून दिली आहे तिची मनात इच्छा धरून जर कुणी ती परत मागितली, १ तर तो यमाच्या घरी अग्रपूजेचा अधिकारी बनून श्रेष्ठ प्रकारच्या शासनास प्राप्त होतो २ आई व वडील या दोन्ही कुळांसहित तो अद्भुत अशा नरकात प्रवेश करतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा लोकांना कोटी कल्पांपर्यंत तापलेल्या लोहदंडांना चिकटून राहावे लागते ४

४२५८ लटिकी ग्वाही सभेआंत । देतां[1] पतित आगळा ॥ १ ॥
कुंभपाकीं वस्ती करूं । होय धुरु कुळेसीं ॥ २ ॥
रजस्वला रुधिर स्रवे । तेंचि घ्यावें तृषेसी ॥ ३ ॥
तुका म्हणे जन्मा आला । काळ जाला कुळासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ग्वाही–साक्ष, आगळा–श्रेष्ठ, धुरु–श्रेष्ठ, रजस्वला–विटाळशी स्त्री

अर्थ :– कोर्टकचेरीत जाऊन जो खोटी साक्ष देतो तो श्रेष्ठ प्रकारचा पतित असतो. १ कुंभपाक नावाच्या नरकात वस्ती करणाऱ्या कुळांत तो श्रेष्ठ ठरतो, २ विटाळशी स्त्रीचा स्रवणारा स्राव त्याला तहान लागल्यावर प्यावयास मिळेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा मनुष्य जन्माला येऊन कुळाला काळच झाला आहे. ४

४२५९ आचरे दोष न धरी धाक । परीपाक दुःखाचा ॥ १ ॥
चांडाळ तो दुराचारी । अंगीकारी कोण त्या ॥ २ ॥
नव्हे संतान वोस घर । अंधकार कुळासी ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याचें दान । घेतां पतन दुःखासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परिपाक–परिणाम, अंगीकारी–स्वीकारी, वोस–रिकामे.

अर्थ :–कुठलाही धाक न धरता जो कुणी दोषाचे आचरण करतो त्याला परिणामी दुःखच भोगावे लागते. १ हा चांडाळ दुराचारी असल्यामुळे त्याचा कोण स्वीकार करणार ? २ त्याला संतानही कधी होणार नाही व सारे घर त्याचे रिकामे पडेल. साऱ्या कुळात अंधार पसरेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाकडून दान घेणाराही दु:खी होईल व तो अधोगतीला जाईल ४

४२६० कींविलवाणा जाला आतां । दोष करितां न विचारी ॥ १ ॥
अभिळाषी नारी धन । झकवी जन लटिकेंचि ॥ २ ॥
विश्वासिया करी घात । न धरी चित्ता कांटाळा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं आला । वृथा गेला जन्मासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– न विचारी–विचार करीत नाही, अभिळाषी–इच्छा करतो, झकवी–फसवतो, कांटाळा–कंटाळा.

अर्थ :– दोष आचरताना हा कधी विचार करीत नाही आणि आता परिणाम भोगताना मात्र केविलवाणा चेहरा करतो. १ याने आतापर्यंत स्त्री व धन यांचीच इच्छा मनात धारण केली व खोटे बोलून लोकांना फसविले. २ ज्याने विश्वास ठेविला त्याला घातपात करण्याचा याच्या चित्तात कधीच कंटाळा नसतो. अथवा साऱ्या विश्वास

१ देतो,

घात करण्याच्या याच्या चित्ताला कधी कंटाळा नसतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा मनुष्य जन्मास आल्यासारखाच असून व्यर्थ गेलेला असतो. ४

४२६१ घेऊं नये तैसें दान । ज्याचें धन अभिळाषी ॥ १ ॥
तो ही येथें कामा नये । नर्का जाय म्हणोनि ॥ २ ॥
विकी स्नानसंध्या जप । करी तप पुढिलांचें ॥ ३ ॥
तुका म्हणे दांभिक तो । नर्का जातो स्वइच्छा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अभिळाषी–मनात इच्छा धरलेले

अर्थ :– ज्याने मनात इच्छा धरून दुसऱ्याचे धन लुबाडले असते त्याचे दान कधीही घेऊ नये १ तो यामुळे नरकाला जाणार असल्याने येथे कामास येणार नाही २ जो दुसऱ्यास स्नानसंध्या, जप, तप याचे पुण्य विकतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तो मनुष्य दांभिक असून स्वतःच्या इच्छेनेच नरकास जात राहातो ४

४२६२ सदा नामघोष करूं हरिकथा । तेणें सदा चित्ता समाधान ॥ १ ॥
सर्वसुख ल्यालों सर्व अलंकार । आनंदें निर्भर डुलतसों[1] ॥ २ ॥
असों ऐसा[2] कोठें आठव ही नाही । देहींच विदेही भोगू दशा ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही जालों अग्निरूप । लागों नेदूं पापपुण्य आतां[3] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निर्भर–परिपूर्ण

अर्थ :– आम्ही सदासर्वकाळ श्रीहरीच्या नामाचा घोष करू श्रीहरीची कथा करू त्यामुळे आमच्या चित्तात अतिशय समाधान होईल. १ श्रीहरीच्या सर्व सुखाचे सर्व अलंकार आम्ही अंगावर घातले आहेत या आनंदाने परिपूर्ण होऊन आम्ही डुलत आहोत २ आम्ही या आनंदात मग्न झालो की कुठे आहोत याची आठवणही होत नाही अशा प्रकारे आम्ही देही असूनही विदेहीपणाची अवस्था भोगीत आहोत ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या प्रकारे अग्निरूप, ब्रह्मरूप झालो असून पापपुण्याचा संबंध आता आम्ही आम्हास लागू देणार नाही ४

४२६३ वरिवरि बोले युद्धाचिया गोष्टी । परसैन्या भेटी नाहीं जाली ॥ १ ॥
पराव्याचे मार पाहुनियां दृष्टी । कांपतसे पोटीं थरथरा ॥ २ ॥
मनाचा उदार रायाचा जुंझार । फिरंगीचा मार मारीतसे ॥ ३ ॥
धन्य त्याची माय धन्य त्याचा बाप । अंगीं अनुताप हरिनामें ॥ ४ ॥
तुका म्हणे साधु बोले खगधार । खोचतें अंतर दुर्जनाचे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा– पराव्याचे–दुसऱ्याच्या, मार–समुदाय, फिरंगीचा–तरवारीचा, खगधार–खड्गाची धार.

अर्थ :– हा मनुष्य वरवर युद्धाच्या गोष्टी बोलतो, पण हे कुठवर ? तर शत्रूच्या सैन्याची भेट झाली नाही तोपर्यंतच १ पण शत्रूच्या सैन्याची एकदा दृष्टिभेट झाली की याचे पोट भीतीने थरथरा कापू लागते २ जो मनाने स्वतःच्या जीवावर उदार झाला आहे व जो राजाचा शूर योद्धा आहे तोच तरवारीचा मार खाण्यासही भीत नाही ३ अशाच प्रकारे अंगी अनुताप होऊन जो हरिनामात दंग होऊन जातो त्याचे आईबाप धन्य होत ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा साधु माणसाचे बोलणेही तरवारीच्या धारेप्रमाणे तीक्ष्ण असते त्यामुळे दुर्जनाचे अंतःकरण भेदले जाते. ५

---

१ डुल्लतसों, २ आता, ३ अंगा

४२६४ गंधर्वनगरीं क्षण एक राहावें । तेंचि पैं करावें मूळक्षेत्र ॥ १ ॥
खपुष्पाची पूजा बांधोनि निर्गुणा । लक्ष्मीनारायणा तोषवावें ॥ २ ॥
वंध्यापुत्राचा लग्नाचा सोहळा । आपुलिया डोळां पाहों वेगीं ॥ ३ ॥
मृगजळा पोहीं घालुनि सज्ञाना । तापलिया जना निववावें[1] ॥ ४ ॥
तुका म्हणे मिथ्या देहेंद्रियकर्म । ब्रह्मार्पण ब्रह्म होय बापा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– गंधर्वनगरीं–आकाशात दिसणाऱ्या ढगाच्या आकृतीत, मूळक्षेत्र–राहाण्याचे मूळ ठिकाण, खपुष्पाची–आकाशपुष्पाची, निर्गुणी–दोऱ्याशिवाय, वंध्यापुत्राचा–वांझ बाईस झालेल्या मुलाचा, पोहीं–पाणपोई, मिथ्या–खोटा

अर्थ –आकाशात दिसणाऱ्या विविध ढगाच्या आकृतीत क्षणभर राहून तेथेच आपले निवासस्थान करावे १ आकाशपुष्पाची माळ दोऱ्याशिवाय ओवावी आणि ती लक्ष्मीनारायणाच्या गळ्यात घालून त्याला संतुष्ट करावे २ वांझ स्त्रीच्या मुलाच्या लग्नाचा सोहळा आपल्या डोळ्यानी त्वरेने पाहावा ३ मृगजळाची पाणपोई घालून जे कुणी तापलेले सज्ञानी असतील त्याना शांत करावे ४ तुकाराम महाराज म्हणतात, हा सर्व प्रकार जसा खोटा आहे त्याच प्रमाणे देहाची व इंद्रियाची कर्मे खोटी आहेत बापा ही सर्व ब्रह्मार्पण करून तू ब्रह्मरूपच होऊन जा ५

४२६५ तुझा म्हणविलों दास । केली उच्छिष्टाची आस ॥ १ ॥
मुखीं घालावा कवळ । जरी तू होशील कृपाळ ॥ २ ॥
सीण भाग माझा पुसे । तुका म्हणे न करीं हांसें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – आस–इच्छा, कवळ–घास

अर्थ – मी स्वत ला तुझा दास म्हणवून घेतो म्हणून तुझ्या उच्छिष्टाची इच्छा केलेली आहे. १ देवा, तू जर कृपाळू असशील तर माझ्या मुखात प्रेमाने घास घालावास २ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, माझे लोकात हसे न व्हावे म्हणून माझा शीणभाग तुम्ही दूर करावा ३

४२६६ काय मागें आम्ही गुंतलों फाशानीं । पुढें वाहों मनीं धाक देवा ॥ १ ॥
कीर्ति चराचरीं आहे तैसी आहे । भेटोनियां काय द्यावें[2] आम्हां ॥ २ ॥
घेउनी धरणें बैसती उपवासी । हट आम्हांपाशीं नाहीं तैसा ॥ ३ ॥
तातडी तयानीं केली विटंबणा । आम्हां नारायणा काय उणें ॥ ४ ॥
नाहीं मुक्तिचाड वास वैकुंठींचा । जीव भाव आमुचा देऊं तुज ॥ ५ ॥
तुका म्हणे काय मानेल तें आतां । तूं घेई अनंता सर्व माझें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा .– मुक्तिचाड–मुक्तीची इच्छा

अर्थ – देवा, आम्ही तुला काय मागावे ? कोणत्या गोष्टींत आम्ही गुंतलो आहोत ? आमच्या मनात पुढे धाक वाटतो १ तुमची कीर्ती सर्व चराचरात आहे त्याप्रमाणे आम्हास भेटून प्रेमसुख द्यावे २ कित्येक लोक तुमच्यापाशी उपवास करून हट्ट करतात, धरणे धरतात, तसा काही प्रकार आमच्यापाशी नाही ३ आम्हास मुक्तीची इच्छा नाही वैकुंठवासही नको आम्ही आमचा जीवभाव तुम्हांस देऊ ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुला काय वाटेल ते अनंता, माझे सर्व काही मागून घे ५

१ तोषवावे, २ घ्यावे

४२६७ जालों बळिवंत । होऊनियां शरणागत ॥ १ ॥
केला घरांत रिघावा । ठायी पाडियेला ठेवा ॥ २ ॥
हाता चढे धन । ऐसें रचलें कारण ॥ ३ ॥
तुका म्हणे मिठी । पायीं देउनि केली लुटी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– रिघावा–प्रवेश, कारण–कार्य

अर्थ :– देवा, तुला शरण येऊन मी बलवान झालो आहे. १ तुमच्या घरात प्रवेश केल्यामुळे एक मोठा ठेवा पदरात पडला २ हातात सर्व संपत्ती येईल असे कार्य झाले आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुमच्या पायाना मिठी मारून तुमच्या प्रेमाची लूट केली आहे. ४

४२६८ दासीचा जो संग करी । त्याचे पूर्वज नर्का द्वारीं ॥ १ ॥
ऐसे सांगो जातां जना । नये कोणाचिया मना ॥ २ ॥
बरें विचारूनी पाहें । तुज अंतीं कोण आहे ॥ ३ ॥
तुका म्हणे रांडलेका । अंतीं जासिल यमलोका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा .– विचारूनी–विचार करून.

अर्थ – जो दासीशी सग करतो त्याचे पूर्वज नरकास जातात १ असे मी या सर्व लोकाना सागत असतो, पण ते कुणाच्याच मनात येत नाही. २ नीट विचार करून पाहा ना तुला शेवटी कुणाचा आधार मिळणार आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अरे राडेच्या लेका, तू शेवटी यमलोकास जाशील ना. ४

४२६९ गुळ सांडुनि गोडी घ्यावी । मीठ सांडुनि चवि चाखावी ॥ १ ॥
ऐसा प्रपंच साडुनि द्यावा । मग परमार्थ जोडावा ॥ २ ॥
साकरेचा नव्हे ऊंस । आम्हां कैंचा गर्भवास ॥ ३ ॥
बीज भाजुनि केली लाही । जन्ममरण आम्हां नाहीं ॥ ४ ॥
आकारासी कैंचा ठाव । देह प्रत्यक्ष जाला वाव ॥ ५ ॥
तुका म्हणे अवघें जग । सर्वा घटीं पांडुरंग ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – साडुनि–सोडून, वाव–व्यर्थ, घटीं–पदार्थात

अर्थ :– गूळ सोडून त्याची गोडी मात्र घ्यावी मीठ सोडून त्याची चव मात्र घ्यावी. १ याप्रमाणे प्रपंच सोडून परमार्थाचा लाभ करून घ्यावा २ साखरेचा पुन काही ऊस होत नाही त्याप्रमाणे आम्हाला पुनः गर्भवास कसा येणार ? ३ आम्ही आमचे जन्मबीज भाजून त्याची लाही केली असल्याने आम्हास जन्ममरण नाही ४ ज्या ठिकाणी प्रत्यक्ष देहच व्यर्थ झाला आहे त्या ठिकाणी त्याच्या आकाराला कसले स्थान आले आहे ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, या सर्व जगातील पदार्थात हा एक पाडुरग निवास करून आहे ६

४२७० आमुचे दंडवत पायांवरि डोई । व्हावे उतराई ठेवूनियां ॥ १ ॥
कराल तें काय नव्हे जी विठ्ठला । चित्त द्यावे बोला बोबडिया ॥ २ ॥
तुका म्हणे आम्ही लडिवाळें अनाथें । म्हणोनि दिनानाथें सांभाळावें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– डोई–डोकें.

अर्थ :– आम्ही आमचे डोके या श्रीहरीच्या पायावर ठेवून, त्याला दडवत घालून उतराई झालो आहोत १ विठ्ठला, तुम्ही मनात आणाल तर काय नाही होणार ? आमच्या बोबड्या बोलाकडे तुम्ही चित्त द्यावे. २ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही अनाथ असलो तरी लडिवाळ आहोत, म्हणून दीनानाथाने आम्हांस सामाळावे. ३

४२७१ भाग्यवंत आम्ही विष्णुदास जगीं । अभंग प्रसंगीं धैर्यवंत ।। १ ।।
नाहीं ते पुरवीत आणुनि जवळी । गाउनी माउली गीत सुखें ।। २ ।।
प्रीति अंगीं असे सदा सर्वकाळ । बोळली सकळ सुखें ठायीं ।। ३ ।।
आपुल्या स्वभावे जैसे जेथें असो । तैसे तेथें दिसो साजिरेचि ।। ४ ।।
वासनेचा कंद उपडिले मूळ । दुरिते सकळ निवारिलीं ।। ५ ।।
तुका म्हणे भक्तजनाची माउली । करील साउली विठ्ठल आम्हा ।। ६ ।।

शब्दार्थ व टीपा :– बोळलीं–प्राप्त झाली, दुरितें–पापे

अर्थ – आम्ही विष्णुदास या जगात मोठे भाग्यवत आहोत आणि प्रसगी भग न पावणारे धैर्यवान आहोत १ आम्ही या माऊलीचे गीत मोठ्या सुखाने गात असतो ही आई आमच्यासाठी नाहीत ते पदार्थ आणून जवळ देत असते. २ तिची आमच्यावर व आमची तिच्यावर सतत प्रीती असल्यामुळे सर्व सुखे आमच्या ठिकाणी प्राप्त झाली आहेत ३ आम्ही आमच्या स्वभावाप्रमाणे जिथे आहोत तिथे व तसे आहोत तेथेच आम्ही मोठे शोभून दिसतो ४ वासनेचा मूळ कद उपटून टाकलेला असल्याने सर्व पातके नाहीशी झाली आहेत. ५ तुकाराम महाराज म्हणतात, ही विठ्ठल माऊली सर्व भक्तलोकाची सावली आहे तीच आमच्यावर कृपेची सावली करीत आहे ६

४२७२ तीर्थे फळती काळें जन्में आगळिया । संतदृष्टी पाया हेळामात्रें ।। १ ।।
सुखाचे सुगम वैष्णवाचे पाय । अंतरींचा जाय महाभेव ।। २ ।।
काळें हि न सरे तपें समाधान । कथे मूढजन समाधिस्थ ।। ३ ।।
उपमा द्यावया सागता आणीक । नाहीं तिन्ही लोक धुंडाळिता ।। ४ ।।
तुका म्हणे मी राहिलो येणे सुखें । संतसगें दु खें नासावया ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा :– आगळिया–श्रेष्ठ प्रकारची, हेळामात्रें–क्षणमात्रात, महाभेव–मोठी भीती

अर्थ – श्रेष्ठ प्रकारची तीर्थस्थाने अनत काळाने, अनेक जन्माने फलद्रूप होतात पण सतदृष्टीचा लाभ होताच सर्व सुखे क्षणमात्रात प्राप्त होतात १ असे हे वैष्णवाचे पाय सुखाचे असून सुगम आहेत त्यांच्या दर्शनाने मनातील मोठी भीती नाहीशी होते २ अनेक काळपर्यंत तपश्चर्या केली तरी समाधान होत नाही परतु कथेमध्ये मात्र मूर्ख मनुष्यास सुद्धा हरिचिंतनात समाधी लागते ३ यासबधी उपमा द्यायची म्हटले तरी तीनही लोक धुडाळून पाहिले तरी ती सापडणार नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, मी या सतसगाच्या सुखाने दु खे दूर करण्यासाठी राहिलो आहे ५

४२७३ संतजना माझी यावया करुणा । म्हणउनी दीन हीन जालों ।। १ ।।
नेणे योग युक्ती नाहीं ज्ञान मति । गातसे या गीती पांडुरंगा ।। २ ।।
भाव भक्ती नेणे तप अनुष्ठान । करितो किर्तन विठ्ठलाचे ।। ३ ।।
ब्रह्मज्ञान ध्यान न कळे धारणा । एका नारायणा वाचूनिया ।। ४ ।।
तुका म्हणे माझा विठोबासी भार । जाणे हा विचार तोचि माझा ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा :- मति-बुद्धी, नेणे-जाणीत नाही.

अर्थ :- या सतलोकाना माझी करुणा यावी म्हणून मी अगदी हीन दीन होऊन गेलो आहे १ मी काही योग जाणीत नाही नाना युक्त्या जाणीत नाही. मला काही ज्ञान वा बुद्धीही नाही. तरी मी या पांडुरंगाचे नाम गीतांनी गात असतो २ मी भावभक्ती जाणीत नाही, जप, तप, अनुष्ठानही जाणीत नाही मी फक्त या विठ्ठलाचे कीर्तन करतो. ३ ध्यानधारणा मी करीत नसल्याने मला ब्रह्मज्ञानही समजत नाही या नारायणाशिवाय मला काहीच कळत नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझा सर्व भार या विठोबावर आहे तोच माझ्यासंबंधीचा विचार जाणतो. ५

४२७४ ऐसे काय उणें जालें तुज देवा । भावेंविण सेवा घेसी माझी ॥ १ ॥
काय मज द्यावा न लगे मुशारा । पहावें दातारा विचारुनि ॥ २ ॥
करितो पाखांडें जोडूनि अक्षरें । नव्हे ज्ञान खरें भक्तिरस ॥ ३ ॥
गुणवाद तुझे न बोलवे वाणी । आणिका छळणीं वाद सांगें ॥ ४ ॥
तरी आतां मज राखें तुझे पायीं । देखसोल कांहीं प्रेमरस ॥ ५ ॥
तुका म्हणे तुज हांसतील लोक । निष्काम सेवक म्हणोनिया ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा - मुशारा-वेतन, विचारुनि-विचार करून

अर्थ :- देवा, असे काय तुला कमी पडले ? म्हणून तू माझी सेवा भावाशिवाय असली तरी घेतोस ? १ या सेवेचा मोबदला (वेतन) मला काय द्यावा लागणार नाही ? तू एकदा विचार करून तर पाहा ना. २ मी अक्षरे जोडून पाखंडीपणा करतो माझ्याजवळ खरे ज्ञान नाही, की खरा भक्तिरसही नाही. ३ तुझे गुणवाद वाणीने न बोलता तुझ्यामाझ्यातील छळवादाचे प्रकारच मी इतराना सांगतो ४ देवा, असे असले तरी तू मला माझ्यातील थोडाफार प्रेमरस पाहून तुझ्यापायी आश्रय दे ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी तुझा सेवक जर काम न झालेला तसाच राहिलो तर तुला सर्व हसतील पाहा ६

४२७५ भोंदावया मीस घेऊनि संतांचे । करी कुटुंबाचे दास्य सदा ॥ १ ॥
मनुष्याचे परी बोले रावा करी । रंजवी नरनारी जगामध्यें ॥ २ ॥
तिमयाचा बैल करी सिकविले[1] । चित्रींचे बाहुले गोष्टी सांगे ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा जळो हे महंती । लाज नाहीं चित्तीं निसुगातें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- भोंदावया-फसविण्यासाठी, मीस-सोंग, निमित्त, रावा-पोपट, तिमयाचा बैल-नदीबैल, निसुगातें-कोडग्याला

अर्थ - लोकाना फसविण्यासाठी संताचा वेष घेऊन हा मनुष्य आपल्याच कुटुंबाचे दास्य नेहमी करीत असतो. १ ज्याप्रमाणे पिंजऱ्यामधील पोपट माणसाप्रमाणे बोलतो त्याप्रमाणे हा जगामध्ये स्त्रीपुरुषाचे मन रंजविण्यासाठी बडबड करीत असतो २ नदीबैल हा मालकाने शिकविल्याप्रमाणे करतो, अथवा कळसूत्री बाहुली शिकविल्याप्रमाणे हालचाल करते त्याप्रमाणे याचे असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या कोडग्याला कितीही सांगितले तरी त्याची लाज त्याला वाटत नाही. त्याच्या महतीस आग लागो ४

४२७६ अंगीं घेऊनियां वारें दया देती । तया भक्ता हातीं चोट आहे ॥ १ ॥
देव्हारा बैसोनि हालविती सुपें । ऐसीं पापी पापें लिंपताती ॥ २ ॥

---

[1] सांगितले

एकीबेकीन्यायें होतसे प्रचित । तेणे लोक समस्त भुलताती ॥ ३ ॥
तयाचे स्वाधीन दैवते[1] असती । तरी का मरती त्याचीं पोरे ॥ ४ ॥
तुका म्हणे पाणी अंगारा जयाचा । भक्त कान्होबाचा तो ही नव्हे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – प्रचित–अनुभव पाणी–तीर्थ

अर्थ – अंगात नाना प्रकारची क्षुद्र दैवते आणून जे लोकावर दया करतात अशा भक्ताच्या हातात काय थोट आहे ? १ उगाच दैवतांचे देव्हारे बसवून त्यावर सुपे हालवितात आणि शकुन सांगतात, यामुळे हे पापी पापाती अधिक लडबडले जातात २ लहान मुलाच्या एकीबेकीच्या खेळात जसे योगायोगाने डाव येतोजातो त्याचप्रमाणे याच्यामुळे एखाद्यास योगायोगाने अनुभव यतो आणि सर्व लोक पण त्यानाच भुलून जातात ३ अशा लोकांच्या स्वाधीन जर दैवते असती तर मग त्याची मुले का मरतात ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे लोकाना तीर्थ व अंगारे देऊन फसविणारे जे कुणी आहेत ते या कान्होबाचे भक्त नव्हेत ५

४२७७ कोणा एकाचिया पोरें केली आळी । ठावीं नाहीं पोळी मागे देखी ॥ १ ॥
बुझाविले हातीं देउनी खापर । छंद करकर वारियेली ॥ २ ॥
तैसे नको करूं मज कृपावंता । काय नाही सत्ता तुझे हातीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मायबापाचे उचित । करावे तें हित बाळकाचे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मागील अभंग क्र ३८०९ पाहावा

४२७८ पंढरपुरींचे दैवत भजावे । काया वाचा जावे शरण त्या ॥ १ ॥
मनीं ध्यान करी अहंता धरूनी । तया चक्रपाणी दूर ठेला ॥ २ ॥
मान अभिमान सांडुनिया द्यावे । अवघ्या नीच व्हावे तरी प्राप्त ॥ ३ ॥
तुका म्हणे हेंचि कोणासी सांगावें । सादर होउनि भावें भजें देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काया–शरीराने

अर्थ – शरीराने, वाणीने या पंढरपुरच्या दैवतास शरण जाऊन त्याची भक्ती करावी १ जो मनात अहंकार धारण करून या श्रीहरीचे ध्यान करतो तो चक्रपाणीपासून दूर राहातो २ यासाठी सर्व प्रकारचा मान, अभिमान सोडून, सर्वांपासून नीच होऊन त्याला शरण गल्यावरच तो प्राप्त होतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, जो देवाला मोठ्या आदराने भजतो त्यालाच हे सांगावे ४

४२७९ अधमाचे चित्त अहंकारीं मन । उपदेश शीण तया केला ॥ १ ॥
पापियाचे मन न करी आचार । विधवे शृंगार व्यर्थ केला ॥ २ ॥
— अधमाचे चित्त दुश्चित्त ऐकेना । वाया सीण मना करूं काय ॥ ३ ॥
गर्धवासी दिली चंदनाची उटी । केशर लल्हाटीं शुकराच्या ॥ ४ ॥
पतिवंचकेसी सांगता उदंड । परि तें पापांड तिचे मनीं ॥ ५ ॥
तुका म्हणे तैसे अभाविकां सांगता । वाउगाचि चित्ता[2] सीण होय ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – गर्धवासी–गाढवाला लल्हाटीं–कपाळावर शुकराच्या–डुकराच्या, वाउगा–व्यर्थ

१ देव ते २ चिंता

अर्थ :– अधम माणसाच्या चित्तात अहंकार फारच मोठा असतो त्याला कितीही उपदेश केला तरी त्याबद्दल शीण होऊन तो वायाच जातो १ विधवा बाईचा शृंगार जसा व्यर्थ असतो, त्याप्रमाणें पापी माणसाचे मन व्यर्थपणे आचार करते २ अधम माणसाचे मन दुष्ट असल्याने ते कधीच ऐकत नाही त्याचे मन वळविण्याचा शीण करू नये तो सर्व प्रयत्न वायाच जातो ३ गाढवाला चंदनाची उटी लावून काय उपयोग ? डुक्कराच्या कपाळावर केशराचा टिळा लावून काय उपयोग ? ४ आपल्या पतीला फसविणाऱ्या स्त्रीस कितीही उपदेश केला तरी तिला ते सारे पाखंडच वाटते ५ तुकाराम महाराज म्हणतात, त्याप्रमाणे जे कुणी अभाविक आहेत त्याना उपदेश करू जाता व्यर्थ शीण मात्र होतो ६

४२८० किती उपदेश करावा खळासी । नावडे तयासी बरें कांहीं ॥ १ ॥
शुद्ध हे वासना नाहीं चांडाळाची । होळी आयुष्याची केली तेणे ॥ २ ॥
नाहीं शुद्ध भाव नायके वचन । आपण्या आपण नाडियेले ॥ ३ ॥
तुका म्हणे त्यासी काय व्याली रांड । करितो बडबड रात्रदिस[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– खळासी–दुष्ट माणसास, नायके–ऐकत नाही

अर्थ :– या दुष्ट माणसास उपदेश तरी किती करावा ? त्याला काही चागले म्हणून आवडतच नाही १ अशा चांडाळाची वासना शुद्ध नसते त्यामुळे त्याने आपल्या आयुष्याची होळी केलेली असते २ याचा भाव शुद्ध नसतो; तो कोणाचेही चागले वचन ऐकत नाही आपल्या आपणाच तो नाडला जातो ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने रात्रदिवस व्यर्थपणे बडबड करणाऱ्या दुष्टास त्याच्या आईने, रांडेने व्यर्थच जन्म दिलेला असतो ४

४२८१ संत देखोनियां स्वयें दृष्टी टाळी । आदरें न्याहाळी परस्त्रीसी ॥ १ ॥
वीट ये कर्णांसी संतवाक्यामृता । स्त्रीशब्द ऐकतां निवे कर्ण ॥ २ ॥
कथेमाजी निज वाटे नित्यक्षणीं । स्त्रियेचे कीर्त्तनीं प्रेमें जागे ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्ही क्रोधासी न यावें । स्वभावा करावें काय कोणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कर्णांसी–कानाना

अर्थ:– समोर संत येत आहेत असे पाहाताच तो स्वत होऊन दृष्टी फिरवून घेतो, त्याच्याकडे पाहातही नाही पण दुसऱ्याची स्त्री समोर असेल तर मोठ्या आदराने व प्रीतीने तो तिला न्याहळून पाहातो १ संताच्या वाक्यामृताचा त्याच्या कानाना वीट येतो, पण कुणा सुंदर स्त्रीचे शब्द ऐकताच त्याचे कान निवतात २ श्रीहरीची कथा चालली असताना त्याला प्रत्येक क्षणाला झोप येत असते परंतु सुंदर स्त्रीच्या कीर्तनात मोठ्या प्रेमाने तो जागतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, यासाठी काही तुम्ही रागावू नये एकेकाच्या स्वभावाला कोण काय करणार ? ४

४२८२ मणि पडिला दाढेसी मकरतोंडीं । सुखें हस्तेंचि काढवेल प्रौढीं ॥ १ ॥
परि मूर्खाचे चित्त बोधवेना । दुर्धे कूर्मीच्या पाळवेल सेना ॥ २ ॥
सकळ पृथ्वी हिंडता कदाचित । ससींसिंगाची प्राप्त होय तेथें ॥ ३ ॥
अतिप्रयत्नें गाळितां वाळुवेते । दिव्य तेलाची प्राप्त होय तेथें ॥ ४ ॥
अतिक्रोधें खवळला फणी पाहीं । धरू येतो मस्तकीं पुष्पप्रायी ॥ ५ ॥
पहा ब्रह्मानंदेंचि एकीं हेळा । महापातकी तो तुका मुक्त केला ॥ ६ ॥

---

१ रात्रदीस.

शब्दार्थ व टीपा :– बोधवेना–उपदेश करता येणार नाही, कूर्मीच्या–कासवीच्या, ससी–सशाच्या, फणी–सर्प, हेळा–क्षणमात्रात.

अर्थ :– मगराच्या दाढेत अडकलेला मणी एखाद्या वेळी प्रौढीने स्वत:च्या हाताने सुखाने काढता येईल. १ परंतु मूर्खाच्या चित्तास बोध, उपदेश करता येणार नाही. कासवीच्या दुधावर सेनेचे पोषणही करता येईल २ सगळ्या पृथ्वीवर हिंडून कदाचित सशाच्या शिंगांची प्राप्ती होईल ३ अतिशय प्रयत्न केल्यास कदाचित वाळूस रगडून, गाळून तिच्या मधून दिव्य तेलाचीही प्राप्ती करून घेता येईल ४ अत्यंत क्रोधाने खवळलेला सर्पही प्रयत्न केल्यास फुलाप्रमाणे डोक्यावर धारण करता येईल. ५ तुकाराम महाराज म्हणतात, परंतु ब्रह्मानंदाच्या मुळे एका क्षणमात्रात महापातकीही मुक्त करता येईल ६

विवरण:– तुकाराम महाराजाच्या या अभंगावर राजा भर्तृहरीच्या प्रसिद्ध श्लोकाची छाप दिसते. उपनिषदे, गीता, पुराणे, ज्ञानेश्वरी, नाथभागवत इत्यादी ग्रंथांचे अध्ययन तुकोबाचे होते. त्याचप्रमाणे सुभाषिताचीही त्यांना माहिती असावी अनेक अशक्य गोष्टी करण्यात यश मिळेल, पण मूर्खाच्या चित्तास मात्र बोध करता येणार नाही, अशा अर्थाचे भर्तृहरीचे एकदोन श्लोक आहेत ते पुढीलप्रमाणे ' प्रसह्य मणिमुद्धरेन्मकरवक्त्रदंष्ट्रान्तरात् । समुद्रमपि संतरेत् प्रचलदूर्मिमालाकुलम् । भुजङ्गमपि कोपितं शिरसि पुष्पवद्धारयेत्– । न तु प्रतिनिविष्टमूर्खजनचित्तमाराधयेत् । , एक वेळ मगराच्या जबड्यातून, दाढेतून अडकलेले रत्न खेचून बाहेर काढता येईल, उसळलेल्या लाटांनी खवळलेला समुद्र पार करता येईल, चिडलेल्या सर्पाला फुलाप्रमाणे डोक्यावर घेता येईल, पण हेकट मनुष्याचे मन मात्र त्याला आपलेसे करता येणार नाही अशा भावार्थाच्या या श्लोकातील मकरदाढेत अडकलेला मणी, चिडलेला सर्प ही दोन उदाहरणे तुकोबानी या अभंगात घेतलेली दिसतात. उरलेली दोन त्यांनी भर्तृहरीच्या आणखी एका श्लोकावरून घेतली असावीत. तो श्लोक असा, ' लभेत सिकतासु तैलमपि यत्नत. पीडयन् । पिबेच्च मृगतृष्णिकासु सलिलं पिपासार्दितः । कदाचिदपि पर्यटञ्शशविषाणमासादयेत्– । न तु प्रतिनिविष्टमूर्खजनचित्तमाराधयेत्– ' प्रयत्न केल्यास वाळू पिळून, रगडून, तेलही काढता येईल. तहानेने व्याकुळ झालेला मनुष्य मृगजळापासून तहान भागवील, पृथ्वीच्या पाठीवर भटकून सशाचे शिंगही मिळेल परंतु हेकट माणसाच्या चित्तास मात्र बोध करता येणार नाही. अशा भावार्थाच्या श्लोकातून तुकोबानी वाळूपासून तेल, सशाची शिंगे ही दोन उदाहरणे घेतलेली दिसतात कित्येक अशक्य गोष्टी शक्य होतील पण मूर्खाची समजूत पाडणे कठीण, अशा अर्थाचे मूळचे भर्तृहरीचे श्लोक पण यास तुकोबाची जोड अशी की, मूर्खाचा, महापातकी माणसाचा उद्धार करण्यासाठी एकमात्र साधन आहे. ते म्हणजे नामसंकीर्तनाचे, प्रभुचिंतनाचे, त्यापासून होणाऱ्या ब्रह्मानंदाचे

४२८३ भोळे भाविक हे जुनाट चांगले । होय तैसें फेलें भक्तिभावें ॥ १ ॥
म्हणउनि चिंता नाहीं आम्हां दासां । न भ्यों गर्भवासा जन्म घेतां ॥ २ ॥
आपुलिया इच्छा करूं गदारोळ । भोगूं सर्वकाळ सर्व सुखें ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हां देवाचा सांगात । नाहीं विसंबत येर येरां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– नभ्यों–भय नाही, गदारोळ–गर्जना, सागात–सोबत.

अर्थ – हे दैवत मोठे चांगले, भोळे, भाविक व प्राचीन असे असून भक्तिभावाने त्याचे जतन करावे असे आहे. १ म्हणून आम्हा दासाना कसलीच चिंता नाही आणि अनेक गर्भवास घेण्याचेही भय आम्हास नाही. २ आम्ही आपल्या इच्छेप्रमाणे हरिनामाची गर्जना करू आणि सर्वदा त्याचेच सुख भोगू ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांस या देवाची सोबत सतत असून आम्ही एकमेकाना कधीही विसंबत नाही. ४

४२८४ आतां तरी माझी परिसा विनंती । रखुमाईच्या पति पांडुरंगा ॥ १ ॥
चुकलिया बाळा न मारावें जीवें । हित तें करावें मायबापीं ॥ २ ॥
तुका म्हणे तुझा म्हणताती मज । आतां आहे लाज हेचि तुम्हां ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – परिसा–ऐका

अर्थ – रखुमाईच्या पती पाडुरगा आता तरी तुम्ही माझी ही विनती ऐकावी १ आपले लहान बाळ जर चुकले तर त्याला जीव जाईपर्यंत मारू नये त्याच्या हिताचे असेल तेच मायबापानी करावे २ तुकाराम महाराज म्हणतात, मला तुझा म्हटले जाते आता यासबधीची लाज देवा, तुम्हासच आहे ३

४२८५ नाहीं बळयोग अभ्यास कराया । न कळे ते क्रिया साधनाची ॥ १ ॥
तुझिये भेटीचें प्रेम अतरगीं । नाहीं बळ अगीं भजनाचें ॥ २ ॥
काय पाडुरगा करू बा विचार । झुरतें अतर भेटावया ॥ ३ ॥
तुका म्हणे सांगा वडिलपणे बुद्धी । तुजविण दयानिधी पुसों कोणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – अतर–मन, अत करण

अर्थ – देवा योगाभ्यास करण्याविषयी आम्हास पुरेसे बळ नाही नाना साधनांच्या क्रिया कशा करायच्या तेही आम्हास समजत नाही १ तुझ्या भेटीचे प्रेम मात्र आमच्या अतरगात मोठेच आहे परतु तुझे भजन करण्याची शक्ती मात्र अगात नाही २ पाडुरगा, तुझ्या भेटीसाठी माझे चित्त फार झुरते आहे याचा विचार तरी काय रे करावा ? ३ तुकाराम महाराज म्हणतात दयानिधी तुम्ही मला वडीलपणाची बुद्धी सांगा ना तुमच्याशिवाय मी कुणास विचारावे ? ४

४२८६ जिहीं तुझी कास भावें धरियेली । त्याची नाहीं केली साड देवा ॥ १ ॥
काय माझा भोग आहे तो न कळे । सुखें तुम्ही डोळे झांकियेले ॥ २ ॥
राव रक तुज सारिखेचि जन । नाहीं थोर लहान तुजपाशीं ॥ ३ ॥
तुका म्हणे मागें आपगिले भक्ता । माझिया सचिता कृपा नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मागील अभगक्रमाक ४१११ पाहावा

४२८७ कोणतें कारण राहिले यामुळें । तें म्यां तुज बळें कष्टवावे ॥ १ ॥
नाहीं जात जीव नाहीं होत हानि । सहज तें मनीं आठवले ॥ २ ॥
नाहीं चिंता काही मरतो उपासी । अथवा त्या म्हैसी गाई व्हाव्या ॥ ३ ॥
हें तो तुज कळो येतसे अतरीं । लापणीक वरी साच भाव ॥ ४ ॥
तुका म्हणे देवा नासिवतासाठी । पापासवें तुटी परिती तुझ्या ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मागील प्रथम खडातील अभगक्र ६८६ पाहावा

४२८८ पहावया तुझा जरि बोले अत । तरि माझे जात डोळे देवा ॥ १ ॥
स्तबीं[1] तुज नाहीं घातले प्रल्हादें । आपुल्या आनदें अवतार ॥ २ ॥
भक्ताचिया काजा जालासी सगुण । तुज नाहीं गुण रूप नाम ॥ ३ ॥
ऐसा कोण देवा अधम यातीचा । निर्धार हा साचा नाहीं तुझा ॥ ४ ॥
तुका म्हणे बोले कवतुके गोष्टी । नेदी येऊ पोटीं राग देवा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अत–शेवट, काजा कामासाठी, साचा–खरा

अर्थ – देवा, तुझा शेवट झाला असे जरी कुणी बोलले तरी माझे डोळे जातील १ स्तभामध्ये तुला प्रल्हादाने घातले नाही, तर तूच आपल्या आनदासाठी प्रकट होऊन अवतार धारण केलास २ आपल्या भक्ताच्या

१ स्तभी

कामासाठी तू सगुण झालास ए हवी तुला गुण, रूप नाम यापैकी काही नाही ३ देवा, तुझ्या अंताविषयी बोलणारा असा अधम जातीचा आहे तरी कोण ? हा काही तुझा निर्धार खरा नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्ही कौतुकाने या गोष्टी बोलतो तुला याचा राग येऊ नये ५

४२८९ प्रगट व्हावे हे अज्ञानवासना । माझी नारायणा हीनबुद्धि ॥ १ ॥
खाणीवाणी होसी काष्टीं तूं पाषाणीं । जतु जीवाजनीं[1] प्रसिद्ध हा ॥ २ ॥
ज्ञानहीन तुज पाहें अल्पमति । लहान हा चित्तीं धरोनिया ॥ ३ ॥
परि तूं कृपाळ होसी देवराणा । ब्रिदें तुझीं जना प्रसिद्ध हे ॥ ४ ॥
उतावीळ बहु भक्ताचिया काजा । होसी केशीराजा तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – काजा–कामासाठी

अर्थ :– नारायणा माझी हीन बुद्धी व अज्ञानाची वासना दूर होण्यासाठी तू प्रकट व्हावेस १ देवा, तू खाणीवाणीत, कष्टात, पाषाणात, जीवजंतूत असल्याचे प्रसिद्ध आहे २ मी ज्ञानहीन असून मी माझ्या अल्पमतीने तुझ्याकडे पाहात आहे तुला लहान समजून मी माझ्या चित्तात धरून ठेवीत आहे ३ पण देवराणा तू कृपाळू आहेस याविषयीची तुझी ब्रीदे लोकात प्रसिद्ध आहेत ४ तुकाराम महाराज म्हणतात, केशीराजा, तू भक्तांची कामे करण्यासाठी फारच उतावीळ बनला आहेस ५

४२९० जरी तुझा मज नसता आधार । कैसा हा संसार उन्हावता ॥ १ ॥
ऐसा बळी कोण होईल पुरता । जो हे वारी चिंता आशापाश ॥ २ ॥
मायामोहफासा लोकलाजबेडी । तुजवीण तोडी कोण एक ॥ ३ ॥
हें तो मज कळो आले अनुभवें । बरें माझ्या जीवें पाडुरंगा ॥ ४ ॥
तुका म्हणे यास तूचि माझा ग्वाही । पुरि भाव नाहीं जना[2] लोका ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – ग्वाही–साक्षीदार

अर्थ – देवा तुझा आधार जर मला नसता तर मग हा संसार मला कसा दुरावला असता ? १ माझी इच्छा पुरविणारा असा हा बलवान तुझ्याशिवाय कोण आहे ? माझी चिंता व आशापाश दूर करणारा कोण आहे ? २ माया, मोह, आशापाश, बेडी लोकलाज याना तुझ्याशिवाय कोण तोडणार ? ३ पांडुरंगा, हे मला अनुभवाने फार चांगल्या रीतीने कळून आले आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, या सर्वांस तूच माझा साक्षीदार आहेस जन-लोकात पुरा भाव याविषयी नाही ५

४२९१ तुजविण चाड आणिकाची काहीं । धरीन हें नाहीं तुज ठावे ॥ १ ॥
तरणउपाय योगक्षेम माझा । ठेवियेला तुझ्या पायीं देवा ॥ २ ॥
कोण मज आळी काय[3] हे तातडी । सोनियाची घडी जाय दिस ॥ ३ ॥
तुझिया नामाचे ल्यालोसे भूषण । कृपा संतजन करितील ॥ ४ ॥
तुका म्हणे जाला आनंदाचा वास । हृदया या नास नव्हे कधी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–इच्छा, आळी–हट्ट, घडी–वेळ, नास–नाश

१ जीवजनी, २ जनलोका, ३ मोण

अर्थ .- देवा, तुझ्याशिवाय आम्हास दुसऱ्या कशाचीच इच्छा नाही, हे तुलाही माहीत आहे १ देवा, माझा तरणोपाय, योगक्षेम सर्व काही तुझ्याच पायावर ठेवलेले आहे २ मा । हट्ट तो काय, तातडी तरी काय, पण सोन्याची ही वेळ व हा दिवस जात आहे ३ मी तुझ्या नामाचे भूषण ल्यालो असून माझ्यावर हे सतजन कृपा करतील. ४ तुकाराम महाराज म्हणतात, या माझ्या हृदयात आता आनंदाचा निवास झाल्यामुळे या सुखाचा कधीच नाश होणार नाही ५

४२९२ हेंचि सुख पुढें मागतों आगळें । आनंदाचीं फळें सेवादान ॥ १ ॥
जन्मजन्मांतरीं तुझाचि अंकिला । करूनि विठ्ठला दास ठेवीं ॥ २ ॥
दुजा भाव आड येऊं नेदीं चित्ता । करावा अनंता नास त्याचा ॥ ३ ॥
अभय देऊनि करावें सादर । क्षण तो विसर पडो नेदीं ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही जेजे इच्छा करूं । ते ते कल्पतरु पुरविसी[1] ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आगळें–श्रेष्ठ प्रकारचे

अर्थ – देवा, आमच्या सेवादानाच्या आनंदाची फळे मिळावीत याच श्रेष्ठ प्रकारच्या सुखाची मी मागणी करीत आहे १ विठ्ठला, जन्मजन्मातरी मी तुझाच दास व सेवक बनून राहिलो आहे २ अनंता, माझ्या चित्तात तुझ्या शिवाय दुसरा भाव येऊ देऊ नकोस जर आला तर त्याचा नाश करावास ३ मला अभय देऊन मोठ्या आदराने तुझा विसर कधीही पडू देऊ नकोस ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही ज्याची ज्याची इच्छा करितो ते ते तू कल्पतरू होऊन पुरवतोस ५

४२९३ तुज केलिया नव्हे ऐसें काई । डोंगराची राई क्षणमात्रें ॥ १ ॥
मज या लोकांचा न साहे आघात । देखणे प्रचित जीव घेती ॥ २ ॥
सहज विनोदें बोलियेलों गोष्टी । आरंभी तो पोटीं न धरावी ॥ ३ ॥
दीनरूप मज करावें नेणता । याहूनी अनंता आहें तैसा ॥ ४ ॥
तुका म्हणे जेणें मज तूं भोगसी । ते करीं जनासी चाड नाहीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – राई–मोहरी, चाड–गरज

अर्थ – देवा, तू केल्याने होत नाही असे काय आहे ? तू एका क्षणात डोंगराची मोहरी करतोस १ मला आता या लोकाचा आघात सहन होत नाही हे माझा जीव घेतात असा अनुभव येतो २ मी प्रथम ज्या गोष्टी बोललो त्या सहज व विनोदाच्या होत्या त्या तुम्ही मनावर घेऊ नयेत ३ तुम्ही मला दीन रूपाचा व नेणता करू नये त्यापेक्षा मी आहे तसाच बरा आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्या योगे तू माझे प्रेम भोगशील असे कर मला इतर लोकाची गरज काहीही नाही ५

४२९४ ऐसा सर्व भाव तुज निरोपिला । तूं मज एकला सर्वभावें ॥ १ ॥
अंतरींची का हे नेणसील गोष्टी । परि सुखासाठीं बोलविसी ॥ २ ॥
सर्व माझा भार तुज चालवणे । तेथें म्या बोलणे काय एक ॥ ३ ॥
स्वभावें स्वहित हिताचें कारण । कौतुक करून निवडिसी ॥ ४ ॥
तुका म्हणे तूं हें जाणसी गा देवा । आमुच्या स्वभावा अंतरींच्या ॥ ५ ॥

---

१ पुरवावे

शब्दार्थ व टीपा – अतरींची-अत करणातील, कारण-कार्य

अर्थ – देवा याप्रमाणे मी माझ्या मनातील सर्व भाव तुला सागितला कारण सर्व भावाने तूच मला एकटा आहेस १ तू माझ्या अत करणातील गोष्ट जाणीत का नाहीस ? पण प्रेमसुखासाठी तू मला बोलते करतोस २ माझा सर्व भार देवा तुलाच घालवावयाचा आहे अशा ठिकाणी मी काय बोलावे ? ३ स्वभावत च आपण हिताचे कार्य करीत असतो तू ते कौतुक करून निवडतोस ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू आमच्या अतरीच्या स्वभावाला जाणतोस ५

४२९५ लोखडाचे न पाहे दोष । शिवोन परीस सोने करी ॥ १ ॥
जैसी तैसी तरी वाणी । मना आणी माउली ॥ २ ॥
लेकराचे स्नेहे गोड । करी कोड त्यागुणे ॥ ३ ॥
मागें पुढें रिघे लोटी । साहे खेटी करी तें ॥ ४ ॥
तुका विनवी पाडुरगा । ऐसे सागा आहे हें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड-कौतुक

अर्थ – परीस हा लोखडाचे गुणदोष न पाहाताच त्याचे सोने करून टाकतो १ त्याप्रमाणे माझी वाणी कसली जरी असली तरी माऊली, तू ती मनात आणू नकोस २ लेकराचा स्नेह तिला गोड वाटतो त्यामुळेच ती त्याचे कोडकौतुक करीत असते ३ ती मागे पुढे त्याला लोटते, त्याच्यासाठी हेलपाटे खाते ४ तुकाराम महाराज म्हणतात, पाडुरगा, असे हे आहे ते सागा अशी विनती आहे ५

४२९६ पर्वकाळीं धर्म न करी नासरी । खर्ची राजद्वारीं द्रव्यरासी ॥ १ ॥
सोइऱ्यासी करी पाहुणेर वरा । काडवी[1] ठोबरा सतालागीं ॥ २ ॥
बाइलेचीं[2] सर्व आवडीनें पोसी । मातापितरासी दवडोनी ॥ ३ ॥
श्राद्धीं कष्टी होय मागता ब्राह्मण । गोवार मागून सावडीतो ॥ ४ ॥
नेतो पानें फुले वेश्येला उदड । ब्राह्मणासी खाड नेदी एक ॥ ५ ॥
हातें मोऱ्या शोधी कष्ट करी नाना । देवाच्या पूजना कटाळतो ॥ ६ ॥
साग वेळ धदा करिता श्रमेना । साधूच्या दर्शना जाता कुथे ॥ ७ ॥
हरिच्या कीर्तनीं गुगायासि लागे । येरवीं तो जागे उगलाचि ॥ ८ ॥
पुराणीं बैसता नाहीं रिकामटी । खेळतो सोगटी अहोरात्रीं ॥ ९ ॥
देवाच्या विभुती न पाहे सर्वथा । करी पानवथा नेत्रभिक्षा ॥ १० ॥
गाईला देखोनी बदबदा मारी । घोडयाची चाकरी गोड लागे ॥ ११ ॥
ब्राह्मणाचे तीर्थ घेता त्रास मोटा । प्रेमें घेतो घोंटा घटघटा ॥ १२ ॥
तुका म्हणे ऐसे प्रपचीं गुतले । जन्मोनि मुकले विठोवासी ॥ १३ ॥

शब्दार्थ व टीपा – नासरी अर्धी दमडी पाहुणेर-पाहुणचार, गोवार-शेणकाला, उगलाचि-स्वस्थ बसून, रिकामटी-वेळ नाही, पनवथा-पाणवठा

अर्थ – हे लोक कसे आहेत पाहा पर्वकाळ आला तरी अर्धी दमडीसुद्धा हा धर्मासाठी खर्च करणार नाही पण राजाच्या द्वारी मात्र त्याची कृपा व्हावी म्हणून नजराण्यासाठी द्रव्याच्या राशी उभ्या करतो १ सोयऱ्यांना

१ काडितो, काडिता, २ बईलेच्या गोता आवडीन

चांगला पाहुणचार करतो. पण संत दारांत पाहाताच हा दडगा काढतो ३ बायकोच्या नात्याची सर्व माणसे हा पोसतो. पण त्याचवेळी आईबापांना मात्र सोडून देतो. ३ वाडवडिलांच्या श्राद्धाच्या दिवशी ब्राह्मण सांगताना याला फार कष्ट होतात. पण शेणकला टाकून घर मात्र स्वच्छ करतो. अथवा सर्व गोवऱ्या गोळा करून ठेवतो. ४ वेश्येसाठी पानेफुले हा पुष्कळ नेतो. पण ब्राह्मणाला मात्र सुपारीचे एक खांडही देत नाही कधी ५ मोऱ्या धोधून हा हातांनी फारच कष्ट करतो, पण देवाच्या पूजेस मात्र कंटाळतो. ६ सदा सर्वकाळ धंदा करताना याला कधी श्रम वाटत नाहीत, पण साधूच्या दर्शनास जातांना मात्र हा तक्रार करतो. ७ श्रीहरीचे कीर्तन सुरू झाले की याला झोपेची गुंगी येते. पण एऱ्हवी मात्र उगाच स्वस्थपणे जागत बसतो. ८ पुराणास बसण्याच्या वेळी मला वेळ नाही, मी रिकामटेकडा नाही असे म्हणतो, पण घरी मात्र रात्रंदिवस सोंगट्या खेळत बसतो. ९ देवाच्या नाना विभूती हा कधी पाहणार नाही, पण पाणवठ्यावर जाऊन मात्र डोळ्यांनी स्त्रियांकडे पाहातो. १० गरीब गाईला पाहून हा तिला बदाबदा मारतो, पण मालकाच्या घोड्याची चाकरी मात्र याला बरी वाटते. ११ ब्राह्मणाच्या पायाचे तीर्थ घेताना याला मोठाच त्रास वाटतो. पण घोट्याचे प्राशन मात्र हा घटाघटा करतो. १२ तुकाराम महाराज म्हणतात, असे जे कुणी प्रपंचात गुंतले आहेत ते जन्मास येऊन विठोबाला मुकतात. १३

४२९७ आपुल्या पोटासाटीं लोकांची प्रौढी वाणी । संतांची वदनीं निंदा करी ॥ १ ॥
पोटा घातलें जेणें अन्न । न म्हणे पतितपावन ॥ २ ॥
जेणें घातलें संसारीं । विसरला तया हरी ॥ ३ ॥
मी कोठील आणि कोण । हें न कळे जयालागून ॥ ४ ॥
तुका म्हणे नरस्तुती । करितो भाट त्रिजगतीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– थोडयाफार फरकाने मागील अभंगक्रमांक ४११४ पाहावा.

४२९८ आम्ही रामाचे राऊत । वीर झुंझार बहुत ॥ १ ॥
मनपवनतुरंग । हातीं नामाची फिरंग ॥ २ ॥
वारू चालवूं चहूंखुरीं । घाला घालूं यमपुरी ॥ ३ ॥
तुका म्हणे पेणें । आम्हां वैकुंठासी जाणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– राऊत–घोडेस्वार, शिपाई, मनपवनतुरंग–वाऱ्यासारखे वेगवान मन हाच घोडा, फिरंग–पोलादी तलवार, वारू–घोडा, पेणें–मुक्काम.

अर्थ:– आम्ही या श्रीरामाचे फार झुंजार असे वीर शिपाई आहोत. घोडेस्वार आहोत १ वाऱ्याप्रमाणे वेगवान असणाऱ्या मनाचा घोडा करून आम्ही नामरूपी खड्ग हाती धारण केले आहे. २ आम्ही हा घोडा आता चौखुरांनी चालवू व यमाच्या नगरावर हल्ला चढवू. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांला वैकुंठीच्या मुक्कामावर पोचावयाचे आहे ४

४२९९ पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास घेती[1] जन्म ॥ १ ॥
कर्मधर्म त्याचे जाला नारायण । त्याचेनी पावन तिन्ही लोक ॥ २ ॥
वर्णअभिमानें कोण जाले पावन । ऐसें द्या सांगून मजपाशीं ॥ ३ ॥
अंत्यजादि योनि तरल्या हरिभजनें । तयाचीं पुराणें भाट जालीं ॥ ४ ॥
वैश्य तुळाधार गोरा तो कुंभार । धागा हा चांभार रोहिदास ॥ ५ ॥

---

१ जन्म घेती.

कबीर मोमीन लतिफ[1] मुसलमान । सेना न्हावी जाण विष्णुदास ॥ ६ ॥
कान्होपात्र[2] खोदु पिंजारी तो दादु । भजनीं अभेदू हरिचे पायीं ॥ ७ ॥
चोखामेळा बंका जातीचा माहार । त्यासी सर्वेश्वर ऐक्य करी ॥ ८ ॥
नामयाची जनी कोण तिचा भाव । जेवी पंढरीराव तियेसवें ॥ ९ ॥
मैराळा जनक कोण कुळ त्याचें । महिमान तयाचें[3] काय सांगों ॥ १० ॥
यातायातीधर्म नाहीं विष्णुदासा । निर्णय हा ऐसा वेदशास्त्रीं ॥ ११ ॥
तुका म्हणे तुम्ही विचारावे[4] ग्रंथ । तारिले पतित नेणों किती ॥ १२ ॥

शब्दार्थ व टीपा – पावन–पवित्र, योनि–जाति, मोमीन–कोष्टी, यातायाती–जातीजातीमधील भेद, विषमता, विचारावें–विचार करून पाहावा

अर्थ – ज्या ठिकाणी श्रीहरीचे दास जन्म घेतात ते स्थान व ते कुळ अतिशय पवित्र असते १ या वैष्णवाचे सर्व कर्मधर्म एक नारायणच बनलेला आहे त्यामुळे तीनही लोक पवित्र होऊन गेले आहेत २ वर्णांचा अभिमान धरून कोण पवित्र झाले आहे, ते मला सांगा पाहू ३ उलट हरिभजनामुळे अंत्यजादी जाती मात्र तरून गेल्या आणि त्याची कीर्ती पुराणांनीही गाइली आहे ४ सत्यत्वाने वागणारा तुळाधार वैश्य व गोरोबा नावाचा कुंभार, जोडे शिवणारा रोहिदास चांभार इत्यादी अंत्यज हरिनामाने तरले ५ मुसलमान कोष्टी कबीर, मुसलमान लतीफ आणि न्हाव्यांमधील सेना असे हे सर्व विष्णुदास बनले आहेत ५ कान्होपात्रा नावाची एक नायकीण, खोद नावाचा हिजडा, दादू नावाचा एक पिंजारी, या श्रीहरीचे भजन करून हे हरीच्या पायी अभेदरूपाने राहिले ७ चोखामेळा आणि बंका हे महार पण त्यांच्याशीही सर्वेश्वर श्रीहरीने एकरूपता स्वीकारली ८ जनाबाई ही नामदेवाची दासी, पण तिचा केवढा भाव ! तिच्या बरोबर प्रत्यक्ष पंढरीराव जेवण करीत असे ९ मैराळ जनक या नावाचा एक भक्त त्याचे कुळ कोणते हेही माहीत नाही पण त्याचे माहात्म्य काय सांगावे ? १० यावरून असे दिसते की जातींचा धर्म, जातिभेदाचा भाव विष्णुदासात नसतो. असा निर्णय वेदशास्त्रानीच केलेला आहे ११ तुकाराम महाराज म्हणतात, या हरिनामाने किती पातकी तरून गेले हे काही समजत नाही, पण यासबंधी तुम्हीच नीट ग्रंथ पाहून विचार करावा १२

विवरण – श्रीहरीच्या भक्ताना जातीशी काही काम नाही, ते एकदा हरिनामात मग्न झाले की त्यांची जात हीन असली तरी तिची बाधा त्याना होत नाही हा एक प्रमुख विचार भागवतधर्मीय संतानी प्रसारित केल्याचे आपण मागे अनेकदा पाहिले आहे 'जातीपाँती पूछ नहिं कोई। हरिको भजे सो हरिका होई' असे कबीरदासानी म्हटले आहे. श्रीहरीच्या भक्ताची जात हरिभक्त हीच होय तुका म्हणे नाहीं जाती सवे काम । ज्याचे मुखीं नाम तोचि धन्य' असे तुकोबानी म्हटले आहे वरील अभंगात तुकोबानी अंत्यज साधुसंताची एक यादीच देऊन त्यांच्या हीन यातीचा प्रतिबंध कसा होत नाही, ते हरिभक्त म्हणून कसे एक आहेत यासबंधी तपशीलवार वर्णन केले आहे. ज्या कुळात हरिदास जन्मास येतात ते कुळ, ते स्थान एकदम पावन होऊन जाते 'अंत्यजादि योनि तरल्या हरिभजने.' म्हणून त्यानी तुळाधार वैश्य, लतिफ मुसलमान, सेना न्हावी, वेश्या कान्होपात्रा, पिंजारी दादू महार चोखा, दासी जनी, मैराळ जनक इत्यादींची यादी दिलेली आहे यापैकी प्रत्येकाची जात निराळी आहे धंदा वेगळा आहे आणि काहीचे पूर्वकर्मही निराळे आहे पण यांच्यात एक समान धागा हरिभक्तीचा आहे तेवढ्या आधारावर त्यांच्यातील भेद संपलेला आहे

पूर्वजन्मात काही विपरीत घडले तर पश्चात्तापाने व हीन यातीत जन्म झाल्यास सत्संगाने आणि हरिभक्तीने पूर्वकर्माचे व जातीचे बंधन संपते हा दिलासा प्रथम भगवद्गीतेत दिला मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः । स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम्' जन्म जरी पापयोनीत झाला असला तरी व स्त्रिया, वैश्य

१ लतीब, २कान्होपात्रा, ३ नामाचे, ४ विवरव

शूद्र असा भेद असला तरी माझा आश्रय करतात त्याना श्रेष्ठ गती प्राप्त होते हा गीतेचा आधार आहे 'म्हणोनि कुळ जाति वर्ण। हे आघवेंचि गा आकरण। एथ अर्जुना माझेपण। सार्थक एक।' असा निर्णय ज्ञानदेवानी दिलेला आहे 'तैसे क्षत्री वैश्य स्त्रिया। का शूद्र अंत्यजादि इया। जाती तवचि वेगळालिया। जव न पवती मातें' असे स्पष्टपणे मार्गदर्शन ज्ञानेश्वरानी केले आहे आणि तुकोबानी हाच धागा आपल्या विचारानी परिपुष्ट केलेला दिसतो श्रीहरीच्या प्रेमात दंग झाल्यावर जातीचे भान कुणास राहाणार ? 'विसरल्या आम्ही कोणीये जातीच्या। वर्णही बहूच्या एक जाल्या' असे गोपीच्या मुखातून तुकोबानी वदविले आहे 'जिही म्हणविले हरिचे अंकित। जातीचे ते होत कोणी तरी' असा त्याचा या बाबतीतील निर्णय आहे 'उत्तम त्या याती। देवा शरण अनन्य गति' अनन्य भावाने देवास शरण गलेल्या सव जाती उत्तम होत आपल्याकडील चोखा महाराचे अभंग या दृष्टीने पाहाण्यासारखे आहेत वरील अभगात उल्लेख असलेला रोहिदास अथवा रैदास चाभार सत पण त्याचाही अनुभव 'नीचेसे प्रभु उच किओ है, कह रविदास चमार' असाच आहे

४३०० नामासारिखी करिणी। हे तो न दिसे त्रिभुवनीं ॥ १ ॥
सिलंगणीचे सोनें। ठेवू नये ते गाहाण ॥ २ ॥
आदित्याचीं झाडें। काय त्याचा उजड पडे ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा। ब्रिदें सोडोनिया ठेवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – थोडयाफार फरकानें मागील अभंगक्रमांक ४१९५ पाहावा

४३०१ येऊनि ससारा काय हित केलें। आयुष्य नासिलें शिश्नोदरा ॥ १ ॥
विषय सेविता कोण तृप्त जाला। इधनीं निवाला अग्नि कोठें ॥ २ ॥
देखोनी मृगजळ भावावलीं वेडीं। विचाराची थडी न टाकिती ॥ ३ ॥
ऐसिया जीवासी सोय न लाविसी। निष्ठुर का होसी कृपाळुवा ॥ ४ ॥
तुका म्हणे देवा अगाध पै थोरी। सर्वांचे अंतरीं पुरलासी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – शिश्नोदरा–विषयवासना व पोटाची भूक, इधनीं–जळणानें, थडी–तीर

अर्थ – या मानवी जन्मास येऊन या जगात काय हित साधले ? सव आयुष्य विषयवासना व पोटाची भूक शमविण्यात नष्ट केले १ विषयाचे सेवन करून कोण तृप्त झाला आहे ? इंधनाच्या साहाय्याने अग्नी कधी तृप्त होतो काय ? २ मृगजळ पाहून वेडे प्राणी धावावून जातात, नीट विचार करून पैलतीरावर जात नाहीत ३ अशा जीवाची सोय देवा, तू का लावत नाहीस ? कृपाळू देवा तू निष्ठुर का होतोस रे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमची थोरवी अगाध आहे तू सर्वांच्या अंतःकरणात निवास करून राहिला आहेस ५

४३०२ समर्थाचे सेवे बहु असे हित। विचार हृदयात करुनी पाहे ॥ १ ॥
वरकडाऐसा नव्हे हा समर्थ। क्षणेंचि घडित सृष्टी नासे ॥ २ ॥
ज्याची कृपा होता आपणा ऐसे करी। उरों नेदी उरी दारिद्राची ॥ ३ ॥
ऐशालागीं मन चोळगें अहर्निशी। तेणे वश्य होशी ब्रह्मादिका ॥ ४ ॥
तुका म्हणे हेंचि आहे पै मुद्दल। सत्य माझा बोल हाचि माना ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वरकडाऐसा–इतरासारखा किरकोळ चोळगें–वळतें

अर्थ – या समर्थ श्रीहरीच्या सेवेत फारच हित आहे नीट यासबंधी मनात विचार करून पाहा १ हा समर्थ इतरासारखा किरकोळ नाही तो एका क्षणात सारी सृष्टी रचतो वा तिचा नाशही करू शकतो २ याची

कृपा झाली की हा आपल्या भक्तांना आपणांसारखे करतो. त्यांचे दारिद्र्य उरू देत नाही. ३ अशा या श्रीहरीकडे रात्रंदिवस मन वळते. त्यामुळे ब्रह्मादिकांनाही वंदनीय होता येते ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्हांला हेच एक मुद्दल आहे. माझे हे बोलणे तुम्ही सत्य माना. ५

४३०३ पिकलियें[1] सेंदे कडुपण गेलें । तैसें आम्हां केलें पांडुरंगें ॥ १ ॥
काम क्रोध लोभ निमाले ठायींचि । सर्व आनंदाची सृष्टि जाली ॥ २ ॥
आठव नाठव गेले भावाभाव । जाला स्वयमेव पांडुरंग ॥ ३ ॥
तुका म्हणे भाग्य या नांवें म्हणीजे । संसारीं जन्मीजे याचि लागीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सेंदें–शेंदाड फळ.

अर्थ :– शेंदाड फळ एकदा पिकले की त्याचे कडूपण जाते. त्याप्रमाणे आमची स्थिती या पांडुरंगाने केली आहे. १ आमच्या ठिकाणी असणारे काम, क्रोध इत्यादी विकार जागच्या जागी विरून गेले. म्हणून आम्हांस सर्व सृष्टीच आनंदमय होऊन गेली आहे. २ लौकिक प्रपंचाविषयी आठव अथवा नाठव, त्याविषयी भाव अथवा अभाव हे सर्व तो पांडुरंग स्वतःच बनून गेला आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या स्थितीलाच भाग्याची स्थिती म्हणतात, यासाठीच या संसारात जन्म घ्यावा ४

४३०४ येऊनि नरदेहा विचारावें सार । धरावा पें धीर भजनमार्गी ॥ १ ॥
चंचळ चित्तासी ठेवूनियां ठायीं । संतांचिये पायीं लीन व्हावें ॥ २ ॥
भावाचा पें हात धरावा निश्चयें । तेणें भवभय देशधडी ॥ ३ ॥
नामापरतें जगीं साधन सोपें नाहीं । आवडीनें गाई सर्वकाळ ॥ ४ ॥
तुका म्हणे धन्य वंश त्या नराचा । ऐसा निश्चयाचा मेरु जाला ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– विचारावें–विचार करावा, भवभय–संसाराचे भय.

अर्थ :– लोकहो, या नरदेहाच्या जन्मास येऊन सारभूत तत्त्व काय आहे याचा विचार करावा. आणि भजनमार्गात धीर धरून असावे. १ चंचल असणाऱ्या तुमच्या चित्ताला एकाच ठिकाणी स्थिर करा व संतांच्या चरणांवर नम्र व्हा २ श्रीहरीविषयीच्या भावाचा हात निश्चयाने धरावा. त्यामुळे संसाराचे भय देशोधडीला जाईल ३ या श्रीहरीच्या नामाशिवाय दुसरे सोपे साधन नाही म्हणून ते सर्वकाळ मोठ्या प्रेमाने गावे ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे जो निश्चयाचा महामेरू झाला त्या पुरुषाचा वंश धन्य आहे. ५

४३०५ षड्रसीं रांधिलें खापरीं घातलें[2] । चोहोटा ठेविलें मध्यरात्रीं ॥ १ ॥
त्यासी सदाचारी लोक न शिवती । श्वानासी निश्चिती फावलें तें ॥ २ ॥
तैसें दुष्टकर्म जालें हरिभक्ता । त्यागिली ममता विषयासक्ति ॥ ३ ॥
इहपरलोक उभय विटाळ । मानिती केवळ हरिचे दास ॥ ४ ॥
तुका म्हणे देवा आवडे हे सेवा । अनुदिनीं व्हावा पूर्ण हेतु ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– रांधिलें–शिजविले, चोहोटा–भरचौकात, श्वानासी–कुत्र्यास.

अर्थ :– चांगले पक्वान्न शिजवले व ते खापरात ठेवून मध्यरात्रीच्या सुमारास जर भर चौकात ठेवले १ तर सदाचारी लोक त्याला शिवणारसुद्धा नाहीत. पण कुत्र्याला मात्र त्याचा निश्चित लाभ होतो २ हरीच्या

१ पिकलिया, २ वाढिले.

भक्ताना दुष्टकर्म असेच आवडत नाही विषयासक्तीवरील त्याची ममता सपलेली असते ३ श्रीहरीचे दास अशा दुष्टकर्मांचा या लोकी व परलोकी विटाळच मानतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, मला मात्र तुमची ही सेवा फार आवडते माझा हेतू दिवसेदिवस पूर्ण होत जावा ५

४३०६ बीज भाजुनि केली लाही । आम्हां जन्ममरण नाहीं ॥ १ ॥
आकारासी कैचा ठाव । देहप्रत्यक्ष जाला देव ॥ २ ॥
साकरेचा नव्हे उस । आम्हां कैचा गर्भवास ॥ ३ ॥
तुका म्हणे ओघा जोग । सर्वां घटीं पांडुरंग ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- मागील अभंगक्रमाक ४२६९ पाहावा.

४३०७ वैकुंठींचा देव आणिला भूतळा । धन्य तो आगळा पुंडलीक ॥ १ ॥
धारिष्ट धैर्याचा वरिष्ठ भक्ताचा । पवित्र पुण्याचा एकनिष्ठ ॥ २ ॥
पितृसेवा पुण्यें लाधला निधान । ब्रह्म सनातन अंगसंगें ॥ ३ ॥
अंगसंगें रंगें क्रीडा करी जाणा । ज्या घरीं पाहुणा वैकुंठींचा ॥ ४ ॥
धन्य त्याची शक्ति भक्तीची हे ख्याति । तुका म्हणे मुक्ति पायीं लोळे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- आगळा-श्रेष्ठ, निधान-साठा, ठेवा

अर्थ – हा पुडलीक श्रेष्ठ व धन्य आहे. कारण त्याने वैकुठातील देव या पृथ्वीवर आणला १ तो मोठा धैर्यवान असून भक्तातही श्रेष्ठ आहे तो पुण्यवानांत पवित्र असून एकनिष्ठ आहे २ त्याने आईबापाची सेवा करून जे पुण्य मिळविले त्यामुळे त्याला हा श्रीहरीचा ठेवा प्राप्त झाला सनातन ब्रह्म त्याच्या अगसगाशी क्रीडा करू लागले ३ अगसगाच्या रगात हा श्रीहरी, हा वैकुठीचा राणा त्याच्याशी क्रीडा करीत असतो ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्याची शक्ती धन्य आहे त्याच्या भक्तीची ख्यातीही मोठी आहे कारण त्याच्या पायाशी मुक्ती लोळण घेत असते ५

४३०८ मृगाचिये अगीं कस्तुरीचा वास । असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥ १ ॥
भाग्यवंत घेती वेचूनिया मोले[1] । भारवाही मेले[1] वाहता वोझें ॥ २ ॥
चंद्रामृतें तृप्तिपारणें चकोरा । भ्रमरासी चारा सुगंधाचा ॥ ३ ॥
अधिकारी येथें घेती हातवटी । परीक्षवंता दृष्टी रत्न जैसे ॥ ४ ॥
तुका म्हणे काय अंधळिया हातीं । दिले जैसे मोतीं वाया जाय ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- ठावा-माहीत

अर्थ :- कस्तुरीमृगाच्या अगी कस्तुरीचा सुवास असतो. पण तो सुवास त्या मृगाना काहीच समजत नाही.१ भाग्यवान लोक मात्र द्रव्य खर्च करून कस्तुरी विकत घेतात आणि मृग मात्र तिचे व्यर्थ ओझे वाहूनच मरतात २ चद्राच्या अमृतामुळे चकोर तृप्त होतो आणि फुलांच्या सुगधाचा चारा भ्रमरास होतो ३ जशा प्रकारे रत्नाची परीक्षा त्याची परख करणारा करीत असतो, त्याप्रमाणे अधिकारी लोक आपल्या हातोटीने त्या त्या वस्तूचा स्वीकार करतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, आंधळ्या माणसाच्या हातात मोती देऊन काय उपयोग ? ते वायाच जाणार त्याप्रमाणे अनधिकारी माणसाच्या हातात वस्तू देणे व्यर्थ होय ५

---

१ मोल

४३०९ आलिया संसारीं देखिली पंढरी । कीर्ति महाद्वारीं वाणूं तुझी ॥ १ ॥
पताकांचे भार नामाचे गजर । देखिल्या संसार सफळ जाला ॥ २ ॥
साधुसंतांचिया धन्य जाल्या भेटी । सांपडली लुटी मोक्षाची हे ॥ ३ ॥
तुका म्हणे आतां हेंचि पैं मागणें[1] । पुढती नाहीं येणें संसारासी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाणूं–वर्णन करूं, भार-समुदाय.

अर्थ :– देवा, या संसारात आल्यामुळे एक चांगले झाले की मी पंढरी पाहिली. तेथे महाद्वारात राहून आता तुझी कीर्ती वर्णन करू. १ येथे नाना पताकांचा समुदाय व हरिनामाचे गजर पाहून संसार सफल झाला असे वाटते. २ साधुसंतांची भेट झाल्यामुळे धन्यता वाटली यामुळे मोक्षाची लूट करायला सापडली ३ तुकाराम महाराज म्हणतात, यापुढे जन्मास येऊन संसारात गुंतु नये हीच एक मागणी श्रीहरी, तुझ्यापुढे आहे. ४

४३१० ऐसे कैसे जाले भोंदू । कर्म करोनि म्हणती साधु ॥ १ ॥
अंगा लावूनियां राख । डोळे झांकुनी करिती पाप ॥ २ ॥
दावुनि वैराग्याची कळा । भोगी विषयाचा सोहळा ॥ ३ ॥
तुका म्हणे सांगों किती । जळो तयांची संगती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कळा–तेज, ऐट.

अर्थ .– लोक कसे भोंदू झाले आहेत पाहा. वाटेल ते वाटेल कर्म करतात आणि स्वतःला साधू म्हणवून घेतात. १ अंगाला राख फासतात आणि सर्वांचे डोळे चुकवून पापकर्म करतात २ वैराग्याची ऐट दाखवून विषयांचा सोहळा भोगतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे मी काय काय आणि किती किती सांगू ? त्यांच्या संगतीला आग लागो. ४

४३११ कोणी निंदा कोणी वंदा । आम्हां स्वहिताचा धंदा ॥ १ ॥
काय तुम्हांसी गरज । आम्ही भजूं पंढरिराज ॥ २ ॥
तुम्हांसारिखें चालावें । तेव्हां स्वहिता मुकावें ॥ ३ ॥
तुका म्हणे हो कां कांहीं । गळ दिला विठ्ठल पायीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– गळ–पकडण्याचे साधन.

अर्थ :– कुणी आम्हांस निंदा वा कुणी वंदा, आमचा हा स्वहित साधण्याचा धंदा आहे. १ तुम्हांस त्याची काय गरज आहे ? आम्ही नित्य त्या पंढरीराजास भजू. २ आम्ही तुमच्यासारखे वागत राहू तर मग स्वहिताला मुकावे लागेल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, काही का होईना, आम्ही गळ या विठ्ठलाच्या हाती दिलेला आहे. ४

४३१२ तुझे नामें दिनानाथा । आम्ही उघडा घातला माथा ॥ १ ॥
आतां न धरावें दुरी । बोल येईल ब्रीदावरी ॥ २ ॥
पतित होतों ऐसा ठावा । आधीं कां न विचारावा ॥ ३ ॥
तुका म्हणे तुझे पायीं । आम्ही मिरास केली पाहीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठावा–माहीत, विचारावा–विचार करावा, मिरास–वतनदारी.

१ मागेन.

अर्थ :– दीनानाथा, तुझ्या नामाच्या बळावर आम्ही आमचा माथा उघडा ठेवला आहे. १ आता तुम्ही आम्हांस दूर करू नये नाही तर दीनानाथ, अनाथनाथ या तुमच्या ब्रीदाला बोल लागेल २ आम्ही जर पतित आहोत असे होते तर मग तुम्ही यासंबंधी आधीच विचार का नाही केला ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या पायी आम्ही वतनदारी केली आहे. ४

४३१३ रक्त श्वेत कृष्ण पीत प्रभा भिन्न । चिन्मय अंजन सुदलें डोळां ॥ १ ॥
तेणें अंजनगुणें दिव्यदृष्टी जाली । कल्पना निवाली द्वैताद्वैत ॥ २ ॥
देशकालवस्तुभेद मावळला । आत्मा निर्वाळिला विश्वाकार ॥ ३ ॥
न जाला प्रपंच आहे परब्रह्म । अहंसोहं ब्रह्म आकळलें[1] ॥ ४ ॥
तत्त्वमसि विद्या ब्रह्मानंद सांग । तेचि जाला अंगें तुका आतां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– रक्त–तांबडा, श्वेत–पांढरा, कृष्ण–काळा, पीत–पिवळा, सुदले–घातले, निर्वाळला–निर्मळ झाला, आकळलें–समजून आले, सांग–पूर्ण

अर्थ :– रजोगुणाचा तांबडा वर्ण, सत्त्वगुणाचा पांढरा वर्ण, तमोगुणाचा काळा वर्ण, व शुद्ध सात्त्विकाचा पिवळा वर्ण यांच्याहून भिन्न असे चिन्मयात्र ( ज्ञानमय ) असे अंजन माझ्या सद्गुरुनाथाने डोळ्यात घातले आहे १ या अंजनामुळे माझी दृष्टी दिव्यस्वरूपाची असून तीमधील द्वैतअद्वैत या कल्पना नाहीशा झाल्या आहेत. २ देश, काल इत्यादींचा वस्तुभेद नाहीसा होऊन विश्वाकार असलेला हा आत्मा निर्मल झाला आहे ३ प्रपंच हा प्रपंच न उरता एक परब्रह्म आहे असाच अनुभव येऊन अहं-सोहंच्या जाणिवेने मला ब्रह्माचे ज्ञान झाले आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, 'तत्त्वमसि' या महावाक्याच्या अनुभवामळे मला ब्रह्मानंदाचा परिपूर्ण आस्वाद घेता आला आणि मी तोच ब्रह्मानंद सर्वांगांनी बनलो आहे. ५

विवरण :— या एका अनुभूतिसंपन्न अशा अभंगात चिन्मय अंजन डोळ्यात घातल्यानंतर, 'तत्त्वमसि'; ते ब्रह्मतत्त्व तूच आहेस, असा साक्षात्कार घडल्यावर त्रिगुणात्मक जगाचा, बाह्य वस्तूचा कसा विसर पडतो व प्रपंच-भाव कसा नाहीसा होऊन एक परब्रह्म तत्त्वच कसे उरते, देशकाळाचे बंधन कसे नाहीसे होते, आत्माच सर्व विश्वास भरून राहिल्याचा अनुभव कसा येतो, सर्वांगानी ब्रह्मभावाचाच स्वानंद कसा लुटता येतो, याचे मोठे प्रत्ययकारी वर्णन तुकोबानी केले आहे रक्त, श्वेत, कृष्ण या रंगानी रज, सत्त्व व तम हे गुण सूचित असून या त्रिगुणात्मक प्रकृतीमुळे या जगताची निर्मिती झाली अशी आस्त्या तत्त्वज्ञानाची परंपरा आहे. रक्त, श्वेत, कृष्ण हे वर्ण अग्नी, आप म्हणजे पाणी व पृथ्वी याचे द्योतक असल्याने याचा मेळ म्हणजे हे दृश्य जगत होय सर्व सृष्टीची रचना या तीन तत्त्वांवर झाली असल्याचे सांगतात. सृष्टिकर्त्या श्रीहरीने कृतयुगात पांढरा, त्रेतायुगात तांबडा आणि द्वापरयुगात काळा वा पिवळा वर्ण धारण केल्याचे भागवतात म्हटले आहे कृष्ण वर्ण हा कलियुगाचा मानला जातो असे हे रक्त म्हणजे तांबडे, श्वेत म्हणजे पांढरे, कृष्ण म्हणजे पिवळे प्रतीक त्या त्या प्रवृत्तीचे मानून विश्वाची वा सृष्टीची रचना स्पष्ट केलेली असते. 'कृतयुगीं श्वेतवर्णधर', 'त्रेतायुगीं रक्तवर्ण', 'द्वापरी घनश्यामवर्ण', 'कलियुगी इंद्रनीळकीळ-समुदायो' अशा शब्दानी परमेश्वराचे वर्णन एकनाथानी भागवताच्या पाचव्या अध्यायात केले आहे

सृष्टीची अथवा बाह्य जगताची ही त्रिगुणात्मक अवस्था 'तत्त्वमसि' या महावाक्याच्या अनुभूतीत संपते. साधक त्रिगुणातीत अवस्थेस जाऊन पोचतो ज्या शुद्धब्रह्मतत्त्वाची त्याला अनुभूती येते ते ब्रह्म निर्गुण, अरूप, निराकार असल्याने त्याचा अनुभवही तसाच गुणातीत असतो 'न शुक्लं न कृष्णं न रक्तं न पीतम्' असे श्रीशंकराचार्यांनी, दशश्लोकीत म्हटल्याप्रमाणे त्याची अनुभूती असते त्याला तीन गुणाची, तीन रंगाची आठवणच नसते. चिन्मयरूपी अंजन एका सद्गुरुकृपेने डोळ्यात भरले गेले की मग दृष्टी दिव्य होऊन जाते द्वैताद्वैत, सगुणनिर्गुण इत्यादींच्या पलीकडचा अनुभव येऊन 'देशकाळ वस्तुभेद मावळला' अशी प्रचीती येते महाभारतातील उद्योगपर्वात श्रीसनत्सुजातांना धृतराष्ट्र विचारतो, 'आभाति शुक्लमिवलोहितमिवाथो कृष्णमथांजन का द्रवं या । तद् ब्रह्मणः पश्यति यत्र विद्वान् कथं रूपं तदमृतमक्षरं परम्'– ज्ञानी पुरुषाला त्या अक्षर ब्रह्माचे ज्ञान होते ते कोणत्या रूपाचे ? ते ब्रह्म

[1] कवळलें.

पांढरे असते, तांबडे असते काळे असते, की पिवळे असते ? या प्रश्नाचे उत्तर देताना सनत्सुजातानी म्हटले आहे 'नाभाति शुक्लमिव लोहितमिवाथो कृष्णमथाजन का द्राय वा' ज्ञानी पुरुषाला दिसणाऱ्या ब्रह्माचे कोणतेच रूप नसते ते पांढरे नसते, की तांबडे नसते त्याला कसलाच रंग नाही की रूपही नाही याच दृष्टीने समर्थ रामदासानी आपल्या मनाच्या श्लोकात म्हटले आहे, 'नसे पीत ना ना श्वेत ना श्याम कांहीं । नसे व्यक्त अव्यक्त ना नीळ नाहीं' त्या ब्रह्मतत्त्वास ना आकार, ना रंग आणि या अवस्थेत त्याला कशाचाही मोह नसतो त्याला कशाचा द्वेष वाटत नाही. सुखदु ख, हर्षामर्ष निंदास्तुती, मानापमान, शत्रुमित्र इत्यादीच्या पलीकडे तो जातो. या गुणातीत अवस्थेचे मोठे गोचर व स्पष्ट वर्णन तुकोबानी या अभंगात केले आहे तो उदासीन होतो गुणातीत होतो, त्याचा प्रपचच ब्रह्मरूप होऊन जातो तुकोबाच्या शब्दात या अवस्थेचे वर्णन करायचे म्हणजे, 'जाला इहलोकीं परलोक । आलें सकळिक घेकुठ ॥ न कळे दिवस राती । अखंड लागलीसे ज्योति ॥ आनंदलहरीची गति । वर्णूं किती तया सुखा ? '

या सुखाच्या अनुभूतीमुळे मग स्वदेशातच भुवनत्रयाच्या निवासाचा प्रत्यय येतो 'रूपगुण नाम अवघा मेघश्याम' होऊन जातो मनासहित काया पालटून जाते 'चित्त चैतन्यीं पडता मिठी । दिसे हरिरूप अवघी सृष्टि' अशा अनुभवात तो रगून जातो 'तुका म्हणे त्याचे । डोळां अंजन घरवे' या प्रकारच्या श्रेष्ठ अंजनाने काय होते ? तर 'अणूचिया ऐसे । असे भरले प्रकाशें' अशी प्रचीती येते आत्माच विश्वाकार होऊन 'तुका आकाशाएवढा' अशी मनाची, चित्ताची अवस्था होते

४३१४ नीत सांडोनि अवनीत चाले । भडउमंड भलतेचि बोले ॥ १ ॥
त्यात कोणाचे काय वा गेले । ज्याचे तेणे अनहित केले ॥ २ ॥
ज्यासि वदावे त्यासी निंदी । मैत्री सांडोनि होतसे दंदी ॥ ३ ॥
आन यातीचे सगती लागे । सतसज्जनामध्यें ना वागे ॥ ४ ॥
केल्याविण पराक्रम सांगे । जेथें सांगे तेथेंचि भीक मागे ॥ ५ ॥
करी आपुलाचि सभ्रम । परि पुढें कठीण फार यम ॥ ६ ॥
तुका म्हणे कांहीं नित्यनेम । चित्तीं न धरी तो अधम ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – नीत–नीती, भडउमड-वृथा वडवड करणारा, दंदी–वादी, द्वेषी, आन–दुसऱ्या

अर्थ – चागल्या नीतीचा मार्ग सोडून हा अनीतीनच वागतो वृथा वडवड करणाऱ्या माणसाप्रमाणे भलतेच बोलतो १ त्यात कुणाचे काय गेले ? ज्याचे त्यानेच स्वत चे अहित करून घेतले २ ज्याला खरे म्हणजे वदन करायचे, त्याचीच हा निंदा करून त्याची मैत्री सोडतो व त्याचा द्वेषी बनतो ३ दुसऱ्याच्या अथवा भलत्याच्याच सगतीस हा लागतो सतसज्जनाच्या सोबतीने हा कधी वागत नाही ४ काही पराक्रम स्वत केल्याशिवायच हा स्वमुखाने सांगतो आणि जेथे सांगतो तेथेच भीकही मागतो ५ आपला आपणच हा सभ्रम निर्माण करून राहातो पण पुढे फार कठीण असा यम उभा आहे ६ तुकाराम महाराज म्हणतात काही चागला नित्यनेम करण्याविषयी जो मनात धरीत नाही तो अधमच जाणावा ७

४३१५ मानूं कांहीं आम्ही आपुल्गिया इच्छा । नाहीं तरि सरिसा रकरावो ॥ १ ॥
आपुल्या उदास आहों देहभावी । मग लज्जाजीवीं चाड नाहीं ॥ २ ॥
तुका म्हणे खेळों आम्ही सहजलीळे । म्हणोनि निराळे सुखदु खा ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – सरिसा-सारखा, रकरावो–भिकारी व राजा, चाड–जरूरी

अर्थ – आम्ही आपल्या इच्छेस येईल त्याप्रमाणे कुणास मानू वा न मानू नाही तर एऱ्हवी आम्हास भिकारी व राजा हे सारखेच वाटतात १ आम्ही आपल्या देहभावाविषयी जेथे उदास आहोत तेथे दुसऱ्यासबधी

आमच्या मनात लाज वाटण्याची जरूरी नाही. २ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही या ठिकाणी सहज अशा लीलेने खेळत आहोत. म्हणूनच सुखदु खांहून निराळे झालो आहोत. ३

४३१६ बोले तैसा चाले । त्याचीं वंदीन पाउलें ॥ १ ॥
अंगें झाडीन अंगण । त्याचें दासत्व करीन ॥ २ ॥
त्याचा होईन किंकर । उभा ठाकेन जोडोनि कर ॥ ३ ॥
तुका म्हणे देव । त्याचे चरणीं माझा भाव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– किंकर–सेवक, दास, ठाकेन–राहीन.

*अर्थ :–* जो बोलण्याप्रमाणे, उपदेश केल्याप्रमाणे स्वत चालतो, वागतो त्याची मी पावले वंदन करीन १ मी स्वतः होऊन त्याचे अगण झाडीन त्याचे दास्यत्व मी करीन. २ मी त्याचा सेवक होईन मी त्याच्या पुढे हात जोडून उभा राहीन. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा मनुष्य मला देवाप्रमाणे असून माझा भाव त्याच्या चरणी आहे ४

४३१७ पाण्या निघाली गुजरी । मन ठेविलें दो घागरीं ।
चाले मोकळचा पदरीं । परी लक्ष तेथें ॥ १ ॥
वावडी उडाली अंबरीं । हातीं धरोनियां दोरी । दिसे दुरिच्या दुरी । परी लक्ष तेथें ॥ २ ॥
चोर चोरी करी । ठेवी वनांतरीं । वर्ततसे चराचरीं । परी लक्ष तेथें ॥ ३ ॥
व्यभिचारिणी नारी । घराश्रम करी । परपुरुष जिव्हारीं । परी लक्ष तेथें ॥ ४ ॥
तुका म्हणे असो भलतिये व्यापारीं । लक्ष सर्वेश्वरीं । चुको नेदी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .– गुजरी–गुजरायी स्त्री, वावडी–पतग, अबरीं–आकाशात, घराश्रम–घरची कामेधामे, व्यवहार, जिव्हारीं–अत करणात, व्यापारीं–व्यवहारात

अर्थ :– गुजरायी स्त्री डोक्यावर एकावर एक अशा दोन घागरी ठेवून पाण्याला निघते पदर मोकळा ठेवून ती चालत असली तरी तिचे लक्ष त्या घागरीवर असते १ आकाशात वर उच पतंग उडत असतो आणि त्याची दोरी खाली उडविणाराच्या हातात असते. पतंग वर आकाशात दूरवर असतो. पण त्याचे सारे अनुसंधान दोरी धरणाराजवळ असते २ चोर चोरी करून रानावनात जाऊन ठेवा लपवून ठेवतो आणि जगात सर्वत्र वावरतोही. पण त्याचे लक्ष सतत त्या ठेव्याकडे असते ३ व्यभिचारी स्त्री घरातील कामधंदा नीटपणे करते पण तिच्या अंतःकरणात परपुरुषास स्थान असते त्याकडे तिचे लक्ष असते ४ तुकाराम महाराज म्हणतात, त्याप्रमाणे मी कोणत्याही व्यवहारात गुतलेला असो, पण माझे लक्ष त्या सर्वेश्वरावरून चुकू नये ५

४३१८ जनाचिया मना[1] जावें कासियेसी । माझी वाराणसी पांडुरंग ॥ १ ॥
तेथें भागीरथी येथें भीमरथी । अधिक म्हणती चंद्रभागा ॥ २ ॥
तेथें माधवराव येथें यादवराव । जाणोनियां[2] भाव पुंडलिकाचा ॥ ३ ॥
विष्णुपद गया तेचि येथें आहे । प्रत्यक्ष हें पाहे विटेवरी ॥ ४ ॥
तुका म्हणे हेचि प्रपंच उद्धरी । आता पंढरपुरी घडो बापा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– कासियेसी–काशीला, माधवराव–पार्वतीमातेचा पती महादेव.

---

१ सर्गे जावे कासियासी, २ अधिक हा भाव पुडलीक

अर्थ –लोकांच्या मनात आपण काशीस जावे असे असते पण पंढरीचा पांडुरंग हीच माझी वाराणशी अथवा काशी आहे १ तेथे भागीरथी असेल तर येथे भीमा नदी असून तिला चंद्रभागा असे आणखी नाव आहे. २ त्या ठिकाणी महादेव आहे तर येथे यादवराव कृष्ण आहे पुंडलीकाचा भाव जाणून तो येथे उभा आहे ३ त्या ठिकाणी विष्णुपद, गया इत्यादी स्थाने असतील तर येथेही ती स्थाने असून विष्णूचे रूप तर प्रत्यक्ष विटेवर उभे आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, याच्याच मुळे प्रपंचात आपला उद्धार होत असल्याने बापा, या पंढरीचीच यात्रा वारंवार घडो ५

४३१९ नको येऊ लाजे होय तू परती। भजो दे श्रीपती सखा माझा ॥ १ ॥
तुझे संगतीनें मोटा जाला घात। जालो मी अंकित दुर्जनाचा ॥ २ ॥
तुका म्हणे राडे घेइन काठीवरी। धनी सहाकारी राम केला ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – परती–परत, अंकित–स्वाधीन, सहाकारी–मदत करणारा

अर्थ – लज्जे, तू येऊ नकोस माझ्या समोरून दूर हो हा श्रीपती माझा सखा असल्याने याला भजू दे १ तुझ्या संगतीने माझा मोठाच घात झाला तुझ्यामुळे मी दुर्जनांच्या स्वाधीन झालो २ तुकाराम महाराज म्हणतात, राडे, तू जर माझे ऐकले नाहीस तर तुला मी काठीने मारीन मला माझा धनी श्रीराम मदत करणारा आहे ३

४३२० भक्तिऋण घेतले माझे। चरण गाहाण आहेत तुझे ॥ १ ॥
प्रेम व्याज देई हरी। माझा हिशेब लवकरी करीं ॥ २ ॥
माझें मी न सोडीं धन। नित्य करितो कीर्त्तन ॥ ३ ॥
तुझे नाम[1] आहे खत। सुखें करीं पचाईत ॥ ४ ॥
तुका म्हणे गरुडध्वजा। यासी साक्ष श्रीगुरुराजा[2] ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – खत–कागदपत्र

अर्थ – देवा तुम्ही माझ्या भक्तीचे ऋण घतले आहे त्यामुळे तुमचे चरण माझ्याकडे गहाण आहेत १ श्रीहरी मला आता प्रेमरूपी व्याज तू दे आणि माझा हिशेब लौकर पूर्ण कर २ मी माझे धन सोडणार नाही यासाठी मी तुझे कीर्तन नित्य करीत राहीन ३ तुझ्या नावाचे कागदपत्र माझ्या जवळ आहे त्याचा निवाडा तू सुखाने कर ४ तुकाराम महाराज म्हणतात गरुडध्वजा या सर्व व्यवहारास साक्षी असणारा माझा श्रीसद्गुरुनाथ आहे ५

४३२१ फिरविले देऊळ जगामाजी ख्याति। नामदेवा हातीं दुध प्याला। १ ॥
भरियेली हुंडी नरसी महत्याची। धनाजीजाटाचीं सेते पेरी ॥ २ ॥
मिराबाईसाटीं घेतो विष प्याला। दामाजीचा जाला पाडेवार[3] ॥ ३ ॥
कबीराचे मागीं विणू लागे सेले। उठविले मूल कुंभाराचे ॥ ४ ॥
आता तुम्ही दया करा पंढरिराया। तुका विनवी पाया वेळोवेळा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – धनाजी–धना जाट, पाडेवार–महार

अर्थ –नामदेव तीर्थयात्रेस गेले असताना औंढ्या नागनाथाच्या मुक्कामी नामदेवासाठी नागनाथाने आपल्या देवळाचे तोंड फिरविले याच नामदेवाच्या हातून देव दूध प्याले अशी ख्याती सर्व जगात आहे १ नरसी मेहत्याची हुंडी या देवाने भरली व धन्नाजी जाटाची शेते याने पेरली २ मीराबाईसाठी याने विषाचा पेला स्वत घेतला आणि दामाजीसाठी हा सेवक महार झाला ३ कबीराच्या मागावर याने शेले विणण्याचे काम केले

१ नामी, २ सद्गुरुराजा ३ पाढेवार

आणि गोरा कुंभार भक्तीच्या प्रेमात चिखल तुडवीत असताना मूल मरण पावले ते याने जिवत केले ४ पंढरीराया, आता तुम्ही माझ्यावर दया करा अशी विनती मी वेळोवेळी तुम्हांस करीत आहे ५

४३२२ हेचि वेळ देवा नका मागें घेऊं । तुम्हांविण जाऊं शरण कोणा ॥ १ ॥
नारायणा ये रे पाहें विचारून । तुजविण कोण आहे मज ॥ २ ॥
रात्र दिवस तुज आठवूनि आहें । पाहातोसी काये सत्व माझें ॥ ३ ॥
तुका म्हणे किती येऊं काकुलती । कांही माया चित्तीं येऊं द्यावी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विचारून–विचार करून

अर्थ :– देवा, आता यावेळी मात्र मागे घेऊ नका तुमच्याशिवाय मी शरण तरी कुणाला जाऊ हो ? १ नारायणा, याचा विचार करून तू माझ्याकडे ये तुझ्याशिवाय मला आहे तरी कोण रे ? २ मी रात्रदिवस तुला आठवून राहात आहे तू काय माझे सत्व पाहातोस ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता तुम्याशी किती काकुळतीस यावे ? माझी थोडी तरी माया तुमच्या चित्तात येत असावी ४

४३२३ वृंदावना[1] केले साकरेचे आळें । न सडे वेगळें कडुपण ॥ १ ॥
कावळ्याचें पिलूं कौतुकें पोशिलें । न राहे उगलें विष्ठेविण ॥ २ ॥
क्षेम देतां अंगा गाधेलाची पोळी । करवी नाद्राळी महाशब्द ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे न होती ते भले । घालिती ते घाले साधुजना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वृंदावना–एक प्रकारच्या कडू फळास, न सडे–सोडत नाही, उगले–स्वस्थ, क्षेम–आलिंगन गाधेलाची–गांधील माशीचे, नाद्राळी–गर्जना

अर्थ :– कडू वृंदावनाच्या वेलास जरी साखरेचे आळे केले तरी त्याचे कडूपण सपून ते काही वेगळेपणाने गोड होत नाही १ कावळ्याच्या पिलाला कौतुकाने पोसून जरी स्वच्छ ठेवले तरी ते विष्ठेत लोळल्याशिवाय स्वस्थ राहाणार नाही २ गांधील माशीने आपल्या अंगास आलिंगन दिले तर अंगच पोळेल त्यामुळे महा गर्जना शब्दांनी करावी लागेल ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे लोक भले होत नाहीत ते साधु लोकावर घालेच घालत असतात ४

४३२४ मुसळाचें धनु नव्हे हो सर्वथा । पाषाण पिळितां रस कैचा ॥ १ ॥
वांझे बाळा जैसे दुध नाहीं स्तनीं । गारा त्या अधणीं न सिजती ॥ २ ॥
नवखंड पृथ्वी पिके मृगजळें । डोंगर भेटे बळें असमानासी[2] ॥ ३ ॥
नैश्वर देह तैसे तेव्हां होय ब्रह्म । तुका म्हणे श्रम करनो काय ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पाषाण दगड, असमानासी–आकाशाला

अर्थ .– मुसळाचे धनुष्य कधीही बनणार नाही, की दगड पिळून कधी त्याचा रस काढता येणार नाही. १ वांझ स्त्रीच्या बाळासाठी तिच्या स्तनातून दूध कसे येणार ? गारगोट्याचे दगड अधणात टाकले तरी ते शिजणार नाहीत. २ मृगजळाच्या पाण्यावर नवखंड पृथ्वी कशी पिकणार ? डोंगर कितीही उंच झाला तरी आकाशास कसा भिडणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, त्याप्रमाणे हा नश्वर देह ब्रह्मस्वरूपास कसा जाणार ? तेव्हा या बाबतीत श्रम करून व्यर्थच होणार ४

---

१ इंद्रावणा, २ आसमानी

४३२५ धन्या आता काय करू । माझीं तान्हुलें लेकरूं ॥ १ ॥
धन्या अवचित मरण आलें । मज कोणासी निरविलें ॥ २ ॥
माझें दार नका पाडूं । त्याचे हात पाय तोडूं ॥ ३ ॥
एके हातीं धरली दाढी । घे कुऱ्हाडी दुजे हातीं ॥ ४ ॥
येरी घाव घालूं पाहे । तव तो उठोनि उभा राहे ॥ ५ ॥
तुका म्हणे अवघीं चोरें । सेखीं रामनाम सोइरें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – दुजे–दुसऱ्या, येरी–दुसरा

अर्थ :– घरफोडी झाली असताना, घरमालकास बांधले असताना त्याची बायको म्हणते, ' धन्या, मग माझे कसे होईल ? मला कुणाच्या जीवावर सोपविले ? २ माझे घरदार पाडू नका हो त्याचे हातपाय तोडू नका ' ३ त्या चोरांनी एका हाताने त्याची दाढी धरली व दुसऱ्या हाताने कुऱ्हाड घेतली ४ तो घाव घालू पाहातो तो धनी उठून उभा राहातो ५ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे सर्वजण स्वार्थी चोर आहेत शेवटी रामनाम हाच खरा सोयरा होय ६

४३२६ निरंजनीं आम्हीं बांधियेलें घर । निराकारीं निरंतर राहिलों आम्ही ॥ १ ॥
निराभासीं पूर्ण जालों समरस । अखंड ऐक्यास पावलों आम्ही ॥ २ ॥
तुका म्हणे आतां नाहीं अहंकार । जालों तदाकार नित्य शुद्ध ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – निरंजनीं–प्रकाशरूपी आत्मा

अर्थ – प्रकाशरूपी अशा ठिकाणी आम्ही घर बांधले असून तेथेच निराकार होऊन आम्ही राहिलो आहोत १ ज्या ठिकाणी विश्वाभास नाही अशा ठिकाणी आम्ही स्थिर होऊन समरस झालो आहोत अखंड ऐक्यास आम्ही आलो आहोत २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने आम्ही अहंकाररहित झालो असल्यामुळे तदाकार व तद्रूप होऊन नित्य शुद्ध बनून राहिलो आहोत ३

४३२७ पांडुरंगें सत्य केला अनुग्रह । निरसोनि संदेह बुद्धिभेद ॥ १ ॥
जीवशिवा सेज रचिली आनंदें । आउठावे पदीं आरोहण ॥ २ ॥
निजीं निजरूपीं निजविला तुका । अनुहातें बाळका हलरु गाती ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – संदेह–संशय, आउठावे–ब्रह्माच्या पदावर, ब्रह्मपदी, अनुहातें–योगसाधनेमुळे ऐकू येणारा एक ध्वनी, हलरू–गीत, अंगाई गीत

अर्थ – या पांडुरंगाने माझ्यावर सत्यस्वरूपाचा अनुग्रह केलेला आहे त्याने माझ्या मनातील संदेह व भेदात्मक देहबुद्धी यांचा नाश केला आहे १ त्याने जीवशिवाचे ऐक्य करून मोठ्या आनंदाने शेज रचून माझी ब्रह्मपदावर स्थापना केली आहे २ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे या विश्वमाऊलीने मला निजरूपात झोपवून अनुहात ध्वनीची अंगाई गीते म्हटली आहेत ३

४३२८ नाना मतांतरें शब्दाची व्युत्पत्ति[1] । पाठांतरें होती वाचाळ ते ॥ १ ॥
माझ्या विठोबाचें वर्म आहे दुरी । कैंची तेथें उरी देहभावा ॥ २ ॥
यज्ञ याग जप तप अनुष्ठान । राहे ध्येय ध्यान आलीकडे ॥ ३ ॥
तुका म्हणे होय उपरति चित्ता । अंगीं सप्रेमता येणें लागें ॥ ४ ॥

१ वीत्पत्ती

शब्दार्थ व टीपा :– उरी-शिल्लक, उपरति-पश्चात्ताप.

अर्थ :– नाना प्रकारची मतान्तरे करून लोक शब्दांचे अर्थ वेगवेगळे लावतात आणि मर्म न समजता ग्रंथ पाठ करून वाचाळ होतात १ परंतु माझ्या विठोबाचे वर्म यामुळें फारच दूर राहाते. त्याची एकदा प्राप्ती झाल्यावर मग देहभाव शिल्लक तरी कसा राहील ? २ यज्ञयाग, जपतप, अनुष्ठान, ध्येय, ध्यान, धाता वगैरे अलीकडे राहून याचे खरे वर्म दूरच राहाते. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या चित्तात खरी उपरती निर्माण व्हावयास हवी. याचमुळे अंगी श्रीहरीविषयी प्रेम निर्माण होईल. ४

४३२९ नाहीं शब्दाधीन वर्म आहे दुरी । नव्हे तंत्रीं मंत्रीं अनुभव तो ॥ १ ॥
हर्षामर्षे अंगीं आदळती लाटा । कामक्रोधें तटा सांडियेलें ॥ २ ॥
न सरे ते[1] भक्ति विठोबाचे पायीं । उपरति नाहीं जेथें चित्ता ॥ ३ ॥
तुका म्हणे सुख देहनिरसनें । चिंतनें चिंतनें तद्रूपता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हर्षामर्षे–सुखदु:खांनी, न सरे–मान्य होत नाही.

अर्थ :– या श्रीहरीचे वर्म शब्दांत नाही. ते शब्दांहून फार दूर आहे, त्याचप्रमाणे ते नाना प्रकारच्या तंत्रांत वा मंत्रांत अनुभवास येत नाही १ अंगात नाना प्रकारच्या सुखदुःखांनी लाटा उत्पन्न होतात व कामक्रोधादी विकार आपली मर्यादा सोडून अनावर होतात. २ ज्याच्या चित्तास उपरती झाली नाही त्याची भक्ती विठोबाच्या पायांस मान्य होत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देहाचे निरसन करूनच श्रीहरीच्या प्राप्तीचे सुख प्राप्त करून घ्यावे. त्यामुळेच तद्रूपता प्राप्त होते. ४

४३३० शोधूनि अन्वय वंश वंशावळी । परस्परा कुळीं उच्चारण ॥ १ ॥
म्हणविलें मागें पुढें चाले कैसें । केला सामरस्यें अभिषेक ॥ २ ॥
एकछत्र झळके उन्मनी निशाणी । अनुहात ध्वनी गगन गर्जे ॥ ३ ॥
तुकया स्वामी स्थापी निजपदीं दासा । करूनि उल्हासा सप्रेमता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– उन्मनी–स्वस्वरूपाच्या अनुभवाची अवस्था, अनुहात–योगसाधनेमुळे होणारा एक प्रकारचा ध्वनी.

*अर्थ :– हा श्रीहरी आपल्या भक्तांच्या शोधपरंपरेतील वंशावळी व कुळी परस्पर शोधून त्यांच्यातील संबंध* जुळवितो. १ आणि यापूर्वी भक्तांची जी परंपरा चालत आलेली असते तीच पुढे चालत ठेवून हा त्यांना एकवाक्यता, समरसतेचा अभिषेकच करतो. २ त्याच्या ठिकाणी एकछत्री अधिकार असून स्वरूपाच्या अनुभवाची खूण प्रकट झालेली असते. आणि अनुहात ध्वनीची गर्जना साऱ्या आकाशात होत राहाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा देव, हा माझा स्वामी आपल्या दासांना मोठ्या प्रेमभराने व उल्हासाने निजपदावर स्थापन करतो. ४

४३३१ प्रवृत्तिनिवृत्तीचे आटूनियां भाग । उतरिलें चांग रसायण ॥ १ ॥
ज्ञानाग्निहुताशीं कडशिले वोजा । आत्मसिद्धिकाजा लागूनियां ॥ २ ॥
ब्रह्मीं ब्रह्मरस शीघ्र[2] जाला पाक । घेतला रुचक प्रतीतीमुखें ॥ ३ ॥
स्वानुभवें अंगीं जाला समरस । साधनी निजध्यास ग्रासोग्रासीं ॥ ४ ॥
अरोग्यता तुका पावला अष्टांगीं । मिरविला रंगीं निजात्मरंगें[3] ॥ ५ ॥

१ हे, २ सिद्ध, ३ निजात्मरंगी.

शब्दार्थ व टीपा :– चांग-चांगले, कढशिले-निवडले, शुद्ध केले, चोजा-नीटपणे, स्वच्छपणे, काजा-कामासाठी.

अर्थ :– प्रवृत्तीचे व निवृत्तीचे सर्व भाग नाहीसे करून यांच्या विरहित असे आत्मस्वरूपाचे रसायन मोठे चांगले उतरले आहे १ आत्मप्राप्तीच्या कामासाठी हे ज्ञानाच्या अग्नीमध्ये नीटपणे निवडून, शुद्ध करून तयार केले आहे २ अशा रीतीने ब्रह्मरसाचा स्वयंपाक तयार झाला त्याचा रुचकर असा अनुभव प्रचीतीस आला ३ अशा या स्वानुभवामुळे सामरस्याची प्रचीती आली व प्रत्येक घासाच्या ठिकाणी साधनरूपाचा निजध्यास अनुभवास आला. ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्या शरीरातील भवरोग नाहीसा होऊन मी निरोगी झालो आहे आणि निजसुखाच्या आत्मरंगाने मी रंगून गेलो आहे ५

४३३२ काय वा करिशी सोवळें ओवळें । मन नाहीं निर्मळ वाउगेंचि ॥ १ ॥
काय वा करिसी पुस्तकांची मोट । घोकितां हृदयस्फोट हाता नये ॥ २ ॥
काय बा करीसी टाळ आणि मृदंग । जेथें पांडुरंग रंगला नाहीं ॥ ३ ॥
काय वा करीसी ज्ञानाचिया[1] गोष्टी । करणी नाहीं पोटीं बोलण्याची ॥ ४ ॥
काय वा करीसी दंभलौकिकातें । हित नाहीं मातें तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– वाउगेंचि–व्यर्थच, मोट–भार, माते–गोष्टी.

अर्थ :– अरे, उगाच सोवळ्याओवळ्याच्या गोष्टी कशासाठी करतोस ? जर तुझे मन निर्मळ नसेल तर या गोष्टी व्यर्थच आहेत १ उगाच पुस्तकांचा भारा घेऊन काय करणार ? घोकता घोकता हृदय फुटून जाता कामा नये. २ अरे, ज्या भजनात पांडुरंग रंगला नाही त्यातील टाळ व मृदंग यांचा थाट काय उपयोगाचा ? ३ ज्या बोलण्याच्या पोटी करण्याची इच्छा नाही अशा ज्ञानासंबंधीच्या गोष्टी उगाच का रे करतोस ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, हिताच्या गोष्टी न करता उगाच दंभ व लौकिक वाढेल असे तू वर्तन का रे करतोस ? ५

४३३३ स्वामी[2] तूं ही कैसा न पडसी डोळां । सुंदर सांवळा घवघवीत ॥ १ ॥
चतुर्भुज माळा रुळे एकावळी । कस्तुरी निडळीं रेखिलीसे ॥ २ ॥
शंख चक्र गदा[3] रुळे वैजयंती । कुंडलें तळपती श्रवणीं दोन्ही ॥ ३ ॥
तुका म्हणे स्वामी आतां दावीं पाय । पांडुरंग माय कृपावंते ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निडळीं–कपाळावर.

अर्थ :– स्वामी, तुझे सुंदर, सावळे व ठसठशीत असे रूप माझ्या डोळ्यांत कसे भरत नाही ? १ तुझे रूप चार हाताचे असून एकेरी मोत्यांची माळ तुझ्या गळ्यात रुळत आहे तुझ्या कपाळावर कस्तुरीचा टिळा लावलेला आहे. २ तुझ्या हातांत शंख, चक्र, गदा, पद्म ही आयुधे असून गळ्यात वैजयंती माळ शोभत आहे. तुझ्या दोनही कानांत कुंडले तळपत आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगे, माये, कृपावंते, आता तरी तू मला तुझे पाय दाखीव. ४

४३३४ आणीक कोणापुढें वासूं मुख सांग । माझें अंतरंग कोण जाणे ॥ १ ॥
पाहे तुजकडे येऊनी जाऊनी । पांडुरंगा मनीं विचारावें ॥ २ ॥
भय चिंता[4] अवघे उद्योग सांडिले । आठवुनीं पाउलें असें[5] तुझीं ॥ ३ ॥
नका विसरूं मज वैकुंठनायका । विनविनो तुका बंदीजन ॥ ४ ॥

१ ज्ञान आणि गोष्टी, २ स्वप्नी तोही, ३ गळा, ४ चित्ती, ५ आहे

शब्दार्थ व टीपा :– विचारावें–विचार करावा, वंदिजन–स्तुतिपाठक.

अर्थ :– देवा, मी आणखी कुणापुढे रे माझे तोंड वासू ? तू तरी सांग ना. माझे अंतरंग कोण जाणणार ..? १ पांडुरंगा, मी एकसारखा जातायेता तुझ्याकडे पाहात आहे. तूच तुझ्या मनात विचार करून पाहा. २ मी भय, चिंता आणि इतर सर्व उद्योग सोडून तुझीच पावले हृदयात आठवून आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, वैकुंठनायका, तुम्ही मला विसरू नका अशी विनंती मी स्तुतिपाठक तुका करीत आहे. ४

४३३५ सद्‌गुरूचे चरणीं ठेविला मस्तक । देउनियां हस्तक उठविलें ॥ १ ॥
उठविलें मज देउनियां प्रेम । भावार्थें सप्रेम[1] नमस्कारीं ॥ २ ॥
नमस्कारीं त्याला सद्‌गुरुरायाला । तुका म्हणे बोला नाम वाचें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– हस्तक–हात.

अर्थ :– मी सद्‌गुरूंच्या चरणी मस्तक ठेवल्यावर त्यांनी मला हातात धरून उठविले. १ त्यांनी मला प्रेम देऊन उठविले. मी मग त्यांना प्रेमाने व भावपूर्णतेने नमस्कार केला. २ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या सद्‌गुरुनाथाला मी नमस्कार केला. त्यांचे नाम वाणीने नित्य घेत राहा. ३

४३३६ सद्‌गुरूनें मज आशीर्वाद दिला । हरुष भरला हृदयीं माझे ॥ १ ॥
हृदयींचा भाव कळला गुरूसी । आनंदउल्हासीं बोले मज ॥ २ ॥
बोले मज गुरु कृपा तो करूनि । तुका म्हणे मनीं आनंदलों ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– हरुष–हर्ष, आनंद.

अर्थ :– माझ्या सद्‌गुरुरायाने मला आशीर्वाद दिल्यामुळे माझ्या हृदयात हर्ष भरून राहिला आहे. १ माझ्या हृदयातील भाव माझ्या गुरूला समजला आहे. ते माझ्याशी आनंदाने व उल्हासाने बोलले. २ तुकाराम महाराज म्हणतात, माझे हे गुरुनाथ माझ्यावर कृपा करून बोलले. त्यामुळे माझ्या मनास मोठाच आनंद झाला आहे.३

४३३७ आनंदाचा कंद गाइयेला गीतीं । पाहियेला चित्तीं देवराव ॥ १ ॥
देवराव तो ही आहे निश्चयेंसीं । अखंड नामासी बोलवितो ॥ २ ॥
बोलवितो मज कृपा तो करूनि । तुका म्हणे मनीं धरा भाव ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– कंद–साठा, ठेवा.

अर्थ :– मी हा आनंदाचा ठेवा माझ्या गीतांनी गाइला आहे. या देवरावास मी माझ्या चित्तात पाहिला आहे. १ हा देवराव निर्धार करून अखंडपणे माझ्याकडून नाम वदवून घेतो. २ तुकाराम महाराज म्हणतात, तो माझ्यावर कृपा करून मला बोलते करतो. त्याच्याविषयी मनात तुम्ही शुद्ध भाव धरा. ३

४३३८ सातादिवसांचा जरी जाला उपवासी । तरीं कीर्तनासी टाकूं नये ॥ १ ॥
फुटो हा मस्तक तुटो हें शरीर । नामाचा गजर सोडूं नये ॥ २ ॥
शरीराचे होत दोनी ते ही भाग । परि कीर्तनाचा रंग सोडों नये ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसा नामीं ज्या निर्धार । तेथें निरंतर देव असे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निर्धार–निश्चय.

अर्थ :– सात दिवसांचा उपवास असला तरी कीर्तनाचा रंग सोडून जाऊ नये. १ मस्तक फुटले तरी चालेल, शरीर तुटले तरी चालेल, पण नामस्मरणाचा गजर कधी सोडू नये. २ शरीराचे दोन विभाग कुणी केले

१ सप्रेमें.

तरी कीर्तनाचा रंग सोडून जाऊ नये. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हरिनामाच्या ठिकाणी जेथे अशा प्रकारचा निर्धार असतो तेथेच देव निरंतर वसती करतो. ४

४३३९ चला आळंदीला जाऊं । ज्ञानदेवा डोळां पाहूं ॥ १ ॥
होतिल संतांचिया भेटी । सुखाचिया सांगों गोष्टी ॥ २ ॥
ज्ञानेश्वर ज्ञानेश्वर । मुखीं म्हणतां चुकती फेर ॥ ३ ॥
तुम्हां जन्म नाहीं एक । तुका म्हणे माझी भाक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- फेर-जन्ममरणाच्या फेऱ्या, भाक-शपथ.

अर्थ :- चला, आळंदीला जाऊन तेथील ज्ञानदेवाना डोळे भरून पाहू. १ तेथे अनेक संतांच्या भेटी होतील. सुखाच्या चार गोष्टी सांगता येतील. २ ज्ञानेश्वर, ज्ञानेश्वर असा नामजप मुखाने केला की मग जन्ममृत्यूंच्या फेऱ्या चुकतील. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एवढे केल्यावर तुम्हांला पुन्हा जन्म येणार नाही अशी माझी शपथ आहे ४

४३४० चरणीं नमन सद्गुरूच्या पूर्ण । नित्य हरिगुण गाऊं सदा ॥ १ ॥
गोवर्धन जेणें नखीं हो धरिला । काळया नाथिला[1] महाबळी ॥ २ ॥
ऐसे हरिगुण गातो वाचेवरि । पतितासी तारी जनार्दन ॥ ३ ॥
तुका म्हणे हेंचि सज्जना जीवन । वाचेसी स्मरण गोविंदाचें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- नाथिला-त्रासला, पराभूत केला.

अर्थ :- श्रीसद्गुरुनाथांच्या चरणी पूर्ण नमन करून नेहमी श्रीहरीचे गुण गात राहू. १ ज्याने आपल्या नखावर गोवर्धन पर्वत धारण केला व ज्याने महाबलवान कालिया सर्पाला पराभूत केले त्याचे गुण गाऊ. २ हा जनार्दन पतितांना वारंवार तारत असल्यामुळे मी त्याचे गुण वरचेवर गातो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, वाणीने सतत गोविंदाचे स्मरण करणे हेच सज्जनांचे जीवन आहे. ४

४३४१ सद्गुरुवांचूनि प्रेतरूप वाणी । बोलती पुराणीं व्यासऋषि ॥ १ ॥
म्हणोनि तयाचें पाहूं नये तोंड । निगुरा अखंड सुतकाळा ॥ २ ॥
कोणे परी तया नव्हेचि सुटका । देह त्याचा लटिका जाणा तुम्ही ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसीं बोलती पुराणें । संतांचीं वचनें मागिलां हो[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- निगुरा-बिनगुरूचा, सुतकाळा-सुतकी

अर्थ :- सद्गुरूच्या कृपेवाचून तुमची वाणी प्रेतरूपाची आहे. असेच व्यासादी ऋषींनी पुराणांतून सांगितले आहे १ म्हणून जो बिनगुरूचा आहे तो अखंडपणे सुतकी समजावा, त्याचे तोंडसुद्धा पाहू नये. २ कोणत्याही प्रकाराने त्याची या भवचक्रातून सुटका होणार नाही. त्याचा देह तुम्ही खोटाच समजावा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असे अनेक पुराणे व पूर्वीचे संत बोलत आहेत. ४

४३४२ डिवेना डसेना बुजेना निर्मळ । परि अमंगळ स्वीकारीना ॥ १ ॥
परंतु गर्धव अपवित्र जाणा । पर्वकाळीं दाना देऊं नये ॥ २ ॥
डिवी लात्री बुजे बहु नेदी दुध । मुखीं नाहीं शुद्ध विष्टा खाय[3] ॥ ३ ॥

१ मथिला, २ हीं ३ भक्षी.

परंतु ते गाय पवित्र हो जाणा । पर्वकाळीं दाना देऊंजेले ॥ ४ ॥
ब्राह्मणे ब्राह्मणा सद्गुरू करावा । परि न करावा शूद्रादिक ॥ ५ ॥
तुका म्हणे देवें सांगितली सोय । म्हणोनि त्याचे पाय धरिले जीवें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – डिवेना–मारेना, गर्दभ–गाढव, डिवो–मारते, लातो–लाथा मारणारी

अर्थ – गाढव कधी कुणाला मारीत नाही, डसत नाही बुसत नाही, वरवर निर्मळही वाटते आणि अमंगल खाणे स्वीकारीत नाही १ पण त्याला अपवित्रच मानतात पर्वकाळात त्याचे दान देऊ नये २ उलट गाय ही मारते, लाथा देते, बुजते, दूधही फार देत नाही तिचे मुखही शुद्ध नसते, कारण ती विष्ठा खाते ३ परंतु ती गाय पवित्र जाणावी तिचे दान पर्वकाळात दिले जाते ४ यासाठीच ब्राह्मणाने ब्राह्मणासच सद्गुरू करावा शूद्रादिकातील करू नये ५ तुकाराम महाराज म्हणतात, मला ही सोय या देवानेच सांगितली असल्यामुळे मी त्याचे पाय जीवभावाने धरले आहेत ६

४३४३ संसारींचे ओझें वाहता वाहाविता । तुजविण अनंता नाहीं कोणी ॥ १ ॥
गीतेमाजी शब्द दुंदुभीचा गाजे । योगक्षेमकाज करणे त्याचे ॥ २ ॥
चतुर्भुजा करीं वारू शृंगारावे । सारथ्य करावे अर्जुनाचे ॥ ३ ॥
श्वपच अंत्यज भक्तिस्नेहें जाला । अचळपदीं केला ध्रुव तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – काज–कार्य, वारू–घोडे, श्वपच–चांडाळ

अर्थ – अनंता, संसाराचे ओझे वाहाण्यात तुझ्याशिवाय दुसरे कुणीही नाही १ भगवद्गीतेमध्ये या आश्वासनाच्या शब्दाची दुंदुभी गाजत राहिली आहे माझ्या भक्ताचा योगक्षेम मी करतो, ही ती ग्वाही होय २ या आश्वासनासाठी हा श्रीहरी आपल्या भक्ताच्या रथाचे घोडे शृंगारतो व त्याचे सारथ्यही करतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तीच्या प्रेमापोटी श्रीहरीने चांडाळास व अंत्यजासही अढळपदी बसवून तारले आहे ध्रुवालाही हेच पद दिले आहे ४

विवरण – आपल्या भक्ताचा सर्व योगक्षेम श्रीहरी कौतुकाने चालवितो हा 'गीतेमाजी शब्द दुंदुभीचा गाजे' तो नवव्या अध्यायात असा आहे 'अनन्याश्चिंतयंतो मां ये जनाः पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्' एकनिष्ठ चिंतन करून माझी उपासना जे सतत करतात त्याचा योगक्षेम मी चालवितो असे आश्वासन भगवंतांनी गीतेत दिले आहे यासंबंधीची दोन उदाहरणे तुकोबांनी या अभंगात दिली आहेत एक अर्जुनाचे व दुसरे ध्रुवाचे हा चतुर्भुज श्रीहरी आपल्या भक्ताचे, अर्जुनाचे घोडे शृंगारतो, त्याचे सारथ्य करतो आणि या भक्तवात्सल्याचे वर्णन करताना ज्ञानेश्वर म्हणतात, 'ऐसे अनन्यगतिकें चित्तें । चिंतितसातें मातें । जे उपासिति तयांतें । मीचि सेवीं' माझी अनन्यभावाने जे सेवा करतात माझे चिंतन करतात, त्यांची सेवा मीच करतो लहान मुलाची तहानभूक जशी आई सर्व समजते तसे आपल्या भक्ताचे सर्व काही श्रीहरीच करीत असतो आपल्या भक्ताचे वेडे कोडकौतुक श्रीहरीला असते यासंबंधी दुसऱ्या एका संदर्भात ज्ञानदेव म्हणतात 'म्हणोनि गा नमस्कारूं । तयांतें आम्ही माथां मुकुट करूं । तयाची टाच धरूं । हृदयीं आम्ही ॥ तो पहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसी मज डोळे । हातींचेनि लीलाकमळें । पूजूं तयातें ॥ दोंवरी दोनी । भुजा आलों घेउनी । आलिंगावया लागुनी । तयाचें भाग ॥'

४३४४ कवणदिस येईल कैसा । न कळे संपत्तीचा भरवसा ॥ १ ॥
चौदा चौकडिया लंकापति । त्याची कोण जाली गती ॥ २ ॥
लंकेसारिखें भुवन । त्याचे त्यासी पारखें जाण ॥ ३ ॥

तेहतीस कोटि बांदवडी । राज्य जाता न लगे घडी ॥ ४ ॥
ऐसे अहंतेने नाडिले । तुका म्हणे वाया गेले ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – बांदवडी–बंदीखाना

अर्थ – कोणता दिवस कसा येईल हे काही सांगता येणार नाही कारण या संपत्तीचा कसलाही भरवसा नसतो १ एवढा चौदा चौकड्यांचा अधिपती लंकेचा राजा रावण, पण त्याची अखेर काय गती झाली ? २ लंके सारखे नगर पण त्याचे त्यालाच पारखे होऊन बसले ३ त्याच्या बंदिखान्यात तेहतीस कोटी देव होते, पण त्याचे राज्य संपताच एका क्षणात ते सर्व मोकळे झाले ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने संपत्तीचा अहंकार ज्यानी धरला ते सर्व नाडले गेले आहेत ५

४३४५ लटिका प्रपंच वांझेची संतति । तत्वज्ञा हे भ्रांति बाधू नेणे ॥ १ ॥
सूर्यबिंबीं काय अंधार रिघेल । मृगजळें तिंबेल नभ काई ॥ २ ॥
तैसा दृश्यभास नाडळेचि डोळां । प्रकाशसोहळा भोगीतसे ॥ ३ ॥
भोग भोग्य भोक्ता नाडळेचि काहीं । चैतन्यविग्रही पूर्णकाम ॥ ४ ॥
तुका ब्रह्मानंदी आहे तुकब्रह्म । प्रपंचाचे बंड न देखे डोळां ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – रिघेल–शिरेल, तिंबेल–भिजून मऊ होईल, नाडळे–आढळत नाही

अर्थ – वांझेच्या संततीप्रमाणे हा प्रपंच लटकाच आहे जो तत्त्व जाणणारा आहे त्याला हा भ्रम कधी बाधू शकत नाही १ सूर्याच्या बिंबात काय अंधाराचा प्रवेश होईल ? मृगजळाने काय आकाश भिजून मऊ होईल ? २ त्याप्रमाणे हा दृश्य होणारा भास प्रकाशाचा सोहळा भोगणाऱ्या डोळ्यांना आढळतच नाही ३ जो चैतन्याच्या स्वरूपात पूर्णकाम होऊन गेला आहे त्याला भोग भोक्ता भोग्य असा फरक आढळतच नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, या ब्रह्मानंदात मी ब्रह्मरूप होऊन गेलो असल्यामुळे प्रपंचाचे बंड मला माझ्या डोळ्यांनी दिसतच नाही ५

४३४६ न म्हणे यो आम्ही आपुलेनि चित्तीं । निःशेष अतिप्रीति विषयीं तो ॥ १ ॥
खोटा तो विटाळ खोटा तो विटाळ । म्हणोनि गाबाळ साडियेले ॥ २ ॥
भागवतभाळूचा चित्ताचा आदर । कोरडें उत्तर चाटावें ते ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही नव्हों फजितखोर । तुटींचा व्यापार करावया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – गाबाळ–फाफटपसारा

अर्थ – ज्याला नाना विषयाच्या ठिकाणी अतिशय प्रीती वाटते तो आम्ही आमच्या चित्तात आपला म्हणणार नाही १ अशा प्रकारे विषयाचा विटाळ खोटा असल्याने आम्ही या विषयांचा फापटपसारा सोडून दिलेला आहे २ ज्याच्या चित्तास भागवतभाळूचा आदर आहे त्याच्या कोरड्या उत्तरास काय चाटायचे आहे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने तुटीचा व्यापार करायला आम्ही काही फजितखोर नाहीत ४

४३४७ अनाथाचा नाथ पतितपावन । दीनाचे रक्षण करीतसे ॥ १ ॥
ऐसे जाणोनिया नामीं विश्वासलों । भीमातिरा आलों धांवतचि ॥ २ ॥
स्नान हें करितां त्रिताप निवाले । महाद्वारा आलें मन माझें ॥ ३ ॥

तेथें अनुमात्र रीग नव्हे याचा । परतलों साचा तेथूनियां ॥ ४ ॥
पुंडलिकापाशीं येऊनि पुसिलें । चिन्मय दाटलें जनार्दन ॥ ५ ॥
तुका म्हणे आतां दुजा देव नाहीं । बाप तरी आई तोचि विठो ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– त्रिताप–अधिदैविक, अधिभौतिक व आध्यात्मिक असे तीन ताप, साचा–खरा.

अर्थ :– हा थोहरी अनाथांचा नाथ व पतितांना पावन करणारा असून दीनांचे रक्षण करीत असतो. १ असे समजल्यामुळे मी याच्या नामावर विश्वास ठेवला. आणि भीमेच्या तीरावर धावतच आलो. २ या भीमा नदीत स्नान करताच माझ्या मनाचे त्रिताप दूर झाले. व तेथून माझे मन महाद्वारापाशी आले. ३ तेथे मात्र त्याचा अणुमात्रही आत प्रवेश झाला नाही. म्हणूनच तेथूनच मी परतलो. ४ आणि पुंडलीकाला येऊन विचारले, तो लक्षात आले की, हा जनार्दन चिन्मय असून सर्वत्र व्यापून राहिलेला आहे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला दुसरा देव कुणीही नाही. माझी आई, माझा पिता हा एक विठोबाच आहे. ६

४३४८ ढालतरवारे गुंतले हे कर । म्हणे तो[1] जुंझार कैसा झुंजों ॥ १ ॥
पेटी[2] पडदळे[3] सिले टोप ओझें । हें तो जालें दुजें मरणमूळ ॥ २ ॥
बैसविलें मला येणें अश्वावरी । धांवूं पळूं तरी कैसा आतां ॥ ३ ॥
असोनि उपाय म्हणे हे अपाय । म्हणे हायहाय काय करूं ॥ ४ ॥
तुका म्हणे हा तों स्वयें परब्रह्म । मूर्ख नेणे वर्म संतचरण ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पेटी–चिलखत, सिले–डोक्यास, पडदळे–तरवार अडकविण्याचा पट्टा.

अर्थ :– भित्रा मनुष्य लढाईवर गेला तर म्हणतो, माझ्या एका हातात ढाल व दुसऱ्या हातात तरवार आहे. असे दोनही हात गुंतले असताना मी युद्ध तरी कसे करू ? १ आणि माझ्या अंगात चिलखत आहे, डोक्यावर टोप आहे, कमरेस तरवार अडकविण्याचा पट्टा आहे. या सर्वांचे ओझे म्हणजे मला दुसरे मरणाचे आमंत्रणच वाटते. २ आणि शिवाय लोकांनी मला तर घोड्यावर बसविले. पण मी शत्रूच्या मागे कसा धावू ? कसा पळू ? ३ हे सर्व खरे म्हणजे शरीर–रक्षणाचे उपाय असूनही त्याला हा अपाय वाटतो व हाय हाय करून तो शोक करतो. ४ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा प्राणी स्वयमेव परब्रह्म असून मूर्ख संतचरणांचे वर्म जाणीतच नाही. ५

४३४९ किडा अन्नाचें माणूस । त्याचा म्हणविल्या दास ॥ १ ॥
तें ही त्यासी उपेक्षीना । बोल आपुला सांडीना ॥ २ ॥
तो तूं नराचा नरेंद्र । तुजपासूनि इंद्र चंद्र ॥ ३ ॥
तुका म्हणे विश्वंभर । तुज वर्णी फणीवर ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– फणीवर–शेष.

अर्थ :– अन्नावर किड्याप्रमाणे जगणारा साधा मनुष्य, पण त्याचाही दास झाल्यावर १ तो आपल्या दासास उपेक्षीत नाही व आपला बोल सोडीत नाही २ आणि देवा, तू तर नरांचा नरेंद्र असून तुझ्यापासूनच इंद्र व चंद्र यांची निर्मिती झाली. ३ तुकाराम महाराज म्हणतात, विश्वंभरा, तुझे फणिवर शेष वर्णन करतो. ४

४३५० कोटिजन्म पुण्यसाधन साधिलें । तेणें हाता आलें हरिदास्य ॥ १ ॥
रात्रीं दिवस ध्यान हरीचें भजन । कायावाचामन भगवंतीं ॥ २ ॥

१ मी, २ पोटी, ३ पदढाळें.

ऐसिया प्रेमळा म्हणताती वेडा । ससार रोकडा बुडविला ॥ ३ ॥
'एकवीस कुळें जेणे उद्धरिली । हे तो न कळे खोली भाग्यमदा ॥ ४ ॥
तुका म्हणे त्याची पायधुळी मिळे । भवभय पळे वंदिताचि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – भवभय-ससाराचे भय

अर्थ – कोटी जन्माचे पुण्यसाधन करून श्रीहरीचे दास्य हाती आले आहे १ आता कायावाचामनेकरून रात्रदिवस या श्रीहरीचेच भजन करीन २ अशा या प्रेमळ भक्तास लोक वेडा म्हणतात त्याने आपला ससार बुडविला असे म्हणतात ३ खरे म्हणजे याने आपल्या हरिभक्तीने आपल्या एकवीस कुळाचा उद्धार केला पण त्याच्या पुण्याची खोली जे मतिमद आहेत त्याना समजत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा माणसाची पायधूळही वदन केली तरी ससाराचे भय पळून जाईल ५

४३५१ उपजला प्राणी न राहे ससारीं । बैसला सेजारी काळ उसा ॥ १ ॥
पाहा तो उदीर घेउनि जाय बोका । तैसा काळ लोका नेत असे ॥ २ ॥
खाटिकाचे घरीं अजापुत्र पाहें । कसाबाची गाय वाचे कैसी ॥ ३ ॥
तुका म्हणे काहीं करा काढाकाढी । जाती ऐसी घडी पुन्हा नये ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उसा–उशाला, अजापुत्र–बोकड, काढाकाढी–व्यवस्था

अर्थ – जो प्राणी जन्मास आला तो काही ससार करीत असताना कायम राहाणार नाही कारण त्याच्या उशाला काळ एकसारखा टपून बसला आहे १ बोका जसा उदीर घेऊन जातो त्याप्रमाणे हा काळ लोकाना घेऊन जातो ते पाहा २ खाटकाच्या घरचा बोकड कसा वाचणार ? कसावाच्या हातची गाय कशी वाचणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात म्हणून काही तरी व्यवस्था करा गलेला वेळ काही पुन येणार नाही ४

४३५२ पढरीस जाऊ म्हणती । यम थोर चिंता करि ती ॥ १ ॥
या रे नाचो ब्रह्मानदें । विठ्ठलनामाचिया छदें ॥ २ ॥
धरिली पढरीची वाट । पापें रिगालीं कपाट ॥ ३ ॥
केले भीमरेचे स्नान । यमपुरी पडिले खान ॥ ४ ॥
दुरोनि देखिली पढरी । पापें गेलीं दुरच्यादुरी ॥ ५ ॥
दुरोनि देखिले राउळ । हरुषें नाचती गोपाळ ॥ ६ ॥
तुका म्हणे नाहीं जाणे । अखड पढरिये राहाणे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – रिगालीं-शिरली, कपाट–डोंगराची गुहा, खान–चोरी, दरोडा, राऊळ–देऊळ, हरुषें–आनदाने

अर्थ – यम मोठी चिंता करीत असल्याने आपण पढरीस जाऊ या असे लोक म्हणतात १ या हो या विठ्ठलनामाच्या छदात ब्रह्मानदाने नाचू या २ एकदा या पढरीची वाट धरल्यावर पापे डोंगरकपारीत दडून राहातात ३ एकदा भीमानदीत स्नान केले की यमपुरीवर दरोडा पडतो तिकडे जावे लागत नाही ४ पढरी दुरून जरी पाहिली तरी सर्व पापे दूर निघून जातील ५ पाडुरगाचे देऊळ जरी पाहिले तरी आनदाने गोपाळ नाचू लागतात ६ तुकाराम महाराज म्हणतात, या पढरीतच अखड राहातेसे वाटते येथून परतून घरी जावेसे वाटत नाही ७

४३५३ पय दधि घृत आणि नवनीत । तैसें दृश्यजात एकपणें ॥ १ ॥
कनकाचे पाहीं अलंकार केले । कनकत्वा आले एकपणें ॥ २ ॥
मृत्तिकेचे घट जाले नानापरी । मृत्तिका अवधारीं एकपणें ॥ ३ ॥
तुका म्हणे एक एक ते अनेक । अनेकत्वीं एक एकपणा[1] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पय-दूध, दधि–दही, घृत-तूप, नवनीत–लोणी, कनकाचे–सोन्याचे.

अर्थ :– दूध, दही, तूप, लोणी हे दिसायला वेगळे असले तरी स्वरूपतः एकच आहेत सुवर्णाचे नाना दागिने केलेले पाहा पण सुवर्णाच्या नात्याने ते एकच असतात. २ मातीचे नाना प्रकारचे व आकाराचे घट केले तरी माती ही एकपणानेच असते हे समजून घ्या. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एक एक असे पदार्थ अनेक दिसत असले तरी त्यांच्या अनेकत्वात एकपणा असतो. ४

४३५४ पंधरा दिवसांमाजी साक्षात्कार जाला । विठोबा भेटला निराकार ॥ १ ॥
भांबगिरिपाठारीं वस्ति जाण केली । वृत्ति थिरावली परब्रह्मीं ॥ २ ॥
निर्वाण जाणोनि आसन घातलें । ध्यान आरंभिलें देवाजीचें ॥ ३ ॥
सर्प विंचू व्याघ्र आंगासी झोंबले । पीडूं जे लागले सकळिक ॥ ४ ॥
दीपकीं कर्पूर कैसा तो विराला । तैसा देह जाला तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:– भाबगिरीपाठारीं–भामनाथ नावाच्या डोंगराच्या सपाटीवर, दीपकीं–दिव्यात, विराला–नाहीसा झाला.

अर्थ :– पंधरा दिवसात मला साक्षात्कार झाला निराकार स्वरूपाचा विठोबा मला भेटला. १ भामनाथ नावाच्या डोंगराच्या सपाटीवर मी वसती करून राहिलो हे जाणा. त्याच ठिकाणी माझी वृत्ती परब्रह्मी स्थिरावून राहिली. २ मी निर्वाणाचे म्हणून तेथेच आसन घातले आणि श्रीहरीचे ध्यान आरंभिले ३ यानंतर माझ्या अंगास सर्प, विंचू, वाघ झोंबू लागले. या सर्वांची पीडा मला होऊ लागली ४ तुकाराम महाराज म्हणतात, दिव्यात जसा कापूर विरून जातो त्याप्रमाणे या तुकोबाचा देह ब्रह्मत्वात समरस झाला ५

४३५५ अज्ञान हा देह स्वरूपीं मीनला । सर्व वोसावला[2] देहपात ॥ १ ॥
ज्ञानस्वरूपाची सांगड मिळाली । अंतरीं पाहिली ज्ञानज्योती ॥ २ ॥
तुका म्हणे चित्त स्वरूपीं राहिलें । देह विसावलें तुझ्या पायीं ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– वोसावला–नाहीसा झाला.

अर्थ :– अज्ञानरूपी हा देह स्वरूपात विरून गेला देहपाताची भीती यामुळे सर्व नाहीशी झाली १ स्वरूपज्ञानाची सांगड मिळून अंतरंगातील ज्ञानज्योत पाहण्याचा अनुभव आला २ तुकाराम महाराज म्हणतात, माझे चित्त देवा, तुमच्या स्वरूपात राहिले आणि तुमच्या पायावर माझा देह विसावून गेला आहे. ३

४३५६ दामाजीपंताची रसद गुदरली । लज्जा सांभाळिली देवरायें ॥ १ ॥
तयाचें चरित्र परिसा हो सादरें । करितों नमस्कार संतजना ॥ २ ॥
मंगळवेढा असे वस्ति कुटुंबेंसी । व्यापारी सर्वांसी मान्य सदा ॥ ३ ॥
कर्म काय करी ठाणाचा हवाला । तों कांहीं पडला कठिण काळ ॥ ४

१ एकपणे, २ वोसरला.

धान्याचीं भाडारे होती तीं फोडिलीं । पढरी रक्षिली दुष्काळात ॥ ५ ॥
दुवळीं अनाथ तीं हीं वाचविलीं । राष्ट्रात ते जाली कीर्ति मोठी ॥ ६ ॥
मुजुम करीत होता कानडा ब्राह्मण । फिर्याद लिहून पाठविली ॥ ७ ॥
अविदाचे राज्य बेदरीं असता । कागद पाहता तलब केली ॥ ८ ॥
दामाजीपतासी धरोनि चालविले । इकडे या विठ्ठले भाव केली ॥ ९ ॥
विकते धारणे सवाईचे मोल[1] । धान्याचे सकळ द्रव्य केले ॥ १० ॥
दामाजीपताच्या नावे अर्जदास्त । लिहून खलेती मुद्रा केली ॥ ११ ॥
विठो पाडेवार भक्ता साह्य जाला । बेदरासी गेला रायापासीं ॥ १२ ॥
जोहार मायबाप पुसती कोठील । तव तो म्हणे स्थळ मगळवेढें ॥ १३ ॥
दामाजीपतानीं रसद पाठविली । खलेती ओतिली अर्जदास्त ॥ १४ ॥
देखोनिया राजा सतोष पावला । म्हणे व्यर्थ त्याला तलब केली ॥ १५ ॥
काय तुझें नाव पुसती यत्रधारी । तो म्हणे बेगारी विठा कीं जी ॥ १६ ॥
पावल्याचा जाब द्यावा मायबाप । करोनि घेतो माप म्हणती ते ॥ १७ ॥
पावल्याचा जाब दिधला लिहून । तसरीफ देऊन पाठविला ॥ १८ ॥
छत्री घोडा शिविका आभरणासहित । दिला सवे दूत पाठवूनि ॥ १९ ॥
वाटे चुकामुक जाली याची त्याची । ते आले तैसेचि मगळवेढा ॥ २० ॥
दामाजीपतासी बेदरासी नेलें । राजा म्हणे जालें कवतुक ॥ २१ ॥
काल गेला विठा बेगारी देऊन । तसरीफ देऊन जाब दिला ॥ २२ ॥
काय तुमचे काज सागा[2] जी सत्वर । बोला जी निर्धार वचनाचा ॥ २३ ॥
कैंचा विठा कोण पाठविला कधीं । काढोनिया आधीं जाब दिला ॥ २४ ॥
पहाताचि जाब हृदय फुटलें । नयन निडारले राजा देखे ॥ २५ ॥
सावळें सकुमार रूप मनोहर । माया तेणें भार वाहियेला ॥ २६ ॥
दामाजीपतासी रायें सन्मानिलें । तो म्हणे आपुलें कर्म नव्हे ॥ २७ ॥
आता तुमची सेवा पुरे जी स्वामिया । शिणविलें सखया विठोबासी ॥ २८ ॥
निरोप घेऊनि आला स्वस्थळासी । उदास सर्वांसीं होता जाला ॥ २९ ॥
दामाजीपतानीं सेविली पढरी । ऐसा त्याचा हरि निकटवृत्ति ॥ ३० ॥
तुका म्हणे विठो अनाथ कैवारी । नुपेक्षी हा हरि दासालागीं ॥ ३१ ॥

शब्दार्थ व टीपा – रसद–गावाच्या वसुलाचा सरकारात भरणा, परिसा–ऐका, हवाला–अधिकारी, मुजुम–जमाखर्चाचे काम अविदाचें–मुसलमानाचे, तलब–बोलावणे, माव–माया, अर्जदास्त–लेखी अर्ज, पाडेवार–महार, खलेती–अर्ज ठेवण्याची रेशमी पिशवी, यत्रधारी–हत्यारबद शिपाई, तसरीफ–मानाचा पोषाख, शिविका–पालखी, आभरणासहित–किमतवान दागिन्यांसहित, काज–काम, निडारले–भरून आले

अर्थ – या देवरायाने दामाजीपताची रसद सरकारकडे भरून लाज राखली १ त्याचे चरित्र नीट आदर करून ऐका हो सतजनाना मी नमस्कार करून सागत आहे २ मगळवेढा नावाचे एक गाव असून तेथील व्यापारी लोक सर्वांना मान देऊन आपल्या कुटुंबासहित राहात असत ३ एकदा मोठा दुष्काळ पडला असताना तेथील

[1] मोले, [2] बोला

अधिकाऱ्याने काय धर्म केले ते पाहा ४ धान्याची सरकारी भांडारे होती ती याने फोडली आणि दुष्काळात पंढरपुरच्या आसपासच्या लोकाचे प्राण वाचविले ५ अशा प्रकारे दुष्काळात जे अनाथ होते ते वाचविल्यामुळे त्याची कीर्ती राष्ट्रात सवत्र पसरून राहिली ६ या दामाजींच्या जमाखर्चाचे काम एक कानडी ब्राह्मण करीत असे त्याने यासबधीची फिर्याद सरकारात केली ७ बेदर येथे मुसलमानाचे राज्य त्यावेळी होते बादशहाने फिर्यादीचा कागद पाहाताच दामाजीकडे पैशाची मागणी केली ८ या गुन्हेचासाठी दामाजीपताना सरकारी नोकरानी धरून बिदरला नेले ९ आणि इकडे विठ्ठलाने आपल्या भक्तासाठी एक माया केली ९ चालू बाजाराप्रमाणे सव्वापट भाव करून लुटलेल्या धान्याचे मोल करून त्याचे द्रव्य तयार केले १० दामाजीपताच्या नावे लेखी अर्ज करून तो खलित्यास, पिशवीत घालून त्यावर मुद्राही केली ११ आपल्या भक्तास साहय करणारा विठोबा महार झाला व तो स्वत बिदर येथे पातशहापाशी गेला १२ 'जोहार मायबाप' म्हणून महाराने नमस्कार केला 'तू कुठला रे ?' म्हणून चौकशी झाली त्यावर 'मी मगळवेढ्याचा' म्हणून जबाब दिला १३ 'दामाजीपतांनी गावच्या वतुलीचा भरणा पाठविला आहे' असे म्हणून महाराने पातशहापुढे अर्जासहित द्रव्याची पिशवी ओतली १४ द्रव्य पाहून राजास सतोष वाटला आणि तो मनाशी म्हणतो, दामाजीपतांला व्यर्थ आपण पैशाची निकड लावली १५ हुजुरातबद शिपायानी महारास विचारले, 'नाव काय रे तुझे ?' त्यावर तो म्हणाला 'मी बिगारी करणारा विठा महार आहे १६ पैसे पावल्याचा जाब द्यावा लिहून' त्यावर 'पैसे मोजून घेतो' असे शिपाई म्हणाले १७ त्यावर पैसे मिळाल्याचे त्यांनी लिहून दिले आणि त्याबरोबरच मानाचा पोषाख दामाजीस दिला १८ छत्री घोडे, वस्त्रदागिने, पालखी यांच्या सहित आपल्या दूताला राजाने पाठवून दिले १९ वाटेत या दूताची व दामाजीपताची चुकामूक झाली दूत तसेच मगळवेढ्यास आले २० आणि राजाच्या सेवकानी दामाजीपतांस विदरास आणले त्याना पाहून 'मोठेच आश्चर्य झाले !' असा उद्गार राजाने काढला २१ 'काल तर तुमचा विठा बिगारी पैसे देऊन गेला त्याच्या बरोबर दूत देऊन मानाचा पोषाखही तुम्हाला पाठविला पावतीही दिली' असे राजाने म्हटले २२ आता तुमचे इथे काय काम आहे ? लौकर निर्धाराने सागा' २३ त्यावर दामाजीपत बोलले, 'कोण विठा महार ? कुणी पाठविला ? कधी आला होता ? त्यावर राजाने सविस्तर उत्तर दिले २४ उत्तर ऐकताच दामाजीपताचे हृदय फुटून निघाले त्याचे डोळे पाण्याने भरून निघाल्याचे राजाने पाहिले २५ त्या पढरीच्या विठ्ठलाचे सावळे, सुकुमार व मनोहर असे रूप त्यांच्या डोळ्यासमोर उभे राहिले त्यानेच आपल्यासाठी हा भार सहन केला २६ दामाजीपताचा मोठाच सन्मान राजाने केला त्यावर त्यानी सांगितले, 'हे काही आपले काम नव्हे २७ स्वामी आता तुमची सेवा पुरी झाली या सेवेमुळेच मी माझ्या विठ्ठलसख्याला शिणवले' २८ राजाचा निरोप घेऊन दामाजीपत परत मगळवेढ्यास आले त्यांना सर्वांविषयी उदास वाटत होते २९ यानतर दामाजीपतानी पढरपुरचा आश्रय घेतला अशा प्रकारे श्रीहरी त्यांच्या अगदी जवळचा झाला ३० तुकाराम महाराज म्हणतात याप्रमाणे हा विठोबा अनाथाचा कैवारी असून आपल्या दासाना श्रीहरी कधीही उपेक्षीत नाही ३१

४३५७ पहिली माझी ओवी ओवीन जगत्र । गाईन पवित्र पांडुरंग ॥ १ ॥
दुसरी माझी ओवी दुजें नाहीं कोठें । जनीं वनीं भेटे पांडुरंग ॥ २ ॥
तिसरी माझी ओवी तिळा नाहीं ठाव । अवघाचि देव जनीं वनीं ॥ ३ ॥
चवथी माझी ओवी यैरिले वळण । गाईन निधान पांडुरंग ॥ ४ ॥
पाचवी माझी ओवी माझिया माहेरा । गाईन निरंतरा पांडुरंग ॥ ५ ॥
साहावी माझी ओवी साहा ही आटले । गुरुमूर्ति भेटले पांडुरंग ॥ ६ ॥
सातवी माझी ओवी आठवे वेळोवेळा । बैसलासे डोळा पांडुरंग ॥ ७ ॥
आठवी माझी ओवी आठावीस युगें । उभा चद्रभागे पांडुरंग ॥ ८ ॥

नववी माझी ओवी सरलें दळण । चुकले मरण ससारींचे ॥ ९ ॥
दाहावी माझी ओवी दाहा अवतारा । न यावे ससारा तुका म्हणे ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – जगत्र–त्रैलोक्य, दुजें–दुसर द्वैत निधान–ठेवा, साठा, साहाही–सहा शास्त्रही

अर्थ – या त्रैलोक्यात एक पाडुरगच भरलेला असून त्या पवित्र देवाला मी माझी ही पहिली ओवी गाईन १ या जगतात याच्याशिवाय दुसरे कुणीच उरलेले नाहीत लोकात वनात सवत्र पाडुरगच भेटतो त्याला ही दुसरी ओवी मी गात आहे २ लोकात वनात सवत्र हाच एक भरून राहिलेला आहे याच्याशिवाय तिळभरही कुठे जागा दिसत नाही याच्यासाठी मी ही तिसरी ओवी गात आहे ३ या माझ्या चौथ्या ओवीबरोबर सर्व प्रपचाचे दळण मी जात्यात घालून माझ्या सर्वस्वाचा ठेवा हा जो पाडुरग त्याला गाईन ४ ही पाचवी ओवी माझ्या माहेरचा माझा मायबाप तो पाडुरग त्याला नित्य गाईन ५ सहा शास्त्रानीही जो आकलन होत नाही अशा गुरुमूर्ती पाडुरगाला मी सहावी ओवी गाईन ६ जो पाडुरग माझ्या डोळ्यात भरून राहिलेला आहे त्यास आठवून आठवून मी ही सातवी ओवी गाईन ७ अठ्ठावीस युगापर्यंत जो पाडुरग विटवर चद्रभागेच्या तीरावर उभा राहिलेला आहे त्यास मी ही आठवी ओवी गाईन ८ आता माझ दळणही सपले, आणि या ससारातील जन्ममरणही सपले म्हणून मी ही नववी ओवी गात आहे ९ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता या ससारात पुन कधी जन्मास येणार नाही, म्हणून ही माझी दहावी ओवी दहाही अवताराना गात आहे १०

४३५८ धरोनिया फरश करी । भक्तजनाची विघ्नें वारी ॥ १ ॥
ऐसा गजानन महाराजा । त्याचे चरणीं हालो लागो माझा ॥ २ ॥
सेंदुर शमी बहुप्रिय ज्याला । तुरा दुर्वांचा शोभला ॥ ३ ॥
उंदिर असे जयाचें वहन । माथा जडितमुगुट पूर्ण ॥ ४ ॥
नागयज्ञोपवीत रुळे । शुभ्र वस्त्र शोभित साजिरें ॥ ५ ॥
भावमोदक हरामरी । तुका भावे हे पूजा करी ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – फरश–कुऱ्हाड, वारी–दूर करतो यज्ञोपवीत–जानवे साजिरें–शोभिवत

अर्थ – हा गणपती हातामध्ये कुऱ्हाड धारण करून आपल्या भक्ताची सव विघ्ने दूर करीत असतो १ अशा या गजानन महाराजाच्या चरणी माझा माथा नम्र व्हावा २ या देवाला शमी व शेंदूर फार प्रिय आहे त्याच्या मस्तकावर दुर्वांचा तुरा फार शोभून दिसतो ३ याचे वाहन उदीर असून याच्या माथ्यावर रत्नजडित असा सपूर्ण मुकुट आहे ४ नागरूपी यज्ञोपवीत याच्या पोटावरून रुळत असून त्याचे पाढरे शुभ्र वस्त्र अतिशय शोभून दिसत आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात मी या गजाननाचे हरामर भाव मोदकाचा नैवेद्य दाखवून मोठ्या भक्तिभावाने पूजन करीत आहे ६

४३५९ नाम आहे जयापाशीं । जेथें राहे तेथेंचि काशी ॥ १ ॥
ऐसा नामाचा महिमा । जाणे वाल्मीक शकर उमा ॥ २ ॥
नाम प्रल्हादवाळ । जाणे पापी आजामेळ ॥ ३ ॥
नाम जाणे तो नारद । नामें ध्रुवा अक्षय पद ॥ ४ ॥
नाम गणिकेतें तारी । पशु गजेंद्र उद्धारी ॥ ५ ॥
नाम जाणे हणुमत । जाणताति महासत ॥ ६ ॥
नाम जाणे शुकमूर्ति । जाणे राजा परिक्षिती ॥ ७ ॥
नाम जाणे तुका । नाहीं ससाराचा धोका ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :- उमा-पार्वती, अक्षय-शाश्वत

अर्थ :- ज्याच्यापाशी श्रीहरीचे नाम आहे तेथेच काशी क्षेत्राचा निवास असतो १ असा हा नाममहिमा वाल्मीकी, शंकर व पार्वती यानी जाणलेला आहे २ प्रल्हादबाळाने नामाचाच आश्रय घेतला पापी असूनही अजामेळाने नामासच जाणले. ३ नारदाने नाममवती जाणली नामामुळेच ध्रुवाला अक्षयपदाची प्राप्ती झाली. ४ नामस्मरणामुळे गणिकेचा उद्धार झाला नामामुळेच गजेंद्रपशूचा उद्धार झाला ५ हनुमंताने नाम जाणले. मोठमोठ्या संतानीही रामनाम ओळखले ६ शुकमुनींनी नाममहिमा जाणला, परीक्षिती राजाने रामनाम जाणले. ७ तुकाराम महाराज म्हणतात, मीही श्रीहरीचे नाम जाणल्यामुळे संसारापासून मला कसलाही धोका नाही ८

४३६० बहुतां जन्मां अंतीं जन्मलासी नरा । देव तूं सोइरा करीं आतां ॥ १ ॥
करीं आतां बापा स्वहिताचा स्वार्थ । अनर्थाचा अर्थ सांडीं आतां ॥ २ ॥
सांडीं आतां कुडी कल्पनेची वाट । मार्ग आहे नीट पंढरीचा ॥ ३ ॥
पंढरीस जावें सर्व सुख घ्यावें । रूप तें पाहावें विटेवरि ॥ ४ ॥
विटेवरि नीट आनंदाचा कंद । तुका नाचे छंद नामघोषें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- सांडीं-सोडून दे, कुडी-वाईट

अर्थ :- माणसा, पुष्कळ जन्माच्या शेवटी तुला हा माणसाचा जन्म आलेला आहे तरी तू आता देवास सोयरा करून घे. १ बापा, तू आता तरी स्वहिताचा हा स्वार्थ करून घेच आणि अर्थाचा अनर्थ सोडून दे २ वाईट कल्पनेची वाट तू आता सोडून दे पंढरीचा मार्ग चांगला नीट सरळ आहे ३ पंढरीस जाऊन विटेवर श्रीहरीचे रूप पाहावे आणि त्याचे सर्व सुख भोगावे ४ तुकाराम महाराज म्हणतात, या विटेवर आनंदाचा कंद नीटपणे उभा असून मी त्याच्याच नामघोषाच्या छंदात नाचत आहे ५

४३६१ किती सांगो तरि नाइकति बटकीचे । पुढें सिंदळीचे रडतील ॥ १ ॥
नका नका करूं रांडेची संगती । नेवोनी अधोगती घालिल यम ॥ २ ॥
तुका म्हणे जरी देवीं नाहीं चाड । हाणोनि थोबाड फोडिल[1] यम ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- चाड-इच्छा

अर्थ - कितीही सांगितले तरी बटकीचे ऐकतच नाहीत पण पुढे शिंदळीचे रडतील १ तुम्ही रांडेची संगत बिलकुल करू नका नाही तर मग यम तुम्हाला अधोगतीस नेऊन घालतील. २ तुकाराम महाराज म्हणतात, देवाविषयी जर तुम्हांस इच्छा नसेल तर मग यम तुमचे थोबाड फोडून हाणील ३

४३६२ उघानु काटीवरि चोपडुची आस । नवरा राजस मिरवतसे ॥ १ ॥
जिव्हाळयाच्या काठी उबाळयाच्या मोटा । नवरा चोहटा मिरवतसे ॥ २ ॥
तुळसीची माळ नवरीचे कंठीं । नोवरा वैकुंठीं वाट पाहे ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसी नोवऱ्याची कथा । परमार्थ वृथा बुडयिला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - उघानु-तारुण्याचा बहार, काटीवरि-शरीरावर, चोपडुची-चोपडून, आस-आशा, मोट-शरीराचे गाठोडे, चोहटा-भर चौकात

१ फोडी थाळ.

अर्थ :- शरीरावर तारुण्याचा बहर उमटून आल्याने आशा प्रभावित बनली असून यामुळे नवरा शोभून मिरवत आहे. १ लौकिक संसाराच्या जिव्हाळ्यामुळे शरीराच्या गाठोड्यास वासनेचा उमाळा आलेला असून त्या योगे नवरा भरचौकात मिरवीत आहे. २ नवरी तुळशीची माळ गळ्यात घालून उभी आहे आणि नवरा तिची वाट वैकुंठात पाहात आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशी ही नवऱ्याची कथा असल्यामुळे त्याने सारा परमार्थ वृथाच बुडविला आहे ४ (बहुतेक गाथ्यातून हा अभंग क्षेपक म्हणून नोंदविला आहे याचा अर्थ समाधानकारक लागत नाही)

४३६३ न कळे महिमा वेद मौनावले । जेथें पांगुळले मनपवन ॥ १ ॥
चंद्र सूर्य ज्याचें तेज वागविती । तेथें माझी मती कोणीकडे ॥ २ ॥
काय म्या वाणावें तुझ्या थोरपणा । सहस्रवदना वर्णवेना ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही बाळ तूं माउली । कृपेची साउली करीं देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- मनपवन-वाऱ्यासारखे मन

अर्थ :- देवा, तुझा महिमा समजावून घेताना वेदही मौनावले. त्यानाही तो समजला नाही. त्याचे वर्णन करताना वाऱ्यासारखे मनही पांगळून गेले १ ज्या श्रीहरीचे तेज चंद्रसूर्य नित्य वागवतात तेथे माझी अल्प मती कुणीकडे ? २ सहस्रवदनांचा शेषही तुझे वर्णन करताना थकला, तेथे मी तुझा मोठेपणा काय वर्णन करावा ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, आम्ही बाळ असून तू आमची माऊली आहेस तू आमच्यावर कृपेची सावली कर.४

४३६४ संतचरणरज लागतां सहज । वासनेचें बीज जळोन जाय ॥ १ ॥
मग रामनामीं उपजे आवडी । सुख घडोघडी वाढों लागे ॥ २ ॥
कंठीं प्रेम दाटे नयनीं नीर लोटे । हृदयीं प्रगटे रामरूप ॥ ३ ॥
तुका म्हणे साधन सुलभ गोमटें । परि उपतिष्ठे पूर्वपुण्यें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- नीर-पाणी, गोमटें-चागले, उपतिष्ठे-प्राप्त होते

अर्थ :- संताचे चरण सहज जरी लागले तरी वासनेचे बीज जळून जाईल १ मग त्यानंतर रामनामात आवड निर्माण होते आणि त्यानतर सुखाची वाढ वरचेवर होत राहील २ मग त्याच्या प्रेमाने कठात प्रेम दाटून येते, आणि डोळ्यातून पाणी वाहू लागते व हृदयातून रामाचे रूप प्रकट होते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे रामनामाचे साधन सहज, सुलभ व फार चागले असे आहे पण याची आवड मात्र पूर्वपुण्याईने निर्माण होते ४

४३६५ विधवेसि एक सुत । अहर्निशीं तेथें चित्त ॥ १ ॥
तैसा तूं मज एकला । नको मोकलूं विठ्ठला ॥ २ ॥
सुपुत्रालागीं बाप । अवघे तेथेंचि संकल्प ॥ ३ ॥
तुका म्हणे चित्तीं । पतिव्रते जैसा पति ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- सुत-मलगा, अहर्निशीं-रात्रंदिवस, मोकलू-सोडू

अर्थ :- विधवा स्त्रीला एखादाच मुलगा असला की रात्रंदिवस तिचे चित्त त्याच्याकडेच असते १ देवा, विठ्ठला, त्याप्रमाणे तू मला एकटाच आहेस मला तू सोडू नकोस. २ सुपुत्राकडे बापाचे नेहमीच लक्ष असते सर्व संकल्प त्याच्याविषयीच असतात. ३ तुकाराम महाराज म्हणतात, पतिव्रतेच्या चित्तात जसा फक्त पतीच असतो त्याप्रमाणे मला देवा, तू एकच आहेस ४

४३६६ म्हणे विठ्ठल पाषाण । त्याच्या तोंडावरि वाहाण ॥ १ ॥
नको नको दर्शन त्याचें । गलितकुष्ट भरो वाचें ॥ २ ॥
शाळिग्रामासि म्हणे धोंडा । किडे[1] पडोत त्याच्या तोंडा ॥ ३ ॥
भावी सद्गुरु मनुष्य । त्याचे खंडो का आयुष्य ॥ ४ ॥
हरिभक्ताच्या करी चेष्टा । त्याचे तोंडीं पडो विष्ठा ॥ ५ ॥
तुका म्हणे किती ऐको । कोठवरी मर्यादा राखों ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– पाषाण–दगड, भावी–मानतो.

अर्थ :– विठ्ठलाच्या मूर्तीला जो पाषाण म्हणतो त्याच्या तोंडावर वहाण हाणावयास हवी १ त्याचे कधी दर्शन सुद्धा नको. त्याचें तोंड गलित कुष्टाने भरो २ शाळिग्रामास जो धोंडा म्हणतो त्याच्या तोंडात किडे पडोत ३ सद्गुरूस जो साध्या माणसाप्रमाणे मानतो त्याचे आयुष्य कमी होऊन जाईल ४ जो हरीच्या भक्ताची चेष्टा करतो त्याच्या तोंडात विष्ठा पडते ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारचे बोलणे मी किती ऐकू ? आणि त्याची मर्यादा तरी किती राखू ? ६

४३६७ स्वर्गींचे अमर इच्छिताति देवा । मृत्युलोकीं व्हावा जन्म आह्मा ॥ १ ॥
नारायणनामें होऊं जीवन्मुक्त । किर्तनीं अनंत गाऊं गीतीं ॥ २ ॥
वैकुंठींचे जन सदा चिंतिताति । कइं येथें येती हरिचे दास ॥ ३ ॥
यमधर्म वाट पाहे निरंतर । जोडोनियां कर तिष्ठतसे ॥ ४ ॥
तुका म्हणे पावावया पैल पार । नाममंत्र सार भाविकांसि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– अमर–देव, पैल–पलीकडचे, पार–तीर, तट.

अर्थ :– देवा, स्वर्गातील नाना देव ' आम्हास मृत्युलोकात जन्म यावा ' अशी इच्छा करतात. १ त्याना वाटते की, नारायणाच्या नामाने आपण जीवन्मुक्त होऊ, आणि कीर्तनात त्या अनंताला नाना प्रकारच्या गीतांनी गाऊ २ वैकुंठीचे लोक सतत चिंतन करतात की, आपल्याकडे श्रीहरीचे दास कधी येतील ? ३ यमधर्म तर हात जोडून तिष्ठत उभा राहून साधुसंतांची वाट पाहातो ४ तुकाराम महाराज म्हणतात, भाविक लोकाना संसार-सागराचा पैलतीर पावण्यासाठी सारभूत असा एक नाममंत्रच आहे ५

४३६८ व्यापक हा विश्वंभर । चराचर याचेनी ॥ १ ॥
पंढरिराय विटेवरि । त्याचीं घरीं पाउलें ॥ २ ॥
अवघियांचा हाचि ठाव । देवोदेवीं सकळ ॥ ३ ॥
तुका म्हणे न करीं सोस । भेदें दोष उफराटे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– चराचर–सजीव, निर्जीव, ठाव–स्थान

अर्थ :– हा विश्वंभर व्यापक असून याच्यामुळेच चराचर सृष्टी व्यापलेली आहे. १ हा पंढरीराव विटेवर उभा असून त्याची पावले धरावीत २ सर्वांना हेच एक स्थान असून याच्यातच सर्व देवदेवी सामावल्या आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात, विनाकारण दुसरा सोस करू नकोस भेद मानल्याने उलट दोष मात्र निर्माण होतात. ४

१ कोड पडो त्याच्या तोंडा.

४३६९ पसरोनि मुखें । कैसे धालो वा हारीखें ॥ १ ॥
ब्रह्मादिका दुर्लभ वाटा । आह्मा फावला राणटा ॥ २ ॥
गोड लागे काय तरि । कृपावंत जाला हरि ॥ ३ ॥
उडती थेंबुटें । अमृताहुनि गोमटें ॥ ४ ॥
गोडाहुनि गोड । जिव्हा नाचे वाटे कोड ॥ ५ ॥
लुणावुनि तुका । दावी वर्म बोलो नका ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – धालों–संतुष्ट झालो, हारीखें–हर्षाने, राणटा–रानवटाना, थेंबुटें–लहान थेंब, कोड-कौतुक

अर्थ – आम्ही या श्रीहरीच्या कृपाप्रसादासाठी मुखे पसरून आहोत त्याच्या प्राप्तीमुळे कसे हर्षाने, आनंदाने आम्ही संतुष्ट झालो १ ब्रह्मादिकानासुद्धा जी दुर्लभ वाटा आहे तो आम्हा रानवटाना सहजासहजी मिळाला २ जर हा श्रीहरी कृपावंत झाला तर सवच गोड होते ३ याच्या मुखातून जे लहान थेंब बाहेर पडतात ते अमृतापेक्षा गोड व चागले वाटतात ४ याच नाम गोडाहून गोड असल्यामुळे माझी जीभ मोठ्या कौतुकाने नाचते ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी लुणावून सागत आहे की, मी तुम्हाला या श्रीहरीचे नेमके वर्म दाखवितो तुम्ही अधिक बोलू नका ६

४३७० आमुची मिरास पंढरी । आमुचें घर भीमातिरीं ॥ १ ॥
पांडुरंग आमुचा पिता । रकुमाबाई[1] आमुची माता ॥ २ ॥
भाऊ पुंडलीक मुनि । चंद्रभागा आमुची वहिणी ॥ ३ ॥
तुका जुन्हाट मिराशी । ठाव दिला पायांपाशीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – मिरास–हक्कदारी वतनदारीचे ठिकाण, जुन्हाट–जुना

अर्थ – आमचे हक्कदारीचे ठिकाण पंढरी असून भीमेच्या तीरावर आमचे घर आहे १ हा पांडुरंग आमचा पिता असून रखुमाई ही आमची माता आहे २ हा पुंडलीक मुनी आमचा भाऊ असून येथील चंद्रभागा आमची बहीण आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे मी येथील फार जुन[illegible] श्रीहरीच्या पायी आश्रय घेतला आहे ४

४३७१ गंगा गेली सिंधुपाशीं । जरी तो ठाव नेदी तिशी ॥ १ ॥
तिणे जावे कवण्या ठाया । मज सांगा पंढरिराया ॥ २ ॥
जळ क्षोभले जलचरा । माता[2] बाळा नेदी थारा ॥ ३ ॥
तुका म्हणे आलो शरण । देवा त्वा का धरिलें मौन्य ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव–आश्रय, कवण्या–कोणत्या, जळ–पाणी थारा–आश्रय

अर्थ – गंगा मोठ्या आशेने सागरास मिळायला गेली, पण सागराने तिला आश्रय दिला नाही तर तिने कुठे जावे ? १ पंढरीराया, मग तिने कोणत्या ठिकाणी जावे ? हे तरी तुम्ही मला सांगावे २ पाण्यातील जीव पाणीच क्षोभले तर कुठे जातील ? आईच जर बालकास थारा देणार नाही तर ते जाईल तरी कुठे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा मी तुला शरण आलो आहे तू मौन का धरले आहेस ? ४

१ रखुमाई, २ माय

४३७२ बैसो आतां मनीं । आलें तैसेंचि वदनीं ॥ १ ॥
मग अवघेंचि गोड । पुरे सकळ हि कोड ॥ २ ॥
बाहेरील भाव । तैसा अंतरीं हि वाव ॥ ३ ॥
तुका म्हणे मणि । शोभा दाखवी कोंदणीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– कोड–इच्छा, वाव–अवसर.

अर्थ :– जे हे हरिनाम माझ्या तोंडात येते तेच माझ्या मनात स्थिर व्हावे १ मग सर्व काही गोडच गोड होऊन जाते, आणि सर्व इच्छा पूर्ण होतात २ बाहेरचा जसा भाव असेल त्याप्रमाणेच अंतरंगातही शिरकाव होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, कोंदणामुळेच आतील रत्नाची शोभा वाढते. ४

४३७३ वेठी ऐसा भाव । न करीं अहाच उपाव ॥ १ ॥
रूप डसवी न जिवा । अवघा येच ठायीं हेवा ॥ २ ॥
कृपणाचेपरि । लेखा पळनिमिषेवरि ॥ ३ ॥
तुका म्हणे असा[1] । संनिधचि जगदीशा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेठी–बिगारी, आहाच–व्यर्थच, उपाव–उपाय, डसवीन–ठसवीन, साठवीन, हेवा–हाव, लेखा–मोजदाद.

अर्थ :– बिगारीप्रमाणे भाव दाखवून मी व्यर्थ काही उपाय करणार नाही. १ या श्रीहरीचे रूप मी माझ्या अंत:करणात ठसवून घेईन. यासाठीच माझी सर्व हाव आहे २ एखादा कृपण मनुष्य ज्याप्रमाणे सर्वकाळ आपल्या संचित धनाची मोजदाद करतो, त्याप्रमाणे मी या श्रीहरीस एक पळभरही विसरणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, जगदीशा, तुम्ही नेहमी माझ्या जवळ असावे. ४

४३७४ सर्वसुखा अधिकारी । मुखें उच्चारी हरिनाम ॥ १ ॥
सर्वांगें तो सर्वोत्तम । मुखीं नाम हरीचें ॥ २ ॥
ऐशी उभारिली बाहे । वेदीं पाहें पुराणीं ॥ ३ ॥
तुका म्हणे येथें कांहीं । संदेह नाहीं भरवसा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा:– बाहे–बाहू, हात.

अर्थ :– जो या श्रीहरीचे नाम मनापासून उच्चारतो तो सर्व सुखांचा अधिकारी होतो. १ या श्रीहरीचे नाम मुखात असल्यामुळे तो सर्वांगांनी उत्तमच होतो २ अशा प्रकारे याचे वर्णन वेदानी व पुराणानी बाहू उभारून केलेले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या ठिकाणी कसलाही संशय नाही असा भरवसा मला आहे. ४

४३७५ जो का निर्गुण निराकार । तेणें धरियेले अवतार ॥ १ ॥
निर्गुण होता तो सगुणासि आला । भक्तिसाटीं प्रगटला ॥ २ ॥
जो का त्रिभुवनचाळक । तो हा नंदाचा बाळक ॥ ३ ॥
सोडविलें वसुदेवदेवकीसि । अवतार धरिला तिचे कुशीं ॥ ४ ॥
मारियेला कंसराणा । राज्यीं स्थापिलें उग्रसेना ॥ ५ ॥
तुका म्हणे देवादिदेव । तो हा उभा पंढरिराय ॥ ६ ॥

---
१ आस.

शब्दार्थ व टीपा – चाळक–चालक, चालविणारा

अर्थ – जो निर्गुणनिराकार आहे त्यानेच भक्तासाठी नाना अवतार धारण केले आहेत १ जो निर्गुण होता तोच सगुण बनला आहे भक्तासाठी तो असा सगुण झाला आहे २ जो या त्रिभुवनाचा चालक आहे तोच नंदाच्या घरी बालक म्हणून अवतरला आहे ३ त्यानेच वसुदेवदेवकीस तुरुंगातून सोडविले व तिच्या उदरी अवतार धारण केला ४ त्यानेच कंस राजाला ठार मारून उग्रसेनास राज्यपदी बसविले ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे हा देवाधिदेवच पंढरीराव म्हणून येथे उभा राहिलेला आहे ६

४३७६ जुनाट हे धन अंत नाहीं पार । लाता आले फार सरले नाहीं ॥ १ ॥
नारद हा मुनि शुक सनकादिक । उरले आमुप तुम्हां आम्हा ॥ २ ॥
येथूनिया धना खाती बहुत[1] जन । वाल गुंज उणे जाले नाहीं ॥ ३ ॥
तुका म्हणे धना नाहीं अंतपार । कुंटित हे चार वाचा तेथें[2] ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पार–सीमा, आमुप–पुष्कळ कुंठित–कुंठित

अर्थ – श्रीहरीचे हे नाणे अथवा धन अतिशय जुनाट असून त्याला अंतपार नाही हे धन अनेक लोक खात आले आहेत तरी ते काही संपले नाही १ हा नारदमुनी, शुक व सनकादिक यानी या धनाची अपार लूट केली असली तरी ते तुम्हाआम्हासाठी पुष्कळच उरले आहे २ येथील हे धन पुष्कळजण खात आले तरी त्यातून एक वालभर किंवा गुंजभरही ते कमी झाले नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात अशा या धनाला अंतपार नाही या ठिकाणी चारही वाणी कुंठित होऊन जातात ४

४३७७ कोडियाचे गोरेपण । तैसे अहंकारीज्ञान ॥ १ ॥
त्यासि अंतरीं[3] रिझे कोण । जवळी जाता चिळसवाण ॥ २ ॥
प्रेतदेह गौरविले । तैसे विटंबवाणें जाले ॥ ३ ॥
तुका म्हणे खाणे विष्ठा । तैशा देहबुद्धिचेष्टा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चिळसवाण–किळसवाणे

अर्थ – कोड आलेल्या माणसाचे जसे गोरेपण असते त्याचप्रमाणे ज्ञान हे अहंकारी असते १ त्याच्या जवळ जाताच आपणास किळसवाणे वाटते मग अंतरगात कोण रिझणार ? २ प्रेतास कितीही शृंगारले तरी ती त्याची विटंबनाच होय तसे ज्ञानी माणसाचे असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, देहात्मबुद्धीच्या या चेष्टा विष्ठा भक्षण करण्यासारख्या आहेत ४

४३७८ पाया जाला नारू । तेथें बांधला कापूरू । तेथें बिबव्याचे काम । अधमासि तों अधम ॥ १ ॥
रुसला गुलाम । धणी करीतो सलाम । तेथें चाकराचे काम । अधमासि तो अधम ॥ २ ॥
रुसली घरची दासी । धणी समजावी तियेसि । तेथें बटकीचे काम । अधमासि तों अधम ॥ ३ ॥
देव्हाऱ्यावरि विंचू आला । देवपूजा नावडे त्याला । तेथें पैजारेचें काम । अधमासि तों अधम ॥ ४ ॥
तुका म्हणे जाती । जातीसाटीं खाती माती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – पैजारेचे–पायतनाचे

अर्थ – पायास जर नारूचा रोग झाला तर तेथे कापूर बांधून काय उपयोग ? तेथे बिबव्याचेच काम आहे अधमास अधमच उपयोगी येतो १ गुलाम जर रुसला तर धन्याच्या सलामाचा उपयोग होणार नाही तेथे

१ बहु जतन, २ जेथें, ३ आता

चाकराप्रमाणेच त्याला वागविले पाहिजे. कारण अधम माणसाशी अधमाप्रमाणेच वागावे. २ घरातली दासी जर रुसली तर धन्याने तिची कितीही समजूत केली तरी काय उपयोग ? बटकीप्रमाणेच तिच्याशी वागावे कारण अधमास अधमच धरा. ३ वेव्हान्यावर जर विंचू आला तर त्याची पूजा करून काही उपयोग होणार नाही. त्या ठिकाणी पायतनाचेच काम आहे. कारण अधमाला अधमाप्रमाणेच वागवावे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे ज्याचीत्याची जात असून त्यासाठी भाती लावी लागते. ५

४३७९ ब्राह्मणा न कळे आपुलें तें वर्म । गंवसे परब्रह्म नामें एका ॥ १ ॥
लहानथोरासि करितों प्रार्थना । दृढ नारायणा मनीं धरा ॥ २ ॥
सर्वांप्रति माझी हेचि असे विनंती । आठवा श्रीपती मनामाजी ॥ ३ ॥
केशव नारायण करितां आचमन । तेचि संध्या स्नान कर्म क्रिया ॥ ४ ॥
नामें करा नित्य भजन भोजन । ब्रह्मकर्म ध्यान याचे पायीं ॥ ५ ॥
तुका म्हणे हेंचि निर्वाणीचें शस्त्र । म्हणोनि सर्वत्र स्मरा वेगीं ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– गंवसे–सापडते.

अर्थ :– या ब्राह्मणांना श्रीहरीच्या प्राप्तीचे वर्म समजत नाही परंतु ते परब्रह्म नामस्मरणाने सापडते. १ म्हणून लहानथोरांना मी अशी प्रार्थना करितो की, त्यांनी या नारायणास मनात दृढ धरावे. २ सर्वांना माझी हीच विनंती आहे की, त्यांनी आपल्या मनात श्रीपतीचे पाय आठवावेत. ३ आचमन करून केशव, नारायणा ही नामे घेतात त्यांतच स्नानसंध्या व क्रियाकर्म याचे सार आले आहे. ४ नामस्मरण घेऊनच रोज भजन व भोजन करीत जा. ब्रह्मकर्म व ध्यान त्याच्या पायांशी करावे. ५ तुकाराम महाराज म्हणतात, या श्रीहरीचे नाम हेच एक निर्वाणीचे शस्त्र असल्यामुळे त्याचे स्मरण सर्वत्र त्वरेने करा ६

४३८० नरदेह वांयां जाय । सेवीं सद्गुरूचे पाय ॥ १ ॥
सांडोनियां अहंभाव । धरीं भक्ती पूजीं देव ॥ २ ॥
थोराचिये वाटे । जातां भवशोक आटे ॥ ३ ॥
प्रल्हादातें तारी । तुका म्हणे तो कंठीं धरीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सांडोनियां–सोडून

अर्थ :– तुझा नरदेह वाया जाऊ नये म्हणून तू सद्गुरूचे पाय धर. १ अहंभाव सोडून या देवाचे पूजन करून त्याच्यावर भक्ती धर. २ थोर संत महात्मे ज्या वाटेने गेले आहेत त्या वाटेने गेल्यास संसारापासून होणारा शोक दूर होईल. ३ तुकाराम महाराज म्हणतात, प्रल्हादाला तारणारे हे नाम तुम्ही कंठात धारण करा ४

४३८१ संचित तैशी बुद्धि उपजे मनामधीं । सांगितलें सिद्धि नय जाय ॥ १ ॥
ज्याचा जैसा ठेवा तो त्यापाशीं धांवे । न लगतो करावे उपदेश ॥ २ ॥
घेऊन उठती आपुलाले गुण । भविष्याप्रमाणें तुका म्हणे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– नव जाय–न वजाय, जाणार नाही.

अर्थ :– जसे आपले संचित कर्म असेल त्याप्रमाणे मनामध्ये बुद्धी निर्माण होईल. कितीही सिद्धी केल्या तरी ती ठरलेल्या मार्गाने जाणार नाही. १ ज्याचा जसा पूर्वकर्माचा ठेवा असतो त्याप्रमाणे त्याची धाव होत

असते. त्याला इतर उपदेशही करावे लागत नाहीत २ तुकाराम महाराज म्हणतात, जसे भविष्यात असेल त्याप्रमाणे आपापले गुण उठून तयार होतात ३

४३८२ कुरंगीपाडस चुकलेसे वनीं । फुटे दुःखेंकरोनि हृदय त्याचें ॥ १ ॥
तैसा परदेशी जालों तुजविण । नको हे निर्वाण पाहूं माझें ॥ २ ॥
अपराधाच्या कोटि घालीं सर्व पोटीं । नको या शेवटीं उपेक्षूं गा ॥ ३ ॥
तुका म्हणे असों द्यावी माझी चिंता । कृपाळु अनंता पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कुरंगीपाडस–हरिणीचे पाडस.

अर्थ :– एखादे हरिणीचे पाडस वनात चुकलेले असावे मग त्याचे हृदय दुःखाने फुटून जाते १ देवा, त्याप्रमाणे मी तुझ्याशिवाय परदेशी झालो आहे तू आता माझा अंत पाहू नकोस २ माझे कोटी अपराध तू आता पोटामध्ये घाल आणि मला शेवटी उपेक्षू नकोस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृपाळू, अनंता, पांडुरंगा, तुम्ही माझी चिंता करीत असावे. ४

४३८३ धन्य जालो हो संसारीं । आम्ही देखिली पंढरी ॥ १ ॥
चंद्रभागे करूं स्नान । पुंडलीकाचें दर्शन ॥ २ ॥
करूं क्षेत्रप्रदक्षिणा । भेटूं संत या सज्जनां ॥ ३ ॥
उभे राहू गरुडपारीं । डोळेंभरुनी पाहों हरी ॥ ४ ॥
तुका म्हणे वाळवंटीं । महालाभ फुकासाटीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– फुकासाटीं–फुकटच

अर्थ :– आम्ही या संसारात असून धन्य झालो कारण आम्ही ही पंढरी नगरी पाहिली १ चंद्रभागेत आता आम्ही स्नान करून पुंडलीकाचे दर्शन घेऊ. २ मग क्षेत्रप्रदक्षिणा करिताना साधुसंताची भेट घेऊ ३ त्यानंतर गरुडपाराजवळ उभे राहू आणि श्रीहरीस डोळे भरून पाहू. ४ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे या वाळवटात हा महालाभ फुकटच होत असतो. ५

४३८४ पंढरीचा वारकरी । खेपा वैकुंठबंदरीं ॥ १ ॥
तया नाहीं आणखी पेणें । सदा वैकुंठीं राहाणें ॥ २ ॥
आजा गेला केल्या यात्रा । उद्धरिलें कुळा सर्वत्रा ॥ ३ ॥
तुका म्हणे नाहीं । यासि संदेह कल्पांतीं ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पेणें–मुक्कामाचे स्थान

अर्थ – जो पंढरीचा वारकरी असतो त्याच्या या वैकुंठबंदरीच्या खेपा वारंवार होतात १ त्याला याखेरीज दुसरे मुक्कामाचे ठिकाण नसते. त्याचे नेहमीच राहाणे वैकुंठाला असते. २ येथे आले गेले म्हणजे, येथील यात्रा केल्यामुळे त्याने आपल्या कुळातील सर्वांचाच उद्धार केलेला असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याविषयी संदेह कल्पांतीही मनामध्ये बाळगू नये. ४

४३८५ सोडियेल्या गाई नवलक्ष गोपाळीं । सवें वनमाळी चालियेला ॥ १ ॥
सुदीनसुवेळीं[१] भाग्याच्या उदयीं । चारावया गाई वनामाजी ॥ २ ॥

१ सुदीन समय भाग्याचा उदय.

गाईगोपाळांच्या संगें चाले हरि । क्रीडा नानापरि खेळताति ॥ ३ ॥
काठी कांबळीया मोहरीया पोंवा । सिदोरी गांजिवा खांद्यावरि ॥ ४ ॥
गोधनें सवंगडे खेळे नानापरी । आले भीमातीरीं वेणुनादा ॥ ५ ॥
तेथें उभा ठेला गोपाळांसहित । सिदोरिया सोडीत बैसे तेथें ॥ ६ ॥
तुका म्हणे ज्यांनीं आणिल्या भाकरी । नेऊनियां हरीपुढें देती ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– मोहरीया–मुरली, पुंगी, पोंवा–पावा, गांजिवा–फळे वगैरे नेण्याचे जाळे.

अर्थ :– नऊ लाख गोपाळांनी गाई सोडल्या व वनमाळी कृष्णाला घेऊन ते वनाकडे निघाले. १ चांगल्या दिवशी, चांगल्यावेळी भाग्यसूर्याचा उदय होताना गाई रानावनात चरावयास त्यांनी नेल्या. २ या गाईगोपाळांच्या बरोबर श्रीहरी निघाला व नाना प्रकारच्या क्रीडा करू लागला. ३ हातात काठी, खांद्यावरी घोंगडी, तोंडात बासरी अथवा पावा आणि खांद्यावर शिदोरी, फळे वगैरे ठेवलेले जाळे; असा त्याचा थाट होता. ४ त्याच्या भोवती गाईंचे धन असून सवंगडी नाना प्रकारचे खेळ खेळतात. बासरीचा मधुर ध्वनी काढीत ते स भीमेच्या तीरावर आले ५ त्या ठिकाणी तो गोपाळांसहित उभा राहिला व त्याने आपल्या बरोबरीच्या शिदोऱ्या सोडल्या. ते वनभोजनास बसले ६ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यांनी ज्यांनी भाकरी आणल्या होत्या त्यांनी त्यांनी त्या श्रीहरीपुढे नेऊन ठेवल्या. ७

४३८६ ज्यां जैसी आवडी त्यां तैसा विभाग । देत पांडुरंग तृप्ति जाली ॥ १ ॥
मुखींचें उच्छिष्ट हिरोनियां खातां । विस्मित विधाता देखोनियां ॥ २ ॥
दिलें जें गोपाळां तें नाहीं कोणासि । विस्मित मानसीं सुरवर ॥ ३ ॥
देव ऋषि मुनि सिद्ध हे चारण । शिव मरुद्गण चंद्र सूर्य ॥ ४ ॥
तुका म्हणे आले सकळ हि सुरवर । आनंदें निर्भर पाहावया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– सुरवर–श्रेष्ठ देव, निर्भर–पूर्ण.

अर्थ :– ज्याला जशी आवड असेल त्याप्रमाणे या पांडुरंगाने न्याहरीचा विभाग दिल्यामुळे सर्वांना तृप्तता आली. १ श्रीहरीच्या मुखातील उच्छिष्ट हिरावून घेऊन खात असताना प्रत्यक्ष ब्रह्मदेव देखील विस्मित झाला. २ या श्रीहरीने या गोपाळांना जे दिले ते इतर कुणालाच दिलेले नाही याबद्दल श्रेष्ठ देव मनात विस्मय करू लागले. ३ देव, ऋषी, मुनी, सिद्ध, चारण ( भाट ), शिव, मरुद्गण, चंद्र, सूर्य ४ तुकाराम महाराज म्हणतात, हे सर्व श्रेष्ठ देव हा परिपूर्ण आनंद पाहावयास आले ५

४३८७ आले सुरवर नानापक्षी जाले । सकळ अवतरले श्वापदवेषें ॥ १ ॥
श्वानखररूपी होऊनियां आले । उच्छिष्ट कवळ वेचिताति ॥ २ ॥
होऊनियां दीन हात पसरिती । मागोनियां घेती उष्टावळी ॥ ३ ॥
अभिमान आड घालोनि बाहेरि । तयां म्हणे हरि घ्या रे धणी ॥ ४ ॥
तुका म्हणे धणी लाधली अपार । तया सुखा पार काय सांगों ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– कवळ–घास, धणी–तृप्त होईपर्यंत.

अर्थ :– असे हे श्रेष्ठ देव अनेक वेषांनी आले. कुणी नाना पक्षी होऊन आले. इतर सर्व श्वापदांचा वेष घेऊन अवतीर्ण झाले. १ कुणी कुत्र्याची वा गाढवाची रूपे घेऊन आले आणि या काल्याच्या पंगतीमधील

उच्छिष्टाचे घास वेचू लागले २ ते दीन होऊन हात पसरू लागले व उष्टा घास मागू लागले ३ त्यांचा अभिमान दूर करून श्रीहरी त्याना ' घ्या तृप्त होईपर्यंत घ्या असे म्हणू लागला ४ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे त्याना अपार अशी तृप्ती लाभली त्याच्या सुखाला काही मर्यादा उरलेली नव्हती ५

४३८८ एकमेकीं घेती थडका । पाडी धडका[1] देऊनि ॥ १ ॥
एकमेका पाठीवरि । बैसोनि करिती ढवाळी ॥ २ ॥
हाता हात हाणें लाहीं । पळता घाई चुकविती ॥ ३ ॥
तुका म्हणे लपणी चपणी । एका हाणी पाठीवरी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – थडका–टक्कर, ढवाळी–टवाळी, थट्टा लपणी चपणी–लहान मुलाचा एक खेळ

अर्थ – हे गोपाळ एकमेकाना खेळताना टक्कर देऊ लागले आणि धडका देऊन पाडू लागले १ एकमेकाच्या पाठीवर बसून एकमेकाची टवाळी करू लागले २ एकमेकाच्या हातावर हात हाणून कुणी डाव घेतला, तर कुणी घाईने पळून चुकविला ३ तुकाराम महाराज म्हणतात लपणी चपणीच्या खेळात कुणी दुसऱ्याच्या पाठीवर थाप मारू लागले ४

४३८९ चला वळू गाई । दूर अंतरल्या भाई ॥ १ ॥
खेळ खेळता जाला शीण । कोण करी वणवण ॥ २ ॥
गाई हुकारी कान्हया । म्हणोनि लागती ते पाया ॥ ३ ॥
तुका म्हणे घ्यावे । नाम संकीर्तन बरवे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – बरवें–चागले

अर्थ – चला रे आता आपण गाई वळून आणू भाई, त्या फार दूरवर गेल्या आहेत १ आतापर्यंत खेळ खेळताना फारच शीण झाला आता आणखी वणवण कुणी करावी ? २ कन्हय्या, गाई परत बोलाव ना, म्हणून ते त्याच्या पाया पडू लागले ३ तुकाराम महाराज म्हणतात, नामसंकीर्तन हेच साधन चांगले आहे ते घ्यावे ४

४३९० नाहीं संसाराची चाड । गाऊं हरिचे नाम गोड ॥ १ ॥
हो का प्राणाचा ही घात । परि हा न सोडी अनंत ॥ २ ॥
जन्मोजन्मीं हाचि धंदा । संतसंग राहो सदा ॥ ३ ॥
तुका म्हणे भाव । तो हा जाणा पंढरिराव ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–इच्छा

अर्थ – मला आता या संसाराची काही इच्छा उरली नाही या श्रीहरीचेच गोड नाम आता गात राहू १ प्राणघात झाला तरी आता या अनंताला आम्ही सोडणार नाही २ संतांचा सत्संग जेणेकरून राहील तोच धंदा आम्ही जन्मोजन्मी करीत राहू ३ तुकाराम महाराज म्हणतात एकनिष्ठ भावाने या पंढरीरायास जाणावा ४

४३९१ हरीविण जिणें व्यर्थचि संसारीं । प्रेत अळंकारीं मिरवत ॥ १ ॥
देवाविण शब्द व्यर्थचि कारण । भांड रंजवण सभेसि गा ॥ २ ॥
आचार करणे देवाविण जो गा । सर्पाचिया अंगा मृदुपण ॥ ३ ॥
तुका म्हणे काय बहु बोलों फार । भक्तीविण नर अभाग्य कीं ॥ ४ ॥

[1] धका

शब्दार्थ व टीपा :– भाड-बडबड्या, रंजवण-करमणूक.

अर्थ :– प्रेताला अलंकार घालून मिरवीत नेणे जसे व्यर्थ, त्याप्रमाणे संसारात श्रीहरीशिवाय जगणे व्यर्थच आहे १ देवाच्या प्रेमाशिवाय इतर शब्द बोलणे व्यर्थच आहे सभेमध्ये नुसती करमणूक करण्यासाठी बडबड करून काय फायदा ? २ देवाशिवाय जे गुणी आचरण करतील त्याचे ते करणे सर्पाच्या अंगाच्या मऊपणाप्रमाणे घातक आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी आता यालेरीज फार काय बोलू ? भक्तीच्या शिवाय मनुष्य अभागीच मानावा लागेल ४

४३९२ जालासि पंडित पुराण सांगसी । परि तूं नेणसी मी हें कोण ॥ १ ॥
गाढवभरी पोथ्या उलथिशी पानें । परि गुरुगम्यखुणें नेणशी बापा ॥ २ ॥
तुका कुणबियाचा नेणे शास्त्रमत । एक पंढरीनाथ विसंबेना ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– नेणशी–जाणीत नाही.

अर्थ :– तू मोठा पंडित झालास आणि पुराणही सागत राहिलास. पण मी कोण हे काही तू जाणीत नाहीस १ गाढवभर पोथ्या जमा करुन त्याची पाने जरी तु उलटलीस तरी बापा, गुरूच्या मुखाशिवाय तुला काहीच समजणार नाही २ तुकाराम महाराज म्हणतात मी कुणब्याचा असून इतर शास्त्रमत काही मी जाणीत नाही. पण या पंढरीनाथास मात्र कधीही विसंबत नाही ३

४३९३ स्वप्नींच्या व्यवहारा काळातर लेखा । जागृतीसि रुका गांठी नाही ॥ १ ॥
तेवीं शब्दज्ञाने करिती चावटी । ज्ञान पोटासाठीं विको नये ॥ २ ॥
बोलाचीच कढी बोलाचाची भात । जेवूनियां तृप्त कोण जाला ॥ ३ ॥
कागदीं लिहिली नांवाची साकर । चाटितां मधुर केवीं लागे ॥ ४ ॥
तुका म्हणे जळो जळो त्याचे ज्ञान । यमपुरी कोण दंड साहे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– थोड्याफार फरकाने मागील अभगक्रमाक ३८७१ पाहावा

४३९४ भूत नावरे कोणासी । पुंडलीकें खिळिलें त्यासी ॥ १ ॥
समचरण असे विटे । कटिकर उभें नीट ॥ २ ॥
वाळुवंटीं नाचती संत । प्रेमामृतें डुल्लत ॥ ३ ॥
तुका म्हणे पुंडलीका । भक्तिबळें तूंचि निका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – कटिकर–कटीवर कर, कमरेवर हात, निका–श्रेष्ठ, चागला

अर्थ – हे श्रीहरीचे भूत कुणासही आवरत नाही. परंतु या पुंडलीकाने मात्र त्याला चागलेच खेळवले आहे १ हे समचरण ठेवून, कमरेवर हात धेऊन विटेवर नीटपणे उभे राहिले आहे. २ याच्याच प्रेमाने वाळवटात संत नाचताना डुलतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, पुंडलीका, तूच या भक्तिबळाने श्रेष्ठ बनला आहेस ४

४३९५ आपुले वरदळ नेदा । एवढी गोविंदा कृपणता ॥ १ ॥
यावर बा तुमचा मोळा । हा गोपाळा फळेना ॥ २ ॥
सेवा तरी घेतां साग । चोरिले अंग सहावेना ॥ ३ ॥
तुका जरी क्रियानष्ट । तरी कां कष्ट घेतसां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- वरदळ-हलके, निरस, वरकड सामान, मोळा-रीत, सांग-परिपूर्ण.

अर्थ :- गोविंदा, तुमची कृपणता तरी पाहा केवढी. आपल्या जवळची किरकोळ गोष्टही तुम्ही देत नाही. १ गोपाळा, यावर तुमची रीत काही समजत नाही हो २ आमच्याकडून सेवा मात्र परिपूर्ण घेता तुम्ही. आम्ही थोडे अंग चोरले तरी तुम्हांला ते सहन होत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही जर असे कृपानष्ट आहात तर मग एवढे कष्ट तरी का घेता हो ? ४

४३९६ भीमातिरींचा नाटक । यानें लावियेलें चेटक ॥ १ ॥
मन बुद्धि जाली ठक । नेणे संसाराची टुक ॥ २ ॥
कैसी प्रसंगीक वाणी । प्रत्यादर कडसणी ॥ ३ ॥
तुका म्हणे मोठा ठक । जेथें तेथें उभा ठाके ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- ठक-फसवणूक करणारी, टुक-शिस्त, रीत, कडसणी-निवड, शोध, विचार.

अर्थ :- भीमातीरावरील श्रीहरीच्या या नाटकी लीलांनी मनाला चेटूक केल्याप्रमाणे भुलविले आहे. १ याच्यामुळे मन व बुद्धी ठक बनल्याने संसाराची शिस्त माहीत नाहीशी झाली आहे २ प्रासंगिक अशी वाणी कशी प्रकट होते याचा आदराने शोध घ्यावा. ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा हा श्रीहरी महाठक असून जेथे तेथे उभा राहातो. ४

४३९७ कां रे दाटोन होतां वेडे । देव आहे तुम्हांपुढें ॥ १ ॥
ज्यासि पाठ नाहीं पोट । करी त्रैलोक्याचा घोंट ॥ २ ॥
तुमची तुम्हां नाहीं सोय । कोणाचें वा काय जाय ॥ ३ ॥
तुका गातो नामीं । तेथें नाहीं आम्ही तुम्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- दाटोन-मुद्दामच

अर्थ - लोकहो, तुम्ही मुद्दामच वेडे का होता हो ? देव तर तुमच्यापुढेच उभा आहे. १ ज्याला पाठ नाही की पोट नाही, तो त्रैलोक्यास एकाच घोटात गिळू शकतो २ तुमची तुम्हीच आपली सोय करवून घेत नाही. येथे कुणाचे काय बरे जाणार ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी येथे तुम्हीआम्ही असे न मानता मी या देवाचे नाम गातो. ४

४३९८ नव्हे हें कवित्व टांकसाळी नाणें । घेती भले जन भले लोक ॥ १ ॥
लागलासे झरा पूर्ण नवनीतें । सेविलियां हित फार होय ॥ २ ॥
तुका म्हणे देवा केला बलात्कार । अंगा आलें फार महंतपण ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- नवनीतें-लोण्याला

अर्थ :- हे माझे कवित्व काही टांकसाळीतील नाण्याप्रमाणे कृत्रिम नाही याचा आदर चांगले चांगले लोक करीत आहेत. १ जणू नवनीताला पूर्ण झराच लागलेला आहे याचे सेवन केल्याने तुमचे फार हित होईल. २ तुकाराम महाराज म्हणतात, या देवाने बलात्कार केल्यामुळे माझ्या अंगी महंतपण मोठेच आले आहे. ३

४३९९ सांवळें सुंदर पाहें दृष्टीभरि । ऐसें कांहीं करीं मन माझें ॥ १ ॥
मना तुज ठाव दिला त्याचे पायीं । राहें विठाबाईसवें सदा ॥ २ ॥
मना नको धरूं आणिकांचा संग । नाहीं पांडुरंग ज्यां मनीं ॥ ३ ॥
वरपंग भाव नको म्हणे तुका । करीं प्राणसखा नारायण ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– ठाव–आश्रय, स्थान, वरपंग–वरवरचा, कृत्रिम.

अर्थ :– हे सावळे व सुंदर असे श्रीहरीचे रूप दृष्टिभरून पाहीन अशा प्रकारचे माझे मन करावेस १ मना, तुला मी त्याच्या पायीच आश्रय दिलेला आहे. तू या विठाबाईबरोबरच सतत राहावेस. २ मना, ज्याच्या मनात पांडुरंग नाही अशांचा संग तू धरू नकोस. ३ तुकाराम महाराज म्हणतात, उगाच वरवरचा भाव धरू नकोस. या नारायणाला प्राणसखा मान. ४

४४०० एकली वना चालली राना । चोरुनि जना घराचारी ॥ १ ॥
कोणी नाहीं संगीसवें । देहभावें उदास ॥ २ ॥
जाउनि पडे दुर्घटवनीं । श्वापदांनीं वेढिली ॥ ३ ॥
मार्ग न चले जातां पुढें । भय गाढें उदेलें ॥ ४ ॥
मागील मार्गे अंतरलीं । पुढील चाली खोळंबा ॥ ५ ॥
तुका म्हणे चिंतीं[1] यासि । हृदयस्थासी आपुल्या ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– घराचारी–गृहस्थाश्रमी, गाढें–मोठे, उदेलें–उदयास आले.

अर्थ :– कुणी एक गृहस्थाश्रमी बाई घरातील लोकांना चोरून एकटीच रानावनात निघाली १ ती देह-भावाच्या बाबतीत उदास असून तिच्या बरोबरही कुणी नव्हते. २ चालता चालता ती दुर्घट अशा वनात जाऊन पडली आणि हिंस्र श्वापदांनी वेढली गेली. ३ तिला आता पुढे जायला मार्ग दिसेना आणि पुढे तर मोठेच भय उभे राहिलेले दिसले ४ मागची माणसे मागे अंतरली आणि पुढच्या चालीत अंतर पडले ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा वेळी तू आपल्या हृदयस्थ श्रीहरीस चिंतावेस. ६

४४०१ पडली घोर रजनी । संगी कोणी नसेचि ॥ १ ॥
पहा हो कैसें चालविलें । पिसें गोवलें लावूनि ॥ २ ॥
कोठें लपविलें तें अंग । होता संग दिला तो ॥ ३ ॥
मज कधीं नव्हतें ठावें । दोही भावें वाटोळें ॥ ४ ॥
तुका म्हणे कैंची उरी । दोहीपरि नाडिलें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– रजनी–रात्र, संगी–सोबती, पिसें–वेड, गोवलें–गुतवले.

अर्थ :– घोर अशी रात्र झाली आहे. सोबतीला बरोबर कुणीच नाही. १ या श्रीहरीने मला आपल्या मोहात गुंतवून वेड लावून पाहा कसे चालविले आहे. २ मला सोबत दिली तर मग ते अंग कुठे लपविले. ३ मला काही माहीत नसल्यामुळे प्रपंच व परमार्थ या दोनही बाजूंनी माझे वाटोळे झाले आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे दोनही बाजूंनी फसल्यावर मग शिल्लक तरी काय उरणार आहे ? ५

१ चिंती.

४४०२ उदार कृपाळ पतितपावना[1] । ब्रिदें नारायणा जातो वांया ॥ १ ॥
वर्णिलासि श्रुति नेणे तुझा पार । राहे मौनाकार नेति ऐसें ॥ २ ॥
तेथें माझा धांवा पावे कोणीकडे । अदृष्ट हें पुढें वोडयलें ॥ ३ ॥
कोण ऐसा भक्त लाधला भाग्यासी । आठवण ऐसी द्यावी तुज ॥ ४ ॥
तुका म्हणे नको पाहों माझा अंत । जाणोनि हे मात उडी घालीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– पार–अंत, नेति–असा नाही असे, मात–गोष्ट

अर्थ :– नारायणा; उदार, कृपाळू, पतितपावन ही तुझी ब्रीदे वायाच जात आहेत १ वेदश्रुती तुझा अंत-पार लागत नाही असेच वर्णन करतात. ' असे नाही ' असे म्हणत त्या मौन होऊन राहातात. २ अशा स्थितीत माझा धावा तुझ्याकडे कसा पोचणार ? अदृष्ट पुढे काय ओढवणार आहे किंवा माझे अदृष्ट ( प्रारब्ध ) पुढे निर्माण झाले असल्याने माझा धावा कसा पोचणार ? ३ अशा कोणत्या भक्तास हे भाग्य लाभले आहे की त्याची आठवण तुला द्यावी. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तू माझा अंत पाहू नकोस. हे सर्व जाणून माझ्या रक्षणासाठी उडी घालून धावत ये ५

४४०३ ज्याचें जैसें भावी मन । त्यासि देणें दरुषण ॥ १ ॥
पुरवूं जाणे मनिची खूण । समाधान करोनि ॥ २ ॥
आपणियातें प्रगट करी । छाया वरी कृपेची ॥ ३ ॥
तुका म्हणे केले[2] दान । मन उन्मन हरिनामीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– दरुषण–दर्शन.

अर्थ :– ज्याच्या मनात जसा भाव असतो त्याप्रमाणे हा श्रीहरी त्याला दर्शन देतो. १ हा आपल्या भक्तांच्या मनातील खूण जाणून त्याप्रमाणे समाधान करीत असतो २ भक्तांसाठी आपण स्वतः होऊन हा प्रकट होतो आणि त्यांच्यावर कृपेची छाया करीत राहातो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी सर्वस्वाचे दान केले असल्याने माझे मन श्रीहरीच्या नामात एकतान होऊन गेले आहे. ४

४४०४ कां रे पुंडचा मातलासी । उभें केलें विठ्ठलासि ॥ १ ॥
वस्ति क्षीरसागरवासीं । आला उभा पंढरीसि ॥ २ ॥
भक्ती देखोनि निकट । देवें सोडिलें वैकुंठ ॥ ३ ॥
तुका म्हणे बळी । तूंचि एक भूमंडळीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निकट–नि सीम, बळी–बलवान.

अर्थ:– अरे पुंडचा, तू माजलास की काय ? या माझ्या विठ्ठलास का रे उभे केलेस ? १ याची वसती खरे म्हणजे क्षीरसागरातली, पण हा तुझ्यासाठी पंढरीस येऊन उभा राहिला आहे. २ तुझी नि सीम भक्ती पाहून या देवाने वैकुंठ सोडले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, या भूमंडळावर तूच एक बलवान आहेस. ४

४४०५ शेवटींची विनंती । ऐका ऐका कमळापती ॥ १ ॥
काया वाचा मन । चरणीं असे समर्पण ॥ २ ॥
जीवपरमात्मा ऐक्यासि । सदा वसो हृदयेंसी ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । कंठीं वसावे केशवा ॥ ४ ॥

१ पतितपावन, २ केले.

शब्दार्थ व टीपा :– वसावें–निवास करावा.

अर्थ :– कमलापती, माझी ही एक शेवटची विनंती ऐका ना. १ मी माझी काया, वाचा व मन हे सर्व तुमच्या चरणी समर्पण केले आहे. २ जीव व परमात्मा याचे ऐक्य नेहमी तुझ्या हृदयात वसून राहावे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, केशवा, तुझे नाम माझ्या कंठात सदा वसावे. ४

४४०६ माझें परिसावें गाऱ्हाणें । चित्त द्यावें नारायणें ॥ १ ॥
माझे हृदयींचें वर्म । देवा जाणशी तूं कर्म ॥ २ ॥
सबाह्यअंतरसाक्ष । ऐसा वेदीं केला पक्ष ॥ ३ ॥
तुका म्हणे नेणां । काय सांगों नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – परिसावें–ऐकावे.

अर्थ :– नारायणा, चित्त देऊन तुम्ही माझे हे गाऱ्हाणे ऐकावे १ देवा, माझे कर्म आणि माझ्या हृदयाचे वर्म तू जाणतोस. २ अंतर्बाह्य स्वरूपात तू साक्षी असतोस असे वेदानी प्रतिपादन केले आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, मी काय सागतो ते तुम्ही जाणीत नाही काय ? ४

४४०७ गुरुचिया मुखें होईल ब्रह्मज्ञान । न कळे प्रेमखुण विठोबाची ॥ १ ॥
वेदातें विचारा पुराणातें पुसा । विठोबाचा कैसा प्रेमभाव ॥ २ ॥
तुका म्हणे सांडा जाणिवेचा शीण । विठोबाची खूण जाणती संत ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– पुसा–विचारा, सांडा–सोडा

अर्थ :– श्रीगुरूच्या मुखाने ब्रह्मज्ञान होईल, पण या विठोबाची प्रेमखूण काही समजणार नाही. १ तुम्ही वेदांना विचाराल, पुराणांना विचाराल, तरी विठोबाचा प्रेमभाव तुम्हांस कसा समजणार ? २ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून तुम्ही ज्ञानाचा शीण सर्व सोडून द्यावा. कारण या विठोबाची खूण फक्त संतच जाणतात. ३

४४०८ देव आतां आम्हीं केला असे ऋणी । आणिका वांचूनि काय गुंता ॥ १ ॥
एकाचें आर्जव करूं एकनिष्ठ । आणिकांचा बोभाट कासा नये ॥ २ ॥
बहुतांचे आर्जव केलिया खटपट । नाहीं हा शेवट शुद्ध होत ॥ ३ ॥
पुरता विचार आणोनी मानसीं । अंतरलों सर्वांसि पई देखा ॥ ४ ॥
तुका म्हणे देवा चरणीं असो भाव । तेणें माझा जीव संतोष हा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .– आणिकाचा–इतराच्या.

अर्थ :– आता या देवाला आम्ही ऋणी करून ठेवले आहे त्याच्यावाचून इतर देवाचा गुंता करण्यात काय अर्थ ? १ या एकाच देवाचे आर्जव एकनिष्ठपणे करू. इतराचा बोभाटा आमच्या कामास येणार नाही २ इतर पुष्कळांचे आर्जव केल्याने व्यर्थ खटपटच होत असते त्यामुळे शुद्ध हेतू मात्र शेवटास जात नाही. ३ इतर सर्व देवांना मी मनात पूर्ण विचार करूनच अंतरलो आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, तुमच्याच चरणी माझा एकनिष्ठ भाव असो त्यामुळेच माझ्या जीवास संतोष होईल. ५

४४०९ पापाची वासना नको दावूं डोळां । त्याहूनि अंधळा बराच मी ॥ १ ॥
निंदेचें श्रवण नको माझे कानीं । बधिर करोनि ठेवीं देवा ॥ २ ॥

अपवित्र वाणी नको माझ्या मुखा । त्याजहूनि मुका बराच मी ॥ ३ ॥
नको मज कधीं परस्त्रीसंगति । जनांतुन माती उठतां भली ॥ ४ ॥
तुका म्हणे मज अवघ्याचा कांटाळा । तूं एक गोपाळा आवडसी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– माती–देह, कांटाळा–कंटाळा.

अर्थ :– देवा, माझ्या डोळ्याकडून पापदायक वासना पाहाणे नको त्यापेक्षा मी आंधळा राहिलेलाच बरा १ माझ्या कानांवर कुणाची निंदा येऊ नये, त्यापेक्षा मी बहिरा झालो तर बरे. २ माझ्या मुखातून अपवित्र वाणी बाहेर येऊ नये; त्यापेक्षा मी मुका राहिलेला बरा. ३ मला कधी परस्त्रीची संगत नको. त्यापेक्षा या जगातून माझा देह नाहीसा झालेला बरा. ४ तुकाराम महाराज म्हणतात, मला सर्वांचा कंटाळा असून गोपाळा, तूच एक तेवढा मला आवडतोस. ५

४४१० कीर्त्तनाचा विकरा मातेचें गमन । भाड खाई धन विटाळ तो ॥ १ ॥
हरिभक्ताची माता हे हरिगुणकीर्त्ति । इजवर पोट भरिती चांडाळ ते ॥ २ ॥
अंत्यज हा ऐसें कल्पांतीं करीना । भाड हे खाईना जननीची ॥ ३ ॥
तुका म्हणे त्याचें दर्शन ही खोटें । पूर्वजासि नेटें नरका धाडी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– विकरा–विक्री, भाड–लाच, कुटणपणा करून मिळविलेले द्रव्य, नेटें–त्वरेने.

अर्थ :– हरिकीर्तनाची विक्री करणे, त्यापासून पैसा मागणे हे मातेशी गमन केल्याप्रमाणे आहे. अशा कारचे धन हे वाईट मार्गाचे असल्याने त्याचा विटाळच होतो. १ श्रीहरीची गुणकीर्ती ही हरिभक्ताची माता असते. इच्यावर जे पोट भरतात ते चांडाळच होत. २ अंत्यजही आपल्या आईस विकून पैसे घेईल असे कल्पांतीही घडणार नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे कथेची विक्री करणारे लोक असतात, त्याचे दर्शनही मला खोटे वाटते. तो आपल्या कृत्याने आपल्या पूर्वजास नरकास धाडतो. ४

४४११ पंढरी पावन जालें माझें मन । आतां करूं ध्यान विठोबाचें[1] ॥ १ ॥
आतां ऐसें करूं नाम गाऊं गीतीं । सुखाचा सांगाती विठो करूं ॥ २ ॥
संग करूं त्याचा तो सखा आमचा । अनंतां जन्मांचा मायबाप ॥ ३ ॥
परतोनि सोई घरीं कां रे मना । विठ्ठलचरणा घालीं मिठी ॥ ४ ॥
घातलीसे मिठी नाहीं भक्तिभाव । उदार पंढरिराव तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– सांगाती–सोबती

अर्थ :– या पंढरीस आल्यानंतर माझे मन पावन होऊन गेले आहे. आता आपण या विठोबाचे सुखाने ध्यान करू. १ आता असे करू या की या श्रीहरीचे नाम गीतात गाऊ आणि या विठोबाला सुखाचा सोबती करू.२ तो आमचा सखा असल्यामुळे आम्ही त्याची सोबत करू. तो आमच्या अनंत जन्मांचा मायबाप आहे. ३ मना, एकदा विठ्ठलचरणांवर मिठी घातली की मग तेथून परतण्याची आशा धरू नकोस ४ तुकाराम महाराज म्हणतात, माझ्याजवळ फारसा भक्तिभाव नसला तरी हा पंढरीराव उदार असल्यामुळे मी त्याच्या चरणांना मिठी घातलेली आहे.५

४४१२ येईं गे विठ्ठले विश्वजीवनकळे । सुंदर घननीळे पांडुरंगे ॥ १ ॥
येईं गे विठ्ठले करुणाकल्लोळे । जीव कळवळे भेटावया ॥ २ ॥

१ विठ्ठलाचे

न लगती गोड आणीक उत्तरें । तुझें प्रेम झुरे भेटावया ॥ ३ ॥
तुका म्हणे धांव घालीं कृष्णाबाई । क्षेम चहूंबाहीं देईं मज ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – क्षेम–आलिंगन चहूबाहीं–चारही हातानी

अर्थ – सर्व विश्वाला जीवनकला देणाऱ्या विठ्ठले, सुंदर घननीळे, पांडुरंगे तू माझ्यासाठी धावत ये. १ करुणेच्या कल्लोळे, विठ्ठले, तू धावत ये तुला भेटण्यासाठी माझा जीव कळवळून गेला आहे २ तुला भेटण्यासाठी प्रेमाने जीव झुरत असल्यामुळे इतर कुणाचीही उत्तरे गोड वाटत नाहीत ३ तुकाराम महाराज म्हणतात, कृष्णाबाई, तू धाव घाल व चारही हातानी मला आलिंगन दे ४

४४१३ कटावरी कर कासया ठेविले । जननी विठ्ठले जीवलगे ॥ १ ॥
शंखचक्रगदाकमळमंडित । आयुधें मंडित कृष्णाबाई ॥ २ ॥
क्षण एक धीर होत नाहीं चित्ता । केव्हां पंढरिनाथा भेटशील ॥ ३ ॥
तुका म्हणे हेंचि करीं देई क्षेमा । तईंच विश्रामा पावईन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – क्षेमा–आलिंगन, तईं–तेव्हा

अर्थ :– विठ्ठले, माऊली, जीवलगे, तू आपल्या कमरेवर हात का गे ठेवलेस ? १ कृष्णाबाई, शंख, चक्र, गदा, कमळ या आयुधानी तू शोभणारी आहेस २ पंढरीनाथा, तू मला केव्हा भेटशील रे ? तुझ्यावाचून माझ्या चित्तास एक क्षणभरही धीर वाटत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, तू हेच कर की तू मला प्रेमाने आलिंगन दे तेव्हाच मला खरी विश्रांती मिळेल ४

४४१४ आतां मोकलावे नव्हे हे उचित । तरी कृपावंत म्हणवावें ॥ १ ॥
पूर्वी भक्त जाले सर्व आपंगिले । नाहीं उपेक्षिले तुम्हीं कोणी ॥ २ ॥
माझिया वेळेसि का गा लपालासि । विश्व पोसितोसि लपोनियां ॥ ३ ॥
करावी म्हणावी सर्वां भूतीं दया । तरी भेटावया येईन मी ॥ ४ ॥
तरी माझे हातीं देईं मनबुद्धि । जरि दयानिधि येशील तूं ॥ ५ ॥
तुका म्हणे तूंचि अवघा सूत्रधारी । माझी सत्ता हरी काय आहे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – मोकलावे–सोडून द्याव, आपंगिले–सांभाळले

अर्थ :– देवा, तुला कृपावंत म्हटले जाते असे असून तू आम्हास सोडून द्यावेस हे काही योग्य नाही १ पूर्वीच्या सर्व भक्तांना तुम्ही सांभाळले तुम्ही कुणाचीच कधी उपेक्षा केलेली नाही २ असे असताना माझ्याच वेळेस का लपून राहिलास रे ? पण लपलास तरी तू विश्वाचे पोषण करीत असतोस ३ मी सर्वांभूती दया करावी. तरच मी भेटावयास येईन ४ असे जर तू म्हणशील तर मग देवा, माझी मन-बुद्धी माझ्या हातात दे ना. तू दयानिधी, माझ्यासाठी धावून ये ५ तुकाराम महाराज म्हणतात, तूच सर्व प्रकारचा सूत्रधार आहेस श्रीहरी, माझ्या हातात काय सत्ता आहे रे ? ६

४४१५ माझें कोण आहे तुजविण देवा । मुकुंदा केशवा नारायणा ॥ १ ॥
वाट पाहतसे कृपेच्या सागरा । गोपीमनोहरा पांडुरंगा ॥ २ ॥
साच करीं हरी आपुली ब्रिदावळी । कृपेनें सांभाळीं महाराजा ॥ ३ ॥

क्षमा करीं सर्व अपराध माझा । लडिवाळ मी तुझा पांडुरंगा ॥ ४ ॥
साह्यच होसी तरी जाती साही वैरी । मग सुखें अंतरीं ध्यान तुझें ॥ ५ ॥
कृपा करोनि देईं दया क्षमा शांती । तेणें तुझी भक्ति लाभईल ॥ ६ ॥
माझें हें सामर्थ्य नव्हे नारायणा । जरी कांहीं करुणा येइल तुज ॥ ७ ॥
तुका म्हणे मज कैसें आपंगा जी । आपुलेसें करा जी पांडुरंगा ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :– साच–खरी, अंतरीं–अंत करणात, आपगा–साभाळा की.

अर्थ :– देवा, मुकुंदा, नारायणा, केशवा, तुझ्या शिवाय माझे दुसरे कोण आहे रे ? १ कृपेच्या सागरा, गोपीमनोहरा, पांडुरंगा, मी तुझीच वाट पाहात आहे २ श्रीहरी, आपली ब्रीदावळी खरी करून दाखवा.; आणि महाराजा, मला कृपेनें सांभाळा ३ माझे सर्व अपराध तू क्षमा करावेस. पांडुरंगा, मी तुझे लडिवाळ लेकरू आहे.४ तू जर मला साह्यभूत होशील तर माझ्या चित्तातील कामक्रोधादी सहा शत्रू नाहीसे होतील मी मोठ्या सुखाने चित्तात तुझेच ध्यान करीन ५ देवा, कृपा करून तू मला दया, क्षमा, शांती यांची प्राप्ती करून दे. त्यामुळेच तुझी भक्ती मला लाभेल. ६ नारायणा. हे काही माझे सामर्थ्य नव्हे. तुला जर काही करुणा येईल तरच हे होईल. ७ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, मला आपलेसे करून सांभाळावे. ८

४४१६ अपराध जाले जरी असंख्यात । तरी कृपावंत नाम तुझें ॥ १ ॥
तुझें लडिवाळ तुज कृपा यावी । म्यां वाट पाहावी कवणाची ॥ २ ॥
मायबाप माझा रुखमादेवीवर । हा दृढ निर्धार अंतरींचा ॥ ३ ॥
तुका म्हणे कोणे गोष्टीचें संकष्ट । न घालीं मज भेट नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– अंतरींचा–चित्ताचा

अर्थ :– देवा, माझे असंख्यात जरी अपराध झाले असले तरी तुझे नाव कृपावंत आहे. १ मी तुझा लडिवाळ असल्यामुळे तुला माझी करुणा यावी, तू कृपा करावीस तू जर हे केले नाहीस तर मी वाट तरी कुणाची पाहावी रे ? २ हा रुखमादेवीवर माझा मायबाप असल्याचा दृढ निश्चय माझ्या चित्ताचा आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, कोणत्याही गोष्टीचे संकट न घालता मला तू भेट दे ४

४४१७ आधीं कां मज लावियेली सवे । आतां न राहावे तुजविण ॥ १ ॥
पहिलेंचि तोंडक कां गा नाहीं केलें । आतां उपेक्षिलें न सोडीं मी ॥ २ ॥
कृपेच्या सागरा न पाहें निर्वाण । जालों तुजवीण कासावीस ॥ ३ ॥
तुका म्हणे कोठें गुंतलेति हरी । येईं झडकरी पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सवे–सवय, तोंडक–तटा, भाडण

अर्थ :– देवा, आधीच तुम्ही मला तुमची सवय का हो लावली ? आता मात्र मी तुमच्याशिवाय राहाणार नाही. १ पहिल्यानेच भाडणतटा निर्माण करून ताटातूट का नाही केली ? आता जर तुम्ही उपेक्षा केली तर मी सोडणार नाही २ कृपेच्या सागरा, तू आता आणखी अंत पाहू नकोस तुझ्याशिवाय मी फारच कासावीस झालो आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, तुम्ही कुठे गुंतला आहात ? पांडुरंगा, तू लौकर धावत ये ४

४४१८ या रे पांडुरंगा केव्हा येशी भेटी । जाहालों हिंपुटी तुजवीण ॥ १ ॥
तुजवीण सखें न वटे मज कोणी । वाटते चरणीं घालूं मिठी ॥ २ ॥
ओवाळावी काया चरणांवरोनि । केव्हा चक्रपाणी भेटशील ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी पुरवीं आवडी । वेगीं घालीं उडी नारायणा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– हिंपुटी–कष्टी, दु:खी, न वटे–वाटत नाही, काया–शरीर

अर्थ :– अरे पांडुरंगा, तू मला भेटायला कधी येशील ? मी तुझ्याशिवाय फारच कष्टी झालोय रे १ तुझ्याशिवाय मला दुसरे कुणीही सखे वाटत नाहीत तुझ्याच पायावर मिठी घालावीशी वाटते २ तुझ्या चरणावरून माझे शरीर ओवाळून टाकावेसे वाटते चक्रपाणी, तू मला केव्हा भेटशील रे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, त्वरेने उडी घालून तू माझी एवढी आवड पूर्ण कर ना ४

४४१९ पंचाग्निसाधन करूं धूम्रपान । काय तीर्थाटण करूं सांग ॥ १ ॥
सांग कोणे देशीं आहे तुझें गांव । घेऊनिया धांव येऊं तेथें ॥ २ ॥
सांग कांहीं वृत्त कोण करूं व्रत । जेणें कृपावंत होशील तूं ॥ ३ ॥
वाटतें सेवटीं जालासि निष्ठुर । न देसी उत्तर तुका म्हणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– पंचाग्निसाधन–चार बाजूंना चार अग्नी व वर सूर्य अशा स्थितीत केलेले तप, साधन धूम्रपान–धुनीवर उलटे टांगून धूर पिण्याचे एक तप

अर्थ :– देवा, मी पंचाग्निसाधनाचे व्रत करू की धूम्रपानाचे खडतर तप करू ? की काही तीर्थाटण करू? काय करू ते सांग १ तुझे गाव तरी कोणत्या देशात आहे ते मला सांग मी तेथेही धाव घेऊन येईन २ तुझ्या प्राप्तीसाठी मी कोणते व्रत करावे यासंबंधी तू काही मला सांग ना तू कोणत्या कार्याने कृपावंत होशील ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू उत्तर देत नाहीस हे पाहून शेवटी निष्ठुर झालास असेच मला वाटते ४

४४२० तुजवीण तीळभरी रिता ठाव । नाहीं ऐसें विश्व बोलतसे ॥ १ ॥
बोलियेले योगी मुनी साधु संत । आहेसि या आंत सर्वांठायीं ॥ २ ॥
मी तया विश्वासें आलों शरणागत । पूर्वींचें अपत्य आहें तुझें ॥ ३ ॥
अनंत ब्रह्मांडें भरोनि उरलासि । मजला जालासि कोठें नाहीं ॥ ४ ॥
अंतपार नाहीं माझिया रूपासि । काय सेवकासि भेट देऊं ॥ ५ ॥
ऐसें विचारिलें म्हणोनि न येशी । सांग हृषीकेशी मायबापा ॥ ६ ॥
तुका म्हणे काय करावा उपाय । जेणें तुझे पाय आतुडति ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – रिता–रिकामा, ठाव–स्थान, जालासि–जन्म दिलास, विचारिलें–विचार केलास, आतुडति–प्राप्त होतात

अर्थ :– देवा, या विश्वात तुझ्याशिवाय एक तिळभरही स्थान रिकामे नाही असे बोलले जाते. १ योगी, सर्व मुनी, साधू, संत हे सर्व तू पदार्थमात्रात आहेस असेच बोलतात २ या विश्वासाने मी तुला शरण आलो आहे. मी पूर्वीच तुझे अपत्य होतो ३ तू अनंत ब्रह्मांडांत भरून राहिला आहेस त्या सर्वांत मलाच जन्म दिला नाहीस असे होणार नाही ४ ' माझ्या रूपास याप्रमाणे अंतपार नाही ! तर मी सेवकाला भेट कशी काय देऊ ? ' ५ असा विचार केलास, म्हणूनच तू हृषीकेशी, मायबापा, येत नाहीस काय ? ते सांग ६ तुकाराम महाराज म्हणतात, देवा, ज्यामुळे तुझे पाय मला प्राप्त होतील असा मी काय उपाय करावा ? ७

४४२१ काम क्रोध आड पडले पर्वत । राहिला अनंत पलीकडे ॥ १ ॥
नुलंघवे मज न सापडे वाट । दुस्तर हा घाट वैरियाचा ॥ २ ॥
आता कैचा मज सखा नारायण । गेला अंतरोन पांडुरंग ॥ ३ ॥
तुका म्हणे व्यर्थ मोलाचे शरीर । गेले हा विचार कळो आला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नुलंघवे–उल्लंघन करवत नाही

अर्थ – माझ्या मार्गात काम, क्रोध इत्यादी विकारांचे पर्वत आड आले असून त्याच्या पलीकडे हा अनंत राहिला आहे १ या पर्वताचे उल्लंघन काही मला करवत नाही मला यातून वाटही सापडत नाही हा वैरी लोकांचा घाट मोठा दुस्तर म्हणजे तरून जाण्यास कठीण असा आहे २ आता हा नारायण मला सखा म्हणून कसा मिळणार? हा पांडुरंग मला अंतरून गेला ना ३ तुकाराम महाराज म्हणतात, यामुळे माझे हे मोलवान शरीर व्यर्थ गेले असा विचार मला समजून आला ४

४४२२ नव्हे निष्ठावंत तुज काय बोल । सेवेविण मोल मागतसे ॥ १ ॥
न घडे भजन शुद्ध भावनिष्ठा । आपुल्या अदृष्टावरी बोल ॥ २ ॥
पूर्वी जाले भक्त असंख्य विरक्त । काम क्रोध अहंते निर्दाळिले ॥ ३ ॥
ऐसी अंगवण नाहीं मज देवा । करीतसे हेवा भेटावयाचा ॥ ४ ॥
कृपा करोनिया पुरवी असोसी । आपुल्या ब्रिदासी राखावया ॥ ५ ॥
तुका म्हणे एक बाळक अज्ञाते । त्यासि हे पोसित मायबापें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – अदृष्टावरी–प्रारब्धावर अंगवण–सामर्थ्य शक्ती हेवा–हाव, असोसी–अतृप्ती, हाव

अर्थ – देवा, मीच निष्ठावान भक्त नाही उगाच तुला बोल देण्यात काय अर्थ आहे? मी तुझ्याकडून सेवा न करताच कृपेचे मोल मागत आहे १ मला नीट भजन घडत नाही माझ्या जवळ शुद्ध अशी भावनिष्ठा नाही माझ्या प्रारब्धालाच याचा बोल लावला पाहिजे २ यापूर्वी काम, क्रोध, अहंकार इत्यादी विकारांना नष्ट करणारे असे अनेक विरक्त भक्त पूर्वी होऊन गले आहेत ३ अशा प्रकारचे सामर्थ्य देवा माझ्या जवळ नाही म्हणून तर मी भेट घेण्याचीच तेवढी हाव धरीत आहे ४ देवा, तुम्ही कृपा करून माझी ही हाव पूर्ण करा व तुमचे ब्रीद राखा ५ तुकाराम महाराज म्हणतात मी एक बालक अज्ञानी असून त्याला तुम्ही मायबापांनी पोसावे ६

## नाटाचे अभंग २

४४२३ अगा ये मधुसूदना माधवा । अगा ये कमळापती यादवा ।
अगा श्रीधरा केशवा । अगा बांधवा द्रौपदीच्या ॥ १ ॥
अगा विश्वव्यापका जनार्दना । गोकुळवासी गोपिकारमणा ।
अगा गुणनिधि गुणनिधाना । अगा मर्दना कंसाचिया ॥ २ ॥
अगा सर्वोत्तमा सर्वेश्वरा । गुणातीता विश्वंभरा ।
अगा निर्गुणा निराकारा । अगा आधारा दीनाचिया ॥ ३ ॥

अगा उपमन्यसहाकारा । अगा शयना फणिवरा ।
अगा काळकृतांत असुरा । अगा अपारा अलक्षा ॥ ४ ॥
अगा वैकुंठनिवासा । अगा अयोध्यापति राजहंसा ।
अगा ये पंढरिनिवासा । अगा सर्वेशा सहजरूपा ॥ ५ ॥
अगा परमात्मा परमपुरुषा । अगा अव्यया जगदीशा ।
अगा कृपाळुवा आपुल्या दासा । तोडीं भवपाश तुका म्हणे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- मर्दना-नाश करणाऱ्या, उपमन्य-उपमन्यू.

अर्थ:- अरे मधुसूदना, माधवा, कमलापती, यादवा, श्रीधरा, केशवा, द्रौपदीच्या बंधू, तू माझ्यासाठी धावत ये. १ अरे विश्वव्यापका, जनार्दना, गोकुळात राहाणाऱ्या गोपिकारमणा, गुणांच्या निधाना, गुणनिधी, कंसास मारणाऱ्या देवा, २ अरे सर्वोत्तमा, सर्वेश्वरा, गुणातीता, विश्वंभरा, निर्गुणा, निराकारा, दीनांच्या आधारा, ३ अरे, उपमन्यूला मदत करणाऱ्या देवा, शेषावर शयन करणाऱ्या देवा, काळाचाही नाश करणाऱ्या, असुरांचा नाश करणाऱ्या देवा, अपारा, अलक्षा, ४ अरे वैकुंठनिवासा, अयोध्यापती, राजहंसा, पंढरीनिवासा, सर्वेशा, सहजरूपा, ५ तुकाराम महाराज म्हणतात, अरे परमात्म्या, परमपुरुषा, अव्यया, जगदीशा, तू आपल्या दासावर कृपाळू हो व माझे भवपाश सोडून टाक. ६

४४२४ कैसी करूं तुझी सेवा । ऐसें सांगावें जी देवा ।
कैसा आणूं अनुभवा । होसी ठावा कैशापरी ॥ १ ॥
कर्मभ्रष्ट माझें मन । नेणें जप तप अनुष्ठान ।
नाहीं इंद्रियांसि दमन । नव्हे मन एकविध ॥ २ ॥
नेणें यातीचा आचार । नेणें भक्तीचा विचार ।
मज नाहीं संतांचा आधार । नाहीं स्थिर बुद्धि माझी ॥ ३ ॥
न सुटे मायाजाळ । नाहीं वैराग्याचें बळ ।
न जिंकवती सबळ । काम क्रोध शरीरीं ॥ ४ ॥
आतां राख कैसें तरि । मज नुपेक्षावें हरी ।
तुझीं ब्रिदें चराचरीं । तैसीं साच करीं तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- नुपेक्षावें-उपेक्षा करू नये, साच-खरी.

अर्थ :- देवा, मी तुझी सेवा तरी कशी करू रे ? हे तू सांग ना. मी तुझा अनुभव कसा घेऊ ? कोणत्या रीतीने तू मला माहीत होशील रे ? १ माझे मन कर्मभ्रष्ट आहे ते जप, तप, अनुष्ठान इत्यादी काही जाणीत नाही. इंद्रियांचे दमन करणे मला माहीत नसल्यामुळे माझे मनही एकविध होत नाही. २ मी माझ्या जातीचा आचारधर्म जाणीत नाही. मी भक्तीचा विचार कधी करीत नाही. मला संतांचाही आधार नसल्याने माझी बुद्धी कधीच स्थिर नसते. ३ माझ्या मागचे मायाजाल कधी सुटत नाही, मला वैराग्याचे बळ नाही आणि त्यामुळे शरीरात असणारे कामक्रोधादी विकार मला जिंकवत नाहीत ४ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, माझी उपेक्षा तू करू नकोस, आता कसे तरी तू माझे रक्षण कर. चराचरांविषयी असणारी तुझी ब्रीदावली तू खरी कर. ५

४४२५ भीमातीरवासी । तेथें निश्चयेंसी काशी ।। १ ।।
मुख्यमुक्तीचें माहेर । ऐसे जाणा पंढरपुर ।। २ ।।
घडे भींवरेशीं स्नान । त्यासि पुन्हा नाहीं जन्म ।। ३ ।।
भाव धरोनि नेटका । मोक्ष जवळी म्हणे तुका ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – नेटका–नीट, चांगला

अर्थ – भीमातीरावर राहणारा हा श्रीहरी आहे त्या ठिकाणी काशी क्षेत्राचे माहात्म्य निश्चयाने आहे १ येथेच मुख्य भक्तीचे माहेर असलेले हे पंढरपूर जाणा २ ज्याला भीवरा नदीत स्नान घडते त्याला पुन जन्माला यावे लागत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणून चांगला भाव या ठिकाणी धारण करून मोक्षास जवळ करावे ४

४४२६ जाली गाढवी दुधाळ । महिमा गाईची पावेल ।। १ ।।
श्वान जालेंसे चांगले । तरी का सांगातें जेवील ।। २ ।।
जाली सिंदळा चांगली । तरि का पतिव्रता जाली ।। ३ ।।
तुका म्हणे ऐशा जाति । काय उंचपणा पावती ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – श्वान–कुत्रे

अर्थ – गाढवी कितीही दूध देणारी झाली तरी तिला गाईची महती मिळेल का ? १ कुत्रे कितीही चांगले असले तरी त्याला कुणी बरोबर घेऊन जेवतात का ? २ शिंदळ बाई कितीही चांगली झाली तरी ती पतिव्रतेच्या बरोबरीची होईल का ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, अशा या जातीचे लोक काय उच्च पद मिळवतील ? ४

४४२७ काशीयात्रा पांच द्वारकेच्या तीन । पंढरीची जाण एक यात्रा ।। १ ।।
काशी देह विटंबणे द्वारके जाळणे । पंढरीशी होणे ब्रह्मरूप ।। २ ।।
अठरापगडयाती सकळ हि वैष्णव । दुजा नाहीं भाव पंढरीसि ।। ३ ।।
तुका म्हणे असो अथवा नसो भाव । दर्शने पंढरिराव मोक्ष देतो ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – दुजा–दुसरा

अर्थ – पांच काशीयात्रा करणे, तीन द्वारकेच्या यात्रा करणे हे पंढरीच्या एका यात्रेबरोबर आहे १ काशीला देहाची विटंबना होते, द्वारकेस देह जळून जातो पंढरपूरला मात्र देह ब्रह्मरूप होतो २ या पंढरीच्या क्षेत्रात दुजाभाव कधीच नसतो त्या ठिकाणी अठरापगड जाती वैष्णवच बनतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, मनात भाव असो वा नसो, हा पंढरीराव दर्शनानेही मोक्ष देतो ४

४४२८ हेंचि मागणे विठाबाई । पायीं ठेवूनिया डोई ।। १ ।।
शांति दया अंत करणीं । रंगो रामनामीं वाणी ।। २ ।।
मूळ द्वंद्वाचे विपडो । निजानंदीं वृत्ति जडो ।। ३ ।।
तुका म्हणे हरी । आता आपुलेंसें करीं ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – विघडो–नाहीसे होवो

अर्थ – विठाबाई, तुझ्या पायावर डोके ठेवून पुढीलप्रमाणे एकच मागणे आहे १ शांती, दया असे गुण अंतःकरणात निर्माण होऊन रामनामात वाणी रंगून जावो २ द्वंद्वाचे मूळ नाहीसे होवो, आणि निजानंदी वृत्ती जडो ३ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, तू आता मला आपलेसे करून ठेव ४

४४२९ करोनि स्नानविधि आणि देवधर्म । क्रिया नित्यनेम तुजसाटीं ॥ १ ॥
तुजलागीं दानें तुजलागीं तीर्थें । सकळ ही व्रतें तुजलागीं ॥ २ ॥
सकळ चित्तवृत्ति दिवस आणि राती । आवडशी प्रीती नारायणा ॥ ३ ॥
तुका म्हणे याहो पवित्राच्या राया । प्राणविसावया पाडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – क्रिया–नित्यकर्म.

अर्थ – देवा, रोजचा स्नानविधी, देवधर्म, नित्यकर्म, नेमधर्म इत्यादी तुझ्यासाठीच आहे १ तुझ्यासाठीच दानधर्म, तुझ्यासाठीच तीर्थयात्रा असून सर्व व्रते तुझ्यासाठीच आहेत २ नारायणा, सर्व चित्तवृत्ती रात्रंदिवस तुझ्यासाठीच असून तुझी प्रीती मनात आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, अहो पवित्राच्या राया, पाडुरंगा, तुम्ही माझा प्राणविसावा आहात ४

४४३० पहावा नयनीं विठ्ठलचि एक । काहीं तरी सार्थक ससाराचें ॥ १ ॥
कोठें पाहो तुज का गा लपालासि । काही बोल मशीं नारायणा ॥ २ ॥
वाटते उदास मज दाही दिशा । तुजविण हृषीकेशा वाचोनिया ॥ ३ ॥
नको ठेवूं मज आपणा वेगळें । बहुत कळवळें तुजलागीं ॥ ४ ॥
तुका म्हणे भेटी देईं नारायणा । घडी कठवेना तुजविण ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – घडी–क्षण

अर्थ – जन्माला येऊन एका विठ्ठलालाच डोळ्यानी पाहिले तरी ससाराचे सार्थक होईल १ नारायणा, मी तुला कोठे पाहू ? तू लपून का राहिला आहेस ? माझ्याशी काही थोडे बोल ना २ हृषीकेशा, तुझ्यावाचून मला दहाही दिशा उदास वाटत आहेत ३ देवा तू मला आपणाहून वेगळे ठेवू नकोस असे फार कळवळ्याने मी सांगत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, मला तू भेट दे तुझ्याशिवाय एक क्षणही मला धीर धरवत नाही ५

४४३१ पूर्वी बहुताचे केले प्रतिपाळ । ते मज सकळ श्रुत आहे ॥ १ ॥
अज अविनाश निर्गुण निरामय । विचारिले काय त्याचे वेळे ॥ २ ॥
तयाचिये वेळे होशी कृपावंत । माझाचि का अंत पहातोसि ॥ ३ ॥
नारद प्रऱ्हाद उपमन्यु ध्रुरु । त्याचा अंगीकारु कैसा केला ॥ ४ ॥
अंबऋषीसाटीं गर्भवास जाले । का गा मोकलिले कृपासिंधु ॥ ५ ॥
धर्माचे उच्छिष्ट अर्जुनाचीं घोडीं । आणीक साकडीं कितीएक ॥ ६ ॥
जालासि लुगडीं तया द्रौपदीचीं । न ये का आमुची कृपा काहीं ॥ ७ ॥
तुका म्हणे का गा जालासि कठीण । माझा भाग सीण कोण जाणे ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – प्रतिपाळ-सांभाळ श्रुत-माहीत, अज-न जन्मलेला, निरामय-निरोगी, विचारलें-विचार केला, धुरू-ध्रुव, अंगीकार-स्वीकार, मोकलिलें-सोडले, त्यागले, सांकडीं-संकटे

अर्थ – देवा, पूर्वी तुम्ही अनेकांचा सांभाळ केला आहे हे सर्व मला माहीत आहे १ तू स्वत अज अविनाशी निर्गुण, निरामय असूनही त्यांचा उद्धार करताना काही विचार केला होतास काय ? २ त्यांच्या वेळी मात्र कृपावंत होतोस आणि माझा मात्र असा अंत का रे पाहातोस ? ३ नारद प्रल्हाद उपमन्यू ध्रुव इत्यादींचा स्वीकार तू कसा केलास रे ? ४ अंबऋषीसाठी तू अनेक गर्भवास सोसलेस, मग कृपासिंधू, तू माझाच का रे त्याग केला आहेस ? ५ तू धर्मराजाच्या घरी उष्टी काढलीस अर्जुनाची घोडी धुतलीस आणखीही कितीतरी लोक संकटां-तून तू मुक्त केलेस ६ द्रौपदीच्या संकटकाळी तू लुगडी होऊन तिची लाज राखलीस असे असताना आमची मात्र करुणा तुला का येत नाही ? आमच्यावर तू कृपा का करीत नाहीस ? ७ तुकाराम महाराज म्हणतात देवा एवढा तू कठीण हृदयाचा का रे झालास ? माझा शीण व त्रास तुझ्यावाचून कोण जाणणार रे ? ८

४४३२ कासयासि व्यर्थ घातले संसारीं । होतें तैसे जरी तुझे चित्तीं ॥ १ ॥
तुझिये भेटीची थोर असे आस । दिसोनी निरास आली मज ॥ २ ॥
आता काय जिणे जाले निरर्थक । वैकुंठनायक भेटेचि ना ॥ ३ ॥
आडलासि काय कृपेच्या सागरा । रुक्मादेवीवरा सोइरिया ॥ ४ ॥
तुका म्हणे देई चरणाची सेवा । नुपेक्षीं केशवा मायबापा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आस-आशा, इच्छा, निरास-निराशा, नुपेक्षीं-उपेक्षा करू नकोस

अर्थ – देवा, असे माझ्यावर कृपा न करण्याचेच जर तुझ्या मनात होते तर मग मला व्यर्थ या संसारात तरी का घातलेस रे ? १ तुझ्या भेटीची फार मोठी आशा मला होती पण याविषयी मला फारच निराशा दिसून आली २ आता हा वैकुंठनायक भेटत नसल्यामुळे एकदर जिणें निरर्थकच झाले आहे ३ कृपेच्या सागरा, तू अडून राहिला आहेस का ? रखुमाईच्या वरा तू माझा सोयरा आहेस ४ तुकाराम महाराज म्हणतात तू तुझ्या चरणाची सेवा मला दे केशवा, मायबापा, तू माझी उपेक्षा करू नकोस ५

४४३३ पक्षीयाचे घरीं नाहीं सामुगरी । त्याची चिंता करी नारायण ॥ १ ॥
अजगर जनावर वारुळात राहे । त्याजकडे पाहे पांडुरंग ॥ २ ॥
चातक हा पक्षी नेघे भूमिजळ । त्यासाठीं घननीळ नित्य वर्षे ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही पिप्पलिकाची जात । पुरवीं मनोरथ पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – नेघे-घेत नाही, पिपिलिकाची-मुंग्यांची

अर्थ – पक्ष्यांच्या घरी कोणतीही धान्य इत्यादी सामग्री नसते पण नारायण त्यांची चिंता करीत असतो १ अजगरासारखे जनावर वारुळात स्वस्थ पडून राहिले तरी हा पांडुरंग त्याचेकडे पाहून त्याची काळजी करतो २ चातक पक्षी हा कधी भूमीवरील जल घेत नाही त्यासाठी नील वर्णाचा मेघ निळासावळा श्रीहरी नित्य वर्षाव करीत असतो ३ तुकाराम महाराज म्हणतात पांडुरंगा आम्हीही या मुंग्यांच्या मार्गाने जाणारे आहोत तू आमचे मनोरथ पूर्ण कर ४

४४३४ रामनाम हाचि मांडिला दुकान । आहे वानोवाण घ्यारे कोणी ॥ १ ॥
नका कोणी कष्ट घेता रे आळस । वांटितो तुम्हांस फुकाचे हें ॥ २ ॥

सचितासारिखें पडे त्याच्या हाता । फारसें मागता तरी न ये ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हीं साठविले सार । उरलिया[1] थार विचारिता ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – वानोवाण–उत्तम प्रकार

*अर्थ – आम्ही रामनामाचे दुकान माडले आहे निरनिराळे उत्तम प्रकार आमच्याकडे आहेत ते कुणीही* घ्यावेत १ हे घेताना कुणीही आळस करू नये मी तुम्हाला हे फुकट वाटीन २ ज्याचे जसे कर्म असेल त्याप्रमाणे त्याच्या हातात लाभ होईल फार काही मागता येणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात आम्ही साररूपाने हा माल साठविला आहे उरलेल्याचाही आम्ही विचार करू ४

४४३५ बहुजन्मा शेवटीं स्वामी तुझी भेटी । बहु मोह पोटीं थोर जाला ॥ १ ॥
बहु पुरें पाहिलीं बहु दिशा शोधिली । बहु चिंता वाहिली दुर्भराची ॥ २ ॥
बहु काळ गेले अनुचित केले । बहु नाहीं गाइले नाम तुझें ॥ ३ ॥
ऐसा मी अपराधी अगा कृपानिधि । बहु सता संनिधि ठेवीं तुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पुरें–शहरे, दुर्भराची–भरण्यास कठीण अशा पोटाची

अर्थ – स्वामी, पुष्कळ जन्माच्या शेवटी तुझी–माझी भेट होत आहे यासाठी फार मोठा मोह माझ्या पोटात निर्माण झाला आहे १ तुझ्या शोधात असताना मी पुष्कळ शहरे पाहिली पुष्कळ दिशांचा शोध केला भरण्यास कठीण अशा पोटाची खूप चिंता वाहिली २ पुष्कळ काळपर्यंत पूर्वी अनुचित काम केले मुखाने तुझें नामही फार गाइले नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात अगा कृपानिधी, असा मी फार अपराधी आहे तुम्ही मला या पुष्कळ संताच्या जवळ ठेवावे ४

४४३६ कोण तो उपाव करूं भेटावया । जाळावी हे काया ऐसें वाटे ॥ १ ॥
सोडोनिया गांव जाऊं वनांतरा । रकुमादेवीवरा पहावया ॥ २ ॥
करूं उपवास शोधूं हे शरीर । न धरवे धीर नारायणा ॥ ३ ॥
जाती आयुष्याचे दिवस हे चारी । मग केव्हा हरी भेटशील ॥ ४ ॥
तुका म्हणे काहीं सांगा विचारोनि । विठो तुझे मनीं असेल तें ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – उपाव–उपाय काया–शरीर, शोधू–शुद्ध करू, विचारोनि–विचार करून

अर्थ – देवा, तुला भेटण्यासाठी मी उपाय तरी कोणता करावा रे ? यासाठी मला हे माझे शरीर जाळून टाकावे असे वाटते १ या रखुमादेवीवरास पाहाण्यासाठी हा गाव सोडून रानावनात जाऊ काय ? २ उपवास वगैरे करून हे शरीर शुद्ध करू काय ? नारायणा आता मात्र माझ्या मनास धीर धरवत नाही ३ आयुष्याचे हे चार दिवस जातील, मग श्रीहरी मला केव्हा भेटशील रे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, विठो तुझ्या मनात काय असेल ते नीट विचार करून सांग ना ५

४४३७ माय बाप बंधु सोयरा सांगाती । तूंचि माझी प्रीति गण गोत ॥ १ ॥
शरण आलीं त्यांचीं वारिलीं दुरितें । तारिले पतित असंख्यात ॥ २ ॥
इतर कोण जाणे पावलें विश्रांति । न येता तुजप्रति शरणागत ॥ ३ ॥
तयामध्यें मज ठेवीं नारायणा । लक्षुमीरमणा सोइरिया ॥ ४ ॥
तुका म्हणे देईं दर्शनाचा लाभ । जें पाय दुर्लभ ब्रह्मादिका ॥ ५ ॥

---

१ उरलियाचो

शब्दार्थ व टीपा :– सांगाती-सोबती, वारिलीं-निवारण केली, दुरितें-संकटे, पातके.

अर्थ :– देवा, तूच माझा मायबाप, बंधू, सोयरा, सोबती असून तूच माझ्या प्रीतीचा गणगोत आहेस. १ तू शरण आलेल्यांची संकटे दूर केली आहेस. असंख्य पतितांचा तू उद्धार केला आहेस. २ तुला शरण आलेल्यांना इतर कुणाकुणांना विश्रांती मिळाली आहे ते पूर्णपणे कोण जाणणार ? ३ लक्ष्मीनारायणा, माझ्या सोयऱ्या नारायणा त्यांच्यामध्ये तू मला एकाला ठेव. ४ तुकाराम महाराज म्हणतात, ब्रह्मादिकांनाही जे पाय दुर्लभ आहेत त्यांच्या दर्शनाचा लाभ तू मला दे. ५

४४३८ पाप ताप माझे गुणदोष निवारीं । कृष्णा विष्णु हरी नारायणा ॥ १ ॥
काम क्रोध वैरी घालोनि बाहेरी । नूं राहें अंतरीं पांडुरंगा ॥ २ ॥
करिशील तरी नव्हे कांइ एक । निर्मिलें त्र्यैलोक्य हेळामात्रें ॥ ३ ॥
समर्थासि काय आम्हीं शिकवावें । तुका म्हणे यावे पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– निवारीं–दूर कर, अंतरी–अत करणात, हेळामात्रें–एका क्षणात

अर्थ :– कृष्णा, विष्णू, हरी, नारायणा, तू माझे पाप, ताप, गुणदोष निवारण कर. १ पांडुरंगा, काम, क्रोध इत्यादी वैऱ्यांना बाहेर घालवून तूच माझ्या अंतःकरणात निवास कर २ देवा, तू करशील तर काय होणार नाही ? त्रैलोक्याची निर्मिती एका क्षणात तू करशील ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तुझ्यासारख्या समर्थाला आम्ही काय रे शिकवावे? तू आमच्यासाठी धावत यावेस ४

४४३९ ये गा महाविष्णु अनंतभुजाच्या । आम्हां अनाथांच्या माहेरा ये ॥ १ ॥
भेटावया तुज ओढे माझा जीव । एकवेळा पाय दावीं डोळां ॥ २ ॥
आणीक हें आर्त नाहीं नारायणा । ओढे हे वासना भेटावया ॥ ३ ॥
वाटे चित्तीं काय करावा विचार । चरण सुंदर पहावया ॥ ४ ॥
तुका म्हणे माझे पुरवीं मनोरथ । येई गा न संवरीत पांडुरंगा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :–भुजाच्या–हाताच्या, न संवरीत–शंका न धरता.

अर्थ :– अनंत हातांच्या महाविष्णू, तू माझ्यासाठी ये रे आम्हा अनाथांच्या माहेरा, तू आमच्यासाठी धावत ये. १ तुला भेटण्यासाठी माझा जीव एकसारखा ओढला जात आहे, तरी एक वेळ तुझ्या पायांचे दर्शन डोळ्यांना होऊ दे. २ नारायणा, याखेरीज आणखी कुठलीही इच्छा माझ्या मनात नाही तुला भेटण्यासाठी मात्र माझी वासना ओढ घेते ३ तुझे सुंदर चरण पाहाण्यासाठी काय विचार करावा, असे माझ्या चित्तास एकसारखे वाटत आहे. ४ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, तू माझे मनोरथ पुररिण्यासाठी मनात शंका न धरता ये. ५

४४४० काय पाहतोसि कृपेच्या सागरा । नराच्या नरेंद्रा पांडुरंगा ॥ १ ॥
नामाचा प्रताप ब्रिदाचा वडिवार । करावा साचार नारायणा ॥ २ ॥
कलीमाजी देव बौध्यरूप जाला । जगाचिया बोला लागूं नका ॥ ३ ॥
माय पुत्रा काय मारूं पाहे कळी । जगाची ढवाळी काय काज ॥ ४ ॥
तुका म्हणे या हो कृपेच्या सागरा । रुकुमादेवीवरा मायबापा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– साचार–खरा, ढवाळी–थट्टा, काज–कारण.

अर्थ :- कृपेच्या सागरा, नराच्या नरेंद्रा, पांडुरंगा, तू आता काय पाहातोस रे ? १ नारायणा, तुझ्या नामाचा प्रताप, ब्रीदाचा बडिवार तू आता खरा करून दाखव. २ या कलीत देव हा बौद्ध रुपाने झाला आहे. जगाचे बोलणे मानू नका. ३ या कलीमुळेच आई आपल्या पुत्राला मारू पाहाते. जगाची टवाळी कोणत्या कारणाने करावी? ४ तुकाराम महाराज म्हणतात, कृपेच्या सागरा, तुम्ही माझ्यासाठी धावून यावे. रखुमादेवीवरा, तू माझा मायबाप आहेस. ५

४४४१ रामनामाचे पवाडे । अखंड ज्याची वाचा पढे ॥ १ ॥
धन्य तो एक संसारीं । रामनाम जो उच्चारी ॥ २ ॥
रामनाम गर्जे वाचा । काळ आज्ञाधारक त्याचा ॥ ३ ॥
तुका म्हणे रामनामीं । कृतकृत्य जालों आम्ही ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- पवाडे-कीर्ती.

अर्थ :- ज्याची वाचा अखंडपणे रामनामाची कीर्ती गात असते, १ तो एक या संसारात धन्य असतो. कारण तो सतत रामनाम उच्चारीत असतो २ रामनाम ज्याच्या वाणीने एकसारखे गरजते त्याचा प्रत्यक्ष काळही आज्ञाधारक असतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच रामनामामुळे आम्ही कृतकृत्य झालो आहोत ४

४४४२ येइल घरा न घरीं संदेहा । फकिराचा याया व्हावा जेव्हां ॥ १ ॥
होइल फकीर योगी महानुभाव । घडीघडी देव सांभाळील ॥ २ ॥
तुका म्हणे ऐसें बोलती बहुत । येणें गुणें संत जाले राम ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :- यावा-सोस.

अर्थ :- फकीरवृत्तीचा जेव्हा सोस तुम्ही धराल तेव्हा हा देव तुमच्या घरी येईल यात शंका नाही. १ जेव्हा तुम्ही महानुभाव घेणारा योगी किंवा फकीर व्हाल तेव्हा देव तुम्हांला प्रत्येक क्षणी सांभाळील. २ तुकाराम महाराज म्हणतात, असे पुष्कळ जण म्हणतात व याच गुणानी संत रामस्वरुपाला जाऊन पोचले आहेत. ३

४४४३ भक्तीवीण जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखमूळ ॥ १ ॥
वीसलक्ष योनि वृक्षामाजी घ्याव्या । जलचरीं भोगाव्या नवलक्ष ॥ २ ॥
अकरालक्ष योनि किड्यांमाजी घ्याव्या । दशलक्ष भोगाव्या पक्ष्यांमध्यें ॥ ३ ॥
तीसलक्ष योनि पशूंचीये घरीं । मानवामीतरीं चारलक्ष ॥ ४ ॥
एकएक योनि कोटिकोटि फेरा । मनुष्यदेहाचा वारा मग लागे ॥ ५ ॥
तुका म्हणे तेव्हां नरदेह नरा । तयाचा मातेरा केला मूढें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- योनि-जाती, वर्ग.

अर्थ :- भक्तीशिवाय जिणे लाजिरवाणे होते. त्याला आग लागो. भक्ती नसेल तर दुःखाचे मूळ असणारा संसार भोगावा लागतो. १ वीस लक्ष योनी वृक्ष जातीत घ्याव्या लागतात व जलचर योनीत नऊ लक्ष जन्म घ्यावे लागतात २ किड्यांच्या जातीत अकरा लक्ष जन्म घ्यावे लागतात व पक्ष्यांमध्ये दहा लाख जन्म भोगावे लागतात ३ तीस लक्ष जन्म पशुयोनीत घेतल्यावर मग मानव जातीत चार लक्ष जन्म होतात. ४ एकेका जातीत कोटीकोटी वेळा जन्म घेतल्यानंतर मग मनुष्यदेहाची प्राप्ती होते. ५ तुकाराम महाराज म्हणतात, एवढ्यानंतरच माणसास देह प्राप्त होतो. परंतु मूढ माणसाने त्याचे व्यर्थ मातेरे केलेले असते. ६

**विवरण:–**अनेक जन्माचा फेरा भोगल्यावर हा नरदेह प्राप्त होत असल्याने त्याचा योग्य तो उपयोग करून त्यास प्रभुप्राप्तीच्या मार्गास लावावे असे साधुसतांचे सांगणे आहे. चौऱ्याऐंशी लक्ष योनीतून भ्रमण केल्यानंतर मोठ्या भाग्याने हा मनुष्यदेह लाभतो. तो मूर्खत्वाने फुकट घालवू नये. केवढ्या मोठ्या प्रयासाने हा देह लाभतो याचे पुराणान्तरी जे वर्णन आहे, त्याचाच साराश तुकोबा या अभंगात देतात. वीसलक्ष योनी जीवास वृक्षजातीतच भोगाव्या लागतात. नंतर जलचर प्राण्याच्या नऊ लक्ष, किडयाच्या अकरा लक्ष, पक्ष्याच्या दशलक्ष, पशूच्या तीस लक्ष आणि मानवाच्या चार लक्ष योनी भोगून या सुंदर नरदेहाची प्राप्ती होत असते असा हिशेब पुराणाच्या आधारावर तुकोबा देत आहेत. 'जलजा नवलक्षाश्च दशलक्षाश्च पक्षिणः। कृमयो रुद्रलक्षाश्च विंशल्लक्षा गवादय ॥ स्थावरास्त्रिंशल्लक्षाश्च चतुर्लक्षाश्च मानवाः। पापपुण्य समं कृत्वा नरयोनिषु जायते' असा पुराणाचा निर्वाळा आहे. चारलक्ष मानव, वीस लक्ष पशू, अकरा लक्ष कृमिकीटक, दहा लक्ष खेचर, नऊ लक्ष जलचर, तीस लक्ष स्थावर इत्यादी हिशेब रामदासही आपल्या दासबोधात देतात. 'चारी खाणी चारी वाणी। चौऱ्यांसी लक्ष जीवयोनी। शास्त्रीं अवघें नेमुनी। बोलिलें असे ॥ मनुष्य च्यारी लक्ष। पशु वीस लक्ष। कृमी आक्रा लक्ष। बोलिलें शास्त्रीं ॥ दहा लक्ष ते खेचर। नवलक्ष जळचर। तीस लक्ष स्थावर। बोलिले शास्त्रीं ॥' अशा या दीर्घ प्रवासानंतर प्राप्त झालेल्या नरदेहाकडून सतांनी अत्युच्च ध्येयाची म्हणजे ईश्वरप्राप्तीची अपेक्षा केलेली आहे.

पुराणातून व साधुसतांच्या वचनातून जीवसृष्टीचा हा जो विकास काही लक्ष योनीतून सांगितला जातो त्याला आधार कोणता, ही मोजदाद नेमकी केव्हा, कुणी व कशी केली याविषयी आपणांस फारशी माहिती नाही. अनेक लक्षाचे हे आकडे आपणास आश्चर्यकारकही वाटण्याचा संभव आहे पण गेल्या शतकात उत्क्रांतिवादाच्या शास्त्राचा प्रभाव पडल्यामुळे जीवसृष्टीच्या अभ्यासास अगदी नवे वळण लागले आहे. अगदी सूक्ष्म अशा एकपेशीय जलचर जीवापासून लक्षावधी वर्षांच्या इतिहासात लक्षावधी योनींचे प्राणी हळू हळू उदयास आले; असाच निष्कर्ष उत्क्रांतिवादीही आज काढीत आहेत. माहीत होत असलेल्या जीवाची, त्याच्या जातीची शास्त्रज्ञांनी केलेली नोंद पाहिल्यास पुराणातील आकडे अगदीच बेभरवशाचे आहेत असे वाटणार नाही शास्त्रज्ञानी केलेली खानेसुमारी अशी आहे. पृष्ठवंशीय प्राण्याचे प्रकार सुमारे ४३,००० असून यात ९००० पक्षी, ४५०० सस्तन प्राणी, ५००० सरपटणारे प्राणी, २००० उभयचर प्राणी, २३००० मासे इ. अशी संख्या असून प्रत्येकात उपप्रकारही आहेतच. शिवाय प्रत्येक जातीत व उपजातीत आणखी लक्षावधी जीव माहीत नसलेल्याची आणखी भर.

या प्राण्याच्याखेरीज आणखी जीवसृष्टीचे विश्व तर अद्भुतरम्य असेच आहे या सूक्ष्म जीवाची मोजदादही करणे शक्य नाही. तरीसुद्धा माहीत झालेल्या अपृष्ठवंशीय जीवाची मोजणी करण्याचा प्रयत्न शास्त्रज्ञांनी केलेला आहे. पुढील आकडे विशिष्ट जातीचे अथवा प्राणिप्रकाराचे आहेत. समुद्रातील अगदी लहान प्राणी ५०००, स्पंजमय प्राणी ४००० जेलीफिशच्या जातीचे प्राणी ९०००, हैड्राच्या जातीचे ३२०००, खेकड्याच्या जातीचे जातीचे २५०००, एकपेशीय ३०,००० मृदुकवचधारी, १००,००० कीटक, ७००,००० ( आधार . The Pictorial Encyclopedia of the Animal world १९६७ ) हे आकडे जीवाच्या विविध जातीचे वा प्रकाराचे आहेत. ज्ञात असलेल्या जीवाची ही मोजदाद पाहिल्यास व अज्ञाताची अफाट सृष्टी ध्यानात घेतल्यास पुराणातरीच्या चौऱ्याऐंशी लक्ष योनीचे आश्चर्य वाटावयास नको फरक एवढाच की, पुराणिकानी हे आकडे कसे वा कोठून आणले, त्याची मोजदाद करण्याच्या पद्धती काय आहेत हे आपणास माहीत नाही आणि आधुनिक शास्त्रज्ञाची मोजदाद आपणास आधारासहित तपासून पाहण्यासारखी असते या लक्षावधी लहान मोठ्या जीवसृष्टीच्या विकासातून आजचा मानव उदयास आला हेही उत्क्रान्तिशास्त्रानेच दाखवून दिलेले आहे

४४४४ तुजवांचून कोणा शरण। जाऊं आतां कर जोडून ॥ १ ॥
कोण करील माझें साहे। चित्तीं विचारूनि पाहें ॥ २ ॥
तूं तंव कृपेचा सागर। दीनबंधु जगदोद्धार ॥ ३ ॥
तुका म्हणे निका। भवसिंधु तारक नौका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- साहे-साह्य, मदत, विचारूनि-विचार करून, निका-चांगली.

अर्थ :- देवा, मी आता हात जोडून तुझ्याशिवाय कुणाला शरण जाऊ? १ मला तुझ्याशिवाय साह्य तरी कोण करणार आहे? तूच नीट विचार करून पाहा ना. २ तू तर देवा, कृपेचा सागर आहेस तू दीनबंधू व जगाचा उद्धार करणारा आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू खरे म्हणजे या भवसागरातून तरून जाण्यासाठी चांगली नौकाच आहेस. ४

४४४५ हातीं धरिलियाची लाज । देवा असोदे गा तुज ॥ १ ॥
आहें अमंगळ दुर्बळ । होई दीन तूं दयाळ ॥ २ ॥
बाळ सेंबडें मातेसि । काय नावडे तियेसि ॥ ३ ॥
तुका म्हणे जाणें । करीन देहाचें सांडणें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- सांडणें-त्याग.

अर्थ :- देवा, हाती धरलेल्या या दासाची लाज तुला असू द्यावी रे. १ मी तर अमंगळ व दुर्बळ आहे, पण तू मात्र दीनांना दयाळू आहेस. २ स्वतःचे मूल शेंबडे असले तरी ते त्याच्या मातेस आवडत नाही काय? ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्यासाठी मी माझ्या देहाचा त्याग करीन हे तू जाण. ४

४४४६ जळोजळो तें गुरुपण । जळोजळो तें चेलेपण ॥ १ ॥
गुरु आला वेशीद्वारीं । शिष्य पळतो खिडोरीं ॥ २ ॥
काशासाटीं जालें येणें । त्याचे आलें वर्षासन ॥ ३ ॥
तुका म्हणे चेला । गुरु दोघे हि नरकाला ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- खिडोरीं-खिडारात, भगदाडात.

अर्थ :- पुढीलप्रमाणे असलेले गुरूपण जळून जावो. त्याचे चेलेपणही जळून जावो. १ असा गुरु गावाच्या वेशीपाशी आला की शिष्य खिडारात लपण्यासाठी पळून जातो. २ गुरु तरी शिष्याकडे कशासाठी येत असतो? तर त्याचे वर्षासन त्याला वसूल करायचे असते ३ तुकाराम महाराज म्हणतात, असा चेला व असा गुरु दोघेही नरकाला जातात. ४

४४४७ अगा पंढरीच्या राया । वेगीं येईं तू सावया ॥ १ ॥
दीनबंधु तुझें नाम । देईं आपुलें आम्हां प्रेम ॥ २ ॥
जीवनकळा तूं विश्वाची । तूंचि माउली अनाथाची ॥ ३ ॥
तुका म्हणे पुंडलिका । ठेवीं मस्तकीं पादुका ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- सावया-साह्य करण्यासाठी.

अर्थ :- अरे पंढरीच्या राया, तू मला साह्य करण्यासाठी लौकर ये. १ तुझे नाव दीनबंधू असून तू तुझे प्रेम आम्हांस दे. २ तू या विश्वाची जीवनकला असून अनाथांची माऊलीही आहेस ३ तुकाराम महाराज म्हणतात, पुंडलिका, तू तुझ्या पादुका माझ्या मस्तकी ठेव. ४

४४४८ विटेवरी समचरण । तो हा रुक्मिणीरमण ॥ १ ॥
वेदशास्त्रा माहेर । केले दासा उपकार ॥ २ ॥

नामापाशीं चारी मुक्ति । पहा हृदयीं प्रतीति ।। ३ ।।
तुका म्हणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – कळा–कला, सकळा–सर्व

अर्थ – हा रुक्मिणीचा पती विटेवर समचरणानी उभा आहे १ हा वेदशास्त्रानादेखील माहेर असून याने दासावर उपकार केले आहेत २ याच्या नामामुळे चारही मुक्ती मिळतात यासबंधीचा अनुभव आपल्या हृदयातच तुम्ही पाहा ३ तुकाराम महाराज म्हणतात, याच्या अगी सर्व प्रकारच्या कला आहेत ४

४४४९ सकळ हे माया नागवे कवणा । भांबाविलें जना दाही दिशा ।। १ ।।
आशा तृष्णा दंभ लागलीं हीं पाठी । नेदी बैसों हाटीं मोह ठायीं ।। २ ।।
काम क्रोध घरा लावितील आगी । निंदा हिंसा दोघी पळतां खाती ।। ३ ।।
लाज पुढें उभी राहिली आडवी । ते करी गाढवी थोर घात ।। ४ ।।
तुका म्हणे चिंता घाली गर्भवासीं । ओढोनियां पाशीं चहूकडे ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा – नेदी–देत नाही, हाटीं–बाजारात

अर्थ – ही सर्व माया कुणालाही नागविते, फसविते लोकांना दाही दिशाना फिरवून भावावते एका ठिकाणी बसू देत नाही २ काम, क्रोध इत्यादी विकार घराला केव्हाच आग लावतील तेथून पळताना निंदा व हिंसा दोघीजणी खाऊन टाकतील ३ लाज पुढे येऊन आडवी उभी राहिली असून ती गाढवी फार मोठा घात करीत आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात, लौकिकाविषयीची चिंता चहूकडील नाना पाशात ओढून गर्भवासात घालते ५

४४५० सकळतीर्थांहूनि । पंढरी हे मुगुटमणि ।। १ ।।
काय सांगो तेथिल शोभा । रमावल्लभ जेथें उभा ।। २ ।।
न लभे व्रततीर्थदानीं[1] । तें या विठ्ठलदर्शनीं ।। ३ ।।
साधु संत गाती नाम । सकळ भूतांचा विश्राम ।। ४ ।।
तुका म्हणे स्तुती । करूं काय सांगो किती ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा – भूतांचा–प्राण्यांचा, जीवांचा

अर्थ – सर्व तीर्थांहून ही पंढरी म्हणजे मुकुटमणी आहे १ तेथील शोभा काय सांगावी ? कारण तेथे रमावल्लभ उभा आहे २ जे व्रत करून, तीर्थयात्रा करून, दान करून मिळत नाही ते या विठ्ठलाच्या दर्शनाने मिळते ३ याचे नाम साधुसंत गातात हा सर्व जीवांना एक प्रकारची विश्रांतीच आहे. तुकाराम महाराज म्हणतात, ही पंढरी व येथील श्रीहरी याची स्तुती तरी मी किती करू ? याच्याविषयी किती सांगू ? ५

४४५१ गव्हाच्या घुगऱ्या । नाचण्याच्या पुऱ्या । वऱ्या त्याचि वऱ्या । पाधाणी त्या पाधाणी ।। १ ।।
काय थोरपण । वाया जाळावा तो शीण । कारणापें भिन्न । निवडे तें निराळें ।। २ ।।
रुचि वोजेपाशीं । गरज ते जैशीतैशी । करूं नका नाशी । खावें खाणे जालें तें ।। ३ ।।
तुका म्हणे मोठा । काय करावा तो ताठा । नाहीं वीण नीटा । पाविजेत मारग ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा – पाधाणी–अडाणी बायको, वोजेपाशीं–सरळपणात, चांगुलपणात

[1] तीर्थव्रतदानी

अर्थ :– गव्हाच्या घुगऱ्या व नाचण्यांच्या पुऱ्या, जर एखाद्या अडाणी बायकोने केल्या तर बऱ्याच म्हणाव्या लागतात. १ अशा थोरपणाचा काय उपयोग ? उगीच शीण होतो तो मात्र जाळावा. भिन्न कारणामुळे जे निवडले जाईल तेच बरे २ नीट चांगुलपणा असेल तर रुची असते. गरज जशीतशी भागली जाते, म्हणून जे असेल ते खावे लागते. त्याचा नाश मात्र करू नका. ३ तुकाराम महाराज म्हणतात, उगाच मोठा ताठा काय कामाचा ? त्याच्याशिवाय काय नीट मार्ग मिळत नाहीत ? ४

४४५२ आपुलिया ऐसें करी । संग धरी ज्याचा हो ॥ १ ॥
म्हणउनि परपरते । वरवरते पळतसें ॥ २ ॥
लोभिक तें लोभा लावी । बांधल्या गोवी वांचूनि ॥ ३ ॥
तुका म्हणे नामगोठी । पुरे भेटी तुझी देवा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– परपरते–पलीकडचे, दुसरे.

अर्थ :– जो ज्याचा संग धरतो तो त्याला आपल्यासारखेच करून टाकतो. म्हणूनच जे कुणी पलीकडचे, दुसरे असते ते वरवर पळून जाते. २ आणि लोभी मनुष्य लोभ काही गुंत्यात बांधल्यावाचून लावतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या नामाविषयीच्या गोष्टी आणि तुझी भेट एवढेच पुरे आहे. ४

४४५३ बरें जालीयाचे अवघे सांगाती । वाइटाचे अंतीं कोणी नाहीं ॥ १ ॥
नोहे मातापिता नोहे कांतासुत । इतरांची मात काय सांगों ॥ २ ॥
तुका म्हणे जन दुतोंडी सावज । सांपडे सहज तिकडे धरी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– कांतासुत–बायको आणि मुलगा, मात–गोष्ट.

अर्थ :– काही चांगले झाले की त्याचे सर्वच सोबती होतात. पण काही वाईट झाले की शेवटी कुणीच मदतीस येत नाही. १ या प्रसंगी मग बायको, मुलगा, माता, पिता यांपैकी कुणीही मदतीस नसते. मग इतरांची गोष्ट कशासाठी सांगावी ? २ तुकाराम महाराज म्हणतात, लोक हे दुतोंडी प्राण्यासारखे असतात. जिकडून सापडले तिकडून धरतात. ३

४४५४ मिथ्या आहे सर्व अवघें हें मायिक । न कळे विवेक मज कांहीं ॥ १ ॥
सर्व बाजागिरी वाटती ही खरी । पहातां येथें उरी कांहीं नाहीं ॥ २ ॥
आतां मज दुःख वाटतें अंतरीं । उपाय झडकरी सांग कांहीं ॥ ३ ॥
पुढें कोण गति न कळे सर्वथा । तुझे पायीं माथा ठेवियेला ॥ ४ ॥
करणें तें करी सुखें आतां हरी । तुज म्यां निर्धारीं धरियेलें ॥ ५ ॥
स्वहित तें काय न कळे सर्वथा । तारीं तूं अनंता तुका म्हणे ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– मिथ्या–खोटे, बाजागिरी–गारुडीविद्या.

अर्थ :– सर्व काही खोटे आणि मायिक आहे. पण याविषयी मला काहीच विवेक करता येत नाही. १ ही सर्व गारुडीविद्या वाटते हे खरे येथे खरे पाहू जाता काहीच उरत नाही. २ आता मात्र मला अंतःकरणात फार दुःख वाटते. ते दूर होण्यासाठी काही तरी उपाय तू सांग. ३ पुढे काय गती होणार आहे हे काही नीट समजत नाही. मी तुझ्या पायांवर मात्र मस्तक ठेविले आहे. ४ श्रीहरी, आता तुला जे काय करायचे असेल ते सुखाने कर

मी तुला निर्धाराने धरून ठेविले आहे ५ तुकाराम महाराज म्हणतात, स्वहित काय आहे ते मला मुळीच समजत नाही अनंता, तूच आता मला तार. ६

४४५५ अवघ्या कोल्हयांचें वर्म अंडीं । धरितां तोंडीं खीळ पडे ॥ १ ॥
भुंकूं नका भुंकूं नका । आला तुका विष्णुदास ॥ २ ॥
कवणे ठायीं सादर व्हावें । नाहीं ठावें गाढवा ॥ ३ ॥
दुर्जनासि पंचानन । तुका रजरेणु संतांचा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- पंचानन-सिंह.

अर्थ :- कोल्हयासारख्या सर्व ढोंगी माणसांचे वर्म त्यांच्या अंडात असते. तेच धरले म्हणजे त्याची तोंडे बंद होतात १ उगाच भुंकू नका, भुंकू नका, हा विष्णुदास तुका आला आहे. २ कोणत्या ठिकाणी प्रकट व्हावे हे तुम्हा गाढवाना माहीतच नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, मी दुष्ट लोकाना सिंहासारखा असलो तरी संतांच्या चरणांवरील रजकण आहे ४

४४५६ तुझे म्हणों आम्हा । मग उणे पुरुषोत्तमा ॥ १ ॥
ऐसा धर्म काय । अमृतानें मृत्यु होय ॥ २ ॥
कल्पवृक्षा तळीं । गांठी बांधलिया झोळी ॥ ३ ॥
तुका म्हणे परीस । सांपडल्या उपवास ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- उणें-कमी.

अर्थ :- पुरुषोत्तमा, एकदा आम्ही तुझेच आहोत असे म्हटल्यावर मग काय कमी आहे रे ? १ अमृताच्या प्राशनाने मृत्यू यावा असा काय त्याचा गुणधर्म असतो ? २ कल्पवृक्षाच्या तळाशी बसून झोळीला गाठी देण्यासारखेच हे आहे ३ तुकाराम महाराज म्हणतात, परीस हाती आल्यावर उपवास करणे हे चमत्कारिकच. ४

४४५७ कोरडिया गोष्टी नावडती मना । नाहीं ब्रह्मज्ञानाविण चाड ॥ १ ॥
दाखवीं आपुलें सगुण रूपडें । वंदीन मी कोडें पाय तुझे ॥ २ ॥
न लगे तो मोक्ष मज सायुज्यता । नावडे हे वार्ता शून्याकारी ॥ ३ ॥
तुका म्हणे चाड धरीन श्रीमुखें । येशिल कवतुकें जवळीक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा - चाड-इच्छा, जरूरी, कोडें-कौतुकानें

अर्थ - देवा, माझ्या मनास कोरड्या गोष्टी आवडत नाहीत मला त्या ब्रह्मज्ञानाचीही तशी इच्छा नाही. १ तू एकदा आपले सगुण रूप दाखीव म्हणजे मी कौतुकाने तुझ्या पायांना वंदन करीन २ मला तुझा मोक्ष नको की सायुज्यतेची मुक्ती नको. शून्यकारी अशी निर्गुण निराकारी वार्ता मला आवडत नाही. ३ तुकाराम महाराज म्हणतात, तुझ्या मुखाची मात्र मी मनात इच्छा धरीन मग तू कौतुकाने माझ्याजवळ येशील. ४

४४५८ गणेश सारजा करिती गायना । आणि देवांगना रंभे ऐशा ॥ १ ॥
तेथें आम्ही मानवांहीं विनवावें तें काय । सुरवर पाय वंदिति जेथें ॥ २ ॥
ज्याच्या गायनासी तटस्थ शंकर । त्या हि परि पार न कळे तुझा ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही किंकर ते किती । इंद्राची हि मति नागविशी ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – सारजा-शारदा, सुरवर-श्रेष्ठ देव किंकर-सेवक, नागविसी-सापडत नाहीस

अर्थ – या देवाचे गायन प्रत्यक्ष गणेश शारदा आणि रंभेप्रमाणे देवण्या अशा देवांगना करतात १ येथे आम्ही मानवानी त्याला काय विनवावे ? त्याच्या ठिकाणी तर श्रेष्ठ देवही त्याचे वंदन करतात २ ज्याच्या गायनात थकर तटस्थ होतो, त्यालाही तुझा अंत लागत नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, तू प्रत्यक्ष इंद्राच्याही बुद्धीला सापडत नाहीस त्या ठिकाणी आम्ही सेवक कसे पुरे पडणार ? ४

४४५९ डोळियांचे दैव आजि उभें ठेलें । निधान देखिलें पंढरीयें ॥ १ ॥
काय तें वानावें वाचेचें पालवें । वेदा न बोलवे रूप ज्याचें ॥ २ ॥
आनंदाच्या रसें ओतीव चांगलें । देखतां रंगलें चित्त माझें ॥ ३ ॥
तुका म्हणे मी तों सगळाच विरालों । विठ्ठलचि जालों दर्शनानें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – ठेलें-राहिले, निधान-साठा, वानावें-वर्णावे, पालवें-खुणावण्याने

अर्थ – आज माझ्या डोळ्याचे दैव उभे राहिलेले पाहिले कारण मी आज पंढरीस हे सुखाचे निधान पाहिले १ जेथे वेदासही त्याच्या रूपाचे वर्णन करता येत नाही त्या ठिकाणी मी वाणीच्या खुणावण्याने किती वर्णन करावे ? २ हे रूप आनंदाच्या रसातून चांगले ओतीव अशा स्वरूपात पाहाताच माझे चित्त त्यातच रंगून गेले ३ तुकाराम महाराज म्हणतात मी या रूपास पाहून सगळाच विरून गेलो आहे विठ्ठलाच्या दर्शनाने विठ्ठलच बनून गेलो आहे ४

४४६० भोगियेल्या नारी । परि तो बाळब्रह्मचारी ॥ १ ॥
ऐसी ज्याचे अंगीं कळा । पार न कळे वेदाला ॥ २ ॥
बळीवळी थोरथोर । मोडोनिया केले चूर ॥ ३ ॥
वाकडी कुबज्या । सरसी आणियेली वोजा ॥ ४ ॥
मल्ल रगडिला पायीं । गज झुगारिला बाहीं ॥ ५ ॥
जिवे मारियेला मामा । धांवे भक्तांचिया कामा ॥ ६ ॥
तुका म्हणे पूर्ण । दावी भक्तीचीं विंदानें ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – कळा-कला, पार-सीमा, मर्यादा वोजा-नीटपणास, विंदानें-कौशल्य, कारागिरी

अर्थ – याने अनेक नारी भोगल्या असल्या तरी हा बालब्रह्मचारीच आहे १ अशी ज्याच्या अंगी कला आहे त्याचा अंत वेदांनाही लागत नाही १ याने अनेक बलवानानाही, थोर थोर बलिष्ठाना मोडून चूर करून टाकले आहे २ अनेक ठिकाणी वाकडी असणारी कुब्जा याने नीट करून तिला चांगली बनविली ३ याने मल्लाला पायांनी रगडून हत्तीही आपल्या हातांनी झुगारून दिला ४ याने आपल्या मामास, कंसास जीवे मारले आहे हा आपल्या भक्तांच्या कामासाठी धावत येतो ५ तुकाराम महाराज म्हणतात, अशा प्रकारे हा आपल्या भक्ताची कारागिरी पूर्णपणे दाखवीत आहे ६

४४६१ वृद्धपणीं आली जरा । शरीर कांपे थरथरा ॥ १ ॥
आयुष्य गेलें हें कळेना । स्मरा वेगीं पंढरिराणा ॥ २ ॥
दांत दाढा पडिल्या ओस । हनुवटि भेटे नाकास ॥ ३ ॥
हात पाय राहिले कान । नेत्रां पाझर हाले मान ॥ ४ ॥

अंगकांति परतली । चिरगुटा ऐसी जाली ॥ ५ ॥
आड पडे जिव्हा लोटे । शब्द नये मुखा वाटे ॥ ६ ॥
लांब लोंबताती अंड । भरभरा वाजे गांड ॥ ७ ॥
तुका म्हणे आतां तरी । स्मरा वेगीं हरी हरी ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा :– जरा–म्हातारपण

अर्थ :– शरीराला म्हातारपण आले असून आता त्याचा थरकाप वाढला आहे. १ असे आपले आयुष्य फुकट गेले हे कळतच नाही यासाठी त्वरेने पंढरीच्या राण्याचे स्मरण करा २ तोंडातील दात व दाढा पडून गेल्या, हनुवटी नाकास भेटायला आली. ३ हात, पाय, कान कामातून गेले डोळ्यांना सारखाच पाझर लागला व मान हालू लागली. ४ पूर्वीची अंगकांती पालटून ती चिरगुटाप्रमाणे झाली. ५ जिभा मागे पडून शब्द अडखळू लागले. मुखावाटे त्याचा उच्चार नीट होईना ६ अंड लांब लोंबू लागले, आणि गांडीतून भरभर असा आवाज येऊ लागला ७ तुकाराम महाराज म्हणतात, आता तरी वेगाने श्रीहरी श्रीहरी असे स्मरण करा ना. ८

४४६२ वृद्धपणीं न पुसे कोणी । विटंबणी देहाची ॥ १ ॥
नव द्वारें जाली मोकळीक । गांड सरली वाजती ॥ २ ॥
दंत दाढा गळे थुंका । लागे नाका हनुवटी ॥ ३ ॥
शब्द नये मुखावाटा । करिती चेष्टा पोरें तीं ॥ ४ ॥
तुका म्हणे अजून तरि । स्मरें श्रीहरी सोडवील ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा .– विटंबणी–विटंबना

अर्थ :– म्हातारपणी माणसास कुणीच विचारत नाही. देहाची एकसारखी विटंबनाच होते. १ शरीराच्या नऊ द्वारातून मोकळीक झाली गांडीतून आवाज होऊ लागले २ दात, दाढा तोंडातून नाहीशा झाल्या. तोंडातून थुंका गळू लागला नाकास हनुवटी लागली ३ मुखावाटे शब्द येईनासे होतात आणि पोरे चेष्टा करू लागतात ४ तुकाराम महाराज म्हणतात, अजून तरी तू श्रीहरीचे स्मरण कर तुला तो सोडवील ५

विवरण –वरील दोन अभंगात तुकाराम महाराजांनी माणसास येणारे वृद्धत्व व त्यानुसार होणारे रोग, शरीराचे विकलत्व याचे अतिरेकाने वर्णन केले आहे सत मानवी देहाचे असे वरवर विकृत व भयानक वाटणारे वर्णन का करतात ? याच देहाच्या साह्याने परमेश्वराची प्राप्ती करून घ्यावयाची आहे ना ? याच मुखाने प्रभुनाम गायचे, याच डोळ्यांनी त्याचे रूप पाहून हृदयात साठवायचे, याच बाहूंनी त्याला आलिंगन द्यायचे, याच कानांनी त्याचे गुणगान ऐकायचे; म्हणजे याच देहाने व इंद्रियांनी त्याची पूजा करायची, आराधना करायची, असे असताना या देहाची व त्याच्या विकलतेची तपशिलाने वर्णने सत का देतात ? वृद्धपणात शरीर थरथर कापते, दाढा पडून जातात, हनुवटीस नाक भेटायला येते, नेत्रांना पाझर लागतात, मान लुटलुटू करायला लागते, सतेज अंगकांती चिरगुटाप्रमाणे होऊन जाते अशी देहाची विटंबना होत राहाते तुकोबांनी मानवी देहाचे वा त्याच्या वृद्धत्वाचे शब्दचित्र का काढले आहे ?

या महत्त्वाच्या प्रश्नाचे उत्तरही वरील दोन अभंगातच आहे ' आयुष्य गेले हें कळेना । स्मरा वेगीं पंढरी-राणा ' हे युवाना सांगायचे आहे आता तरी ' स्मरा वेगीं हरी हरी ' हा त्याचा उपदेश आहे मानवी देह सर्व इंद्रिया-सहित कार्यक्षम आहे तोपर्यंतच त्याच्या साह्याने ईश्वराची प्राप्ती करून घ्यावी, तो सत्कारणी लावावा, अशी संतांची शिकवण आहे नाहीतर भर वयात मनुष्य भलत्याच भ्रमात असतो. मी म्हणजे माझा देह, माझें रूपसौंदर्य याच वृत्तीत तो गुरफटून जातो, आणि मग त्याच्या हातून भलभलते अनाचार होऊ लागतात. आपणास वृद्धत्व येणार आहे,

मृत्यू अटळ आहे, हे तो विसरून जातो व मग अनन्वित कृत्ये त्याच्या हातून घडतात अशा या देहाभिमानी माणसास मृत्यूजवळ उभा आहे, उद्या देहाची सर्व इंद्रिये क्षीण होणार आहेत अशी जाणीव संत करून देतात याच मानवी देहाची भयानक अशी चित्रणे ते करतात देहाचे यथार्थ स्वरूप व त्यावरून साधावयाचे ध्येय याची जाणीव माणसास करून देण्यासाठीच ही अशी वृद्धत्वाची वर्णने साधुसंत करीत असतात. 'जन्ममृत्युजराव्याधि दुःखदोषानुदर्शनम्' जन्म, मृत्यू, जरा म्हणजे म्हातारपण, दुःख हे दोष आहेत असे ज्ञानी मनुष्य मानतो, अशी भगवद्गीतेची साक्ष आहे उद्याच वाटमारी होण्याचा संभव असल्यामुळे 'तव आजोचि होईजे सावधान' असे श्रीज्ञानदेवानी म्हटले आहे आज तारुण्याने रसरसलेले शरीर उद्या सर्वांगानी क्षीण होईल कमळाच्या पाकळ्याशी स्पर्धा करणारे डोळे म्हातारपणी पिकलेल्या पडवळासारखे दिसतील शोभिवंत दिसणाऱ्या भुवया झाडाच्या जुन्या सालीप्रमाणे लोंबतील श्वासवाच्या लोटानी ऊर भिजून जाईल थुंकीच्या पिचकाऱ्यानी तोंड मलीन होईल सुंदर विड्याने रंगणाऱ्या आजच्या तोंडात कफाचा लोंढा येऊन दाढा दातासकट उखडून जातील झडीच्या पावसामुळे एकदा गुरे बसली म्हणजे ती काही केल्या उठत नाहीत, त्याप्रमाणे म्हातारपणी जीभ काही नामस्मरणासाठी उठणार नाही आषाढातील पावसामुळे जशी पर्वत शिखरे पाझरतात त्याप्रमाणे दाताच्या खिंडीतून लाळेचे पूरच्या पूर वाहतील सारे शरीर म्हाताऱ्या माकडासारखे बेडौल दिसेल मळमूत्राची द्वारे फुटक्या भांड्यासारखी होतील इतके वर्णन करून ज्ञानदेव म्हणतात, 'नवसिये होती इतरें । माझिया निधनें' त्याच्या निधनासाठी जवळचे नातेवाईकही नवस करू लागतील म्हणून तरुणपणीच विचारी माणसाने 'ऐसी वार्धक्याची सूचणी नीट जाणून घ्यावी 'म्हणोनि वार्धक्यायेनि आठवें । वार्धक्य जो नागवे । तयाच्या ठायीं जाणावें । ज्ञान आहे' असा निर्वाळा ज्ञानदेवानी दिलेला आहे

या हेतूने संत देहाची निंदा करतात, पुढील वृद्धत्वाची आठवण करून देतात रामदासानीही देहाची व जरामृत्युव्याधीची अत्यंत कडक शब्दात चर्चा केली आहे 'नर्काचें कोठार भरलें । आतबाहेरी लिडोविडिलें । मूत्र पोतडें । जमलें दुर्गंधीचें' असा हा देह विवेकाने सत्कारणी लावावयाचा असतो चंद्रासारखे असणारे मुखकमळ 'लाळ थुंका आणि मळ । पीत श्लेष्मा प्रबळ' याचे स्थान असल्याचे जाणावे आणि याचा उपयोग प्रभुनामासाठी प्रथम पासूनच करावा 'ऐसें दुःख गर्भवासीं । होत प्राणिमात्रासीं । म्हणोनिया भगवंतासी । शरण जावें' असा रामदासांचा निष्कर्ष आहे

४४६३ आतित्याई देतां जीव । नये कींव देवासि ॥ १ ॥
घोंडघासाटीं राग आला । जीव दिला पंगेंत ॥ २ ॥
त्यासि परलोकीं नाहीं मुक्ति । अधोगति चुकेना ॥ ३ ॥
तुका म्हणे कृष्णराम । स्मरतां श्रम वारती ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आतित्याई–आततायी, वारती–दूर होतात

अर्थ :– आततायी माणसाने देवासाठी म्हणून जीव दिला तरी देवास कधीही कींव येत नाही. १ घोडघासाठी राग येऊन जर पंगेत कुणी जीव दिला तर देव पावणार नाही २ त्याला परलोकही नाही, आणि मुक्तीही मिळणार नाही त्याची अधोगतीही कधी चुकणार नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, या रामकृष्णाचे नाम घेताच सर्व श्रम दूर होतात ४

४४६४ तुझें रूप पाहतां देवा । सुख जालें माझ्या जीवा ॥ १ ॥
हें तों वाचे बोलवेना । काय सांगों नारायणा ॥ २ ॥
जन्मोजन्मींचें सुकृत । तुझे पायीं रमे चित्त ॥ ३ ॥
जरी योगाचा अभ्यास । तेव्हां तुझा निजध्यास ॥ ४ ॥
तुका म्हणे भक्त । गोड गाऊं हरिचें गीत ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – सुकृत–पुण्य

अर्थ – देवा, तुझे रूप पाहाताना माझ्या जीवास फारच सुख होते १ नारायणा, मी माझ्या वाणीने काय सांगू ? वाचेनें ते बोलताच येत नाही २ अनेक जन्माचे पुण्य असल्यामुळे तुझ्या पायी माझे चित्त रमू लागले ३ योगाचा जर अभ्यास असता तर तुझा मला निजध्यास लागला असता ४ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही भक्त या श्रीहरीचे गोड गीत गाऊ ५

४४६५ तुजवीण मज कोण आहे देवा । मुकुंदा केशवा नारायणा ॥ १ ॥
जोडोनियां कर कृपेच्या सागरा । गोपीमनोहरा पांडुरंगा ॥ २ ॥
साच करी हरी आपुली ब्रिदावळी । कृपेने सांभाळीं मायबापा ॥ ३ ॥
साहृच होसी जरी[1] जाती सहा वैरी । मग ध्यान करीं आवडीने ॥ ४ ॥
सर्व अपराध क्षमा करीं माझा । लडिवाळ तुझा पांडुरंगा ॥ ५ ॥
कृपा करोनिया द्यावी क्षमा शांति । तेणे तुझी भक्ति घडेल देवा ॥ ६ ॥
ऐसे तो सामर्थ्य नाही नारायणा । जरी तुज करुणा येइल कांहीं ॥ ७ ॥
तुका म्हणे आता आपगावे मज । राखे माझी लाज पांडुरंगा ॥ ८ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–खरी, आपगावे–सांभाळावे

अर्थ :– मुकुंदा, नारायणा, केशवा, देवा, तुझ्याशिवाय मला दुसरे कोण आहे रे ? १ कृपेच्या सागरा, पांडुरंगा, गोपीमनोहरा मी तुला हात जोडीत आहे २ श्रीहरी, तू आपली ब्रीदावली खरी करून दाखीव मायबापा, तू माझ्यावर कृपा करून मला सांभाळ ३ तू जर मला साहृयभूत झालास तर कामक्रोधादी सहा शत्रू निघून जातील मग मी तुझे ध्यान मोठ्या आवडीने करीन ४ माझे सर्व अपराध देवा, तू क्षमा कर पांडुरंगा, मी तुझा लडिवाळ आहे ५ देवा, तू माझ्यावर कृपा कर व क्षमा, शांति दे त्यामुळेच तुझी भक्ती मला घडेल ६ नारायणा, माझ्या स्वतःचे असे काहीच सामर्थ्य नाही म्हणून तुला माझी करुणा थोडी तरी येईल ७ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, माझा सांभाळ करून माझी लाज तू राखावीस ८

४४६६ नको विद्या वयसा आयुष्य फारसे । नाहीं मज पिसे मुक्तीचे हीं ॥ १ ॥
रामकृष्ण म्हणता जावो माझा प्राण । हेंचि कृपादान मागतसे ॥ २ ॥
नको धन मान न वाढो संतान । मुखीं नारायण प्राण जावा ॥ ३ ॥
तुका म्हणे दीन काकुलती येतो । तुज निरवितो पांडुरंगा ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पिसे–वेड, निरवितों–ताब्यात देतो

अर्थ :– देवा, मला विद्या नको, की वाढणारे आयुष्यही नको मला मुक्तीचेही वेड नाही १ देवा, रामकृष्ण म्हणत असताना माझा प्राण जावा हेच कृपादान मी तुझ्याजवळ मागीत आहे २ मला धन नको, मान नको, माझे संतानही न वाढो, परंतु नारायणा, मुखात तुझे नाम असताना प्राण जावा ३ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, मी दीन तुला काकुळतीस येत असून मी माझे सर्वस्व तुझ्या ताब्यात देत आहे ४

४४६७ शिष्या सांगे उपदेश । गुरुपूजा हे विशेष ॥ १ ॥
दावी आचार सोवळे । दंड कमंडलु माळे ॥ २ ॥
छाटी भगवी मानसीं । व्यर्थ म्हणवी संन्यासी ॥ ३ ॥
तुका म्हणे लोभ । न सुटे नाहीं लाभ ॥ ४ ॥

१ तरी

शब्दार्थ व टीपा :– छाटी–सन्याशाचे वस्त्र

अर्थ – गुरुचे पूजन हेच विशेष आहे असा उपदेश हा गुरू आपल्या शिष्यास सांगतो. १ दंड, कमंडलू, माळ इत्यादींच्या साहचार्याने तो सोवळे आचार दाखवितो २ त्याच्या अंगावर भगवी छाटी असली तरी मनातून तो तसा विरक्त नसतो तो उगाचच स्वतःस सन्यासी म्हणवून घेतो ३ तुकाराम महाराज म्हणतात, लौकिक गोष्टीविषयी जर काही लोभ सुटला नाही तर काहीच लाभ होणार नाही ४

४४६८ जिकडे पाहें तिकडे उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ १ ॥
डोळा बैसले बैसले । रूप राहोनि संचलें ॥ २ ॥
न वर्जितां दाही दिशा । जिकडे पाहे तिकडे सरिसा ॥ ३ ॥
तुका म्हणे समपदीं । उभा दिठीचिये आधीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – न वर्जिता–न वळवता, सरिसा–जवळ, दिठी–दृष्टी

अर्थ :– जिकडे पाहावे तिकडे हा गगनाचा गाभा उभा राहिलेला दिसतो १ याचे रूप माझ्या डोळ्यांत भरून साचले आहे २ दाही दिशांना जिकडे पाहाल तिकडे हा जवळ आहे असे भासते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हा श्रीहरी दृष्टी पोचण्याच्या आधीच समपदांनी उभा असतो ४

४४६९ आपटा संवदड रानचारा । दसऱ्याचा होय तुरा ॥ १ ॥
तैसा देवामुळें मान । नाहीं तरी पुसे कोण ॥ २ ॥
मृत्तिकेची ते घागरी । पाण्यासाटीं बैसे शिरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे माप जाण । दाण्यासवे घेणे देणे ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– आपटा–दसऱ्याची दिवशी ज्याची पानें सोने म्हणून देतात ते झाड, संवदड–शमीचे झाड

अर्थ :– आपटा, शमीचे झाड ही झाडे खरे म्हणजे रानातील चाऱ्याप्रमाणेच पण दसऱ्यासारख्या मुहूर्तावर मात्र त्यांना सोन्याचे मोल येते १ त्याप्रमाणे देवामुळे मान येतो नाहीतर कोण विचारते ? २ मातीचीच घागर बनलेली असते पण तिच्यात पाणी भरलेले असल्यामुळे तिला महत्त्व येऊन ती डोक्यावर बसते ३ तुकाराम महाराज म्हणतात, दाण्यांनी भरलेले माप असल्याने त्याला एवढे महत्त्व असते ४

४४७० काळ सार्थक केला त्याणीं । धरिला मनीं विठ्ठल ॥ १ ॥
नाम वाचे श्रवण कीर्ति । पाउलें चित्तीं समान ॥ २ ॥
कीर्तनाचा समारंभ । निर्दंभ सर्वदा ॥ ३ ॥
तुका म्हणे स्वरूपसिद्धि । नित्य समाधि हरिनामीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निर्दंभ–दंभ नसलेला

अर्थ :– ज्यांनी आपल्या मनात विठ्ठल धरला त्यांनी आपले आयुष्य सार्थकी लावले १ त्यांच्या वाणीत सतत श्रीहरीचे नाम असते त्याचीच कीर्ती त्यांच्या कानावर येते त्याचीच सम पाउले त्यांच्या चित्तात असतात २ त्यांना कीर्तन हाच मोठा समारंभ वाटतो ते सदा दंभरहित असतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, हरिनामामध्ये नित्य रममाण होणे हीच त्यांची समाधी व स्वरूपसिद्धी होय ४

४४७१ आम्ही जातों आपुल्या गावा । आमुचा रामराम घ्यावा ॥ १ ॥
तुमची आमची हेचि भेटी । येथूनिया जन्मतुटी ॥ २ ॥

आतां असों द्यावी दया । तुमच्या लागतसें पायां ॥ ३ ॥
येतां निजधामीं कोणी । विठ्ठलविठ्ठल बोला वाणी ॥ ४ ॥
रामकृष्ण मुखीं बोला । तुका जातो वैकुंठाला ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– जन्मतुटी–जन्माची ताटातूट.

अर्थ :– आता आम्ही आमच्या गावास जात आहोत. आमचा रामराम तुम्ही घ्यावा. १ तुमची व आमची हीच आता शेवटची भेट आहे येथून आता जन्माची ताटातूट होणार आहे. २ आता तुमची सर्वांची दया माझ्यावर असू द्यावी. मी तुमच्या पायांशी लागत आहे. ३ कुणी जर निजधामास यालं तर वाणीने विठ्ठल विठ्ठल असे म्हणा ४ तुकाराम महाराज म्हणतात, तुम्ही मुखाने रामकृष्ण असे बोला; मी वैकुंठाला निघालो आहे. ५

४४७२ कामधेनूचें वासरूं । खाया न मिळे काय करूं ॥ १ ॥
ऐसें आम्हां मांडियेलें । विठो त्वां कां सांडियेलें ॥ २ ॥
बैसोनि कल्पद्रुमातळीं । पोटासाटीं तळमळी ॥ ३ ॥
तुका म्हणे नारायणा । बरें लोकीं हें दीसेना ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– सांडियेलें–सोडले.

अर्थ :– कामधेनूचे वासरू असून त्याला खायला काही मिळत नाही. काय करू असे त्याने म्हटल्याने काय होणार ? १ देवा, तुमचे-आमचे असेच नाते असताना तू आमचा त्याग का केलास ? २ कल्पवृक्षाच्या तळाशी बसून पोटासाठी तळमळतो, याला काय म्हणावे ? ३ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणा, हे तर लोकात बरे दिसणार नाही. ४

४४७३ तुझें नाम माझे मुखीं असो देवा । विनवितों राघवा दास तुझा ॥ १ ॥
तुझ्या नामबळें तरले पतित । म्हणोनि माझें चित्त तुझे पायीं ॥ २ ॥
तुका म्हणे तुझें नाम हें सादर । गातां निरंतर सुख वाटे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– सादर–आदराने.

अर्थ :– देवा, तुझे नाम माझ्या मुखात सतत असो. राघवा, अशी विनवणी हा दास तुला करीत आहे. १ तुझ्या नामाच्या बळावर अनेक पतित लोक तरले म्हणून तर माझे चित्त तुझ्या पायी लागले आहे. २ तुकाराम महाराज म्हणतात, तुझे नाम हे मोठ्या आदराने गात असताना मला नेहमीच सुख वाटते. ३

४४७४ उभय भाग्यवंत तरीच समान । स्थळीं समाधान तरीच राहे ॥ १ ॥
युक्तीचें गौरव नसतां जिव्हाळा । सांचवणी जळा परी नाश ॥ २ ॥
लोखंडा परीस ज्ञानिया तो शठ । नांवाचा पालट दगड खरा ॥ ३ ॥
तुका म्हणे अवघे विनोदाचे ठाव । एकात्मक भाव नाहीं तेथें ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उभय–दोनही, ठाव-स्थाने.

अर्थ :– दोनही व्यक्ती समान असल्या तरच भाग्यवंत असतात तरच त्यांच्या स्थानावर समाधान लाभते. १ एक जिव्हाळा जर नसेल तर वरवरची युक्ती काय कामाची ? साठवलेले पाणी नासूनच जाणार. २ परीसाला

सोलंड पाहिजे, दगड असेल तर त्याच्यात पालट होणार नाही. त्याचप्रमाणे शठाचा म्हणजे मूर्खांचा पालट ज्ञानी माणसामुळे होतो. ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकात्मतेची भावना ज्या ठिकाणी नसते तेथे सर्वत्र विनोदाचीच स्थाने निर्माण होतात. ४

४४७५ दो दिवसांचा पाहुणा चालतो उताणा । कां रे नारायणा न भजसी ॥ १ ॥
तूं अखंड दुश्चित्ता तुज नेती अवचिता । मग पंढरीनाथा भजसी केव्हां ॥ २ ॥
तुका म्हणे ऐसे आहेत उदंड । तया केशव प्रचंड केवीं भेटे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– उदंड–पुष्कळ.

अर्थ :– या जगात मनुष्य पाहाल तर दोन दिवसांचा पाहुणा असतो; पण तो मोठ्या गर्वाने उताणाच चालतो. पण नारायणाला काही भजत नाही. १ तू तर अखंडपणे दुश्चित्तच असल्याने तुला अवचितपणे काळ घेऊन जाईल. मग तू पंढरीनाथाला कधी रे भजशील ? २ तुकाराम महाराज म्हणतात, असे अहंकारी लोक पुष्कळच आहेत. त्यांना केशव केव्हा भेटेल कोणास माहीत ? ३

४४७६ तुझे पाय माझें भाळ । एकत्रता सर्वकाळ ॥ १ ॥
हेंचि देईं विठाबाई । पांडुरंगे माझे आई ॥ २ ॥
नाहीं मोक्ष मुक्ति चाड । तुझी सेवा लागे गोड ॥ ३ ॥
सदा संग सज्जनांचा । नको वियोग पंढरीचा ॥ ४ ॥
नित्य चंद्रभागे स्नान । करीं क्षेत्रप्रदक्षण ॥ ५ ॥
पुंडलीक पाहोन दृष्टि । हर्षे नाचों वाळवंटीं ॥ ६ ॥
तुका म्हणे पांडुरंगा । तुझें स्वरूप चंद्रभागा ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– भाळ–डोके, चाड–इच्छा.

अर्थ :– देवा, तुझे पाय व त्यांवरील माझे डोके, अशी एकत्रता सर्वकाळ असावी. १ विठाबाई, पांडुरंगे, माझे आई, हेच एक देणे मला तू दे. २ मला मोक्षाची अथवा मुक्तीची इच्छा नाही. तुझी सेवाच मला फार गोड वाटते. ३ सतत सज्जनांची सोबत तू मला दे या पंढरीचा वियोग होऊ देऊ नकोस. ४ नित्य चंद्रभागेचे स्नान घडून मी त्या क्षेत्राची प्रदक्षणा करावी. ५ मी पुंडलीकाला डोळे भरून पाहीन व हर्षाने त्या वाळवंटात नाचेन. ६ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, या चंद्रभागेचेही रूप तुझेच आहे. ७

४४७७ बाईल चालिली माहेरा । संगें दिधला म्हातारा ॥ १ ॥
सिधा सामग्री पोटाची । सर्व स्वारी बइलाची ॥ २ ॥
जातां पाडिली ढोरानें । सिव्या देती अन्योविन्यें ॥ ३ ॥
न सावरी आपणातें । नग्न सावलें वरतें ॥ ४ ॥
फजित केलें जनलोकीं । मेला म्हणे पडे नरकीं ॥ ५ ॥
गोहाची हे गेली लाज । गांजितां कां तुम्ही मज ॥ ६ ॥
तुका म्हणे जनीं । छी थू केली विटंबणी ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– अन्योविन्यें–परस्पराना, सावलें–लुगडे, वस्त्र, गोहाची–नवऱ्याची.

अर्थ :– कुणी एक बाई माहेराला निघाली होती. तिच्या बरोबर तिचा म्हातारा नवरा होता १ बरोबर पोरास लागणारी शिधासामग्री असून बैलही बरोबर होता. २ तिला जाताना त्या ढोराने पाडले. मग त्यांनी एकमेकाला शिव्या द्यायला सुरवात केली ३ तिला स्वत:ला सावरता आले नाही. तिचे लुगडे वर होऊन ती नग्न झाली ४ या लोकात याने मला फजीत केले, मेला नरकात पडेल असे ती म्हणाली ५ यात या नवऱ्याचीही लाज गेली तुम्ही मला विनाकारण का गांजता असे ती म्हणू लागली ६ तुकाराम महाराज म्हणतात, अशा रीतीने सर्व लोकात छी: थू आणि विटंबना झाली. ७

४४७८ तुळसीवृंदावनीं उपजला कांदा । नावडे गोविंदा कांहीं केल्या ॥ १ ॥
तैसे वंशामध्यें जाले जे मानव । जाणावे दानव अभक्त ते ॥ २ ॥
केवड्यामधील निर्गंध कणसे । तैशीं तीं माणसे भक्तिहीन ॥ ३ ॥
तुका म्हणे जेवीं चंदनातिल आळी । न चढे[1] निढळीं देवाचिया ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – निढळीं–कपाळावर.

अर्थ :– तुळसीवृंदावनात जर कांदा निपजला तर तो गोविंदाला काही केल्या आवडत नाही १ त्याचप्रमाणे मानववंशात जन्मास येऊन जे अभक्त मानव झाले ते दानव मानावेत २ केवड्यातील कणीस जसे गंधहीन असते तशी माणसे भक्तिहीन झाली तर होतात ३ तुकाराम महाराज म्हणतात, चंदनातील आळी, ती चंदनामधील आहे म्हणून काही देवाच्या कपाळावर जाऊन बसत नाही ४

४४७९ संचित तैशी वुद्धि उपजे मनामधीं । सांगितलें सिद्धी नव जाय ॥ १ ॥
ज्याचा जैसा ठेवा तो त्याप्रति धांवे । न लगती करावे उपदेश ॥ २ ॥
घेउनियां उठे आपुलाला गुण । भविष्य प्रमाण तुका म्हणे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– मागील अभंगक्रमांक ४३८१ पाहावा

४४८० शिव शक्ति आणि सूर्य गणपति । एकचि म्हणती विष्णूस ही ॥ १ ॥
हिरा गार दोनी मानिती समान । राजस भजनें वायां जाती ॥ २ ॥
अन्य देवतांसि देव म्हणऊन । तामस जीवन तमोयोग्या ॥ ३ ॥
वांयां जायासाठीं केलासे हव्यास । अन्य देवतांस देवपण ॥ ४ ॥
आपुलिया मुखें सांगतसे धणी । नव्हे माझी वाणी पदरींची ॥ ५ ॥
धन्य ते वैष्णव भजती केशव । सात्विक हे जीव मोक्षा योग्य ॥ ६ ॥
तुका म्हणे मोक्ष नाहीं कोणापासीं । एका गोविंदासी शरण व्हा रे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– धणी–स्वामी.

अर्थ :– शिव, शक्ती, सूर्य, गणपती ही सर्व या विष्णूचीच रूपे आहेत असे म्हणतात. १ परंतु अन्य देवतांची भजने राजस वृत्तीने करून लोक वाया जातात ते हिरा व गारगोटी एकच मानतात २ इतर देवतांना अथवा देवांना देव समजून तामसी लोक तामसमय जीवन जगतात. ३ अशा रीतीने अन्य देवताना शरण गेल्याने हा हव्यास वाया गेल्याप्रमाणेच होतो. ४ हा स्वामी आपल्या स्वत:च्या मुखाने हे सारे सांगत आहे. ही वाणी काही माझी पदरची नाही ५ या केशवाला भजणारे वैष्णव धन्य होत. मोक्षाला जाण्यास योग्य असे हे सात्त्विक जीव आहेत. ६ तुकाराम महाराज म्हणतात, मोक्ष हा इतर कुणापाशीही नसल्याने तुम्ही एका गोविंदाला शरण जावे. ७

---

[1] चले.

विवरण :- शिव, शक्ती, सूर्य आणि गणपती ही देवाची नावे जरी भिन्न भिन्न असली तरी ती सर्व एकाच परमेश्वराची म्हणजे विष्णूची रूपे आहेत. याच्याशिवाय इतर ल्हानसान देवदेवताना कुणी भजू नये असा भावार्थ या अभंगाचा आहे वैदिक काळापासून या पाचही देवाची नावे गाजत आलेली असून त्याच्या उपासकाच्या परपराही भिन्नत्वाने वाढीस लागल्या होत्या. प्रत्येकाचे वळ वाढून अनुयायात स्पर्धा निर्माण झाली. श्रेष्ठकनिष्ठ भाव निर्माण होऊन मतभेद वाढले एकत्वाच्या साक्षात्काराऐवजी नाना मतमतातरे निर्माण होऊन बुद्धिभेद होत राहिला. समाज विघटित होत राहिला. म्हणून शिव, विष्णू, शक्ती, सूर्य आणि गणपती या पाच देवाच्या उपासकाचे एकीकरण करण्याच्या दृष्टीने प्रथम शकराचार्यानी पचायतनकल्पना काढून पाच पथीयाचे ऐक्य घडविण्याचा महान प्रयत्न केला. प्रत्येक देवाचा पूजक आपल्या घरी पचायतनात आपला देव मध्ये ठेवून त्याच्याभोवती इतर चार देवाना भजू लागला सर्वांचेच पूजन घडल्याने ऐक्याची भावना वाढीस लागली उपास्य दैवताची सख्या अधिक असली तरी त्याच्यातील तत्वामध्ये भेद नाही असा भाव या पंचायतनपूजेमुळे वाढीस लागला 'एकं सत् विप्राः बहुधा वदन्ति' या उक्तीस जसा अर्थ आहे तसाच 'अनेकीं सदा एक देवासि पाहे' हेही वचन महत्वाचे आहे. पचायतनपूजेमुळे समन्वयाची कल्पना वळावत जाऊन मतभेद मिटत गेले

४४८१ तुम्ही साधु संत कैवल्यसागर । मोक्षाचे आगर तुह्मां घरीं ॥ १ ॥
तेथें मतिमंद काय बोलो वाणी । अमृताचे धणी पाणी कां घ्या ॥ २ ॥
कोटी भानु तेजीं खद्योत बापुडें । तैसा तुह्मांपुढें काय बोलों ॥ ३ ॥
तुह्मी अवघे चिंतामणि कल्पतरूचीं वनें । त्यापुढें धांवणें मशकांनीं ॥ ४ ॥
वाराणशीक्षेत्र गंगा वाहे कोड । काय तेथें पाड कोकणाचे ॥ ५ ॥
पल्लवाचा वारा हिमकरीं काय । गगनावरी छाय कोण करी ॥ ६ ॥
समुद्राची तृषा हरी ऐसा कोण । जगाची जी तान्ह निववीतो ॥ ७ ॥
मेरूचा पाठार अवघी ते क्षिति । मशकाचे हातीं मुष्टि फावे ॥ ८ ॥
सिंहापुढें काय जंबूक आरोळी । मोतियाचे वोळी कांच काय ॥ ९ ॥
कापुरासि काय लावूनि उटावें । काय ओवाळावें दीपकासि ॥ १० ॥
तैसे तुह्मी निरे ज्ञानाचे मरीव । तेथें म्यां बोलावें पाड काय ॥ ११ ॥
कृपानिधि तुह्मीं बोलविलें बोला । सुखें न्याय केला तुमचा मीं ॥ १२ ॥
अज्ञान मी वेडें ह्मणवितों बाळ । माझा प्रतिपाळ करणें तुह्मां ॥ १३ ॥
बोवडें बोलणें न धरावा कोप । क्षमा करा बाप कृपासिंधु ॥ १४ ॥
तुका ह्मणे तुह्मी संत बापमाय । भयें[1] धरिलें पाय कृपानिधि ॥ १५ ॥

शब्दार्थ व टीपा :- धणी-मालक, भानु-सूर्य, खद्योत-काजवा, मशकांनी-चिलटानी, कोड-कौतुकाने, पाड-किंमत, पल्लवाचा-पानाचा, हिमकरीं-चद्राला, क्षिती-पृथ्वी, जंबूक-कोल्हा, निरें-शुद्ध, सात्त्विक.

अर्थ :- संतहो, तुम्ही कैवल्याचे सागर आहात तुमच्या घरी मोक्षाचे आगरच आहे. १ अशा ठिकाणी मी मतिमंद वाणीने काय बोलणार ? अमृताचे जे मालक आहेत त्यांनी पाणी का प्यावे ? २ कोटी सूर्यांच्या तेजापुढे बापड्या काजव्याचे काय ? त्याप्रमाणे मी तुमच्यापुढे आहे ३ तुम्ही सर्वजण चिंतामणी व कल्पतरू यांची रूपे आहात. त्याच्यापुढे चिलटांनी काय धावावे ? ४ वाराणशी येथील गगा कौतुकाने वाहात असताना तिच्यापुढे कोकणातील लहानशा नदीची काय किंमत ? ५ झाडाचा, पानाचा वारा चद्राला काय उपयोगी ? गगनावर छाया कोण धरतो ? ६ सर्व जगाची तहान भागविणाऱ्या या समुद्राची तृष्णा हरण करणारा कोण आहे ? ७ मेरू-

१ भयें.

पर्वताचे पठार व अवघी पृथ्वी एकीकडे आणि चिलटाच्या हातातील माती एकोकडे ८ सिंहाच्यापुढे कोल्हयाचे ओरडणे काय किंमतीचे ? मोत्यांच्या ओळीपुढे काचेच्या मण्याची काय किंमत ? ९ कापराला आपली कशाचे उटणे लावावे ? दीपकाला कशाने ओवाळावे ? १० त्याप्रमाणे संतजनहो, तुम्ही ज्ञानाचे भरीव साठे आहात. तेथे मी बोलण्याची किंमत काय ? ११ तुम्ही कृपेचे निधी असून मला बोलते केले आहे. आणि त्याच बळावर मी तुमचा न्याय सुखाने केला आहे. १२ मी स्वतःस अज्ञानी व वेडे बाळ म्हणवून घेतो माझा सांभाळ तुम्हांलाच करावा लागणार आहे. १३ माझे बोल बोबडे असले तरी तुम्ही त्याचा राग धरू नये तुम्ही कृपासिंधू बाप असल्याने मला क्षमा करा. १४ तुकाराम महाराज म्हणतात, संतहो, तुम्ही मायबाप आहात तुम्ही कृपेचे निधी आहात. मी भयाने तुमचे पाय धरले आहेत १५

४४८२ देहीं असोनियां देव । वृथा फिरतो निर्दैव ॥ १ ॥
देव आहे अंतर्यामीं । व्यर्थ हिंडे तीर्थग्रामीं ॥ २ ॥
नाभी मृगाचे कस्तुरी । व्यर्थ हिंडे वनांतरीं ॥ ३ ॥
साखरेचें मूळ ऊंस । तैसा देहीं देव दिसे ॥ ४ ॥
दुधीं असतां नवनीत । नेणे तयाचें मथित ॥ ५ ॥
तुका सांगे मूढजना । देहीं देव कां पाहाना ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– निर्दैव–दुर्दैवी, नाभीं–बेंबीत

अर्थ :– आपल्या देहातच देवाची वस्ती असताना दुर्दैवी मनुष्य विनाकारणच फिरत राहातो. १ देव तर आपल्या अंतःकरणात आहे व्यर्थ तीर्थाच्या गावी हिंडू नये २ कस्तुरीमृगाच्या बेंबीतच कस्तुरी असते पण तो मात्र व्यर्थ साऱ्या रानात हिंडत असतो. ३ साखरेचे मूळ ज्याप्रमाणे उसातच असते, त्याप्रमाणे देव हा आपल्या देहातच असतो. ४ दुधामध्येच लोणी असते, पण त्याचे मथन करणे माहीत नसल्यावर त्याचा लाभ कसा होणार ? ५ तुकाराम महाराज म्हणतात, मी मूढ लोकांना सांगत आहे की, देहातच देव पाहा ना ६

४४८३ जयजय ह्मणा राम । हातें टाळी वाचे नाम ॥ १ ॥
आटाआटी नाहीं ज्यास । न वेचे मोल न पडे खांस ॥ २ ॥
आपण ह्मणे आणिकां हातीं । यज्ञादिकीं नये ते गति ॥ ३ ॥
आसन भोजन करितां काम । ध्यानसमाधि म्हणतां राम ॥ ४ ॥
मंत्र जपा हाचि सार । वर्णा याती जयजयकार ॥ ५ ॥
ह्मणतां राम ह्मणे तुका । वेळोवेळां चुकों नका ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – आटाआटी–खटाटोप, परिश्रम

अर्थ :– मुखाने जय जय राम म्हणा. हाताने टाळी वाजवा. मुखाने नाम घ्या १ या नामस्मरणास काही खटाटोप करावा लागत नाही त्याला काही खास मोलही द्यावे लागत नाही २ आपण स्वतः नाम घेऊन ते इतरांनाही देता येते. नामाने साध्य होणारी गती यज्ञादिक क्रियांनीही होणार नाही ३ आसनावर बसल्यानंतर भोजन करताना, काम करताना, ध्यानात, समाधीत रामनाम म्हणावे ४ सर्वांचे सार असे हा नाममंत्र आहे. त्याचाच जप करा. प्रत्येक वेळेस रामनाम चुकू नका ६

४४८४ शिकवणेसाटीं घाटते तळमळ । पुढें येईल काळ फोडी डोई ॥ १ ॥
तेव्हां त्यासि काय देशील उत्तर । मेळउनी अंतर ठेवितोसि ॥ २ ॥

येयीचिया सोंगें मोरपियाचे परि । होईल तें दुरि शृंगारिलें ॥ ३ ॥
तुका ह्मणे कां रे राखिलें खरकटें । रागेल्याचे तंट रागेलें का ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- डोई-टोके, रागेल्याचे-रागावलेल्या माणसाचे, तंट-तटा, बोभाटा.

अर्थ :- लोकांना शिकविण्यासाठी मी तळमळ करतो आहे. कारण पुढे काळ डोळे फोडण्यासाठी येईल हे मला समजते. १ तेव्हा तू त्याला काय उत्तर देशील रे ? तू देवाशी येवढे अंतर का मिळवून ठेवतोस ? २ येथे बहुरुप्याप्रमाणे अनेक सोंगे घेऊन नटवेपणा केला तरी एके दिवशी ते सर्व शृंगारणे दूर होणार आहे. ३ तुकाराम महाराज म्हणतात, हे खरकटे तू का राखून ठेवले आहेस ? रागावलेल्या माणसाचा बोभाटा तसाच होणार ४

४४८५ होई आतां माझ्या भोगाचा भोगिता । सकळ अनंता शुभाशुभ ॥ १ ॥
आठवुनी पाय राहिलों हृदयीं । निवारली तई सकळ चिंता ॥ २ ॥
अचळ न चळे देहाचें चळण । आहे हें वळण प्रारब्धेंचि ॥ ३ ॥
तुका ह्मणे जालें एकचि वचन । केलिया कीर्तन आराणुक ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- तई-तेव्हा, आराणुक-समाधान.

अर्थ :- अनंता, माझा जो काही शुभ अथवा अशुभ भोग असेल त्याचा भोक्ता तू हो. १ मी तुझे पाय माझ्या हृदयात आठवून राहिलो आहे तेव्हा तू माझी सर्व चिंता दूर केलीस २ माझ्या देहाचे चलनवलन हे त्याच्या स्वतःचे नव्हे. सर्व काही वळण त्याला प्रारब्धानेच लागले ३ तुकाराम महाराज म्हणतात, कीर्तन केल्याने समाधान लाभते. एकच वचन सार्थ व महत्त्वाचे आहे ४

४४८६ लेखी दुखण्यासमान । वेचला नारायणीं क्षण ।
उद्यांचें आजिच मरण । आणोनि म्हणे हरि भोक्ता ॥ १ ॥
नाहीं कांहीं पडों येत तुटी । जाणें तो आहे सेवटी ।
लाभ विचारोनि पोटीं । होई सेवटीं जागृत ॥ २ ॥
आहे ते उरे कटा । लावुनि चळ आपुला फाटा ।
पुरे हे न पुरे सेवटा । तरण्या वळकटा सदा वास ॥ ३ ॥
म्हणोनि मोडावा कांटाळा । अविद्यात्मक कोंवळा ।
होतील प्रबळा । आशा तृष्णा माया ॥ ४ ॥
क्षण या देहाच्या अंतीं । जड होऊनि राहेल माती ।
परदेश ते परवर होती । चिळसविती नाकडोळे ॥ ५ ॥
जंव या नाहीं पातल्या विपत्ति । आयुष्य भविष्य आहे हातीं ।
लाभ विचारोनि गुंती । तुका म्हणे अंतीं सर्व पिसुनें ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- लेखी-समज, मान, विचारोनि-विचार करून, कटा-कमरेस, फाटा-आडरान, मार्ग, परवर-माजघर, पिसुनें-द्वाड, चहाडखोर, दुष्ट

अर्थ :- आयुष्य हे दुखण्याप्रमाणे समज व नारायणासाठी प्रत्येक क्षण खर्च कर. उद्याचे मरण आजच उभे, आहे असे समजून तू हे कर. कारण सर्व भोक्ता श्रीहरीच आहे १ असे केल्याने कशाचीही तूट पडत नाही. तो

शेवटी काळजी करणारा आहे हे जाण नीट विचार करून हा लाभ करून घे. शेवटी नीट जागृत राहा २ जे काय उरले आहे ते कमरेस लावून तू आपल्या मार्गाने चल पळ ते काय आहे ते शेवटास पुरणार नाही तरण्या व बळकट माणसाची शक्ती नेहमी राहाणार नाही ३ म्हणून कटाळा सोडून द्यावा आत्मविचेविषयी कोवळ्या मनाने तत्पर व्हावे. नाही तर आशा, तृष्णा, माया या वृत्ती प्रबळ होतील ४ या देहाच्या अंती त्याची एका क्षणात माती होऊन जाईल भाजघरातील सगेसोयरे परदेशाच्या लोकाप्रमाणे होतील नाक डोळे किळसवाणे होतील ५ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत या विपत्ती आल्या नाहीत तोपर्यंतच आयुष्याचे भविष्य हाती लागल्याप्रमाणे आहे शेवटी सर्वजण द्वाड आहेत असा अनुभव येईल म्हणून नीट लाभाविषयी विचार करून गुंतावे ६

४४८७ आसावले मन जीवनाचे ओढी । नामरूपीं गोडी लावियेली ॥ १ ॥
काय तुझे पायीं नाहीं भाडवल । माझे मिथ्या बोल जाती ऐसे ॥ २ ॥
काय लोखंडाचे पाहे गुणदोष । शिवोन परीस सोनें करी ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें अवघें असों द्यावें । आपुले करावे ब्रीद साच ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– थोड्याफार फरकाने मागील अभगक्रमाक ३३०१ पाहावा

४४८८ पंढरीची वारी जयाचिये घरीं । पायधुळी शिरीं वंदिन त्याची ॥ १ ॥
दासाचा मी दास पोसणा डोंगर । आता बहु फार काय बोलों ॥ २ ॥
जातीचे मी हीन न कळे भजन । म्हणोनि संतचरण इच्छीतसे ॥ ३ ॥
तुका म्हणे मज म्हणावे आपुलें । बहुता तारिले संतजनीं ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – पोसणा–पोसावयाचे मूल

अर्थ – ज्याच्या घरी पंढरपूरची वारी आहे त्याच्या पायावरील धूळ मी माझ्या शिरावर घेऊन वंदन करीन १ मी त्याच्या दासाच्या दासाकडून पोसला जाणारा एक मोठा सेवक आहे आता यापेक्षा आणखी फार काय बोलावे २ मी जातीने हीन असून मला भजन कसे करावे हे काही समजत नाही म्हणून मी संताचे चरण धरले आहेत ३ तुकाराम महाराज म्हणतात या संतांना पुष्कळांनी तारले आहे. त्यांनी मलाही आपले म्हणावे ४

४४८९ नाम पावन पावन । त्याहून पवित्र आहे कोण ॥ १ ॥
*शिव हालाहालें तापला । तो ही नामें शीतळ झाला ॥ २ ॥*
शिवास नामाचा आधार । केला कळिकाळ किंकर ॥ ३ ॥
मरण जालें काशीपुरी । तेथें नामचि उद्धरी ॥ ४ ॥
तुका[1] म्हणे अवघीं चोरें । एक हरिनाम सोइरे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – किंकर–सेवक

अर्थ :– श्रीहरीचे नाम हे फार पवित्र आहे त्याच्याशिवाय पवित्र आहे तरी कोण ? १ प्रत्यक्ष शिव-शंकराने हालाहल विष प्राशन केल्यावर त्याच्या अंगाचा ताप झाला पण तोही श्रीहरीच्या नामामुळे शीतल झाला २ या शिवासही नामाचाच एक आधार असल्याने त्याने प्रत्यक्ष यमासही स्वत चा सेवक बनविले आहे ३ काशीला गेल्यावर तेथे मरण स्वीकारले तरच मोक्ष मिळतो, पण येथे केवळ नामामुळेच जीवाचा उद्धार होतो ४ तुकाराम महाराज म्हणतात इतर सर्व साधने चोराप्रमाणे असून एक हरिनाम मात्र आपल्या सोयऱ्यांप्रमाणे आहे ५

१ नामा म्हणे

४४९० अल्प विद्या परि गर्वशिरोमणि । मजहूनि ज्ञानी कोण आहे ॥ १ ॥
अंगीं भरे ताठा कोणासी मानीना । साधूची हेळणा स्वयें करी ॥ २ ॥
सज्जनाच्या देहीं मानी जो विटाळ । त्रैलोकीं चांडाळ तोचि एक ॥ ३ ॥
संतांची जो निंदा करी मुर्खों जन । ततेलें तें पाप वज्रलेप ॥ ४ ॥
तुका म्हणे ऐसे मावेचे मईंद । त्यांपाशीं गोविंद नाहीं नाहीं ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– मागील अभंगक्रमांक ४२१० पहावा

४४९१ नाहीं संतांशीं शरण । काय वाचोनि पुराण ॥ १ ॥
म्हणें विठ्ठलाचा दास । देखोनी परनारीस हांसे ॥ २ ॥
करिती विठोबाची भक्ति । दयाधर्म नाहीं चित्तीं ॥ ३ ॥
तेथें नाहीं माझा देव । व्यर्थ श्रमवी हा जीव ॥ ४ ॥
अंगीं नाहीं क्षमा दया । म्हणती भेट पंढरिराया ॥ ५ ॥
नाहीं धर्माची वासना । काय करोनि प्रदक्षिणा ॥ ६ ॥
ऐसें नव्हे भक्तिधर्म । तेथें नाहीं माझा राम ॥ ७ ॥
नये कृपा कांहीं केल्या । नये घाम जीव गेल्या ॥ ८ ॥
जैसी खड्गाची धार । विठ्ठलचरणीं तुका शूर ॥ ९ ॥

शब्दार्थ व टीपा :– खड्गाची–तरवारीची.

अर्थ :– संतांना शरण न जाता नुसतो पुराणे वाचली तर काय उपयोग होणार ? १ स्वतःला विठ्ठलाचा [illegible]विती, आणि दुसऱ्याच्या बायकोकडे पाहून हसतो. २ विठ्ठलाची भक्ती करतो, पण चित्तामध्ये मात्र काहीच दयाधर्म नाही. ३ अशा ठिकाणी माझा देव नसतो. मग व्यर्थपणे जीवास श्रम कशासाठी ? ४ पंढरीराया, तू आम्हांस भेट असे हें म्हणतात, पण त्यांच्या अंगी दया, क्षमा इत्यादी नसतात. ५ मनामध्ये धर्माची वासनाच नसेल तर मग प्रदक्षिणा करून उपयोग काय ? ६ असे हे भक्तिधर्म नाही त्या ठिकाणी माझा रामही राहात नाही ७ जीव गेल्यासही दयेने घाम येत नाही अशांवर काही केल्या देव कृपा करणार नाही ८ तुकाराम महाराज म्हणतात, तरवारीच्या धारेप्रमाणे मी विठ्ठलाच्या चरणी शूर होऊन राहिलो आहे ९

४४९२ नाहीं रिकामीक परी वाहे मनीं । तया चक्रपाणि साह्य होय ॥ १ ॥
उद्वेग जीवासि पंढरीचें ध्यान । तया नारायण साह्य करी ॥ २ ॥
शरीरासि बळ नाहीं स्वता भाव । तया पंढरिराव साह्य करी ॥ ३ ॥
असो नसो बळ राहे पराधीन । तरी अनुमान करूं नका ॥ ४ ॥
तुका म्हणे येणें करोनि चिंतन । तया नारायण जवळीक ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– रिकामीक–वेळ, अनुमान–अनादर, संकोच.

अर्थ :– रिकामा वेळ नसला तरी जो श्रीहरीचे नाम मनात घेतो त्याला चक्रपाणी साह्य करतो. १ जीवास उद्वेग वाटला तरी जो पंढरीचे ध्यान करतो त्याला नारायण साह्य करीत असतो २ शरीरात बळ नसले तरी जो स्वतः भाव ठेवून राहातो त्याला हा पंढरीराय साह्य करीत असतो. ३ बळ असो नसो, पराधीन असलात तरी तुम्ही श्रीहरीविषयी संकोच करू नका. [illegible]काराम महाराज म्हणतात, या प्रकारे श्रीहरीचे चिंतन करून नारायणास जवळ करावे. ५

४४९३　दारिद्र्याने विप्र पीडिला अपार । तया पोटीं पोर एक असे ॥ १ ॥
बाहेरी मिष्टान्न मिळे एके दिशीं । घेऊनी छंदासि त्याचि बैसे ॥ २ ॥
क्षुधाकाळीं रडे देखिले ते मागे । काहीं केल्या नेघे दुजें काहीं ॥ ३ ॥
सहज कौतुके बोले बापमाये । देवापाशीं आहे मागशी तें ॥ ४ ॥
तेव्हा तुजलागीं स्मरे नारायणा । जीवींच्या जीवना पांडुरंगा ॥ ५ ॥
लागली हे क्षुधा जात असे प्राण । काय हे निर्वाण पाहातोसि ॥ ६ ॥
ब्रह्मांडनायक विश्वाचा पाळक । वरी तिन्ही लोक पोसितोसि ॥ ७ ॥
प्राण हा उत्कर्ष जाहला विठ्ठल । तेव्हा तो कृपाळ धाव घाली ॥ ८ ॥
सांडूनि वैकुंठ धाव घाली तई । आळंगिला बाहीं कृपावंतें ॥ ९ ॥
तुका म्हणे दिला क्षीराचा सागर । राहे निरंतर तयापासीं ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा :- विप्र–ब्राह्मण, नेघे–घेईना, दुजें–दुसरे, बाही–बाहूनी

अर्थ – एकदा एक ब्राह्मण अपार दारिद्र्याने पीडला होता त्याला एक उपमन्यू नावाचा मुलगा होता १ त्याला एके दिवशी बाहेर चांगले गोड पक्वान्न खायला मिळाले घरी आल्यावर त्याने तोच छंद आपल्या बापापाशी घेतला २ भूक लागली की तो त्याच पक्वान्नासाठी रडे पाही ते खायला मागे काही केले तरी तो दुसरा पदार्थ घेईना ३ मग एकदा सहज कौतुकाने त्याच्या आईवापानी सांगितले की, 'तुला काय हवे ते देवापाशी माग' ४ तेव्हा नारायणा, तो तुला स्मरू लागला पांडुरंगा, जीवीच्या जीवना तो तुझी आराधना करू लागला ५ त्याला क्षुधा लागली तरी, प्राण जायची वेळ आली तरी त्याने तपश्चर्या सोडली नाही देवा असे निर्वाण तुम्ही काय पाहाता ? ६ तू ब्रह्मांडाचा नायक आहेस विश्वाचा पालक आहेस तीनही लोकांचे पोषण तू करतोस ७ असे असताना माझा प्राण हा फारच विव्हल झाला आहे कृपाळू देवा, तू माझ्या साठी धावून ये ८ अशी प्रार्थना केल्यावर तो श्रीहरी वैकुंठ सोडून धावून आला व त्याने त्याला आपल्या बाहूंनी कृपावंत होऊन आलिंगन दिले ९ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीने या उपमन्यूला दुधाचा सागर दिला व तो त्याच्यापाशी निरंतर राहू लागला १०

४४९४　अनाथाचा सखा ऐकिला प्रताप । होसि कृपावंत मजवरि ॥ १ ॥
माझिया गा चित्ता करिं शिकवण । जेणे तुझे चरण जोडतील ॥ २ ॥
जोडोनिया कर येतो काकुलती । रखुमाईच्या पति कृपावंता ॥ ३ ॥
हरुषें निर्भर करीं माझें मन । दाखवीं चरण पांडुरंगा ॥ ४ ॥
तुझे भेटीविण जन्म गेला वाया । भजन कराया शक्ति नाहीं ॥ ५ ॥
न घडे तुझी सेवा न घडे पूजन । जन्मोनि निष्कारण जाऊं पाहे ॥ ६ ॥
तुका म्हणे हरि करावे या काय । शरणासि साह्य होईं बापा ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – हरुषें–हर्षाने, आनंदाने, निर्भर–परिपूर्ण

अर्थ – देवा, तू अनाथाचा सखा आहेस असा तुझा प्रताप मी ऐकलेला आहे तरी तू माझ्यावर कृपावंत हो १ माझ्या चित्ताला नीट शिकवण तू द्यावीस की जेणेकरून तुझ्या चरणाची प्राप्ती मला होईल २ मी तुला हात जोडून काकुळतीस येत आहे रखुमाईच्या पती तू कृपावंत आहेस ३ माझे मन आनंदाने परिपूर्ण कर पांडुरंगा तुझे पाय मला दाखीव ४ तुझ्या भेटीशिवाय माझा जन्म वाया गेला असून मला भजन करण्यासाठी

शक्ती नाही ५ मला तुझी सेवा घडत नाही, की तुझे पूजन घडत नाही मी जन्मास येऊन निष्कारणच वाया जात आहे ६ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरी, मी यासाठी काय करावे ? बापा, भजनासाठी मला साहृय करावे.७

४४९५ हीनवर बीजवर दोघी त्या गडणी । अखंड कहाणी संसाराची ।। १ ।।
माझा पति बहु लहानचि आहे । खेळावया जाय पोरासवे ।। २ ।।
माझें दुःख जरी ऐकशील सई । म्हातारा तो बाई खोकतसे ।। ३ ।।
खेळे साजवरी बाहेरी तो राहे । वाट मी वो पाहे सेजेवरी ।। ४ ।।
पूर्व पुण्य माझें नाहीं बाई[1] नीट । बहु होती कष्ट सांगो काई ।। ५ ।।
जवळ मी जातें अंगा अंग लावू । नेदी जवळ येऊं कांटाळतो ।। ६ ।।
पूर्व सुकृताचा हाचि बाई ठेवा । तुका म्हणे देवा काय बोल ।। ७ ।।

शब्दार्थ व टीपा :– हीनवर–दुर्बल, लहान पती, बीजवर–दुसऱ्यादा लग्न करणारा पुरुष, मोठ्या वयाचा पती, गडणी–मैत्रिण, सोवतीण

अर्थ :– जिला हीनवर लहान वयाचा नवरा मिळाला आहे अशी एक व जिला मोठ्या वयाचा नवरा मिळाला आहे अशी एक, अशा दोन स्त्रिया मैत्रिणी असून त्या पुढीलप्रमाणे आपल्या संसाराची कहाणी सांगत आहेत १ एक म्हणते, माझा पती फारच लहान असून तो एकसारखा खेळायला पोराच्यांत जातो २ दुसरी म्हणते, माझे दुःख तू तर ऐक ग बाई माझा म्हातारा पती एकसारखा खोकतच असतो ३ एक म्हणते, माझा छोटा पती सध्याकाळ झाली तरी बाहेर राहूनच खेळत असतो व मी इकडे शेजेवर त्याची वाट पाहात असते ४ माझे पूर्वपुण्य काही बाई नीट नाही मी तुला काय सांगू ? फार कष्ट होतात ग ५ मी त्याच्या जवळ जाते, तो अंगाला हात लावू देत नाही जवळ येऊ देत नाही कटाळा करतो ६ तुकाराम महाराज म्हणतात, बाई, हा पूर्व-सुकृताप्रमाणे लाभ झालेला असतो उगाच देवाला बोल कशासाठी द्यावा ? ७

४४९६ स्वामीच्या सामर्थ्यें । चाले बोलिला पुरुषार्थ ।। १ ।।
पाठी देवाचे हें बळ । मग लाभे हातीं काळ[2] ।। २ ।।
देव ज्यासी साहृय । तेणें केले सर्व होय ।। ३ ।।
तुका म्हणे स्वामीसत्ता । मग नाहीं भय चिंता[3] ।। ४ ।।

शब्दार्थ व टीपा :– बोलिला–जो बोलला जाईल तो

अर्थ – या स्वामीच्या सामर्थ्यानेच सर्व काही बोलला गेलेला पुरुषार्थ चालतो १ पाठीशी एकदा देवाचे बळ असले की मग हालात काळाचीही सत्ता येते, अथवा आवश्यक ते फळ हातात येते २ देव ज्याला साहृय करणारा झाला आहे त्याने जे केले ते सर्व होईल ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकदा स्वामीची सत्ता प्रस्थापित झाली की मग कसलीच चित्ताला भीती उरत नाही ४

४४९७ नामाचा डांगोरा फिरवीं घरोघरीं । म्हणा हरीहरी सर्वभावें ।। १ ।।
नामें हरती कर्में वैकुंठींचो पें वस्ति । सनिध श्रीपति सदोदित ।। २ ।।
नामाचा महिमा बहुता फळला । नामें उद्धरिला अजामेळ ।। ३ ।।
गजेंद्राची स्थिति पुराणीं बोलती । नामेंचि श्रीपति पावलासे ।। ४ ।।
तुका म्हणे नाम घेतां मुक्ति आहे । नामें सर्व पाहें आकळिले ।। ५ ।।

१ कांहीं, २ फळ, ३ चित्ता

शब्दार्थ व टीपा :- आकळिलें-समजले, ध्यानात येते.

अर्थ :- मी श्रीहरीच्या नामाचा डांगोरा घरोघरी सर्वत्र फिरवीत आहे. सर्वभावाने या श्रीहरीचे नाव तुम्ही घ्यावे. १ नामस्मरणांनी कर्मांचा लोप होऊन वैकुंठीच्या वसतीचा लाभ होतो व श्रीपती सतत जवळ राहातो. २ अशा या नामाचा महिमा पुष्कळाना समजला आहे. या नामानेच अजामेळाचा उद्धार झाला ३ गजेन्द्राची स्थिती कशी होती व नामामुळे कशी झाली यासंबंधी पुराणांनी सांगितले आहे. याच नामामुळे त्याला श्रीपती प्रसन्न झाला. ४ तुकाराम महाराज म्हणतात, श्रीहरीचे नाम घेतल्यावर मुक्ती मिळेल नामाने सर्व काही समजते ५

४४९८ यमाचे हे पाश नाटोपती कोणातें । आम्हां दिनानाथें रक्षियेलें ॥ १ ॥
यम नेतां तुम्हां रक्षील हें कोण । तुम्हां धन्यधन्य कोण म्हणती ॥ २ ॥
संतसज्जनमेळा पवित्र संतकीर्ति । त्यांनीं उत्तम स्थिति सांगितली ॥ ३ ॥
तेचि धरोनि चित्तीं तुका हित करी । यमासि पांपरी हाणे आतां ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :- नाटोपती-आटोपत, पांपरी-लाथ.

अर्थ :- यमाचे पाश कुणासही आटोपत नाहीत आम्हांस मात्र या दीनानाथाने रक्षिले. १ तुम्हांला यम नेत असताना कोण राखेल ? तुम्हांला धन्य धन्य असे कोण म्हणतील ? २ संतांच्या व सज्जनांच्या मेळाव्यात राहाणे, संतांची कीर्ती गाणे यांमुळेच उत्तम स्थिती प्राप्त होईल असे सांगितले जाते ३ तुकाराम महाराज म्हणतात, हेच एक मी चित्तात धरून हितकर ते करीत आहे आता मी यमाला देखील लाथ हाणीन. ४

४४९९ देवासीं पैं भांडों एकचित्त करूनि । आम्हांसि सज्जनीं सांगितलें ॥ १ ॥
आम्हां काय आतां देवें आडो परी । भेटी नेदी तरी सुखें नेदो ॥ २ ॥
तोचि नांदो सदा हरि पैं वैकुंठीं । आम्हां देशवटी देवो सुखें ॥ ३ ॥
देवें अभिमान चित्तांत धरिला । तरी तो एकला राहो आता ॥ ४ ॥
चित्तीं धरोनि नाम असों सुखें येथें । हर्षे गाऊं गीत गोविंदाचे ॥ ५ ॥
तुका म्हणे सर्व देवाची नष्टाई । आम्ही सुखें पाहों डुलतसों ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :- नेदी-देत नाही, देशवटी-देशपार.

अर्थ :- देवाशी एकचित्ताने आम्ही भांडण करू आम्हाला संतसज्जनांनी असेच सांगितले आहे. १ आता देव जरी अडला तरी आम्हांस काय त्याचे ? त्याने आम्हास भेट दिली नाही तर सुखाने ती न देवो २ तो देव सतत वैकुंठात राहिला, नांदला तरी नांदो अथवा आम्हांला देशपार केले तर सुखाने करो ३ देवानेच आपल्या चित्तात अभिमान धरून राहिला असेल तो एकटा राहू द्या. ४ आम्ही मात्र त्याचे नाम आमच्या चित्तात धारण करून येथे सुखाने राहू. गोविंदाचे गीत मोठ्या हर्षाने गाऊ ५ तुकाराम महाराज म्हणतात, ही सर्व त्या देवाची नष्टाई आहे; पण आम्ही मात्र सुखाने डुलत राहू ते पाहावे ६

४५०० मरणी आली मुक्त पेठा । करा लाटा व्यापार ॥ १ ॥
उधार घ्या रे उधार घ्या रे । अवघे या रे जातीचे ॥ २ ॥
येथें पंक्तिभेद नाहीं । मोठें कांहीं लहान ॥ ३ ॥
तुका म्हणे लाभ घ्यावा । मुद्दल भावा जतन ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा.– भरणी–बहर, लाटा–मोठा.

अर्थ :– या ठिकाणी व्यापारास बहर आला असून पेठ मुक्त आहे हरिनामाचा मोठाच व्यापार तुम्ही करा. १ सर्व लहानथोर, हीनश्रेष्ठ जातींचे लोकहो, या व हा माल उधार घेऊन जा. २ येथे लहानमोठे असा कसलाच पंक्तिभेद नाही ३ तुकाराम महाराज म्हणतात, एकनिष्ठ भावाचे मुद्दल जतन करून तुम्ही याचा लाभ घ्यावा. ४

४५०१ ग्रासोग्रासीं भाव । तरी देहिंच जेवी देव ॥ १ ॥
घरीं स्मरण तें सार । नाहीं दुरी तें अंतर ॥ २ ॥
भोगितां तूं भावें । देव जेऊ बैसे सवें ॥ ३ ॥
तुज पावो देवा । भावें अंतरींची सेवा ॥ ४ ॥
गुंतला साधनीं । देव नाहीं त्रिभुवनीं ॥ ५ ॥
तुका म्हणे हातीं । न धरितां गमाविती ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा :– अंतरींची–अंत:करणापासूनची.

अर्थ – प्रत्येक घास घेताना जर तू देवाविषयी भाव मनात धरशील तर देहात बसून देव जेवण करील.१ श्रीहरीचे स्मरण हे सर्व सार आहे असे तू मनात धर मग तुला त्याच्यापासून दूर अंतर आहे असे वाटणार नाही. २ जे भोगशील ते मनात भाव धारण करून भोग मग देव तुझ्या जवळ येऊन बसेल ३ देवा, तुला माझ्या चित्तातील सेवा प्राप्त होवो. ४ यावेरीज भलत्या साधनात गुंतलात की मग देव त्रिभुवनात शोधूनही सापडणार नाही. ५ तुकाराम महाराज म्हणतात, नामाने सापडणारा हा देव लोक हाती न धरता गमावून बसतात ६

४५०२ कामिनीसी जैसा आवडे भ्रतार । इच्छीत चकोर चंद्र जैसा ॥ १ ॥
तैसी हे आवडी विठ्ठलाचे पायीं । लागलिया नाहीं गर्भवास ॥ २ ॥
दुष्काळें पीडिल्या आवडे भोजन । आणिक जीवन तृषाक्रांता ॥ ३ ॥
कामातुर जैसा भय लज्जा सांडोनि । आवडे कामिनी सर्वभावें ॥ ४ ॥
तुका म्हणे तैसी राहिली आवडी । पांडुरंग थडी पाववील ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– जीवन–पाणी, थडी–तीर

अर्थ :– सुंदर स्त्रीस ज्याप्रमाणे भ्रतार मनापासून आवडतो, अथवा चकोर पक्षी जशी चंद्राची इच्छा करतो, १ त्याप्रमाणे मला या विठ्ठलाच्या पायी आवड आहे हो गोडी एकदा मनास लागली की मग गर्भवास सोसावा लागत नाही २ दुष्काळाने पीडलेल्यास भोजन आवडते आणि तहानेने व्याकुळ झालेल्यास पाणी आवडते. ३ एखादा कामाने आतुर झालेला मनुष्य जसा सर्व प्रकारची भीती व लाज सोडून सर्व भावाने कामिनीवर प्रेम करतो.४ तुकाराम महाराज म्हणतात, त्याचप्रमाणे माझी आवड या श्रीहरीवर राहिली आहे हा पांडुरंग मला पैलतीरास घेऊन जाईल. ५

४५०३ ॐ तत्सदिति सूत्राचें सार । कृपेचा सागर पांडुरंग ॥ १ ॥
हरि: ॐ सहित उदात्त अनुदात्त । प्रचुरीस्वरासहित[1] पांडुरंग ॥ २ ॥
गोब्राह्मणहिता[2] होऊनि निराळें । वेदाचें तें मूळ तुका म्हणे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– उदत–उदात्त, श्रेष्ठ, अनुदत–मध्यम, प्रचुरीश्वरासहित-खूप मोठ्या स्वरात अथवा स्वरित, प्रचय इत्यादी स्वरासहित.

अर्थ :– हरि ॐ तत् सत् या सूत्राचे एक सार म्हणजे हा कृपेचा सागर पांडुरंग आहे १ हरिःॐ ही अक्षरे मोठ्या स्वरात, मध्यम स्वरात अथवा खूप मोठ्या स्वरात म्हटली तरी त्याचा अर्थ पांडुरंग असाच होतो २ तुकाराम महाराज म्हणतात, असे हे वेदाचे मूळ गोब्राह्मणांच्या हितासाठी निराळे होऊन राहिले आहे किंवा असे हे वेदाचे मूळ सर्वत्र व्यापूनही निराळे होऊन राहिले आहे अथवा सर्वत्र व्यापूनही निराळे होऊन राहिलेले हे तत्त्व वेदाचे मूळ आहे. ३

विवरण – या एका लहानशा पण महत्त्वाच्या अभंगात तुकाराम महाराज सर्व वेदाचे सूत्र जे 'ॐ तत्सदिति' हे पांडुरंगस्वरूप असल्याचे सांगतात 'ॐतत्सत् अथवा 'हरि ॐतत्सत्' या सूत्रानी सत् स्वरूपाच्या परब्रह्माचे वर्णन केले जाते. 'ॐ इत्येवाक्षरं ब्रह्म' या सूत्रात ॐ या एकाक्षरासच ब्रह्म असे नामाभिधान मिळाले आहे गीतेच्या सतराव्या अध्यायातील तेविसाव्या श्लोकात 'ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः' परब्रह्माचा 'ॐतत्सत' या तीन प्रकारानी निर्देश केला जातो असेच म्हटले आहे हे जे सर्व दृश्य जगत निर्माण झाले आहे ते 'ॐ तत्सत्' या तीन शब्दानी बनलेल्या परब्रह्मापासून तेव्हा ॐतत्सत् हे सर्व विश्वाचे मूळ होय. याच संकल्पापासून विश्वाची निर्मिती आहे. यासाठीच यज्ञ, दान, तप आणि इतर शास्त्रोक्त कर्मे नेहमी ॐ या उच्चाराने सुरू होतात. 'तत्' शब्दाचा उच्चार करून कर्मातील फलाची आशा सोडण्यात आलेली असते हे कर्म लोक मोक्षार्थी करतात. आणि सत् या पदाचा अर्थ असा की, अस्तित्व आणि साधुत्व अथवा चांगुलपणा प्रशस्त व चांगल्या कर्मांसही सत् असे म्हटले जाते. यज्ञ, तप आणि दान याच्या ठिकाणची स्थिर भावना म्हणजेही 'सत्' असे म्हटले जाते हरीही ॐकार स्वरूपात पांडुरंगच आहे 'वेदाचीं हीं बीजें हरि अक्षरें दोन्हीं' असे एकनाथानी आपल्या हरिपाठात म्हटले आहे. अशा प्रकारे हरी हा शब्द वेदाशी संबंधित असून सर्व प्रकारचे पापताप नाहीसे करणारा आहे. 'हरि म्हणतां गति पातकें नासती। कळिकाळ कांपती हरि म्हणता॥ हरि म्हणतां भुक्ति हरि म्हणतां मुक्ति। चुके यातायाती हरि म्हणतां' असे तुकोबानीच एका ठिकाणी म्हटले आहे

दुसऱ्या चरणातील 'उदत अनुदत। प्रचुरीश्वरासहित' ही रूपे 'उदात्त अनुदात्त। प्रचयस्वरासहित' याप्रमाणे असून यातील प्रत्येक पदाचा अर्थ व्याकरणाच्या परिभाषेत पाहाणे अगत्याचे आहे. उदात्त स्वर म्हणजे 'उच्चैरुदात्तः' या सूत्राप्रमाणे तालु, कंठ, मूर्धन्य इत्यादी सावयव स्थानाच्या वरच्या भागाच्या जो अच् निर्माण होतो त्याला उदात्त स्वर असे नाव आहे अशा प्रकारे वागेंद्रियाच्या साह्याने जो स्वर स्पष्ट, मोठा, व्यक्त, उच्च तो उदात्त आणि अनुदात्त म्हणजे 'नीचैरनुदात्त या सूत्राप्रमाणे खालच्या भागाच्या ठिकाणी जो अच् निर्माण होतो तो स्वर. याखेरीज वेदात स्वरित, प्रचय असेही स्वराचे प्रकार आहेत. अशा रीतीने स्वराचे जे विविध प्रकार आहेत त्याच्यासहित असे हे पांडुरंगाचे रूप आहे पाठभेदानें 'विरहित' असे काही ठिकाणी वर्णन असेल तर या सर्व स्वराच्या पलीकडे असणारे जे ब्रह्मस्वरूप आहे तेच पांडुरंग होय या अशा प्रकारे 'ॐ तत्सदिति' हा जो सर्व संकल्पाचा मूळ मंत्र तोच विठ्ठलरूप अथवा पांडुरंगस्वरूप आहे असे बोवा म्हणतात 'ॐतत्सत्' या मंत्राचे रहस्य उपनिषदातून खुलासेवार स्पष्ट करण्यात आले आहे. 'ओमिति ब्रह्म' असे उपनिषदाचे वचन आहे तत् म्हणजे ते किंवा दिसणाऱ्या सृष्टीच्या पलीकडील तत्त्व, 'सत्' म्हणजे डोळ्यापुढे दिसणारी सृष्टी ही दोनही मिळून ब्रह्मच आहे याच अर्थाने 'सदसच्चाहमर्जुन' सत् म्हणजे परब्रह्म आणि असत् म्हणजे दृश्य सृष्टी दोनही मीच आहे असे गीतेत भगवतानी म्हटले आहे सारांश. 'ॐ तत्सत्' हे जे परब्रह्माच्या वर्णनाचे सार आहे ते म्हणजे हे पांडुरंगाचे रूप आहे असे तुकोबाना वाटते या सूत्राचा भावार्थ ज्ञानदेवानी अतिशय समर्पक शब्दात सांगताना म्हटले आहे, 'म्हणोनि प्रणवैकनाम। हें एक क्षर ब्रह्म। जो माझें स्वरूप परम। स्मरत सांता।' एकाक्षर ब्रह्म हे माझेच स्वरूप आहे असे भगवान म्हणतात याच स्वरूपात 'कृपेचा सागर पांडुरंग' आहे असे तुकोबाना म्हणावयाचे आहे

१ प्रचुररहित, २ सबर्स व्यापिलें सर्वांही निराळें। वेदाचे ते मूळ तुका म्हणे॥

या अभंगात 'हरि ॐ' अशा प्रकारे 'हरि' या शब्दाचा उल्लेख आला आहे. सर्व पापताप हरण करणारा तो हरी श्रीशंकराचार्यांनी म्हटले आहे, 'स्मृतिमात्रेण पुंसां पापं संसारं वा हरतीति हरिः' नामस्मरणाबरोबर पाप व लौकिक संसारातील दुःखे जो हरण करतो तो हरी.

तिसऱ्या चरणाचा अर्थही पाठभेदामुळे भिन्नभिन्न होणारा आहे पहिल्या पाठाप्रमाणे वेदाचे हे जे मूळ: पांडुरंगस्वरूपाचे आहे ते गोब्राह्मणाच्या हितासाठी निराळे म्हणजे अवतार धारण करून राहिले आहे पातकाची वाढ झाली की पृथ्वी गाईचे रूप घेऊन ब्रह्मदेवाकडे जाते असा उल्लेख पुराणातून येतो नतर मग भगवताचा अवतार होऊन दुष्टांचा नाश होतो सज्जनाचे रक्षण होते यात आपोआप गाईचेही रक्षण आलेच ब्राह्मण हे वेदरक्षणकर्ते, ज्ञानाचे, परब्रह्माचे रक्षणकर्ते; म्हणून त्यांच्या रक्षणात सर्व आले असा भावार्थ. यापेक्षा दुसरा पाठ 'सर्वस्व व्यापीलें सर्वांहि निराळें' हा अधिक चांगला आहे पांडुरंगस्वरूपी हे वेदाचे मूळ सर्व जगताला व्यापूनही सर्वांपेक्षा निराळे होऊन राहिले आहे

या एका महत्त्वाच्या अभंगासंबंधी वासुदेव लक्ष्मणशास्त्री पणशीकर यांनी म्हटले आहे, "या अभंगात श्रीमद्भगवद्गीतेप्रमाणे म्हणजे 'ॐतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः । ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा' या श्लोकाचे सार आणून नतर वेदाच्या उच्चारखाली जी स्वरासंबंधी विशेष माहिती आवश्यक आहे ती दिली आहे ती अशी उदित-उदात्त, अनुदित-अनुदात्त व प्रचुरीस्वर-प्रचयस्वर हे शब्द जुन्या महाराष्ट्र भाषेत योजिले आहेत, असे वाटते किंवा उदित अथवा अनुदित शब्दांनी असाही बोध घेता येईल की पूर्वमीमांसेच्या यज्ञकांडात 'उदिते जुहोति' म्हणजे सूर्योदय होताच होम करावा व 'अनुदिते जुहोति' म्हणजे उदय झाला नसताना होम करावा इत्यादी कर्मकांडाच्या माहितीचा कोठे कोठे समावेश केला आहे, त्या माहितीचे दिग्दर्शन करणे ते उघड रस्त्यावर पसरण्यापेक्षा जरा गूढ जुन्या शब्दांनी केले आहे "

४५०४ सांडियेला गर्भ उबगोनि माउली । नाहीं सांभाळिली भूमि शुद्ध ॥ १ ॥
उष्ण तान भूक एवढिये आकांतीं । ओसंगा लाविती काय म्हूण ॥ २ ॥
खांद्यावरि शूळ मरणाचिये वाटे । अन्याय हो मोठे केले साच ॥ ३ ॥
हातींचा हिरोनि घातला पाठीसी । तुका म्हणे ऐसी परी जाली ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा – उबगोनि-कटाळून, ओसंगा–मांडीवर, साच–खरे, परी–प्रकार

अर्थ :– माऊलीने कंटाळून पोटी वाहिलेला गर्भ सोडून दिला असे करताना भूमी शुद्ध अथवा अशुद्ध हेही पाहिले नाही १ उन्हामुळे लागलेली तहान, भूक इत्यादी आकांताच्या वेळी ती त्यास मांडीवर काय म्हणून घेऊन बसते ? २ खांद्यावर शूळ घेऊन मरणाच्या वाटेवर जाण्याइतके मोठे अन्याय खरे केले ३ तुकाराम महाराज म्हणतात, परंतु या श्रीहरीने हातातून घेऊन मला पोटाशी धरले, पाठीशी घातले; हा असा प्रकार घडून आला ४

# ओंव्या प्रारंभ २३१ अभंग ३

४५०५ पांडुरंगा करूं प्रथम नमना । दुसरें चरणा संतांचिया ॥ १ ॥
याच्या कृपादानें कथेचा विस्तारु । बाबाजीसद्गुरुदास तुका ॥ २ ॥
काय माझी वाणी मानेल संतांसी । रंजवूं चित्तासी आपुलिया ॥ ३ ॥
या मनासी लागो हरिनामाचा छंद । आवडी गोविंद गावयासी ॥ ४ ॥
सीण जाला मज संसारसंभ्रमें । सीतळ या नामें जाली काया ॥ ५ ॥

या सुखा उपमा नाहीं द्यावयासी । आलें आकारासी निर्विकार ॥ ६ ॥
नित्य धांवे तेथें नामाचा गजर । घोष जयजयकार आइकतां ॥ ७ ॥
तांतडी ते काय हरिगुण गाय । आणीक उपाय दुःखमूळ ॥ ८ ॥
मूळ नरकाचें राज्य मदें माते । अंतरे बहुत देव दुरी ॥ ९ ॥
दुरी अंतरला नामनिंदकासी । जैसें गोचिडासी क्षीर राहे ॥ १० ॥
हे वाट गोमटी वैकुंठासी जाता । रामकृष्णकथा दिंडी ध्वजा ॥ ११ ॥
जाणते तयांनीं सांगितलें करा । अंतरासी वारा आडूनियां ॥ १२ ॥
यांसी आहे ठावें परि अंध होती । विषयाची खंती वाटे जना ॥ १३ ॥
नाहीं त्या सुटली द्रव्य लोभ माया । भस्म दंड छाया तरुवराची ॥ १४ ॥
चित्त ज्याचें पुत्रपत्नीबंधूवरी । सुटेल हा परि कैसे जाणा ॥ १५ ॥
जाणते नेणते करा हरिकथा । तराल सर्वथा भाक माझी ॥ १६ ॥
माझी मज असे घडली प्रचित । नसेल पतित ऐसा कोणी ॥ १७ ॥
कोणीं तरी कांहीं केलें आचरण । मज या कीर्तनेंविण नाहीं ॥ १८ ॥
नाहीं भय भक्ता तराया पोटाचें । देवासी तयाचें करणें लागे ॥ १९ ॥
लागे पाठोवाटी पाहे पायाकडे । पीतांबरें खडे वाट झाडी[1] ॥ २० ॥
डिकोनियां कां रे राहिले हे लोक । हेचि कवतुक वाटे मज ॥ २१ ॥
जयानें तारिले पाषाण सागरीं । तो ध्या रे अंतरीं स्वामी माझा ॥ २२ ॥
माझिया जीवाची केली सोडवण । ऐसा नारायण कृपाळु हा ॥ २३ ॥
हाचि माझा नेम हाचि माझा धर्म । नित्य वाचे नाम विठोबाचें ॥ २४ ॥
चेतवला अग्नि तापत्रयज्वाळ । तो करी शीतळ रामनाम ॥ २५ ॥
मना धीर करीं दृढ चित्तीं धरीं । तारील श्रीहरि मायबाप ॥ २६ ॥
बाप हा कृपाळु भक्तां भाविकांसीं । घरी होय दासी कामारी त्या ॥ २७ ॥
त्याचा भार माथां चालवी आपुला । जिहीं त्या दिधला सर्व भाव ॥ २८ ॥
भावेंविण जाणा नाहीं त्याची प्राप्ति । पुराणें बोलती ऐसी मात ॥ २९ ॥
मात त्याची जया आवडे जीवासी । तया गर्भवासीं नाहीं येणे ॥ ३० ॥
यावें गर्भवासीं तरी च विष्णुदासीं । उद्धार लोकांसी पूज्य होती ॥ ३१ ॥
होती आवडते जीवाचे ताइत । त्यां घडी अच्युत न विसंभे ॥ ३२ ॥
भेदाभेद नाहीं चिंता दुःख कांहीं । वैकुंठ त्या ठायीं सदा वसे ॥ ३३ ॥
वसे तेथें देव सदा सर्वकाळ । करिती निर्मळ नामघोष ॥ ३४ ॥
संपदा तयांची न सरे कल्पांतीं । मेळविला भक्ती देवलाभ ॥ ३५ ॥
लाभ तयां जाला संसारा येऊनि । भगवंत ऋणी भक्तीं केला ॥ ३६ ॥
लागलेंसे पिसें काय मूढजना । काय[2] नारायणा विसरलीं ॥ ३७ ॥
विसरलीं तयां थोर जाली हाणी । पचविल्या खाणी चौऱ्यासीच्या ॥ ३८ ॥
शिकविले तरी नाहीं कोणा लाज । लागलीसे भाज धन गोड ॥ ३९ ॥

१ झाडी, २ का रे

गोड एक आहे अविट गोविंद । आणीक तो छंद नासिवंत ॥ ४० ॥
तळमळ त्याची काहीं तरी करा । का रे निदसुरा बुडावया ॥ ४१ ॥
या जनासी भय यमाचें का नाहीं । सांडियेलीं तिहीं एकराज्यें ॥ ४२ ॥
जेणें अग्निमाजी घातलासे पाव । नेणता तो राव जनक होता ॥ ४३ ॥
तान भूक जिहीं साहिले आघात । तया पाय हात काय नाहीं ॥ ४४ ॥
नाहीं ऐसा तिहीं केला सवसार । दुःखाचे डोंगर तोडावया ॥ ४५ ॥
याच जन्में घडे देवाचें भजन । आणीक हें ज्ञान नाहीं कोठें ॥ ४६ ॥
कोठें पुढें नाहीं घ्यावया विसावा । फिरोनि या गावा आल्याविण ॥ ४७ ॥
विनवितां दिवस बहुत लागती । म्हणउनि चित्तीं देव धरा ॥ ४८ ॥
धरा पाय तुम्ही संतांचे जीवासी । वियोग तयासी देवा नाहीं ॥ ४९ ॥
नाहीं चाड देवा आणीक सुखाची । आवडी[1] नामाची त्याच्या तया ॥ ५० ॥
त्याचीच उच्छिष्ट बोलतों उत्तरें । सांगितलें खरें व्यासादिकीं ॥ ५१ ॥
व्यासें सांगितलें भक्ति हेचि[2] सार । भवसिंधु पार तरावया ॥ ५२ ॥
तरावया जना केलें भागवत । गोवळ गोपी भक्त माता पिता ॥ ५३ ॥
तारुनिया खरे[3] नेली एकयासरें । निमित्तें उत्तरें ऋषीचिया ॥ ५४ ॥
यासी वर्म ठावें भक्तां तरावया[4] । जननी बाळ माया राखे तान्हें ॥ ५५ ॥
तान्हेलें भुकेलें म्हणे वेळोवेळां । न मगतां लळा जाणोनिया ॥ ५६ ॥
जाणोनिया वर्म देठ लावियला । द्रौपदीच्या बोलासवें धावे ॥ ५७ ॥
धावे[5] सरवता धेनु जैसी वत्सा । भक्तालागीं तैसा नारायण ॥ ५८ ॥
नारायण व्हावा हाव ज्याच्या जीवा । धन्य त्याच्या दैवा पार नाहीं ॥ ५९ ॥
पार नाहीं सुखा तें दिलें तयासी । अखंड वाचेसी रामनाम[6] ॥ ६० ॥
रामनाम दोनी उत्तम अक्षरें । भवानीशंकरें उपदेशिलीं ॥ ६१ ॥
उपदेश करी विश्वनाथ कानीं । वाराणसी प्राणी मध्यें मरे ॥ ६२ ॥
*मरणाचे अंतीं राम म्हणे जरी । न लगे यमपुरी जावें[7] तया ॥ ६३ ॥*
तयासी उत्तम वास वैकुंठीं । वसे नाम चित्तीं[8] सर्वकाळ ॥ ६४ ॥
सर्वकाळ वसे वैष्णवाच्या घरीं । नसे क्षणभरी स्थिर कोठें ॥ ६५ ॥
कोठें नका पाहो करा हरिकथा । तेथें अवचिता सांपडेल ॥ ६६ ॥
सांपडे हा देव भाविकांचे हातीं । शाहाणे मरती तरी नाहीं ॥ ६७ ॥
नाहीं भले[9] भक्ती केलियावांचूनि । अहंता पापिणी नागवण ॥ ६८ ॥
नागवलो म्हणे देव मी आपणा । लाभ दिला जना ठकलो[10] तो ॥ ६९ ॥
तोचि देव येर नव्हे ऐसें कांहीं । जनार्दन ठायीं चहूं खाणी ॥ ७० ॥
खाणी भरूनियां राहिलासे आंत । बोलावया मात ठाव नाहीं ॥ ७१ ॥
ठाव नाहीं रिता कोणी देवाविण । ऐसी ते सज्जन संतवाणी ॥ ७२ ॥

---

१ तयाची तैसा तया, २ ह विचार, ३ पुढें, ४ तारावया, ५ धावे सव ताही धेनु जैसा बत्सा, ६ रामनाम, ७ जाणें, ८ कंठीं, ९ भोळी, १० ठकला

वाणी बोलूनिया गेली एक पुढें । तयासी वाकुडें जाता ठके ॥ ७३ ॥
ठका नाहीं अर्थ ठाउका वेदाचा । होऊनि भेदाचा दास ठेला ॥ ७४ ॥
दास ठेला पोट[१] अर्थ दमासाटीं । म्हणउनि तुटी देवासवे ॥ ७५ ॥
सवे वेव द्विजातीही दुराविला । आणिकाचा आला कोण पाड ॥ ७६ ॥
पाड करूनिया नागविलीं फार । पंडित वेव्हार खळवादी ॥ ७७ ॥
वादका निंदका देवाचें दर्शन । नव्हे जाला पूर्ण षडकर्मी ॥ ७८ ॥
षडकर्मी हीन रामनाम कंठीं । तयासवें भेटी सवें[२] देवा ॥ ७९ ॥
*देवासी आवडे भाविक जो भोळा । शुद्ध त्या चांडाळा करुनि मानी ॥ ८० ॥*
मानियेला नाहीं विश्वास[३] या बोला । नाम घेता मला युक्ति थोडी ॥ ८१ ॥
युक्ति थोडी मज दुर्बळाची वाचा । प्रताप नामाचा बोलावया ॥ ८२ ॥
बोलता पांगल्या श्रुति नेति नेति । खुंटलिया युक्ति पुढें त्याच्या ॥ ८३ ॥
पुढें पार त्याचा न कळेचि जाता । पाउलें देखता ब्रह्मादिकां ॥ ८४ ॥
काय भक्तीपिसें[४] लागलें देवासी । इच्छा ज्याची जैसी तैसा होय ॥ ८५ ॥
होय हा सगुण निर्गुण आवडी । भक्तिप्रिय गोडी फेडावया ॥ ८६ ॥
या[५] बापासी बाळ बोले लाडें कोडें । करुनि वाकुडें मुख तैसें ॥ ८७ ॥
तैसें याचकाचें समाधान दाता । होय हा राखता सत्त्वकाळीं ॥ ८८ ॥
सत्त्वकाळीं कामा न येती आयुधें । बळ हा सबध सैन्यलोक ॥ ८९ ॥
सैन्यलोक तया दाखवी प्रताप । लोटला हा कोप कोपावरी ॥ ९० ॥
कोपा मरण नाहीं शांत होय त्यासी । प्रमाण भल्यासी सत्त्वगुणीं ॥ ९१ ॥
सत्त्वरजतम आपण नासती । करिता हे भक्ति विठोबाची ॥ ९२ ॥
चित्त रंगलिया चैतन्यचि होय । तेथें उणें काय निजसुखा ॥ ९३ ॥
सुखाचा सागरु आहे विटेवरी । कृपादान करी तोचि एक ॥ ९४ ॥
एक चित्त धरू विठोबाचे पायीं । तेथें उणें काहीं एक आम्हा ॥ ९५ ॥
आम्हासी विश्वास याचिया नामाचा । म्हणउनि वाचा घोष करू ॥ ९६ ॥
करू हरिकथा सुखाची समाधि । आणिकाची बुद्धि दुष्ट नासे ॥ ९७ ॥
नासे सवसार लोकमोहो माया । शरण जा रे तया विठोबासी ॥ ९८ ॥
सिकविलें मज मूढा संतजनीं । दृढ या वचनीं राहिलोंसे ॥ ९९ ॥
राहिलोंसे दृढ विठोबाचे पायीं । तुका म्हणे काहीं न लगे आता ॥ १०० ॥

शब्दार्थ व टीपा – तातडी–लवकर, शीघ्र, खती–दुःख, पिसे–वेड, भाज–बायको

अर्थ – प्रथम पांडुरंगाचे नमन करू दुसरे नमन संताच्या चरणाला करू १ बाबाजी सदगुरूचा दास असलेला तुका पांडुरंग आणि संत याच्या कृपने कथेचा विस्तार करीत आहे २ संताना मान्य होईल व आपल्या चित्ताची करमणूक होईल, अशी प्रचुर माझी वाणी कोठें आहे ? ३ माझ्या मनाला हरिनामाचा छंद लागो, आणि गोविंदाचे गुण गाण्याची आवड निर्माण होवो ४ संसारातील ओढगस्त स्थितीमुळे मला फार शीण आला असून हरि

१ पाठ, २ सत्य ३ उधार, ४ भक्तपिसे, ५ माय

नामाने हे शरीर शांत झाले आहे. ५ हरिनामाने होणाऱ्या सुखास उपमान नाही. कारण हरिनामामुळे निराकार
देव साकार होतो. ६ जेथे हरिनामाचा अखंड घोष व जयजयकार चालला असेल तेथे तो धावत जातो. ७ म्हणून
मनुष्याने सातडीने हरिनाम व हरिगुण गावेत; इतर साधने दुःखाला कारण आहेत. ८ राज्याच्या मदाने धर्माची
पर्वा न करता जो उन्मत्त होतो, त्याला नरकाची प्राप्ती होते. देव त्याच्यापासून दूर होतो व अंतरतो. ९ गोचिडाला
गाईच्या स्तनांतील दूध जवळ असूनही आवडत नाही, त्याप्रमाणे नामाची निंदा करणाराला तो दूर आहे १० राम-
कृष्णाची कथा करणे, वीणा, पताका घेऊन रामकृष्णाचे गीत गाणे ही वैकुंठाला जाण्याची सोपी वाट आहे. ११ जे
विचारी आहेत त्यांनी अहंकाराचा वारा लागू न देता, मी सांगितले तसे करावे. १२ काही लोक विषयांत दुःख
आहे हे माहीत असूनही अंधळे होतात कारण लोकांना विषयाचे महत्त्व वाटते. १३ गृहस्थाला द्रव्यलोभ, स्त्री-
पुत्रादी प्रेम सुटत नाही, आणि संन्याशाला भस्म, दंड व वृक्षाची छाया यांचा लोभ सुटत नाही. १४ ज्याचे चित्त
पुत्र, पत्नी, बंधू यांच्यावर आहे, त्यांचा लोभ काय सुटेल ! याचा तुम्हीच विचार करा. १५ याकरता, तुम्ही जाणते
असा, अथवा नेणते असा, हरिकथा करा त्यायोगाने तरून जाल हे मी प्रतिज्ञेवर सांगतो. १६ माझ्यासारखा पतित
कोणी नसेल; परंतु मी हरिकृपेने तरलो, याचा मला अनुभव आहे. १७ जगात कोणी तरी सत्कर्मे केली असतील,
परंतु मी तर हरिकीर्तनावाचून दुसरे काहीच केले नाही. १८ भक्तांना तरून जाण्याचे श्रमच नाही जे मूल पोटी
जन्माला आले, त्याचे सर्व काही आईला करावे लागते १९ देव भक्तांच्या पाठीशी असतो चालताना लक्ष ठेवतो.
पायांना त्रास होऊ नये म्हणून वाटेतील काटे, खडे वेचून पीतांबराने वाट झाडून स्वच्छ करतो. २० हरिनामाने
इतका देव वश होतो असे असताना हरिनाम न घेता हे लोक संसारात इतके चिकटून राहिले आहेत, याचे मला
आश्चर्य वाटते. २१ ज्याने समुद्रावर पाषाण तारले, त्या माझ्या स्वामीचे मनात ध्यान करा २२ नारायणाने
माझ्या जीवाची संसारातून सोडवणूक केली आहे असा हा कृपाळू आहे २३ वाणीने विठोबाचे नाम घेणे हाच
माझा नियम आणि हाच माझा धर्म आहे. २४ प्रत्येकाच्या हृदयात तापत्रयाग्नीच्या ज्वाळा पेटलेल्या असतात
त्यांना रामनाम शांत करते २५ अरे मना, तू हाच संकल्प कर, आणि चित्तात दृढ विश्वास धर, की मायबाप
श्रीहरी मला तारीलच २६ माझा मायबाप फार कृपाळू आहे. तो भक्तांच्या घरी काम करणाऱ्या दासीसारखा
होतो. २७ ज्यांनी कायावाचा आणि मन अर्पण केले आहे, त्यांच्या योगक्षेमाचा भार स्वतः हरी वाहातो २८
सात्त्विक भक्ति-भावावाचून त्याची प्राप्ती होत नाही. हेच कथापुराणे सांगतात २९ ज्याला हरीचीच कथा अत्यंत
आवडते, त्याला पुन गर्भवास नाही ३० वैष्णवांना जन्माला याकरिताच यावे लागते की लोकांच्या उद्धाराचे कार्य
करावे, म्हणूनच ते जगाला पूज्यही होतात. ३१ देवाला जीवापेक्षाही वैष्णव फार आवडतात. जणू गळ्यातील ताईत
असल्याप्रमाणे अच्युत त्यांना कधीही विसरत नाही ३२ वैष्णवांना विष्णुमय जग भासत असल्यामुळे त्यांची भेद-
भावना नष्ट झालेली असते. आणि त्यांना कोणतेही चिंता किंवा दुःख मुळीच नसते त्यांच्याजवळ श्रीहरी अखंड
राहातो. ३३ जेथे शुद्धभावाने नामघोष करतात, तेथे देव सर्वकाळ राहातो ३४ ज्यांनी भक्तिभावाने देवाचा
लाभ करून घेतला, त्यांची संपत्ती कल्पांतीदेखील संपत नाही कारण जेथे देव तेथे लक्ष्मी असतेच. ३५ ज्यांनी
ज्यांनी भक्तिबळाने भगवंताला ऋणी केले, त्यांनाच मनुष्यदेहाला येऊन लाभ झाला, असे जाणावे. ३६ या मूर्ख
लोकांना काय संसाराचे वेड लागले आहे काही कळत नाही हे लोक नारायणाला पूर्ण विसरून गेले आहेत आहेत. ३७
जे नारायणाला विसरतात त्यांची फार मोठी हानी होते ३८ कितीही सांगितले शिकविले, तरी या लोकांना समजत
नाही. त्यांना स्त्री, धन हेच फार गोड वाटते ३९ अरे पाहू जाता अवीट आणि गोड गोविंदच आहे. इतर सर्व
विटणारे व नष्ट होणारे आहेत त्यामुळे त्यांचा छंद व्यर्थ आहे ४० अरे, देवप्राप्तीसाठी काही तरी तळमळ करा.
व्यर्थ झोपेत का आयुष्य घालविता ? ४१ या लोकांना यमाचे भय का बरे नाही ? जगात काही राजेलोकांनीही
परमार्थाकरिता राज्याचा त्याग केला आहे ४२ ज्याने देहाभिमान नाहीसा करण्याकरिता अग्नीत पाय घातला
तो जनकराजा अज्ञानी होता काय ? ४३ ज्याने सहानभूक व इतर आघात जिंकले त्याला काय नाक, कान, डोळे
इत्यादी अवयव नव्हते काय ? संसारापेक्षा देवाच्या भजनात अधिक आनंद आहे, हे त्याने जाणले होते. ४४ शुकाने
डोंगर नष्ट होण्याकरिता संसार झालाच नाही, असा त्याने निश्चय केला होता ४५ या मनुष्यदेहातच देवाचे भजन
घडते; कारण भक्ती करण्याचे ज्ञान इतर कोणत्याही देहात असणे शक्य नाही. ४६ परंतु मनुष्यदेहात आल्यानिवाय

तुम्हाला कोणत्याही देहात मोक्षरूप विश्रांती मिळण्याचे स्थान नाही ४७ मनुष्यदेह मिळविण्याकरिता देवाला विनवणी करीत बसाल तर फार दिवस लागतील म्हणून आताच चित्तामध्ये देवाचे चिंतन करा ४८ ज्याना देवाचा कधीच वियोग नाही, अशा संताना जीव अर्पण करून त्याचे पाय धरा ४९ देवाला दुसऱ्या कोणत्याही सुखोपचारांची इच्छा नाही परंतु त्याला संतांची फार आवड आहे ५० व्यासादिक संतानी पुराणात जे सांगितले आहे त्याचीच उच्छिष्ट वचने मी बोलत आहे त्याच्या वचनाचा अनुवाद करीत आहे ५१ भवसिंधू तरून जाण्याकरिता भक्ती हेच मुख्य साधन असे व्यासानी सांगितले आहे. ५२ लोकाच्या उद्धाराकरिताच व्यासानी भागवत निर्माण केले गोप, गोपी, वसुदेव, देवकी, नंद-यशोदा इत्यादी भक्त भक्तीने उद्धरून गेले, असे सांगितले आहे ५३ वाल्मीकी ऋषीने जे रामायणात लिहिले, त्या वचनाचे निमित्त करून रामचंद्रान सर्वांचा उद्धार करून आपल्याबरोबर सर्वांना वैकुंठाला नेले ५४ आई जशी तान्हूचा बाळाचे संगोपन करते त्याप्रमाणे भक्तांना कसे तारावे, हे वर्म देवालाच माहीत असते ५५ माझ्या तान्हुल्याला भूक लागली आहे असे आई वारवार म्हणते व त्याची मुखचर्या पाहून बाळाला स्तनपान करते ५६ द्रौपदीच्या मनातील हेतू जाणून ऋषींच्या वनातील तुटलेले जांभूळ परत देठाला चिकटविले अनेक संकटसमयी द्रौपदीने हाक मारताच देव धावत आले ५७ धेनू जशी वासराकरिता धावत जाते, त्याप्रमाणे भक्ताकरिता नारायण धावत जातो ५८ नारायण आपल्याजवळ असावा, अशी ज्यांची इच्छा आहे, त्याच्या भाग्याला अंत नाही ते धन्य आहेत ५९ जे लोक मुखाने ' राम राम ' म्हणतात त्याना देव जे सुख देतो त्या सुखाला पार नाही ६० राम राम या दोन अक्षरी मंत्राचा भगवान शंकराने पार्वतीस उपदेश केला. ६१ जो प्राणी काशीमध्ये मरतो, त्याला विश्वनाथ कानामध्ये राम या मंत्राचा उपदेश करितात ६२ मरतेवेळी जो ' राम राम ' म्हणतो, त्याला यमपुरीला जावे लागत नाही ६३ ज्याच्या कंठात सर्वकाळ राम नाम आहे त्याला वैकुंठात उत्तम स्थान प्राप्त होते ६४ देव वैष्णवाच्या घरी सर्वकाळ राहातो त्याना सोडून दुसरीकडे कोठेही स्थिर राहात नाही ६५ इतर साधनाकडे पाहू नका हरिकथा करा हरिकथेत देव अकस्मात सापडतो ६६ भाविकाच्या हातात देव सापडतो शाहाणे कष्ट करून मरतात पण त्यांच्या हाती तो लागत नाही ६७ भक्ती केल्यावाचून त्याची प्राप्ती होत नाही अहंतारूपी पापिणी मनुष्याची हानी करते ६८ जो मी देव आहे असे म्हणतो, तो पूर्ण नागवला अनुभव नसताना जो दुसऱ्यास उपदेश करतो, त्या उपदेशाप्रमाणे वागणाऱ्यास लाभ होतो आणि उपदेशकर्त्याची हानी होते ६९ जो मी देव आहे असे म्हणतो तोच देव आहे, आणि इतर माणसे देव नाहीत काय ? सर्वव्यापक जनार्दन चार प्रकारच्या भूतामध्ये आहे ७० सर्व भूतामध्ये व्यापून तो आपल्या महिमेत आहे देव नाही असे कोणतेही स्थान सांगता येत नाही ७१ देवावाचून कोणतेही स्थान रिकामे नाही, असे संत सज्जन सांगतात ७२ संत महात्मे जगाला उपदेश करून पुढे गेले आहेत त्याच्या उपदेशानुसार न चालता जो वाकडे चालतो, तो फसतो ७३ याचे कारण त्याला वेदाचा तात्पर्यार्थ कळत नाही त्यामुळे जीवब्रह्मातील भेद सत्य आहे असा निश्चय करून भेदाचा दास होतो व तो फसतो ७४ जो पोट भरण्याकरिता आणि पैसा व कीर्ती मिळविण्याकरिता देवाचा दास झाला आहे त्याला देवाची प्राप्ती होत नाही ७५ ब्राह्मण असूनही तो जर भेदवादी किंवा दांभिक असेल तर त्यालाही देवाची प्राप्ती होत नाही, तर मग इतर जातीचा काय पाड आहे ? ७६ जे पंडित प्रतिष्ठेसाठी वाटेल तो व्यवहार करतात दुष्ट बुद्धीने भेदभाव सत्य मानतात ते पूर्णपणे फसले, असे जाणावे. ७७ एखादा ब्राह्मण षट्कर्मे करणारा मोठा चांगला असला, तरी तो जर भेदवादी आणि वेद, गुरु, संत, देव यांची निंदा करीत असेल, तर त्याला देवाचे दर्शन होत नाही ७८ एखादा ब्राह्मण शारीरिक व बौद्धिक अनुकूलता नसल्यामुळे षटकर्महीन आहे परंतु त्याच्या कंठात रामनाम असेल, तर त्याला देवाची भेट खात्रीने होते ७९ जो मोठा भाविक आहे, तो देवाला फार आवडतो, आणि जो शुद्ध जातीचा असूनही अभाविक असेल, तर त्याला तो अशुद्ध मानतो ८० नामाने मनुष्य उद्धरून जातो पुढील कोणत्या तरी जन्मी नामाचे फळ मिळेल, असे मी मानले नाही मी एवढा मतीमंद असूनही या चालू जन्मातच उद्धरून गेल्याचा मला अनुभव आला आहे ८१ मी मंद बुद्धीचा आहे माझी भाषाही व्याकरणशुद्ध नाही तरी पण अभंगाची रचना करून मी हरीचे वर्णन करीत आहे हा सर्व नामाचा प्रताप आहे ८२ श्रुती देखील हरीचे वर्णन करता करता शेवटी ' नेति नेति ' म्हणून थांबल्या त्यांचे चातुर्य देखील कुंठित झाले ८३ हरीच्या स्वरूपाचा, गुणाचा कितीही शोध करीत पुढे गेले, तरी पण ब्रह्मादिकाना देखील

त्याचा शेवट कळत नाही. ८४ देवाला भक्तीचे वेड का लागले आहे, ते कळत नाही. भक्तीची इच्छा जशी असेल त्याप्रमाणे तो आकार धरतो ८५ देव भक्तप्रिय असल्यामुळे भक्तांना ज्या रूपाची गोडी किंवा आवड असेल, ती तो पूर्ण करण्याकरिता निर्गुण असलेला सगुण होतो ८६ लहान मूल आईबापांजवळ वाकडे तोंड करून लाडाने बोबडे बोलते; पण मायबापाला त्यापासून समाधान वाटते ८७ याप्रमाणे याचकाच्या मागण्यापासून देवाला आनंद वाटतो. याचकाचे समाधान व इच्छा पूर्ण होईल असे तो दान देतो आणि अंतकाळी त्याचे रक्षण करतो. ८८ यम जेव्हा सर्व हरण करतो, तेव्हा सार्वभौम राजा जरी असला, तरी पण त्याची शस्त्रास्त्रे, मित्र, नातेवाईक, सैन्य, प्रजाजन यापैकी काहीच उपयोगाला येत नाही. ८९ एखाद्या राजाचे सैन्य जास्तीत जास्त शत्रूला आपला पराक्रम दाखवील पण त्यामुळे क्रोधाने क्रोध वाढतच जातो. ९० क्रोधाला कधी मरण येत नाही. जो शांत असतो, तोच चांगला असतो. चांगल्या माणसाला सत्वगुणच मान्य आहे ९१ विठोबाची भक्ती केली असता, सत्त्व, रज, आणि तम हे तीन गुण आपोआपच नष्ट होतात ९२ चित्त जेव्हा चैतन्याशी एकरूप होते, तेव्हा ते चैतन्यच होते, आणि तसे झाल्यानंतर निजसुखाला काय कमी आहे? ९३ सुखाचा सागर विटेवर उभा आहे, तोच एक आपल्या भक्तांना कृपावान करतो ९४ आता विठोबाच्या चरणाचे ठिकाणी चित्त एकाग्र करून तेथे आम्हाला काय उणे आहे? ९५ आम्हांला त्या नामाविषयी विश्वास आहे, म्हणूनच त्या नामाचा घोष करू ९६ आणि सुखाची समाधी प्राप्त करून देणारी हरिकथा करू. हरिकथाश्रवणाने श्रवणकर्त्याचीही दुष्ट बुद्धी नष्ट होते ९७ त्या पांडुरंगाला शरण गेले असता संसार, लोकलज्जा, स्त्री-पुत्रावरील प्रेम नष्ट होते. ९८ संतजनांनी मला मूढाला जसे शिकविले, जसे सांगितले त्याप्रमाणे त्यांच्या वचनांवर दृढ विश्वास ठेवून मी करीत आहे ९९ तुकाराम महाराज म्हणतात, आता मला कशाचीही गरज नाही. विठोबाच्या चरणी दृढ राहिलो आहे १००

४५०६ गाईन ओवियां पंढरिचा देव । आमुचा तो जीव[1] पांडुरंग ॥ १ ॥
रंगलें हें चित्त माझें तया पायीं । म्हणउनि घेईं हाचि लाहो ॥ २ ॥
लाहो करीन मी हाचि संवसारीं । राम कृष्ण हरि नारायण ॥ ३ ॥
नारायण नाम घालितां तुकासी । न येती या रासी तपतीर्थें ॥ ४ ॥
तीर्थें रज माथा वंदिती संतांचे । जे गाती हरिचे गुणवाद ॥ ५ ॥
गुणवाद ज्याचे गाता पूज्य जाले । वडिवार बोले कोण त्याचा ॥ ६ ॥
त्याचा नाहीं पार कळला वेदांसी । आणिक ही ऋषि विचारितां ॥ ७ ॥
विचारितां तैसा होय त्यांच्या भावें । निजसुख[2] ठावें नाहीं कोणा ॥ ८ ॥
कोणा कवतुक न कळे हे माव । निजलिया जीव करी धंदा ॥ ९ ॥
करुनि कवतुक खेळे हाचि लीळा । त्यापूनि वेगळा पाहातसे ॥ १० ॥
सेवटीं आपण एकलाचि[3] खरा । सोंग हा पसारा नट केला ॥ ११ ॥
लाविवेलें चाळा मोपणें हें जन । भोग तया कोण भोगविशी ॥ १२ ॥
विषयीं गुंतलीं विसरलीं तुज । कन्या पुत्र भाज धनलोभें ॥ १३ ॥
लोभें गिळी फांसा आमिषाच्या आशा । सापडोनि मासा तळमळी ॥ १४ ॥
तळमळ याची तरी[4] शम होईल । जरी हा विठ्ठल आठविती ॥ १५ ॥
आठवे हा तरी संतांच्या सांगातें । किंवा हें संचित जन्मांतर ॥ १६ ॥
जन्मांतरें तीन भोगितां कळती । केलें तें पावती करितां पुढें ॥ १७ ॥
पुढें जाणोनियां करावें संचित । पुजावे अतीत देव द्विज ॥ १८ ॥

१ भाव, २ निजरूप, ३ वेगळा, ४ तरीच

जन्म तुटे ऐसें नव्हे तुम्हां जना । पुढिल्या पावना धर्म करा ॥ १९ ॥
करा जप तप अनुष्ठान याग । संतीं हा मारग स्थापियेला ॥ २० ॥
लावियेलीं कर्में शुद्ध आचरणें । कोणा एका तेणें काळें पावे ॥ २१ ॥
पातला सत्वर निष्काम उदार । जिंकिली अपार वासना हे ॥ २२ ॥
वासनेचें मूळ छेदिल्या वांचून । तरलोसें कोणी न म्हणावें ॥ २३ ॥
न म्हणावें जाला पंडित वाचक । करो मंत्रघोष अक्षरांचा ॥ २४ ॥
चाळविली एकें तेचि आवडीनें । लोक दंभमानें देहसुखें ॥ २५ ॥
सुख तरीच घडे भजनाचे सार । वाचे निरंतर रामनाम ॥ २६ ॥
राम हा उच्चार तरीच बैसे वाचे । अनंता जन्माचें पुण्य होय ॥ २७ ॥
पुण्य ऐसें काय रामनामापुढें । काय ते बापुडे यागयज्ञ ॥ २८ ॥
यागयज्ञ तप संसार दायकें । न तुटती एके नामेंविण ॥ २९ ॥
नामेंविण भवसिंधु पावे पार । ऐसा विचार नाहीं दुजा ॥ ३० ॥
जाणती हे भक्तराज महामुनि । नाम सुखधणी अमृताची ॥ ३१ ॥
अमृताचें सार निजतत्व बीज । गुह्याचें तें गुज रामनाम ॥ ३२ ॥
नामें असंख्यात तारिले अपार । पुराणीं हें सार प्रसिद्ध हे ॥ ३३ ॥
हेंचि सुख आम्ही घेऊं सर्वकाळ । करूनि निर्मळ हरिकथा ॥ ३४ ॥
कथाकाळीं लागे सकळा समाधि । तात्काळ हे बुद्धि दुष्ट नासे ॥ ३५ ॥
नासे लोभ मोहो आशा तृष्णा माया । गातां गुण तया विठोबाचे ॥ ३६ ॥
विठोबाचे गुण मज आवडती । आणीक हे चित्तीं न लगे कांहीं ॥ ३७ ॥
कांहीं कोणी नका सांगों हे उपाव । माझ्या मनीं भाव नाहीं दुजा ॥ ३८ ॥
जाणोनियां आम्ही दिला जीवभाव । दृढ याचे पाव[1] धरियेले ॥ ३९ ॥
धरियेले आतां न सोडीं जीवेंसी । केला[2] येच विशीं निरधार ॥ ४० ॥
निरधार आतां[3] राहिलों ये नेटीं । संवसारतुटी करूनियां ॥ ४१ ॥
येणें अंगीकार केला पांडुरंगें । रंगविलों[4] रंगें आपुलिया ॥ ४२ ॥
आपुली पाखर घालुनिया वरि । आम्हांसी तो करी यत्न देव ॥ ४३ ॥
देव राखे तया आणिकांचें काय । करितां उपाय चाले तेथें ॥ ४४ ॥
तेथें नाहीं रिघ कळिकाळासी जातां[5] । दास म्हणवितां विठोबाचे ॥ ४५ ॥
*विठोबाचे आम्ही लाडिके डिंगर । कांपती असुर काळ धाकें ॥ ४६ ॥*
धाक तिहीं लोकीं जयाचा दरारा । स्मरण हें करा त्याचें तुम्ही ॥ ४७ ॥
तुम्ही निदसुर नका राहूं कोणी । चुकावया खाणी गर्भवास ॥ ४८ ॥
गर्भवासदुःख यमाचें दंडण । थोर होय शीण येतां जातां ॥ ४९ ॥
तान भूक पीडा जीतां ते आघात । मेल्या यमदूत जाच करिती ॥ ५० ॥
जाच करिती हें कोणा आहे ठावें । नरकीं कौरवें बुडी दिली ॥ ५१ ॥

---

१ पाय, २ केला हा सेवेसी निरधार, ३ आम्ही, ४ रंगविला, ५ येता.

बुडी दिली कुंभपाकीं दुर्योधनें । दाविना लाजेनें मुख धर्मा ॥ ५२ ॥
धर्म हा कृपाळू आलासे जवळी । बैसला पातळीं वरि नये ॥ ५३ ॥
न ये वरि कांहीं करितां उपाव । भोगवितो देव ज्याचें त्यासी ॥ ५४ ॥
त्यांसी अभिमान गर्व या देहाचा । नुच्चारिती वाचा नारायण ॥ ५५ ॥
नारायण विसरलीं संवसारीं । तयांसी अघोरीं वास सत्य ॥ ५६ ॥
सत्य मानूनियां संतांच्या वचना । जा रे नारायणा शरण तुम्ही ॥ ५७ ॥
तुम्ही नका मानूं कोणी विसवास । पुत्र पत्नी आस धन वित्त ॥ ५८ ॥
धन वित्त लोभ माया मोहपाश । मांडियले फांसे यमदूतीं ॥ ५९ ॥
दूतीं याच्या मुखा केलेसे कुडण । वाचे नारायण येऊं नेदी ॥ ६० ॥
नेदी शुद्धबुद्धि आतळों चित्तासी । नाना कर्मे त्यासी दुरावती ॥ ६१ ॥
दुराविलीं एकें जाणतीच फार । निंदा अहंकार वादभेद ॥ ६२ ॥
वाद भेद निंदा हे फंद काळाचे । गोवितील वाचे रिकामिकें ॥ ६३ ॥
रिकामिक देया होय नव्हे मना । चिंतेचिये घाणा जुंपिजेसी ॥ ६४ ॥
सेवटीं हे गळा लावुनियां दोरी । सांभाळ ये करीं वासनेचा ॥ ६५ ॥
वासनेचा संग होय अंतकाळीं । तरी तपोबळी जन्म धरी ॥ ६६ ॥
धरूनियां देव राहतील चित्तीं । आर्धीचिया गती आठवाया[1] ॥ ६७ ॥
आठवावा देव मरणाचे काळीं । म्हणउनि बळी जीव दिल ॥ ६८ ॥
दिले टाकूनियां भोग ऋषेश्वरीं । खाती वनांतरीं कंदमूळें ॥ ६९ ॥
मुळें सुखाचिया देव अंतरला । अल्पासाटीं नेला[2] अधोगती ॥ ७० ॥
गति हे उत्तम व्हावया उपाव । आहे धरा पाव विठोबाचे ॥ ७१ ॥
विठोबाचे पायीं राहिलिया भावें । न लगे कोठें जावें वनांतरा ॥ ७२ ॥
तरतो दुबळीं विठोबाच्या नांवें । संचित ज्या सर्वे नाहीं शुद्ध ॥ ७३ ॥
शुद्ध तरे[3] याचें काय तें नवल । म्हणतां विठ्ठल वेळोवेळां ॥ ७४ ॥
वेळा कांहीं नाहीं कवणाचे हातीं । न कळे हे गति भविष्याची ॥ ७५ ॥
भविष्य न सुटे भोगिल्यावांचूनि । संचित जाणोनि शुद्ध करा ॥ ७६ ॥
करावे सायास आपुल्या हिताचे । येथें आलियाचें मनुष्यपण ॥ ७७ ॥
मनुष्यपण तरी साधी नारायण । नाहीं तरी हीन पशूहूनी ॥ ७८ ॥
पशु पाप पुण्य काय ते जाणती । मनुष्या या गति ठाउकिया ॥ ७९ ॥
ठाउकें हें असे पाप पुण्य लोका । देखती ते एकां भोगितिया ॥ ८० ॥
भोगतील एक दुःख संवसारीं । काय सांगों परी वेगळाल्या ॥ ८१ ॥
त्यावें खावें घरें असावें सदैव । हेचि करी हांव संवसारीं ॥ ८२ ॥
संवसारें जन गिळिले सकळ । भोगविती फळ गर्भवासा ॥ ८३ ॥
वासनेचें मूळ छेदिल्यावांचून । नव्हे या खंडण गर्भवासा ॥ ८४ ॥
सायास केलियावांचुनि तें कांहीं[4] । भोगावरी पाहीं घालूं नये ॥ ८५ ॥

१ आठवाव्या, २ गेला, ३ तरी याचे, ४ नाही.

नये बळें घड घालू काटचावरि । जाये जीवे धरी सर्प हातीं ॥ ८६ ॥
हाती आहे हित करील तयासी । म्हणउनि ऋषी सांगितले ॥८७ ॥
सागती या लोका फजित करूनि । आपण जे कोणी तरले ते ॥ ८८ ॥
तेणे वाळवटीं उभारिले कर । कृपेचा सागर पांडुरंग ॥ ८९ ॥
गगाचरणीं करी पातकाची धुनी । पाउले तीं मनीं चिंतिलिया ॥ ९० ॥
चिंतने जयाच्या तारिले पाषाण । उद्धरी चरण लावूनिया ॥ ९१ ॥
लावूनिया टाळी नलगे बैसावे । प्रेमसुख घ्यावे सतसगें ॥ ९२ ॥
सतसगें कथा करावे कीर्तन । सुखाचे साधन रामराम[1] ॥ ९३ ॥
मग कोठें देव जाऊ न सके दुरी । बैसोनि भीतरी राहे कठीं ॥ ९४ ॥
राहे व्यापुनिया सकळ शरीर । आपुला विसर पडो नेदी ॥ ९५ ॥
नेदी दु ख देखो आपुलिया दासा । वारी गर्भवासा यमदूता ॥ ९६ ॥
तान भूक त्यासी वाहो नेदी चिता । दुश्चित हे घेता नाम होती ॥ ९७ ॥
होती जीव त्याचे सकळ ही जत । परि ते अंकित सचिताचे ॥ ९८ ॥
चेवले जें कोणी देहअभिमाने । त्यासी नारायणे कृपा केली ॥ ९९ ॥
कृपाळू हा देव अनाथा कोंवसा । आम्ही त्याच्या आशा लागलोसो ॥ १०० ॥
लावियेले फासे येणे पाडुरगें । तुका म्हणे सगे सताचिया ॥ १०१ ॥

शब्दार्थ व टीपा – लाहो–ऊद, लोभ, बडिवार–मोठपणा, प्रतिष्ठा, फासा–पाश, निवसुर–अर्धवट, अज्ञानी, कोंवसा–आश्रय, आधार

अर्थ – पढरपूरनिवासी विठोबा आहे त्यास मी आनदाने ओव्या गाईन, कारण तो आमचा जीवप्राण आहे १ त्याच्या चरणी माझे चित्त जडले आहे म्हणून मी त्याच्याच नावाचा लोभ धरतो २ मी ससारी असून रामकृष्ण या नावाची इच्छा धरीत आहे ३ या नावाच्या बरोबरील तपतीर्थादी साधने येणार नाहीत ४ ज हरीचे गुण वर्णन करतात त्या सताची पायधुळीला तीर्थें देखील वदन करितात ५ ज्याचे गुण गाऊन सत या योग्य तेस आले, त्या देवाचे सामर्थ्य कोणी वर्णन करावे ? ६ ते वर्णन करण्याविषयी पुष्कळ ऋषी विचार करितात, पण ज्याचा अत वेदास देखील लागला नाही मग त्याना कसा लागेल ? ७ देवाचे मूळ स्वरूप माहीत नाही, तो देव एक भावाने ज्याच्या त्याच्या सारखा होतो ८ देवाचे कौतुक व माया कोणासही समजत नाही, तो देव सर्व जीव झोपले असताही मायाशक्तीच्या द्वारा सृष्टीचा व्यवहार करीतच राहतो ९ कौतुकाने सर्व खेळ खेळून, विश्वाला व्यापूनही अलिप्त राहून विश्वाचा व्यवहार तो पाहतो १० बहुरूप्यासारखे सोंग करून देवाने सर्व पसारा वाढविला आहे. ही सोंगे जेव्हा तो टाकून देतो, तेव्हा तोच एक शेवटी खरा असतो ११ मी देह आणि देहासबधी या अभिमानाच्या छदात लोक गुतले आहेत म्हणून सचितकर्माचे भोग भोगतात भोगविणाराही देवच आहे १२ बायका, मुले व द्रव्य याविषयीच्या लोभात गुतल्यामुळे हे लोक देवास विसरून गेले १३ जसा मासा आमिषाच्या आशेने फास गिळतो आणि मग त्यात अडकल्यानतर तळमळतो, त्याप्रमाणे लोकाची स्थिती होते १४ एक विठोबाचा आठव केला तरच सर्व लोकाची तळमळ नाहीशी होईल १५ एक सताच्या सगतीने अथवा मागील अनेक जन्माचा पुण्यसचय असेल तरच देवाचे स्मरण होईल १६ साप्रतच्या सुखदु खाचे भोगावरून लोकास तीन जन्माचे ज्ञान होते १७ ते असे की, मागील जन्मी जे काय केले असेल ते या जन्मी व या जन्मी काय केले असेल ते पुढील जन्मी भोगावे लागेल १८ असे समजून देव, ब्राह्मण व अतिथी याची पूजा करून पुण्याचा सचय करावा १९

१ रामनाम,

संतांनी ज्या धर्माची स्थापना केली, आणि जे तुम्हांस सांगितले, त्याप्रमाणे जपतपादी सत्कर्माचे अनुष्ठान करा. २० चांगल्या कर्माच्या वागणुकीने चालले असता केलेले पुण्य कोणत्या तरी एखाद्या जन्मी उपयोगी पडेल २१ ज्यांनी फलाच्या इच्छेला जिंकून निष्काम कर्म केले त्यांचा लवकर उद्धार होतो. २२ मूळासुद्धा वासना नाहीशी केल्याशिवाय आम्ही तरलो असे कोणीही म्हणू नये. २३ वेदाक्षरे पाठ करून आम्ही पंडित झालो, हे तुमचे म्हणणे व्यर्थ आहे. २४ कित्येक लोक कीर्तीच्या व मानाच्या इच्छेने व देहसुखाच्या लालसेने भजनाची आवड ठेवतात. पण ते सर्व पूर्ण फसले. २५ एका श्रीहरीचे सर्वकाळ नामस्मरण केले असता खऱ्या सुखाची प्राप्ती होते. २६ निष्काम कर्माचे पुण्य, अनंत जन्मांचे जर असेल तर त्याच्या वाणीने नाम येईल. २७ रामनामावाचून जगात कोणते मोठे पुण्य आहे? त्यापुढे यज्ञयागादी साधने तुच्छ आहेत. २८ कारण, याग, यज्ञ, तपादी साधने केली असता संसारच मिळणार आहे आणि त्यापासून हरिनामाखेरीज सुटका नाही. २९ रामनामावाचून दुसरे कोणतेही साधन भवसागरातून तारण्यास समर्थ नाही. पूर्ण विचार केल्यास हेच सिद्ध होते. ३० एक श्रीहरीनामाची गोडी भक्त जाणतात. त्यावाचून त्यांना दुसरे माहीत नाही. ३१ नाम हे अमृताचे सार असून निजस्वरूपाचे बीज आहे व सर्व गुह्यांमधले गुह्य आहे. ३२ हरिनामाच्या योगाने पुष्कळ लोकांचा उद्धार झाला, त्याची गणती नाही असे पुराणांनी वर्णन केले आहे ३३ हेच नामामृताचे सुख सर्वकाळ सेवन करू व शुद्ध भावाने हरिकथा करू. ३४ कथेच्या वेळी सर्व श्रोत्यांना समाधी लागते व तत्काळ दुष्ट बुद्धीचा नाश होतो ३५ विठोबाचे गुण गाइले असता माया, मोह, लोभ, तृष्णा नष्ट होतात. ३६ मला विठोबाचेच गुण आवडतात. माझ्या मनाला दुसरे काही आवडत नाही. ३७ म्हणून मला कुणीही कोणतेही गुण सांगू नका. माझ्या मनात विठोबावाचून दुसरा विषय नाही. दुसऱ्यावर माझे प्रेम नाही. ३८ सर्व साधनांचा विचार करूनच हरीला जीवभाव अर्पण करून त्याचे पाय दृढ धरले आहेत. ३९ आता जीव गेला तरी धरलेले चरण कधीच सोडणार नाही. आमरण त्याचीच सेवा करण्याचा निश्चय केला आहे ४० संसाराचा संबंध सोडून आम्ही याच निश्चयाने राहिलो आहोत ४१ पांडुरंगाने माझा अंगिकार केला असून आपल्या रंगात रंगवून टाकले आहे. ४२ देव आमच्यावर आपल्या प्रेमाची पाखर घालून आमचे रक्षण करण्याचा प्रयत्न करतो ४३ देव ज्याचे रक्षण करतो त्याला मारण्याचे कितीही उपाय योजिले तरीसुद्धा ते काही चालणार नाहीत. ४४ विठोबाचे दास म्हणवून घेतल्यावर त्याच्या घरी कळिकाळालाही प्रवेश नाही ४५ आम्ही विठोबाची लाडकी मुले आहोत त्यामुळे असुर आणि काळ आमच्या भयाने थरथर कापतात. ४६ त्रैलोक्यामध्ये ज्या देवाचा धाक, दरारा आहे, त्याचे तुम्ही सर्वकाळ स्मरण करा. ४७ विनाकारण झोपेमध्ये गुंगू नका. नामस्मरण करून यशाची जागणी व गर्भवासाचे पुल नाहीसे करा ४८ जन्ममृत्यूच्या येरझारांनी व यमयातनेच्या दुःखाने लोक फार श्रमी झाले आहेत. ४९ जिवंतपणी तहानभुकेची पीडा होत आहे व मेल्यावर यमदूत जाच करीत आहेत. ५० मेल्यावर यमाचा जाच होतो की नाही, हे कोणास माहीत आहे? असे लोकांचे म्हणणे आहे. याला प्रमाण भारतातील इतिहास कौरव नरकात पडल्याचे [illegible] आहे. ५१ पूर्वदेहाचा अभिमान आठवून दुर्योधनास लाज वाटल्यामुळे त्याने धर्मराजाला तोंड न दाखविता तो नरकात जाऊन बसला. ५२ धर्मराजा कृपाळू असल्यामुळे त्याच्या जवळ आला, पण तो दुर्योधन खाली गेला. तो लाजेने वर येईनासा झाला. ५३ धर्मराजाने पुष्कळ उपाय केले पण त्याचे संचितकर्म त्यास वेध भोगवीत आहे ५४ त्या दुर्योधनाला आपला देहाभिमान असल्यामुळे त्याने नारायण या नामाचा उच्चार केला नाही. ५५ संसाराला येऊन नारायणास विसरले त्यांना अघोर नरकात खरोखरी वास करावा लागला ५६ हे संतांचे बोलणे खरे मानून तुम्ही नारायणास शरण जावे हे बरे ५७ त्या नारायणावाचून कोणाचा भरवसा नाही. म्हणून बायका, मुले, द्रव्य या लोभात पडू नका. ५८ ह्या धनाचा लोभ व सर्व गणगोताचा मोह हे यमदूताचे फासे आहेत. ते त्यांनी तुमच्यावर घातले आहेत. ५९ अंतकाळी यमदूत येऊन लोकांची वाचा बंद करतात. त्यांच्या मुखात नाम येऊ देत नाहीत. ६० अनेक प्रकारची केलेली वाईट कर्मे ती त्याच्या चित्तामध्ये चांगली बुद्धी उत्पन्न होऊ देत नाहीत. म्हणून ते देवास अंतरले ६१ बहुतकरून जाणते लोक तर फारच अंतरले; कारण त्यांच्या अंगी अभिमान असून ते भेदात्मक वाद व निंदा करितात. ६२ वाद, भेद, निंदा हे छंद काळाचे आहेत. त्या योगाने व्यर्थ वाया शिणवितात. ६३ एक वेळ देहास आराम मिळतो, पण मनास कधीही नाही; कारण ते चिंताग्नी वाढविणारा जुनाट आहे ६४ मरणसमयास देखील वासनेची दोरी गळ्यास लावून अनेक योनींमध्ये घालविणारे मनच आहे. ६५ मोठ्या

तपश्चर्येचे बळ जरी अगो असले, तरी अखेरीस वासना उत्पन्न होईल तसा त्यास जन्म होतो ६६ याकरिता अशा गतीची आठवण करून कित्येक लोक चित्तामध्ये आगोदरच देव धरून राहिले आहेत ६७ मरणसमयास देवाची आठवण व्हावी म्हणून मोठ्या पराक्रमी लोकांनी देखील आपले प्राण खर्च केले ६८ त्याकरिताच ऋषी, मुनी सर्व भोग वगैरे टाकून रानामध्ये व पवमुळे पाला खात बसले आहेत ६९ कित्येक लोक संसारसुखामध्ये गुंतल्यामुळे देवास अंतरले, अशा थोड्या लाभाकरिता अखेरीस नरकामध्ये गेले ७० चांगली गती मिळण्याचा उपाय म्हणजे विठोबाच्या पायाचे ध्यान चित्तामध्ये करावे ७१ जर विठोबाच्या पायी भाव राहिला तर आहार टाकून वनात वगैरे जाणे नको ७२ पूर्वीचे संचितकर्म जरी वाईट असले तरी ते अभागी लोक एका विठोबाच्या नामाने उद्धरतील ७३ मग नामस्मरणाने ज्याचे संचितकर्म चांगले आहे त्याचा उद्धार होण्याचे काही नवल आहे काय ? ७४ काळाची गती कोणाच्या स्वाधीन नाही व पुढील भविष्य कोणासही समजत नाही ७५ हे प्रारब्ध भोगल्यावाचून सुटत नाही असे समजून चांगल्या पुण्याचा संचय करावा ७६ आपले हिताकरिता जर चांगले उपाय केले, तर मनुष्य जन्माला आल्याचे सार्थक झाले ७७ जर मनुष्यदेहात देवाची प्राप्ती करून घेतली तर उत्तम, नाहीपेक्षा जनावराहूनही नीच असे समजावे ७८ कारण जनावरे काही पापपुण्य जाणीत नाहीत आणि ते सर्व प्रकार मनुष्यास माहीत आहेत ७९ पापपुण्य हे मनुष्यास माहीत आहे आणि त्याची चांगलावाईट बाधा दुसऱ्यास होते तो दिसते ८० कित्येक लोक संसारामध्ये दुःख भोगतात त्याचे प्रकार वेगळाले काय सांगायचे आहेत ! ८१ संसारास येऊन चांगले अलंकार वस्त्रे व उत्तम पक्वान्न खाण्यास असावे आणि आपण भाग्यवान व्हावे, असा सर्वांचा हेतू आहे ८२ याप्रमाणे सर्व लोक संसाराने गिळले आहेत अखेरीस गर्भवासाचे दुःख भोगावे हेच फळ त्यांना मिळते ८३ मूळामुळी वासना नाहीशी केल्याशिवाय जन्ममृत्यूचे खंडण होणार नाही ८४ आपल्या प्रारब्धी असेल तसे होईल असे कोणी म्हणू नये सायास केल्यावाचून देवाची प्राप्ती होणार नाही ८५ प्रारब्धाप्रमाणे होईल असे म्हणून धड पाय ठेवून कोणी काट्यावर घालतो काय ? अथवा जिवंत सर्प कोणी गळ्यात घालील काय ? ८६ याकरिता प्रारब्ध आड न करिता, कोणीही आपले हित करील तर त्याच्या स्वाधीन आहे असे ऋषींनी वर्णन केले आहे ८७ जे कोणी मुक्त झाले त्यांनी आपल्यासारखे आचरण करा म्हणून लोकास रागावून सांगितले आहे ८८ पांडुरंग लोकास बोलाविण्याकरिता हात उभारून वाळवंटात उभा आहे तो केवळ कृपेचा समुद्र आहे ८९ ज्या चरणांपासून पातकाचा नाश करणारी गंगा उत्पन्न झाली आहे, त्या चरणाचे मनात चिंतन करावे ९० ज्याचे चरण लागून समुद्रावर दगड देखील तरले, त्याने आपले चिंतन करणाराचा उद्धार केला ९१ याकरिता कोणी तोंड बंद करून मौनपणाने बसू नये सर्वकाळ संताच्या संगतीत बसून प्रेमसुख घ्यावे ९२ संताच्या संगतीने नामसंकीर्तन करावे हे साधन सुखाचे आहे ९३ या योगाने देव कोठे दूर जात नाही तो आपल्या हृदयात सर्व काळ राहातो ९४ सर्व अंगांमध्ये देवाचा संचार होतो आणि तो दासाला आपला विसर पडू देत नाही ९५ देव आपल्या भक्तास कोणत्याही प्रकारचे दुःख होऊ देत नाही व यमदूतापासून आणि गर्भवासापासून सोडवितो ९६ त्या भक्तांना सहानुभूतीविषयीची काळजी करू देत नाही कारण ते नाम घेताना संकोचित होतील म्हणून ९७ सर्व जीवजंतू देवाचेच आहेत पण ते संचितकर्माच्या अचित झाल्यामुळे त्यास अंतरले ९८ मी देही व देहसंबंधी माझे या अभिमानातून जे निघाले त्याच्यावर नारायण कृपा करीत आहे ९९ हा देव दीन जनाविषयी कृपेचे घर आहे म्हणून त्याच्या आशेला आम्ही गुंतलो आहोत १०० तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगाने या आपल्या आशेमध्ये गुंतून आम्हाला भक्तजनांच्या स्वाधीन केले आहे १०१

४५०७ विचार करिती बैसोनि गौळणी । ज्या कृष्णकामिनी कामातुरा ॥ १ ॥
एकांत एकल्या एकाच सुखाच्या । आवडती त्याच्या गोष्टी त्याला ॥ २ ॥
तर्कवितर्किणी दुराविल्या दुरी । मौन त्या परिचारी आरंभिले ॥ ३ ॥
कुशळा कवित्या कवित्या लोभिका । त्या ही येथें नका आम्हांपाशीं ॥ ४ ॥
बोलक्या वाचाळा कृष्णरता नाहीं । या चोरोनि सोहीं खेट केली ॥ ५ ॥

भेऊनियां जना एकी सवा जाल्या । वाती विझविल्या दाटोबळें ॥ ६ ॥
कृष्णसुख नाहीं कळलें मानसीं । निंदिती त्या त्यासी कृष्णरता ॥ ७ ॥
तो नये जवळी देखोनि कोल्हाळ । म्हणउनि समेळ मेळविला ॥ ८ ॥
अंतरीं कोमळा बाहेरी निर्मळा । तल्लीन त्या बाळा कृष्णध्यानीं ॥ ९ ॥
हरिरूपीं दृष्टि कानीं त्याच गोष्टी । आळंगिती कंठीं एकाएकी ॥ १० ॥
न साहे वियोग करिती रोदना । श्रमिष्ट भावना देहाचिया ॥ ११ ॥
विसरल्या मागें गृह सुत पती । अवस्था याचिती गोविंदाची ॥ १२ ॥
अवस्था लागोनि निचळचि ठेल्या । एकाएकी जाल्या कृष्णरूपा ॥ १३ ॥
कृष्णा म्हणोनियां देती आलिंगन । विरहताप तेणें निवारेना ॥ १४ ॥
ताप कोण वारी गोविंदावांचूनि । साच तो नयनीं न देखतां ॥ १५ ॥
न देखतां त्यांचा प्राण रिघों पाहे । आजि कामास ये उसिर केला[1] ॥ १६ ॥
रित्या ज्ञानगोष्टी तयां नावडती । आळिंगण प्रीती कृष्णाचिया ॥ १७ ॥
मागें कांहीं आम्ही चुकलों त्याची सेवा । असेल या देवा राग आला ॥ १८ ॥
आठविती मागें पापपुण्यदोष । परिहार एकीस एक देती ॥ १९ ॥
अनुतापें जाल्या संतप्त त्या बाळा । टाकुनि विव्हळा धरणी अंग ॥ २० ॥
जाणोनि चरित्र जवळीच होता । आली त्या अनंता कृपा मग ॥ २१ ॥
होउनी प्रगट दाखविलें रूप । तापत्रय ताप निवविले ॥ २२ ॥
निवालेया देखोनि कृष्णाचें श्रीमुख । शोक मोह दुःख दुरावला ॥ २३ ॥
साच भाव त्यांचा आणुनियां मना । आळंगितो राणा वैकुंठींचा ॥ २४ ॥
हरिअंगसंगें हरिरूप जाल्या । बोलों विसरल्या तया सुखा ॥ २५ ॥
व्यभिचारभावें भोगिलें अनंता । वर्तोनि असतां घराचारी ॥ २६ ॥
सकळा चोरोनि हरि जयां चित्तीं । धन्य त्या नांदती तयामध्यें ॥ २७ ॥
उणें पुरें त्यांचें पडों नेंदी कांहीं । राखे[2] सर्वां ठायीं देव तयां ॥ २८ ॥
न कळे लाघव ब्रह्मादिकां भाव । भक्तिभावें देव केला तैसा ॥ २९ ॥
तुका म्हणे त्यांचा धन्य व्यभिचार । साधिलें अपार निजसुख ॥ ३० ॥

शब्दार्थ व टीपा :– खेट–पंगत, ठेल्या–उभ्या राहिल्या, आळंगितो–आलिंगन देतो.

अर्थ :– कृष्णाच्या अंगसंगाची इच्छा करणाऱ्या गौळणी एकत्र बसून विचार करू लागल्या. १ ज्या एकांतात एकट्याच बसल्या होत्या, त्यांना एक कृष्णसुखाच्याच गोष्टी आवडत होत्या. २ तर्ककुतर्क करणाऱ्यांना दूर घालवून त्यांनी कृष्णसुखाच्या गोष्टींना सुरुवात केली होती. ३ ज्या प्रवचन, कथा, कविता आणि धनाचा लोभ करणाऱ्या आहेत, त्या आमच्या जवळ नकोत असे त्या म्हणू लागल्या. ४ ज्या बोलक्या, वाचाळ आणि कृष्णरत नाहीत, त्यांना कळू न देता यांनी नियमितपणे एकत्र पंगतीची जागा निश्चित केली होती. ५ पामर लोकांना भिऊन त्या सर्वजणी निवृत्तीधर्माच्या बाजूला झाल्या, आणि मुद्दामच लोकांनी आपल्याला पाहू नये म्हणून त्यांनी दिवे मालवून टाकले. ६ ज्यांना कृष्णसुखाचा अनुभव नाही, निदान मनात त्याचे परोक्षज्ञान नाही, अशा नास्तिक, पाखंडी गौळणींना कृष्णरत झालेल्या गौळणी धिःकारू लागल्या. ७ केवळ तर्कचर्चा केल्याने कृष्ण जवळ येत नाही. म्हणून

१ जला, २ सखे.

त्या भाविक गौळणींनी स्वतंत्र मेळावा केला ८ अंतःकरणात शुद्ध व बाहेरून देहाने शुद्ध असलेल्या त्या गोपबाला कृष्णाच्या ध्यानात निमग्न झाल्या होत्या ९ त्यांची दृष्टी हरीच्या रूपाच्या ठिकाणी होती कान हरीच्या कथा ऐकण्याकडे तल्लीन झाले होते आणि गळ्यात गळा घालून एकमेकी आलिंगन देत होत्या १० कृष्णाच्या वियोगामुळे त्या रडू लागल्या आणि भ्रमिष्टासारख्या होऊन, त्याना देहाची शुद्धीही राहिली नाही ११ त्या आपल्या पती, सुत, घर या सर्वांना विसरल्या, आणि एका गोविंदाच्याच ठिकाणी चित्त लावून बसल्या १२ गोविंदाचा वेध मनाला लागल्यामुळे त्या गौळणी अतिशय शुद्ध होऊन एकदम कृष्णरूप झाल्या होत्या १३ परस्परांना कृष्ण समजून आलिंगन देऊ लागल्या पण त्याचे विरहदुःख त्यायोगे निवृत्त झाले नाही १४ जोपर्यंत खरोखर गोविंद दृष्टीस पडणार नाही तोपर्यंत गोविंदावाचून दुसरा कोण बरे ते दुःख निवारण करू शकेल ? १५ कृष्ण दृष्टीस न पडल्यामुळे त्यांचे प्राण जाऊ पाहात होते त्या परस्परांना म्हणू लागल्या, सखे ! आज कृष्णाने दर्शन देण्यास उशीर का केला ? १६ त्या गौळणींना पोकळ ज्ञानाच्या गोष्टी आवडत नव्हत्या, त्याना कृष्णाला आलिंगन देण्याचीच आवड होती १७ त्या म्हणत होत्या, मागे आम्ही कृष्णाची सेवा करण्यात चुकत असू म्हणूनच त्याला आमचा राग आला असेल १८ मागे आपण काही पाप किंवा अक्षम्य अपराध केला असेल का ? त्याचे त्या स्मरण करू लागल्या आणि एकमेकींची क्षमा मागून, पुन असे न करण्याचा निश्चय करीत होत्या १९ त्या गौळणी पश्चात्तापाने तप्त होऊन, वियोगदुःखाने विव्हळ होऊन, जमीनीवर अंग टाकीत होत्या २० त्या गौळणींची अवस्था व त्यांचे शुद्ध चरित्र पाहून अनंताला त्यांची दया आली कारण तो जवळच होता २१ तेथे प्रगट होऊन त्याने आपले नयनमनोहर रूप त्याना दाखविले, आणि त्यांचे त्रिविधताप दूर केले २२ श्रीकृष्णाचे मुख पाहून गौळणी शांत झाल्या व त्यांचा शोक, मोह व दुःख नाहीसे झाले २३ त्यांचा शुद्ध सात्विक भाव पाहून वैकुंठराज श्रीकृष्णाने त्याना आलिंगन दिले २४ हरीच्या अंगसंगतीने त्या गौळणी हरीरूप झाल्या आणि त्या सुखाचे वर्णन त्याना करता येईना अशी त्यांची अवस्था झाली २५ याप्रमाणे प्रपंचात राहूनही त्या गौळणींनी व्यभिचारभावाने अनंताचा भोग घेतला २६ कोणालाही कळू न देता ज्यांच्या चित्तात हरी राहतो, आणि देहाने मात्र जे सर्वांत राहातात ते धन्य आहेत २७ अशा भक्तांना देव काहीही कमी पडू देत नाही त्यांचे सर्व ठिकाणी रक्षण करितो २८ ज्याची लीला चातुर्य ब्रह्मादिकानाही कळत नाही तो देव त्या गौळणींनी भक्तिभावाच्या बळाने आपलासा केला होता २९ तुकाराम महाराज म्हणतात त्या गौळणींचा लोकदृष्ट्या व्यभिचार असला तरीसुद्धा तो परमार्थ होता म्हणूनच त्या योगाने अपार आत्मसुखाची प्राप्ती करून घेतली होती ३०

## बाळक्रीडा प्रारंभ अभंग—१००

४५०८ देवा आदिदेवा जगत्रयजीवा[१] । परियेसीं केशवा विनंती माझी ॥ १ ॥
माझी वाणी तुझें वर्णी गुण नाम । ऐसें देईं प्रेम कांहीं कळा ॥ २ ॥
कळा तुजपाशीं आमुचें जीवन । उचित करून देईं आम्हा ॥ ३ ॥
आम्हा शरणागता तुझाचि आधार । तूं तव सागर कृपासिंधु ॥ ४ ॥
सिंधु पायवाट होय तुझ्या नामें । जाळीं[२] महाकर्में दुस्तरें तीं ॥ ५ ॥
तीं फळें उत्तमें तुझा निजध्यास । नाहीं गर्भवास सेविलिया ॥ ६ ॥
सेविलिया राम कृष्ण नारायण । नाहीं त्या बंधन संसाराचें ॥ ७ ॥
संसार तें काय तृणवतमय । अग्नि त्यासी खाय क्षणमात्रें ॥ ८ ॥
क्षणमात्रें जाळी दोषांचिया रासी । निंद्य उत्तमासी वंद्य करी ॥ ९ ॥
करी ब्रिदें साच आपलीं आपण । पतितपावन दिनानाथ ॥ १० ॥

१ जगत्रयजीवा, २ जळतील कर्में दुस्तर ते

**नाथ अनाथाचा पति गोपिकाचा । पुरवी चित्तींचा मनोरथ ।। ११ ।।**
**चित्तीं जें धरावे तुका म्हणे दासीं । पुरविता होसी मनोरथ ।। १२ ।।**

शब्दार्थ व टीपा - परियेसीं-ऐक, दुस्तरें-कठीण, भयंकर

अर्थ :- त्रैलोक्यनायका देवाधिदेवा, केशवा, माझी एक विनंती ऐक १ माझ्या वाणीने तुझेच गुणानुवाद व नाम वर्णन करावे अशा प्रकारचे प्रेम मला दे २ देवा, सर्व कला तुझ्याजवळ आहेत आणि आमचे जीवनही तुझ्या स्वाधीन आहे ते आम्हास योग्य अधिकाराने दे ३ आम्ही तुला शरण आल्यानंतर आम्हाला तुझाच आधार आहे, आणि तू तर कृपेचा अथांग सागरच आहेस ४ तुझ्या नामस्मरणाने भयंकर कर्मांचे दहन होऊन भवसिंधूवरून जाण्याकरिता पायवाट होते, इतका तो उल्लंघन करण्यास सोपा होतो ५ तुझ्या स्वरूपाचे ध्यान सतत करण्याने स्वर्ग आणि मोक्ष ही उत्तम फळे प्राप्त होतात आणि त्यायोगाने गर्भवासादी दुःखे निवारण होतात ६ 'रामकृष्ण नारायण' ही तुझी नामे सर्वकाळ जपली असता त्याला देहाशी संसाराचे बंधन प्राप्त होत नाही ७ संसार केवळ वाळल्या गवताप्रमाणे आहे त्यास जसा अग्नी लावला असता एका क्षणात भक्षण करतो, ८ याप्रमाणे देवा, पातकांचा केवढाही मोठा ढीग असला, तरी तुझे नाम त्याला एक क्षणात भस्म करून टाकते, आणि अति निंद्य लोकसुद्धा वंद्य व श्रेष्ठ होतात ९ पतितपावना, दीनानाथा, देवा हे तुझे ब्रीद तूच खरे कर १० देवा, तू अनाथाचा नाथ आणि गोपिकाचा पती आहेस तू माझ्या मनातील एकच इच्छा पूर्ण कर ११ तुकाराम महाराज म्हणतात, सेवकानी मनात जी इच्छा करावी ती तू पूर्ण करतोस १२

विवरण - या व पुढल्या नव्याण्णव म्हणजे एकूण शंभर अभंगात तुकाराम महाराजांनी श्रीकृष्णाच्या बाललीला वर्णन केल्या आहेत या बाललीला तुकोबांनी केव्हा लिहिल्या ? सद्गुरुनाथाचा उपदेश होण्याच्या आधी की नंतर ? हे अभंग म्हणजे तुकोबांचे प्रारंभीचे कवित्व की नंतरचे ? इत्यादी प्रश्न महत्त्वाचे असले तरी आपणास येथे या बाळक्रीडाचा भावार्थ व हेतू याचाच विचार करावयाचा आहे भागवतातील कथांच्या आधारे या शंभर अभंगात तुकोबांनी श्रीकृष्णाच्या बालक्रीडांचे अतीव रसाळ व भक्तिभावपूर्ण असे वर्णन केलेले आढळून येईल या बालक्रीडांतील शाब्दिक कलाकुसर, शामसखाची गमत इत्यादी विशेषापेक्षा त्यांच्या अंतरंगातील गोडी विशेष महत्त्वाची आहे. अभंगांना तुकोबांनी ओव्या म्हटले आहे

श्रीविठ्ठलाचे अथवा पांडुरंगाचे उपासक तुकोबा श्रीकृष्णाच्या बाललीला का वर्णन करतात ? याचे उत्तर स्पष्टच आहे की, श्रीविष्णू, श्रीकृष्ण, श्रीविठ्ठल ही एकाच देवाची रूपे आहेत याची तुकोबांना खात्री होती श्रीकृष्णाचे बाळरूपच भीमरेच्या तीरावर विठ्ठलाच्या रूपाने स्थिरावले अशी सर्वच मराठी संतांची निष्ठा आहे 'होतासि क्षीरसागरीं । महा दाटली असुरीं ।। म्हणोनिया घरीं गौळियांचे अवतार ।। केला पुंडलीकें गोवा । तुज पंढरीये देवा ' या तुकोबांच्याच ओळीतून श्रीकृष्णच पंढरपुरास विठ्ठलाच्या रूपाने कसा स्थिर झाला याची साक्ष पटते 'गीता जेणें उपदेशिली । ते हे विटेवरी माउली ' अशी तुकोबांची श्रद्धा होती 'सावळें रूपडें चतुर्भुज मूर्ती । कृष्णनाम चित्तीं संकल्प हा ' असा त्यांच्या मनाचा ध्यास होता अवघा आणिला परिवार । गोपीगोपाळांचा भार । तुका म्हणे धन्य झालें । भूमीं वैकुंठ आणिलें । ' याही चरणातून श्रीकृष्ण व भूवैकुंठीचा पांडुरंग यांचे नाते स्पष्ट होण्यासारखे आहे 'पांडुरंग बाळमूर्ती । गाई गोपाळा संगतीं । येऊनिया प्रीतीं । उभें समचि राहिलें ' या वचनावरूनही श्रीकृष्ण विठ्ठल यांची एकरूपता ध्यानात येण्यासारखी आहे

तुकोबांप्रमाणेच पूर्वीच्याही ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ इत्यादी संतांनीही श्रीकृष्णाच्या बाललीलांचेच वर्णन केले आहे भगवद्गीता सांगणा या श्रीकृष्णाच्या बालरूपावर व त्याच्या विविध लीलांवर सूरदास, मीरा, नरसी मेहता इत्यादी संतांचेही मनापासून प्रेम आहे श्रीकृष्णाचे सारे बालचरित्र भागवताच्या आधारे उभे करून तुकोबांनीही आपल्या आराध्य दैवताचीच उपासना अथवा पूजा शब्दांनी बांधली आहे वसुदेवदेवकीचा शीण, कारावासातील कृष्णजन्म, कृष्णाचे गोकुळात येणे, गोकुळात त्याने केलेल्या खोड्या, गोपींच्या तक्रारी, कृष्णविरहाने झालेली त्यांच्या मनाची अवस्था, गोपाळांचे विविध खेळ, दहीकाल्याची वनातील पंगत, कृष्णाचे मृत्तिकाभक्षण,

यशोदेस पटलेले त्याचे माहात्म्य, कालियामर्दनाचा भीषण प्रसग, त्या प्रसगी गोपगोपींची झालेली करुण मनस्थिती, कृष्णभेटीचा आनद, कृष्णाने गोवर्धनगिरीच्या आश्रयाने केलेले इद्राच्या कोपापासूनचे रक्षण, कसचाणूराचा पराभव इत्यादी विविध प्रसगाचे मोठे गोड व घटकदार वर्णन तुकोबानी बालक्रीडेच्या या शभर अभगातून केलेले आहे हाच श्रीकृष्ण विठोबा होऊन चद्रभागेच्या तीरावर समचरणानी उभा असल्याची त्याची साक्षी आहे तोच त्याचा अनुभव आहे बाळक्रीडेच्या शेवटच्या अभगात ते म्हणतात, 'धाले वेद ज्याची कीर्ती वाखाणती। प्रत्यक्ष ये मूर्ति विठोबाची ॥'

तुकोबाच्या या बाळक्रीडेच्या अभगातील क्रीडेचे, काल्याचे व गोळणीवरील अभग अतिशय बहारीचे आहेत गोपगोपींची अत्युत्कट भक्ती व श्रीकृष्णाचे भक्तवात्सल्य याचे अतिशय मनोहर दर्शन तुकोबाच्या या अभगातून होण्यासारखे आहे या गोपींनी या मुरारीसवे नाना प्रकारच्या क्रीडा केल्या 'त्याच्या पूर्वपुण्या कोण लेखा करी?' असे तुकोबानी विचारले आहे 'खेळविला जिहीं अतर्बाह्य सुखें। मेळवूनि मुखें चुबन दिलें' अशा प्रकारचे सुख फक्त गोपीनाच का मिळाले? तुकोबानीच म्हटले आहे, 'ज्यांचे कृष्णीं तन मन जाले रत। गृह पति सुत विसरल्या' एवढी तन्मयता मनाची वा वृत्तीची झाली की, 'दिलें त्यासी सुख अतरींचे देवें' अशी अवस्था प्राप्त होते 'मने हरिरूपीं गुतल्या वासना। उदास या मुना गोळियाच्या' या चरणाप्रमाणे सर्व लौकिक वासना सपल्या की त्याच्याशी 'खेळे नारायण कवतुकें' हे ओघाने आलेच

काल्याच्या अभगाची अवीट गोडी तर आजही वारकरी भक्तांच्या कीर्तनप्रसगी प्रत्येकाच्या मुखात जागी होते भिवरेच्या तीरावर स्थिरावलेल्या या देवाभोवती फेर धरून अजूनही वारकरी भक्त नाचतात त्या वेळच्या काल्याचा प्रसाद भक्षण करून धन्य होतात

४५०९ मनोरथ जैसे गोकुळींच्या जना। पुरवावी वासना तयापरी ॥ १ ॥
रिण फेडावया अवतार केला। अविनाश आला आकारासी ॥ २ ॥
सीण जाला वसुदेवदेवकीस। वधी बाळें कस दुराचारी ॥ ३ ॥
दुराचारियासी नाहीं भूतदया। आप पर तया पाप पुण्य ॥ ४ ॥
पुण्यकाळ त्याचा राहिलासे उभा। देवकीच्या गर्भा देव आले ॥ ५ ॥
गर्भासी तयाच्या आला नारायण। तुटलें बधन आपेंआप ॥ ६ ॥
आपेंआप बेड्या तुटल्या शृखला। बदाच्या आगळा[1] किलिया कोडें ॥ ७ ॥
कोडमार केला होता बहु दिस। सोडवी निमिष्य नलगता ॥ ८ ॥
न कळे तो त्यासी सांगितला माव। आपणांसी ठाव नदाघरीं ॥ ९ ॥
नदा घरीं जातां येता वसुदेवा। नाहीं जाला गोवा सवें देव ॥ १० ॥
सवें देव तया आड नये काहीं। तुका म्हणे नाहीं भय चिंता ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा – आगळा–अधिक, फार मोठा, गोवा–गुता, अडचण

अर्थ .– देवा, गोकुळातल्या लोकाचे जसे मनोरथ तुम्ही पूर्ण केलेत तसे माझेही करा १ त्याचे जन्मजन्मातरीचे सेवेचे ऋण फेडण्याकरिता निराकार होता तो आकारास आला २ वसुदेव आणि देवकी या उभयताना कसाच्या बदिखान्यात फार दु:ख भोगावे लागले कारण त्याची सहा मुले दुराचारी कसाने मारली. ३ त्या कसाचे आचरण वाईट असल्यामुळे त्याच्या ठिकाणी भूतदया नसून आपलेपरके किंवा पापपुण्य यांचा तो विचार करीत नव्हता ४ वसुदेवदेवकीच्या पूर्वपुण्याचा उदय झाल्यामुळे त्याच्या पोटी देवाने अवतार घेतला ५ नारायण हा देवकीच्या उदरी राहिल्याबरोबर सर्व प्रकारची बधने आपोआप नाहीशी झाली ६ हातातील बेड्या व पायांतील शृखला

1 आगळा विल्येकोड

आपोआप सुटून पडल्या, इतकेच नव्हे तर, दाराची कुलपे, कड्या अर्गळा, खिळे, कोंडे आपोआप गळून पडले ७ त्या पूर्वी कसाने वसुदेवदेवकीला बदिखान्यात कोंडले होते त्याना देवानी सोडविले त्यास एक क्षणदेखील लागला नाही ८ कसाच्या भयापासून बालकाचे कसे रक्षण करावे हे वसुदेवदेवकीस समजले नाही मला गोकुळात नदाच्या घरी नेऊन ठेवावे असे देवानी सांगितले ९ बालकृष्णास घेऊन नद गोकुळात गेला व त्याला तेथे ठेऊन आला जातायेताना वाटेत कोणत्याही प्रकारचा अडथळा आला नाही १० तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या बरोबर देव आहे त्याला कोणत्याही प्रकारचा अडथळा येत नाही ११

४५१० चिंता ते पळाली गोकुळाबाहेरी । प्रवेश भीतरीं केला देवें ॥ १ ॥
देव आला घरा नदाचिया गावा । धन्य त्याच्या दैवा दैव आले ॥ २ ॥
आले अविनाश धरूनि आकार । दैत्याचा सहार करावया ॥ ३ ॥
करावया भक्तजनाचें पालण । आले रामकृष्ण गोकुळासी ॥ ४ ॥
गोकुळीं आनद प्रगटले सुख । निर्भर हे लोक घरोघरीं ॥ ५ ॥
घरोघरीं जाला लक्ष्मीचा वास । दैन्यदारिद्रास[1] त्रास आला ॥ ६ ॥
आला नारायण तयाच्या अतरा । दया क्षमा नरा नारीलोका ॥ ७ ॥
लोका गोकुळींच्या जाले ब्रह्मज्ञान । केलियावाचून जपतपें ॥ ८ ॥
जपतपें काय करावीं साधनें । जव नारायणे कृपा केली ॥ ९ ॥
केली नारायणे आपुलीं अंकित । तोचि त्याचें हित सर्व जाणे ॥ १० ॥
सर्व जाणे एक विष्णु साच खरा । आणीक दुसरा नाहीं नाहीं ॥ ११ ॥
नाहीं भक्तादुजें तिहीं त्रिभुवनीं । एका चक्रपाणीवाचूनिया ॥ १२ ॥
याच्या सुखसगें घेती गर्भवास । तुका म्हणे आस त्यजूनिया ॥ १३ ॥

शब्दार्थ व टीपा – भीतरीं–आत, साच–खरा.

अर्थ – देवाने गोकुळात प्रवेश केल्याबरोबर तेथील लोकाची चिंता गोकुळाच्या बाहेर पळून गेली १ प्रत्यक्ष नदाचे घरी तो आल्यामुळे त्याचे भाग्य धन्य आहे २ अविनाशी देव दुष्टाचा सहार करण्यासाठी आकारास आला ३ आपल्या भक्तजनाचे रक्षण करण्याकरिताच रामकृष्णानी गोकुळात अवतार घेतला ४ गोकुळामध्ये साक्षात सुख प्रगट झाले म्हणून त्या ठिकाणचे लोक आनदी आणि निर्भय झाले ५ घरोघरी लक्ष्मी नादू लागल्यामुळे दैन्य आणि दारिद्र्य त्रासून पळून गेले ६ त्याच्या हृदयामध्ये नारायणाची वस्ती झाल्यामुळे स्त्री–पुरुषाच्या अत करणात दया, क्षमा, शाती इत्यादी दैवीसपत्तीने वास्तव्य केले ७ जे दुर्लभ असे ब्रह्मज्ञान ते गोकुळवासी लोकाना जपतपादी साधनें न करता प्राप्त झाले ८ जोपर्यंत त्या नारायणाने कृपा केली नाही, तोपर्यंत त्या जपतपादी साधनाचा काय उपयोग ? ९ नारायणाने त्या सर्व लोकाना आपले अंकित केले आणि तोच त्याचे हित कशात आहे ते पाहात आहे १० सर्व विश्वामध्ये एक देवच व्यापक आहे त्याच्याशिवाय खरोखर दुसरा कुणी नाही हे भक्तानी जाणले आहे ११ त्या भक्ताना एका चक्रपाणीवाचून त्रिभुवनात कोणाचा आधार वाटत नाही १२ तुकाराम महाराज म्हणतात, म्हणूनच भक्त ससाराची आशा टाकून कृष्णाच्या सगतीचे सुख भोगण्याकरिता पुन पुन जन्म घेतात १३

४५११ याच्या पूर्वपुण्या कोण लेखा करी । जिहीं तो मुरारी खेळविला ॥ १ ॥
खेळविला जिहीं अतर्बाह्यसुखें । मेळवूनि मुखें चुंबन दिले ॥ २ ॥
दिले त्यासी सुख अंतरींचे देवें । जिहीं एका भावें जाणितला ॥ ३ ॥

१ दारिद्र्यास

जाणितला तिहीं कामातुर नारी । कृष्णभोगावरी चित्त ज्याचें ॥ ४ ॥
ज्याचें कृष्णी तन मन जालें रत । गृह पति सुत विसरल्या ॥ ५ ॥
विष तया जालें धन मान जन । वसविती वन एकांतीं त्या ॥ ६ ॥
एकांतीं त्या जाती हरीसी घेउनि । भोगइच्छाधणी फेडावया ॥ ७ ॥
ज्याच्या सपना तैसा त्याकारणें । अंतरींचा देणें इच्छाभोग ॥ ८ ॥
भोग त्याग नाहीं दोन्ही जयापासीं । तुका म्हणे जैसी स्फटिकशिळा ॥ ९ ॥

शब्दार्थ व टीपा – लेखा–मर्यादा गणना, जिहीं–ज्यांनी, धणी–तृप्ती

अर्थ – जी मंडळी देवास घेऊन रात्रंदिवस खेळवितात, त्या लोकांच्या पुण्याची गणना कोण करू शकेल ? १ ज्यांनी अंतर्बाह्य सुखाने देवास खेळविले व त्याच्या मुखास मुख लाऊन चुंबन घेतले २ ज्यांनी एकभावाने देवास जाणले आहे त्यांना देवाने आत्मसुख दिले आहे ३ ज्या कामातुर नारींचे चित्त कृष्णाच्या भोगावरच जडले होते, त्यांना देवाने एकांतातील भोगसुख दिले ४ ज्या गौळणी काया–वाचा–मने कृष्णचरणी रत झाल्या, ज्यांना कृष्ण सुखापुढे घर, पती, मुलगा यांचा विसर पडला, त्यांना देवाने भक्तिसुख दिले ५ त्यांना धन, मान आणि लोक विषासारखे झाले ज्या हरीला वनात, एकांतात नेत होत्या, त्यांना देवाने वैराग्यसुख दिले ६ त्या गौळणी हरीला भक्तिसुखाची इच्छा करून एकांतात घेऊन जात ७ आणि जिचा जसा भाव असेल त्याप्रमाणे देवही तिची इच्छा पूर्ण करीत होता ८ तुकाराम महाराज म्हणतात, देव हा भोग व त्याग याविरहीत आहे, पण जशी स्फटिकाची शिळा कोणत्याही रंगाशी एकरूप होत नाही त्याप्रमाणे देवही दोन्हींपासून अलिप्त आहे ९

४५१२ शिळा स्फटिकाची न पालटे भेदें । दाउनिया छंदें जैसी तैसी ॥ १ ॥
जैसा केला तैसा होय क्षणक्षणा । फेडावी वासना भक्तिभावें ॥ २ ॥
फेडावया आला अवघियांची धणी । गोपाळ गौळणी मायबापा ॥ ३ ॥
मायबापा सोडविलें बंदीहुनि । चाणूर मर्दुनी कंसादिक ॥ ४ ॥
दिक नाहीं देणें अरिमित्रा एक । पूतना कटक मुक्त केली ॥ ५ ॥
मुक्त केला मामा कंस महादोषी । बाळहत्या राशी पातकाच्या ॥ ६ ॥
पाप कोठें राहे हरी आठविता । भक्ती द्वेषें चिंता जैसा तैसा ॥ ७ ॥
साक्षी तयापाशीं पूर्वीलकर्माच्या । बांधला सेवेच्या ऋणें देव ॥ ८ ॥
देव भोळा धांवे भक्तां पाठोवाठीं । उच्चारितां कंठीं मागेंमागें ॥ ९ ॥
मानाचा कंटाळा तुका म्हणे त्यासी । धांवे तो घरासी भाविकाच्या ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – धणी–धनी, मालक

अर्थ – स्फटिकाची शिळा ज्याप्रमाणे सर्व रंगाप्रमाणे दिसूनही अलिप्त असते, त्याप्रमाणे देव सर्व कर्मे करून अलिप्त आहे १ भक्तांनी ज्याप्रमाणे भाव धरावा त्याप्रमाणे तो होतो व त्यांची वासना पूर्ण करितो २ गौळणी व आईबाप या सर्वांची इच्छा पूर्ण करण्याकरिता देव आकाराला आला होता ३ त्याने कंस–चाणूरादी दुष्टांचा नाश करून आपले आईबाप बंधनातून सोडविले ४ दुष्टांचा नाश करून त्यांना मुक्त केले कारण, शत्रू असो वा मित्र असो, दोघानाही तो मोक्षाप्रत नेतो ही प्रचीती पूतनेचा वध करून त्याने प्रत्यक्ष दाखविली ५ प्रत्यक्ष बाळहत्येच्या पापाच्या राशी झाल्या असूनसुद्धा तो कंसमामा मुक्त केला ६ भक्तीने अथवा द्वेषाने हरीचा आठव केला असता पाप कोठे राहील ? ७ त्यांच्या पूर्वकर्माचा साक्षी देवच असल्यामुळे तो त्यांना पूर्वकर्मानुसार फळे देतो म्हणूनच भक्तांच्या सेवारूपी ऋणाने बांधलेला असल्यामुळे त्यांच्याजवळ राहातो ८ भक्तांनी आपल्या कंठामध्ये नाम धारण केले असता त्यांच्या मागेपुढे देव धावतो असा तो भोळा आहे ९ तुकाराम महाराज म्हणतात, त्या देवाला मानाची गरज नाही, ज्यांच्या ठिकाणी भाव आहे त्यांचे घरात तो धावत जातो १०

४५१३ चारी वेद ज्याची कीर्ती वाखाणिती । बांधवी तो हातीं गौळणीच्या ॥ १ ॥
गौळणिया गळा बांधिती धारणीं । पायां चक्रपाणी लागे तया ॥ २ ॥
तयाघरीं रिघे चोरावया लोणी । रितें पाळतूनि शिरे माजी ॥ ३ ॥
माजी शिरोनियां नवनीत खाये । कवड तें आहे जैसें तैसें ॥ ४ ॥
जैसा तैसा आहे अंतर्बाह्याकारीं । म्हणउनि चोरी नसंपडे ॥ ५ ॥
नसंपडे तयां करितां खटपट । वाउगे बोभाट वर्माविण ॥ ६ ॥
वर्म जाणती त्या एकल्या एकटा । बैसतील वाटा निरोधूनि ॥ ७ ॥
निवांत राहिल्या निःसंग होऊनि । निश्चळ ज्या ध्यानीं कृष्णध्यान ॥ ८ ॥
न ये क्षणभरी योगियांचे ध्यानीं । धरिती गौळणी भाविका त्या ॥ ९ ॥
भाविका तयांसी येतो काकुलती । शाहाण्या मरती नसंपडे ॥ १० ॥
नलगे वेचावी टोली[1] धनानांवें । तुका म्हणे भावें चाड एका ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा :– रिघे–प्रवेश केला, टोली–कवडी

अर्थ :– चार वेद ज्याची कीर्ती गातात तो आपणांस गौळणींच्या हाताने बांधून घेतो. १ ज्याचा गळा गौळणी घुसळखांबाला बांधतात, त्या वेळी तो चक्रपाणी त्यांच्या पाया पडतो. २ त्यांच्या घरी लोणी चोरण्याकरिता श्रीहरी प्रवेश करतो व पाळत ठेवून तो घरात शिरतो. ३ आणि आत शिरून तो लोणी खातो व दारे जशीच्या-तशीच ठेवितो. ४ प्रत्येकाच्या हृदयात व बाहेर श्रीहरी जसाच्या तसा व्यापक असल्यामुळे चोरी सापडत नाही. ५ त्यांनी कितीही खटपट केली तरी त्यांना हरी हस्तगत होण्याचे मर्म न कळल्यामुळे त्यांचे प्रयत्न व्यर्थ होतात. ६ ज्या कोणी मर्म जाणत आहेत त्या एकट्या वाट रोखून बसतात. ७ व त्या कृष्णध्यानाच्या योगाने निःसंग होऊन निश्चळ अशा निवांत राहतात. ८ क्षणभर देखील जो परमात्मा योगियांच्या ध्यानात येत नाही त्याला भावीक गवळणी धरितात. ९ त्यावेळी त्यांच्या हातून सुटण्याकरिता प्रभू त्यांना काकुळतीला आणतो, आणि शाहण्यांना यत्न करून जीव गेला तरी सापडत नाही. १० तुकाराम महाराज म्हणतात, हरी प्राप्त करून घेण्यास एका कवडीचा खर्च करावा लागत नाही. तेथे फक्त भावाचीच गरज आहे. ११

४५१४ चाड अनन्याची धरी नारायण । आपणासमान करी रंका ॥ १ ॥
रंक होती राजे यमाचिये घरीं । आचरणें बरीं नाहीं म्हूण ॥ २ ॥
नसंपडे इंद्रचंद्रब्रह्मादिकां । अभिमानें एका तिळमात्रें ॥ ३ ॥
तिळमात्र जरी होय अभिमान । मेरु तो समान भार देवा ॥ ४ ॥
भार पृथिवीचा वाहिला सकळ । जड होती खळ दुष्ट लोक ॥ ५ ॥
दुष्ट अभक्त जे निष्ठुर मानसीं । केली हे तयांसी यमपुरी ॥ ६ ॥
यमदूत त्यांसी करिती यातना । नाहीं नारायणा भजिजेलें[2] ॥ ७ ॥
जे नाहीं भजले एका भावें हरी । तयां दंड करी यमधर्म ॥ ८ ॥
यमधर्म म्हणे तयां दोषियांसी । कां रे केशवासी चुकलेती ॥ ९ ॥
चुकलेती कथा पुराणश्रवण । होते तुम्हां कान डोळे मुख ॥ १० ॥
कान डोळे मुख संतांची संगति । न धराच चित्तीं सांगितलें ॥ ११ ॥

१ टोली, २ भजले जे

सांगितले संतीं तुम्हा उगवूनि । गर्भासी येऊनि यमदंड ॥ १२ ॥
दडू आम्हीं रागें म्हणे यमधर्म । देवा होय श्रम दुर्जनाचा ॥ १३ ॥
दुर्जनाचा येणें करूनि सहार । पूर्णअवतार रामकृष्ण ॥ १४ ॥
रामकृष्णनामें रंगले जे नर । तुका म्हणे घर वैकुठीं त्या ॥ १५ ॥

शब्दार्थ व टीपा – चाड–इच्छा, म्हूण–म्हणून

अर्थ – नारायण हा अनन्य भक्ताविषयी इच्छा धरतो व तो रंक जरी असला तरी त्यास आपली पदवी देतो १ राजे त्याचे आचरण शुद्ध नसल्यामुळे यमाच्या घरी रंक होतात २ इंद्र चंद्र, ब्रह्मादिकांनाही तिळमात्र अभिमान असल्यास तो सापडत नाही ३ तिळायेवढा जरी अभिमान झाल्यास त्याचे ओझे देवास मेरुपर्वताएवढे होते ४ देव पृथ्वीचा आणि इतर भूतमात्राचा भार सहन करील, तथापी जे लोक दुष्ट, खळ आहेत त्यांचा भार देवास जड होतो ५ जे कोणी दुष्ट व भक्तिहीन असून निर्दय आहेत त्यांच्याकरिता देवाने यमलोक केला आहे ६ मनुष्य जन्माला येऊन ज्यानी नारायणाचे भजन केले नाही त्याना यमदूत फार दु:ख देतात ७ ज्यांनी श्रद्धा–भक्ती प्रेमाने हरीचे भजन केले नाही त्याना यमधर्म शिक्षा करितो ८ अशा पाप्याना यमधर्म म्हणतो, अरे तुम्ही केशवाचे भजन का केले नाही ? ९ व कथा, पुराण श्रवण का केले नाही ? तुम्हास कान, डोळे मुख दिले नव्हते काय ? १० हे सर्व असूनही संताची संगती केली नाही व त्यानी सांगितलेला उपदेशही मनात ठेविला नाही ११ जर तुम्ही जन्माला येऊन हरिभजन केले नाही तर तुम्हाला गर्भवासाचे एक दु:ख व यमदंड अशी दोन्ही दु:खे भोगावी लागतील असे संतानी तुम्हाला बजावून सांगितले होते ना ? १२ परंतु तुम्ही ते मवाप होऊन ऐकले नाही आता आम्ही तुम्हाला अवश्य शिक्षा करू, असे यमधर्म त्या प्राण्याना म्हणू लागतो देवालाही पण दुर्जनांचा भार सहन होत नाही १३ भगवतानी रामकृष्ण हा पूर्ण अवतार घेऊन दुर्जनाचा संहार केला १४ तुकाराम महाराज म्हणतात त्या रामकृष्णनामाच्या चिंतनाने जे लोक रंगले आहेत त्यांना वैकुंठात स्थान मिळते १५

४५१५ वैकुंठींच्या लोका दुर्लभ हरिजन । तया नारायण समागमें ॥ १ ॥
समागम त्याचा धरिला अनंतें । जिहीं चित्तवित्त समर्पिलें ॥ २ ॥
समर्थे तों गाती हरीचे पवाडे । येर ते बापुडे रावराणे ॥ ३ ॥
रामकृष्णें केले कौतुक[1] गोकुळीं । गोपाळांचे मेळीं गाई चारी ॥ ४ ॥
गाई चारी मोहोरी पावा वाहे पाठीं । धन्य जाळी काठी कांवळी ते ॥ ५ ॥
काय गौळियांच्या होत्या पुण्यरासी । आणीक त्या म्हैसी गाई पशु ॥ ६ ॥
सुख तें अमुप लुटिले सकळीं । गोपिका गोपाळीं धणीवरि ॥ ७ ॥
धणीवरि त्यासी सांगितली मात । जयाचें जें आर्त तयापरी ॥ ८ ॥
परि याचे तुम्ही आइका नवल । दुर्गम जो खोल साधनासि ॥ ९ ॥
शिंक लावूनिया घालितो बाहेरी । पाहातो भीतरी सर्वेचि तो ॥ १० ॥
तोंडाकडे त्याच्या पाहे कवतुकें । शिव्या देतां सुखें हासतसे ॥ ११ ॥
हासतसे शिव्या देतां त्या गौळणी । मरतां जपध्यानीं न बोले तो ॥ १२ ॥
तो जेंजें करिल तें दिसे उत्तम । तुका म्हणे वर्म दावीं सोपें ॥ १३ ॥

शब्दार्थ व टीपा – वर्म–मर्म, मोहोरी–वणू, बाहेरी धणीवरि–तृप्ती होईपर्यंत आर्त–तीव्र इच्छा

1 चरित्र

अर्थ :– वैकुंठातील लोकाना हरिभक्ताची प्राप्ती दुर्लभ आहे कारण त्याच्याबरोबर निरंतर नारायण असतो. १ ज्या भक्तानी अनंताला, श्रीहरीला चित्त व वित्त अर्पण केले आहे, त्याची सगती तो करीत असतो. २ जे कुणी हरीची कीर्ती वर्णन करितात ते समर्थ आहेत बाकीचे श्रेष्ठ राजे जरी असले तरी ते दीन आहेत. ३ बलराम आणि श्रीकृष्ण यानी गोकुळात गोपाळाच्या मेळ्यात गाई चारण्याचे कौतुक केले ४ गाई चारते वेळी वेणू व मुरली त्याने पाठीवर घेतली त्याच्या हातातील काठी व अगावरील कांबळी त्याच्या अंगस्पर्शाने धन्य झाली. ५ त्या गोप–गौळणींनी व गाई, म्हशी व इतर पशूंनी कोणत्या पुण्याच्या राशी केल्या होत्या काही कळत नाही. ६ कारण त्या गौळणी व गोपाळांनी अमितसुखाचा भोग तृप्त होईपर्यंत घेतला ७ ज्याच्या मनात जे मागण्याची इच्छा होती ते ते त्यानी तृप्त मनाने देवाला सांगितले. ८ परंतु त्या देवाचे एक नवल ऐकावे की, तो इतर साधनांना दुर्लभ आहे ९ त्या देवास शिक्षा करून गौळणींनी जरी घराच्या बाहेर घालविला तरी तो, परतून पाहिले असता त्याच ठिकाणी राहतो १० त्यास गौळणींने जरी शिव्या दिल्या तरी तो तिच्या तोंडाकडे कौतुकाने पाहून हसतो. ११ अनेक जपतपादी साधने करून जरी कोणी मेले तरी तो देव त्यांच्याबरोबर भाषण देखील करीत नाही; पण तोच देव गौळणींच्या शिव्या ऐकून हसतो १२ तुकाराम महाराज म्हणतात, भगवान जे जे करतो ते ते उत्तमच दिसते असे सोपे वर्म त्याने दाखविले आहे. १३

४५१६ दावी वर्म सोपें भाविका गोपाळां । वाहे त्यांच्या गळां पाले माळा ॥ १ ॥
मान देती आधीं मागतील डाव । देवा ते गौरव माने सुख ॥ २ ॥
मानती ते मंत्र हमामा हुबरी । सितोडिती वरि स्नान तेणें ॥ ३ ॥
वस्त्रें घोंगडिया घालुनियां तळीं । वरी वनमाळी बैसविती ॥ ४ ॥
तिहीं लोकांसी जो दुर्लभ चिंतना । तो धांवे गोधना वळतियां ॥ ५ ॥
यांच्या वचनाचीं पुष्पें वाहे शिरीं । नैवेद्य त्यांकरीं कवळ मागे ॥ ६ ॥
त्यांचिये मुखींचें हिरोनियां घ्यावें । उच्छिष्ट तें खावें धणीवरी ॥ ७ ॥
धरी माथां गुंफे मोरपिसावेटी । नाचे टाळी पिटी त्यांच्या छंदें ॥ ८ ॥
छंदें नाचतील जयासवें हरी । देहभाव वरी विसरलीं ॥ ९ ॥
विसरली वरी देहाची भावना । तेचि नारायणा सर्वपूजा ॥ १० ॥
पूजा भाविकाची न कळता घ्यावी । न मागतां दावी निज ठाव ॥ ११ ॥
ठाव पावावया[1] हिंडे मागें मागें । तुका म्हणे संगें भक्ताचिया ॥ १२ ॥

शब्दार्थ व टीपा : –कवळ–घास, धणीवरी–तृप्ती होईपर्यंत

अर्थ – देवाने आपल्या प्राप्तीचे सोपे वर्म भाविक गोपाळाला दाखविले, ते असे की, गोपाळांनी झाड-पाल्याच्या माळा गळ्यामध्ये घालून त्याची पूजा करावी १ आणि गोपाळकृष्णास आधी आमचा डाव दे, हाच मान मुख आहे असे म्हणतात त्या बोलाने देव सुख मानतो २ हमामा, हुबरी गोपाळ घालीत तेव्हा त्याच्या थुका देवाच्या अंगावर उडत, परंतु देवाला ते मंत्रयुक्त स्नान घातले आहे असे वाटे ३ घोंगड्याच्या व वस्त्राच्या घड्या एकावर एक घालून त्या आसनावर कृष्णाला बसवितात ४ त्रैलोक्यातील कोणालाही त्याची प्राप्ती होणे दुर्लभ आहे. तो देव गाई वळणाऱ्या गोपाळाच्या मागे जातो. ५ गोपाळ जे काही वेडेवाकडे बोलतील ते मंत्रपुष्प मानून त्याना म्हणतो की तुमच्या हातातील घास मला द्या, म्हणजे मी नैवेद्य अर्पण केला असे समजेन ६ गोपाळ जर स्वसंतोषाने अन्नाचा घास देत नसतील तर त्याच्या तोंडातील अन्न हिसकून घेऊन त्या उच्छिष्टानी त्याची तृप्ती होत असे ७ मोरपिसे व फुले गुंफून त्याला वेटोळे देऊन त्याचा मुगुट करून ते कृष्णाच्या मस्तकी घालितात, मग तो त्याच्या छंदाने टाळी वाजवून नृत्य करितो ८ प्रत्यक्ष देव त्याच्या बरोबर छदाने नाचतो आणि त्यामुळे ते

[1] पाहावया

आपला देहभाव विसरून जातात ९ जे कोणी देहभाव विसरून नामछंदाने नाचतात त्याची षोडशोपचारे पूजा नारायणास अर्पण होते १० विधियुक्त पूजा न जाणताही निरभिमान भाविकाची स्वैर वागणूक ही पूजाच समजून देव त्याचा स्वीकार करतो, आणि भक्तानी काही मागितले नाही तरीसुद्धा आपल्या निजपदाची प्राप्ती देव त्याना करून देतो ११ तुकाराम महाराज म्हणतात, भक्ताना निजस्वरूपाची प्राप्ती व्हावी म्हणून तो भक्तांच्या संगतीने त्यांच्या मागे मागे फिरत राहतो १२

४५१७ भक्तजना दिले निजसुख देवे । गोपिका त्या भावे आळंगिल्या ॥ १ ॥
आळंगिल्या गोपी गुणवंता नारी । त्याच्या जन्मांतरीं हरि ऋणी ॥ २ ॥
इसलिया त्याचें करी समाधान । करविता आण[1] क्रिया करी ॥ ३ ॥
क्रिया करी तुम्हां न वजे पासुनि । अवधियाजणी गोपिकासी ॥ ४ ॥
गोपिकासी म्हणे वैकुंठींचा पति । तुम्हीं माझ्या चित्तीं सर्वभावें ॥ ५ ॥
भाव जैसा माझ्याठायीं तुम्ही धरा । तैसाचि मी खरा तुम्हांलागीं ॥ ६ ॥
तुम्हा कळो द्या हा माझा तुमचा भाव । तुमचाचि जीव तुम्हा ग्वाही ॥ ७ ॥
ग्वाही तुम्हा आम्हां असे नारायण । आपलीच आण वाहातसे ॥ ८ ॥
सत्य बोले देव भक्तिभाव जैसा । अनुभवे रसा आणूनिया ॥ ९ ॥
यासी बुझावितो वेगळाल्या भावें । एकीचे हे ठावें नाही एकी ॥ १० ॥
एकी क्रिया नाहीं आवधियांचा भाव । पृथक हा देव घेतो तैसे ॥ ११ ॥
तैसे कळो नेदी जो मी कोठें नाहीं । अवघियांचे ठायीं जैसा तैसा ॥ १२ ॥
जैसा मनोरथ ज्यें चित्तीं काम । तैसा मेघश्याम पुरवितो ॥ १३ ॥
पुरविले मनोरथ गोपिकांचे । आणीक लोकांचे गोकुळींच्या ॥ १४ ॥
गोकुळींच्या लोकां लावियेला छंद । वैसला गोविंद त्यांचे चित्तीं ॥ १५ ॥
चित्तें ही चोरूनि घेतलीं सकळां । आवडी गोपाळावरी तया ॥ १६ ॥
आवडे तयासी वैकुंठनायक । गेलीं सकळिक विसरोनि ॥ १७ ॥
निंदा स्तुती कोणी न करी कोणाची । नाहीं या देहाची शुद्धि कोणा ॥ १८ ॥
कोणासी नाठवे कन्या पुत्र माया । देव म्हणुनि तया चुंबन देती ॥ १९ ॥
देती या टाकून भ्रतारासी घरीं । लाज ते अंतरीं आथीच ना ॥ २० ॥
नाहीं कोणा धाक कोणासी कोणाचा । तुका म्हणे वाचा काया मनें ॥ २१ ॥

शब्दार्थ व टीपा – बुझावितो–समजावितो

अर्थ – भक्तजनांना देवाने आत्मसुख दिले आणि गोपिकाना प्रेमाने आलिंगन दिले १ त्या गोपिका रूपगुणसंपन्न होत्या, आणि त्यानी अनेक जन्मात केलेल्या निष्काम भक्तियोगाने हरी त्यांचा ऋणी झाला होता, म्हणून हरीने त्यांना आलिंगन दिले २ इसलेल्या गोपींचे तो समाधान करीत होता वस्तुत कर्ता, करविता प्रत्यक्ष हरीच आहे ३ सर्व गोपिकापुढे तो निश्चयाने सांगत आहे की, मी आता तुमच्या पासून कधीच दूर जाणार नाही ४ एकदा वैकुंठाधिपती भगवान गोपिकाना म्हणाला–गोपिकानो, सर्व प्रकाराने तुम्ही माझ्या चित्तात आहात ५ तुम्ही जसा भाव ठेवाल तसाच मीही तुमच्याशी खरोखर वागेन ६ आपला देवाच्या ठिकाणी भाव खरा आहे किंवा नाही, हे तुम्हीच जाणून घ्या, कारण, तुमचे चित्तच तुम्हाला साक्षी आहे ७ तुमचा भाव माझ्या ठिकाणी व माझा भाव तुमच्या ठिकाणी शुद्ध आहे किंवा नाही याविषयी 'नारायण' साक्षी आहे याप्रमाणे देवाने आपणच सां

[1] आपण

दिले ८ ज्याचा जसा भाव असेल, त्याप्रमाणे त्याला त्या सत्त्वाचा अनुभव आणून देऊन देव त्याला बोलत असतो ९ त्या गोकुळात भिन्न अधिकाराच्या गोपिका होत्या त्याप्रमाणे देव त्याची समजूत पटवीत होता परतु एकाला पटविलेली समजूत दुसरीला तो कळू देत नव्हता १० कारण सव गोपिकाचे आचरण व भाव एक नव्हता, त्यामुळे देव देखील त्याची वेगवेगळ्या प्रकारे समजूत पटवीत होता ११ आपण कोठे नाही असे नाही अणुरेणूत आपली व्याप्ती आहे, हे आपले पारमार्थिक स्वरूप मात्र तो कोणालाही कळू देत नव्हता १२ जिचा जसा मनोरथ व भोगवासना होती, तशी त्या मेघश्यामाने पुरविली १३ जसे गोपिकाचे मनोरथ पुरविले तसे गोकुळातील इतर लोकांचेही पुरविले १४ गोकुळातील लोकाना गोविंदाने आपला छद लावला, आणि तो त्याच्या चित्तात जडून बसला १५ गोपाळाने सर्वांचे चित्त चोरून आपल्याकडे आकृष्ट करून घेतले म्हणून त्या सर्वांची गोपाळावर आवड स्थिर झाली १६ त्यांना केवळ वैकुठनायकच आवडत होता त्या आवडीपुढे ते सर्व विषयाना सपूर्ण विसरून गेले होते १७ गोकुळात कोणीही कोणाची निंदा करीत नव्हते, कारण कोणालाही स्वत त्या देहाचे भान राहात नव्हते मग दुसऱ्याची निंदा कशी समजेल ? १८ गोकुळातील कोणाही गोपिकाना ही आपली मुलगी, ही आई, असे भान राहात नव्हते 'देव' समजून सर्वांचे चुंबन घेत होत्या १९ नवऱ्याला घरी टाकून देवाकडे जात होत्या त्याच्या मनात मुळीच लाज नव्हती २० तुकाराम महाराज म्हणतात, गोकुळातील लोक कायावाचामनेंकरून हरिरूप झाल्यामुळे कोणालाही कोणाचे भय वाटत नव्हते २१

४५१८ मनें हरिरूपीं गुतल्या वासना । उदास या सुना गौळियाच्या ॥ १ ॥
याच्या भ्रताराचो धरूनिया रूपें । त्याच्या घरीं त्यापें भोग करी ॥ २ ॥
करी कवतुक त्यांचे तयापरी । एका दिसे हरि एका लेक ॥ ३ ॥
एक भाव नाहीं सकळाच्या चित्तीं । म्हणऊनि प्रीति तैसें रूप ॥ ४ ॥
रूप याचे आहे अवघेंचि एक । परि कवतुक दाखविलें ॥ ५ ॥
लेकरू न कळे स्थूल कीं लहान । खेळे नारायण कवतुकें ॥ ६ ॥
कवतुक केले सोंग बहुरूप । तुका म्हणे बाप जगाचा हा ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – उदास–निराश त्यापें–त्याच्याशी

*अर्थ* – *गोकुळातील गवळ्याच्या सुना मनाने हरीच्या रूपाचे ठिकाणी आसक्त झाल्या होत्या, आणि* स्वत त्या ससाराविषयी निराश झाल्या होत्या १ भगवान त्याच्या नवऱ्याची रूपे धारण करून त्याच्या घरी त्याच्याशी भोग घेत होता २ ज्याच्याशी जशी क्रीडा त्याला करावीशी वाटेल तशी तो करीत होता प्रत्येक गौळणीला एकच हरी अनेक रूपानी कुणाला मुलगा, कुणाला पती कुणाला देव असा दिसत होता ३ कारण, सर्वांच्या चित्तात एकभाव नव्हता, म्हणून देवदेखील प्रेमाने तशी रूपें धारण करीत होता ४ वस्तुत देवाचे एकच सच्चिदानंद रूप आहे, परतु त्याने अनेक रूपाचे कौतुक दाखविले ५ हा नारायण लहान लेकरू आहे की मोठा मनुष्य आहे ? हे कुणालाच कळत नव्हते अशा प्रकारे तो कौतुकाने खेळत होता ६ तुकाराम महाराज म्हणतात, *हा नारायण जगाचा बाप असून पुष्कळ सोंगे घेऊन कौतुकाने खेळत होता* ७

४५१९ जगाचा हा बाप दाखविले माये । माती खाता जाये मारावया ॥ १ ॥
मारावया तिणे उगारिली काठी । भुवनें त्या पोटीं चौदा देखे ॥ २ ॥
देखे भयानक झाकियेले डोळे । मागुता तो खेळे तियेपुढें ॥ ३ ॥
पुढें रिघोनिया घाली गळा कव । कळों नेदी भाव मायावता ॥ ४ ॥
मायावत विश्वरूप[1] काय जाणे । माझें माझें म्हणे बाळ देवा ॥ ५ ॥

[1] हरिरूप

बाळपणीं रीठा रगडिला दाढे । मारियेले गाढे कागबग ॥ ६ ॥
गळा बांधकनि उखळासी दावे । उन्मळी त्या भावे विमळार्जुन ॥ ७ ॥
न कळे जुनाट जगाचा जीवन । घातले मोहन गौळियासी ॥ ८ ॥
सिकीं उतरूनि खाय नवनीत । न कळे बहुत होय तरी ॥ ९ ॥
तरीं दुधें डेरे भरले राजण । खाय ते भरून दावी दुणी ॥ १० ॥
दुणी जाले त्याचा मानिती सतोष । दुमत्याची आस धरूनिया ॥ ११ ॥
आशाबद्धा देव असोनि जवळी । नेणती ते काळीं स्वार्थामुळें ॥ १२ ॥
मुळें याच देव न कळे तयासी । चित्त आशापाशीं गोंवियेले ॥ १३ ॥
लेकरू आमचे म्हणे दसवती । नदाचिये चित्तीं तोचि भाव ॥ १४ ॥
भाव जाणावया[1] चरित्र दाखवी । घुसळिता रवी डेरियात ॥ १५ ॥
डेरियात लोणी खादलें रिघोनि । पाहे तो जननी[2] हातीं लागे ॥ १६ ॥
हातीं धरूनिया काढिला बाहेरी । देखोनिया करी चोज त्यासी ॥ १७ ॥
सिकवी विचार नेणे त्याची गती । होता कोणे रीती डेरियात ॥१८ ॥
यासी पुत्रलोभें न कळे हा भाव । कळो नेदी माव देव त्यासी ॥ १९ ॥
त्यासी मायामोहजाळ घाली फास । देव आपणास कळो नेदी ॥ २० ॥
नेदी भाव राहो लोभिकाचे चित्तीं । जाणताचि होती अधळीं तीं ॥ २१ ॥
अधळीं तीं तुका म्हणे सवसारी । जिहीं नाहीं हरि ओळखिला ॥ २२ ॥

शब्दार्थ व टीपा – कव–मिठी, माव–माया, गाढें–माठे, चोज–नवल, कौतुक

अर्थ – आपण जगाचे बाप कसे आहोत ते एका प्रसंगी श्रीकृष्णाने यशोदेला दाखविले एकदा श्रीकृष्णाने मुद्दाम माती खाल्ली ते पाहून यशोदा त्याला मारण्याकरिता धावली १ यशोदेनें मारण्याकरिता काठी उगारली, तेव्हा माती खाल्ली नाही याची खात्री पटविण्याकरिता देवाने तोंड उघडले, तोच त्याच्या पोटात चौदा भुवने असलेली तिला दिसली २ ते कृष्णाचे भयानक रूप पाहून यशोदेने चटकन डोळे मिटले पुन डोळे उघडून पाहिले तर कृष्ण तिच्यापुढें लहान होऊन खेळत होता ३ यशोदेनें पुढे होऊन एकदम कृष्णाच्या गळ्याला मिठी मारली ज लोक देहादिकाशी तादात्म्य ठेवतात, त्याना तो श्रीकृष्ण आपली माया कळू देत नाही ४ जे मिथ्या पदार्थाशी एकरूप होतात, ते हरीचे पारमार्थिक रूप कसे जाणू शकतील ? यशोदा तर मोहाने 'माझे बाळ', 'माझे बाळ म्हणत होती ५ कृष्णान तर लहानपणीच रिठासुराला दाढेत धरून रगडलें आणि कागासुर, बकासुर याचाही नाश केला ६ एके दिवशी यशोदेने कृष्णाच्या गळ्याला दावे बांधून ते उखळाला बांधून ठेविले, तेव्हा विमळार्जुनाचा उद्धार करावा या हेतूनें देवानें दोन झाडाच्या फटीत उखळ नेऊन त्याना उपटून टाकले ७ हा कृष्ण अनादी आणि जगाचे जीवन आहे हे कोणालाही कळत नव्हते कारण, श्रीकृष्णाने त्या सर्व गवळ्यावर योगमायेचे आवरण घातले होते ८ घरातील शिंकी उतरून तो लोणी खात होता परंतु ते लोणी पूर्वीपेक्षाही दुप्पट होत असे हे पाहूनसुद्धा हा कृष्ण ईश्वर आहे असे कोणालाही समजत नव्हते ९ श्रीकृष्ण जेवढे खात होता त्यापेक्षा दुप्पट दह्याने, दुधाने व लोण्याने भरलेले राजण डेरे दाखवीत होता १० घरात दही, दूध वाढलेले पाहून गोपाळ आनद मानीत होते, व गाई म्हशींचे दुमते असेच वाढावे, अशी आशा मनात धरीत होते ११ देव जवळ असूनही स्वार्थामुळे आशाबद्धाना देवाचे ज्ञान होत नाही १२ दही, दूध वाढण्याला मुख्य कारण देव आहे हे त्याना कळत नव्हते त्याचे चित्त स्वार्थाने बद्ध झाले होते १३ यशोदा तर 'कृष्ण माझे लेकरू आहे' असे म्हणत होती, आणि नदाची पण तीच भावना होती १४ आपल्या खऱ्या स्वरूपाच्या ठिकाणी पुत्र–मित्रादी वेगवेगळे भाव

१ दावावया, गौळणी

दाखविण्याकरिताच तो त-हेत-हेच्या लीला करून दाखवीत होता एकदा यशोदा डे-यात दही घालून घुसळीत लोणी काढीत असता १५ डे-यात शिरून त्याने त्यातील लोणी खाल्ले, तोच तिच्या हाताला तो लागला १६ हाताला धरून तिने त्याला बाहेर काढले कृष्णाला पाहून तो फारच कौतुक करू लागली १७ यशोदा केव्हा केव्हा कृष्णाला मांडीवर घेऊन चांगले विचार शिकवीत असे परंतु एवढा मोठा श्रीकृष्ण डे-यात कसा मावला ? ही श्रीकृष्णाची अघटित लीला तिला त्यावेळी समजत नव्हती १८ पुत्रप्रेमामुळे यशोदेला कृष्णाचे वास्तव स्वरूप कळत नव्हते याचे कारण देवच आपल्या योगमायेने तिला मोहित करून आपले स्वरूप कळू देत नव्हता १९ देवाने त्यांना मायामोहफासात अडकविले होते, म्हणून देव त्याना आपले स्वरूप कळू देत नव्हता २० देव लोभी माणसाच्या चित्तात श्रद्धा, भक्ती, प्रेम राहू देत नाही, म्हणून ते शाहाणे असूनही परमार्थात मूर्ख, अधळे असतात २१ तुकाराम महाराज म्हणतात ज्यानी जन्माला येऊन हरीला जाणले नाही ते लोक अधळेच असतात २२

४५२० ओळखी तयासी[1] होय एका भावे । दुसरिया देवे न पविजे ॥ १ ॥
न पविजे कदा उन्मत्त जालिया । डबु[2] तोचि वाया नागवण ॥ २ ॥
वनवास देवाकारणे एकात । करावीं हीं व्रततपें याग ॥ ३ ॥
व्रत याग यासी फळलीं[3] बहुतें । होतीं या संचितें गौळियाचीं ॥ ४ ॥
यासी देवे तारियेले न कळता । मागील अनता ठावे होतें ॥ ५ ॥
होतें तें द्यावया आला नारायण । मायबापा रीण गौळियाचे ॥ ६ ॥
गौळियाचे सुख दुर्लभ आणिका । नाहीं ब्रह्मादिका तुका म्हणे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – डबु–दभ, अभिमान नागवण–फसवणूक, लुबाडणे

अर्थ – एका भक्तिभावानेच देवाची ओळख होते अन्य साधनानी देवाची ओळख होत नाही १ उन्मत्त होऊन अहकाराच्या योगाने जीवनाची उधळण होणार आहे, मग देवाची प्राप्ती कशी होईल ? २ एका देवाकरिता यज्ञ, याग, व्रते, तपे एकाती करून काही लोक वनवासी होऊन राहातात ३ त्या गवळी लोकाना पूर्वजन्मी व्रते, यज्ञ, याग वगैरे साधने पुष्कळ घडली असल्यामुळे ते पूवपुण्य या जन्मी सफळ झाले ४ गवळ्याचे पूर्वसचितकर्म देवास माहीत असल्यामुळे त्याने त्याना तारले ५ गवळी लोकाचे व आईबापाचे सेवाऋण देवावर होते ते फेडावयाकरिता देव गोकुळात आला ६ तुकाराम महाराज म्हणतात जे सुख गवळी लोकाना प्राप्त झाले ते इतर लोकाना दुर्लभ आहे व ते ब्रह्मादिकासही प्राप्त होत नाही ७

४५२१ नेणतियांसाठीं नेणता लहान । थिकोनि भोजन मागे माये ॥ १ ॥
माया दोनी यास बाप नारायणा । सारखी भावना तयांवरी ॥ २ ॥
तयावरी त्याचा समचित्त भाव । देवकीवसुदेव नद दोघे ॥ ३ ॥
घेउनिया एके ठायीं अवतार । एकीं केला थोर वाढवूनि ॥ ४ ॥
उणा पुरा यासी नाहीं कोणी ठाव । सारिखाचि देव अवघियासी ॥ ५ ॥
यासी दोनी ठाव सारिखे अनता । आधील मागुता वाढला तो ॥ ६ ॥
वाढला तो सेवाभक्तिचिया गुणें । उपचारमिष्टान्नें करूनिया ॥ ७ ॥
करूनि सायास मेळविले धन । ते ही कृष्णार्पण केले तीहीं ॥ ८ ॥
कृष्णासी सकळ गाई घोडे म्हैसी । समर्पिल्या दासी जीवें भावें ॥ ९ ॥
जीवें भावे त्याची करितील सेवा । न विसवती नावा क्षणभरी ॥ १० ॥
क्षणभरी होता वेगळा तयास । होती कासावीस प्राण त्याचे ॥ ११ ॥

---

१ तयाची, २ दभ, ३ फळलीं

त्यांचे ध्यानीं मनीं सर्वभावें हरि । देह काम करीं चित्त त्यापें ॥ १२ ॥
त्याचेंचि चिंतन कृष्ण कोठें गेला । कृष्ण हा जेविला नाहीं कृष्ण ॥ १३ ॥
कृष्ण आला घरा कृष्ण गेला दारा । कृष्ण हा सोयिरा भेटों कृष्णा ॥ १४ ॥
कृष्ण गातां ओंव्या दळणीं कांडणीं । कृष्ण हा भोजनीं पाचारिती ॥ १५ ॥
कृष्ण तयां ध्यानीं आसनीं शयनीं । कृष्ण देखे स्वप्नीं कृष्णरूप ॥ १६ ॥
कृष्ण त्यांस दिसे आभास दुश्चितां । धन्य मातापिता तुका म्हणे ॥ १७ ॥

शब्दार्थ व टीपा :- चिकोनी-रडून, शोक करून, पाचारती-बोलावतात

अर्थ :- तो कृष्ण गोकुळात अज्ञानांसाठी लहान रूप धारण करून, मातेपुढे रडून भोजन मागीत होता. १ या नारायणास वसुदेव-देवकी व नंद-यशोदा असे दोन आईबाप होते. पण त्या दोघांवर कृष्णाची सारखीच प्रीती होती. २ देवकीवसुदेव व नंद-यशोदेवर देवाचे सारखेच प्रेमपूर्वक चित्त होते ३ एका आईबापांच्या पोटी त्याने जन्म घेतला व दुसऱ्याने वाढवून थोर केला ४ या देवास कोणतेही स्थळ कमीजास्त नाही. सर्व लोकांस हा सारखाच आहे. ५ म्हणून याला जन्मस्थानचे म्हणजे मथुरेचे व थोरपण घालविले ते गोकुळातले ही दोन्ही स्थाने सारखीच आहेत ६ मिष्टान्नादी उपचार भक्तीभावाने अर्पण केल्यामुळे देव लहानाचा थोर झाला. ७ नाना प्रकारच्या प्रयत्नाने द्रव्य जरी भक्तांनी मिळविले तरी तेही त्यांनी कृष्णाला अर्पण केले ८ गाई, म्हशी, घोडे वगैरे सर्व संसार भक्तांनी श्रीकृष्णास अर्पण केला. ९ आणि जीवभावाने ते कृष्णाची सेवा करितात व त्याच्या नावास क्षणभरही विसरत नाहीत १० एक क्षण जरी कृष्ण दूर झाला तरी त्यांचा जीव कासावीस होतो. ११ याप्रमाणे त्यांच्या ध्यानीमनी श्रीकृष्णाची वस्ती झाल्यामुळे देह संसाराचे कार्य करतो, पण सर्व चित्त त्या कृष्णाकडे आहे. १२ त्या कृष्णाचेच चिंतन ते सर्व काळ करितात. तो जेवला की नाही, या वेळी कृष्ण कोठे असेल, तो अजून का आला नाही? १३ कृष्ण आमच्या घरात आला, तो दारात गेला आणि कृष्ण आमचा सोयरा यायरा आहे, तोआम्हाला भेटावा. १४ याप्रमाणे कृष्णाच्या ओंव्या दळण-कांडणाचे वेळी गातात, व भोजन करतेवेळी घासाबरोबर त्याचे नाव घेतात. १५ आसनी, शयनी त्या कृष्णाचेच ध्यान करीत होत्या व स्वप्नातही कृष्णरूपच पाहात त १६ तुकाराम महाराज म्हणतात, त्या लोकांना कृष्ण नसतानाही कृष्णाचे रूप दृष्टीस पडते व ते जरी दुश्चित असले तरी तेच त्यांस दिसते. म्हणून त्यांचे आईबाप धन्य आहेत. १७

४५२२ कृष्ण हा परिचारी कृष्ण हा वेव्हारी । कृष्ण घ्या वो नारी आणिकी म्हणे ॥ १ ॥
म्हणे कृष्णाविण कैसें तुम्हां गमे । विळ हा करमे वांयांविण ॥ २ ॥
वांयांविण तुम्हीं पिटितां चावटी । घ्या गे जगजेठी क्षणभरी ॥ ३ ॥
क्षणभरी याच्या सुखाचा सोहळा । पहा एकवेळा घेऊनियां ॥ ४ ॥
याचें सुख तुम्हां कळलियावरि । मग दारोदारीं न फिराल ॥ ५ ॥
लटिकें हें तुम्हां वाटेल खेळणें । एका कृष्णाविणें आवघेंचि ॥ ६ ॥
अवघ्यांचा तुम्ही टाकाल सांगात । घेऊनि अनंत जाल राना ॥ ७ ॥
नावडे तुम्हांस आणीक बोलिलें । मग हें लागलें हरिध्यान[1] ॥ ८ ॥
न करा हा मग या जीवा वेगळा । टोंकवाल बाळा आणिका ही ॥ ९ ॥
आणिका हो तुम्हा येती काकुलती । जवळी इच्छिती क्षण बैसों ॥ १० ॥
बैसों चला पाहों गोपाळाचें मुख । एकी एक सुख सांगतील ॥ ११ ॥
सांगे जंव ऐसी मात[2] दसवंती । तंव त्या धरिती चित्तीं बाळा ॥ १२ ॥
बाळा एकी घरा घेउनियां जाती । नाहीं त्या परती तुका म्हणे ॥ १३ ॥

---

१ कृष्णध्यान २ माता.

शब्दार्थ व टीपा :- वेव्हारी-व्यवहारी

अर्थ :- यशोदा इतर गौळणींना म्हणते - 'सख्यानो, सासू सासऱ्याची व पतीची सेवा करताना व इतर व्यवहार करताना कृष्णाचे ध्यान करा १ तुम्हाला कृष्णावाचून कसे करमते हो ? तुमचा वेळ तरी कसा जातो ? व्यर्थ तुम्हाला बसवते तरी कसे ? २ व्यर्थ चकाट्या पिटीत न बसता त्या जगजेठीचें ध्यान करा ३ त्यापेक्षा एकवेळ कृष्णसुखाचा सोहळा अनुभवून पाहा ४ याचे सुख अनुभविल्यावर तुम्ही दारोदार फिरणार नाहीत ५ एका कृष्णावाचून सर्व खेळ मिथ्या आहे, असे तुम्हास कळून येईल ६ मग सगळ्यांची संगती सोडून कृष्णाला घेऊन तुम्ही रानात जाल ७ एकदा कृष्णाचे ध्यान तुम्हाला लागले की तुम्हास दुसऱ्याने काही बोललेले आवडणार नाही ८ कृष्णसुख अनुभविल्यानंतर मग तुम्ही त्याला आपल्यापासून कधीच वेगळा करणार नाहीत आणि इतराना लाळ घोटण्यास लावाल ९ इतर मैत्रिणीही कृष्णसुख प्राप्त करून देण्याविषयी काकुळतीला येतील आणि तुमच्याजवळ, क्षणभर बसण्याची इच्छा धरतील १० चला, आपण गोपाळाजवळ बसू, त्याचे मुख पाहू, कृष्णसुखाचा अनुभव घेऊ.' ११ याप्रमाणे यशोदा कृष्णासबंधी उपदेश करीत असता, गौळणींनी कृष्णाला चित्तात धारण केले. १२ तुकाराम महाराज म्हणतात, त्या गौळणी कृष्णाला पाहाण्याकरिता यशोदेच्या घरी येऊन त्याला घेऊन जातात त्या दिवसापासून त्यांनी कृष्णाला जीवापासून वेगळे केले नाही १३

४५२३ तुका म्हणे पुन्हा न येती मागुत्या । कृष्णासीं खेळता दिवस गमे ॥ १ ॥
दिवस राती काहीं नाठवे तयासी । पाहाता मुखासी कृष्णाचिया ॥ २ ॥
याच्या मुखें नये डोळयासी वीट । राहिले हे नीट ताटस्तचि ॥ ३ ॥
ताटस्थ राहिले सकळ शरीर । इंद्रियें व्यापार विसरलीं ॥ ४ ॥
विसरल्या तान भुक घर दार । नाहीं हा विचार असों[1] कोठें ॥ ५ ॥
कोठें असों कोण जाला वेळ काळ । नाठवे सकळ विसरल्या ॥ ६ ॥
विसरल्या आम्हीं कोणीये जातीच्या । वर्णा ही बहुंच्या एक जाल्या ॥ ७ ॥
एक जाल्या तेव्हा कृष्णाचिया सुखें । निःशंक मातुके खेळतील ॥ ८ ॥
खेळती मातुके कृष्णाच्या[2] सहित । नाहीं आशंकित चित्त त्यांचे ॥ ९ ॥
चित्तीं तो गोविंद लटिकें दळण । करितो हे जन करी तैसें ॥ १० ॥
जन करी तैसा खेळतील खेळ । अवघा गोपाळ करुनिया ॥ ११ ॥
करितो आपला आवघा गोविंद । जना साच फंद लटिका त्या ॥ १२ ॥
त्याणीं केला हरि सासुरे माहेर । बधु हे कुमर दीर भावे ॥ १३ ॥
भावना राहिली एकाचिये ठायीं । तुका म्हणे पायीं गोविंदाचे ॥ १४ ॥

शब्दार्थ व टीपा :- फंद-कारस्थान, छंद

अर्थ :- तुकाराम महाराज म्हणतात, पुन त्या गोपिका घरी आल्या नाहीत, कारण त्यांचा सारा दिवस कृष्णाशी खेळण्यात जाऊ लागला १ कृष्णाचे मुख पाहात असताना दिवस आहे का रात्र आहे, याचेही त्याना भान राहात नव्हते २ कृष्णाचें मुख पाहाताना त्यांच्या डोळ्याना कटाळा येत नसे डोळ्यांची उघडझाप न करता त्या तटस्थ राहात होत्या ३ सर्व शरीर निश्चळ राहात होते, इंद्रिये आपला व्यापार करण्याचे विसरली ४ तहान, भूक, घर, दार या सर्वांचा त्याना विसर पडला आपण कोठे आहोत ही आठवणही त्याना राहात नसे ५ आपण आहोत कोठे, किती वेळ झाला आहे, हे सर्व त्या विसरून गेल्या होत्या ६ आपण कोणत्या वर्णाच्या, जातीच्या

१ नाहीं, २ कृष्णा त्या सहित

आहोत हे सर्व त्या विसरल्या होत्या म्हणून कृष्णाचे रूप आत्मभावाने पाहाताना चारी वर्णाच्या स्त्रिया एकत्र झाल्या होत्या ७ एवढेच नव्हे तर कृष्णाच्या सुखाने त्या एकरूप झाल्या तेव्हा निर्भयपणाने संसाररूपी भातुकलीचा खेळ त्या खेळू लागल्या ८ कृष्णासह त्या खेळू लागल्या तेव्हा त्याना भयभीत होण्याचे कारणच राहिले नव्हते ९ चित्तात गोविंद असल्यामुळे संसारावरील खोटया प्रेमाने दळण कांडण करत होत्या चार लोक जसे वागतात त्या प्रमाणे त्या वागू लागल्या १० लोक जसे लोभ ठेवून संसार करतात तसा न करता ' सर्वत्र गोपाळ आहे ' असा अनुभव घेऊन या संसार करू लागल्या ११ गोविंदाला आपलेसे करून त्या संसार करू लागल्या जो संसार लोकाना खरा वाटतो, तो त्याना खोटया छंदासारखा वाटत होता १२ गोळणी सासर, माहेर वधू पुत्र वीर या सर्वांना हरिरूप मानीत होत्या १३ तुकाराम महाराज म्हणतात, एका गोविंदाचे ठिकाणीच त्यांचा दृढभाव राहिला होता १४

४५२४ गोविंद भ्रतार गोविंद मुळहारी । नामें भेद परि एकचि तो ॥ १ ॥
एकाचींच नामें ठेवियेलीं दोनी । कल्पितील मनीं यावे जावे ॥ २ ॥
जावे यावे तिहीं घरींचिया घरीं । तेथिची सिदोरी तेथें न्यावी ॥ ३ ॥
विचारिता दिसे येणें जाणें खोटें । दाविती गोमटें लोका ऐसें ॥ ४ ॥
लोक करूनिया साच वर्तताती । तैशा त्या खेळती लटिक्याची ॥ ५ ॥
लटिकीं करिती मंगळदायकें । लटिकींच एकें एका व्याही ॥ ६ ॥
व्याही भाई हरि सोयरा जावायी । अवघियाच्या ठायीं केला एक ॥ ७ ॥
एकासिच पावे जें काहीं करिती । उपचार संपत्ति नाना भोग ॥ ८ ॥
भोग देती सर्व एका नारायणा । लटिक्या भावना व्याही भाई ॥ ९ ॥
लटिकाच त्याणीं केला सवसार । जाणती साचार वेगळा त्या ॥ १० ॥
त्याणीं मृत्तिकेचे करूनि अवघें । खेळतील दोघें पुरुषनारी ॥ ११ ॥
पुरुषनारीं त्याणीं ठेवियेलीं नांवें । कवतुकभावें विचरती ॥ १२ ॥
विचरती जैसे साच भावें लोक । तैसें नाहीं सुख खेळतीया ॥ १३ ॥
याणीं जाणितलें आपआपणया । लटिकें हें वाया खेळतों तें ॥ १४ ॥
खेळतो तें आम्ही नव्हों नारीनर । म्हणोनि विकार नाहीं तया ॥ १५ ॥
तया ठावें आहे आम्ही अवघीं एक । म्हणोनि निःशंक खेळतील ॥ १६ ॥
तया ठावें नाहीं हरिचिया गुणें । आम्ही कोणकोणें काय खेळों ॥ १७ ॥
काय खातों आम्ही कासया लागतें । कैसें हें लागतें नेणो मुखीं ॥ १८ ॥
मुखीं चवी नाहीं वरी अंगीं लाज । वर्ण याती काज न धरिती ॥ १९ ॥
न धरिती काहीं संकोच त्या मना । हासता या जना नाइकती ॥ २० ॥
नाइकती बोल आणिकाचे कानीं । हरि चित्तीं मनीं बैसलासे ॥ २१ ॥
बैसलासे हरि जयांचिये चित्तीं । तया नावडती मायबापें ॥ २२ ॥
मायबापें त्यांचीं नेती पाचारुनि । वळें परि मनीं हरि वसे ॥ २३ ॥
वसतील बाळा आपलाले घरीं । ध्यान त्या अंतरीं गोविंदाचें ॥ २४ ॥
गोविंदाचें ध्यान निजलिया जाग्या । आणीक वाउग्या न बोलती ॥ २५ ॥
न बोलती निजलिया हरिविण । जागृति सपन एक जालें ॥ २६ ॥

एकविध सुख घेती नित्य बाळा । भ्रमर परिमळालागीं तैसा ॥ २७ ॥
तैसा त्याचा भाव घेतला त्यापरी । तुका म्हणे हरि बाळलीला ॥ २८ ॥

शब्दार्थ व टीपा .– मुळहारी – माहेरास बोलावणारा नातेवाईक मनुष्य, याती–जाती.

अर्थ :– त्या गौळणी नवरा गोविंद, माहेराला बोलावून नेण्याकरिता आलेला नातेवाईकही गोविंदच, असे मानीत होत्या मुळात एक गोविंदच, परतु अनेक नामाच्या उपाधीमुळे तो भिन्न भिन्न वाटतो १ म्हणून त्या *गौळणींनी एकाच गोविंदाची मनाने कल्पना करून सासर आणि माहेर अशी दोन नावे लोकदृष्टया ठेविली होती* २ ' हे विश्वचि माझे घर ' आहे अशी त्याची बुद्धी स्थिर झाल्यामुळे कोठलीही शिदोरी कोठेही नेऊन खाल्ली तरी घरीच खाल्ल्यासारखी त्या मानीत होत्या ३ सर्वत्र गोविंद भरला असल्यामुळे सासरी, माहेरी जाणे, येणेच खोटे आहे, हे तत्त्व त्या जाणीत होत्या परतु चार लोकामध्ये चागले दिसेल असे वर्तन करून त्या दाखवीत होत्या ४ लोक ससार खरा समजून करतात. गौळणी खोटा खेळ मानून ससार करीत होत्या ५ लग्नकार्य व त्यातील व्याही जावई खोटे आहेत, असे त्या मानीत होत्या ६ व्याही जावई, वधू या सर्वांचे ठिकाणी एक गोविंदच आहे, असा त्यांनी निश्चय केला होता ७ त्या गौळणी व्याही–जावयाना जे नाना प्रकारचे सुखोपचार, सपत्ती अर्पण करीत होत्या ते सर्व एका गोविंदालाच प्राप्त होत होते ८ व्याही, जावई, वधू याच्या उपाधीच्या ठिकाणी खोटेपणाची भावना ठेवून, सर्व भोग त्या एका नारायणालाच अर्पण करीत होत्या ९ त्यानी ससार खोटा मानून केला, त्यानी हा ससार आपल्या आत्मस्वरूपाहून भिन्न असल्याचे यथार्थत्वाने जाणले होते १० लहान मुली जशा मातीच्या शेणगोळ्याला ' बाहुला ' व ' बाहुली ' अशी नावे ठेवून खेळतात, ११ त्याप्रमाणे पचमहाभूतापासून झालेल्या एका देहाला ' स्त्री ' व दुसऱ्या देहाला ' पुरुष ' अशी नावे ठेवून कौतुकाने त्या ससार करू लागल्या १२ अज्ञानी लोक हा भेद सत्य मानून ससार करतात म्हणून त्याना सुख वाटते परतु खेळ म्हणून ससार करणाऱ्यास त्यात सुखही वाटत नाही आणि दु खही वाटत नाही १३ त्यानी आत्मस्वरूपाला जाणलेले होते त्याना आपण खोटा खेळ खेळत आहोत हे कळत होते १४ खेळणारे आम्ही स्त्री व पुरुष कोणीही नाहीत हे यथार्थज्ञान त्याना होते म्हणून त्याना कामक्रोधादी विकार उत्पन्न होत नव्हते १५ त्या गोपींना आम्ही सर्वजण हरिरूप आहो असे भान होते, म्हणून त्या निर्भयपणाने खेळत होत्या १६ सर्वत्र हरी व्यापलेला आहे अशी त्याची भावना असल्यामुळे आम्ही कोणाशी खेळ खेळत आहो ! हे भेदभाव त्यांना नव्हते १७ आम्ही कशाबरोबर काय खात आहो ? आणि तोंडाला त्याची चव कशी लागते ? हे त्यांना समजत नव्हते १८ तोंडाला अन्नाची रुची, अगी लोकलज्जा, आम्ही अमुक वर्णाचे, अमुक जातीचे, याची आठवण व घरातील कामकाज हे काहीच त्याच्या मनात येत नव्हते १९ त्या लोकमर्यादा काहीच पाळीत नव्हत्या लोक हसत होते, तरीसुद्धा तिकडे त्याचे लक्ष नव्हते २० त्यानी, मनी एक हरी हा विषयच असल्यामुळे इतर बोलणे त्याना ऐकावयास येत नव्हते २१ त्याच्या चित्तात हरी बसला होता, म्हणून त्यांना मायबापदेखील आवडत नव्हते २२ त्याचे मायबाप त्याना बळेच बोलावून नेत होते परतु त्याच्या मनात हरीच राहात होता २३ त्या गौळणी एखाद्या वेळी घरी राहात असल्या तरीसुद्धा, अत करणात त्या हरीचे चितन करीत होत्या २४ जागे असताना, झोपताना त्या गोविंदाचेच भजन करीत होत्या त्यामुळे इतर व्यावहारिक गोष्टी त्या बोलत नव्हत्या २५ जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तिन्ही अवस्था त्याना सारख्याच झाल्या होत्या २६ भ्रमर परिमळावाचून दुसऱ्या कशाचेही सेवन करीत नाही त्याप्रमाणे त्या गौळणी एका कृष्णाचेच सुख नित्य भोगीत होत्या २७ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यांचा जसा भाव होता, त्याप्रमाणे त्यानी हरिसुख भोगले याप्रमाणे हरीने गोकुळात बाललीला केली २८

४५२५ लीलाविग्रही तो लेववी खाववी । यशोदा बैसवी माडीवरी ॥ १ ॥
मांडीवरी भार पुष्पाचिये परी । बैसोनिया करी स्तनपान ॥ २ ॥
नभाचा ही साक्षी पाताळापरता । कुर्वाळिते माता हातें त्यासि ॥ ३ ॥

हातें कुर्वाळुनी मुखीं घाली घास । पुरे म्हणे तीस पोट धाले ॥ ४ ॥
पोट धाले मग देतसे ढेंकर । भक्तीचे तें फार तुळसीदळ ॥ ५ ॥
तुळसीदळ भावें सहित देवापाणी । फार ते त्याहुनि क्षीरसागरा ॥ ६ ॥
क्षीराचा काटाळा असे एकवेळ । भक्तीचे ते जळ गोड देवा ॥ ७ ॥
देवा भक्त जिवाहुनि आवडती । सकळ हि प्रीति त्यांच्याठायीं ॥ ८ ॥
त्याचा हा अंकित सर्व भावे हरि । तुका म्हणे करी सर्व काज ॥ ९ ॥

शब्दार्थ व टीपा – लीलाविग्रही–नाना शरीरे धारण करून खेळ करणारा, धाले–तृप्त झाले

अर्थ :– स्वतःच्या इच्छेने शरीर धारण करणारा तो हरी गोकुळात असताना यशोदा त्याला वस्त्रालंकार घालीत होती, खेळ घालीत होती, मांडीवर बसवीत होती १ हरीला मांडीवर घेतले असता तो फुलासारखा हलका वाटत होता, यशोदा त्याला स्तनपान करीत होती २ आकाशाच्या साक्षीने पाताळाच्याही पलीकडे असणाऱ्या त्या व्यापक हरीला यशोदा आपल्या हाताने कुरवाळीत होती ३ हाताने कुरवाळीत ती घास घालीत होती, तेव्हा तो 'आता पुरे झाले, पोट भरले' असे म्हणत होता ४ पोट भरल्यानंतर तो ढेकर देत होता. हरीला भक्तीने तुळसीदळ अर्पण केले, तरी त्याला त्याचे महत्व वाटते ५ पाणी आणि तुळसीदळ प्रेमाने अर्पण केले असता त्याला ते क्षीरसागराहूनही महत्वाचे वाटते ६ देवाला एखादे वेळी क्षीरसागराचा कटाळा येईल, परंतु भक्ताने अर्पण केलेले पाणी फार गोड लागते ७ देवाला स्वतःचा भक्त जीवापेक्षाही अधिक आवडतो त्याचे सर्व प्रेम भक्ताचे ठिकाणीच असते ८ तुकाराम महाराज म्हणतात, हरी कायावाचामनाने भक्ताचा दास होतो, व त्याची सर्व कामे तो न सांगता करतो. ९

४५२६ जयेवेळीं चोरुनिया नेली वत्से । तयालागीं तैसे होणे लागे ॥ १ ॥
लागे दोहीं ठायीं करावें पाळण । जगाचा जीवन मायबाप ॥ २ ॥
माय जाल्यावरी अवघ्या वत्साची । घरीं वत्से जीचीं तैसा जाला ॥ ३ ॥
जाला तैसा जैसे घरिंचे गोपाळ । आणिक सकळ मोहरी पावे ॥ ४ ॥
मोहरी पावे सिंगें वाहिल्या काहाळा । देखिला सोहाळा ब्रह्यादिकीं ॥ ५ ॥
ब्रह्मादिका सुख स्वप्नीं ही नाहीं । तैसे दोहीं ठायीं वोसंडले ॥ ६ ॥
वोसंडल्या क्षीर अमुप त्या गायी । जैसी ज्याची आई तैसा जाला ॥ ७ ॥
लाघव कळले ब्रह्मयासी[1] याचे । परब्रह्म साचे अवतरले ॥ ८ ॥
तरले हे जन सकळ ही आतां । ऐसे तो विधाता बोलियेला ॥ ९ ॥
लागला हे स्तुती करूं अनंताची । चतुर्मुख वाची भक्ती स्तोत्रें ॥ १० ॥
भक्तिकाजें देवें केला अवतार । पृथ्वीचा भार फेडावया ॥ ११ ॥
पृथिवी दाटीली होती या असुरीं । नासाहावे वरी भार तये ॥ १२ ॥
तया काकुलती आपल्या दासाची । तयालागीं वेची सर्वस्व ही ॥ १३ ॥
स्वहित दासाचे करावयालागीं । अव्यक्त हे जगीं व्यक्ती आले ॥ १४ ॥
तैसा कोण करी त्याचिया पुण्याचा । जयासवें वाचा बोले हरी ॥ १५ ॥
हरी नाममात्रें पातकाच्या रासी । तो आला घरासि गौळियांच्या ॥ १६ ॥
गौळियें अवघीं जालीं कृष्णमय । नामें लोकत्रय तरतील ॥ १७ ॥

१ ब्रह्मदेवा.

तरतील नामें कृष्णाचिया दोषी । बहुत ज्यांपाशीं होइल पाप ॥ १८ ॥
पाप ऐसें नाहीं कृष्णनामें राहे । धन्य तोचि पाहे कृष्णमुख ॥ १९ ॥
मुख माझें काय[1] जो मी वर्णूं पार । मग नमस्कार घाली ब्रह्मा ॥ २० ॥
ब्रह्मा नमस्कार घाली गोधनासी । कळला तयासि हाचि देव ॥ २१ ॥
देवचि अवघा जालासे सकळ । गाई हा गोपाळ वत्सें तेथें ॥ २२ ॥
तेथें पाहाणें जें आणीक दुसरें । मूर्ख[2] त्या अंतरें दुजा नाहीं ॥ २३ ॥
दुजा भाव तुका म्हणे जया चित्तीं । रवरव भोगिती कुंभपाक ॥ २४ ॥

शब्दार्थ व टीपा :– वेची–खर्च करील.

अर्थ:–ज्यावेळी ब्रह्मदेवाने वासरे व गोपाळांना चोरून नेले, त्यावेळी गायींची जशी वासरे, आयांची जशी मुले होती त्याप्रमाणे देवाला व्हावे लागले. १ तिकडे चोरून नेलेल्या वासरांचा, गोपाळांचा व इकडे गाई–आयांचा सांभाळ देवालाच करावा लागला. कारण तोच जगाचा मायबाप असून जीवन आहे. २ वासरांची आई व आईची वासरे तोच झाला. ३ ज्यांच्या घरी जशी मुले होती व त्यांच्याजवळ जशा प्रकारचे पावे होते त्याप्रमाणे तो झाला. ४ हरीने स्वतः मुलांचे रूप धारण करून, वेणू, पावे, शिंगे, झांजा खांद्यावर वाहिल्या, आणि हरीच्या अनेक रूपांचा हा सोहळा ब्रह्मादिक सर्व देवांनी पाहिला. ५ जे सुख ब्रह्मादिक देवांना स्वप्नातसुद्धा प्राप्त होत नाही, ते सुख गाईवासरांच्या व आयामुलांच्या ठिकाणी शिगेला आले होते. ६ त्या गाईंना आपल्या वासरांना पाहिल्याबरोबर पान्हा फुटला. ज्या वासरांची जशी आई होती तसा तो झाला. ७ ब्रह्मदेवाला देवाचा हा महिमा लक्षात आला, व खरोखर परब्रह्म अवतीर्ण झाले आहे, हे त्याला कळून चुकले. ८ 'आता या श्रीकृष्णावतारामुळे गोकुळवासी लोक उद्धरून गेले आहेत' असे ब्रह्मदेव म्हणू लागला. ९ अखेरीस ब्रह्मदेव भगवंताला शरण येऊन अनंताची स्तुती करू लागला, व आपल्या चारही मुखांनी भक्तिस्तोत्रे गाऊ लागला. १० भक्तांच्या रक्षणाकरिता व पृथ्वीचा भार नाहीसा करण्याकरिता देवाने अवतार घेतला आहे, असे तो म्हणू लागला. ११ अवतार होण्यापूर्वी ही पृथ्वी दैत्यांच्या भाराने दुःखी झाली होती, तिला तो भार असह्य झाला होता. १२ देवाला आपल्या भक्तांची दया येते, त्यांच्याकरितां तो सर्वस्व अर्पण करण्यास प्रवृत्त होतो. १३ भक्तांचे हित करण्याकरिताच अव्यक्त असलेले परब्रह्म जगात कृष्णरूपाने व्यक्त झाले १४ हरी ज्यांच्याशी प्रत्यक्ष बोलत आहे त्यांच्या पुण्याची गणती कोण करील? १५ जो हरी केवळ नाममात्राने पातकांच्या राशी जाळून टाकतो; तो आपणहून गवळ्यांच्या घरी आला आहे. १६ ज्या नामाने त्रैलोक्य उद्धरून जाते, त्या कृष्णनामाने सर्व गवळी कृष्णरूप झाले आहेत. १७ ज्यांनी पुष्कळ पाप केले आहे, तेसुद्धा कृष्णाच्या नामाने तरतात. १८ कृष्णाचे नाम घेऊन राहील असे पापच जगात नाही. जो कृष्णाचे मुख पाहतो तो धन्य आहे. १९ देवा, माझे मुख केवढे आहे? या मुखाने मी तुझ्या कीर्तीचे वर्णन करू शकणार नाही. याप्रमाणे स्तुती करून ब्रह्मदेवाने देवास नमस्कार केला. २० ब्रह्मदेवाने गायी–वासरांना व गोपाळांना नमस्कार केला. कारण हे सर्व देवरूप आहेत हे त्याला कळले होते २१ गाई, वत्स, गोपाळ हे सर्व देवच झाला होता. २२ त्या ठिकाणी जो कुणी द्वैत पाहील त्याच्यासारखा कुणीही मूर्ख नाही. कारण, परमार्थात द्वैत नाहीच. २३ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याच्या चित्तात असा द्वैतभाव असेल त्याला रौरव आणि कुंभीपाक या नावाचे नरकवास भोगावे लागतात. २४

४५२७ कुंभपाक लागे तयासि भोगणें । अवघाचि नेणे देव ऐसा ॥ १ ॥
देव ऐसा ठावा नाहीं जया जना । तयासि यातना यम करी ॥ २ ॥
कळला हा देव तया साच खरा । गाइ वत्सें घरा धाडी ब्रह्मा ॥ ३ ॥

---

१ जे मी वर्णूं पामर, २ मूर्ख तोचि खरें नाही दुजा.

ब्रह्मादिका ऐसा देव अगोचर । कैसा त्याचा पार जाणवेल ॥ ४ ॥
जाणवेल देव गौळियाच्या भावे । तुका म्हणे व्हावे[1] सचित हे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अगोचर–न भासणारा, अगम्य

अर्थ–देव सर्वत्र भरलेला आहे, असे जो जाणत नाही, त्याला कुंभीपाक भोगावा लागतो १ सर्वत्र देव आहे, हे ज्याला माहीत नाही, त्याला यमधर्म शिक्षा करतो २ जेव्हा कृष्णाचा महिमा ब्रह्मदेवाला पूर्णपणे कळला, तेव्हा त्याने चोरून ठेविलेल्या गाई, वत्स व गोपाळ याना त्यांच्या घरी पाठवून दिले ३ ब्रह्मादिकांनाही जो देव अगम्य आहे, त्याचा सामान्य माणसाना महिमा काय कळणार आहे ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, गोकुळातील गवळ्यासारखे प्रेम व पूर्वपुण्य असेल तरच देवाचे ज्ञान होते ५

४५२८ सचित उत्तम भूमि कसूनिया । जाऊ नेणे[2] वाया परि त्याचे ॥ १ ॥
त्याचिया पिकासि आलिया घुमरी । आल्या गाईवरी आणीक गाई ॥ २ ॥
गाई दवडुनि घालिती[3] बाहेरी । तव म्हणे हरि बाधा त्या[4] ही ॥ ३ ॥
त्याही तुम्ही बाधा तुमच्या सारिख्या । भोवडा पारिख्या वाड्यातुनि ॥ ४ ॥
पारिख्या न येती कोणाचिया[5] घरा । सूत्रधारी खरा नारायण ॥ ५ ॥
नारायण नांदे जयाचिये ठायीं । सहज तेथें नाहीं घालमेली ॥ ६ ॥
मेलीं हीं शाहाणीं करिता सायास । नाही सुखलेश तुका म्हणे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – भोवडा–घालवून दणे, हाकून देणे

अर्थ–शेताची चागली मशागत करून जो बी पेरतो, त्याचे ते बी कधी वाया जावयाचे नाही १ चागल्या जमीनीत पेरलेल्या बीचे भरघोस पीक येते त्याप्रमाणे पूर्वपुण्याईमुळे त्या गोपाळाच्या घरी पुष्कळ गायी आल्या २ घरी आलेल्या गाईना जी माणसे बाहेर घालवू लागली, त्याना हरी म्हणाला, 'बाहेरून आलेल्या गाईसुद्धा बाधा ३ ज्या तुमच्या गाईसारख्या शात आहेत, त्याना बाधा व ज्या ओढाळ स्वैराचारी, डिवल्या व वाम आहेत त्याना वाड्याच्या बाहेर घालवून द्या ४ सर्व प्राणिमात्राच्या कर्माचे सूत्र हाती धरणारा नारायण प्रत्यक्ष त्या गोकुळात असताना परक्याच्या ओढाळ गाई इतर कुणाच्या घरात जातीलच कशा ? ५ ज्या ठिकाणीं नारायणाची वस्ती आहे, त्या ठिकाणी चागल्यावाईट गाईंचे मिश्रण होणेच शक्य नाही ६ तुकाराम महाराज म्हणतात, शाहाणी माणसे सुख शोधता शोधता फुकट मेली, परतु त्याना गवळ्याना मिळालेल्या सुखाचा कणसुद्धा मिळाला नाही ७

४५२९ तुका म्हणे सुख घेतले गोपाळीं । नाचती कावळीं करुनि ध्वजा ॥ १ ॥
करूनिया टिरी आपुल्या मादळ । वाजविती टाळ दगडाचे ॥ २ ॥
दगडाचे टाळ कोण त्याचा नाद । गीत गाता छंद ताल नाहीं ॥ ३ ॥
ताल नाहीं गाता नाचता गोपाळा । घननीळ सावळा तयामध्यें ॥४ ॥
मध्यें जया हरि तें सुख आगळें । । देहभाव काळें नाहीं तया ॥ ५ ॥
तयासि आळगी आपुलिया करीं । जाती भूमीवरी लोटांगणीं ॥ ६ ॥
निजभाव देखे जयाचिये अगीं । तुका म्हणे सगीं क्रीडे तया ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – टिरी–ढुगण, मादळ–मृदग

अर्थ–तुकाराम महाराज म्हणतात, गोपाळानी कृष्णसुख फार भोगले एकदा तर ते सर्व गोपाळ कांवळीच्या पताका करून नाचू लागले १ त्यांनी आपल्या ढुगणाचे मृदुग केले, व दगडाचे टाळ करून 'कृष्ण कृष्ण' म्हणत

१ सेवे, २ नये, ३ घाल्तिील दुरी, ४ त्यासी, ५ आणिकाच्या

ते वाजवू लागले. २ दगडांच्या टाळांना छंद, ताल नव्हता. जसे कृष्णाचे गीत मुखाने म्हणता येईल तसे ते म्हणत होते. ३ गाताना, नाचताना ताल सूर मुळीच नव्हता; परंतु त्या गोपाळांच्या समुदायात घननीळ सावळा श्रीहरी होता. ४ ज्यांच्यांत हरी आहे ते सुख सर्वांत श्रेष्ठ. त्या सुखोपभोगात त्यांना देहाचे व काळाचे भान नव्हते ५ जे गोपाळ हरीला जमिनीवर लोटांगण घालीत होते, त्यांना देव आपल्या बाहूंनी आलिंगन देत होता ६ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यांच्या ठिकाणी शुद्ध भक्तिभाव असल्याचे हरीला दिसत होते, त्यांच्या बरोबरच तो खेळत होता. ७

४५३० तयांसवें करी काला दहींभात । सिदोऱ्या अनंत मेळवुनी ॥ १ ॥
मेळवुनी अवघियांचे एके ठायीं । मागें पुढें कांहीं उरों नेदी ॥ २ ॥
नेदी चोरी करूं जाणे अंतरींचें । आपलें ही साचें द्यावें तेथें ॥ ३ ॥
द्यावा दहींभात आपले प्रकार । तयांचा वेव्हार सांडवावा ॥ ४ ॥
वांटी सकळांसि हातें आपुलिया । जैसें मागे तया तैसें द्यावें ॥ ५ ॥
द्यावें सांभाळुनी सम तुकभावें । आपण हि खावें त्यांचें तुक ॥ ६ ॥
तुक सकळांचें गोविंदाचे हातीं । कोण कोणे गति भला बुरा ॥ ७ ॥
राखे त्यांसि तैसें आपलाल्या भावें । विचारुनि द्यावें जैसें तैसें ॥ ८ ॥
तैसें सुख नाहीं वैकुंठींच्या लोकां । तें दिलें भाविकां गोपाळांसि ॥ ९ ॥
गोपाळांचे मुखीं देउनि कवळ । घांस माखे लाळ खाय त्यांची ॥ १० ॥
त्यांचिये मुखींचे काढूनियां[1] घांस । झोंबतां हातांस खाय बळें ॥ ११ ॥
बळें जयाचिया ठेंगणें सकळ । तयातें गोपाळ पाडितील ॥ १२ ॥
पाठी उचलूनि वाहातील खांदीं । नाचतील मांदीं मेळवुनी ॥ १३ ॥
मांदीं मेळवुनी धणी दिली आह्मां । तुका म्हणे जमा केल्या गाई ॥ १४ ॥

शब्दार्थ व टीपा.– तुक–योग्यता, प्रतिष्ठा.

अर्थ:–सर्वांच्या शिदोऱ्या एकत्र करून तो हरी त्यांच्याबरोबर दहीभाताचा काला करीत होता १ कोणाजवळ काहीही शिल्लक न ठेवता सर्वांच्या शिदोऱ्या एकत्र करीत होता. २ कोणालाही काहीही लपवून ठेऊ देत नव्हता जसे दुसऱ्याचे घेत होता, तसे आपलेही जे खरे असेल ते देत होता. ३ दहीभात आपल्या सांप्रदायिक प्रकाराने गोपाळांना देऊन त्यांना खोटा प्रपंच विचाराने टाकून द्यावयास लावीत होता. ४ श्रीकृष्ण आपल्या हाताने सर्वांना काला वाटीत होता जो जितके मागेल तितके तो देत होता. ५ सर्वांना सारख्या प्रमाणात मिळेल अशा युक्तीने सर्वांची मर्जी संभाळून होता. आपणही तितक्याच प्रमाणात खात होता. ६ सर्वांची प्रतिष्ठा ठेवणे गोविंदाच्या हातात होते. कोण चांगला आहे, कोण वाईट आहे, हे सर्व त्याला समजत होते. ७ ज्याच्यात्यांच्या अधिकारानुसार त्यांची प्रतिष्ठा ठेवीत होता. त्यांच्या योग्यतेप्रमाणे त्यांना काला देत होता ८ जे सुख वैकुंठातील लोकांना मिळाले नाही, ते देवाने भाविक गोपाळांना दिले. ९ गोपाळांच्या तोंडात काल्याचा घास घालून त्याच्या लाळेने माखलेला घास आपण खात होता १० मुखातला घास काढताना गोपाळ काढू देत नव्हते, तरी पण बलात्काराने काढून कृष्ण खातच होता. ११ ज्याच्या बळापुढे सारे ब्रह्मांड तोकडे पडते, त्या कृष्णाला गोपाळ कुस्तीत पाडीत होते. १२ कृष्णाला पाठी, खांद्यावर घेऊन सर्व गोपाळ एकत्र जमा होऊन नाचत होते. १३ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे देवाने गोपाळांचा समुदाय मिळवून काला वाटून सर्वांची तृप्ती केली. काला खाणे झाल्यावर सर्वांनी गाई जमा केल्या. १४

[1] हिरोनिया.

४५३१ केला पुढें हरि अस्तमाना दिसा । मागें त्यासरिसा थाट चाले ॥ १ ॥
थाट चाले गाई गोपाळांची धूम । पुढें कृष्ण राम तयां सोयी ॥ २ ॥
सोयीं लागलिया तयांची अनंतीं । न बोलावितां येती मागें तया ॥ ३ ॥
तयांचियें चित्तीं बैसला अनंत । घेती नित्यनित्य तेंचि सुख ॥ ४ ॥
सुख नाहीं कोणा हरिच्या वियोगें । तुका म्हणे जुगें घडी जाय ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा:–जुगें–युग.

अर्थ:–सूर्यास्त झालेला पाहून सर्वांनी हरीला पुढे केले, व काही गोपाळ हरीच्या बरोबर, तर काही मागे, अशा रीतीने तो समुदाय चालू लागला १ तो समुदाय चालत होता, तेव्हा गाई-गोपाळांची एकत्र गर्दी उडाली कृष्ण आणि बलराम हे पुढे होते २ ज्यांना देवाचा छंद लागला होता, ते देवाच्या भोवती व मागे न बोलावता येत होते. ३ त्या गोपाळांच्या चित्तात अनंत बसला होता. त्यामुळे ते अनंताचे सुख नित्य भोगीत होते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, गोकुळातील लोकांना हरीचा वियोग झाल्यामुळे सुख वाटत नव्हते. हरीवाचून एक घटकादेखील युगासारखी जात होती. परंतु सायंकाळी हरी घरी येताना मार्गातच त्याचे दर्शन होत असल्यामुळे सर्व गोपगोपींना आनंद होत असे. ५

४५३२ जाय फाकोनियां निवडोनि गाई । आपलाल्या सोयी घराचिये ॥ १ ॥
घराचियें सोयी अंतरला देव । गोपाळांचे जीव गोविंदापें ॥ २ ॥
गोविंदें वेधिलें तुका म्हणे मन । वियोगें ही ध्यान संयोगाचें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– फाकोनियां–दूर जात होते

अर्थ –ज्याचे जेथें घर होते, तिकडे गाई वळवून गोपाळ आपआपल्या घराकडे दूर जात होते. १ घरी गेल्यामुळे देव अंतरल्यासारखा झाला तरीसुद्धा त्यांचे चित्त गोविंदाच्या ठिकाणीच होते २ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यांचे मन गोविंदाकडे वेधले आहे, त्यांना कोणत्याही कारणामुळे हरीचा वियोग झाला असला तरीपण ध्यानामुळे हरीशी त्यांचा नित्यसंयोगच असतो आणि हा मनहरिसंयोग देहहरिसंयोगापेक्षा श्रेष्ठ आहे. ३

४५३३ संयोग सकळां असे सर्वकाळ । दुश्चित्त गोपाळ आला दिसे ॥ १ ॥
गोपाळ गुणाचा म्हणे गुणमय । निंबलोण माये उतरिलें ॥ २ ॥
उतरूनि हातें धरि हनूवटी । ओंवाळूनि दिठी सांडियेली ॥ ३ ॥
दिठी घाली माता विश्वाच्या जनका । भक्तिचिया सुखा गोडावला ॥ ४ ॥
लहान हा थोर जीवजंतु भूतें । आपण दैवतें जाला देवी ॥ ५ ॥
देवी म्हेंसासुर मुंजिया खेचर । लहान हि थोर देव हरि ॥ ६ ॥
हरि तुका म्हणे अवघा एकला । परि या[1] धाकुला भक्तीसाटीं[2] ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– दुश्चित–उदासीन, खिन्न.

अर्थ:–म्हणून ध्यानामुळे सर्व भक्तांना कृष्णाचा सर्वकाळ संयोगच होता. परंतु कृष्ण मात्र भक्ताचा वियोग झाल्यामुळे उदासीन दिसत होता १ कृष्णाला घरी आलेला पाहाताच आई यशोदा म्हणाली, माझा गोविंद मोठा गुणाचा शाहाणा आहे, असे म्हणून तिने त्याच्यावरून निंबलोण उतरून टाकले. २ हाताने कृष्णाची हनुवटी धरून त्याची दृष्ट काढली. ३ आणि भक्तिसुखाला लाचावलेल्या विश्वजनक श्रीहरीला प्रेमाने पाहू लागली. ४ जगातील

१ हा, भक्तासाठी.

म्हाननोडे नोवजंतू. पंचमहाभूते व देव देवी स्वतः हरीच झाला आहे. ५ महिषासुरमर्दिनी, देवी, म्हसोबा, मुंजा, खेचर, भूत, पिशाच सर्व काही हरीच झाला आहे ६ तुकाराम महाराज म्हणतात, सर्वव्यापक असलेला हा एक श्रीहरी भक्तांसाठी त्या गोकुळात चिमणा बाळ झाला होता ७

४५३४ भक्तासाठीं केली यशोदेसी आळी । चिकोनियां चोळी डोळे देव ॥ १ ॥
देव गिळुनिया धरिलें मोहन । माय म्हणे कोण येथें दुजें ॥ २ ॥
दुजें येथें कोणी नाहीं कृष्णाविण । निरुतें जाणोन पुसे देवा ॥ ३ ॥
देवापाशीं पुसे देव काय जाला । हासें आलें बोला याचें हरि ॥ ४ ॥
यांचे मी जवळी देव तो नेणती । लटिकें मानिती साच खरें ॥ ५ ॥
लटिकें तें साच साच तें लटिकें । नेणती लोभिके आशाबद्ध ॥ ६ ॥
सांग म्हणे माय येर वासी तोंड । तंव तें ब्रह्मांड देखे माजी ॥ ७ ॥
माजी जया चंद्र सूर्य तारागणें । तो भक्ताकारणें बाळलीळा ॥ ८ ॥
लीळा कोण जाणे याचें महिमान । जगाचें जीवन देवादिदेव ॥ ९ ॥
देवें कवतुक दाखविलें तया । लागतील पाया मायबापें ॥ १० ॥
मायबाप म्हणे हा चि देव खरा । आणीक पसारा लटिका तो ॥ ११ ॥
तो हि त्यांचा देव दिला नारायणें । माझें हें करणें तो हि मीच ॥ १२ ॥
मीच म्हणउनि जें जें जेथें घ्याती । तेथें मी श्रीपति भोगिता तें ॥ १३ ॥
तें मज वेगळें मी तया निराळा । नाहीं या सकळा ब्रह्मांडात ॥ १४ ॥
तद्भावना तैसें भविष्य तयाचें । फळ देता साचें मीच एक ॥ १५ ॥
मीच एक खरा बोले नारायण । दाविलें निर्वाण निजदासां ॥ १६ ॥
निजदासां खूण दाविली निरुती । तुका म्हणे मूर्ती नारायण ॥ १७ ॥

शब्दार्थ व टीपा :– चिकोनिया–रडून, शोक करून, मोहन–वेड

अर्थ– एके दिवशी यशोदेची भक्ती पाहण्याकरिता देव्हाऱ्यातील देव याने गिळून टाकला, व आपणच हट्टाने रडून डोळे चोळू लागला. १ आपणच देव गिळून वेड पांघरले. यशोदेला देव्हाऱ्यातील मुख्य देव दिसेना. ती म्हणाली, कृष्णा, देव काय झाला रे ? तुझ्यावाचून येथे दुसरे कुणी नाही २ खरेच कृष्णावाचून देवघरात दुसरे कोणीच नव्हते, हे यशोदेला माहीत असूनही ती कृष्णाला विचारू लागली ३ प्रत्यक्ष देवापुढेच यशोदा देव काय झाला असे विचारू लागली. तिच्या या बोलण्याचे श्रीहरीला फार हसू आले ४ हरी मनात म्हणाला– हिच्याजवळ मी प्रत्यक्ष देव असताना मला देव म्हणून न जाणता खोट्या देवाला खरा मानते. ५ जे लोक लोभी व आशाबद्ध आहेत, ते खोट्याला खरे व खऱ्याला खोटे मानतात. ६ यशोदा जेव्हा रागाने देव काय झाला असे विचारू लागली तेव्हा देवाने तोंड उघडून 'आ' केला तेव्हा तिला त्या तोंडात अखिल ब्रह्मांड दिसू लागले ७ ज्याच्या उदरात चंद्र, सूर्य, तारागण आहेत, तो भक्ताकरिता बाळलीला करीत होता ८ कृष्णाची ही लीला व त्याचे महत्त्व कोणाला समजते ? कृष्ण देवाधिदेव व जगाचे जीवन आहे ९ देवाने जेव्हा विश्वरूपदर्शनाची गमत दाखविली, तेव्हा नंद व यशोदा हे दोघे कृष्णाच्या पाया पडू लागले १० व ते मायबाप म्हणू लागले, हा कृष्णच खरा देव आहे, इतर सर्व मिथ्या पसारा आहे ११ असे त्यांना कळल्याबरोबर कृष्णाने जो देव गिळला होता, तो त्यांना परत दिला, व म्हणाला; मीच ही कृती केली होती, आणि प्रतिमारूपी देवदेखील मीच आहे १२ म्हणून तुम्ही ज्याची देव समजून उपासना करीत आहात, त्या उपासनेचा विषय, पूजेचा भोग्य-भोक्ता मीच श्रीपती आहे. १३ अखिल ब्रह्मांडात मी आणि प्रतिमा यात वेगळेपणा नाही. कारण, सर्वात सामान्यरूपाने माझी व्याप्ती आहे १४ ज्या भावनेने व इच्छेने तुम्ही उपासना करीत आहात, त्या उपासनेचा विषय प्रत्यक्षात मीच असून त्याप्रमाणे

फळ देणाराही तोच आहे १५ जगात तोच एक खरा आहे हे तत्त्व देव गिळून दाखविण्याची लीला करून त्याने स्पष्ट दाखविले. १६ तुकाराम महाराज म्हणतात, सर्वाभूती नारायण आहे, हे रहस्य आपल्या निजभक्ताना बाललीलेच्या द्वारा दाखविले १७

४५३५ नारायण भूतीं न कळे जयांसि । तयां[1] गर्भवासीं येणें जाणें ॥ १ ॥
येणें जाणें होय भूतांच्या मत्सरें । न कळतां खरें देव ऐसा ॥ २ ॥
देव ऐसा जया कळला सकळ । गेली तळमळ द्वैतबुद्धि । ॥ ३ ॥
बुद्धीचा पालट नव्हे कोणे काळीं । हरि जळीं स्थळीं तयां[2] चित्तीं ॥ ४ ॥
चित्त ते निर्मळ जैसें नवनीत । जाणिजे अनंत तयामाजी ॥ ५ ॥
तयामाजी हरि जाणिजे त्या भावें । आपलें परावें सारिखेंचि ॥ ६ ॥
चिंतनें तयाच्या तरती आणीक । जो हें सकाळिक देव देखे ॥ ७ ॥
देव देखे तो ही देव कसा नव्हे । उरला संदेहे काय त्यासि ॥ ८ ॥
काया वाचा मनें पूजावे वैष्णव । म्हणउनि भाव धरूनियां ॥ ९ ॥
यांसि कवतुक दाखविलें रानीं । वोणवा गिळूनि गोपाळांसि ॥ १० ॥
गोपाळांसि डोळे झांकविले हातें । धरिलें अनंतें विश्वरूप ॥ ११ ॥
पसरूनि मुख गिळियेलें ज्वाळ । पहाती गोपाळ बोटां सांदी ॥ १२ ॥
संधि सारूनियां पाहिलें अनंता । म्हणती ते आतां कळलासी ॥ १३ ॥
कळला हा तुझा देह नव्हे देवा । गिळिला वोणवा आणीक तो ॥ १४ ॥
नो तयां कळला आरुषा गोपाळां । दुर्गम सकळां साधनासि ॥ १५ ॥
सीण उरे तुका म्हणे साधनाचा । भाविकांसि साचा भाव दावी ॥ १६ ॥

शब्दार्थ व टीपा – संदेह–संशय.

अर्थ – ज्याना सर्वाभूती नारायण आहे असे कळले, त्याना पुन. गर्भवास व जन्ममरण नाहीत. १ भूताचा मत्सर केल्यामुळे जन्ममरण प्राप्त होते देव व्यापक आहे असे एकदा कळल्यावर तो कोणत्याही भूताचा मत्सर करीत नाही २ त्याची तळमळ व द्वैतबुद्धी नष्ट होते. ३ ज्याला जळी, स्थळी, हरी भरला आहे, हे ज्ञान झाले आहे, जगात त्याच्या बुद्धीत कोणत्याही काळी बदल होत नाही ४ जो चित्तामधील अनंताला जाणतो त्याचे चित्त नवनीताप्रमाणे निर्मळ होते ५ सर्व प्राणिमात्रात हरी आहे असे ज्याने जाणले, तो सर्वाकडे हरीबुद्धीने पहातो. त्याला आपले व परके सारखेच वाटतात ६ जग देवस्वरूपच आहे असे जो जाणतो त्या महात्म्याचे चिंतन केले असता, सामान्यजनाचा उद्धार होतो. ७ जो देवाला जाणतो तो स्वत देव का बरे नसतो ? याविषयी संशय घेण्याचे कारणच काय आहे ? ८ देव जाणणाऱ्या वैष्णवाच्या ठिकाणी शुद्ध श्रद्धा ठेवून, त्याला कायावाचामनाने देव मानून त्याची पूजा करावी. ९ आपले व्यापकत्व देवानेच एका प्रसगी रानातील वणवा गिळून गोपाळाना कौतुकाने दाखविले १० वणवा लागल्यावर देवाने गोपाळाना हाताने डोळे झाकण्यास सांगितले; नतर विश्वरूप धारण केले ११ व तोंड पसरून अग्नीच्या ज्वाळा गिळून टाकल्या. हा सर्व प्रकार गोपाळ बोटाच्या फटींतून पाहू लागले १२ जेव्हा डोळ्यावरची बोटे दूर करून त्यानी अनताला पाहिले, तेव्हा ते म्हणाले–देवा, तू केवढा आहेस हे आता आम्हांला चांगले कळले आहे १३ देवा, तुझा हा दिसणारा देह मायिक असून तू दिसतोस तेवढा नाहीस, हे आम्हाला कळले आहे. कारण विश्वरूप धारण करून तू वणवा गिळलेला आम्ही प्रत्यक्ष पाहिला आहे. १४ त्या भोळ्या गोपाळांना देव कळला. परंतु जपतपादी योगसाधने करणाराना तो दुर्गम आहे. १५ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तिभावावाचून इतर साधने व्यर्थ आहेत, केवळ श्रम मात्र होतात. भाविकाना मात्र देव आपण होऊन आपले खरे स्वरूप दाखवितो. १६

१ होय, २ जया.

४५३६ भाव दावी शुद्ध देखोनिया चित्त । आपल्या अकित निजदासा ॥ १ ॥
सागे गोपाळासि काय पुण्य होतें । वाचलो जळते आगी हातीं ॥ २ ॥
आजि आम्हा येथें राखियेले[1] देवे । नाहीं तरी जीवे न वाचतो ॥ ३ ॥
न वाचल्या गाई जळतो सकळें । पूर्वपुण्यबळें वाचविले ॥ ४ ॥
पूर्वपुण्य होतें तुमचिये गाठी । बोले जगजेठी गोपाळासि ॥ ५ ॥
गोपाळासि म्हणे वैकुठनायक । भले तुम्ही एक पुण्यवत ॥ ६ ॥
करी तुका म्हणे करवी[2] आपण । द्यावे थोरपण सेवकासि ॥ ७ ॥

*शब्दार्थ व टीपा – अकित–ताब्यात, वश*

अर्थ – आपल्या ताब्यात असलेल्या आज्ञाधारक भक्ताना त्याचे शुद्ध चित्त पाहून देवाने एक वेगळाच अभिप्राय व्यक्त केला १ कृष्ण म्हणाला, गड्यानो, तुमच्या पूर्वपुण्याईमुळे आपण सर्वजण वणव्यातून वाचलो २ आज आपणा सर्वांना देवाने वाचविले, नाहीतर आपण सर्व जीवानिशी मेलो असतो ३ गाई, म्हशी, सर्व प्राणिमात्र जळून गेले असते तुमच्या पूर्वपुण्याच्या बळामुळे आपण सर्व वाचलो ४ जगजेठी म्हणाला, गोपाळानो, तुमच्या पदरी फार पूर्वपुण्य होते ५ तुम्ही फार पुण्यवान आहात असे सर्वश्रेष्ठ असलेला वैकुठनायक भगवान, गोपाळाना म्हणू लागला ६ तुकाराम महाराज म्हणतात, जगात सर्व कर्ताकरविता तोच स्वत आहे, परतु आपल्या भक्ताना थोरपणा द्यावा, असा भगवताच्या म्हणण्यातील अभिप्राय होता ७

४५३७ काय आम्हा चाळविसी वायाविण । म्हणती दुरून देखिलासि ॥ १ ॥
लावूनिया डोळे नव्हतो दुश्चित । तुज परचित्त भाव[3] होती ॥ २ ॥
होती दृष्टि आत[4] उघडी आमची । बाहेरी ते वायाचि कुची झाकू ॥ ३ ॥
जालासि थोरला थोरल्या तोडाचा । गिळियेला वाचा धूर आगी ॥ ४ ॥
आगी खातो ऐसा आमचा सागाती । आनदें नाचती भोवताली ॥ ५ ॥
भोंवतीं आपणा मेळविलीं देवे । तुका म्हणे ठायें नाहीं ज्ञान ॥ ६ ॥

*शब्दार्थ व टीपा – कुची–उगीच भाव–कपट*

अर्थ – गोपाळ म्हणाले–कृष्णा, तू आम्हाला निष्कारण का चाळवितोस ? तू वणवा गिळताना आम्ही दुरून पाहिले आहे १ तुझ्या म्हणण्याप्रमाणे जरी आम्ही डोळे झाकले होते तरी आम्ही असावध नव्हतो तू काय कपट करतोस इकडे आमचे पूर्ण लक्ष होते २ आम्ही बाहेरून जरी उगीच डोळे झाकले असले, तरी आमची दृष्टी आत उघडीच होती ३ तू मोठ्या तोंडाचा झालास, आणि तोंडाने आग आणि धूर खाऊ लागलास हे सर्व आम्ही प्रत्यक्ष पाहिले आहे ४ आमचा मित्र आग खाणारा आहे, असे म्हणून सर्व गोपाळ कृष्णाच्या भोवती नाचू लागले ५ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे बालक्रीडा करून देवाने आपल्या भोवती गोपाळ जमा केले, परतु त्याना देवाचे यथार्थ ज्ञान नव्हते ६

४५३८ नाहीं त्याची शका वैकुठनायका । नेणती ते एकाविण दुजा ॥ १ ॥
जाणतिया सर्वे येऊ नेदी हरि । तर्कवादी दुरी दुराविले ॥ २ ॥
वादियासी भेद निंदा अहकार । देऊनिया दूर दुराविले ॥ ३ ॥
दुरावले दूर आशाबद्ध देवा । करिता या सेवा कुटुबाची ॥ ४ ॥

१ वाचविले, २ करविता, ३ मान, ४ आत

चित्ती द्रव्यदारा पुत्रादिसंपत्ती । समान ते होती पशु नर ॥ ५ ॥
नरक साधिले विसरोनि देवा । बुडाले ते भवा नदीमाजी ॥ ६ ॥
जीहीं हरिसंग केला सवसारीं । तुका म्हणे खरी खेप त्याची ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – सवें–बरोबर दारा–पत्नी, बायको

अर्थ – ते गोपाळ आपल्यावाचून दुसरे काही जाणत नाहीत, याविषयी त्या वैकुंठनायक देवाला मुळीच शंका नव्हती १ ब्राह्मणपणाची घमेंड असणाऱ्याना तो हरी बरोबर येऊ देत नाही, तार्किक नास्तिकाना तर तो अतिशय दूर करतो २ मतवाद्याना निंदेचा अहेर करून तो बोळवितो ३ कुटुंबाची सेवा करणाऱ्या लोभी लोकाना तर तो जवळसुद्धा येऊ देत नाही ४ ज्याचे चित्त द्रव्य, बायको, पुत्र व इतर संपत्ती यांच्यात गुंतलेले आहे त्याना तो पशूसारखे समजतो ५ जे देवाला विसरले, त्यांनी नरक जोडला व ते भवनदीमध्ये पूर्ण बुडाले असे जाणावे ६ तुकाराम महाराज म्हणतात, ज्यानी संसारात राहून श्रीहरीची संगती केली, त्याचेच जगात येण्याचे सार्थक झाले त्याचाच मनुष्यजन्म सफळ झाला ७

४५३९ खेळींमेळीं आले घरा गोपीनाथ । गोपाळांसहित मातेपाशीं ॥ १ ॥
मातेपाशीं एक नवल सांगती । जाली तैसी ख्याती वोणव्याची ॥ २ ॥
ओवाळिले तिनें करूनि आरती । पुसे दसवती गोपाळांसि ॥ ३ ॥
पुसे पडताळुनी मागुती मागुती । गोपाळ सांगती कवतुक ॥ ४ ॥
कवतुक कानीं आइकतां त्याचें । बोलतां ये वाचे वीट नये ॥ ५ ॥
नयन गुंतले श्रीमुख पाहतां । न साहे लवतां आड पातें ॥ ६ ॥
तेव्हां कवतुक कळों आलें काहीं । हळूहळू दोहीं मायबापां ॥ ७ ॥
हळुहळु त्याचें पुण्य जालें वाड । वारलें हें जाड तिमिराचें ॥ ८ ॥
तिमिर हे तेथें राहों शके कैसें । जालिया प्रकाशें[1] गोविंदाच्या ॥ ९ ॥
दावी तुका म्हणे दंव ज्या आपणा । पालटे ते क्षणामाजी एका ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – वारले–नाहीसा झाला, वाड–थोर, जाड–आडपडदा

अर्थ – कृष्ण सर्व गोपाळांसह मोठ्या खेळीमेळीने घरी आले व आईजवळ येऊन बसले १ नंतर सर्व गोपाळांनी कृष्णाने वणवा गिळून टाकण्याचा पराक्रम कसा केला हे नवल यशोदेजवळ सांगितले २ यशोदेने कृष्णाला आरती ओवाळून दृष्ट काढली व काय काय घडले हे गोपाळांना विचारले ३ यशोदा तेच पुनः पुनः आश्चर्याने विचारू लागली व गोपाळही मोठ्या कौतुकाने सांगू लागले ४ वणवा गिळल्याचे कानाने ऐकताना व गोपाळांच्या वाणीने पुनः पुनः सांगताना कंटाळा मुळीच वाटत नव्हता ५ श्रीकृष्णाचा पराक्रम ऐकताना ती त्याच्याकडे एका वेगळ्याच दृष्टीने पाहू लागली पाहताना तिच्या डोळ्याचे पाते जरासुद्धा लवलेले तिला सहन होत नव्हते ६ हा प्रकार ऐकला तेव्हा नंदयशोदेला कृष्णाचे कौतुक हळूहळू कळून येऊ लागले ७ हळूहळू त्यांच्या अंतःकरणात थोर पुण्याचा अरुणोदय होऊन ज्ञानसूर्य प्रखर झाला, आणि त्यायोगे त्याचा अज्ञानरूपी अंधकाराचा आडपडदा नाहीसा झाला. ८ गोविंदाच्या ज्ञानाचा प्रकाश पडल्यानंतर अज्ञानरूपी अंधकार कसा राहू शकेल ? ९ तुकाराम महाराज म्हणतात, देवाने ज्यांना आपले तात्त्विक रूप दाखविले, त्यांच्या वृत्तीत एका क्षणात बदल होतो, त्यांची पूर्वीची भ्रमवृत्ती देवाचा साक्षात्कार झाल्यानंतर राहात नाही. १०

१ प्रकाश

४५४० काय आता यासि म्हणावे लेकरू । जगाचा हा गुरु मायबाप ॥ १ ॥
माया याची यासि राहिली व्यापून[1] । कळो नये क्षण एक होता ॥ २ ॥
क्षण एक होता विसरलीं त्यासि । माझें माझें ऐसे करी बाळा ॥ ३ ॥
करी कवतुक कळों नेदी कोणा । योजूनि कारणा तेचि खेळे ॥ ४ ॥
तें सुख लुटिलें घरिचिया घरीं । तुका म्हणे परी आपुलाल्या ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – नेदी–न देता

अर्थ – आता या कृष्णाला लहान, लेकरू तरी कसे म्हणावे ? हा तर जगाचा गुरू व मायबाप आहे १ याची माया याच्या ठिकाणी लपून राहिली आहे, त्यामुळे क्षणाची माया मनुष्याला मोहित करते, आणि तेवढ्यातच त्याच्या देवपणाचा विसर पडतो २ कारण क्षणभरातच यशोदेला कृष्णाच्या देवत्वाचा विसर पडला आणि ती 'माझे बाळ, माझे बाळ असे म्हणू लागली ३ तो कृष्णसुद्धा आपण काय कारस्थान करीत आहोत, हे कोणालाही कळू न देता नाना प्रकारची लीला करीत होता ४ तुकाराम महाराज म्हणतात, गोकुळातील लोकांनी कोठेही न जाता घरच्याघरीच कृष्णसुख याप्रमाणे लुटले ५

४५४१ आपुलाल्यापरी करितील सेवा । गीत गाती देवा खेळवूनि ॥ १ ॥
खेळु मांडियेला यमुने पावळीं । या रे चेंडुफळी खेळू आता ॥ २ ॥
आणविल्या डांगा चवगुणा काठी । वैसोनिया वांटी गडिया गडी ॥ ३ ॥
गडी जव पाहे आपणासमान । नाहीं नारायण म्हणे दुजा ॥ ४ ॥
जाणोनि गोविंदें सकळांचा भाव । तयासि उपाव तोचि सांगे ॥ ५ ॥
सांगे सकळांसि व्हा रे एकीकडे[2] । चेंडू राखा गडे[3] तुम्ही माझा ॥ ६ ॥
मज[4] हा न लगे आणीक सांगाती । राखावी बहुतीं हाल माझी ॥ ७ ॥
माझे हाके हाक मेळवा सकळ । नव जा वरळ एकमेका ॥ ८ ॥
एका समतुके अवघेचि राहा । जाईल तो पाहा धरा चेंडू ॥ ९ ॥
चेंडू धरा ऐसे सांगतो सकळां । आपण निराळा एकलाचि ॥ १० ॥
चिंतुनिया चेंडू हाणे ऊर्ध्वमुखें । ठेलीं सकळिक पाहातचि ॥ ११ ॥
पाहातचि ठेलीं न चलता कांहीं । यरु लवलाहीं म्हणे धरा ॥ १२ ॥
धरावा तयानें त्याचें बळ ज्यासि । येरा आणिकासि लाग नव्हे ॥ १३ ॥
नव्हे काम बळ बुद्धि नाहीं त्याचें । न धरवे निंचे उंचाविण ॥ १४ ॥
विचारीं पडिले देखिले गोपाळ । या म्हणे सकळ मजमागें ॥ १५ ॥
मार्ग देवाविण न दिसे आणिका । चतुर होत का बहुत जन ॥ १६ ॥
चतुर चिंतिती बहुत मारग । हरि जाय लाग पाहोनियां ॥ १७ ॥
यामागें जे गेले गोविंदा गोपाळ । ते नेले सीतळ पय ठाया ॥ १८ ॥
पथ जे चुकले आपल्या मतीचे । तयामागें त्याचें तेचि हाल ॥ १९ ॥
हाल दोघां एक मोहरा मागिला । चालतां चुकलां वाट पथ ॥ २० ॥
पथ पुढिलासी चालतां न कळे । मागिलानीं डोळे उघडावे ॥ २१ ॥
ययाचा प्रबोध विचार ज्या नाहीं । समान तो देहीं बाळकासी ॥ २२ ॥
सिकविलें हित नायिके जो कानीं[5] । त्यामागें भलपानीं जाऊं नये ॥ २३ ॥

१ व्यापून, २ एके ठायी, ३ भाइ, ४ मग, ५ कानी

नये तेंचि करी श्रेष्ठाचिया मना । मूर्ख एक जाणा तोचि खरा ॥ २४ ॥
रानभरी जाले न कळे मारग । मग तो श्रीरंग आठविला ॥ २५ ॥
लाज सांडूनियां मारितील हाका । कळलें नायका वैकुंठींच्या ॥ २६ ॥
चारी वेद ज्याची कीर्ती वाखाणीती । तया अति प्रीति गोपाळाची ॥ २७ ॥
गोपाळांचा धांवा आइकिला कानीं । सोयी चक्रपाणि पालविले ॥ २८ ॥
सांगा धरूनियां आले हरिपासीं । लहान थोरांसी सांभाळिलें ॥ २९ ॥
सांभाळिलें तुका म्हणे सकळ हि । सुखी जाले ते ही हरिमुखें ॥ ३० ॥

शब्दार्थ व टीपा – पावळीं–वाळवटात, डांगा–काठी, बरळ–वडबड, लाग–संबंध, प्रयत्न

अर्थ – सर्व गोपाळ आपआपल्या अधिकाराप्रमाणे श्रीहरीची सेवा करू लागले देवासी खेळ खेळून गाणी गाऊ लागले १ एकदा श्रीकृष्णाने यमुनेच्या तीरावर खेळ मांडला व तो म्हणाला, गड्यांनो, या, आता आपण चेंडूफळीचा खेळ खेळू २ मग कृष्णाने चार हात लांब असलेल्या जाड काठ्या आणविल्या व मध्यभागी बसून दोन्ही पक्षाकडे गडी वाटू लागला ३ या खेळात आपणाला उपदेश करण्यास योग्य असे सर्व भक्तगडी आहेत, दुसरा अभक्त, तार्किक, दुराचारी कोणी नाही, असे त्याने जाणले ४ सर्वांची खेळण्याची इच्छा कृष्णाने जाणली, व कसा खेळ खेळावयाचा हेदेखील कृष्णानेच सांगितले ५ कृष्ण म्हणाला, तुम्ही सर्वजण एका पक्षाला व्हा मी एकटा एकीकडे होतो व मी जेव्हा चेंडू फेकेन तेव्हा तुम्ही झेला ६ मला दुसरा कोणी सोबती नको चेंडू फेकताना मी हाक देईन, तेव्हा तुम्ही सर्वांनी सावध राहिले पाहिजे ७ तुम्ही सर्वांनी माझ्या हाकेला हाक दिली पाहिजे, त्या वेळी भलते काही बोलू नका ८ तुम्ही सर्वजण एका अधिकाराचे भक्त एका बाजूने सावध राहा. मी जेव्हा उपदेशरूपी चेंडू तुमच्याकडे फेकेन त्यावेळी तो विचाराने धरा नाहीतर तो इकडेतिकडे जाईल वाया ९ चेंडू धरा, असे पुन्हा एकदा तुम्हा सर्वांना सांगतो असे म्हणून श्रीकृष्ण एकटाच एका बाजूला झाला १० आणि पुढील कामाची योजना करून त्याने चेंडू आकाशात फेकला तेव्हा सर्व गोपाळ पाहातच उभे राहिले, ११ सगळे नुसतेच उभे राहिलेले पाहून श्रीकृष्ण म्हणाला, अरे, चेंडू धरा, उगीच काय पाहात बसला आहात? १२ देवाचे ज्याला बळ असेल, तोच त्याचा चेंडू धरील. त्यावाचून आणिकांचा संबंध नाही किंवा त्यांचे प्रयत्न फुकट जातील. १३ ज्याच्याजवळ इच्छा व बुद्धिबळ नाही, व जो अधिकारानेही नीच आहे त्याला हा चेंडू धरता येणार नाही. १४ सर्व गोपाळ चेंडू वर गेलेला पाहून विचारात पडले, तेव्हा श्रीकृष्ण म्हणाला, तुम्ही माझ्या मागे या मी तुम्हाला सोपा मार्ग सांगतो १५ जगात पुष्कळ लोक चतुर, शहाणे असले तरी पण त्यांना देवाचे साहय न घेता, हिताचा मार्ग दिसणे शक्य नाही. १६ शहाणे देवाचे साहय न घेता आपल्या बुद्धीने हिताच्या मार्गाचा विचार करतात. पण त्या मार्गाने हित होत नाही हा हरी वेदाचा आधार घेऊन दुसऱ्याला मार्ग दाखवितो. म्हणून त्याने दाखविलेला मार्ग बिनचूक असतो १७ जे त्याच्या मागे गेले, त्यांना देवाने सोप्या व सुखकर अशा भक्तिमार्गाने नेले व स्वस्थानी पोचविले १८ जे आपल्या बुद्धीच्या घमेंडीने कोणत्या मार्गाने गेले, आणि त्यांच्यावर भरोसा ठेऊन जे त्यांच्या मागे गेले, त्या सर्वांचे फार हाल झाले १९ स्वबुद्धीने पुढे चालणारे व त्यांच्यावर अंधश्रद्धा ठेऊन त्यांच्या मागे जाणारे, या दोघांचे सारखेच हाल होणार कारण मूळातच त्यांनी चुकीचा मार्ग अवलंबिला होता २० जरी पुढच्यांना हा मार्ग चुकीचा आहे हे कळले नाही, तरीपण मागच्यांनी विचारपूर्वक डोळे उघडे ठेऊन चालणे आवश्यक आहे २१ अधिकार नसताना जो दुसऱ्याला मार्गदर्शन करतो, तो मनुष्य वयाने वृद्ध असला तरीसुद्धा त्याला लहान बालकाप्रमाणे अज्ञानी समजावे २२ जो मनुष्य जाणत्यांनी केलेला उपदेश ऐकत नाही, त्याच्यामागे शहाण्यांनी जाऊ नये २३ जगाला उपदेश करणाऱ्या श्रेष्ठांच्या मनाला जे करणे योग्य वाटत नाही, तो ते जाणूनबुजून करतो. तो महामूर्ख असे निश्चितपणे समजावे २४ खरा मार्ग चुकल्यामुळे काही गोपाळ रानभर विखुरले गेले मग त्यांनी कृष्णाचे स्मरण केले २५ अभिमान टाकून मुक्त कंठाने कृष्णाला हाका मारल्या, तेव्हा वैकुंठनायक कृष्णाला त्यांचा भाव कळला २६ चार वेद ज्याची

कीर्ती गातात त्या श्रीहरीला गोपाळांविषयी फार प्रेम वाटत होते. २७ गोपाळांचा धावा ऐकून, कृष्णाने दूर असलेल्या गोपाळांना आपल्याकडे येण्याविषयी खुणावले. २८ मग योग्य मार्गाने ते हरीजवळ आले. हरीने त्या लहान, थोर, भोळ्या गोपाळांचा सांभाळ केला. २९ तुकाराम महाराज म्हणतात, पुढे ते गोपाळसुद्धा हरीच्या मुखाने उपदेश ऐकून सुखी झाले. ३०

४५४२ मुखें सांगे त्यांसि पैल चेंडू पाहा । उदकांत डोहाचिये मायां ॥ १ ॥
मायां कळंबाचे अवघडा ठायीं । दाखियेला डोहीं जळामाजी ॥ २ ॥
जळांत पाहातां हाडति[1] या दृष्टि । म्हणे जगजेठी ऐसें नव्हे ॥ ३ ॥
नव्हे साच चेंडू छाया दिसे आंत । खरा तेथें चित्त लावा वरी ॥ ४ ॥
वरी देखियेला अवघ्यांनीं डोळां । म्हणती गोपाळा आतां कैसें ॥ ५ ॥
कैसें करूनियां उतरावा खालीं । देखोनिया भ्यालीं अवघीं डोहो ॥ ६ ॥
डोहो बहु खोल काळया भीतरी । सरलीं माघारीं अवघीं जणें ॥ ७ ॥
जयाचें कारण तयासीच ठावें । पुसे त्याच्या भावें त्यास हरि ॥ ८ ॥
त्यासि नारायण म्हणे राहा तळीं । चढे वनमाळी झाडावरी ॥ ९ ॥
वरि जातां वरि[2] पाहाती गोपाळ[3] । म्हणती सकळ[4] आम्ही नेणों ॥ १० ॥
नेणों म्हणती हें करितोसि काई । आम्हां तुझी आई देईल सिव्या ॥ ११ ॥
आपुलिया कानां ठेवुनियां[5] हात । सकळीं निमित्य टाळियेलें ॥ १२ ॥
निमित्याकारणें रचिलें कारण । गेला नारायण खांदीवरी ॥ १३ ॥
खांदीवरी पाय ठेवियेला देवें । पाडावा त्या भावें चेंडू तळीं ॥ १४ ॥
तळील नेणती तुका म्हणे भाव । अंतरींचा देव जाणों नेदी ॥ १५ ॥

*शब्दार्थ व टीपा :– हाडति–खाली, तिरकी.*

अर्थ :– गड्यांनो, पाहा बरे आपला चेंडू कोठे दूर गेला आहे ? यमुनेच्या डोहात का कळंबाच्या माथ्यावर अडकला आहे ? १ कृष्णाने त्यांना कळंबाचे माथ्यावर, अवघड अशा ठिकाणी चेंडू दाखविला व यमुनेच्या डोहात पण दाखविला. २ सर्व गोपाळ खाली नजर करून, तिरक्या दृष्टीने पाहू लागले, तेव्हा श्रीकृष्ण म्हणाला, अरे, असे नाही. ३ तुम्ही पाहता तो चेंडू नव्हे, ती चेंडूची छाया आहे ! जेथे खरा चेंडू आहे, तेथे लक्ष देऊन पाहा. ४ मग सर्वांनी कळंबाच्या फांदीवर अडकलेला चेंडू पाहिला; तेव्हा गोपाळ म्हणाले, आता चेंडू कसा रे काढावा ? ५ आता कसे तरी करून तुम्ही वर चढा आणि चेंडू खाली काढून घ्या. त्याशिवाय दुसरा काय मार्ग आहे ? असे म्हणताच सर्व मुले भयंकर डोहाला पाहून भ्याली. ६ कृष्णा, हा डोह फार खोल आहे; शिवाय आत कालिया नावाचा मोठा सर्प आहे असे म्हणतात. फांदीवरून खाली पडलो तर आमचे कसे होईल ? असे म्हणून सर्व मागे सरले. ७ ज्याचे कारस्थान त्यालाच कळत असते. कृष्णाने त्यांचा भाव समजून घेण्याकरिताच केवळ विचारले होते. ८ नारायण म्हणाला, गड्यांनो, तुम्ही सर्वजण या कळंबाचे खाली बसा. मी एकटाच वर जातो असे म्हणून तो भराभर झाडावर चढला. ९ श्रीहरी वर चढत असलेला पाहून गोपाळ म्हणाले, तू तुझ्या जबाबदारीवर चढ. आम्हांला काही कळत नाही. १० तू जे काय करीत आहेस त्याला आमची संमती पण नाही; कारण तुझे काही बरे-वाईट झाले तर तुझी आई आम्हांला निष्कारण शिव्या देईल. ११ असे म्हणून सगळ्यांनी कानावर हात ठेवले. आपल्यावरची जबाबदारी त्यांनी धुळीप्रमाणे झटकून टाकली. १२ कालियाला घालवून देण्याकरिताच देवाने हे निमित्य रचले होते. तो

१ आडतीये दृष्टि, २ हरि, ३ सकळ, ४ गोपाळ, ५ देऊनियां.

फळव्यावर गेला १३ फळव्याच्या एका फांदीवर त्याने अशा त-हेने पाय ठेविला की, चेंडू पाण्यात पडावा देवाला चेंडू मुद्दामच डोहात पाडवयाचा होता १४ तुकाराम महाराज म्हणतात हा देवाच्या मनातील भाव वृक्षाच्या खाली बसलेल्या गोपाळाना काय माहीत? देवानेही त्याना खरे रहस्य कळू दिले नाही. १५

४५४३ नेदी कळों केल्याविण ते कारण । दाखवी आणून अनुभवा ॥ १ ॥
न पुरेसा हात घाली चेंडूकडे । म्हणीतले गडे सांभाळावे ॥ २ ॥
सांभाळ करिता सकळां जिवाचा । गोपाळांसि वाचा म्हणे बरें ॥ ३ ॥
बरें विचारुनी करावे कारण । म्हणे नारायण वऱ्या वरें ॥ ४ ॥
बरें म्हणउनि तयांकडे पाहे । सोडविला जाय चेंडू तळा ॥ ५ ॥
तयासवें उडी[1] घातली अनंतें । गोपाळ रडत येती घरा ॥ ६ ॥
येतां त्यांचा लोकीं देखिला कोल्हाळ । समोरीं सकळ आलीं पुढें ॥ ७ ॥
पुसती ते मात आपआपल्यांसि । हरिदु खें त्यासी न बोलवे ॥ ८ ॥
न बोलवे हरि बुडालासे मुखें । कुटितील दु खें उर माथे ॥ ९ ॥
मायबापें तुका म्हणे न देखती । ऐसे दु ख चित्तीं गोपाळांच्या ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – कोल्हाळ-कोलाहल, गागाट

अर्थ – देव कोणतेही कार्य करण्याअगोदर कळू देत नव्हता प्रत्यक्ष कार्यच अनुभवाला आणून दाखवीत होता १ त्याने चेंडूपर्यंत हात लांब करून, मुद्दामच असे भासविले की चेंडूपर्यंत हात पोचत नाही २ त्यावेळी सर्वांनी ओरडून सांगितले, कृष्णा, सांभाळ रे बाबा ! तोल सुटेल ३ सर्वांचा सांभाळ करणारा देव त्यांना म्हणाला, बरे आहे, तुम्ही काळजी करू नका. ४ नारायणाने गोपाळांकडे पाहात मुद्दामच चेंडू फांदीवरून खाली डोहात पाडला. ५ आणि लगेच अनंताने डोहात उडी टाकली मग काय! सर्व गोपाळ रडत रडत घरी आले. ६ गावात आल्याबरोबर लोकांनी त्या रडण्याचा कोलाहल ऐकिला आणि सर्वजण पुढे आले. ७ सर्वजण त्यांना रडण्याचे कारण विचारू लागले, पण कृष्णाच्या दु:खामुळे त्यांना बोलवेना ८ सर्व लोक दु:खाने ऊर, डोके फोडून घेतील म्हणून हरी बुडाला हे वृत्त त्यांना आपल्या तोंडाने सांगवेना ९ तुकाराम महाराज म्हणतात, प्रत्यक्ष आईबाप पुढे आलेलेही त्यांना दिसत नव्हते, इतके दु ख गोपाळांच्या मनाला झाले होते १०

४५४४ गोपाळां उभड नावरे दु खाचा । कुटित हे वाचा जाली त्यांची ॥ १ ॥
जालें काय ऐसें न कळे कोणासी । म्हणती तुम्हांपासीं देव होता ॥ २ ॥
देवासवें दु ख न पवते ऐसें । कांहीं अनारिसें दिसे आजी ॥ ३ ॥
आजि दिसे हरि फाकला यापासीं । म्हणउनि ऐसी परि जाली ॥ ४ ॥
जाणविल्याविण कैसें कळे त्यांसि । शाहाणे तयांसि कळों आलें ॥ ५ ॥
कळों आलें तोंहीं फुंद शांत केला । ठायींचाच त्याला थोडा होता ॥ ६ ॥
होता तो विचार सांगितला जना । गोपाळ शाहाणा होता त्याणें ॥ ७ ॥
सांगे आतां हरि तुम्हां आम्हां नाहीं । बुडाला तो डोहीं यमुनेच्या ॥ ८ ॥
यासी अवकाश नव्हेचि पुसतां । जालिया अनंता कोण परि ॥ ९ ॥
परि त्या दु खाची काय सांगों आतां । तुका म्हणे माता लोकपाळां ॥ १० ॥

---
१ दडी

शब्दार्थ व टीपा :- उमडू-उमाळा

अर्थ :- त्या गोपाळाना दु खाचा उमाळा आवरत नव्हता. दु खाने त्याची वाचाच बद झाली होती. १ गोपाळाचे दु ख पाहून सर्वांना दु ख झाले, पण काय झाले हे कोणालाच कळले नाही. सर्वांनी विचारले, अरे पोरानो, तुमच्या बरोबर देव होता ना ? २ देव बरोबर असल्यावर दु ख प्राप्त होण्याचे कारणच नाही. परतु आज काही विपरीत प्रकार घडलेला दिसतो. ३ आज हरी याच्यापासून दूर गेला असला पाहिजे, म्हणूनच हा प्रकार झाला आहे ४ सांगितल्यावाचून सामान्य लोकाना कसे कळणार ? पण जे जाणते होते त्याच्या सर्व लक्षात आले. ५ शहाण्या लोकानी गोपाळाचा शोक शात केला. मूळातच त्याना कृष्णाविषयी उत्कट प्रीती नव्हती म्हणूनच तो शांत होऊ शकला, इतर प्रेमळ गोपाळ रडतच होते, त्याच्या तोंडावाटे एक शब्दही निघेना. ६ परतु त्यातला जो एक विचारी आणि शहाणा गोपाळ होता, त्याने जो खरा प्रकार घडला तो सांगितला. ७ श्रीहरी आता तुमच्याआमच्यात नाही तो यमुनेच्या डोहात बुडाला ८ पुढे अनताचे काय झाले, हे विचारावयास कोणीच अवकाश दिला नाही. ९ तुकाराम महाराज म्हणतात, ते दु खदायक वृत्त ऐकल्याबरोबर एकदम वज्राघात झाल्याप्रमाणे नदयशोदा व इतर वृदावनवासी हबरडा फोडून रडू लागले त्या दु खाची कोणालाच कल्पना करवत नाही. १०

४५४५ पाषाण फुटती ते दु.ख देखोनि । करितां गौळणी शोक लोका ॥ १ ॥
काय ऐसे पाप होतें आम्हांपाशीं । बोलती एकासी एक एका ॥ २ ॥
एकाचिये डोळा असुं बाह्यात्कारी । नाहीं तीं अंतरीं जळतील ॥ ३ ॥
जळतील एके अंतर्बाह्यात्कारें । टाकिलीं लेकुरे कडियेहूनि ॥ ४ ॥
निचेतचि एके राहिलीं निश्चित । बाहेरी ना आत जीव त्याचे ॥ ५ ॥
त्याचे जीव[1] वरी आले त्या सकळा । एका त्या गोपाळावाचूनिया ॥ ६ ॥
वाचणे तें आता खोटें[2] सवसारीं । नव्हे भेटी जरी हरिसवे ॥ ७ ॥
सवे घेऊनियां चालली गोपाळा । अवघींच बाळा नर नारी ॥ ८ ॥
नर नारी नाहीं मनुष्याचें नाव । गोकुळ हे गाव साडियेलें ॥ ९ ॥
साडियेलीं अन्नें संपदा सकळ । चित्तीं तो गोपाळ धरूनि जाती ॥ १० ॥
तिरीं माना घालूनिया उभ्या गाई । तटस्थ या डोहीं यमुनेच्या ॥ ११ ॥
यमुनेच्या तिरीं झाडें वृक्ष वल्ली । दुःखें कोमाइलीं कृष्णाचिया ॥ १२ ॥
पांचें त्याचें दुःख एक जाले तिरीं । मग शोक करी मायबाप ॥ १३ ॥
मायबाप तुका म्हणे सहोदर । तोंवरीच तीर न पवतां ॥ १४ ॥

शब्दार्थ व टीपा -असु-अश्रू, पाणी, कोमाइलीं-कोमेजून गेल्या, सहोदर-बधू वगैरे

अर्थ - गौळणी व गोपाळ याचा शोक पाहून दगडालासुद्धा पाझर फुटू पाहात होता. १ ते परस्पराना म्हणू लागले, असे कोणते आमचे पाप होते म्हणून आज हरी आम्हाला अतरला ? २ काही दाभिक गौळणी वरवर लोकाना दाखविण्याकरिता रडत होत्या, पण काहींचे अत करण करपून गेले होते. ३ काही अतर्बाह्य दु खी झाल्या त्यानी दु खाच्या वेगामुळे उभ्यानेच कडेवरची लेकरे टाकून दिली ४ काही गौळणी दु खावेगाने कर्तव्यमूढ होऊन, धड आत चित्त नाही, धड बाहेर नाही, अशा स्थितीत बसल्या होत्या अशी त्याची पालनेलस्थिती झाली होती ५ काहींचे तर कृष्णावाचून प्राण जाऊ पाहात होते ६ जर हरीची भेट होणार नसेल तर ससारात व्यर्थ जगून तरी काय करावयाचे आहे ७ असे म्हणून त्या गोपाळांबरोबर सर्व स्त्री-पुरुष यमुनेच्या डोहाकडे निघाले ८ गोकुळात माणसे राहिलीच नाहीत सर्व गाव ओस पडले ९ सर्व गोपाळ घरे, दारे, सपत्ती सर्व सोडून कृष्णाचा

१ जीवा वरी, २ कोठें

विचार करत निघाले होते १० यमुनेच्या तीरावर सर्व गाई दुःखाने माना खाली घालून तटस्थ उभ्या होत्या ११ यमुनेच्या तीरावरील झाडे, झुडपे, वेली कृष्णाच्या दुःखाने कोमेजून गेल्या होत्या. १२ प्राणिमात्राचे दुःख एक झाले यशोदा–नंदाच्या दुःखाला तर पारावारच राहिला नाही. १३ तुकाराम महाराज म्हणतात, तीरावर पोचले नव्हते तोवरच आई-बाप, बंधू, मित्र होते, डोहात बुडी मारून कृष्णाला वर काढण्याचा जेव्हा प्रसंग आला तेव्हा सर्वजण मागे सरले १४

४५४६ तीर देखोनियां यमुनेचें जळ । कांठींच कोल्हाळ करिताती ॥ १ ॥
कइवाड नव्हे घालावया उडी । आपणासि ओढी भय मागें ॥ २ ॥
मागें सरे माय पाउला पाउलीं । आपलेंच घाली धाके अंग ॥ ३ ॥
अंग राखोनियां माय[1] खेद करी । अंतरीचें हरी जाणवलें ॥ ४ ॥
जाणवलें मग देवें दिली बुडी । तुका म्हणे कुडी भावना हे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– कइवाड–युक्ती, कैंवार, कुडी–वाईट

अर्थ :– यमुनेचा अथांग डोह पाहून तीरावर बसूनच सर्व लोक कोलाहल करू लागले १ परंतु एकानेही डोहात उडी मारून कृष्णाला वर काढण्याचे धैर्य दाखविले नाही, युक्ती योजिली नाही आपणच आपला पाय भयाने ओढू लागले. २ कृष्णाकरिता आक्रोश करणारी यशोदा तर एक एक पाऊल मागे सरकू लागली आणि आपल्यालाच मरण येते की काय या भयाने तिने जमीनीवर अंग टाकले ३ स्वतःचे अंग राखून आई शोक करीत आहे, हे श्रीहरीला कळून चुकले ४ तुकाराम महाराज म्हणतात, सर्वांची खोटी भावना आहे हे ओळखूनच देवाने डोहात बुडी दिली होती. ५

४५४७ भावनेच्या मुळें अंतरला देव । शिरला संदेह भयें पोटीं ॥ १ ॥
पोटीं होतें मागें जीव द्यावा ऐसें । बोलिल्या सरिसें न करवे ॥ २ ॥
न करवे त्याग या जीवाचा नास । नारायण त्यास अंतरला ॥ ३ ॥
अंतरला बहु बोलता वाउगें । अंतरींच्या त्यागेंविण गोष्टी ॥ ४ ॥
गोष्टी सकळांच्या आइकिल्या देवें । कोण कोण्याभावें रडती तीं ॥ ५ ॥
तीं गेलीं घरास आपल्या सकळ । गोधनें गोपाळ लोक माय ॥ ६ ॥
मायबापाची तों ऐसी जाली गति । तुका म्हणे अंतीं कळों आलें ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – पाठीमोरी–अंतरला.

अर्थ –आपण डोहात बुडी मारली तर निश्चित मरू या भयाने व देवाविषयी दांभिक प्रेम या दोन्ही कारणामुळे त्यांना देव अंतरला होता. १ घरून निघताना त्यांच्या मनात डोहात उडी मारून आपण पण जीव द्यावा असा होता पण प्रत्यक्ष प्रसंग आल्यावर योजिल्याप्रमाणे करणे कठीण गेले २ त्यांना त्याग व जीवाचा नाश करवेना, म्हणून त्यांना नारायण अंतरला ३ अंतःकरणात वैराग्यपूर्ण त्याग नसताना भक्तिप्रेमाच्या निरर्थक गोष्टी ते बोलू लागले, म्हणून त्यांना देव अंतरला. ४ कोण कोणत्या भावनेने बोलत आहे, रडत आहे, हे सर्व अंतर्ज्ञानी हरीने जाणले व ऐकले होते ५ शेवटी गाई, गोपाळ, नंद, यशोदा हे सर्व आपआपल्या घरी निघून गेले ६ तुकाराम महाराज म्हणतात, प्रत्यक्ष आईबापाची ही गती, तर इतरांची गोष्टच काय आहे ? आपल्यावर खरे प्रेम करणारे कोण आहेत हे प्रत्येकाला अंतकाळी कळत असते. ७

---

१ माया.

४५४८ आला त्याचा भाव देवाचिया मना । अंतरीं कारणासाठीं होता ॥ १ ॥
होता भाव त्याचा पाहोनि निराळा । नव्हता पाताळा गेला आधीं ॥ २ ॥
आधीं पाठीमोरीं जालीं तीं सकळें । मग या गोपाळें बुडी दिली ॥ ३ ॥
दिली हाक त्याणे जाऊनि पाताळा । जागविले काळा भुजगासि ॥ ४ ॥
भुजंग हा होता निजला मंदिरी । निर्भर अंतरीं गर्वनिधि ॥ ५ ॥
गर्व हरावया आला नारायण । मिस या करून चेंडुवाचे ॥ ६ ॥
चेंडुवाचे मिसे काळया नाथावा । तुका म्हणे देवा कारण हें ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – नाथावा–खोड मोडावी, कारण–उद्देश, हेतू

अर्थ – त्या सर्वांचा भाव यापूर्वीच देवाच्या मनाला कळला होता पण डोहात तो वेगळ्याच कार्या-करिता गेला होता १ देव सुरवातीला पाताळात गेला नव्हता साधारण वरच होता सर्व लोकांचा डोहावर येण्या-पूर्वीचा *प्रेमभाव नंतर राहिला नाही देहाविषयी आसक्ती निर्माण झाली* २ *यमुनेच्या तीरावर आलेले लोक परत* गेलेले जेव्हा पाहिले तेव्हा त्याने डोहात खोलवर झेप घेतली ३ पाताळात जाऊन मोठ्याने हाक मारली व कालिया नावाच्या भुजंगाला त्याने जागे केले ४ तो भुजंग आपल्या घरात स्वस्थ झोपला होता, तो मोठा स्त्री-पुत्र-पौत्रादीसंपन्न असून गर्वाचा तर निधीच होता ५ हा नारायण चेंडूचे निमित्त करून त्याचा गर्व हरण करण्या-करिताच पाताळात गेला होता ६ तुकाराम महाराज म्हणतात, कालियाची खोड मोडावी हाच देवाचा उद्देश होता ७

४५४९ काळयाचे मागे चेंडु पत्नीपाशीं । तेज.पुंज राशी देखियेला ॥ १ ॥
लावण्यपुतळा मुखप्रभाराशी । कोटि रवि शशी उगवले ॥ २ ॥
उगवला खांब कर्दळीचा गाभा । ब्रीदें वाकी नभा देखे पायीं ॥ ३ ॥
पाहिला सकळ तिने न्याहाळूनि । कोण या जननी विसरली[1] ॥ ४ ॥
विसरु हा तीस कैसा याचा जाला । जीवाहूनि वाला[2] दिसतसे ॥ ५ ॥
दिसतसे रूप गोजिरे लाहान । पाहता लोचन सुखावले ॥ ६ ॥
पाहिले परतोनि काळा दुष्टाकडे । मग म्हणे कुडें जालें आता ॥ ७ ॥
आता हा उठोनि खाईल या बाळा । देईल वेल्हाळा माय जीव ॥ ८ ॥
जीव याचा कैसा वाचे म्हणे नारी । मोहिली अंतरीं हरिरूपें ॥ ९ ॥
रूपें अनंताचीं अनंतप्रकार[3] । न कळे साचार तुका म्हणे ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – कुडे–वाईट, वाला–प्रेम करण्यासारखा, आवडता

अर्थ – कालियाच्या पत्नीजवळ कृष्णाने चेंडू मागितला, तेव्हा तिने एकदम तेज पुंज व्यक्ती बघितली १ लावण्याचा पुतळा, जणू कोटी सूर्यचंद्र उगवले आहेत अशी ज्याची मुखप्रभा २ कर्दळीच्या खांबासारखी ज्याची गुबगुबीत अंगकाठी, पायात तोडे, हातात वाकी, मेघाप्रमाणे नीलवर्ण ३ असा तो श्रीकृष्ण नागपत्नीने बघितला त्याचे अंगअंग न्याहाळून पाहिले व म्हणाली, कोण अशी निष्ठुर आई जी आपल्या सुंदर बाळाला पाण्यात पडला म्हणून विसरली ? ४ हे बाळ जीवापेक्षाही प्रेम करण्यासारखे असून याचा तिला कसा विसर पडला ? ५ याचे रूप किती लहान, सुंदर आणि कोमल आहे माझे तर डोळे याला पाहून विसावले, तृप्त झाले आहेत ६ जेव्हा नाग-पत्नीने आपला दुष्ट काळा नवरा जागा झालेला पाहिले तेव्हा ती दुःखाने म्हणाली, हे मात्र आता वाईट झाले. ७ आता हा दुष्ट उठून या बाळाला खाऊन टाकेल. व मग त्याची प्रेमळ आई पुत्रमरण ऐकून जीव देईल ७ हरीच्या

---

१ विसवली, २ वाल्हा, ३ अनंत अपार

रूपाने मोहित झालेली ती नारी, बाळाचा जीव कोणत्या प्रयत्नाने वाचेल याचा विचार करू लागली ९ तुकाराम महाराज म्हणतात, हा अनंत, अनंत प्रकारची रूपे धारण करतो, पण बहिर्मुखाला ती कळत नाहीत १०

४५५० म्हणे चेंडू कोणें आणिला या ठाया । आलो पुरवाया कोड त्याचें ॥ १ ॥
त्याचें आईकोन निष्ठुर वचन । भयाभीत मन जाले तीचें ॥ २ ॥
तिची चित्तवृत्ति होती देवावरी । आधीं ते माघारी फिरली वेगीं ॥ ३ ॥
वेगीं मन गेलें भ्रताराचे सोयी । विघ्न आले काहीं आम्हांवरी ॥ ४ ॥
वरि उदकास अंत नाहीं पार । अक्षोभ सागर भरलासे ॥ ५ ॥
संचार करूनि कोण्या वाटे आला । ठायींच देखिला अवचिता ॥ ६ ॥
अवचिता नेणो येथें उगवला । दिसे तो धाकुला बोल मोठे ॥ ७ ॥
मोठ्यानें बोलतो भय नाहीं मनीं । केला उठवूनी काळ जागा ॥ ८ ॥
जागविला काळसर्प तये वेळीं । उठिला कल्लोळीं विषाचियें ॥ ९ ॥
यमुनेच्या डोहावरी आला ऊत । काळयाकृतांतधुधुकारें ॥ १० ॥
कारणें ज्या येथें आला नारायण । जाले दरुषण दोघामध्यें ॥ ११ ॥
दोघामध्यें जाले बोल परस्परें । प्रसंग उत्तरें युद्धाचिया ॥ १२ ॥
चिंतावला चित्तीं तोंडें बोले काळ । करीन सकळ ग्रास तुझा ॥ १३ ॥
जाला सावकाश झेंप घाली वरी । तंव हाणे हरि मुष्टिघातें ॥ १४ ॥
तेणें काळें त्यासि दिसे काळ तैसा । हरावया जैसा जीव आला ॥ १५ ॥
आठवले काळा हाकारिलें गोत । मिळालीं बहुत नागकुळें ॥ १६ ॥
कल्हारीं सधानीं वेष्टियेला[1] हरि । अवघा विखारीं व्यापियेला ॥ १७ ॥
यास तुका म्हणे नाहीं भक्ताविण । गरुडाचें चिंतन केलें मनीं ॥ १८ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड–लाड, कल्हारीं–कमळाप्रमाणे, सधानीं–युक्तीने.

अर्थ – माझा चेंडू येथे कोणी आणला ? मी आता त्याचे लाड पुरविण्याकरिताच त्याला वठणीवर आणण्याकरिताच आलो आहे १ हे कृष्णाचे निष्ठुर बोलणे ऐकून नागपत्नीचे मन भयभीत झाले २ प्रथम तिचे मन देवावर जडले होते, पण आपल्या नवऱ्याचा नाश करण्याकरिताच हा आला आहे हे समजताच तिचे मन तावडतोब प्रतिकूल झाले ३ ते नवऱ्याकडे वळले तिला वाटले, आपल्यावर ही नसती आपत्ती आली ४ या डोहातील पाण्याला अंतपार नाही एवढा हा डोह अथांग भरलेला असताना ५ कोणत्या वाटेने हा आत शिरला असेल ? येथे अकस्मात हा आला कसा ? ६ का येथेच तो प्रगट झाला ? हा दिसायला लहान दिसला तरी बोलणे विचारवंतासारखे आहे ७ हा किती मोठ्याने बोलत आहे ? याला भय कसे वाटत नाही ? याने तर हाका मारून कालियाला जागे केले, यावरून हा सामान्य दिसत नाही ८ हरीने जेव्हा कालियाला जागे करून उठविले, तेव्हा यमुनेच्या पाण्यावर विषाच्या बुडबुड्याच्या लाटा निर्माण झाल्या ९ कृतांत काळासारखा असलेला कालिया फुसकारीत उठला तेव्हा त्याच्या विषाग्नीने यमुनेच्या डोहाला ऊत आला १० देव ज्या कारणाकरिता पाताळात आला होता त्यानुसार कालियामध्ये आणि देवामध्ये प्रथम दृष्टिभेट झाली ११ परस्पराचे युद्धाला पाचारण करण्याचेच बोलणे झाले १२ कृष्णाला पाहून कालिया घाबरला, पण खोटेच अवसान आणून म्हणाला, अरे मी तुला आताच गिळून टाकतो १३ असे म्हणून त्याने सावकाश कृष्णावर झेप टाकली, तोच कृष्णाने त्याच्या ताडावर जोराने मूठ मारली १४ तेव्हा कालियाला वाटले की प्रत्यक्ष काळच आपला प्राण घेण्यासाठी येथे आला

१ धरियेला

रूपाने मोहित झालेली ती नारी, याळाचा जीव कोणत्या प्रयत्नाने वाचेल याचा विचार करू लागली ९ तुकाराम महाराज म्हणतात, हा अनंत, अनंत प्रकारची रूपे धारण करतो, पण बहिर्मुखाना ती कळत नाहीत १०

४५५० म्हणे चेंडू कोणें आणिला या ठाया । आलो पुरवाया कोड त्याचें ॥ १ ॥
त्याचें आईकोन निष्ठुर वचन । भयाभीत मन जाले तीचें ॥ २ ॥
तिची चित्तवृत्ति होती देवावरी । आधीं ते माघारी फिरली वेगीं ॥ ३ ॥
वेगीं मन गेलें भ्रताराचे सोयी । विघ्न आले काहीं आम्हावरी ॥ ४ ॥
यरि उदकास अंत नाहीं पार । अक्षोभ सागर भरलासे ॥ ५ ॥
सचार करूनि कोण्या वाटे आला । ठायींच देखिला अवचिता ॥ ६ ॥
अवचिता नेणो येथें उगवला । दिसे तो धाकुला बोल मोठे ॥ ७ ॥
मोठ्यानें बोलतो भय नाहीं मनीं । केला उठवूनी काळ जागा ॥ ८ ॥
जागविला काळसर्प तये वेळीं । उठिला कल्लोळीं विषाचियें ॥ ९ ॥
यमुनेच्या डोहावरी आला ऊत । काळयाकृतांतधुधुकारें ॥ १० ॥
कारणें ज्या येथें आला नारायण । जाले दरुषण दोघामध्यें ॥ ११ ॥
दोघामध्यें जाले बोल परस्परें । प्रसग उत्तरें युद्धाचिया ॥ १२ ॥
चिंतावला चित्तीं तोंडें बोले काळ । करीन सकळ ग्रास तुझा ॥ १३ ॥
जाला सावकाश झेंप घाली वरी । तव हाणे हरि मुष्टिघातें ॥ १४ ॥
तेणें काळें त्यासि दिसे काळ तैसा । हरावया जैसा जीव आला ॥ १५ ॥
आठवले काळा हाकारिले गोत । मिळालीं बहुत नागकुळें ॥ १६ ॥
कल्हारीं संधानीं वेष्टियेला[1] हरि । अवघा विखारीं व्यापियेला ॥ १७ ॥
यास तुका म्हणे नाहीं भक्ताविण । गरुडाचें चिंतन केलें मनीं ॥ १८ ॥

शब्दार्थ व टीपा – कोड–लाड, कल्हारीं–कमळाप्रमाणे, संधानीं–युक्तीने.

अर्थ – माझा चेंडू येथे कोणी आणला ? मी आता त्याचे लाड पुरविण्याकरिताच त्याला यठणीवर आणण्याकरिताच आलो आहे १ हे कृष्णाचे निष्ठुर बोलणे ऐकून नागपत्नीचे मन भयभीत झाले. २ प्रथम तिचे मन देवावर जडले होते, पण आपल्या नवऱ्याचा नाश करण्याकरिताच हा आला आहे हे समजताच तिचे मन तावडतोब प्रतिकूल झाले ३ ते नवऱ्याकडे वळले तिला वाटले, आपल्यावर ही नसती आपत्ती आली ४ या डोहातील पाण्याला अंतपार नाही एवढा हा डोह अथांग भरलेला असताना ५ कोणत्या वाटेने हा आत शिरला असेल ? येथे अकस्मात हा आला कसा ? ६ का येथेच तो प्रगट झाला ? हा दिसायला लहान दिसला तरी बोलणे विचारवंतासारखे आहे ७ हा किती मोठ्याने बोलत आहे ? याला भय कसे वाटत नाही ? याने तर हाका मारून कालियाला जागे केले. यावरून हा सामान्य दिसत नाही ८ हरीने जेव्हा कालियाला जागे करून उठविले, तेव्हा यमुनेच्या पाण्यावर विषाच्या बुडबुड्यांच्या लाटा निर्माण झाल्या ९ कृतांत काळासारखा असलेला कालिया फुसकारीत उठला तेव्हा त्याच्या विषाग्नीने यमुनेच्या डोहाला ऊत आला १० देव ज्या कारणाकरिता पाताळात आला होता, त्यानुसार कालियामध्ये आणि देवामध्ये प्रथम दृष्टिभेट झाली ११ परस्पराचे युद्धाला पाचारण करण्याचेच बोलणे झाले १२ कृष्णाला पाहून कालिया घाबरला, पण खोटेच अवसान आणून म्हणाला, अरे मी तुला आताच गिळून टाकतो. १३ असे म्हणून त्याने सावकाश कृष्णावर झेप टाकली, तोच कृष्णाने त्याच्या तोंडावर जोराने मूठ मारली १४ तेव्हा कालियाला वाटले की प्रत्यक्ष काळच आपला प्राण घेण्यासाठी येथे आला

[1] धरियेला

आहे १५ कालियाने एकदम आपल्या आप्तेष्टाना बोलावले तात्काळ तेथे नाग, सर्पाचा फार मोठा जमाव जमला १६ मोठ्या युक्तीने कमळाप्रमाणे श्रीहरी वेष्टिला गेला त्याचे अंग सर्व बाजूनी विषाने व्यापून गेले १७ तुकाराम महाराज म्हणतात, संकटात देवाला भक्तावाचून कोणीही त्राता नसतो म्हणून देवाने गरुडाचे ध्यान केले १८

४५५१ निजदास उभा तात्काळ पायापें । स्वामी देखे सर्पे वेष्टियेला ॥ १ ॥
लहानथोरे होतीं मिळालीं अपारें । त्याच्या घुघुकारें निवारलीं ॥ २ ॥
निघता आपटी धरूनि धावामधीं । एकाचेचि वधी माथे पायें ॥ ३ ॥
एकीं जीव दिले येताच त्या धाके । येतील तीं एकें काकुलती ॥ ४ ॥
यथेष्ट भक्षिली पोट धाये वरी । तव म्हणे हरि पुरे आता ॥ ५ ॥
आता करूं काम आलों जयासाटीं । हरी घाली मिठी काळयासि ॥ ६ ॥
यासि नाथूनिया नाकीं दिली दोरी । चेंडू भार शिरीं कमळाचा ॥ ७ ॥
चालविला वरी बैसे नारायण । गरुडा आळगुन बहुडविले ॥ ८ ॥
विसरु न पडे सवगड्या गाईं । यमुनेच्या डोहीं लक्ष त्याचें ॥ ९ ॥
त्याच्या गोष्टी काठीं बैसोनि सांगती । बुडाला दाविती येथें हरि ॥ १० ॥
हरीचे चिंतन करिता आठव । तुका म्हणे देव आला वरी ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा – बहुडविले–परत पाठविले

अर्थ – ध्यान करताच भगवताचा दास असलेला गरुड पायाजवळ येऊन उभा राहिला आपल्या स्वामींना सर्पाने वेढले आहे असे पाहून १ गरुडाने हुश करून हुसकल्या बरोबर सर्व जमलेले लहान, मोठे नाग पळून जाऊ लागले २ परतु गरुडाने एकेकाला धरून आपटले, काहींना पायाखाली चिरडले, काहींची डोकी तोडली ३ काहींनी तर गरुड तेथे आल्याबरोबरच प्राण सोडले कित्येक गरुडाला काकुळतीला येऊन शरण आले ४ कित्येक सर्पांना तर गरुडाने खाऊन टाकून यथेच्छ भोजन केले तेव्हा हरी म्हणाला, गरुडा आता पुरे कर ५ आता आपण ज्याच्याकरिता आलो आहोत, ते मुख्य काम प्रथम करू असे म्हणून त्याने कालियाला मिठी दिली ६ व त्याच्या फणीवर नाचून त्याचे दर्प मर्दन केले आणि त्याच्या नाकात दोरा ओवला डोहात पडलेला चेंडू त्याच्या डोक्यावर कमळासारखा ठेवला ७ कृष्ण त्याच्या डोक्यावर थोडावेळ बसला नतर यमुनेच्या डोहातून सहकुटुंब सहपरिवार कालियाला घालवून दिले गरुडालाही आलिंगन देऊन वैकुंठाला परत पाठविले ८ कृष्णाच्या नेहमी सहवासात राहणाऱ्या गोपाळाना व गाईंनाही इकडे विसर पडलेला नव्हता त्याचे लक्ष यमुनेच्या डोहाकडेच होते ९ यमुनेच्या काठावर बसून पूतनावधापासूनचा सर्व वृत्तांत सागत होते व शेवटी याच डोहात हरी बुडला असे दाखवीत होते १० तुकाराम महाराज म्हणतात, गोपाळानी हरीचे चिंतन-स्मरण करताच हरी वर आला ११

४५५२ अवचित त्यांणीं देखिला भुजंग । पळतील मग हाउ आला ॥ १ ॥
आला घेऊनिया यमुनेबाहेरी । पालवितो करीं[1] गडियांसि ॥ २ ॥
गडियांसि म्हणे वैकुंठनायक । या रे सकळिक मजपाशीं ॥ ३ ॥
मजपाशीं तुम्हां भय काय करी । जवळि या दुरी जाऊं नका ॥ ४ ॥
कानीं आइकिले गोविंदाचे बोल । म्हणती नवल चला पाहों ॥ ५ ॥
पाहों आले हरीजवळ सकळ । गोविंदें[2] गोपाळ आलिंगिले ॥ ६ ॥
आल्या गाई वरी घालितील माना । वोरसले स्तना क्षीर लोटे ॥ ७ ॥

---

१ हरि, २ गायनें.

लोटती सकळें एकावरी एक । होउनि पृथक कुर्वाळलीं ॥ ८ ॥
कुर्वाळलीं आनंदें घेती चारापाणी । तिहीं चक्रपाणी देखियेला ॥ ९ ॥
त्याच पार्शी होता परि केली माव । न कळे संदेह पडलिया ॥ १० ॥
याति वृक्ष वल्ली होत्या कोमेलिया । त्यासि कृष्णें काया दिव्य दिली ॥ ११ ॥
दिले गोविंदें त्या पदा नाहीं नाश । तुका म्हणे आस निरसली ॥ १२ ॥

शब्दार्थ व टीपा :– हाउ–बाऊ, पालविती–खुणाविती

अर्थ :– अचानक गोपाळांनी यमुनेच्या पाण्यावर मोठा सप पाहिला, 'बाऊ आला, बाऊ आला' असे म्हणत सर्व लोक पळून जाऊ लागले १ कृष्ण डोहाच्या बाहेर आल्यावर दुरून गडयांना जवळ येण्याबद्दल खुणाऊ लागला २ तों वैकुंठनायक श्रीकृष्ण म्हणाला, गडयांनो, जवळ या, आता कालिया येथून गला आहे ३ माझ्या जवळ आल्यावर भय कसले आले ? आता भिऊन दूर जाऊ नका जवळ या. ४ गोविंदाचे शब्द कानावर पडताच सर्वजण म्हणाले, काय आश्चर्य आहे ते पाहू चला तर खरे. ५ हरीला पाहण्याकरिता जेव्हा ते हरीजवळ आले, तेव्हा हरीने गोपाळांना आलिंगन देऊन, गाईंना कुरवाळिले ६ गाई कृष्णाच्या जवळ येऊन त्याच्या गळयात आपल्या माना घालू लागल्या आणि त्यांना प्रेमपान्हा फुटून त्यांच्या स्तनातून दूध गळू लागले ७ कृष्णाकडे जाण्यासाठी त्या एकमेकींना ढकलू लागल्या कृष्णानेही प्रत्येकीला प्रेमाने कुरवाळले ८ चक्रपाणी कृष्णाला पाहून त्यांना आनंद झाल्यामुळे त्या चारापाणी खाऊ लागल्या ९ सर्वांच्या अंतःकरणात असलेला श्रीहरी त्यांच्याजवळच होता. परंतु मायेने भ्रमात पडल्यावर देव कसा कळेल ? १० सर्व जातींचे वृक्ष, वेली कोमेजून गेल्या होत्या परंतु कृष्णाने त्यांना स्पर्श करून दिव्य शरीरे दिली ११ तुकाराम महाराज म्हणतात, देवाने कल्पांतीही नाश न होणारे अविनाशी पद गोपाळांना देऊन त्या सर्वांची आशा निवृत्त केली १२

४५५३ आस निरसली गोविंदाचे भेटी । संवसारा तुटी पुढिलिया ॥ १ ॥
पुढें पाठविले गोविंदें गोपाळा । देउनि चपळा हातीं गुढी ॥ २ ॥
हाका आरोळिया देउनि नाचती । एक सावाविती हरि आला ॥ ३ ॥
आरधीं पडिलीं होतीं तया घरीं । सकीर्ण त्या नारी नरलोक ॥ ४ ॥
लोका भूक तान नाहीं निद्रा डोळा । रूप वेळोवेळा आठविती ॥ ५ ॥
आहाकटा मग करिती गेलिया । आधीं ठावा तया नाहीं कोणा ॥ ६ ॥
आधीं चुकी मग घडे आठवण । तुका म्हणे जन परिचयें ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – आहाकटा–शोक

अर्थ – ज्यांना गोविंदाची भेट झाली त्यांची सर्व आशा नष्ट होऊन, त्यांना पुन संसार प्राप्त होत नाही. १ अतिचपळ अशा गोपाळाच्या हाती कृष्णाने आनंदाची गुढी देऊन त्याला गोकुळाकडे पाठवून दिले २ हरी यमुनेच्या बाहेर आला असे आनंदाने आरोळया देत ते गोपाळ नाचत जाऊ लागले ३ त्यावेळी गावातील स्त्री-पुरुष दुःखाने शोकाकुल होऊन आपआपल्या घरी अस्ताव्यस्त पडले होते. ४ कृष्णाने डोहात उडी मारल्यापासून ते आपली तहान-भूक-झोप विसरून गेले होते आणि प्रत्येक क्षणी कृष्णाचे स्मरण करीत होते ५ कृष्ण डोहात गेल्यापासून सर्वजण शोक करू लागले होते, परंतु कृष्ण होता तेव्हा त्याचे महत्त्व कोणाला काही कळले नव्हते ६ तुकाराम महाराज म्हणतात, मनुष्य आधी चुकतो व मग पश्चातापात पडतो. अति परिचयामुळे लोक मूल्यवान वस्तूची अथवा व्यक्तीची अवज्ञा करतात ७

४५५४ जननी हे म्हणे आहा काय जालें । शरीर रक्षिलें काय काजें ॥ १ ॥
काय काज आतां हरिविण जिणे । नित्य दुःख कोणें सोसावें हें ॥ २ ॥

हें दुःख न सरे हरि न भेटे तो । त्यामागेंचि जातो एका वेळे ॥ ३ ॥
एकवेळ जरी देखतें मी आता । तरी जीवापरता न करितें ॥ ४ ॥
करिता हे मात हरीचें चिंतन । शुभ तो शकुन तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – काज–अर्थ, काम

अर्थ – यशोदा म्हणाली, अहाहा! किती वाईट झाले हे मी हा देह का ठेवला असेल ? १ आता हरीवाचून जीवन कठण्यात काय अर्थ आहे ? जन्मभर हे वियोगदुःख कोणी सोसावे ? २ जोपर्यंत भेट होणार नाही, तोपर्यंत हे दुःख संपणार नाही त्यापेक्षा त्याच्या मागे गेलेले बरे ३ आता एक वेळ जरी हरी भेटला, तरी त्याला मी जीवापासून दूर करणार नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, अशा तऱ्हेने यशोदा माता हरीचे चिंतन करीत असता तिला शुभ शकून होऊ लागले. ५

४५५५ शुभ मात तिहीं आणिली गोपाळीं । चेंडू वनमाळी घेउनि आले ॥ १ ॥
आली दारा देखे हरुपाची गुढी । सांगितली पुढी हरुषें मात ॥ २ ॥
हरुषलीं माता केलें निंबलोण । गोपाळावरून कुरवंडी ॥ ३ ॥
गोपाळा भोंवते मिळालें गोकुळ । अवघीं सकळ लहान थोरें ॥ ४ ॥
थोर सुख जालें ते काळीं आनंद । सांगती गोविंद वरि आला ॥ ५ ॥
आले वरि बैसोनिया नारायण । काळया नाथून वहन केले ॥ ६ ॥
नगरावाहेरी निघालें आनंदें । लावूनिया वाद्यें नाना घोष ॥ ७ ॥
नारायणापुढें गोपाळ चालतीं । आनंदें नाचती गाती गीत ॥ ८ ॥
तव तो देखिला वैकुंठींचा पती । लोटांगणीं जाती[1] सकळही ॥ ९ ॥
सकळ ही एका भावें आलिंगिलें । अवघिया जालें अवघे हरि ॥ १० ॥
हरि आलिंगनें हरिरूप जालीं । आप विसरलीं आपणास ॥ ११ ॥
सकळांसी सुख एक दिलें देवें । मायबापभावें लोकपाळा ॥ १२ ॥
मायबाप देवा नाहीं लोकपाळ । सारिखीं सकळ तुका म्हणे ॥ १३ ॥

शब्दार्थ व टीपा – हरुषाची–आनंदाची

अर्थ – हरी चेंडू घेऊन डोहातून आला आहे, अशी शुभ वार्ता गोपाळांनी गावात आणली १ एवढी गर्दी कशाची आहे, म्हणून यशोदा माता दारात येऊन उभी राहिली एका गोपाळाच्या हातात आनंदाची गुढी असल्याचे तिने पाहिले तोच एका गोपाळाने पुढे येऊन कृष्ण घर आल्याची आनंदाची वार्ता हसतमुखाने सांगितली २ यशोदेला आनंद झाला तिने त्या गोपाळावरून लिंबलोण उतरून टाकले ३ त्या गोपाळाभोवती सारे लहानथोर गोकुळवासी जमा झाले ४ त्या वेळी सर्वांनाच फार आनंद झाल्यामुळे ते एकमेकांना गोविंद वर आला असे सांगू लागले ५ डोहात त्याने कालियाचे दमन केले आणि त्याच वाहनावर बसून नारायण वर आला आहे ६ सुस्वर वाद्यांच्या नादात व कृष्णाचा जयघोष करीत, आनंदाने सर्व लोक गावाच्या बाहेर आले ७ तिकडे नारायणापुढे गोपाळ आनंदाने चालत, नाचत गायत येतच होते ८ तेव्हा वैकुंठाचा पती जो श्रीकृष्ण त्याला सर्वांनी पाहिले व सवजण हर्षाने लोटांगण घालू लागले ९ तेव्हा हरीने सर्वांना प्रेमाने आलिंगन दिले तेव्हा ते सर्व हरीरूप झाले १० हरीला आलिंगन दिल्यामुळे ते हरिरूप झाले व मीपणास विसरून गेले ११ देवाने सर्वांना सारखे सुख दिले जे सुख मायबापांना, तेच सुख सर्व लोकांना दिले १२ तुकाराम महाराज म्हणतात, हे मायबाप, हे परके असा भेदभाव देवाजवळ नाही त्याला सर्व सारखेच आहेत १३

---

१ येती

४५५६ नेणें वर्ण धर्म जीं आलीं सामोरीं । अवघींच हरी आलिंगिलीं ॥ १ ॥
हरि लोकपाळ आले नगरात । सकळासहित मायबाप ॥ २ ॥
पारणे तयाचे जाले एका वेळे । देखिले सावळें परब्रह्म ॥ ३ ॥
ब्रह्मानंदें लोक सकळ नाचती । गुढिया उभविती घरोघरीं ॥ ४ ॥
घरोघरीं सुख आनंद सोहळा । सडे रंग माळा चौकदारीं ॥ ५ ॥
दारीं वृंदावने तुळसीचीं वनें । रामकृष्णगाणे नारायण ॥ ६ ॥
नारायण तिहीं पूजिला बहुतीं । नाना पुष्पयाती करूनिया ॥ ७ ॥
याचें ऋण नाही फिटलें मागील । पुढें भांडवल जोडिती हीं ॥ ८ ॥
हीं नव्हती कधीं या देवा वेगळीं । केला वनमाळी सेवाऋणी ॥ ९ ॥
सेवाऋणें तुका म्हणे रूपधारी । भक्ताचा कैंवारी नारायण ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – तिहीं–त्यानी

अर्थ – हरीच्या भेटीकरिता आलेल्या माणसाच्या वर्णधर्माचा अधिकाराचा विचार न करिता हरीने सर्वांनाच आलिंगन दिले १ हरी सर्व लोकासमवेत आणि नंदयशोदेसह गावात आले २ सावळे असे परब्रह्मरूप पाहून सर्वांच्या डोळ्याचे पारणे फिटले ३ सर्वांना आनंद झाला व त्या आनंदाच्या भरात सर्व लोक नाचू लागले सर्वांच्या घरी आनंदाच्या गुढ्या उभारण्यात आल्या ४ घरोघरी आनंदी आनंद झाला दारात व अंगणात सडे घालून तऱ्हेतऱ्हेच्या रांगोळ्या घालण्यात आल्या ५ प्रत्येकाच्या दारात वृंदावन आणि तुळशीची झाडे शोभिवंत केली होती राम कृष्ण नारायण असे गीत प्रत्येकजण गात होता ६ नाना प्रकारच्या फुलानी भगवान विष्णूचे त्यानी पूजन केले ७ याचे मागील ऋण अजून फिटले नव्हते तोच त्यानी पुढील सुखाकरता सेवेचे भांडवल जोडून ठेविले. ८ हे लोक देवापासून दूर होणे कधीच शक्य नव्हते कारण त्यानी आपल्या एकनिष्ठ सेवेने देवाला ऋणी केले होते ९ तुकाराम महाराज म्हणतात भक्ताच्या सेवाऋणामुळेच देवाने कृष्णरूप धारण करून अवतार घेतला कारण नारायण सदैव भक्ताचा कैवारी आहे १०

४५५७ नारायण आले निजमंदिरासि । जाले या लोकासि बहुडविते ॥ १ ॥
बहुडविले बहु केले समाधान । विसरु तो[1] क्षण नका माझा ॥ २ ॥
मात सांगितली सकळ वृत्तांत । घेले दंडवत सकळानीं ॥ ३ ॥
सकळा भातुके वांटिल्या साखरा । आपलाल्या घरा लोक गेले ॥ ४ ॥
लोक गेले कामा गाईपें गोपाळ । वारली सकळ लोभापाठीं ॥ ५ ॥
लोभ दावुनिया आपला विसर । पाडितो कुमर धनआशा ॥ ६ ॥
आशेचे बांधले तुका म्हणे जन । काय नारायण ऐसा जाणे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – बहुडविले–परत पाठविले

अर्थ – नारायण आपल्या घरी आला व इतराना त्याने आपआपल्या घरी पाठविले १ मला एक क्षणभरही विसरू नका असे सांगून त्याने सर्वांचे समाधान करून घरी पाठवून दिले २ सर्व लोक घरी जाण्यापूर्वी, डोहात उडी मारण्याचे कारण, व तेथील सर्व वृत्तांत त्याने सांगितला तेव्हा सर्वांनाच आश्चर्य वाटून त्यानी देवाला साष्टांग नमस्कार केला ३ सर्वांना खाऊ म्हणून साखर वाटली मग सर्व लोक आपआपल्या घरी गेले ४ सर्व लोक आपआपल्या कामाला गेले, गाई वासराकडे गेल्या, स्त्रिया गृहकामात गुतल्या, अशा रीतीने प्रत्येकाला लोभ निर्माण

[1] हा

करून सर्वांना आपल्यापासून त्याने अलिप्त केले ५ लोकांच्या मनात धन, दारा, पुत्र यांचा लोभ निर्माण करून भगवान प्रत्येकाला आपला विसर पाडीत असतो ६ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व लोक आशाबद्ध असल्यामुळे ते नारायणाला कसे जाणू शकतील ? ७

४५५८ जाला कवतुक करिता रोकडें । आणीक ही पुढें नारायण ॥ १ ॥
घेऊनिया पुढें धरिला मारग । हरावया भाग इद्रयाजीं[1] ॥ २ ॥
इद्रा दहीं दुध तूप नेता लोणी । घेतले हिरोनि वाटे त्याचे ॥ ३ ॥
हिरोनि घेतल्या कावडी सकळा । म्हणती गोपाळा बरे नव्हे ॥ ४ ॥
नव्हे तेंचि करी न भे कळिकाळा । तुका म्हणे लीळा खेळे देव ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – रोकडें-प्रत्यक्ष, इद्रयाजीं-इद्रासाठी यज्ञात

अर्थ – याप्रमाणे प्रत्यक्ष देवाने कालियाची लीला केली आणि पुढेही अशाच लीला नारायणाने दाखविल्या १ गोवर्धन पर्वताजवळ इद्रयाग करण्याची परपरा होती त्याप्रमाणे त्याची तयारी सुरु झाली होती धनधान्याच्या गाड्या भरून गोवर्धन पर्वताकडे येऊ लागल्या होत्या तोच कृष्णाने त्यांचा मार्ग अडविला आणि इद्रयागाचे सामान हरण करण्यास सुरुवात केली २ इद्रयागाकरिता दही, दूध, तूप लोणी हे सर्व घेऊन जाताना, वाटेतच ते सव कृष्णाने हिरावून घेतले ३ दह्या दुधांच्या कावडी जेव्हा हिरावून घेतल्या तेव्हा गोपाळ म्हणाले, हे बरे नव्हे ! ४ तुकाराम महाराज म्हणतात, इतराना जे अशक्य ते देव करीत होता आणि तो कळिकाळालाही न भिता हा खेळ खेळत होता. ५

४५५९ खेळ नव्हे बरा इद्र कोपलिया । देव म्हणे तया भेऊं नका ॥ १ ॥
नका धरूं भय धाक काही मनीं । बोले चक्रपाणि गौळियांसि ॥ २ ॥
गौळियांसि धीर नाहीं या वचने । आशकितमने बेडावलीं ॥ ३ ॥
बेडावलीं त्यांसि न कळता माय । देवाआदिदेव नोळखता ॥ ४ ॥
नोळखता दु खें वाहाती शरीरीं । तुका म्हणे वरि भारवाही[2] ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – नोळखता- न ओळखता

अर्थ – कृष्णा, हा तुझा खेळ काही चागला नाही इंद्र कोपला तर आपली उपजिविका कशी चालेल ? याचा थोडा विचार कर ! देव म्हणाला, लोकहो भिऊ नका १ इद्राला एवढे भिण्याचे कारण नाही प्रत्येक मनुष्याला त्याच्या पूर्वकर्मानुसार सुखदु खे प्राप्त होतात याप्रमाणे चक्रपाणी श्रीकृष्णाने इद्राचा गर्व हरण करण्याच्या हेतूने गवळ्यांना कर्मवादाचे तत्त्व सांगितले २ परतु गवळ्यांच्या मनात मात्र यावद्दल शका निर्माण झाली आणि ते घाबरून गेले ३ कृष्णाचा हेतू ओळखता न आल्यामुळे आणि कृष्ण हा देवाधिदेव आहे हे न समजल्यामुळे ते सर्वजण घाबरून गेले ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवाला न ओळखून लोक सर्व ससाराचा भार वाहतात आणि त्यामुळेच ते अनत दु खे डोक्यावर घेतात ५

४५६० भारवाही नोळखती या अनता । जवळी असता अगसगें ॥ १ ॥
अगसगें तया न कळे हा देव । कळोनि सदेह मागुताला ॥ २ ॥
मागुती पडती चिंतेचिये डोहीं । जयाची हे नाहीं बुद्धि स्थिर ॥ ३ ॥
बुद्धि स्थिर होउ[3] नेदी नारायण । आशाबद्ध जन लोभिकांची ॥ ४ ॥
लोभिका न साहे देवाचे करणे । तुका म्हणे तेणें दु खी होती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – नोळखती–ओळखत नाहीत

१ इद्रायागीं, २ भार वाही, ३ राहो

अर्थ :– हा अनंत त्यांच्या सतत संगतीत असूनही संसाराचा भार वाहणारे लोक त्याला ओळखत नाहीत १ देवाच्या नित्य संगतीत असूनही त्यांना देव कळला नाही. वणवा गिळणे, कालियामर्दन करणे अशा प्रसगविशेषी जरी तो ईश्वर आहे असे वाटले, तरी नंतर त्याच्या मनात शंका निर्माण होत होती २ ज्याची बुद्धी स्थिर नसते, ते नंतर चिंतेच्या डोहात पडतात ३ हा नारायण, आशाबद्ध व लोभी लोकाची बुद्धी स्थिर राहू देत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवाचे वचन व करणे, लोभी लोकांना आकलन होत नाही, आणि त्याचमुळे ते दु खी होतात. ५

४५६१ दुःखी होती लोभें करावें तें काई । उडतील गाई म्हैसी आतां ॥ १ ॥
आणीकही कांहीं होईल अरिष्ट । नायिके हा धीट सांगितलें ॥ २ ॥
सांगो चला याच्या मायबापांपाशीं । निघाले घरासि देवा रागें ॥ ३ ॥
रागें काला देतां न घेती कवळ । टोकवी गोपाळ क्रोधियांसि ॥ ४ ॥
क्रोध देवावरि धरियेला राग । तुका म्हणे भाग न लभती ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – टोकवी–टुकटुक माकड केले

अर्थ :– कृष्णाच्या या नव्या निर्णयाने लोक दु खी झाले होते. काय करावे ? इंद्राने जर पाऊस पाडला नाही तर गाई-म्हशी दूध देणार नाहीत या चिंतेत ते पडले होते. १ आणि दुसरेही एखादे संकट येईल पण कितीही विनविले तरी या धीटाला ते पटत नाही २ आणि मग ते गोपाळ कृष्णावर रागावून त्याच्या आईवडिलाना सागण्याकरिता निघाले. ३ कृष्णाने त्याच्या कावडींतील दहधादुधाचा काला केला आणि तो गोपाळाना देऊ लागला. पण रागाने त्यानी तो घेतला नाही. परंतु कृष्ण व काही गोपाळ तो खाऊ लागले आणि अभिमानी लोकाना ते 'टुकटुक माकड' असे म्हणून वेडावू लागले. ४ तुकाराम महाराज म्हणतात, अभिमानी लोकानी देवावर राग धरल्यामुळे काल्याचा प्रसाद त्याना मिळाला नाही. ५

४५६२ भाग त्या सुखाचे वांकडयां बोबडयां । आपलिया गडयां भाविकांसि ॥ १ ॥
भारवाही गेले टाकुनि कावडी । नवनीतगोडी भाविकांसि ॥ २ ॥
काला करूनियां वांटिलां सकळां । आनंदें गोपाळांमाजी खेळे ॥ ३ ॥
खेळेंमेळें दहीं दुध तूप[1] खाती । भय नाहीं चित्तीं कवणाचें ॥ ४ ॥
कवणाचे चाले तुका म्हणे बळ । जयासी गोपाळ साह्य जाला ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :- भाग–वाटा

अर्थ :– त्या काल्याच्या सुखाचा वाटा कृष्णाच्या वेडया वाकडया, भोळयाभावडया, भाविक सवंगडयांना मिळाला. १ जे भारवाही होते ते आपल्या कावडी तेथेच टाकून निघून गेले. मात्र त्यानी त्यांतील लोण्याची गोडी चाखली. २ कृष्णाने काला करून सर्वांना वाटला. याप्रमाणे कृष्ण आपल्या भविक गोपाळाशी आनंदाने खेळत होता ३ ते सर्व खेळीमेळीने दही, दूध, लोणी खात होते त्याच्या मनाला कोणाचे भय वाटत नव्हते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, ज्याना एकदा गोपाळाचे साह्य झाले त्याच्यापुढे कुणाचेही बळ चालणार नाही. ५

४५६३ जाणवलें इंद्रा चरित्र सकळ । वांकुल्या गोपाळ दाविताती ॥ १ ॥
तातडिया मेघा आज्ञा करी राव । गोकुळींचा ठाव उरों नेदा ॥ २ ॥
नेदावया गाई म्हसी वांचों लोक । पुरा सकळिक सिळाधारीं ॥ ३ ॥

१ लोणी

धाक नाहीं माझा गोवळियां पोरां । सकळिक मारा म्हणे मेघां ॥ ४ ॥
म्हणवितो देव आपणा तोवरी । जंव नाहीं वरी कोपलों मी ॥ ५ ॥
मीपणें हा देव न कळेचि त्यासी । अभिमाने रासि गर्वाचिया ॥ ६ ॥
अभिमानरासि जयाचये ठायीं । तुका म्हणे तईं देव दुरी ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – ठाव-ठिकाणी, स्थान, याग-यज्ञ

*अर्थ* :– कृष्णाने आपला यज्ञ बंद पाडला असून, गोपाळ आपल्याला बाकुल्या दाखवीत आहेत, वेडावत आहेत, हे इंद्राला कळले १ इंद्र रागावला आणि त्याने मेघाना प्रलयकाळ करण्याची आणि गोकुळाला निःशेष करण्याची आज्ञा दिली २ शिळाधाराचा वर्षाव करून, गावागावातील लोक, गाई-म्हशी या सर्वांचा नाश करा ! ३ गवळ्याच्या या अचरट पोराना माझे भय राहिले नाही म्हणून खुशाल सर्वांना मारा व माझा प्रताप चागल्या प्रकारे त्याच्या लक्षात आणून द्या ४ जोपर्यंत मी रागावलो नाही तोपर्यंतच तो कृष्ण आपल्याला देव म्हणवून घेतो ५ जोपर्यंत त्याना मीपणाचा अभिमान आणि सत्ताबळाचा गर्व आहे, तोपर्यंत त्याना खरा देव कोणता हे कळणार नाही ६ तुकाराम महाराज म्हणतात, जोपर्यंत अभिमानाची घमेंड आहे तोपर्यंत देव दूरच राहाणार ७

४५६४ देव त्यां फावला भाविकां गोपाळां । नाहीं तेथें कळा अभिमान ॥ १ ॥
नाडलीं आपल्या आपणचि एके । संदेहदायकें बहुफारें ॥ २ ॥
फारें चाळविलीं नेदी कळों भाव । देवाआदिदेव विश्वंभर ॥ ३ ॥
विश्वासावांचुनि कळों नये खरा । अभक्तां अघोरा जैसा तैसा ॥ ४ ॥
जैसा भाव तैसा जवळि त्या दुरि । तुका म्हणे हरि देतो घेतो ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– भाव-माया

*अर्थ* :– परंतु खरा कृष्णदेव अभिमानी इंद्राला प्राप्त न होता भाविक गोपाळाना प्राप्त झाला, कारण त्याच्या ठिकाणी शहाणपणाचा, ऐश्वर्याचा अभिमान नव्हता १ जे लोक संशयाने भुचकळ्यात पडून अडकले जातात, फसतात, २ त्याना देवाधिदेव विश्वभराचे अस्तित्व कळत नाही. आणि म्हणून ते फसतात ३ जे मूर्ख, अघोर, अविश्वासी, नास्तिक आहेत, त्याना खरा देव जसा आहे तसा कळत नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे देव जवळ आणि दूर आहे, ज्याची जशी सेवा तसे तो फळ देतो, व भक्ताचे प्रेम घेतो. ५

४५६५ तो या साच भावें न कळेचि इंद्रा । म्हणउनि धारा घाली सिळा ॥ १ ॥
घाली धारा मेघ फडाडिला माथां । वरि अवचिता देखियेला ॥ २ ॥
देखती पाऊस वोळला गोपाळ । भ्याले हे सकळ विचारिती ॥ ३ ॥
विचार पडला विसरले खेळ । अन्याय गोपाळ म्हणती केला ॥ ४ ॥
लागलेसे गोड न कळे ते काळीं । भेणें वनमाळी आठविती ॥ ५ ॥
आतां काय कैसा करावा विचार । गोधनासि थार आपणियां ॥ ६ ॥
याचिया विचारें होणार ते काई । तुका म्हणे ठायीं वेडावलीं ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– साच-खरा, वोळला-वळला, भणें-भीतीने, थार-आश्रय

अर्थ :- गोकुळात देवाधिदेव श्रीकृष्ण आहे हे अनवधानाने इंद्राला समजले नाही त्यामुळे आज्ञाधारी मेघानी शिळाधाराचा अखंड वर्षाव करण्यास सुरुवात केली. १ अकस्मात मेघाचा गडगडाट आणि मुसळधार पाऊस आलेला गोपाळांनी पाहिला २ मुसळधार पावसाला पाहून सर्व गोपाळ घाबरले, आणि आता कसे करावे ? असा विचार करू लागले. ३ लहान मुले खेळ खेळण्यास विसरली, मोठी माणसे, इंद्रयाग न केल्याच्या अपराधाचे हे फळ असे म्हणू लागली ४ इंद्रयाग बंद पाडताना गोड वाटले, भोगा आता आपल्या कर्माचे फळ असे वृद्ध माणसे म्हणू लागली पावसाचा जोर वाढल्यामुळे सर्व भयभीत झाले आणि वनमाळी श्रीकृष्णाचा धावा करू लागली ५ आता काय करावे ? कोठे जावे ? गाई-म्हशी कोठे आसऱ्यास बांधाव्यात ? कोणाला काहीच सुचत नव्हते ६ तुकाराम महाराज म्हणतात, सर्व लोक पावसाच्या विचाराने वेडे झाले पण त्याच्या विचाराने काय होणार होते. ७

४५६६ वेडावलीं काय करावे या काळीं । म्हणे वनमाळी गोपाळांसि ॥ १ ॥
शिरीं धरूं गोवर्द्धन उचलूनि । म्हणे तुम्ही कोणी भिऊं नका ॥ २ ॥
नका सांडूं कोणी आपला आवाका । मारिता या हाका वारोळिया ॥ ३ ॥
अशंकित चित्तें न वटे[1] त्या खरें । धाकेंच ते वरें म्हणती चला ॥ ४ ॥
चित्तीं धाक परि जवळी अनंत । तुका म्हणे घात होऊं नेदी ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आवाका-धैर्य

अर्थ – सर्व लोक वेडावले त्याना काय करावे हे कळेना तेव्हा वनमाळी श्रीकृष्ण गोपाळाना म्हणाला १ तुम्ही कोणीही बिलकूल भिऊ नका मी गोवर्धन पर्वतच तुमच्या सर्वांच्यावर उचलून धरतो २ तुम्ही आपले धैर्य सोडू नका विनाकारण हाका, आरोळ्या का मारीत आहा ? ३ परंतु कृष्णाचे ते बोलणे कोणालाही खरे वाटले नाही हा लहान कृष्ण एवढा मोठा पर्वत कसा उचलील ? अशी शंका त्याच्या मनात आली म्हणून पावसाच्या भयाने ' चला, आपण कोठे तरी आश्रयाला जाऊ ' असे ते म्हणू लागले ४ तुकाराम महाराज म्हणतात, अनंत जवळ असल्यावर तो कोणाचाही घात होऊ देत नाही हे माहीत असूनसुद्धा गोपाळाच्या मनात भय निर्माण झाले ५

४५६७ नेदी दु:ख देवो दासा नारायण । ठेवी निवारून आल्या आधीं ॥ १ ॥
आधीं पुढें शुद्ध करावा मारग । दासामार्गे मग सुखरूप ॥ २ ॥
पर्वतासि हात लाविला अनंतें । तो जाय वरतें आपेंआप ॥ ३ ॥
आपल्याआपण उचलिला गिरी । गोपाळ हे करी[2] निमित्यासि ॥ ४ ॥
निमित्य करूनि करावे कारण । करितां आपण कळों नेदी ॥ ५ ॥
दिनाचा कृपाळु पतितपावन । हे करी वचन सांच खरें ॥ ६ ॥
सांगणें न लगे सुखदु:ख दासा । तुका म्हणे ऐसा कृपावंत ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :- मारग-मार्ग, गिरी- पर्वत, साच-खरे.

अर्थ :- आपल्या भक्तांचे दु:ख देवाला बघवत नसल्यामुळे तो त्यांना दु:ख होऊ देत नाही. दु:ख येण्यापूर्वीच ते निवारण करण्याची योजना करून ठेवतो १ प्रथम दु:ख निवारण करण्याचा शुद्ध आणि सोपा करतो. नंतर तो भक्तांना खुशाल पाठीमागे येण्यास सांगतो २ अनंताने सहज पर्वताला हात लावल्यावरोबर तो गोवर्धन आपोआप वर जाऊ लागला ३ कृष्णाने आपल्या सामर्थ्याने गोवर्धन उचलला, गोपाळांना केवळ निमित्तमात्र हात लावण्यास सांगितले.४

१ वाटे, २ फेरी

देव नेहमी कोणतेही काम करताना कोणाला तरी निमित्तमात्र पुढे करीत असतो पण ते कोणाला कळू देत नाही ५ दीनवत्सल, पतितपावन, हे ब्रीद त्याने त्यावेळी खरे करून दाखविले ६ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तांची सुखदु:खे त्याला सांगावी लागत नाहीत असा तो कृपाळू आहे ७

४५६८ कृपावंतें हाक दिली सकळिकां । माजिया रे नका राहों कोणी ॥ १ ॥
निघाले या भेणें पाउसाच्या जन । देखे गोवर्द्धन उचलिला ॥ २ ॥
लाविले गोपाळ फेरी चहूंकडे । हांसे कुदे रडे कोणी धाके ॥ ३ ॥
धाके हीं सकळ निघालीं भीतरी । उचलिला गिरी तयाखालीं ॥ ४ ॥
तयाखालीं गाई वत्सें आलीं लोक । पक्षी सकळिक जीवजाति ॥ ५ ॥
जिहीं म्हणविलें हरीचे अंकित । जातीचे ते होत कोणी तरी ॥ ६ ॥
जाति कुळ नाहीं तयासि प्रमाण । अनन्या अनन्य तुका म्हणे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – भणे–भीतीनें

अर्थ – त्या कृपाळू देवाने सर्वांना हाक देऊन सांगितले की, कोणीही बाहेर जाऊ नका सर्वजण या गोवर्धनाच्या खाली या १ पावसाच्या भीतीनें सर्व लोक गोवर्धनाच्या खाली येण्यास निघाले २ कोणी पावसाच्या भीतीने रडू, कुदू लागले, कोणी हसू लागले, अशा सर्व गोपाळांना चहूकडे उभे राहण्यास सांगितले ३ याप्रमाणे भयाने सर्वजण उचललेल्या गोवर्धनाच्या खाली हळू हळू येण्यास निघाले ४ त्या सर्वांत माणसे, गाई, वासरे व इतर पशुपक्षी असे सर्व जातींचे जीव होते ५ जे स्वत ला हरीचे दास म्हणवून घेत होते, त्या सर्वांना ते कोणत्याही जातीचे असले तरीसुद्धा देवाने आश्रय दिला ६ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तीच्या क्षेत्रात जाती, कुळ, प्रमाण नसून अनन्य भक्ताशी तो अनन्य होतो ७

४५६९ त्यासि राखे बळें आपुले जे दास । कळिकाळासि वास पाहों नेदी ॥ १ ॥
पाउस न येतां केली याची थार । लागला तुषार येऊं मग ॥ २ ॥
येउनि दगड वैसतील गिरी । वरुषला धारीं शिळाचिये ॥ ३ ॥
शिळाचिये धारीं वरुषला आकाश । होता दिवस सात एक सरें ॥ ४ ॥
*एक सरें गिरि धरिला गोपाळीं । होतेरे सत्व बळी आम्ही ऐसे ॥ ५ ॥*
ऐसे कळो आलें देवाचिया चित्ता । म्हणे तुम्हीं आतां हात सोडा ॥ ६ ॥
हासती गोपाळ करुनि नवल । आइकोनि बोल गोविंदाचे ॥ ७ ॥
दावितील डोया गुडघे कोपर । फुटले ते भार उचलितां ॥ ८ ॥
भार आम्हावरि घालुनि निराळा । राहिलासि डोळा चुकवुनि ॥ ९ ॥
निमित्य अंगुळी लावियेली वरी । पाहों कैसा गिरी धरितोसि ॥ १० ॥
सिणले हे होते ठायींच्या त्या भारें । लटिकेचि खरें मानुनिया ॥ ११ ॥
याणीं अंत पाहों आदरिला याचा । तुका म्हणे याचा याचाळ ते ॥ १२ ॥

शब्दार्थ व टीपा – भार–ओझे, अंगुळी–हाताचे बोट, करंगळी

अर्थ – आपले सर्व सामर्थ्य खर्च करून तो भक्ताचे रक्षण करतो आपल्या भक्ताकडे तो कळिकाळाला सुद्धा वाकड्या नजरेने पाहू देत नाही १ देवाने कोणालाही पाऊस न लागण्याची व्यवस्था केली होती फक्त थोडे थोडे तुषार येत होते. २ त्या पर्वतावर दगड येऊन पडत होते शिळाधारांचा वर्षाव अखंड होत होता ३ सात

दिवस सारखा शिळावर्षाव झाला. जिकडेतिकडे जलप्रलय झाला ४ कृष्णाने पर्वत उचलून धरला म्हणूनच सर्वांचे प्राण वाचले पण गोपाळाना असे वाटले की, आपण शूर, बलाढ्य होतो म्हणूनच हा पर्वत सात दिवस उचलून धरला ५ गोपाळाना झालेला गर्व देवाच्या लक्षात आला म्हणून देव म्हणाला, गोपाळानो तुम्ही सर्वजण हात सोडा ६ हे गोविंदाचे बोलणे ऐकल्यावर सर्वांना आश्चर्य वाटले व त्यानी त्या बोलण्याचा उपहास केला ७ गोपाळ म्हणाले, गोवर्धनाचे ओझे उचलून आमची डोकी, गुडघे, कोपरे फुटली आहेत असे म्हणून ते कृष्णाला दाखवू लागले ८ तू आमच्यावर सर्व ओझे टाकून आमचा डोळा चुकवून वेगळा राहिला आहेस ९ आणि निमित्यमात्र अंगुळी लावून उभा राहिला आहेस आता आम्ही पर्वताला लावलेले हात सोडून देतो, पाहू तू एकटा कसा धरतोस ते १० खोट्यासच खरे मानून मुळातच खोट्या अभिमानाच्या भाराने ते गोपाळ शिणून गेले होते ११ तुकाराम महाराज म्हणतात, वाचाळ अशा बहिर्मुख गोपाळानी देवाचा अंत पाहण्याचे ठरविले १२

४५७० वाचाळ लटिके अभक्त जे खळ । आपुले ते बळ वाखाणावे ॥ १ ॥
बळें हुंबरती सत्य त्या न कळे । नुघडती डोळे अंधळ्याचे ॥ २ ॥
आसुडिल्या माना हात पाय नेटें । तव भार बोटें उचलिला ॥ ३ ॥
लटिकाचि आम्हीं सीण केला देवा । कळो आले तेव्हा सकळासि ॥ ४ ॥
आले कळो तुका म्हणे अनुभवे । मग अहंभावे साडवले ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – खळ–दुष्ट, नुघडती–उघडत नाहीत.

अर्थ – जे वाचाळ, लबाड, अभक्त व दुष्ट गोपाळ होते तेच आपल्या सामर्थ्याची स्तुती करीत होते १ उगीच बडबड करीत होते परंतु त्यांना खरे काय आहे, ते कळत नव्हते त्या आंधळ्याचे डोळे कधी उघडायचेच नाहीत २ पर्वताला धरण्याकरिता मानेला हिसडे देऊन, हातापायाला ताण देऊन मोठ्या नेटाने ते उभे होते त्या सर्वांनी हात सोडून दिले, तरीपण देवाने एका बोटाच्या आधाराने पर्वताचा भार उचलून धरिला. ३ तेव्हा सर्व गोपाळांना कळून आले की, आम्ही पर्वताला व्यर्थ उचलण्याचे श्रम केले देव कसा बलवान आहे हे त्या प्रसंगी सर्वांना कळून आले ४ तुकाराम महाराज म्हणतात, स्वानुभवाने देवाचे माहात्म्य त्याना कळले, म्हणून त्यानी अभिमान टाकून दिला ५

४५७१ सांडवले सकळाचे अभिमान । आणिले शरण लोटांगणीं ॥ १ ॥
लोटांगणीं आले होऊनिया दीन । मग नारायण म्हणे भले ॥ २ ॥
भला आजि तुम्ही केला साच पण । गिरि गोवर्धन उचलिला ॥ ३ ॥
लागती चरणा सकळ ते काळीं । आम्हामध्यें बळी तूंचि एक ॥ ४ ॥
एका तुजविण न यो आम्ही कामा । कळों कृष्णा रामा आले आजी ॥ ५ ॥
आजिवरि आम्हा होता अभिमान । नेणता चरणमहिमा तुझा ॥ ६ ॥
तुझा पार आम्ही नेणों नारायणा । नरों गोवर्द्धना राखियेले ॥ ७ ॥
राखियेले गोकुळ आम्हा सकळासि । दगडाच्या राशी वरुषता ॥ ८ ॥
वर्णावें तें काय तुझें महिमान । धरिती चरण सकळ ही ॥ ९ ॥
सकळ ही तान विसरलीं भूक । सकळ ही सुख दिले त्यासि ॥ १० ॥
त्यासि कळो आला वैकुंठनायक । तुका म्हणे लोक निर्भर ते ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा :- साडवले-टाकले, साच-खरा

अर्थ :- कित्येकांना देवानेच आपले माहात्म्य त्यांच्या निदर्शनास आणले व सर्वांना अभिमान टाकून, लोटांगण घालीत शरण येण्यास भाग पाडले १ सर्वजण दीन होऊन लोटांगण घालीत शरण आले तेव्हा नारायण त्यांची स्तुती करु लागला २ तुम्ही आज खरोखरच पराक्रम केला कारण एवढा मोठा गोवर्धन पर्वत उचलून धरिला ३ असे कृष्णाने म्हणताच सर्वजण लाजेने देवाच्या पाया पडू लागले आम्हाला व्यर्थ मोठेपणा देऊ नकोस आमच्यामध्ये तूच खरा पराक्रमी आहेस ४ कृष्णा, रामा, तू नसतास तर आमचा काही उपयोग झाला नसता हे आज आम्हाला कळून आले आहे. ५ आजवर तुझ्या चरणाचा महिमा माहीत नव्हता, म्हणून आम्हास अभिमान होता ६ नारायणा, तुझ्या गुणाचा अंत आम्हाला लागत नाही एका नखाग्रावर सात दिवस गोवर्धन धरणे हे केवढे आश्चर्य आहे ७ दगडाचा वर्षाव होत असता, गोकुळाचे व आमचे सर्वांचे रक्षण तू केलेस. ८ तुझे माहात्म्य आम्ही काय वर्णन करावे ? असे म्हणून सर्व गोपाळ कृष्णाचे पुन पुन पाय धरु लागले ९ सर्वजण तहान, भूक विसरुन गेले परंतु देवाने सर्वांना सुख देऊन काही उणे पडू दिले नाही १० तुकाराम महाराज म्हणतात, त्या प्रसंगाने देवाचे महत्त्व कळून आले. याप्रमाणे गोकुळातील लोक पूर्ववत आनंदात निमग्न झाले ११

४५७२ लोकां कळो आला देव आम्हांमधीं । टाकिली उपाधि तिहीं शंका ॥ १ ॥
शंका नाहीं थोरा लाहानां जीवासि । कळला हा हृषीकेशी मग ॥ २ ॥
मग मनीं जाले निर्भर सकळ । सर्गे लोकपाळ कृष्णाचिया ॥ ३ ॥
कृष्णाचिया ओव्या गाणे गाती गीत । कृष्णमय चित्त जाले त्यांचे ॥ ४ ॥
त्यांसि ठावा नाहीं बाहेरिल भाव । अंतरीच वाव सुख जाले ॥ ५ ॥
सुखें तया दीस न कळे हे राती । अखंड या ज्योती गोविंदाची ॥ ६ ॥
चिंतनेचि धालीं न लगे अन्नपाणी । तुका म्हणे मनीं समाधान ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :- निर्भर-निर्भय, धालीं-संतुष्ट झाली

अर्थ - सर्व लोकांना आपल्यामध्ये देव आहे हे कळले, त्यामुळे त्यांनी अभिमान व शंका टाकून दिली १ गोकुळातील लहानथोरांना देवाविषयी संशय राहिला नाही हा कृष्ण म्हणजे भगवान विष्णू आहे, हे कळले २ कृष्णाच्या संगतीत सर्व लोक निर्भय होऊन आनंदीत झाले. ३ कृष्णाच्या ओव्या, कृष्णाचेच नाम व कृष्णाचे गीत गाऊ लागले त्यामुळे त्यांचे चित्त कृष्णमय झाले ४ अंतर्यामीच्या सुखामुळे त्यांना बाहेरची वार्ताही कळत नव्हती. ५ त्या सुखामुळे दिवस आहे का रात्र हेही त्यांना समजत नव्हते. गोविंदाची ज्योत अंतःकरणात अखंड तेवत होती ६ तुकाराम महाराज म्हणतात, हरीच्या चिंतनानेच ते तृप्त झाले होते त्यांना अन्नपाण्याची गरज नव्हती त्यांच्या मनाला समाधान प्राप्त झाले होते ७

४५७३ समाधान त्यांचीं इंद्रियें सकळ । जयां तो गोपाळ समागमें ॥ १ ॥
गोविंदाचा जाला प्रकाश भीतरीं । मग त्यां बाहेरी काय काज ॥ २ ॥
काज काम त्यांचे सरले व्यापार । नाहीं आप पर माझें तुझें ॥ ३ ॥
माया सकळांची सकळा ही वरी । विषम तें हरि दिसों नेदी ॥ ४ ॥
दिसे तया आप परावें सारिखें । तुका म्हणे सुखें कृष्णाचिया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा - भीतरीं-आत, चित्तात, काज-काम, गरज.

अर्थ - कृष्णाच्या संगतीमुळे त्यांची सर्व इंद्रिये समाधान पावली होती. १ अंतःकरणात त्या गोविंदाचा प्रकाश असल्यावर त्यांना बाह्य विषयाची काय गरज होती ? २ त्यांचे कामकाज, सर्व व्यापार संपले होते. आपपर

भाव त्याच्या ठिकाणी राहिला नव्हता ३ सर्वांचे सर्वांवर प्रेम होते एका हरीवाचून त्यांना भेद दिसत नव्हता ४ तुकाराम महाराज म्हणतात, कृष्णाच्या सुखापुढे आपले आणि परके सारखेच दिसत होते. ५

४५७४ कृष्णाचिया सुखें भूक नाहीं तान । सदा समाधान सकळांचें ॥ १ ॥
कळलेंचि नाहीं जाले किती दिस । बाहेरिल वास विसरलीं ॥ २ ॥
विसरु कामाचा तुका म्हणे जाला । उद्वेग राहिला जावें यावें ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा :– उद्वेग–दु ख

अर्थ – कृष्णाचे सुख प्राप्त झाल्यामुळे त्याना तहानभूक लागत नव्हती सर्वांना अखंड समाधान प्राप्त झाले होते. १ त्या सुखानंदात असताना किती दिवस निघून गेले हे त्याना कळले नाही बाहेरचे सर्व विषय ते विसरून गेले होते २ तुकाराम महाराज म्हणतात, त्याना सर्व विषयाचा विसर पडला होता आणि जन्ममरणाचे दु.ख राहिले नव्हते ३

४५७५ जावें बाहेरी हा नाठवे विचार । नाहीं समाचार ठावा कांहीं ॥ १ ॥
कांहीं न कळे तें कळों आलें देवा । मांडिला रिघावा कवतुक ॥ २ ॥
कवतुकासाटीं भक्त देहावरि । आणिताहे हरि बोलावया ॥ ३ ॥
यासि नांव रूप नाहीं हा आकार । कळला साचार भक्ता मुखें ॥ ४ ॥
मुखें भक्तांचिया बोलतो आपण । अंगसंगें भिन्न नाहीं दोघे ॥ ५ ॥
दोघे वेगळाले लेखिल जो कोणी । तयाचा मेदिनी वहु भार ॥ ६ ॥
तयासी घडलीं सकळ ही पापें । भक्ताचिया कोपें निंदा द्वेषें ॥ ७ ॥
द्वेषियाचा संग न घडावा कोणा । विष जेंवी प्राणां नाश करी ॥ ८ ॥
करितां आइके निंदा या संतांची । तया होती तेचि अधःपात ॥ ९ ॥
पतन उद्धार संगाचा महिमा । त्यजावे अधमा संत सेवीं ॥ १० ॥
संतसेवीं जोडे महालाभरासी । तुका म्हणे यासि नाश नाहीं ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा :– नाठवे–आठवत नाही, मेदिनी–पृथ्वी

अर्थ :– कृष्णसुखापुढे कोणाला बाहेर जावेसे वाटेना बाहेरची कोणतीही वार्ता ऐकावी असे त्याच्या मनात येईना १ जे इतराना कळणे शक्य नाही, ते त्याना देवाच्या कृपेने कळले होते. त्याचे मन देवाच्या कौतुकाने भरून गेले होते २ जगाला आपले कौतुक सांगता यावे याकरिताच देव आपल्या भक्तांना देहभानावर आणीत होता. ३ देवाला नाव, रूप, आकार नाही, हे भक्ताच्या मुखानेच जगाला कळते ४ देवच भक्तांच्या मुखाने बोलतो कारण एकमेकाशी एकरूप झाल्यामुळे भिन्न नसतात. ५ जो देवात आणि भक्तात भेद मानतो, त्या पाप्याचा पृथ्वीला भार होतो. ६ जो भक्तावर रागावून त्याची निंदा किंवा द्वेष करतो, त्याच्याकडून सर्व पापे घडली असे जाणावे ७ भक्ताचा द्वेष करणाऱ्याची कोणालाही संगती घडू नये कारण विष जसे प्राण्याचा नाश करते, याप्रमाणेच द्वेष करणाराची संगती हिताचा नाश करते. ८ जो संताची निंदा कानानी ऐकतो त्याचाही अधःपात होतो. ९ संगतीचा महिमाच असा आहे की, ती निंदाद्वारा पतनाला व स्तुतीद्वारा उद्धाराला कारण आहे म्हणून संतसंगती करावी व संतनिंदकाची संगती टाळावी १० तुकाराम महाराज म्हणतात, संतसेवकाला महालाभाची राशी प्राप्त होते, या लाभाचा पुनः कधी नाश होत नाही ११

४५७६ नाहीं नाश हरि आठविता मुखें । जोडतील सुखें सकळ ही ॥ १ ॥
सकळ ही सुखें वोळलीं अंतरीं । मग त्याबाहेरी काय काज ॥ २ ॥
येऊं विसरलीं बाहेरी गोपाळें । तल्लीन सकळें कृष्णसुखें ॥ ३ ॥
सुख तें योगिया नाहीं समाधीस । दिलें गाई वत्स पशु जीवा ॥ ४ ॥
वारला पाऊस केव्हा नाहीं ठावा । तुका म्हणे देवावाचूनिया ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वोळलीं–प्राप्त झाली, मिळाली, वारला–दूर केला, थांबला

अर्थ – मुखाने हरिनामसंकीर्तन करणाऱ्याचा कधीच नाश होत नाही त्याला जगातील सर्व सुखे प्राप्त होतात १ सर्व सुखे ज्याच्या अंतःकरणात उदभवली आहेत त्याला बाहेरच्या जगाशी काय कर्तव्य आहे ? २ सर्व गोपाळ देहभानावर येण्याचे विसरून गेले कृष्णसुखात निमग्न झाले होते ३ जे सुख योग्यांना समाधिअवस्थेत प्राप्त होत नाही ते देवानें गाई वासरे, पशुपक्षी इत्यादी जीवांना दिले ४ तुकाराम महाराज म्हणतात, कृष्णसुख भोगताना पाऊस केव्हा थांबला, हे एका देवावाचून कोणालाच कळले नाही ५

४५७७ यासि समाचार सांगतो सकळा । चलावें गोकुळा[१] म्हणे देव ॥ १ ॥
देव राखे तया आडलिया काळें । देव सुखफळें देतो दासा ॥ २ ॥
दासा दुःख देखों नेदीं आपुलिया । निवारी आलिया न कळतां ॥ ३ ॥
नाहीं मेघ येतां जातां देखियेला । धारीं वरुषला शिळाचिये ॥ ४ ॥
एवढें भक्ताचें सांकडें अनंता । होय निवारिता तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – नेदीं–देत नाही, सांकडें–संकट, दुःख

अर्थ – कृष्ण म्हणाला, गोपाळांनो इंद्राने शिळाधारांचा वर्षाव का केला, ते सविस्तर सांगतो, तुम्ही आता गोकुळात चला १ संकटाच्या वेळी भक्तांचे रक्षण देव करतो, तो आपल्या भक्तांना सुखाची फळ देतो २ भक्तांना दुःख पाहण्याचा प्रसंग कधीही येऊं देत नाही दुःख येण्यापूर्वीच कळू न देता, तो त्याचे निवारण करतो ३ त्यामुळे मेघ केव्हा आले, आणि केव्हा गेले आणि त्यांनी शिळाधारांचा वर्षाव किती केला, हे त्यांना कळलेसुद्धा नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात, भक्ताचे संकट देवावर येऊन पडते, आणि तोच त्याचे निवारणही करतो ५

४५७८ फाकुडतो एके पाहाती बाहेरी । तया म्हणे हरि वोसरला ॥ १ ॥
वोसरला मेघ आला होता काळ । बाहेरी सकळ आले लोक ॥ २ ॥
कवतुक जालें ते काळीं आनंद । कळला गोविंद साच भावें ॥ ३ ॥
भावें तयापुढें नाचती सकळें । गातील मंगळें ओंव्या गीत ॥ ४ ॥
गीत गाती ओंव्या रामकृष्णावरी । गोपाळ मोहोरी वाती[२] पावे ॥ ५ ॥
वत्सें गाई पशु नाचती आनंदें । वेधलिया छंदें गोविंदाच्या ॥ ६ ॥
चित्त वेधियेलें गोविंदें जयाचें । कोण तें दैवाचें तयाहुनि ॥ ७ ॥
तयाहुनि कोणी नाहीं भाग्यवंत । अखंड सांगात गोविंदाचा ॥ ८ ॥
गोविंदाचा संग तुका म्हणे ध्यान । गोविंद ते जन गोकुळींचे ॥ ९ ॥

शब्दार्थ व टीपा – साच–खरा मोहोरी–बासरी

१ गोपाळा, २ वाहाती

अर्थ :– काही लोक गोवर्धनाच्या बाहेर येऊन पाऊस ओसरला का नाही, हे भीत भीत पाहू लागले हरी म्हणाला, अरे ! असे भिता काय ? पाऊस ओसरला आहे, चला बाहेर. १ काय हो ! हा मेघ म्हणजे आपल्या-करिता काळच आला होता बुवा ! असे परस्परात बोलत सर्व लोक गोवर्धनाच्या बाहेर आले. २ त्यावेळी सर्वांना फार आनंद झाला. कृष्णाने गोवर्धन उचलला याचे सर्वांनी कौतुक केले गोविंद केवढा आहे, कसा आहे, हे त्या दिवशी त्याना यथार्थ रूपाने कळले. ३ लोक कृष्णापुढे मंगल अशा ओव्या गाऊ लागले, नाचू लागले. ४ त्या ओव्या राम-कृष्णाच्या वर्णनपर होत्या लहान गोप वेणु, पावा वाजवू लागले. ५ गोविंदाच्या नादाने वेडावलेली गाई–वासरे टुणटुण उड्या मारू लागली. ६ ज्याचे चित्त गोविंदाने आकर्षित केले आहे त्याच्यापेक्षा जगात कोण भाग्याचा आहे ? ७ ज्याना अखंड गोविंदाची संगती आहे, त्याच्यापेक्षा कोणीही जगात भाग्यवान नाही ८ तुकाराम महाराज म्हणतात, गोकुळातील लोकाना गोविंदाची नित्य संगती व नित्य ध्यान असल्यामुळे सारे लोक गोविंदरूपच झाले होते ९

४५७९ गोकुळींची गती कोण जाणे परि । पाहों आला वरी इंद्रराव ॥ १ ॥
इंद्रापाशीं मेघ बोलती बडिवार । सकळ संहार करुनि आलो ॥ २ ॥
आतां जीव नाहीं सागाया ते रानीं । पुरिलें पाषाणीं शिळाधारीं ॥ ३ ॥
रिता कोठें नाहीं राहों[1] दिला ठाव । जल्पती तो भाव न कळतां ॥ ४ ॥
न कळतां देव वळें हुंबरती । साच ते पावती अपमान ॥ ५ ॥
माय न कळतां केली तोंडपिटी । इंद्र आला दृष्टी पाहावया ॥ ६ ॥
पाहतां ते आहे जैसे होते तैसें । नाचती विशेषें तुका म्हणे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा - रिता–रिकामा, ठाव–स्थान, जागा, जल्पती–बडबडतात

अर्थ – गोकुळाची काय अवस्था झाली आहे हे पाहाण्याकरिता इंद्र वर आला १ तेव्हा मेघ इंद्राजवळ येऊन आपली बढाई सांगू लागले. २ आम्ही सर्वांना शिळा पाषाणानी पुरून टाकले आहे, आता त्या रानात प्राणी म्हणून कोणीही शिल्लक राहिला नाही ३ आम्ही वर्षावावाचून थोडीसुद्धा जागा शिल्लक ठेवली नाही. याप्रमाणे खरी परिस्थिती माहीत नसल्यामुळे मेघ खुशाल वाटेल तशी बडबड करू लागले ४ ज्याना देवाचे महत्व समजलेले नसते, ते लोक अभिमानाने काहीतरी बडबडत असतात पण त्याचा शेवटी अपमान होतो. ५ याप्रमाणे देवाची माया न समजता गर्वाने मेघानी खूपच बडबड केली प्रत्यक्ष वस्तुस्थिती पाहाण्याकरिता मग इंद्र गोकुळात आला.६ तुकाराम महाराज म्हणतात, गोकुळात पाहातो तो काय ? तेथे पूर्वीपेक्षाही विशेष आनंदी आनंद होता लोक आनंदाने नाचत होते, गोकुळ, गाई, वासरे जशीच्या तशीच होती ७

४५८० नाचतां देखिलीं गाई वत्सें जन । विस्मित होऊन इंद्र ठेला ॥ १ ॥
लागला पाऊस शिळाचिये धारीं । वाचलीं हीं परी कैसीं येथें ॥ २ ॥
येथें आहे नारायण सदेह नाहीं । विघ्न केले ठायीं निर्विघ्न तें ॥ ३ ॥
विचारितां उचलिला गोवर्धन । अवतार पूर्ण कळो आला ॥ ४ ॥
आला गौळियाच्या घरा नारायण । करितो स्तवन इंद्र त्यांचें ॥ ५ ॥
त्याच्या पुण्या पार कोण करी लेखा । न कळे चतुर्मुखा ब्रह्मयासि ॥ ६ ॥
सीणतां जो ध्याना न ये एकवेळा । तो तया गोपाळां समागमें ॥ ७ ॥
समागमें गाई वत्स पुण्यवंता । देह कुर्वाळिता अंगसंग ॥ ८ ॥
संग जाला मायबापां लोकपाळां । आळिंगिती गळा कंठाकंठ ॥ ९ ॥

[1] उरीं.

करिते हे जाले स्तुती सकळिक । देव इंद्रादिक गोविंदाची ॥ १० ॥
करितील वृष्टी पुष्पवरुषाव । देवाआदिदेव पूजियेला ॥ ११ ॥
पुष्पांजुळी मंत्र घोष जयजयकार । दुमदुमी अंबर तेणे नादें ॥ १२ ॥
नामाचे गजर गंधर्वांचीं गाणीं । आनंद भुवनीं[1] न माये तो ॥ १३ ॥
तो सुखसोहळा अनुपम्य रासी । गोकुळीं देवासी दोहीं ठाईं ॥ १४ ॥
दोहीं ठायीं सुख दिले नारायणे । गेला दरुषणे वैरभाव ॥ १५ ॥
भावना भेदाची जाय उठाउठी । तुका म्हणे भेटी गोविंदाचे ॥ १६ ॥

शब्दार्थ व टीपा – ठेला-राहिला, परी-प्रकारे अंबर-आकाश

अर्थ – गोकुळात गाई वासरे व सर्व गोपाळ आनंदात गुंग होऊन नाचत बसलेले पाहून इंद्र आश्चर्यचकित झाला १ तो मनात म्हणाला सात दिवस मुसळधार पाऊस पडला असता हे सर्व वाचले कसे ? २ ज्या अर्थी हे सर्व जसेच्या तसे आहे त्या अर्थी येथे नारायण असला पाहिजे मी मूळातच निर्विघ्न ठिकाणी विघ्न केले मग त्याचा उपयोग काय होणार ? ३ इंद्राने विचारणा केली, तेव्हा त्याला कळून आले की, कृष्णाने गोवर्धन उचलून सर्वांचे रक्षण केले अर्थात हा कृष्ण पूर्णावतार आहे हेही इंद्राच्या लक्षात आले ४ इंद्र नंदाकडे आला आणि नारायणाची स्तुती करू लागला ५ इंद्र म्हणाला, या गवळ्याच्या पुण्याची गणती कोण करेल ? त्याचा आदीअंत प्रत्यक्ष चतुर्मुख ब्रह्मदेवालाही सांगता येणार नाही ६ योग्याने योगाभ्यासाचे कितीही श्रम केले तरी एकवेळसुद्धा त्याच्या ध्यानात येत नाही तो हरी गोपाळांच्या संगतीत राहातो ७ पुण्यवान अशा गाई वासरांच्या संगतीत राहून त्यांना कुरवाळतो ८ सर्व लोकांना व नंदयशोदेला हरीची संगती लाभली असून त्याच्या गळ्यात गळा घालून तो आलिंगन देतो ९ याप्रमाणे इंद्राने व इतर देवांनी गोविंदाची प्रशंसा केली १० नंतर इंद्राने देवाधिदेवाची पूजा केली तेव्हा इतर देवांनी विमानातून स्तुतिपूर्वक पुष्पवृष्टी केली, ११ मंत्रघोष करून पुष्पांजली वाहिली, जयजयकार केला त्या नादाने आकाश दुमदुमले १२ कृष्णनामाचा गजर होऊ लागला गंधर्व गाणी गाऊ लागले तो आनंद त्रैलोक्यात मावेनासा झाला १३ तो सुखसोहळा मानव आणि देव यांनी पाहिल्यामुळे गोकुळात व स्वर्गात दोही ठिकाणी आनंद झाला १४ नारायणाने दोही ठिकाणी आपले सुख दिले कृष्णाच्या व्यापक रूपाचे दर्शन होताच सर्व जीव परस्परातील वैरभाव विसरले. १५ तुकाराम महाराज म्हणतात, गोविंदाची ममत्वाने भेट होताच तत्काळ भेदभावना नष्ट होते १६

४५८१ गोविंदाचे नाम गोड घेता वाचे । तेथें हे कइचे वैरभाव ॥ १ ॥
भावे नमस्कार घातले सकळीं । लोटांगणे तळीं महीवरि ॥ २ ॥
वरि हातबाहे उभारिली देवे । कळलीया भावे सकळाचिया ॥ ३ ॥
सकळ ही वरि बहुडविले त्यळा । चलावे गोपाळा म्हणे घरा ॥ ४ ॥
राहिलीं हीं नाचो गोविंदाच्या बोले । पडिलीया डोले[2] छंदें हो तीं ॥ ५ ॥
छंद तो नावरे आपणा आपला । आनंदाचा आला होता त्यांसि ॥ ६ ॥
त्याच्या[3] तुका म्हणे आनंदें सकळ । ठेंगणे गोपाळ समागमें ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – महीवरि-पृथ्वीवर, बहुडविले-पाठविले

अर्थ – गोविंदाचे गोड नाम घेतल्यानंतर तेथ वैरभाव कसा राहील ? १ सर्वांनी देवाला भक्तिभावनेने जमिनीवर लोटांगण घालून नमस्कार केला २ सर्वांचा भाव जाणून देवाने हात वर केला ३ ज्यांना त्यांना

१ त्रिभुवनीं, २ डोळे, ३ त्यासी

आपआपल्या स्थळी देवाने आज्ञा देऊन पाठवून दिले ४ गोविंदाच्या आज्ञेमुळे गोपाळाचे नाचणे बंद झाले तरी पण अंथरुणावर पडल्यावर देखील कृष्णाच्या छंदाने डोलत होते ५ त्याना तो छंद अनावर झाला होता कारण तो कृष्णछंद त्याच्या मनात संचरला होता, त्यामुळे त्याना आनंदाचा उमाळा आला होता ६ तुकाराम महाराज म्हणतात, विशेषत लहान गोपाळाच्या संगतीमुळे तर त्या सर्वांनाच आनंद झाला होता ७

४५८२ समागमें असे हरि नेणतिया । नेदी जाऊं वाया अंकितासि ॥ १ ॥
अंकिता सावध केले नारायणे । गोपाळ गोधनें सकळिका ॥ २ ॥
सदळही जन आले गोकुळासि । आनंद मानसीं सकळाच्या ॥ ३ ॥
सकळाचा केला अंगीकार देवें । न कळता भावे वाचवी त्या ॥ ४ ॥
त्या जाला निर्धार हरि आम्हांपासीं । निवांत मानसी निर्भर तीं ॥ ५ ॥
निर्भर हे जन गोकुळींचे लोक । केले सकळिक नारायणे ॥ ६ ॥
नारायण भय येऊं नेदी गावा । तुका म्हणे नावा अनुसरे त्या ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – अंकितासि–सेवकाना, भक्ताना, निर्भर–आनंदित, निर्भय

अर्थ – अज्ञानी, भाविक अशा लोकाच्या संगतीत हरी राहातो तो आपल्या भक्ताला वाया जाऊ देत नाही १ नारायणाने आपल्या आज्ञेत असणाऱ्या गोपाळाना, व गाई वासराना सावध केले २ म्हणूनच ते सर्व गोवर्धन पर्वतापासून गोकुळात परत आले कृष्णाने संकटातून वाचविले यावद्दल सर्वांच्या मनात आनंद मावेना ३ कृष्णाने सर्वांचा अंगिकार केला त्याना दु खाची जाणीव होऊ न देता सर्वांचे प्राण वाचविले ४ आमच्या जवळ हरी आहे, अशी त्याची खात्री झाली त्यामुळे ते शांत व आनंदित झाले ५ नारायणाने गोकुळातील सर्व लोकाना आनंदित केले ६ तुकाराम महाराज म्हणतात, जो नारायणाच्या नामाला अनुसरतो, त्याच्या गावालासुद्धा भय जात नाही ७

४५८३ ये दशे चरित्र केले नारायणे । रांगता गोधनें राखिताहे ॥ १ ॥
हें सोंग सारिलें या रूपें अनंतें । पुढें हि बहु तें करणे आहे ॥ २ ॥
आहे तुका म्हणे धर्म संस्थापणे । केला नारायणे अवतार ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – ये दशे–लहानपणी

अर्थ – नारायणाने तो अगदी लहान असताना, रांगत होता तेव्हा पूतना, शकटासुर इत्यादींचा नाश करून चरित्र केले पुढे जरा मोठा झाल्यावर गाईंचे रक्षण केले. १ नंतर अनंताने गुराख्याचेही सोंग दूर सारले, कारण प्रौढपणी त्याला आणखी पुष्कळ कार्य करावयाचे होते २ तुकाराम महाराज म्हणतात, नारायणाने मुख्यत धर्माची संस्थापना करण्याकरताच अवतार घेतला होता ३

४५८४ अवतार केला संहाराव[1] दुष्ट । करिती हे नष्ट परपीडा ॥ १ ॥
परपीडा करी दैत्य कंसराव । पुढें तो ही भाव आरंभिला ॥ २ ॥
लाविलें लाघव पाहोनिया संधी । सकळाही वधी दुष्टजना ॥ ३ ॥
दुष्टजन परपीडक जे कोणी । ते या चक्रपाणी न साहति ॥ ४ ॥
न साहवे दु ख भक्ताचे या देवा । अवतार घ्यावा लागे रूप ॥ ५ ॥
रूप हें चांगले रामकृष्ण नाम । हरे भवश्रम उच्चारिता ॥ ६ ॥

१ संहाराया

उच्चारिता नाम कस[1] वैरभावे । हरोनिया जीवें कृष्ण केला ॥ ७ ॥
कृष्णरूप त्यासि दिसे अवघें जन । पाहे तो आपण कृष्ण जाला ॥ ८ ॥
पाहिले दर्पणीं आधील मुखासि । चतुर्भुज त्यासि तोचि जाला ॥ ९ ॥
जालीं कृष्णरूप कन्यापुत्र भाज । तुका म्हणे राज्य सैन्य जन ॥ १० ॥

शब्दार्थ व टीपा – न साहति–सहन होत नाही, दर्पणीं–आरशात

अर्थ – जे दुष्ट-नष्ट व दुसऱ्याना दुःख देतात, साधूचा छळ करतात, त्याचा नाश करण्याकरिता देवाने अवतार घेतला होता. १ दैत्यानी व कसाने दुसऱ्याचा छळ केला, म्हणून देवाने पुढेही दुष्टाचा नाश करण्याचे कार्य चालू ठेवले २ मल्लयुद्धाची युक्ती योजून व योग्य संधी पाहून दुष्टाचा नाश केला ३ जे कुणी परपीडक व दुष्ट आहेत, ते देवाला सहन होत नाहीत ४ दुष्टानी भक्ताना दिलेला त्रास देवाला तर मुळीच सहन होत नाही. म्हणून प्रसगानुसार रूप धारण करून देवाला अवतार घ्यावा लागतो ५ राम व कृष्ण या दोन अवतारातील रूप व नाम फार चागले असून नामाचा उच्चार करताक्षणीच भवदुःख नाहीसे होते ६ कसाने भयाने कृष्णनामाचा उच्चार केला, त्या योगाने त्याची जीवदशा नष्ट होऊन तो कृष्णरूप झाला ७ त्याला जिकडे तिकडे कृष्ण दिसू लागला तो स्वतःलाही कृष्णरूपच पाहात होता ८ आरशात त्याने आपले रूप पाहिले असता ते त्यास पूर्वीसारखे न दिसता चतुर्भुज श्यामसुदर झाल्याचे दिसून आले. ९ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे कसाने भयाने कृष्णाचे चिंतन केल्यामुळे बायको, मुले, मुली, राज्य, सैन्य सर्व लोक त्याला कृष्णमय दिसू लागले १०

४५८५ सैन्य जन हासे राया जाले काई । वासपे तो ठायीं आपणासि ॥ १ ॥
आपणा आपण जयास तीं तैसीं । वैरभाव ज्यासि भक्ति नाहीं ॥ २ ॥
नाहीं याचा त्याचा भाव एकविध । म्हणउनि छंद वेगळाले ॥ ३ ॥
वेगळाल्या भावें तीं तया हासती । तयास दिसती अवघीं हरि ॥ ४ ॥
हरिला कसाचा जीव भाव देवें । द्वेषाचिया भावें तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – वासपे–बडबडू लागला

अर्थ – कस जेव्हा कृष्ण म्हणू लागला, व आपल्या ठिकाणीच कृष्णाची आठवण करून भिऊ लागला, त्यावेळी त्याचे सैन्य व प्रजाजन राजाला असे काय झाले, पिसे लागले की काय, म्हणून हसू लागले. १ ज्याच्या ठिकाणी कृष्णाबद्दल वैरभाव किंवा भक्तिभावही नाही, त्याला आपल्यासारखेच सर्व लोक सामान्य आहेत असे वाटते २ कृष्णाविषयी एकविध भाव नसतो, म्हणूनच अनेक विषयाचे अनेक छद असतात ३ सैन्याला, प्रजाजनाना कृष्णाविषयी कोणताच भाव नसल्यामुळे ते कसाला हसू लागले, पण कसाच्या ठिकाणी कृष्णाविषयी एकच भयभाव असल्यामुळे त्याला सर्व कृष्णरूपच दिसत होते ४ तुकाराम महाराज म्हणतात, याप्रमाणे कसाने भयभावाचे ध्यान केल्यामुळे कृष्णाने त्याची जीवदशा नष्ट केली ५

४५८६ द्वेषाचिया ध्यानें[2] हरिरूप जाले । भाव हारपले देहादिक ॥ १ ॥
देहादिक कर्मे अभिमान वाढे । तया कसा जोडे नारायण ॥ २ ॥
नारायण जोडे एकविध भावें । तुका म्हणे जीवें जाणे लागे ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – हारपले–नष्ट झाले

१ कस, २ भावे

अर्थ :– द्वेषभावाने ध्यान करून कंस हरिरूप झाला ध्यानाने त्याचा देहाभिमान नाहीसा झाला होता १ देहाभिमानाने केलेली कर्मे जन्ममरणपरंपरा वाढवितात, परंतु कंसाचा देहाभिमान गेल्याने त्याला नारायणाची प्राप्ती होते. २ तुकाराम महाराज म्हणतात, कृष्णाविषयी काम, द्वेष, भय, वात्सल्य यापैकी कोणताही का भाव असेना, पण तो एकविध म्हणजे अव्यभिचारी असावा. जीवदशा अर्पण करण्याचे धैर्य असावे म्हणजे नारायणाची प्राप्ती होते ३

४५८७ जीवभाव त्याचा गेला अभिमान । म्हणऊनि जन हांसे कंसा ॥ १ ॥
सावध करितां नये देहावरि । देखोनिया दुरि पळे जन ॥ २ ॥
जन वन हरि जालासे आपण । मग हे लोचन झांकियेले ॥ ३ ॥
झांकुनि लोचन मौन्येंचि राहिला । नाहीं आतां बोलायाचे काम ॥ ४ ॥
बोलायासि दुजें नाहीं हे उरलें[1] । जन कृष्ण जाले स्वयें रूप ॥ ५ ॥
रूप पालटले गुण नाम याति । तुका म्हणे भूतीं देव जाला ॥ ६ ॥

शब्दार्थ व टीपा – लोचन–डोळे, दुजें–दुसरे

अर्थ :– कंसाचा जीवभाव आणि देहाभिमान गेला होता, म्हणून सर्व लोक त्याला हसत होते १ त्याला देहशुद्धीवर आणण्याचा कितीही प्रयत्न केला, तरी तो येत नव्हता उलट लोक जवळ आले की तो कृष्णच जवळ आला आहे, असे समजून दूर पळून जात होता २ जेव्हा त्याला लोक, वन व स्वतःचे शरीर देखील हरिरूप दिसू लागले, तेव्हा त्याने भयाने डोळे झाकून घेतले. ३ तो डोळे झाकून स्वस्थ बसला बोलावयाचे आता कामच राहिले नाही अशी त्याची स्थिती झाली. ४ बोलण्याच्या व्यवहाराकरिता आवश्यक असलेले द्वैत उरलेच नव्हते. कारण त्याला आपणासह सर्व लोक कृष्णच दिसत होते ५ तुकाराम महाराज म्हणतात, रूप, गुण, नाम आणि जात याचा बाध होऊ नये म्हणून त्याला सर्वभूती देवच दिसत होता ६

४५८८ जालो[2] स्वयें कृष्ण आठव हा चित्तीं । भेद भयवृत्ति उरली आहे ॥ १ ॥
उरली आहे रूप नाव दिसे भिन्न । मी आणि हा कृष्ण आठवतो ॥ २ ॥
तोवरि हा देव नाहीं तयापासीं । आला दिसे त्यासि तोचि देव ॥ ३ ॥
देवरूप त्याची दिसे वरी काया । अंतरीं तो भयाभीत भेदें[3] ॥ ४ ॥
भेदें तुका म्हणे अंतरे गोविंद । साचें विण छंद वाया जाय ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – काया–शरीर

अर्थ :– जोपर्यंत कंसाच्या चित्तात मी कृष्ण झालो असे चिंतन होते, तोपर्यन्त मी आणि कृष्ण अशी भेद-भावना असल्यामुळे भयवृत्ती उरली होती १ दोघांची नाव, रूपे भिन्न आहेत, असे जोपर्यन्त कंस चिंतन करीत होता, तोपर्यंत त्याच्या ठिकाणी भेदभाव होताच २ आणि जोपर्यंत भेदभाव होता, तोपर्यंत कंसाजवळ आत्मरूपाने देव नव्हता केवळ ध्यानयोगाने जो मनुष्य त्याच्याजवळ येईल, त्याला तो कृष्ण समजत होता. ३ त्याला वरवर आपले शरीर कृष्णरूप दिसत होते, तरी पण वास्तव भेद तो पाहात असल्यामुळे त्याचे अंतःकरण भयभीत झाले होते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, द्वैत निर्माण झाले की देव दूर होतो, भेदप्रतीतीमुळे देव दुरावतो आणि ज्याला वास्तव अपरोक्ष ज्ञान झाले नसेल, त्याचे ज्ञान, योग, ध्यान, याग इत्यादी साधनाचे छंद वाया जातात ५

४५८९ वांयां तैसे बोल हरिशीं अंतर । केले होती चार भयभेदें ॥ १ ॥
भेदभय गेले नोळखे आपणा । भेटी नारायणा कंसा जाली ॥ २ ॥

१ राहिले, २ जाला, ३ भयें

जाली भेटी कसा हरिशीं निकट । सन्मुखचि नीट येरयेरा ॥ ३ ॥
येरयेरा भेटी युद्धाच्या प्रसगीं । त्याचे शस्त्र अगीं हाणितले ॥ ४ ॥
त्याचे वर्म होतें ठावे या अनता । तुका म्हणे सत्तानायक हा ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – नोळखे–ओळखत नाही, येरयेरां–एकमेकाना.

अर्थ – ज्याच्या चित्तात भय आणि भेदभाव आहे, त्याने ज्ञानाच्या कितीही गप्पा मारल्या, तरी त्या व्यर्थ आहेत एवढेच नव्हे तर तसे बोलणे वेडेपणाचे होते १ जेव्हा ज्ञानाने कसाच्या मनातील भय आणि भेद गेला, व तो मीपणाला ओळखत नव्हता, तेव्हा त्याला नारायणाची आत्मत्वाने भेट झाली २ आणि भयाने केलेल्या ध्यानाने हरीच्या सगुणरूपाची भेट अगदी त्याच्या समोर झाली ३ कस व हरी याची परस्पर भेट झाली असता त्याच्यात व्यवहारदृष्टीने युद्ध झाले व त्या प्रसगी देवाने कसाच्या मानेवर खड्गाचा प्रहार करून कसाचा नाश केला ४ तुकाराम महाराज म्हणतात, अनत हा सर्वसत्ताधीश असल्यामुळे कसाच्या मरणाचे वर्म कशात आहे, हे त्याला पूर्ण माहीत होते ५

४५९० नारायणे कंस चाणूर मर्दिला । राज्यीं बैसविला उग्रसेन ॥ १ ॥
उग्रसेन स्थापियेला शरणागत । पुरविला अत अभक्ताचा ॥ २ ॥
अवघेंचि केले कारण अनतें । आपुलिया हातें सकळ ही ॥ ३ ॥
सकळ ही केलीं आपुलीं अकित । राहे गोपीनाथ मथुरेसि ॥ ४ ॥
मथुरेसि आला वैकुंठनायक । जाले सकळिक एक राज्य ॥ ५ ॥
राज्य दिले उग्रसेना शरणागता । सोडविलीं माता पिता दोन्ही ॥ ६ ॥
सोडवणे धावे भक्ताच्या कैवारें । तुका म्हणे करें शस्त्र धरी ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – अकित–आज्ञाधारक, सेवक.

अर्थ – नारायणाने कसाचा नाश केल्यावर चाणुराचाही नाश केला, आणि उग्रसेनाला राज्यावर बसविले १ याप्रमाणे देवाने दुष्टाचा व अभक्ताचा नाश केला व उग्रसेन शरण आल्यामुळे त्याला राज्य दिले. २ अनताने आपल्या हाताने राज्याभिषेकाचा सोहळा पार पाडला ३ मथुरेत कृष्ण राहिला, आणि त्याने सर्व लोकाना आज्ञाधारक भक्त करून वश केले ४ श्रीकृष्ण आल्यापासून मथुरेत एकछत्री, निष्कटक राज्य झाले ५ वसुदेवदेवकीला कारागृहातून सोडविले ६ तुकाराम महाराज म्हणतात, हा शस्त्र हातात धारण करून भक्तांचा पक्ष घेतो, त्याना सकटातून सोडविण्याकरिता धावतो ७

४५९१ धरी दोही ठायीं सारखाचि भाव । देवकी वसुदेव नद दोघे ॥ १ ॥
दोन्ही एके ठायीं केल्या नारायणें । वाढविला तिणें आणि त्याली ॥ २ ॥
त्याला वाढला हा आपल्या आपण । निमित्या कारणें मायबाप ॥ ३ ॥
माय हा जगाची बाप नारायण । दुजा करी कोण यत्न यासि ॥ ४ ॥
कोण जाणे याचे अतरींचा भाव । कळों नेदी माव तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – दुजा–दुसरा

अर्थ – वसुदेवदेवकी आणि नंदयशोदा या दोन्ही आईबापावर कृष्णाची सारखीच माया होती १ जिने जन्म दिला आणि जिने वाढविले, त्या दोघी आयाची कृष्णाने एके ठिकाणी भेट घडवून आणली २ खरे पाहाता, कृष्ण स्वेच्छेने जन्माला आला आणि स्वसामर्थ्याने वाढला, पण वसुदेवदेवकीला व नंदयशोदेला केवळ निमित्त मात्र केले ३ कारण नारायणच सर्व जगाचा मायबाप असल्यामुळे त्याला दुसरे कोणते मायबाप जन्म देण्याचा प्रयत्न करतील ? ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवाच्या मनातील भाव कोणाला कळत नाही व तो आपले कारस्थान कोणाला कळूही देत नाही ५

४५९२ दिनाचा कृपाळु दुष्टजना काळ । एकला सकळ व्यापक हा ॥ १ ॥
हासे बोले तैसा नव्हे हा अनंत । नये पराकृत म्हणो यासि ॥ २ ॥
यासि कळावया एक भक्तिभाव । दुजा नाहीं ठाव धांडोळिता ॥ ३ ॥
धांडोळिता श्रुति राहिल्या निश्चित । तो करी संकेत गोपींसवे ॥ ४ ॥
गोपिकाची वाट पाहे द्रुमातळीं । मागुता न्याहाळी न देखता ॥ ५ ॥
न देखता त्यासि उठे बैसे पाहे । वेडावला राहे वेळोवेळा ॥ ६ ॥
वेळोवेळा पथ पाहे गोपिकाचा । तुका म्हणे वाचा नातुडे तो ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – पराकृत–सामान्यासारखा, दुजा–दुसरा, द्रुमातळीं–झाडाखाली

अर्थ – हा कृष्ण दीनाविषयी कृपाळ व दुष्ट जनाचा काळ आणि निर्गुणनिराकार एक अद्वितीय व्यापक आहे १ हा अनंत चारचौघासारखा हसतो, बोलतो, म्हणून तो सामान्य माणसासारखा नाही याकरिता त्याला हीन, क्षुद्र म्हणू नये २ त्याचे तात्त्विक स्वरूप करण्याकरिता एक भक्तिभाव कारण आहे दुसऱ्या साधनाने त्याच्या स्वरूपाचा विचार केला तर त्याची प्राप्ती होत नाही ३ श्रुती देखील ज्याचा विचार करिता मौनावल्या, तो देव महाभक्त गोपिकाशी ' तुम्ही अमुक स्थळी मला भेटा ' असा संकेत करीत होता ४ त्या गोपिकाची वृक्षाखाली उभा राहून वाट पाहात होता, त्या दिसल्या नाही, तर पुन पुन दूरवर त्याची वाट पाहात होता ५ त्यांच्याकरिता तो वेडा झाला होता, त्या दिसल्या नाहीत तर तो कासावीस होऊन प्रत्येक वेळी उठत, बसत होता आणि सारखी त्यांची वाट पाहात होता ६ तुकाराम महाराज म्हणतात, श्रुतीला जो अगम्य असा देव वेळोवेळी गोपिकाची वाट पाहात होता ७

४५९३ तो बोले कोमळ निष्ठुर साहोनि । कोपता गौळणी हास्य करी ॥ १ ॥
करावया दास्य भक्ताचे निर्लज्ज । कवतुके रज माथा वंदी ॥ २ ॥
दिले उग्रसेना मथुरेचे राज्य । सांगितले काज करी त्याचे ॥ ३ ॥
त्यासि होता काहीं अरिष्टनिर्माण । निवारी आपण शरणागता ॥ ४ ॥
शरणागता राखे सर्व भावें हरि । अवतार धरी तयासाठीं ॥ ५ ॥
तयासाठीं वाहे सुदर्शन गदा । उभा आहे सदा सांभाळित ॥ ६ ॥
तळमळ नाहीं तुका म्हणे चित्ता । भक्ताचा अनंता भार माया ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – रज–धूळ, काज–काय

अर्थ – एखाद्या वेळी त्या गोपी निष्ठुरपणाने बोलल्या, तरी ते सहन करून तो त्यांच्याशी कोमल बोलत होता त्या रागावल्या तरीही हा मात्र हसत होता १ भक्ताचे दास्य करण्याकरिता हा निर्लज्ज होत असे

कौतुकाने भक्तांची चरणधूळी डोक्याला लावून त्यांना वदन करीत असे. २ कृष्णाने उग्रसेनाला राज्य दिले आणि तो सांगेल ते काम कृष्ण करीत होता. ३ उग्रसेनाला जर कोणते संकट आले तर तो शरण आल्यानंतर त्याचे निवारण करीत होता. ४ शरण आलेल्या भक्तांचे तो काया-वाचा-मनाने रक्षण करीत होता. किंबहुना भक्तांकरताच तो अवतार घेत असतो. ५ भक्तांच्या रक्षणाकरिताच तो हातामध्ये सुदर्शन व गदा वागवितो, आणि सर्वकाळ त्यांचे रक्षण करतो. ६ तुकाराम महाराज म्हणतात, भक्तांच्या मनाला कशाची तळमळ नसते. याचे कारण भक्तांच्या योगक्षेमाचा भारवाही अनंत आहे. ७

४५९४ मारिले असुर दाटले[1] मेदिनी । होते कोणाकोणी पीडित ते ।। १ ।।
ते हा नारायण पाठवी अघोरा । संतांच्या मत्सरा घातावरी ।। २ ।।
वरिले ते दूतीं यमाचिया दंडीं । नुच्चारितां तोंडीं नारायण ।। ४ ।।
नारायण नाम नावडे जयासि । ते जाले मिरासी कुंभपाकीं ।। ४ ।।
कुंभपाकीं सेल मान तो तयांचा । तुका म्हणे वाचा संतनिंदा ।। ५ ।।

शब्दार्थ व टीपा :– मेदिनी–पृथ्वी.

अर्थ :– ज्यांचा पृथ्वीला भार झाला आहे, आणि जे परपीडा करीत होते, त्या असुरांचा देवाने नाश केला. १ संतांचा द्वेष व घात करणाऱ्या दुष्टांना नारायणाने अघोर नरकाकडे पाठविले. २ ज्यांनी जन्मात कधीही नामोच्चार केला नाही, त्यांना नरकात पाठवून यमदूतांकडून शासन करविले. ३ ज्यांना नारायणाच्या नावाची आवड नव्हती ते कुंभीपाक नरकाचे वाटेकरी झाले. ४ तुकाराम महाराज म्हणतात, जे लोक वाणीने संतांची निंदा करितात, त्यांचा कुंभीपाक नरकात चांगलाच मान होतो. ५

४५०५ वास नारायणें केला मथुरेसि । वधूनि दुष्टांसि तये ठायीं ।। १ ।।
ठायीं पितियाचे मानी उग्रसेना । प्रतिपाळी जनांसहित लोकां ।। २ ।।
लोकां दुःख नाहीं मागील आठव । देखियेला देव दृष्टी त्यांणीं ।। ३ ।।
देखोनियां देवा विसरलीं कंसा । ठावा नाहीं ऐसा होता येथें ।। ४ ।।
येथें दुजा कोणी नाहीं कृष्णाविणें । ऐसें वाटे मनें काया वाचा ।। ५ ।।
काया वाचा मन कृष्णीं रत जालें । सकळां लागलें कृष्णध्यान ।। ६ ।।
ध्यान गोविंदाचें लागलें या लोकां । निर्भर हे तुका म्हणे चित्तीं ।। ७ ।।

शब्दार्थ व टीपा :– दुजा–दुसरा, निर्भर–आनंदित.

अर्थ :– दुष्टांचा नाश करून नारायणाने मथुरेत वस्ती केली. १ उग्रसेनाला पित्याप्रमाणे मानून सर्व प्रजाजनांचे पालनपोषण केले. २ ज्यांनी देवाला प्रत्यक्ष पाहिले, त्यांना कोणतेच दुःख होत नव्हते. कंसाच्या दुष्ट शासनाचा सर्वांना विसर पडला होता. ३ देवाला पाहिल्यामुळे कंस नावाचा कोणी होता का नाही, याची आठवणही कोणाला राहिली नव्हती. ४ त्यांना काया-वाचा-मनाने कृष्णाशिवाय मथुरेत दुसरा कोणी राजा नाहीच असे सर्वांना वाटत होते. ५ काया-वाचा-मनाने सर्वजण कृष्णाच्या ठिकाणी निमग्न झाले होते. सर्वांना कृष्णाचे ध्यान लागले होते. ६ तुकाराम महाराज म्हणतात, सर्वांना गोविंदाचे ध्यान लागल्यामुळे सर्व आनंदित झाले होते. ७

४५९६ चिंतले पावलीं जयां कृष्णभेटी । एरवीं ते आटी वांयांविण ।। १ ।।
वासना धरितो कृष्णाविणें कांहीं । सीण केला तिहीं साधनांचा ।। २ ।।

१ दाटल्या.

चाळविले[1] डर्वे एक अहंकारें । भोग जन्मांतरें न चुकती ॥ ३ ॥
न चुकती भोग तपें दानें व्रतें । एका त्या अनंतेंवांचूनिया ॥ ४ ॥
चुकवुनि जन्म देईल आपणा । भजा नारायणा तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – आटी–श्रम

अर्थ – ज्यांनी कृष्णाचे चिंतन केले, त्यांनाच कृष्णाची प्राप्ती होते, इतर साधनांचे श्रम व्यर्थ आहेत १ जे लोक कृष्णाशिवाय इतर विषयाची इच्छा करतात, आणि त्याकरिता जी साधने करतात त्यामुळे त्यांना दुःख होते २ जे देहाच्या ठिकाणी अहंभाव ठेवून लोकांत कीर्ती मिळविण्याकरिता भक्ती करतात, त्यांचे दुःख व त्यांचा जन्ममरणफेरा चुकत नाही ३ एका अनंतावाचून व्रते वैकल्ये केल्याने भोग चुकणार नाही ४ तुकाराम महाराज म्हणतात नारायण आपल्या भक्तांना स्वस्वरूप दाखवून, त्यांचा जन्ममरणफेरा चुकवितो अशा दयाळू नारायणाचे भजन करा ५

४५९७ भजल्या गोपिका सर्व भावें देवा । नाहीं चित्तीं हेवा दुजा कांहीं ॥ १ ॥
दुजा छंद नाहीं तयांचिये मनीं । जागृति सपनीं कृष्णध्यान ॥ २ ॥
ध्यान ज्या हरीचें हरीसि तयाचें । चित्त साही ज्याचें तैशा भावें ॥ ३ ॥
भाग्यें पूर्वपुण्यें आठविती लोक । अवघे सकळिक मथुरेचे ॥ ४ ॥
मथुरेचे लोक सुखी केले जन । तेथें नारायण राज्य करी ॥ ५ ॥
राज्य करी गोपीयादवांसहित । क्रमिले बहुतकाळ तेथें ॥ ६ ॥
तेथें दैत्यीं उपसर्ग केला लोकां । रचिली द्वारका तुका म्हणे ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा – उपसर्ग–त्रास, पीडा

अर्थ – गोपिका काया वाचा मनाने देवाचे भजन करू लागल्या त्यांच्या चित्तात देवावाचून दुसरा विषय नव्हता १ जागृती स्वप्नात एका कृष्णाचेच ध्यान त्या करीत होत्या त्यांच्या मनात दुसरा छंद नव्हता २ जे श्रीहरीचे ध्यान करतात त्यांचे ध्यान हरी करितो त्यांचे चित्तच त्याला साक्षी असते ३ मथुरेच्या लोकांचे पूर्वपुण्य व भाग्य म्हणूनच ते कृष्णाचे चिंतन करीत होते ४ उग्रसेनाचे निमित्त करून कृष्णच स्वतः राज्य करीत असल्यामुळे मथुरेचे लोक आनंदात होते ५ याप्रमाणे देवाने गोपी यादवांसह मथुरेत राज्य केले, व पुष्कळ दिवस तेथे घालविले ६ तुकाराम महाराज म्हणतात परंतु तेथे दैत्यांनी लोकांना फारच उपद्रव देण्यास सुरवात केली म्हणून सर्वांकरिता निर्भय अशी द्वारका निर्माण केली ७

४५९८ रचियेला गाव सागराचे पोटीं । जडोनि गोमटीं नानारत्नें ॥ १ ॥
रत्न खणोखणीं सोनियाच्या भिंती । लागलिया ज्योति रविकळा ॥ २ ॥
कळा सकळ ही गोविंदाचे हातीं । मंदिरें निगुतीं उभारिलीं ॥ ३ ॥
उभारिलीं दुर्गें दारवठे फांजी । कोटि[2] चर्या माजी शोभलिया ॥ ४ ॥
शोभले उत्तम गाव सागरांत । सकळांसहित आले हरि ॥ ५ ॥
आला नारायण द्वारका नगरा । उदार या शूरा[3] मुगुटमणि ॥ ६ ॥
निवडोना याति समानचि केलीं । टणक धाकुलीं नारायणें ॥ ७ ॥
नारायणें दिलीं अक्षई मंदिरें । अभंग साचारें सकळांसि ॥ ८ ॥

१ चालविला दर्भे एका, २ कोठ, ३ सुरा

सकळ ही धर्मशीळ पुण्यवंत । पवित्र विरक्त नारीनर ॥ ९ ॥
रचिलें तें देवें न मोडे कवणा । बळियाचा राणा नारायण ॥ १० ॥
बळबुद्धीनें तीं देवाच सारिखीं । तुका म्हणे मुखीं गाती ओव्या ॥ ११ ॥

शब्दार्थ व टीपा – दारवटे–वेस, उंवरठा, फांजी–नगरकोट, गावकुसू

अर्थ – देवाने समुद्राच्या काठी रत्नजडित अशी द्वारका निर्माण केली १ सोन्याच्या भिंती आणि प्रत्येक मजल्यावर ठिकठिकाणी रत्ने जडविली होती, त्यामुळे जणु काही सर्वत्र सूर्याचे असंख्य दिवे लाविले आहेत, असा भास होत असे २ सर्व कला गोविंदाचे हाती असल्यामुळे त्याने एकापेक्षा एक सुंदर अशी मंदिरे उभारली ३ मोठे किल्ले, आवारे, गावकोट, खिडक्या, दारे निर्माण केली, प्रत्येक घरात कोटीसूर्यांचा प्रकाश शोभत होता ४ चहूकडून समुद्राचा वेढा असलेली ती द्वारका फारच शोभिवंत दिसू लागली श्रीहरी सर्वांसहित त्या द्वारकेत आला ५ उदार व शूर शिरोमणी असलेला नारायण द्वारका नगरीत राहण्याकरिता आला ६ जी जातीने व ज्ञानाने लहान मोठी माणसे होती, त्या सर्वांना देवाने आपल्या समान केले ७ नारायणाने सर्वांना कधीही न भंगणारी, पडणारी घरे दिली ८ द्वारकेतील सर्व लोक अत्यंत धर्मनिष्ठ, पुण्यवान व विरक्त होते ९ नारायण सर्व बलवानाचा राजा असल्यामुळे त्याने रचलेली द्वारका कोणाकडूनही जिंकली किंवा मोडली जाणे शक्य नव्हते १० तुकाराम महाराज म्हणतात, द्वारकेतील लोक बळाने व नीतीने देवासारखेच होते, आणि मुखाने हरिवर्णनपर ओव्या गात होते ११

४५९९ गाती ओव्या कामें करितां सकळें । हालविता बाळें देवावरी ॥ १ ॥
ऋद्धिसिद्धी दासी दारीं ओळगती । सकळ संपत्ति सर्वां घरीं ॥ २ ॥
घरीं बैसलिया जोडलें निधान । करिती कीर्तन नरनारी ॥ ३ ॥
नारीनर लोक धन्य त्याची याति । जयासि संगति गोविंदाची ॥ ४ ॥
गोविंदें गोविंद केले लोकपाळ । चिंतनें सकळ तुका म्हणे ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – ओळगती–आलिंगन देत, विलगत

अर्थ – द्वारकेतील लोक सांसारिक कामे करीत असता व लहान बाळांना पाळण्यात झोपवत असता देवाच्याच ओव्या गात होते १ ऋद्धि सिद्धी दासी होऊन दारात उभ्या राहून त्यांची अखंड सेवा करीत होत्या सर्वांच्या घरी सर्व प्रकारची संपत्ती होती २ त्यांना घरी बसल्या बसल्या अनायासे कृष्णरूप निधान सापडले घरोघरी सर्व लोक कृष्णाचे गुणानुवाद गात होते ३ ज्यांना गोविंदाची संगती लाभली, ते स्त्री पुरुष व जाती कुळ धन्य आहे ४ तुकाराम महाराज म्हणतात गोविंदाने गोविंदनामाचा छंद लावून सर्वच लोकांना गोविंद केले होते ५

४६०० कांहीं चिंता कोणा नाहीं कोणेविशीं । करी द्वारकेसि राज्य देव ॥ १ ॥
द्वारकेसि राज्य करी नारायण । दुष्ट संहारून धर्म पाळी ॥ २ ॥
पाळी वेदआज्ञा ब्राह्मणाचा मान । अतीतपूजन वैष्णवांचें ॥ ३ ॥
अतीत अलिप्त अवघिया वेगळा । नाहीं हा गोपाळा अभिमान ॥ ४ ॥
अभिमान नाहीं तुका म्हणे त्यासि । नेदी आणिकासि धरूं देव ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – अतीत–अतिथी

अर्थ – द्वारकेतील कोणालाही चिंता नव्हती लोक मोठ्या आनंदाने नांदत होते कारण तेथे श्रीकृष्ण राज्य करीत होता १ नारायण दुष्टांचा नाश करून धर्माचे पालन करीत होता २ श्रीकृष्ण स्वतः देवाधिदेव असूनही

वेदाज्ञेचे पालन करीत होता ३ सर्व प्रकारचे वैभव असूनही या कृष्णाला त्याचा अभिमान नव्हता. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देव स्वत निरभिमानी असतो, म्हणूनच तो दुसऱ्यालाही अभिमान धरू देत नाही. ५

४६०१ धरियेले रूप कृष्ण नाम बुथी । परब्रह्म क्षिती उतरले ॥ १ ॥
उत्तम हें नाम राम कृष्ण जगीं । तरावयालागीं भवनदी ॥ २ ॥
दिनानाथब्रिदें रुळती चरणी । वदितील मुनि देव ऋषि ॥ ३ ॥
ऋषीं मुनीं भेटी दिली नारायणें । आणीक कारणें बहु केलीं ॥ ४ ॥
बहु कासावीस जाला भक्तांसाटीं । तुका म्हणे आटी सोसियेली ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– बुथी–उपाधी, खोळ, क्षिती–पृथ्वीवर, आटी–श्रम

अर्थ :– कृष्णरूप व कृष्णनामाची उपाधी स्वीकारून साक्षात परब्रह्म पृथ्वीवर अवतरले होते. १ रामकृष्ण हे नाव जगात भवनदीपार करण्याचे एक उत्तम साधन आहे २ दीनानाथ, पतितपावन ही वचने हरीच्या चरणाच्या ठिकाणी रुळत होती देव व ऋषी मुनी प्रत्येक दिवशी वदन करण्याकरिता येत होते ३ नारायण या ऋषि-मुनींना भेटत होता याप्रमाणे देवाने पुष्कळ अवतारकार्ये केली ४ तुकाराम महाराज म्हणतात, भक्ताना पीडा होत असलेली पाहून देव फार कासावीस झाला, म्हणून त्याने अवतार घेण्याचे कष्ट सोसले. ५

४६०२ सोसियेला आटी गर्भवास फेरे । आयुधाचे भारे वागवितां ॥ १ ॥
वाहोनि सकळ आपुलिये माथां । भार दासा चिंता वाहों नेदी ॥ २ ॥
नेदी काळाचिये हातीं सेवकासि । तुका म्हणे ऐसी ब्रिदावळी ॥ ३ ॥

शब्दार्थ व टीपा – आटी–श्रम, कष्ट

अर्थ – भक्ताकरिता वारवार गर्भवासाचे कष्ट सोसले दुष्टाच्या नाशाकरिता हातात आयुधाचे भार वागविले १ भक्ताचा सर्व भार आपल्या शिरी वाहून त्याना कोणतीही चिंता करू दिली नाही. २ तुकाराम महाराज म्हणतात, आपल्या भक्ताना काळाच्या स्वाधीन तो करीत नाही, हेच त्याचे मुख्य ब्रीद आहे. ३

४६०३ *ब्रिदावळी ज्याचे रुळते चरणीं । पाउले मेदिनी सुखावे त्या ॥ १ ॥*
सुखावे मेदिनी कृष्णाचिये चालीं । कुंकुमें शोभली होय रेखा ॥ २ ॥
होउनि भ्रमर पाउलाचे सुख । घेती भक्त मुख लावूनिया ॥ ३ ॥
याचसाटीं धरियेला अवतार । सुख दिले फार निजदासा ॥ ४ ॥
निज सुख तुका म्हणे भक्ता ठावे । तींहींच जाणावे भोगू त्यासि ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा – मेदिनी–पृथ्वी

अर्थ – ज्याच्या चरणाच्या ठिकाणी ब्रीदावळी शोभत होती, त्याच्या चरणस्पर्शाने पृथ्वी फारच सुखावत होती १ कृष्णाच्या चालण्यामुळे पृथ्वीला फार आनंद होत होता त्याच्या चरणाच्या केशरकस्तुरींच्या रेषा पृथ्वीवर उमटून त्यामुळे ती फार शोभत असे २ भक्तगण भ्रमर होऊन त्याच्या चरणकमलाची गोडी चाखीत होते ३ भक्ताना सुख देण्याकरिताच देवाने अवतार घेतला होता त्याने आपल्या दासाना सर्व प्रकारचे सुख दिले होते. ४ तुकाराम महाराज म्हणतात, देवाचे सुख कसे असते ते एक भक्तानाच माहीत असते, आणि ते कसे भोगावे हे पण तेच जाणतात. ५

४६०४ भोगिला[1] गोपिकां यादवां सकळां । गौळणीगोपाळां गाईवत्सां ॥ १ ॥
गाती धणीवरी केला अंगसंग । पाहिला श्रीरंग डोळेभरि ॥ २ ॥
भक्ति नवविधा तयांसि घडली । अवघीच केलीं कृष्णरूप ॥ ३ ॥
रूप दाखविलें होतां भिन्न भाव । भक्त आणि देव भिन्न नाहीं ॥ ४ ॥
नाहीं राहों दिलें जातां निजधामा । तुका म्हणे आम्हांसहित गेला ॥ ५ ॥

शब्दार्थ व टीपा :– धणीवरी–तृप्ती होईपर्यंत.

अर्थ :– तो आनंद सर्व यादवांनी, गोपी-गोपाळांनी व गाई-वत्सांनी भोगला. १ ते श्रीहरीचे गुण तृप्ती होई-पर्यंत गात होते. संगती करीत होते व श्रीरंगाला डोळे भरून पाहात होते. २ त्यांनाच नवविधा भक्ती घडली व ते त्या योगाने कृष्णरूप झाले. ३ जोपर्यंत भक्तांच्या मनात भेदभाव होता, तोपर्यंत त्यांना सगुणरूप दाखविले. तो जाताच भक्तच देव झाले. त्यामुळे त्यांच्यात भेद राहिला नाही. ४ तुकाराम महाराज म्हणतात, निजधामाला जाताना कोणालाही नेण्याचे शिल्लक ठेवले नाही. तो आमच्यासह वैकुंठाला गेला. ५

४६०५ गेला कोठें होता कोठुनियां आला । सहज व्यापला आहे नाहीं ॥ १ ॥
आहे साच भावें सकळव्यापक । नाहीं अभाविक लोकां कोठें ॥ २ ॥
कोठें नाहीं ऐसा नाहीं रिता ठाव । अनुभवी देव स्वयें जाले ॥ ३ ॥
जातों येतों आम्ही देवाचे सांगात । तुका म्हणे गात देवनाम ॥ ४ ॥

शब्दार्थ व टीपा :– साच–खरा, रिता–रिकामे, ठाव–स्थान.

अर्थ :– देव कोठून आला ? कोठे गेला ? हे काहीच सांगता येत नाही. कारण तो आत्मस्वरूपाने सर्वत्र सहज व्यापक आहे. तात्त्विक दृष्टीने पाहाता तो सर्वत्र खरा आहे आणि अज्ञानी अभाविकांच्या दृष्टीने कोठेच नाही. २ तो नाही, असे कोणतेही स्थान नाही. संत, महात्मे देवाचा अनुभव घेऊन स्वतः देवच झाले. ३ तुकाराम महाराज म्हणतात, आम्ही देवाचे नाम गात देवाबरोबरच येतो आणि त्याच्याबरोबर जातो. ४

४६०६ मना वाटे तैसीं बोलिलों वचनें । केली धिटपणें सलगी देवा ॥ १ ॥
वाणी नाहीं शुद्ध याति एक ठाव । भक्ति नेणें भाव नाहीं मनीं ॥ २ ॥
नाहीं जालें ज्ञान पाहिलें अक्षर । मानी जैसें थोर थोरी नाहीं ॥ ३ ॥
नाहीं मनीं लाज धरिली आशंका । नाहीं भ्यालों लोकां चतुरांसि ॥ ४ ॥
चतुरांच्या राया मी तुझें अंकित । जालों शरणागत देवदेवा ॥ ५ ॥
देवा आतां करीं सरतीं हीं वचनें । तुझ्या कृपादानें बोलिलों तीं ॥ ६ ॥
तुझें देणें तुझ्या[2] समर्पूनि पायीं । जालों उतरायी पांडुरंगा ॥ ७ ॥
रंकाहूनि रंक दास मी दासांचें । सामर्थ्य हें कैचें बोलावया ॥ ८ ॥
बोलावया पुरे वाचा माझी कायी । तुका म्हणे पायीं ठाव द्यावा ॥ ९ ॥

शब्दार्थ व टीपा :– अंकित–सेवक, दास, ठाव–आश्रय, स्थान.

अर्थ :– देवा, माझ्या मनाला वाटले त्याप्रमाणे तुझी यालीला गाइली व अधिकार नसतानाही धैर्य करून तुमच्याशी सलगपणा केला आहे. १ प्रासादिक वाणी नाही, जाती शुद्ध नाही, अव्यभिचारी भक्ती कशी असते ते माहीत नाही, तसेच मनात उत्कट प्रेम नाही. २ मला ज्ञान झाले नाही, ज्ञानाची माझी ओळख पण नाही. थोर

१ भोगिल्या, २ तुज.

लोक मान देतील, असे माझ्याजवळ काही नाही. ३ लोक आपल्याला काय म्हणतील ? याची लाज बाळगिली नाही; शंका धरली नाही. पंडित लोकांना न भिता तुझे वर्णन करता आले त्याप्रमाणे केले आहे. ४ सर्व पंडितांच्या राजा देवाधिदेवा, मी तुझा दास होऊन शरण आलो आहे. ५ देवा, माझे हे बोल मान्य करून घे. कारण तुझ्या कृपेमुळेच मी बोललो आहे. ६ पांडुरंगा, तू दिलेलेच तुला अर्पण करून मी उत्तीर्ण झालो आहे. ७ मी रंकाहून रंक असून दासांचा दास झालो आहे. म्हणून मला तुझी बाललीला वर्णन करण्याचा अधिकार कोठे आहे ? ८ तुकाराम महाराज म्हणतात, तुझे वर्णन करण्यास माझी वाचा पुरी पडेल काय ? याकरिता मला तुझ्या चरणांचा आश्रय दे. ९

४६०७ चारी वेद ज्याची कीर्ती वाखाणिती । प्रत्यक्ष ये मूर्ति विठोबाची ॥ १ ॥
चहुंयुगांचें हे साधन साधिलें । अनुभवा आलें आपुलिया ॥ २ ॥
एवढें करूनि आपण निराळा । प्रत्यक्ष हें डोळां दाखविलें ॥ ३ ॥
दावूनि सकळ प्रमाणाच्या युक्ति । जयजयकार करिती अवघे भक्त ॥ ४ ॥
भक्ति नवविधा पावली मुळची । जनार्दननामाची संख्या जाली ॥ ५ ॥
नवसें ओंव्या आदरें वाचितां । त्याच्या मनोरथा कार्यसिद्धि ॥ ६ ॥
सीमा न करवे आणीक ही सुखा । तुका म्हणे देखा पांडुरंगा ॥ ७ ॥

शब्दार्थ व टीपा :– सीमा–मर्यादा.

अर्थ :– चारी वेद ज्याची कीर्ती वर्णन करतात, ती प्रत्यक्ष विठोबाची मूर्ती आहे. १ चारी युगांचे साधन प्राप्त झाले. ते आपल्या अनुभवाला आले. २ एवढे सर्व करून तो आपण मात्र वेगळा राहिला हे प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी दाखवितो. ३ आपल्या सर्व युक्त्या तो दाखवितो, म्हणून सर्व भक्त त्याचा जयजयकार करतात. ४ नवविधा भक्ती मूळचीच होती ती पावली व या जनार्दनाच्या नामाची संख्या पूर्ण झाली. ५ नवसाने या ओव्या आदराने वाचल्यास त्याचे मनोरथ सिद्ध होतील. ६ तुकाराम महाराज म्हणतात, पांडुरंगा, त्याच्या सुखाची मर्यादाही मला सांगवत नाही. ७.

## ॥ इति बालक्रीडा संपूर्णमस्तु ॥

— खंड तिसरा समाप्त —

# तृतीय खंडातील अभंगसूची

## ख



## ग

## म